साहित्याचार्य श्री. बाळशास्त्री हरदास

यांचीं

# महाभारतावरील व्याख्यानें

# प्रकाशकाचें निवेदन

नागपूर येथील साहित्याचार्य श्री. बाळशास्त्री हरदास यांचीं यंदा पुणें येथें दि. २६ मार्च १९५१ ते २३ एप्रिल १९५१ पर्यन्त ( म्हणजे शिव-जयंतीपासून हनुमानजयंतीपर्यन्त) महाभारतावर व्याख्यानें झालीं. हीं एकंदर व्याख्यानें उपसंहारासह २६ झालीं असून तीं आतां पुस्तकरूपानें प्रकाशित करण्यांत येत आहेत.

मागील वर्षी त्यांचीं अशींच रामायणावर १४ व्याख्यानें झालीं होतीं व तींही त्या वेळीं प्रसिद्ध करण्यांत आलीं आहेत.

श्री. बाळशास्त्री हरदास यांचा रामायण–महाभारताचा व्यासंग किती प्रचंड, अभ्यास किती सूक्ष्म व वक्तृत्व किती अमोघ आहे याचा आतां महाराष्ट्रीयांना चांगला परिचय आहे.

पुढील वर्षी त्यांची पुण्यास भगवान् श्रीकृष्णांवर व्याख्यानमाला व्हावयाची संकलिपत आहे. त्यांचेंही असेंच पुस्तक तयार झालें म्हणजे भारताचे जे महान् सांस्कृतिक ग्रंथ रामायण व महाभारत त्यांचें वास्तव स्वरूप साररूपानें मराठी भाषाभाषिकांना उपलब्ध होऊं शकेल. असें व्हावें एवढीच इच्छा आहे.

गोकुळअष्टमी शके १८७३ }
दि. २४ ऑगस्ट १९५१ }

**प्रकाशक**

# ★ अर्पण-पत्रिका ★



गुरुवर्य अप्रबुद्ध,
गुरुवर्य म. म. कृष्णशास्त्री घुले व
गुरुवर्य वेदांतवाचस्पति भाऊशास्त्री वझे
यांच्या चरणांना सविनय वंदन करून
माझी ही व्याख्यानमाला
युगप्रवर्तक छत्रपति श्री शिवाजी महाराज व
युगप्रवर्तक लो. टिळक
यांना मी समर्पण करतों.

बाळशास्त्री हरदास

# अनुक्रमणिका

# १. प्रास्ताविक

श्रीमन्महाभारतावरील या व्याख्यानमालेचा प्रारंभ छत्रपति शिवाजीमहाराजांसारख्या युगपुरुषाच्या जन्मदिवशीं होत आहे ही अत्यंत सद्भाग्याची गोष्ट आहे. श्रीमहाराजांना महाभारतापासूनच हिंदुराष्ट्राच्या पुनरुत्थानाची स्फूर्ति झाली असें म्हणतात. श्रीशिवाजी महाराजांसारख्या सर्वश्रेष्ठ विभूतीलाही स्फूर्ति देण्याचें सामर्थ्य असलेला हा ग्रंथराज म्हणजे काय आहे हें या व्याख्यानांतून पहाण्याचा आपण प्रयत्न करणार आहोंत.

महाभारतासारख्या विषयावर पुण्यासारख्या भारतीय संस्कृतीचें विद्यापीठ असलेल्या नगरीं व्याख्यान द्यावयास सिद्ध होत असतांना मी एक प्रकारचें धाडसच करीत आहें याची मला पूर्णपणें जाणीव आहे. महाभारताच्या संशोधनाची अखंड तपस्या करणारे तपस्वी व त्यांतील प्रत्येक शब्दाचा कीस काढण्यांत क्षण नि क्षण वेचणारे विद्वान् आजही पुण्यांत विद्यमान आहेत. महाभारतांतील सर्वश्रेष्ठ प्रकरण जें श्रीमत् भगवद्गीता तीवर भगवत्पूज्यपाद श्रीमत् शंकराचार्यांनंतर ज्याचें नांव उच्चारणें योग्य असा गीतेचें रहस्य प्रकाशांत आणणारा महान् भाष्यकार याच नगरीनें भारताला दिलेला आहे. महाभारताची शुद्ध आवृत्ति काढण्यासाठीं कटिबद्ध झालेल्या संशोधक संस्था येथें कार्य करीत आहेत. अशा या शहरांत आजपर्यंत कोणीही न सांगितलेलें महाभारताचें एकादें नवेंच रहस्य मी सांगूं शकेन असा अभिनिवेश कोणालाही धरतां येणार नाहीं.

ज्याप्रमाणें या नगरीचें स्थानमाहात्म्य म्हणून या विषयाला प्रारंभ करतांना माझें अंतःकरण कंपित होऊन जीभ अडखळते, त्याचप्रमाणें विषयाच्या व्यापक सर्वश्रेष्ठतेमुळेंही माझी स्थिति भांबावल्यासारखी होते. सर्व विद्यांची अधिष्ठात्री देवता, व भार-

व्याख्यान १ लें, दि. २६ मार्च १९५१

ताच्या सांस्कृतिक वाङमयांत पूज्यता पावलेले मंगलमूर्ति गजाननही ज्या ग्रंथाच्या गौरवामुळें जागोजागीं चिंतनशील बनले, त्या या ग्रंथाच्या रहस्याचें उद्घाटन मी पामर काय करणार! श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या विनीत शब्दांत मी आपणांस येवढीच विनंति करतों कीं, केवळ माझी वाणी पवित्र होण्यासाठींच मी हा वाग्व्यापार करीत असल्यामुळें आपण " अति हळुवारपण चित्ता आणुनिया " तो ऐकावा. मला महाभारत कितपत समजलें आहे तें आपल्यासमोर मी मांडणार आहें. त्यांतील त्रुटी आपण भरून काढाव्या व नर-नारायणांच्या श्रेष्ठतेचें वर्णन करणाऱ्या या ग्रंथाच्या रसग्रहणांत आपण व मी आपल्या जीवनांतील कांहीं क्षण सार्थकीं लावावे एवढीच माझी इच्छा आहे.

## ग्रंथविस्तार

श्रीमन्महाभारत हा एक लक्ष श्लोकांचा ग्रंथ आहे. त्याच्या विस्तारामुळेंच तो ग्रंथ एककर्तृक नसावा असें पुष्कळांनीं प्रतिपादन केलें आहे. पण केवळ विस्तार म्हणून त्याच्या एककर्तृकत्वावर ऐतिहासिक दृष्टीनें आक्षेप घेतां येत नाहीं. एकनाथ महाराजांच्या कालखंडांत दासोपंत गोसावी या नांवाच्या एका संत कवीनें सव्वा लक्ष पदसंख्येचा 'गीतार्णव' नांवाचा ग्रंथ व तितक्याच पदसंख्येचा 'पदार्णव' नांवाचा दुसरा ग्रंथ निर्माण करून शिवाय इतर अनेक गद्यपद्यात्मक संस्कृत व मराठी ग्रंथ निर्माण केले असा मराठी वाङमयाच्या इतिहासांत उल्लेख आहे. अडीच लक्ष पदसंख्येची निर्मिति करूनही ग्रंथकाराची नवीन ग्रंथनिर्मितीची शक्ति जर शिल्लक राहूं शकते, तर व्यासांसारख्या दिव्य प्रतिभेच्या व्यक्तीनें एक लक्ष श्लोकांचा ग्रंथ निर्माण करणें ही गोष्ट अशक्य कोटींतील कां वाटावी?

महाभारताचें महत्त्व भारतवर्षाच्या सांस्कृतिक वाङमयांत अपरंपार आहे. ब्रह्मयज्ञ नांवाच्या आन्हिक क्रियेंत महाभारताचा 'स्वाध्याय' म्हणून उल्लेख येतो. ऋग्वेदाच्या खालोखाल महाभारताला पूज्य मानण्यांत येतें. जगांतील सर्व महाकाव्यांत विस्तारानें

महाभारत सर्वश्रेष्ठ आहे. 'इलियड' (Iliad) आणि 'ओडेसी' (Odyssey) या दोघांना एकत्र केलें तर जेवढा ग्रंथ होईल त्याच्या आठपट तरी महाभारत मोठें आहे. रामायणापेक्षां तें चार पटीनें मोठें म्हणतां येईल. शिवाय हरिवंशाची जर खिलपर्व म्हणून महाभारतांतच असलेली गणना ध्यानांत घेतली तर ही संख्या अधिकच वाढते. महाभारताला केवळ महाकाव्य म्हणून म्हणतां येणार नाहीं असा आपला अभिप्राय "History of Indian Literature" या भारतीय वाङ्मयाच्या आपल्या इतिहासग्रंथांत डॉ. विन्टरनिट्झ (Winter Nitz) यांनीं व्यक्त केला आहे. ते म्हणतात :

"It is only in a very restricted sense that we may speak of the Mahabharat as an 'Epic' and a 'Poem'. Indeed in a certain sense, the Mahabharat is not one poetic production at all, but rather a whole literature"

## ग्रंथाचें स्वरूप

महाभारतांत केवळ कुरुपांडवांच्या युद्धाचा इतिहास आहे अशी जरी रूढ समजूत असली तरी प्राचीन सांस्कृतिक संकेत तसे नाहींत. कुरुपांडवांच्या युद्धाचा इतिहास सांगण्याच्या निमित्तानें वाङ्मय या शब्दानें अभिप्रेत असलेलें आर्य राष्ट्राचें सर्व कांहीं या ग्रंथांत समाविष्ट झालेलें आहे. महाभारताचा प्राचीन टीकाकार नीलकंठ आपल्या टीकेच्या प्रारंभींच्या प्रस्तावनेंत असें म्हणतो कीं,

"इह खलु भगवान्पाराशर्यः परमकारुणिको मन्दमध्यमतीननुगृहीतुं चतुर्दश विद्यास्थानरहस्यान्येकत्र प्रदर्शयिषुर्महाभारताख्यमितिहासं प्रणेष्यन्प्रारिप्सितस्य ग्रन्थस्य निष्प्रत्यूहपरिपूरणाय प्रचयगमनाय च कृतं मंगलं शिष्यशिक्षार्थं श्लोकरूपेण निबध्नन्नर्थात्तत्र प्रेक्षावत्प्रवृत्त्यंगमभिधेयादि दर्शयति ।"

याचा तात्पर्यार्थ असा कीं, समाजांतील सर्व थरांना मार्गदर्शन करून त्यांच्यावर कृपा करावी या हेतूनें परमदयाळू व्यास महर्षींनीं चौदा विद्यांच्या रहस्यांचें एकत्र दिग्दर्शन करण्याच्या हेतूनें हा ग्रंथ

निर्माण केला आहे. व्यासांनीं महाभारताच्या रूपानें कोणतें महत्त्वाचें कार्य पार पाडलें याचें जें वर्णन महाभारतांत अगदीं प्रारंभींच्याच अध्यायांत केलें आहे त्यांतीलच कांहीं उतारे मी येथें उद्धृत करतों म्हणजे त्यावरून प्रत्यक्ष महाभारतांतच महाभारताचें जें स्वरूप सांगण्यांत आलें आहे त्याची कल्पना येईल :--

तस्याख्यानवरिष्ठस्य विचित्रपदपर्वण: ।
सूक्ष्मार्थन्याययुक्तस्य वेदार्थैर्भूषितस्य च ।। १८

भारतस्येतिहासस्य पुण्यां ग्रन्थार्थसंयुताम् ।
संस्कारोपगतां ब्राह्मीं नानाशास्त्रोपबृंहिताम् ।। १९

वेदैश्चतुर्भि: संयुक्तां व्यासस्याद्भुतकर्मण: ।
संहितां श्रोतुमिच्छाम: पुण्यां पापभयापहाम् ।। २१

आचख्यु: कवय: केचित्संप्रत्याचक्षते परे ।
आख्यास्यन्ति तथैवान्ये इतिहासमिमं भुवि ।। २६

इदं तु त्रिषु लोकेषु महज्ज्ञानं प्रतिष्ठितम् ।
विस्तरैश्च समासैश्च धार्यते यद् द्विजातिभि: ।। २७

अलङ्कृतं शुभै: शब्दै: समयैर्दिव्यमानुषै: ।
छन्दोवृत्तैश्च विविधैरन्वितं विदुषां प्रियम् ।। २८

तपसा ब्रह्मचर्येण व्यस्य वेदं सनातनम् ।
इतिहासमिमं चक्रे पुण्यं सत्यवतीसुत: ।। ५४

ब्रह्मन् वेदरहस्यं च यच्चान्यत्स्थापितं मया ।
साङ्गोपनिषदां चैव वेदानां विस्तरक्रिया ।। ६२

इतिहासपुराणानामुन्मेषं निर्मितं च यत् ।
भूतं भव्यं भविष्यं च त्रिविधं कालसंज्ञितम् ।। ६३

जरामृत्युभयव्याधिभावाभावविनिश्चय: ।
विविधस्य च धर्मस्य ह्याश्रमाणां च लक्षणम् ।। ६४

चातुर्वर्ण्यविधानं च पुराणानां च कृत्स्नश: ।
तपसो ब्रह्मचर्यस्य पृथिव्याश्चन्द्रसूर्ययो: ।। ६५

ग्रहनक्षत्रताराणां प्रमाणं च युगैः सह।
ऋचो यजूंषि सामानि वेदाध्यात्मं तथैव च ।। ६६
न्यायशिक्षाचिकित्सा च दानं पाशुपतं तथा ।
हेतुनैव समं जन्म दिव्यमानुषसंज्ञितम् ।। ६७
तीर्थानां चैव पुण्यानां देशानां चैव कीर्तनम् ।
नदीनां पर्वतानां च वनानां सागरस्य च ।। ६८
पुराणां चैव दिव्यानां कल्पानां युद्धकौशलम् ।
वाक्यजातिविशेषाश्च लोकयात्राक्रमश्च यः ।। ६९
यच्चापि सर्वगं वस्तु तच्चैव प्रतिपादितम् ।
परं न लेखकः कश्चिदेतस्य भुवि विद्यते ।। ७०
अज्ञानतिमिरान्धस्य लोकस्य तु विचेष्टतः ।
ज्ञानाञ्जनशलाकाभिर्नेत्रोन्मीलनकारकम् ।। ८४
धर्मार्थकाममोक्षार्थैः समासव्यासकीर्तनैः ।
तथा भारतसूर्येण नृणां विनिहतं तमः ।। ८५
पुराणपूर्णचन्द्रेण श्रुतिज्योत्स्नाः प्रकाशिताः ।
नृबुद्धिकौरवाणां च कृतमेतत्प्रकाशनम् ।। ८६
इतिहासप्रदीपेन मोहावरणघातिना ।
लोकगर्भगृहं कृत्स्नं यथावत्संप्रकाशितम् ।। ८७
सर्वेषां कविमुख्यानामुपजीव्यो भविष्यति ।
पर्जन्य इव भूतानामक्षयो भारतद्रुमः ।। ९२
भ्रूणहत्यादिकं चापि पापं जह्यादसंशयम् ।
य इमं शुचिरध्यायं पठेत्पर्वणि पर्वणि ।। २६९
पुरा किल सुरैः सर्वैः समेत्य तुलया धृतम् ।
चतुर्भ्यः सरहस्येभ्यो वेदेभ्यो ह्यधिकं यदा ।। २७२
तदाप्रभृति लोकेऽस्मिन्महाभारतमुच्यते ।
महत्त्वे च गुरुत्वे च ध्रियमाणं यतोऽधिकम् ।। २७३
महत्त्वाद्भारवत्त्वाच्च महाभारतमुच्यते ।
निरुक्तमस्य यो वेद सर्वपापैः प्रमुच्यते ।। २७४

महाभारत, आदिपर्व अध्याय १ ला

यो विद्याच्चतुरो वेदान् साङ्गोपनिषदो द्विजः ।
न चाख्यानमिदं विद्यान्नैव स स्याद्विचक्षणः ।। ३८२

अर्थशास्त्रमिदं प्रोक्तं धर्मशास्त्रमिदं महत् ।
कामशास्त्रमिदं प्रोक्तं व्यासेनामितबुद्धिना ।। ३८३

श्रुत्वा त्विदमुपाख्यानं श्राव्यमन्यन्न रोचते ।
पुंस्कोकिलगिरं श्रुत्वा रूक्षा ध्वांक्षस्य वागिव ।। ३८४

इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धयः ।
पञ्चभ्य इव भूतेभ्यो लोकसंविधयस्त्रयः ।। ३८५

अस्याख्यानस्य विषये पुराणं वर्तते द्विजाः ।
अन्तरिक्षस्य विषये प्रजा इव चतुर्विधाः ३८६

क्रियागुणानां सर्वेषामिदमाख्यानमाश्रयः ।
इन्द्रियाणां समस्तानां चित्रा इव मनःक्रियाः ।। ३८७

अनाश्रित्यैतदाख्यानं कथा भुवि न विद्यते ।
आहारमनपाश्रित्य शरीरस्येव धारणाम् ।। ३८८

इदं कविवरैः सर्वैराख्यानमुपजीव्यते ।
उदयप्रेप्सुभिर्भृत्यैरभिजात इवेश्वरः ।। ३८९

अस्य काव्यस्य कवयो न समर्था विशेषणे ।
साधोरिव गृहस्थस्य शेषास्त्रय इवाश्रमाः ।। ३९०

महाभारत, आदिपर्व अध्याय २

यावरून महाभारत म्हणजे निवळ कुरुपांडव युद्धाचा इतिहास नसून आर्यांचें तत्त्वज्ञान, धर्मशास्त्र, नीतिशात्र, राज्यशास्त्र, व्यवहारशास्त्र, कामशास्त्र, इतिहासशास्त्र इत्यादि सर्व शास्त्रांचें एकत्र विस्तारपूर्वक दिग्दर्शन करणारा महान् सांस्कृतिक ज्ञानकोशच होय याची कल्पना येईल. या सांस्कृतिक ज्ञानकोशाच्या महत्तेचें वर्णन मी माझ्या तुटक्या वाणीनें करण्यापेक्षां श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या तेजस्वी शब्दांतच तें आपणांस सांगतों. ज्ञानदेव आपल्या भावार्थदीपिकेच्या प्रस्तावनेंत महाभारताचें वर्णन करतांना म्हणतातः—

आतां अवधारा कथा गहन । जे सकळ कौतुका जन्मस्थान ।
कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ।। २८
ना तरी सर्व सुखाची आदि । जे प्रमेय महानिधि ।
नाना नवरस सुधाब्धि। परिपूर्ण हे ।। २९
कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ ।
शास्त्रजातां वसौट । अशेषांचे ।। ३०
ना तरी सकळ धर्माचें माहेर । सज्जनांचें जिव्हार ।
लावण्यरत्न भाण्डार । शारदेचें ।। ३१
भानूतेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसें उजळिलें ।
तैसें व्यासमती कवळिलें । मिरवे विश्व ।। ३९
जें अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरूपम
परम मंगलधाम । अवधारीजो ।। ४९

ज्ञानेश्वरी अ. १

या महान् सांस्कृतिक ज्ञानकोशांत आर्य राष्ट्राच्या जीवनदृष्टीचें व ध्येयवादाचें यथार्थ व संपूर्ण दिग्दर्शन झालेलें आहे. त्याची मधुरता व त्याचा प्रभाव इतका विलक्षण आहे कीं, दोडदोन सहस्रकें तरी भारतीय मनावर त्यानें अलौकिक प्रभुत्व गाजविलेलें असून परकीय लोकांचा या वाङ्मयाच्या महासागराशीं जेव्हां संबंध आला तेव्हां त्यांतील अत्यंत तेजस्वी रत्नांनीं त्यांच्याही मनावर विलक्षण परिणाम करून त्यांना सदांचे भारून टाकलें आहे. कसें तें आपण पुढच्या व्याख्यानांत पाहूं.

# २. महाभारताचें श्रेष्ठत्व

महाभारताच्या रचनेनंतर भारतीय मनावर त्यानें जें अप्रतिहत अधिराज्य गाजविलें तें खरोखरी अपूर्व आहे. व्याकरणशास्त्र, मंत्रशास्त्र, राज्यशास्त्र, नीतिशास्त्र, व्यवहारधर्म, आपद्धर्म, मोक्षधर्म, तत्त्वज्ञान, काव्य, छंदःशास्त्र, नाटकादि इतर ललित कृति या सर्व क्षेत्रांतून ख्रिस्तपूर्व पांचव्या शतकापासूनच महाभारताचे उल्लेख येतात. विख्यात मीमांसक कुमारिलभट्ट व भगवत्पूज्यपाद श्रीमदाद्य शंकराचार्य हे तर श्रुति म्हणूनच त्याचा उल्लेख करतात. भासाचीं बहुतेक नाटकें महाभारतांतील कथानकांवर आधारलेली आहेत. संस्कृत वाङ्मयांत महाकवि म्हणून ज्यांचा उल्लेख येतो, त्यांच्या कृति महाभारतांतील उपकथानकांवर आधारलेल्या आहेत. हें पाहिलें म्हणजे " इतिहासोत्तमादस्मात् जायन्ते कविबुद्धयः " ही महाभारताच्या कर्त्याची आत्मप्रत्ययपूर्वक वृत्ति सार्थ आहे असें वाटूं लागतें. " कनिष्ठिका सार्थवती बभूव " असें ज्याचें संस्कृत साहित्यांतून यथार्थ वर्णन येतें व शारदेचा विभ्रम म्हणून ज्याला गौरविण्यांत येतें, त्या कविकुलगुरु कालिदासाची विख्यात कृति जें 'अभिज्ञान शाकुंतल' नाटक तें महाभारतांतील शाकुंतलोपाख्यानावर आधारलेलें आहे. शाकुंतलाची योग्यता स्वतंत्र वर्णन करून सांगण्याची आवश्यकता नाहीं. विख्यात जर्मन कवि गटे याला स्वर्ग व पृथ्वी यांच्या उत्फुल्ल वैभवाच्या एकीकरणाचा महान् साक्षात्कार शाकुंतलानें झाला होता हें प्रसिद्ध आहे. संस्कृत भाषेंतील दुसरा महाकवि माघ याच्या 'शिशुपालवधम्' या प्रौढ, सुश्लिष्ट व अर्थगंभीर काव्याची रचना महाभारतांतील सभापर्वांतर्गत शिशुपाल वधाच्या प्रकरणाच्या आश्रयानें झालेली आहे. 'विद्वदौषध' असें ज्याचें यथार्थ वर्णन करतात तें श्रीहर्षाचें विख्यात नैषध काव्य महाभारतांतील नलोपाख्यानावर आधारलेलें आहे. तात्पर्य संस्कृतां-

---

व्याख्यान दुसरें, दि. २७ मार्च १९५१

तील सर्व श्रेष्ठ महाकवींच्या प्रतिभाविलासाचें अधिष्ठान व जीवन-धन म्हणजे महाभारत होय.

## व्यासोच्छिष्ट जगत्त्रय

भारतवर्षांतील सर्व प्रांतिक भाषांतून महाभारतावर जशी स्वतंत्र काव्यें निर्माण झालीं त्याचप्रमाणें महाभारताचीं अनेक रूपांतरेंही झालेलीं आहेत व ती सर्व अतिशय लोकप्रियही आहेत. मराठी भाषेंत योगींद्र श्रीज्ञानदेवांपासून तों मुक्तेश्वर, मोरोपंत व वामन पंडितांपर्यंत किंबहुना, रघुनाथ पंडितांपर्यंतच्या सर्व प्राचीन महाकवींच्या प्रतिभेचे उन्मेष महाभारतानेंच घडविले आहेत. अर्वाचीन खाडिलकरांसारखे नाटककार राजकीय प्रचाराप्रीत्यर्थ आपल्या कृति निर्माण करूं लागले तों त्यांना महाभारताइतकें दुसरें समर्थ साधन त्या प्रसारासाठी आढळलें नाहीं. नुसतें वाङ्मयात्मक जीवनच नव्हे, तर व्यवहार्य जीवनदेखील महाभारतावर आधारलें गेले आहे. भारताचें सर्व सांस्कृतिक जीवन महाभारतप्रणीत धर्माधर्माच्या व्याख्यांच्या सारणींतूनच निर्माण झालें आहे. महाभारतांत वर्णन केलेल्या युद्धशास्त्रांतील डावपेचांचा व व्यूहरचनेचा उपयोग भारतवर्षांतील लोक अलेक्झांडर दि ग्रेटच्या काळापर्यंत करीत असत व शेवटीं त्या काळांतील एका प्रजासत्ताकाच्या शकट व्यूहानेंच अलेक्झांडरच्या ग्रीक सैनिकांना कच खाऊन व माघार घेऊन परत फिरण्यास भाग पाडलें असा इतिहास आहे. व्यष्टि-समष्टींचे धर्म, विधिविधानें व प्रायश्चित्तें, आबालवृद्ध स्त्रीपुरुषांचीं वैयक्तिक, गृह्य, व सामाजिक कर्तव्यें, त्यांच्या जीवनाचें आध्यात्मिक साध्य व त्याचीं साधनें, चातुर्वर्ण्यात्मक समाजरचना, व त्यांचीं कर्तव्यें या सर्वांचें महाभारतांत केलेलें दिग्दर्शन प्रमाण मानून आर्य राष्ट्राचें सांस्कृतिक जीवन सहस्रावधि वर्षें चाललेलें आहे. भारतांतून निर्माण झालेला भक्तिसंप्रदाय तर शतकानुशतकें भारतीय मनावर वर्चस्व गाजवीत आहे. राष्ट्रीय अधःपतनाच्या वेळीं या भक्तिसंप्रदायाच्या पुनरुज्जीवनानें महाराष्ट्रांत श्रीज्ञानेश्वर महाराजांपासूनची

संतपरंपरा निर्माण झाली तर उत्तरेंत गोस्वामी श्रीतुलसीदास भक्तकवि श्रीसूरदास प्रभृतींनीं राष्ट्रीयतेच्या घटक तत्त्वांवर भारतीय समाज स्थिर केला व त्याचें देदीप्यमान पुनरुत्थान घडवून आणलें. कर्मयोगाचा दिव्य संदेश स्वतःच्या भाष्यांतून देऊन लोकमान्य टिळकांनीं आधुनिक युगांत महाभारताच्या साहाय्यानें राष्ट्रीय पुनरुत्थानाचें आंदोलन उत्पन्न केलें. गीतारहस्यानें आमच्या आंदोलनांना नैतिक व आध्यात्मिक अधिष्ठान दिलें अशी बंगाली क्रांतिकारकांची व त्यांच्या आंतरप्रांतीय कीर्तीच्या नेत्यांची साक्ष आहे. तात्पर्य महाभारताच्या अपार सामर्थ्याला दिशा व काळाचीं बंधनें नसून पुनरुत्थानाच्या प्रत्येक क्षणीं त्याचा जसा उपयोग झाला आहे त्याचप्रमाणें प्रत्येक नव्या समस्येला त्याच्यांतून उत्तर मिळत गेलें आहे. म्हणूनच "व्यासोच्छिष्ट जगत्त्रय" असे श्री ज्ञानेश्वर महाराजांनीं उद्गार काढले आहेत.

श्रीमन्महाभारतांत असें म्हटलें आहे कीं 'यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत् क्वचित् !" जें येथें प्रतिपादन केलें आहे तेंच सर्व विश्वांत आहे व जें येथें नाहीं असें कोठेंही कांहीं अपूर्व आढळावयाचें नाहीं. याचा अर्थ असा आहे कीं, विश्वाच्या सर्व व्यापारांचें व त्याच्या पाठीमागच्या शाश्वत आणि अशाश्वत अशा सर्व प्रकारच्या प्रेरणांचें महाभारतांत संपूर्ण दिग्दर्शन झालेलें आहे. नामें व रूपें कितीही बदललीं व साधनांच्या बाह्य स्वरूपांत केवढाही थारेपालट घडून आला तरी मानसशास्त्रज्ञांचें असें मत आहे कीं, सामाजिक व वैयक्तिक मनोवृत्ति व तिचे नैसर्गिक व्यापार अनादिकालापासून एकरूपच असतात व त्यांच्याच वेगवेगळ्या प्रकारच्या विहरणाचा व्यापार म्हणजेच मानवी इतिहासाचा ओघ होय.जो काय बदल किंवा जी काय भिन्नता असेल ती त्या विहरणाच्या बाह्य कवचापुरतीच असते. अंतःप्रेरणा व त्यांचे संघर्ष तेच चालू असतात. महर्षि व्यासांनीं ही गोष्ट ओळखून या विहरणाचें व त्याच्या तरल अशा गतीचें आणि त्यामुळें घडून येणाऱ्या परिणामांचें जें भव्य चित्र महाभारतांत चित्रित केलें आहे तें इतकें सर्वंकष स्वरूपाचें आहे कीं,

इतिहासाच्या ओघांत व्यक्ति व समाजाच्या अवस्थेंतील नांवें, रूपें, व साधनांचें दृश्यस्वरूप कितीही बदललें तरी प्रत्येक संघर्षाच्या व साम्याच्या मुळाशीं त्याच त्या अंत:प्रेरणा व त्यांचेच विहार आढळल्यावांचून राहणार नाहींत. व म्हणूनच जें महाभारतीं नाहीं "तें नाहींच लोकत्रयीं" ही ज्ञानदेवांची उक्ति अगदीं सार्थ ठरते.

## नवरस सुधाब्धि

काव्य म्हणून महाभारताचा विचार केला तर नवरसांचा जो अति भव्य व उत्कट आविष्कार महाभारतांत दृष्टोत्पत्तीस येईल त्याच्यासमोर कोणत्याही कवीची प्रतिभा विनत झाल्यावांचून राहणार नाहीं. रसराज शृंगाराचें नलदमयंतीसारख्या उपाख्यानांतून जें आविष्करण झालें आहे त्यानें कवि, चंपूकार व शब्दसृष्टीचे इतर अनेक ईश्वर यांना तर खाद्य पुरविलेंच आहे पण इतर अनेकांच्या प्रतिभेला अजूनही फुलोरा आणण्याचें त्यांत सामर्थ्य आहे. भीष्मांच्या रूपानें महाभारतकारांनीं विशुद्ध वीररसाचा जो आविष्कार केला आहे तो केवळ अपूर्व होय. संपूर्ण भीष्मपर्व म्हणजे त्या रसाचें महान् विधानक होय. वीररसाचा रौद्र वा भयानक रसाशीं झालेला शबलित आविष्कार सर्वत्र आढळेल. वीररसाचा शबलित परंतु उत्कट आविष्कार द्रोणपर्वांतील अभिमन्यूच्या युद्धांत दृष्टीस पडतो. पण भीष्मपर्वांतील वीररस संमिश्र नसून शुद्ध आहे. त्यांत अंगांगीभाव देखील नाहीं हें त्याचें खरें वैशिष्टय होय. संस्कृत साहित्यशास्त्रांत वीररसाचा स्थायीभाव उत्साही दाखविलेला आहे. बहुधा महाकवींच्या काव्यांतून वीररसाचा जो आविष्कार होत असतो तो रौद्रांतच पर्यवसित होतो. कारण विशुद्ध स्वरूपांत क्रोध या स्थायी भावाशीं मुळींच भेसळ न झालेला असा उत्साहाचा आविष्कार सहसा कोणाला करतां येत नाहीं. वीररस म्हटला कीं, त्यांत युद्ध आलेंच व युद्ध म्हटलें कीं, त्यांत क्रोधाचा भाग आलाच. महाभारताच्या भीष्मपर्वांत असें आढळावयाचें नाहीं. या पर्वाच्या नायकाच्या अंत:करणांत केवळ क्षात्र कर्तव्यपालनाचा अपूर्व उत्साह असून त्यांत प्रतिपक्षांविषयीं मुळींच क्रोध नाहीं. उलट, त्यांतील

विशेष कुशल रणपंडितांविषयीं एक प्रकारच्या वात्सल्यमिश्रित कौतुकाचा आविष्कार आहे. उत्साह या स्थायी भावाचा व वीररसाचा इतका विशुद्ध आविष्कार व्यासावांचून दुसऱ्या कोणाचीही प्रतिभा आजवर करूं शकलेली नाही. निदान माझ्या तरी आढळांत नाही.

वीररसाप्रमाणेंच महाभारतांतील करुण रसाचा आविष्कार देखील अनुपम व अलौकिक आहे. उपाख्यानांतून देखील महाभारतानें नवरसांचे दिव्य व परिपूर्ण आविष्कार करून दाखविले आहेत. तर मग प्रत्यक्ष आख्यानाविषयीं बोलावयासच नको. अभिमन्युवधानंतरचा सुभद्रा, कुंती, द्रौपदी, व युधिष्ठिर यांचा विलाप, पांडवांच्या शिबिरांतील स्मशान शांतता, व अर्जुनाचे शोकोद्‌गार यांनीं कोणाचेंही अंतःकरण द्रवल्यावांचून राहणार नाहीं. अपार पराक्रमाच्या आविष्कारानंतर त्यांतूनच उत्पन्न झालेलें एक करुण वातावरण कोणाच्याही अंतःकरणाची सदाची पकड घ्यावयास समर्थ आहे. भीषण महायुद्धांत भारतांतील बहुतेक सर्व वीरश्रेष्ठांचें पतन झाल्यानंतर त्यांच्या स्त्रियांच्या दुःस्थितीच्या व विलापांच्या वर्णनासाठीं निर्माण झालेलें स्वतंत्र स्त्रीपर्व तर करुण रसाचें आगरच आहे. कर्ण आपला बंधु आहे हें समजल्यावर युधिष्ठिरानें केलेला विलाप आजही सर्वांच्या अंतःकरणाला चटका लावावयास पूर्ण समर्थ आहे. आणि तें द्रौपदीवस्त्रहरणाचें करुणामय दृश्य! त्याची तुलना तरी कोणाला दुसऱ्या कशाशीं करतां येईल काय? एकवार भारतवर्षाची सम्राज्ञी होऊन जिला अभिषेक झाला, पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णानें जिला आपली भगिनी म्हणून मानलें, ती महामती याज्ञसेनी मदांध सत्ताधिपाकडून भर सभेंत केस धरून फरफटत ओढीत आणली जात आहे, तिच्या केसांना हिसडे देत तिची अब्रू चवाठ्यावर मांडण्याचा निकराचा प्रयत्न सुरू आहे, डोळ्यांतून अनिवार अश्रुसरित् कोसळत आहे, व अशा स्थितींत खालीं माना घालून बसलेल्या पराक्रमी कुरुवृद्धांना "मी दासी आहें काय?" असा प्रश्न ती विचारीत आहे हें दृश्य नुसतें कल्पनेंत आल्यावरही

ज्याचे डोळे पाणवणार नाहींत व अंतःकरण पाझरणार नाहीं त्या महापुरुषाची गणना "स वै मुक्तोऽथवा पशुः" या कोटींतच करावी लागेल.

घटोत्कच युद्ध, गीतेंतील सुविख्यात विश्वरूपदर्शन, द्रौपदीला वस्त्रें पुरविण्याचा प्रसंग, कृष्णशिष्टाईच्या वेळीं भगवान् श्रीकृष्णाचें विश्वरूपदर्शन, वनपर्वांतील हनुमंताच्या स्वरूपाचा भव्य आविष्कार इत्यादि महाभारतांतील अद्भुत रसाचे आविष्कार प्रसिद्धच आहेत. कीचकवधाच्या प्रकरणांतील कीचकाच्या वधानंतर भीमानें केलेली त्याच्या प्रेताची दुर्दशा व दुःशासनाचा कंठनाल चिरून त्यानें केलेलें रक्तप्राशन, आजही भीरूंच्या अंगावर रोमांच उत्पन्न करणारा भयानक रसाचा आविष्कार म्हणून दाखवितां येण्यासारखें आहे. महायुद्धानंतर रणभूमीवरील प्रेतांच्या भोंवतीं मांसभक्षी श्वापदांच्या, पक्षांच्या व क्रव्यादांच्या घिरटया घालणाऱ्या थव्यांचें वर्णन, कुरतडलेल्या जिव्हांचें, फोडलेल्या डोळ्यांचें व लचके तोडलेल्या शरीरांचें वर्णन म्हणजे बीभत्सरसाचा मूर्तिमंत आविष्कारच होय. अलीकडच्या साहित्यशास्त्रांत बीभत्साला रस मानावें कीं नाहीं, त्यांत चर्वणा कशी उत्पन्न होणार व ती चर्वणा एखाद्या महाकाव्याचा विषय कसा होऊं शकेल, यासंबंधींचे वादविवाद चालू आहेत व बीभत्साला रसाच्या क्षेत्रांतून बाहेर घालवून देण्याच्या निर्णयापर्यंत हे वादविवाद पर्यवसित होत आहेत. बीभत्साला रसत्व कसें येऊं शकतें, त्यांत चर्वणा कशी निर्माण होऊं शकते, व तो महाकाव्याचा विषय कसा होऊं शकतो याचें निदर्शन म्हणजे महाभारतांतील हें प्रकरण होय असें म्हटलें तरी चालेल. तें वाचून तरी कोणत्याही मर्मज्ञाला बीभत्साचें रसत्व नाकारतां येणार नाहीं. सौप्तिकपर्वांतील अश्वत्थाम्यानें रात्रीं केलेल्या संहारानंतरच्या शिबिराच्या अवस्थेचें वर्णन यांतच समाविष्ट होतें. द्रोणपर्वांत रौद्ररसाचा अत्यंत उत्कट आविष्कार झालेला आहे. शांतिपर्व व गीतेंतील कित्येक प्रकरणें शांतरसाचे आविष्कार म्हणून निर्देश करतां येण्यासारखीं आहेत. शांतरस म्हणजे सर्व वृत्तींची लीनता. महाभारतांत

शांतिपर्वांतील कित्येक उपाख्यानांतून त्याचा उत्कट आविष्कार झालेला आहे. महाभारतांतील हास्यरस इतका प्रसंगनिष्ठ व निर्मळ आहे कीं घाणेरडें विष्णुशर्म्याचें वर्णन देण्याऐवजीं काव्यप्रकाश-कारांच्या प्रतिभेनें त्याचाच उपयोग कां करून घेतला नाहीं याचेंच कोणालाही आश्चर्य वाटावें. वानगीदाखल हास्य रसाचें एकच उदाहरण मी आपणांस सांगतों. कीचकाच्या वधासाठीं द्रौपदी व भीमसेन यांच्यांत बोलणें झाल्यानंतर कीचकाला संकेतस्थान म्हणून विराटाच्या नृत्यशाळेंत अंधाऱ्या रात्रीं बोलविण्यांत येतें, तेथें आल्यानंतर मंचकावर पहुडलेल्या भीमसेनाच्या वज्रदेहाला स्पर्श करूनही काममोहित कीचक त्यालाच सैरंध्री समजून त्याच्याशीं अनुनयाचें भाषण करूं लागतो. भीमसेन त्याच्या स्पर्शज्ञानाची प्रसंशाही करतो. हें भीमकीचक संवादाचें प्रकरण हास्यरसाचें उत्तम निदर्शन म्हणून दाखवितां येईल. आदिपर्वांतर्गत 'बकवध' पर्वांतील ब्राह्मणाच्या लहान मुलाचा गवताची काडी उचलून बकासुराला मारण्याचा आविष्कार तर निरागस हास्याचें उत्कृष्ट उदाहरणच होय. महाभारतानें एकेका रसाचे असे प्रचंड नद निर्माण केले आहेत कीं, त्या सर्वांचा क्षीरसागर म्हणून कविप्रतिभांना तें सदैव महानिधान वाटावें.

महाभारतांतील स्वभावचित्रें उपमान म्हणून सर्वश्रेष्ठ ठरलीं आहेत व भारतीय जीवनाचा तीं सदैव आदर्श झालीं आहेत. महाभारतांतील उपाख्यानांतून उपास्यसंप्रदायही निर्माण झाल्याचें दृश्य निदर्शनास येतें. सावित्री उपाख्यानांतील नायकनायिकांचा व्रतविधींत समावेश झालेला आहे. विष्णुसहस्रनाम व शिवसहस्रनाम-यांसारखीं कित्येक प्रकरणें तर दैनंदिन उपासनांतील नित्य पाठांचा आजही विषय होऊन राहिलीं असून तीं वांछितार्थफलप्रद असल्याचा साधकांचा आजही अनुभव आहे. महाभारताची प्रतिपाद्य व्यक्ति जी भगवान् श्रीकृष्ण तिच्यासंबंधीं तर वर्णन करावें तितकें थोडेंच आहे. भारत काव्याच्या या नायकाची गणना पूर्णावतारांत होत असून मंत्रशास्त्र व सर्व प्रकारचे साधनमार्ग यांची ती सर्वश्रेष्ठ

उपास्यदेवता आहे. तिनें सर्वांना वेड लावलें असून ज्यांचा ज्यांचा हिंदुस्थानाशीं संबंध आला त्या परकीयांनाही तिनें भारून टाकलें आहे. भक्तिसंप्रदायाची ती अधिष्ठात्री देवता असून तिच्या चरणीं विलीन होण्यांत लोक सतत धन्यता मानीत आले आहेत. भोळ्या भक्तांपासून डोळस तत्त्वज्ञांपर्यंत व कुटिल राजनीतिज्ञांपासून तर शुद्ध सात्त्विक धर्मनिष्ठांपर्यंत सदा सर्व काळीं समाजांतील सर्व थरांची ती आकर्षण केंद्र बनून राहिली आहे.

## श्रीमत् भगवद्गीतेचें अपूर्व महत्त्व

महाभारतांतील भगवद्गीता–प्रकरणाला जें महत्त्व लाभलें तितकें दुसऱ्या कोणत्याही धर्मग्रंथाला लाभलेलें नाहीं. रेडियमच्या कणाप्रमाणें त्याची स्फुरणशालिता अखंड असून समाजांतील सर्व थरांना सदासर्वकाळीं मार्गदर्शन करण्याचें तिचें सामर्थ्य अलौकिक आहे. सर्व शास्त्रांहून तिचें आगळें असणारें महत्त्व सर्वांनीच मान्य केलेलें असून फार प्राचीन काळापासून मुक्तिमार्गाच्या पाठ्य ग्रंथांत तिचा समावेश झालेला आहे. सुप्रसिद्ध काश्मीरचा राजा अवंतिवर्मा मरण्यापूर्वीं भगवद्गीतेचा संपूर्ण पाठ ऐकून नंतरच शाश्वततेंत विलीन झाला, असें कल्हणानें आपल्या काश्मीरच्या इतिहासांत म्हटलें आहे. भारतीयांच्या प्रस्थानत्रयींत उपनिषदांच्या बरोबरीनें भगवद्गीतेचा समावेश असून भगवान् श्रीशंकराचार्यांना आपला ज्ञानमार्ग सिद्ध करण्यासाठीं उपनिषदांबरोबरच भगवद्गीतेवर भाष्य लिहिणें क्रमप्राप्त ठरलें. राष्ट्राच्या दुर्दैवाच्या क्षणीं त्याच्या पुनरुत्थानासाठीं गीतेंतून आवश्यक तो संदेश देण्याची भारतीय द्रष्टयांची परंपरा अविच्छिन्न आहे. भगवान् श्रीशंकराचार्यांनीं गीतेच्या द्वारेंच आपला संदेश लोकांना दिला. श्री ज्ञानेश्वर महाराजांनीं भगवद्गीतेच्याच आधारें भागवत धर्माची प्रतिष्ठापना केली. लोकमान्यांनाही कर्मयोगाचा संदेश गीतेच्या द्वारेंच देण्याची आवश्यकता भासली. आजही गीतेंतूनच तत्त्वाच्या मंजरी आपला सुगंध दरवळीत आहेत. श्रीमद्भगवद्गीता हा असा अपूर्व ग्रंथ आहे कीं त्यावर कितीही लिहिलें तरी तें पुरें वाटूंच नये अशी

लोकांची अवस्था होते. विख्यात अरेबियन प्रवासी अल्बरुणी याच्या मनाची पकड गीतेनें घेतली होती. ज्ञानेश्वरांची ज्ञानदेवी, वामनाची यथार्थदीपिका, दासोपंताचा गीतार्णव, तुकाराम महाराजांची मंत्रार्थ गीता, वामनाची समश्लोकी, गीतेचे हिंदी अनुवाद, प्राचीन सर्व संप्रदाय-प्रवर्तकांचीं गीतेवरील भाष्यें, लोकमान्य अरविंद प्रभृतींचे गीतेवरील ग्रंथ या सर्वांचा विचार केला तर असें म्हणावें लागतें कीं ज्या कोणाला आपलें नवें मत प्रतिष्ठापद पावावें असें वाटत असेल त्याला तें गीतेंतून सिद्ध करण्याशिवाय दुसरा मार्गच उरूं नये अशी वस्तुस्थिति आहे. आजच्या धर्मग्लानीच्या काळांतदेखील गीतेची लोकप्रियता वाढती आहे. व तिच्यावर नवनवे ग्रंथ प्रत्यही निर्माण होत आहेत. आमच्या धर्मग्रंथांतील तेजस्वी व निर्मल हिरा या शब्दांत लोकमान्यांनीं तिचें वर्णन केलें आहे तें अगदीं यथार्थ आहे यांत शंका नाहीं.

## रामायण व महाभारत

रामायण व महाभारत हे भारतीय राष्ट्राचे दोन राष्ट्रीय ग्रंथ आहेत. त्यांपैकीं रामायण हा सांस्कृतिक इतिहास असून महाभारत हा अतिप्रचंड असा सांस्कृतिक ज्ञानकोश होय. रामायणानें जीवनाचें ध्येयदर्शन घडविलें असलें तर महाभारतानें मानवी जीवनाची अपरिपूर्णता लक्षांत घेऊन विषम परिस्थितीच्या घनांधकारांतून ध्येयसिद्धीचा मार्ग दाखविलेला आहे. जोंवर हे दोन राष्ट्रीय ग्रंथ भारतीयांजवळ आहेत तोंवर भारतीयांना जगापासून दृष्टिकोन व तत्त्वज्ञान या दृष्टीनें कांहींही शिकण्यासारखें नसून उलट जगाची घडी नीट बसवून सदाची मंगलमयता उत्पन्न करण्याचें सामर्थ्य असलेली जीवनदृष्टि या ग्रंथांच्या भरंवशावर भारतच जगाला देऊं शकेल. मात्र दुर्दैवानें भारतीयांचीच अशी परिस्थिति झालेली आहे कीं त्या ग्रंथांचा प्रकाश त्यांच्याच अंतःकरणांत समाविष्ट करावयास त्यांची धारणा समर्थ नाहीं. त्याचीं कारणें मी पुढें सांगणारच आहे.

महाभारताचें हें महत्त्व केवळ हिंदुस्थानापुरतेंच नसून हिंदुस्थानाबाहेरही या ग्रंथराजानें आपला प्रभाव दाखविला आहे. इसवी सनाच्या दुसऱ्या शतकापासूनच ग्रीकांच्या वाङ्मयांत महाभारताचे उल्लेख येतात. इसवी सनाच्या सहाव्या शतकांत कांबोडियाच्या देवळांतून संपूर्ण भारतसंहितेचें वाचन होत असे. इसवी सनाच्या सातव्या शतकांत मंगोलियांतील तुर्कांमधून महाभारतांतील हिडिंबवधासारखीं प्रकरणें काव्य म्हणून गायिलीं जात होतीं. दहाव्या शतकाच्या पूर्वी तर जावा बेटांतील लोकांनीं आपल्या भाषेंतून महाभारताचें संपूर्ण भाषांतर केल्याचें आढळतें. इसवी सन १८१९ मध्यें फ्रान्झ बॉपनें (Franz Bopp) जेव्हां प्रथम महाभारतांतील नलोपाख्यानाचें रूपांतर केलें तेव्हां हिंदुस्थानांतीलच नव्हे, तर जगाच्या वाङ्मयांतील एक देदीप्यमान अलंकार म्हणून पाश्चात्य साहित्यकांत त्याला प्रतिष्ठा मिळाली. पाश्चात्य देशांतील विद्यापीठांमधून संस्कृत भाषेच्या अध्ययनाला नलोपाख्यानापासूनच प्रारंभ करण्यांत येत असे असें डॉ. विन्टर निट्झनें आपल्या ग्रंथांत उल्लेखिलें आहे. जर्मन, इंग्लिश, फ्रेंच, इटालियन, स्वीडिश, झेक्, पोलिश, रशियन, नवीन ग्रीक भाषा व हंगेरियन इत्यादि जगांतील सर्व भाषांतून त्याचीं भाषांतरें झालीं असून जिब्रान्टिसनें १८६१ सालीं त्याच्यावर नाटक लिहिल्यानंतर फ्रान्सच्या रंगभूमीवर त्याचा प्रयोग करण्यांत आला होता. श्लेगेलनें (A. W. V. Schlegel) त्याच्यावरच आपला असा अभिप्राय प्रकट केला कीं,

I will only say, that in my estimation, this poem can hardly be surpassed in pathos and ethos in the enthrolling force and the tenderness of the sentiments. It is made expressly to attract old and young, the high-born and the lowly, the Commisseurs and those who are merely guided by instincts.

ऋष्यशृंगाची कथा बुद्धजातकांतही घेतलेली असून ती तिबेट, चीन व जपान येथें अत्यंत लोकप्रिय झालेली आहे. डॉ. विंटर निट्झ

याला तर विदुलेची वीरगाथा, द्रोणपर्वांतील रात्रियुद्धांचें वर्णन, स्त्रीपर्वांतील गांधारीच्या तोंडून येणारें रणभूमीचें वर्णन, यांची मोहिनीच पडलेली असून सावित्रीच्या उदात्त कथेनें वेड लावलें आहे. द्रोणपर्वांतील रात्रियुद्धाच्या वर्णनांतील एका प्रसंगावर आपला अभिप्राय व्यक्त करतांना तो असें म्हणतो कीं, the style recalls in some places the lyrics of Kalidas ( येथील वर्णनपद्धति कांहीं ठिकाणीं कालिदासाची आठवण करून देते ). गांधारीच्या तोंडून रणभूमीचें वर्णन वदविण्यांत डॉ. विंटरनिट्झला सौंदर्याचा इतका अपूर्व साक्षात्कार झाला आहे कीं, तो म्हणतो:--

Here follows the lament of Gandhari, which is one of the most beautiful parts of the whole epic as the master piece of elegiac poetry, as well as for the clear description of the battle-field recalling the pictures as a wereschagin The whole scenebecomes so much the more impressive owing to the fact that the poet does not himself tell the story but lets the aged mother of heroes recount what she sees with her own eyes.

सावित्रीच्या उपाख्यानासंबंधानें तर त्यानें व्यक्त केलेला अभिप्राय अत्यंत हृदयंगम आहे. विंटरनिट्झ म्हणतो: But whoever it was who sang the song of Savitri, whether a Suta or a Brahman, he was certainly one of the greatest poets of all times. Only a great poet was capable of placing this noble female character before us, so that we seem to see her before our eyes. Only a true poet could have described in such a touching and elevating manner, a victory of love and constancy of virtue and wisdom over destiny and death, without even for an instant, falling into the tone of the dry preacher of morality; and only an inspired artist could have produced, as if by magic, such wonderful pictures before us. We see the deeply distressed woman walking by the side of her husband who is doomed to death ; the husband, mortally ill,

wearily lying his head on his wife's lap; the dreadful form of the God of Death, who binds the man's soul with fetters and leads it away; the wife, wrestling with the God of Death for the life of her husband; and finally the happily reunited pair wandering homwards in the moon-light with their arms about each other; and we see all these pictures in the splendid setting of a primeval Indian forest whose deep stillness we seem to feel and whose delicious fragrance we seem to breathe when we surrender ourselves to the magic of this incomparable poem. The poem has frequently been translated into European languages including German, but all translations can only give a feeble idea of the incomparable charm of this Indian Poem.

"सावित्री उपाख्यानाचा कवि ब्राह्मण असो किंवा सूत असो, पण तो निश्चितपणें सर्व काळीं सर्वश्रेष्ठ महाकवि ठरल्यावांचून राहणार नाहीं. केवळ महाकवीच इतकें उदात्त स्त्रीजीवन इतक्या जिवंतपणें चित्रित करूं शकतो. जणूं कीं काय तें आजही डोळ्यादेखत घडत आहे कीं काय असें वाटतें. रुक्ष नीतिमत्तेच्या प्रचारकांचा सूर मुळीच न येऊं देतां, प्रेम व सद्गुण आणि शहाणपण यांचें सूत्र मृत्यु व वस्तुस्थिति यांवर अखेरीस कसा विजय मिळवितें याचें इतकें चटका लावणारें व इतक्या समर्पक रीतीनें रेखाटलेलें हृदयंगम चित्र खऱ्या महाकवीशिवाय कोणीच निर्माण करूं शकत नाहीं. एखादा उत्स्फूर्त कलावंतच जणू कीं काय जादूनें निर्माण केलेलें असें आश्चर्यकारक चित्र आपल्यासमोर उभें करील. मृत्यूच्या दाढेंत सांपडलेल्या आपल्या पतीबरोबर त्याची संत्रस्त झालेली पत्नी चालते आहे, श्रांत झालेला तिचा पति तिच्या अंकावर मस्तक टेकून झोंपला आहे, मृत्युदेवतेची भयानक मूर्ति त्याच्या शरीरांतून प्राण ओढून घेऊन चालली आहे, ती सती पतीचे प्राण परत मिळविण्यासाठीं मृत्युदेवतेशीं वादविवाद करीत आहे, व शेवटी आनंदानें पुनर्मीलन घडून आलेलें तें दांपत्य एकमेकांभोंवती हात टाकून चंद्र-

प्रकाशांतून फिरत व रमत आपल्या आश्रमाकडे परतत आहे, हें सर्व दृश्य हिंदुस्थानांतील वनांच्या मनोरम वातावरणांत आपण प्रत्यक्ष बघत आहोंत असा भास होऊन या अतुलनीय व दिव्य शक्तीनें भारलेल्या काव्याच्या जादुनगरींत आपण पूर्णपणें विलीन होऊन जातों. हें काव्य सर्व पाश्चात्य भाषांतून भाषांतरित झालें आहे. पण सर्व भाषांतरें, रूपांतरें, व अनुकरणें त्याची केवळ पुसट कल्पनाच काय ती देऊं शकतात." महाभारताच्या या दिव्य सौंदर्याच्या तन्मयतेंतच आपण आजचें व्याख्यान संपवूं या.

# ३. महाभारताचे टीकाकार

श्रीमत् रामायणाप्रमाणेंच महाभारतीय कथानकांच्याही अनेक प्रकारच्या विकृति झालेल्या असून कांहीं ठिकाणीं महाभारतांतील वर्णनाला सुसंगततेसाठीं म्हणून विशेष स्वरूपाचीं स्पष्टीकरणेंही जोडण्यांत आलेलीं आहेत. भारताच्या वर्णनाच्या ओघांत ज्या ठिकाणीं विरोध अथवा विरोधाभास आढळले तेथें त्यावर शंका उपस्थित करून सुसंगति सुचविण्याचें काम मुख्यत: श्रीमत् भागवतानें केलेलें आहे. त्याचीं कांहीं उदाहरणेंच मी येथें देतों.

(१) महाभारतांतील वनपर्वांत (अ. १५ ते २२) श्रीकृष्ण व शाल्व यांच्या युद्धाचें वर्णन आलेलें आहे. त्यांतील २१ व्या अध्यायांत असें वर्णन आहे कीं, शाल्वांनीं मायिक वसुदेव उत्पन्न करून त्याचा वध केला. आपल्या पित्याचा वध झालेला पाहून भगवान् श्रीकृष्णाला मोह उत्पन्न झाला. ती गोष्ट मिथ्या असतांनाही श्रीकृष्ण ती सत्यच समजले. स्वत: श्रीकृष्णच हें वृत्त सांगतांना म्हणतात :—

**“तस्य रूपं प्रपततः पितुर्मम नराधिप ।**
**ययातेः क्षीणपुण्यस्य स्वर्गादिव महीतलम् ॥** २३
**ततः शाङ्र्गधनुः श्रेष्ठं करात् प्रपतितं मम ।**
**मोहापन्नश्च कौंतेय रथोपस्थ उपाविशम् ॥** २५

—महाभारत वनपर्व अध्याय २१

अर्थ—“शाल्वांच्या विमानांतून पडणाऱ्या माझ्या पित्याचें रूप क्षीणपुण्य झाल्यामुळें स्वर्गातून खालीं ढकलून दिलेल्या ययातीप्रमाणें दिसूं लागलें. तें पहातांच माझ्या हातांतून शाङ्र्गधनुष्य गळून पडलें व मोह उत्पन्न होऊन मी रथांतच पडलों.” भागवतकारांना भगवान् श्रीकृष्णासारख्या पूर्णावतार परब्रह्माला मोह उत्पन्न होणें ही गोष्ट तर अयोग्य वाटलीच, पण प्रत्यक्ष महाभारतांतच श्रीकृष्णाला अनेक स्थळीं देवाधिदेव म्हणून संबोधण्यांत आलेलें असल्या-

---

**व्याख्यान** ३ रें, दि. २८ मार्च १९५१

मुळें त्या प्रतिपादनाशीं हें वर्णन विसंगत आहे असें उघड उघड दिसून आलें, म्हणून त्यांनीं यावर पुढीलप्रमाणें शंका काढून "असें वर्णन करणें अनुचित आहे" असें स्पष्ट शब्दांत प्रतिपादन केलें आहे. भागवतकार म्हणतात,

**एवं वदन्ति राजर्षे ऋषयः केचनान्विताः ।**
**यत्स्ववाचो विरुध्येरन्नूनं ते न स्मरन्त्युत ॥३०**
**क्व शोकमोहौ स्नेहो वा भयं वा येऽज्ञसंभवाः ।**
**क्व चाखण्डितविज्ञानज्ञानैश्वर्यस्त्वखण्डितः ॥३१॥**
**यत्पादसेवोर्जितयाऽऽत्मविद्यया हिन्वन्त्यनाद्यात्मविपर्ययग्रहम् ।**
**लभन्त आत्मीयमनन्तमैश्वरं कुतो नु मोहः परमस्य सद्गतेः ॥३२**

--भागवत दशम स्कंध अध्याय ७७

अर्थ--कांहीं ऋषि परमेश्वराला मोह उत्पन्न झाला असें वर्णन करतात. पण आपण एकदां जें प्रतिपादन केलें त्याच्याच नेमकें विरुद्ध आपण वर्णन करीत आहोंत हें ते विसरतात. केवळ अज्ञांच्याच ठिकाणीं संभवणारे शोक, मोह, स्नेह वा भय हे विकार कुठें, नि अखंडित ज्ञानविज्ञानैश्वर्यमंडित परमेश्वर कुठें! ज्याच्या चरणसेवेनें प्राप्त होणाऱ्या आत्मविद्येच्या आश्रयानें सर्व प्रकारचे मोह व भ्रम नष्ट होऊन आत्मज्ञानात्मक अनंत ऐश्वर्य प्राप्त होतें त्या परमश्रेष्ठ व सर्वांचें आश्रयस्थान असलेल्या परमेश्वराला मोह कसा उत्पन्न होणार ?

(२) महाभारताच्या मौसल पर्वांत असें वर्णन आलें आहे की,

**ततः शरीरे रामस्य वासुदेवस्य चोभयोः ।**
**अन्विष्य दाहयामास पुरुषैराप्तकारिभिः ॥३१॥ मौसल पर्व अ. ७**

अर्थ--" नंतर बलराम नि श्रीकृष्ण यांचीं शरीरें शोधून अर्जुनानें आप्तांकडून त्यांच्यावर अग्निसंस्कार केला. श्रीकृष्ण हे सच्चिदानंद परब्रह्म आहेत हें मानल्यानंतर भक्तांच्या मतें त्यांना पांचभौतिक शरीर असूं शकत नसल्यामुळें ते पंचमहाभूतांत विलीन करण्याचा अथवा होण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. हें भारतीय वर्णन परमे-

श्वराच्या अपांचभौतिकतेला विरोधी असल्यामुळें भागवतकारांनीं त्यावर पुढील वर्णनाचा पडदा टाकलेला आहे.

लोकाभिरामां स्वतनुं धारणाध्यानमंगलम् ।
योगधारणयाऽग्नेय्या दग्ध्वा धामाविशत् स्वकम् ॥ ६
सौदामन्या यथाकाशे यान्त्या हित्वाभ्रमंडलम् ।
गतिर्न लक्ष्यते मर्त्यैस्तथा कृष्णस्य दैवतैः ॥ ९

—भागवत एकादश स्कंध अध्याय ३१

अर्थ—सर्व लोकांना अत्यंत मनोरम वाटणारें, धारणा, ध्यान, यांना अत्यंत मंगलकारक असें आपलें शरीर योगमार्गाच्या अग्नि-धारणेनें जाळून न टाकतां भगवंतांनीं आपल्या मूलभूत स्वरूपांत प्रवेश केला. ज्याप्रमाणें आकाशांत तळपून जाणाऱ्या विजेची गति सामान्य लोकांना समजूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें भगवान् श्रीकृष्णाचें हें महाप्रयाण पहाण्यासाठीं तेथें आलेल्या देवतांना त्यांची गति समजूं शकली नाहीं.

(३) भगवान् श्रीकृष्ण हा महाभारताचा प्रतिपाद्य विषय असतांनाही धर्म, अर्थ, काम इत्यादींचा महाभारतांत जितक्या प्रमाणांत विस्तार झालेला आहे तितका भगवंताच्या वर्णनाचा झालेला नाहीं, असें तर भागवतकारांनीं उघडपणेंच म्हटलेलें असून महाभारताच्या वर्णनांत उद्देश जरी धर्माच्या प्रतिष्ठापनेचा असला, तरी वर्णनाच्या ओघामुळें इतर गोष्टींतच मन रमून लोक श्रेयाला आंचवण्याची भीतीही भागवतकारांनीं व्यक्त केली आहे. ते म्हणतात,

यथा धर्मादयश्चार्थाः मुनिवर्यानुकीर्तिताः ।
न तथा वासुदेवस्य महिमा ह्यनुवर्णितः ॥ ९

—भागवत प्रथमस्कंध अ. ५

जुगुप्सितं धर्मकृतेऽनुशासतः स्वभावरक्तस्य महान् व्यतिक्रमः ।
यद्वाक्यतो धर्म इतीतरः स्थितो न मन्यते तस्य निवारणं जनः ॥१५

—भागवत प्रथमस्कंध अ. ५

अर्थ—नारद व्यासांना म्हणतात कीं, हे मुनिवर्य, ज्याप्रमाणें आपण धर्मादि पुरुषार्थांचें वर्णन केलें आहे त्याप्रमाणें भगवान् वासु-

देवाच्या महिम्याचें वर्णन केलें नाहीं. धर्मासाठींच नि धर्माचें महत्त्व लोकांच्या मनावर बिंबवावें म्हणून आपण अनेक गोष्टी वर्णन करून सांगितल्या आहेत; पण विकारवश लोकांच्या मनोवृत्तीचा विचार केला तर त्यांना आवडणाऱ्या त्या इतर गोष्टींचाच पगडा त्यांच्या मनावर अधिक बसून ते धर्ममार्गालाच आंचवण्याची भीति उत्पन्न झाली आहे. असो.

श्रीमत् भागवताचें म्हणणें आवश्यक व योग्य आहे यांत शंकाच नाहीं. महाभारतावर स्वतंत्र रचना करणाऱ्या लोकांनीं आपआपल्या आवडीनुसार वर्णन केलेलें असल्यामुळें चांगल्या चांगल्या कवींकडूनही भारताच्या प्रतिपादनाचें तात्पर्य ध्यानांत न घेतां विकृतीकरणें झालीं आहेत. कीर्तनकारांच्या कथांनीं तर त्या विकृतीकरणांचा पुष्कळ ठिकाणीं उच्चांकही गांठलेला आहे. पण भारताच्या या भारतीय विकृतीकरणांत कोणताही दुष्ट हेतु नाहीं. भारताचे पाश्चात्य टीकाकार मात्र एक प्रकारच्या दुष्ट हेतूनेंच प्रवृत्त झालेले आढळतात. त्यासाठीं संशोधनाच्या नांवाखालीं ते हेतुतः मिथ्या विधानें करतील, जातां जातां अकारणच एकादा अपसिद्धांत ठोकून देतील नि गृहीत कृत्यें सिद्धांतवजा मानण्याचा आग्रह धरून बसतील. कुठें कुठें तर संहितेंतील वर्णनाचा अर्थ नि सामान्य व्यक्तींना सहज समजूं शकणाऱ्या घटनांकडेही त्यांचें दुर्लक्ष झालेलें आहे. इतर सामान्यांची गोष्टच सोडा, पण या बाबतींत उदाहरणासाठीं मी हिंदुस्थानाविषयी थोडी फार सद्बुद्धि बाळगणाऱ्या डॉ. विन्टरनिट्झच्याच ग्रंथांतील कांहीं विधानें आपणांस सांगतों.

## डॉ. विंटरनिट्झ

आपल्या ग्रंथांत अश्वत्थाम्याचें वर्णन करतांना डॉ. विंटरनिट्झ म्हणतात, Also Ashwathaman, one of Drona's sons महाभारतांत अश्वत्थाम्यावांचून द्रोणांना दुसरा मुलगा असल्याचा उल्लेख नाहीं. महाभारतांत ज्या दोन ठिकाणीं अश्वत्थाम्याच्या जन्माचें वर्णन आहे तें पुढीलप्रमाणें आहेः——

**अलभद् गौतमी पुत्रमश्वत्थामानमेव च ।**
**स जातमात्रो व्यनदद्यथैवोच्चैःश्रवा हयः ॥ ४७ ॥** आदिपर्व अ. १३०
**अलभद् गौतमी पुत्रमश्वत्थामानमौरसम् ।**
**भीमविक्रमकर्माणमादित्यसमतेजसम् ॥ ५० ॥** आदिपर्व अ. १३१

अर्थ–द्रोणपत्नी गौतमीला अश्वत्थामा नांवाचा मुलगा झाला. जन्मतःच उच्चैश्रवा घोड्याप्रमाणें त्यानें गर्जना केली. गौतमीला अत्यंत पराक्रमी नि सूर्याप्रमाणें तेजस्वी अश्वत्थामा नांवाचा पुत्र झाला.

डॉक्टरसाहेबांनीं ही चूक अजाणता केलेली आहे हें उघड आहे.

(२) उत्तर गोग्रहणाच्या प्रसंगाचें वर्णन करतांना ते लिहितात :

' Though the Kourawas harboured a suspicion that it was Arjuna who was fighting against them, they did not recognize him."

महाभारतांतील विराट पर्वांत याच्या उलट अर्जुनाला लोकांनीं नुसतें ओळखलें इतकेंच नव्हे तर त्यानेंही स्वतः लोकांना आपली ओळख सांगितली असा स्पष्ट उल्लेख आहे. अर्जुन येतांना पाहून द्रोणाचार्य म्हणतात,

**एतद्ध्वजाग्रं पार्थस्य दूरतः संप्रकाशते ।**
**एष घोषः सरथजो रोरवीति च वानरः ॥ ४** —विराट पर्व अ. ५३

दुरून पार्थाचा ध्वज तळपतो आहे, रथावरील नाद नि वानराची गर्जना ऐकूं येऊं लागली आहे. युद्धांत अर्जुन द्रोणांना म्हणतो :

**उषिताः स्मो वने वासं प्रतिकर्म चिकीर्षवः ।**
**कोपं नार्हसि नः कर्तुं सदा समरदुर्जय ॥ १८** —विराट पर्व अ. ५८

अथ–अम्हचा वनवास संपला आहे. आवश्यक तें कार्य करावयास आम्ही प्रवृत्त झालों आहोंत. आपण आमच्यावर रागवूं नये. अर्जुन कर्णाला म्हणतो,

**एहि कर्ण मया सार्धं प्रतियुद्धस्व सङ्गरे ॥ ८** —विराटपर्व अ. ६०

त्यावर कर्ण अर्जुनाला म्हणतो,

**अयं कौंतेय कामस्ते न चिरात् समुपस्थितः । १४ विराटपर्व अ. ६०**

पळणाऱ्या दुर्योधनाला अर्जुन म्हणतो,

**युधिष्ठिरस्यास्मि निदेशकारी पार्थस्तृतीयो युधि संस्थितोऽस्मि ।**
**तदर्थमावृत्य मुखं प्रयच्छ नरेन्द्र वृत्तं स्मर धार्तराष्ट्र ॥ १६**

विराट पर्व अ. ६५

"युधिष्ठिराच्या आज्ञेंत राहणारा मी कुंतीचा तिसरा पुत्र तुझ्याशीं युद्ध करावयास आलों आहे. राजासारखे वाग व न पळतां माझ्याशीं युद्ध कर."

(३) आपलीं स्वतःचीं अनुमानें, प्रमाणें न देतां, **सिद्धांत** म्हणून लादण्याचाही प्रकार विंटरनिट्झच्या ग्रंथांतून भरपूर आढळतो. उदाहरणार्थ सुभद्राहरणाच्या बाबतींत डॉ. विंटरनिट्झ लिहितो: Obviously the Yadavas were a rough Shepherd Tribe with whom marriage by theft was still legitimate.

पण हें कशावरून याचें त्याच्याजवळ उत्तर नाहीं. भारतांतील सुभद्राहरण श्रीकृष्णांच्या संमतीनें झालें आहे व त्याचीं कांहीं राजकीय स्वरूपाचीं कारणें आहेत. तीं मी पुढें सांगेन. पण बळानें नि पराक्रमानें कन्याहरणाची चाल क्षत्रियांत होती असें महाभारतावरून स्पष्ट दिसतें. अर्जुनाला सुभद्राहरणासाठीं प्रोत्साहित करतांना भगवान् श्रीकृष्ण असें सांगतात कीं,

**प्रसह्य हरणं चापि क्षत्रियाणां प्रशस्यते ।**
**विवाहहेतुः शूराणामिति धर्मविदो विदुः ॥ २२ ॥**

—आदिपर्व अध्याय २१९

शूर क्षत्रियांच्यामध्यें विवाहासाठीं बळानें 'कन्याहरण' हा धर्मच होय असें धर्मवेत्ते लोक म्हणतात. उद्योगपर्वामध्यें भीष्मांनीं काशीच्या राजकन्यांच्या हरणाचा प्रसंग जो स्वतःच वर्णन केलेला आहे त्यांत ते असें म्हणतात कीं,

**ते यतध्वं परं शक्त्या सर्वे मोक्षाय पार्थिवाः ।**
**प्रसह्य हि हराम्येष मिषतां वो नरर्षभाः ॥ १५ ॥**

—उद्योगपर्व अ. १७३

हे राजांनो तुंमच्यांत सामर्थ्य असेल तर तुम्ही या कन्यांना सोडवा. तुम्ही सगळे पहात असतांना मी बळानें त्यांचें हरण करतों. जर 'प्रसह्यहरण' यादवांना हीन ठरवीत असेल तर भीष्म व कौरव राजकुलांच्या बाबतींतही तोच न्याय लागू होईल. एक अनुमान ज्या कारणांसाठीं एका ठिकाणीं वापरलें आहे त्याच कारणांसाठीं तें दुसऱ्याही ठिकाणीं वापरलें जाईल. महाभारता-प्रमाणें यादव हे क्षत्रिय व शुद्ध क्षत्रिय होते हें निर्विवाद आहे.

(४) शल्याच्या बाबतींत लिहितांना डॉ. विंटरनिट्झ लिहितात :

Shalya is to fight on the side of the Kouravas, but as Karna's charioteer, is to drive chariot badly and thus cause Karna's fall.

आणखी दुसऱ्या एका ठिकाणीं ते लिहितात,

Although we already know that this happens in consequence of the treachery of Shalya, the matter is here presented as . . . ' Brahman–Shap '

पण हें सगळें अनुमान निराधार आहे. कर्णाचा रथ वाईट रीतीनें चालवावा असें युधिष्ठिरानें शल्याला म्हटलेलें नाहीं व शल्यानेंही आपण तें करणार असल्याचें कोठेंही म्हटलेलें नाहीं. युधिष्ठिराची शल्याला अशी विनंति आहे कीं,

**तत्र पाल्योऽर्जुनो राजन् यदि मत्प्रियमिच्छसि ।**
**तेजोवधश्च ते कार्यः सौतेरस्मज्जयावह ।। ४४**

—महाभारत उद्योगपर्व अध्याय ८

आपण जर माझें प्रिय करूं इच्छीत असाल तर अर्जुनाला वांचवावें व त्यासाठीं ज्यावेळीं आपण कर्णाचें सारथ्य कराल त्या वेळीं त्याचा तेजोवध करावा. रथ वाईट चालवून हा तेजोवध करावयाचा नव्हता. तेजोवधाचा प्रकार सांगतांना शल्य स्वतःच असें म्हणतो कीं,

**तस्याहं कुरुशार्दूल प्रतीपमहितं वचः ।**
**ध्रुवं संकथयिष्यामि योद्धुकामस्य संयुगे ।। ४७ ।।**

**यथा स हृतदर्पश्च हृततेजाश्च पांडव ।**
**भविष्यति सुखं हन्तुं सत्यमेतद्ब्रवीमि ते ।। ४८ ।।**

-- महाभारत, उद्योगपर्व, अ ८

अर्थ–मी त्याच्याविरुद्ध व त्याला न रुचणारें बोलून त्याचा अहंकार व त्याचें तेज अशा पद्धतीनें नष्ट करीन कीं, तूं त्याला सहज मारूं शकशील.

श्री. चिंतामणराव वैद्य यांनीं या शल्यप्रकरणावर असा आक्षेप घेतलेला आहे कीं, शल्यासारखा मनुष्य दुर्योधनाला साह्य केल्याचें मान्य केल्यावर कर्णाच्या तेजोवधासारखें विश्वासघाताचें कृत्य करणें शक्य नसल्यामुळें हें सगळें प्रकरणच प्रक्षिप्त असावें. जें जें आपल्याला उलगडलें नाहीं तें तें प्रक्षिप्त म्हणण्याची संशोधकांची नेहमीचीच सोपी रीत आहे. महाभारतांतील शल्यप्रकरणाचा विचार केला तर असें आढळून येतें कीं, शल्याची वंचना करूनच दुर्योधनानें त्याला केवळ शब्दांत पकडून आपल्या बाजूस ओढलें. वास्तविक शल्य पांडवांपैकीं नकुल–सहदेवांचा मामा. आपल्या भाच्यांवर द्यूतांतून झालेल्या अन्यायामुळें, सती द्रौपदीच्या विटंबनेमुळें नि पांडवांना भोगाव्या लागलेल्या अपार आपदांमुळें त्याचें अंतःकरण तिळतिळ तुटत होतें. या सगळ्या प्रकारांचा वचपा काढण्यासाठीं पांडवांना युद्धांत साहाय्य करावें म्हणूनच तो येत होता. दुर्योधनाच्या वंचनेनें फसल्यानंतर पांडवांच्या शिबिरांत येऊन त्यानें युधिष्ठिराच्या जयाची अभ्यर्थना केली आहे. इतकेंच नव्हे, तर कर्णानें द्रौपदीचा केलेला अपमान त्याच्या अंतःकरणांत खुपत होता. त्यानें असे स्पष्ट उद्‌गार काढले आहेत कीं,

**यच्च दुःखं त्वया प्राप्तं द्यूते वै कृष्णया सह ।**
**परुषाणि च वाक्यानि सूतपुत्र कृतानि वै ।। ५० ।।**

--महाभारत उद्योगपर्व अ. ८

तात्पर्य वंचकाची वंचना करणें नि छलकपटाशीं छलकपटानें वागणें याला महाभारतांत अथवा हिंदुधर्मशास्त्राच्या कोणत्याही ग्रंथांत निषिद्ध मानलेलें नाहीं. ‘धटासी आणावा धट, उद्धटासी

उद्धट, खटनटासी खटनट, अगत्य करी । हें समर्थाचें वचन सुप्रसिद्धच आहे. शल्यानें तेंच केलें असलें तर त्याला विश्वासघातकी कसें ठरवितां येईल ? व तेवढ्यावरून साऱ्या शल्यप्रकरणाला प्रक्षिप्त ठरविण्याचें कारण काय ? तात्पर्य संशोधकांची ही मनःकल्पित कल्पना आहे.

याप्रमाणें महाभारतांतल्या अत्यंत साध्या गोष्टींच्या बाबतींत देखील मूळ संहितेच्या उल्लेखांचा विचारही न करतां आपलीं मतें "ठोकून देतों ऐसाजे" या पद्धतीनें सांगणाऱ्या पाश्चात्यांच्या संशोधनांत एक प्रकारचा हेतुगर्भ दुष्टपणाही आहे. हिंदुस्थान देशाच्या राष्ट्रीय अभिमानाला नष्ट करून टाकावयाचें, त्या देशांतील धर्म, संस्कृति, व आत्माभिमान या गोष्टींची निंदा-नालस्ती करावयाची, केवळ आधारहीन अनुमानें सिद्धांत म्हणून जोरानें सांगावयाची असा हा सारा प्रकार आहे. हल्लींची महाभारत संहिता मुळांत एक वीररसप्रधान काव्य असून ब्राह्मणांनीं आपलें महत्त्व वाढविण्यासाठीं मागाहून तिच्यांत अनेक गोष्टी घुसडल्या असें डॉ. विंटरनिट्झचें मत आहे व त्याच्याप्रमाणेंच अनेकांचाही तो तर्क आहे. तो लिहितो,

The more the heroic songs grew in favour and more popular they became, the greater was the anxiety of the Brahamins to take the possession of this epic poetry also and they had the art of compounding this poetry, which was essentially secular in origin, with their own religious poems and the whole stock in trade of their theological and priestly knowledge"

पण हें कशावरून याचें उत्तर "मला असें वाटतें म्हणून" या पलीकडे या लोकांना देतां येत नाहीं. फार तर काय पण दालमन यानें महाभारतावर आपला अभिप्राय प्रकट करतांना ज्यावेळीं असें सांगितलें कीं, "भारत हे भारतीय क्षत्रियांची कर्तव्यनिष्ठा व क्षात्रधर्म सांगणारा धर्मग्रंथ असून त्याचें केंद्र भगवद्गीता व नारायणीय धर्म हें आहे, आणि त्याच्याभोंवतीं अत्यंत कलात्मक रीतीनें इति-

हासाची गुंफण करण्यांत आलेली आहे, तेव्हां त्याच्यासंबंधीं Such a point of view is justifiable, असें म्हणण्यापलीकडे विंटरनिट्झला त्याचें खंडण करतां आलें नाहीं तरीपण I myself believe the real nucleus of the Mahabharat is heroic poem of the conflict between the Kouravas and the Pandavas असें म्हणून स्वतःचा आग्रह सोडावयास कांहीं विंटरनिट्झदेखील सिद्ध नाहीं.

श्रीकृष्ण देखील एक नसून ते तीन चार असले पाहिजेत अशीही कल्पना पाश्चात्य पंडितांनीं लढविलेली आहे व तिला आमच्या देशांतील डॉ. भांडारकर प्रभृति लोकांचाही पाठिंबा आहे. याचें कारण काय असें जर विचारलें तर तें मोठें विचित्र सांगण्यांत येतें. डॉ. विंटरनिट्झ म्हणतो, It is difficult to believe that Krishna the friend and councellor of the Pandavas, Krishna the hera'd of the doctrines of the Bhagavat Geeta, Krishna the youthful hero and demon-slayer, Krishna the favourite and the lover of cowherdesses, finally Krishna the incarnation of the exhalted God Vishnu can be one and the same person. It is far more likely that there were two, or several traditional Krishnas were merged into one deity at a later time. डॉ. भांडारकरांनींही हेंच मत मान्य केलें आहे. यावर लोकमान्य टिळकांनीं गीतारहस्यांत दिलेलें उत्तर मी येथें उद्धृत करतों म्हणजे निराळ्या विवेचनाची आवश्यकता नाहीं. लो. टिळक म्हणतात, "तीन किंवा चार निरनिराळे श्रीकृष्ण झाले असून त्यांपैकीं प्रत्येकानें त्यांत थोडी थोडी भर घातली असेल असें मानण्याचें कारण नाहीं व मानण्यास पुरावाही नाहीं. मूळ धर्मांत घडत आलेल्या बऱ्यावाईट फरकावरून ही कल्पना बसविलेली आहे. पण बुद्ध, ख्रिस्त किंवा महंमद एकेक असतांही त्यांच्या त्यांच्या धर्मांतही जर पुढें पुष्कळ बरेवाईट फरक झालेले आढळून येतात तर मूळच्या भागवत धर्मास पुढें निरनिराळीं स्वरूपें प्राप्त झालीं म्हणून अगर श्रीकृष्णाबद्दल पुढें निर-

निराळ्या कल्पना निघाल्या म्हणून निरनिराळे श्रीकृष्ण मानण्याचें आमच्या मतें कांहीं कारण नाहीं. कोणताही धर्म घेतला तरी कालांतरानें त्याचीं अशीं रूपांतरें होणें अगदीं सहज व स्वाभाविक आहे. त्यासाठीं भिन्नभिन्न कृष्ण, बुद्ध अगर ख्रिस्त मानण्यास नकोत. श्रीकृष्ण, यादव व पांडव किंवा भारतीय युद्ध या ऐतिहासिक गोष्टी नसून कल्पित कथा आहेत असेही तर्क कित्येक लोक, विशेषतः कांहीं पाश्चिमात्य तार्किक काढीत असतात. आणि कित्येकांच्या मतें महाभारत हें एक मोठें थोरलें अध्यात्मपर रूपक आहे. पण आमच्याकडील प्राचीन ग्रंथांचा पुरावा पाहिला तर या शंका निराधार होत असें कोणाही निःपक्षपाती मनुष्यास कबूल करावें लागेल. सारांश श्रीकृष्ण चार पांच नसून एकच ऐतिहासिक पुरुष होते असें आमचें मत आहे. कित्येकांचा यावर असा आक्षेप आहे कीं, श्रीकृष्ण व पांडव हे जरी ऐतिहासिक पुरुष असले तरी श्रीकृष्ण या एका क्षत्रिय योद्धयास प्रथम एका महापुरुषाचें, नंतर विष्णूचें आणि क्रमाक्रमानें अखेर पूर्ण परब्रह्माचें रूप ब्राह्मणांनीं देईपर्यंत दरम्यान पुष्कळ काळ लोटला असावा. पण या म्हणण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. कोणाला देव मानावें व कोणाला देव मानूं नये याबद्दलची आधुनिक तार्किकांची समजूत आणि दोन चार हजार वर्षांपूर्वींच्या लोकांची समजूत यांत महदंतर पडलेलें आहे. आणि ज्ञानी पुरुष स्वतःच ब्रह्ममय होतो असा श्रीकृष्णापूर्वींच्या उपनिषदांत सिद्धांत केलेला असून मैत्र्युपनिषदांत रुद्र, विष्णु, अच्युत, नारायण हे सर्व ब्रह्मच आहेत असें स्वच्छ म्हटलें आहे. मग श्रीकृष्णास परब्रह्मत्व येण्यास वेळ लागण्यांचें कारण काय? इतिहासाकडे पाहिलें तरी बुद्ध आपल्या स्वतःला ब्रह्मभूत म्हणत असून त्याच्या हयातींतच त्यास देवाचा मान मिळूं लागला होता. व त्याच्या मरणानंतर लवकरच त्यास देवाधिदेवाचें किंवा वैदिक धर्मातील परमात्म्याचें स्वरूप प्राप्त होऊन त्याची पूजाही सुरू झालेली होती असें विश्वसनीय बौद्ध ग्रंथावरून दिसून येतें. आणि ख्रिस्ताची गोष्टही तशीच आहे. बुद्ध व ख्रिस्त धर्मांच्या मूळ पुरुषां-

प्रमाणें भागवत धर्माच्याही प्रवर्तकास पहिल्यापासूनच ब्रह्माचें किंवा देवाचें स्वरूप प्राप्त होण्यास कोणतीच हरकत येण्याचें कारण नाहीं." (गीतारहस्य (आवृत्ति १९१५) पृष्ठ ५४२ ते ५४४)

सांस्कृतिक दृष्टया आपल्यापेक्षां कोणीही श्रेष्ठ नाहीं असा दर्प व ज्यांना हीन लेखावयाचें आहे त्यांना सांस्कृतिक दृष्टया हीन ठरविण्याची प्रवृत्ति या दोषांनीं पाश्चात्य दृष्टि डागळलेली असल्यामुळें तिचा डोळसपणानें व जपूनच विचार केला पाहिजे. भारतीयांनीं आपल्या सांस्कृतिक ग्रंथांच्या विषयीं "यद्वै किंचन साहेब अब्रवीत् तद् भेषजम्।" या पद्धतीनें त्यांच्या सिद्धांताकडे पाहूं नये इतकेंच माझें म्हणणें आहे. भारताच्या सांस्कृतिक ग्रंथावर याहूनही अधिक विकृत स्वरूपाचा व दुष्टपणाचा अत्याचार करण्यास भारताचेच कांहीं पुत्र प्रवृत्त झाले आहेत. ते म्हणजे भारतीय कम्युनिस्ट होत. त्यांच्या महाभारतावरील अत्याचाराचें पुढच्या व्याख्यानांत दिग्दर्शन करून मी भारताच्या विषयाला हात घालीन.

---

# ४. कम्युनिस्टांचे महाभारतावरील आक्षेप

कम्युनिस्टांचे महाभारतावरील अत्याचार प्रसिद्ध कम्युनिस्ट पुढारी श्री. एस. ए. डांगे यांच्या 'India from primitive Communism to Slavery' या पुस्तकांतून दृष्टोत्पत्तीस येतात. डांगे यांनीं हें पुस्तक केवळ महाभारतासाठीं लिहिलेलें नसून वेदांपासून महाभारतापर्यंतच्या सर्व भारतीय वाङ्मयाचा मार्क्स व लेनिनिझ-मच्या भौतिक इतिहासप्रक्रियेनें उलगडा करण्यासाठीं म्हणून हें पुस्तक लिहिलेलें आहे. तें एकाद्या विद्वानानें सत्यसंशोधनासाठीं लिहिलेलें पुस्तक नसून सर्व जगांत निरीश्वरवादाची नि जडवादाची प्रतिष्ठापना करावयास बद्धपरिकर झालेल्या रशियानियंत्रित कम्यु-निस्ट योजनेचा एक प्रचारात्मक भाग म्हणजे डांगे यांचें पुस्तक होय.

हें पुस्तक इतर अनेक ग्रंथांप्रमाणें केवळ एखाद्या ग्रंथालयांत राहावयाचें नसून कम्युनिस्टांच्या तंत्राप्रमाणें त्याचा पद्धतशीर प्रचार करण्यांत येईल. त्यांत दिग्दर्शित केलेल्या तत्त्वांचा, प्रतिपाद-नाचा, व भारतीय इतिहासासंबंधीं केलेल्या उलगड्याचा कम्युनि-स्टांच्या अभ्यासमंडळांतून पद्धतशीरपणें प्रचार करण्यांत येऊन भारतीय तरुण मनावर त्यांतील कुसंस्कार घडविण्याचा आटोकाट प्रयत्न करण्यांत येईल, इतकें त्या पुस्तकाला महत्त्व आहे. डांगे हे भारतीय कम्युनिस्ट पार्टीचे संस्थापक व अत्यंत प्रभावशाली पुढारी आहेत. त्यांचा त्याग मोठा आहे. पक्षाच्या सेवेची त्यांची तपश्चर्या मोठी आहे नि त्यांची बुद्धिमत्ताही अत्यंत कुशाग्र आहे. पण पक्ष-विशिष्ट धोरणामुळें रशियन तंत्राचा एक भाग म्हणून भारतीय वाङ्मयाचें त्यांनीं विडंबन चालविलें आहे. रशियामध्यें रशियन नियंत्रणाखालीं सर्व जगांतून धर्ममूल्यांची व नीतिमूल्यांची हकाल-पट्टी करून त्या जागीं पद्धतशीर रीतीनें निरीश्वरवादाची प्रतिष्ठा-पना करण्यासाठीं नुकतेंच एक मंडळ स्थापन झाल्याचें वर्तमान-

---

 व्याख्यान ४ थें, २९ मार्च १९५१

पत्रांतून प्रसिद्ध झालें आहे. त्यावरून मी म्हणतों या गोष्टीची सत्यता विचारवंतांना पटल्यावांचून राहणार नाहीं. कम्युनिस्टांच्या भौतिक इतिहासप्रक्रियेचा ओघ भारतीय जीवनमूल्यें व सांस्कृतिक ग्रंथ यांच्याशीं टक्कर होतांच अनेकवार अडून त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडालेल्या आहेत. ही अडचण ध्यानांत घेऊन " माझी इतिहास-प्रक्रिया हिंदुस्थानला लागू होत नाहीं असें तुम्ही म्हणतां काय, कशी होत नाहीं तेंच मी आतां पहातों ! " अशा अभिनिवेशानें दंड थोपटून कम्युनिस्टांचा हा नेता भारतीय सांस्कृतिक वाङ्मयाच्या विडंबनार्थ प्रवृत्त झाला आहे! त्यामुळें आणि कम्युनिस्टांचा जगांतील वाढता प्रभाव लक्षांत घेऊन डांगे यांच्या पुस्तकांतील प्रमेयांचा विचार करतांना भारतीय तरुण मनानें त्यांतील अपसिद्धांत व अपप्रचार पूर्णपणें लक्षांत घेतले पाहिजेत इतकेंच माझें म्हणणें आहे. जें सत्य असेल तें निर्भीडपणें मांडावयास व स्वीकारावयास मुळींच अडचण नाहीं. पण सत्याच्या नांवाखालीं आत्मवंचनेचे प्रयत्न न ओळखण्याइतकें कोणीही भाबडेंपण स्वीकारूं नये असें मला वाटतें. डांगे यांचें पुस्तक सर्वच बाबतींत विचार करून खोडून काढण्यासरखें आहे. पण माझ्या विषयाच्या मर्यादेमुळें मी केवळ महाभारतापुरताच त्याचा विचार करणार आहें.

## डांगे यांचा आरोप

श्री. डांगे यांनीं आपल्या पुस्तकाच्या उपोद्घातामध्यें (पृ. १-४) गेल्या १५० वर्षांत न्या. तेलंग, रानडे, भांडारकर, राजवाडे, लो. टिळक, दीक्षित, डॉ. जयस्वाल प्रभृति सर्व संशोधकांचा इतिहास लिहिण्यांतील हेतु सत्यसंशोधनाचा नसून भारतीय राष्ट्राच्या आत्माभिमानावर निखारे टाकणाऱ्या पाश्चात्य संशोधकांना गप्प बसवून ब्रिटिश सरकारविरुद्ध करावयाच्या आंदोलनाला नैतिक अधिष्ठान व ऐतिहासिक पार्श्वभूमि मिळवून देण्याचा होता आणि त्यांचें संशोधन नि प्रतिपादन याप्रमाणें हेतुगर्भ असल्यामुळें त्यांतून सत्यदर्शन झालेलें नाहीं, असें म्हणून त्याची बोळवण केलेली आहे.

ते आपल्या "India From Primitive Communism to Slavery" या पुस्तकांत लिहितात,

Indian writers and historians had almost developed a craze to prove that not only were we ancient but that everything that now exists in the world, as part of civilisation, was once with us, and we knew it all in science, philosophy, politics, etc. If Kant was great in Philosophy, our Shankar was one greater. If Shakespeare was great in literature, our Kalidas was one greater. If you had Rousseau's, social contract in politics, we too had one like it. We had Aeroplanes, Railways, Explosives, and what not ? And we had all this when the English or Enropeans were wearing bearskins We dug up our ancient walls and moats, our *Bhoorja patras,* and papyrii to build a defence against the foreign enemy who was trying to anihilate us. History was used by the English Rulers of India to demoralise the rising freedom movement, to build a psychosis in the leadership of the people that compared to world history, its age, its achievements. India and its people were nowhere; and whatever of its history was known, led to one conclusion that this country and its people were historically destined to be always conquered and ruled by foreign invaders.

Serious and responsible historians of *Cambridge History* and other works propagated this thesis. The English spoke as the inheriters of the civilisation of Greece and Rome, claimed the first place in ancient civilisation for them and for Egypt and Palestine; they denied that *Mahabharat* had any meaning or reality, that the Vedas of the Hindus were a historical record, or that our history could go beyond that of the Greeks whose Alexader conquered some parts of India. In order to fight it, our historians went to prove that India's history really

almost begins world history of present man. Tilak says in his "Arctic Home in the Vedas" that "the interglacial Aryan civilization and culture must have been of a higher type than is usually supposed to be; and that there is no reason why the primitive Aryans should not be placed on an equal footing with the prehistoric inhabitants of Egypt on point of culture and civilization."

The celebrated volume of Jayaswal on ancient *Hindu Polity* was written with the motive to refute the assertions of the British ruling class that India was unfit for parliamentary democratic institutions by showing that ancient India had republics and " self-governing democracies.

The works of Tilak, Rajwade, Ranade, Jayaswal, Paogi, Kunte, Bhandarkar, Ketkar and a host of others have done a great deal to lay down the outlines of the history of India. But so far most of the material has been presented with one purpose–to combat the view of Indian History as given by the European (British) writers.

Such militant history-writing had its use in the struggle against British power. But just as it gave the Indian Nationalist a certain morale, it also gave him a false sense of values regarding the past, and made him venerate everything that was of the past, but had ceased to be of any use in the present, or had become a positive hindrance. —( India : From primitive Communism to slavery, Pp. 1–4. )

म्हणजे भारतीय लेखकांनीं व इतिहासज्ञांनीं आपलें सर्व सामर्थ्य हें सिद्ध करण्यासाठींच खर्चीं घातलें आहे कीं, आम्ही केवळ प्राचीनच नसून, शास्त्रें, तत्त्वज्ञान, राजकारणशास्त्र इत्यादि जें जें कांहीं संस्कृतीचा भाग म्हणून आज जगांत नांदतें तें तें सर्व आमच्याजवळ एकदां होतें व आम्हांला माहीत आहे. जर कॉन्ट तत्त्वज्ञानांत श्रेष्ठ असेल तर आमचा शंकर त्यापेक्षां मोठा होता. जर शेक्सपिअर

वाङमयांत मोठा असेल तर आमचा कालिदास त्यापेक्षां मोठा होता. रूसोचें राज्यशास्त्र व सोशल कान्ट्रॅक्टची कल्पना तुमच्याजवळ असेल तर ती आमच्याजवळ नाहीं असें नाहीं. आमच्याजवळ विमानें होतीं, आगगाड्या, विध्वंसक साधनें, सर्व होतें. नव्हतें काय? जेव्हां इंग्रज व युरोपिअन उघड्या अंगानें फिरत होते तेव्हांच आमच्याजवळ हें सर्व कांहीं होतें.

या इतिहास–लेखकांच्या मागची हीच खरी प्रेरणा होती. आम्हांला हीन लेखूं पाहणाऱ्या परकीय शत्रूंविरुद्ध भूर्जपत्रें व ताडपत्रें सरसावून आम्ही प्राचीन इतिहासाच्या भिंती खणून प्रतिकाराची सिद्धता करीत होतों.

हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीचें नैतिक अधिष्ठान नष्ट करून ऐतिहासिक दृष्टयाच हिंदुस्थानांतील लोक जगांत कवडी किंमतीचे असून परक्यांनीं त्यांच्यावर राज्य करणें आणि त्यांना जिंकणें हेंच त्यांच्या इतिहासाच्या ओघांत बसतें हें सिद्ध करण्यासाठींच इतिहासाचा उपयोग केला. केंब्रिज विद्यापीठाच्या इतिहासाचे गंभीर, नि दायित्व अंगावर घेणारे इतिहासज्ञ देखील याच गोष्टींच्या प्रचारासाठीं खपत होते. या गोष्टींशीं टक्कर देऊन मानवी इतिहास जर कांहीं असेल तर तो हिंदुस्थानापासूनच सुरू होतो हें सिद्ध करण्यासाठींच भारतीय संशोधक पुढें सरसावले. ग्रीस व रोमच्या संस्कृतींतून वाढलेले इंग्रज लोक स्वतःच्या संस्कृतीला नि इजिप्त आणि पॅलेस्टाईनच्या संस्कृतीला प्रथम श्रेणीचें स्थान देऊन, महाभारताला कांहीं अर्थ आणि सत्यता नसून वेदांचा इतिहासाशीं कांहीं संबंध नाहीं आणि ज्यांच्या शिकंदरानें हिंदुस्थानचा कांहीं भाग जिंकला त्या ग्रीकांपूर्वी हिंदुस्थानास कांहींही इतिहास नाहीं असें प्रतिपादीत होते, त्यांना उत्तर देण्यासाठींच भारतीय इतिहास-लेखकांनीं लेखन केलें. उदाहरणार्थः टिळक आपल्या "आर्क्टिक होम इन दि वेदाज," या ग्रंथांत म्हणतात, "आर्यांची संस्कृति व सभ्यता समजण्यांत येते त्यापेक्षां निश्चितच अधिक श्रेष्ठ श्रेणीची असली पाहिजे. आणि सभ्यत

आणि संस्कृतीच्यासंबंधीं प्रागैतिहासिक काळांतील इजिप्शियनां- पेक्षां आर्यांना कमी लेखण्याचें कोणतेंही कारण दिसून येत नाहीं जयस्वालांचा 'प्राचीन हिंदुराज्यसंस्था' हा विख्यात ग्रंथ असाच विशिष्ट राजकीय हेतूंसाठींच लिहिलेला आहे. ब्रिटिश लोक "लोक- तंत्रात्मक राज्यकारभाराला हिंदुस्थान अयोग्य आहे" असें प्रति- पादन करीत होते. याच्या उलट प्राचीन भारतांत गणराज्यें व स्वयंशासित लोक—तंत्रात्मक राज्यव्यवस्था होती हें सिद्ध करून आपली त्याविषयींची पात्रता सिद्ध करणें हाच जयस्वालांच्या लिहि- ण्यांतील हेतु आहे. टिळक, राजवाडे, रानडे, जयस्वाल, पावगी, कुंटे, भांडारकर, केतकर, आणि इतर भारतीयांचा संघच्या संघ प्राचीन भारताच्या इतिहास-लेखनास प्रवृत्त झाला तो केवळ या उद्देशानें. या सैनिकी बाण्याच्या इतिहासलेखनाचा उपयोग ब्रिटिश सत्तेविरुद्ध युद्ध करीत असतांना होता यांत शंका नाहीं. पण ज्याप्रमाणें या इतिहासलेखनानें भारतीय राष्ट्रवाद्यांना कांहीं विशिष्ट प्रमाणांत नैतिक पार्श्वभूमि मिळवून दिली, त्याचप्रमाणें प्राचीन भारताविष- यींच्या मूल्यांच्या अत्यंत चुकीच्या कल्पना त्यांच्या मनांत बद्धमूल करून त्याला प्रत्येक प्राचीनत्वाचा दुरभिमानी बनविलें. त्यामुळें तें इतिहासलेखन आज तर निरुपयोगी झालेंच आहे, पण इतिहास- दर्शनाच्या दृष्टीनें तें निश्चित विरोधक व तापदायकच झालें आहे.

डांगे यांचा हा किती सफाईदार वार आहे! लेखणीच्या एकाच फटकाऱ्यानें त्यांनीं येथें कितीतरी गोष्टी सांगितल्या आहेत! एक- तर त्यांना आतां कोणाचींही मतें पद्धतशीर व प्रमाणबद्ध रीतीनें खोडून काढण्याची आवश्यकता उरली नाहीं. आणि सर्वच्या सर्व इतिहासलेखकांना बुर्झुआंच्या वर्गांत लोटून त्यांच्या परिश्रमावर बोळा फिरवितां आला! टिळकांनीं अनेक प्रमाणें दाखवून आर्यांची प्राचीनता व सुसंस्कृतता सिद्ध केली. ती खोटी ठरविण्याच्या भान- गडींत न पडतां डांगे व त्यांचे अनुयायी फक्त इतकेंच म्हणणार कीं, हें सारें तुम्ही राष्ट्राभिमानाच्या दृष्टीनें लिहिलें तें ठीक आहे. पण तें कांहीं खरें नाहीं. त्यासाठीं टिळकांचा सिद्धांत खोडून टाकण्याची

त्यांना यातायात नको. रहस्यसिद्धांताच्या बाबतींत तुम्ही युरोपिअनांशीं भांडतां हें ठीक आहे, पण वस्तुस्थिति कांहीं अशी असूं शकत नाहीं असें म्हटलें म्हणजे डांगे यांचें काम संपतें! वेदांगज्योतिषासारख्या विषयावर तपेचीं तपें घालविणाऱ्या व्यक्तीपासून तर वर्षानुवर्षें मनन-चिंतनांत घालवून प्राचीन भारतीय ग्रंथांचा अभ्यास करणाऱ्या राजवाडे, भांडारकर प्रभृतींना अशा सुलभ रीतीनें दूर सारण्याची ही युक्ति संस्थानांमागून संस्थानें लेखणीच्या एकाच फटकाऱ्यानें धुळीस लोळविणाऱ्या डलहौसीवरही अधिक ताण करणारी आहे यांत शंका नाहीं!

याप्रमाणें दुसऱ्यावर खोटे हेत्वारोप करून स्वत: डांगे तरी सत्यसंशोधनाच्या हेतूस्तव इतिहासलेखनास प्रवृत्त झाले आहेत काय? 'नाहीं' असें त्याचें उत्तर आहे. किंबहुना त्यांनीं बोळवण केलेल्या संशोधकांनीं परिश्रमपूर्वक नि सप्रमाण तरी लेखन केलेलें आहे, पण डांगे यांनीं तेंही केलें नाहीं. आपण ग्रंथ कां लिहीत आहोंत हें स्पष्ट करतांना आधीं ते सर्वांवर एक आरोप करतात नि नंतर आपला हेतु स्पष्ट करतात. त्यांचा आरोप (पृ. १६।१७) असा आहे कीं —

## डांगे यांचा आरोप

When the working class of a county has grown to the consciousness of its historical role, and begins to organise with its new ideology, the Bourgeoisie, besides suppressing it with violence, tries to corrupt it with its own ideology in every possible way. One of these ways is to teach the worker *wrong history*, to give him a picture of history as will tie him to the tail of the Bourgeois social order, as the best one, as the inevitable one, as the permanent, eternal, God given, most moral and happy one. Bourgeoisie presents the Communist conception of history, and future society as utopian, unreal, immoral, unnatural anti-human nature and ruinous. In order to do this,

the Bourgeois intelligentsia dives again into history, hypnotises the rising worker with the idealist, metaphysical picture of social growth and denies the dialectical materialist picture of social growth.

One of the ideological arguments the Bourgeoisie used against the rising Communist movement in India was that whatever the case in Europe and other Countries, India and its culture, its people and history were piculiar to themselves, that they did not answer to any of the laws of Marxism-Leninism.

And they dived into the story of the *Vedas, Smritis, Upanishads,* epics, and *Puranas,* and as evidence of their theory held forth for view the powerful systems of castes, the saintly kings on thrones and kingly saints in forests, all surviving through thousands of years, as nowhere else, and turned round and askedthe Communists: Where are all these according to your law of historical materialism ? India had no primitive communism, no collective property and matriarchy, no communes, she has no history of their break–up and rise of private property and State, classes and class–wars, slavery and feudalism, as you call them, taking their turns in her history. Yes, we have capitalism now; the cursed gift of the English and their machine but our capitalism has its distinctly Indian virtue. Hence we need not inevitably go over to Socialism through class–struggles and revolution. We shall have a new product of our own, and belie your law of Communism.

The Proletiarian State or the Proletarian democracy is not necessary for Indian conditions. In order to prove this they approach the worker and the peasant with bright happy stories of the Hindu and Muslim past and exploit

his present ignorance and ideology to cheat him of his future. (India : from primitive Communism to slavery PP. 16-17 )

म्हणजे ज्या वेळीं श्रमजीवी वर्ग ऐतिहासिक ओघाच्या अनुसार जागृत होऊन आपल्या नव्या तत्त्वज्ञानानुसार संघटित होऊं लागतो, त्यावेळीं बुर्झुआ हा हिंसात्मक साधनांनीं त्याला दडपून टाकण्याचा प्रयत्न करतोच; पण शक्य त्या सर्व साधनांनीं त्याच्या तत्त्वज्ञानाचेंही विडंबन करतो. या विडंबनाचा एक मार्ग त्याला चुकीचा इतिहास शिकविणें हा आहे. या मार्गानें आपलें समाजशास्त्र दुर्लंघ्य, शाश्वत, सनातन, देवानें दिलेलें, सर्वांत अधिक नैतिक व सुखस्वरूप आहे हें सिद्ध करण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. कम्युनिस्टांच्या इतिहासाच्या व्याख्येला खोटी, अनैतिक, मिथ्या, अनैसर्गिक, मनुष्याच्या भावी सुखाच्या दृष्टीनें विध्वंसक असें दाखविण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. त्यासाठीं इतिहासाचा आश्रय करून उठूं पाहणाऱ्या कामकऱ्याला, ध्येयवादी नि आध्यात्मिक समाजविकसनाचीं चित्रें दाखवून, विरोध-विकासात्मक जडवादाचें, समाजविकसनाचें चित्र खोटें आहे हें सिद्ध करण्याचा हा कुटिल डाव आहे. बुर्झुआंच्या ध्येयवादी नि कल्पनागर्भ विचारसरणींतून हिंदुस्थानांतील वर्धिष्णु साम्यवादी चळवळीला असें नेहमीं सांगण्यांत येत असतें कीं, युरोप आणि इतर देशांत कोणतीही वस्तुस्थिति असो; पण हिंदुस्थान, त्याची संस्कृति, लोक व इतिहास हीं कांहीं खास वैशिष्टयांनीं युक्त असून मार्क्सिझम व लेनिनिझमच्या पद्धतीनें तीं वैशिष्टयें मुळींच उलगडूं शकत नाहींत. यासाठीं ते वेद, स्मृति, उपनिषदें, नीतिग्रंथ आणि पुराणें यांच्या आश्रयानें आपली सामर्थ्यशील वर्णसंस्था सिंहासनस्थ संतराजे व राजवैभवानें तळपणारे अरण्यांतील मुनि यांच्या सहस्रावधि वर्षांपूर्वींच्या प्राचीन चित्रणांना पुढें करून असें विचारतात कीं, कुठें तरी अशी वस्तुस्थिति आहे काय? साम्यवादी इतिहासप्रक्रियेच्या पद्धतीनें याचें काय उत्तर देतां येईल? हिंदुस्थानांत रानटी संघजीवन, संघसंपत्ति, इतिहासांतील संघर्ष आणि खाजगी मालमत्तेचें आणि राज्यसंस्थेचें उत्थान, वर्ग व

वर्गविग्रह, दास्य नि सरंजामशाही इत्यादि साम्यवादांतील भानगडीचा मागमूस तरी सांपडतो काय ? आज भांडवलशाही आमच्या देशांत आहे हें खरें ; पण तो ब्रिटिश सत्तेचा अभिशाप आहे. त्यासाठीं अगतिकपणें साम्यवादाच्या, वर्गविग्रहाच्या व क्रांतीच्याच मार्गाची कांस धरली पाहिजे असें नाहीं. त्यासाठीं आम्हीं आमच्या पद्धतीनें स्वतंत्र मार्ग काढूं. त्यासाठीं श्रमजीवी वर्गाची राज्यसत्ता व श्रमजीवी वर्गाचें लोकराज्य हिंदुस्थानांत स्थापन करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं आणि हें सिद्ध करण्यासाठीं ते कामकऱ्यांच्याकडे जातात आणि त्यांना नि शेतकऱ्यांना फसवून त्यांच्या विचारसरणीवर पडदा टाकण्यासाठीं प्राचीन इतिहासांतील उदात्त व सुखस्वरूप कथांचीं चित्रणें करतात.

## डांगे यांची चक्रिकापत्ति

दुसऱ्यांवर हेतूंचा आरोप करीत असतांना श्री. डांगे यांनीं आपण स्वतःच कांहीं विशिष्ट हेतूस्तव प्राचीन भारतीय वाङमयाचें संशोधन करीत आहोंत हें या ठिकाणीं स्पष्टपणें मान्य केलें आहे. इतकेंच नव्हे तर तो हेतु शुद्ध राजकीय स्वरूपाचा असून आज हिंदुस्थानांत चालू असलेल्या कम्युनिस्ट आंदोलनाला हिंदुस्थानच्या इतिहासांतून पाठिंबा मिळवून देणें व त्याचा एक भाग म्हणजे हिंदुस्थानच्या इतिहासाचा विशिष्ट अर्थ लावून दाखविणें यासाठीं ते प्रवृत्त झाले आहेत हेंही त्यांनीं मान्य केलें आहे. हेतुपूर्वक केलेलें इतिहाससंशोधन अशास्त्रीय स्वरूपाचें असतें असा दुसऱ्यावर आरोप करणाऱ्या या व्यक्तीनें स्वतः तेंच अधिक नागड्या स्वरूपांत करण्यास प्रवृत्त व्हावें, तें स्पष्टपणें मान्य करावें, नि तरीही आपण सत्यसंशोधनास बसलों आहोंत असा आग्रह दाखवावा हा निवळ राणा भीमदेवी प्रकार आहे. हिंदुस्थानचा इतिहास मार्क्सिझममध्यें बसत नाहीं काय? मग तो मी आतां त्यांत कोंबून दाखवितों अशा आकसानें ते लेखनास प्रवृत्त झाले आहेत ! त्याचा स्वाभाविक परिणाम म्हणजे खोटे पुरावे देणें, भडक चित्रें रंगविणें, वचनांचे अर्थ उलटे सुलटे करणें, मधलींच कोठलींही वचनें दडपून देणें, नुसतींच विधानें करणें,

विधानांना पुराव्यांशिवाय वापरणें, फिरवाफिरव करणें इत्यादि गोष्टींत झालेला आहे. वास्तविक इतिहासलेखनाला प्रवृत्त होत असतांना त्यांच्यासारख्या बुद्धिमंतांनीं या वाम मार्गाची कांस धरणें सर्वथा अनुचित होतें. पण विद्वानांची बुद्धि चळल्यावर ती एखाद्या ब्रह्मसमंधाप्रमाणें काय काय अनर्थपात करणार नाहीं ? वस्तुस्थिति अशी आहे कीं, या पुस्तकाच्या रूपानें श्री. डांगे यांनीं स्वतःच धूळफेंक करून नि थापा देऊन भारतीय इतिहासाच्या बाबतींत श्रमजीवी वर्गाला नि आपल्या अनुयायांना पूर्णपणें फसविलें आहे. आजच्या भांडवलशाहींत त्यांना जो मार्ग सुचतो त्या मार्गानें त्यांनीं खुशाल जावें, पण त्यासाठीं या अनैतिक वाङमयविडंबनाची कांहींच आवश्यकता नव्हती. कदाचित् कम्युनिस्टांच्या नीतिमूल्यांचाच ते वापर करीत असतील! आपल्या स्वतःच्याच या कृत्यानें त्यांनीं खोटेपणा, अनैतिकता हीं तर आपल्या पदरीं बांधून घेतलेलींच आहेत, पण त्याच बरोबर त्यांचें प्रतिपादन किती विध्वंसक आहे हेंही त्यांनीं स्पष्टपणें दाखविलें आहे. इतिहासक्षेत्रांतील व विशेषतः महाभारत आणि तत्सदृश ग्रंथांच्या प्रांतांतील त्यांच्या मिथ्या नि अनैतिक विडंबनाचीं कांहीं प्रत्यक्ष उदाहरणेंच मी येथें देतों.

## खोटे पुरावे तयार करणें

(१) युधिष्ठिराच्या राज्यारोहणानंतर जिकडे तिकडे दारिद्र्य उत्पन्न झालें होतें असें कोणताही पुरावा न देतां विधान करून श्री. डांगे त्याचा पुरावा म्हणून आपल्या पुस्तकांत (पृ. १७४) लिहितातः

In places where there was famine and drought, the proud ruling class Brahmins turned to the hated Chandalas in their forest retreat to ask for food, and it had become the privilege of the conquered enslaved Chandal to preach morality to the holy Vishwamitra of the conquering Aryans not to resort to eating the carcass of dead dog to preserve his life.

" ज्या ठिकाणीं दुष्काळ व दारिद्र्य होतें तेथें गर्विष्ठ व वर्चस्व गाजविणाऱ्या वर्गाचे प्रतिनिधि जे ब्राह्मण ते द्वेष्य समजण्यांत

आलेल्या चांडालांच्या अरण्यांतील झोंपडींत जात, व अन्नाची भिक्षा मागत व चांडाल त्यांना नीतीचा उपदेश करीत, हें ऋषि विश्वामित्र कुत्र्याची तंगडी मागण्यासाठीं आले असतां चांडालानें त्यांना जो उपदेश केला त्यावरून दिसतें.''

येथें डांग्यांनीं खोटा पुरावा तयार केला आहे. ही कथा महाभारताच्या शांतिपर्वाच्या १४१ व्या अध्यायांत आली असून तेथें युधिष्ठिरानें भीष्मांना असें विचारलें आहे कीं 'अनिवार आपत्तींत अथवा दुष्काळी परिस्थितींत सांपडलेल्या व्यक्तीनें कसें वागावें ? प्राण द्यावा कीं नियमानुसार वागावें ?' त्यावर भीष्मांनीं उत्तर देतांना उदाहरणादाखल म्हणून प्राचीन काळची ही गोष्ट सांगितली आहे. डांगे म्हणतात त्याप्रमाणें त्या काळची ती कशी होणार ? या गोष्टीच्या आरंभीं असें म्हटलें आहे कीं,

**अत्राप्युदाहरन्तीममितिहासं पुरातनम् ।**
**विश्वामित्रस्य संवादं चाण्डालस्य च पक्कणे ॥१२**
**त्रेताद्वापरयोः संधौ तदा दैवविधिक्रमात् ।**
**अनावृष्टिरभूद्घोरा लोके द्वादशवार्षिकी ॥ १३**

—महाभारत शान्तिपर्व अ. १४१

महाभारताप्रमाणें ही गोष्ट त्रेता व द्वापर युगांच्या संधींत झालेली आहे आणि युधिष्ठिराचा राज्यकाल द्वापर आणि कलीच्या संधींतील आहे. अशा स्थितींत या दोन गोष्टी एककालिक कशा होणार ? युधिष्ठिराच्या राज्याच्या वेळच्या परिस्थितीचें वर्णन जें महाभारतांत आहे तेंच या बाबतींत प्रमाण मानलें पाहिजे. कारण त्यायोगेंच त्यावेळची परिस्थिति उलगडेल. शांतिपर्वांत सर्व प्रकारचे प्रश्न विचारण्यांत आले असून त्यांचीं उत्तरें वेगवेगळ्या दृष्टान्तांनीं देण्यांत आलेलीं आहेत. जर विश्वामित्र कधीं काळीं कोण्या चांडाळाचे घरीं गेला म्हणून तें युधिष्ठिराच्या काळचेंच वर्णन मानावयाचें तर शांतिपर्वांतील एका गोष्टींतील उंटाची मान कित्येक मैल लांब होती म्हणून मैलोगणती लांब मानेचे उंट त्या वेळीं होते असें श्री. डांगे यांच्या अनुमानाच्या पद्धतीनें मानावयास काय हरकत आहे ?

(२) आपल्या ग्रंथाच्या १७४ व्या पृष्ठावर श्री. डांगे लिहितात: Straightforword materialism faced them with its challenge, but Pandavas, true to their class-nature, beheaded the materialists.

"भौतिकवाद उघडपणें पांडवांच्या राज्यसत्तेला आव्हान देत होता. पण आपल्या वर्गाच्या स्वभावानुसार त्यांनीं भौतिकवाद्यांचे शिरच्छेद केले."

वास्तविक कोणचाही भौतिकवादी पांडवांच्या राज्यसत्तेला कधींही विरोध करावयास आला नसून सर्व प्रजा युधिष्ठिराची राज्यसत्ता आल्याबद्दल आनंदांत होती असेंच महाभारतांत वर्णन आहे. डांगे यांनीं आपलें हें विधान शांतिपर्वांतील ३९ व्या अध्यायांत आलेल्या चार्वाक राक्षसाच्या कथेवर आधारलेलें आहे. पण महाभारतांतील चार्वाक राक्षस व दर्शनशास्त्रांतील दर्शनकार चार्वाक या दोन व्यक्ति एकच आहेत अशी त्यांनीं जी आपली कल्पना करून घेतली आहे ती मुळांतच बरोबर नाहीं.

'चार्वाको राक्षसो' 'दुर्योधनसखा' अशीं विशेषणें जोडून दुर्योधनाचा एक मित्र युधिष्ठिराची नाजूक व कोमल वृत्ति ध्यानांत घेऊन तिच्यावर प्रहार करावयास पुढें आला असें महाभारतकारांचें म्हणणें आहे. त्यानें युधिष्ठिराचा जो धिक्कार केला तोही कोणच्याही भौतिकवादाच्या तत्त्वांची कांस धरून केला नसून युधिष्ठिरानें आपल्या गुरूचा व नातलगांचा वध केला म्हणूनच केला आहे हें त्याच्याच वाक्यावरून स्पष्ट होतें. तें त्याच्या मित्रप्रेमाच्या दृष्टीनें ठीकच होतें. तो म्हणतो :

**धिक् भवन्तं कुनृपतिं ज्ञातिघातिनमस्तु वै ॥ २६**
**किं तेन स्याद्धि कौंतेय कृत्वेमं ज्ञातिसंक्षयम् ।**
**घातयित्वा गुरूंश्चैव मृतं श्रेयो न जीवितम् ॥ २७**

—महाभारत शांतिपर्व अ. ३८

पण यांत कोणचा Straightforward materialism आहे? शिवाय पांडवांनीं त्याला मुळींच मारलेलें नसून प्रजाजनांनींच त्याचा वध केलेला आहे.

## आदर्श बिघडविण्याचे प्रयत्न

(३) श्री. डांगे हे आपल्या ग्रंथांत (पृष्ठ १६० वर) लिहितात : Jain Sutras say that Sita was Rama's sister. Even Walmiki could not suppress the fact that she was Ayonija. Rama lived in the period when primitives had not yet prohibited brother-sister marriage.

म्हणजे जैनसूत्रें असें म्हणतात कीं, राम अशा रानटी युगांत राहात होता कीं, ज्यावेळीं बहीण-भावांमध्यें लग्नें होत असत. वाल्मीकीलादेखील ही गोष्ट दडवून ठेवतां आली नाहीं. त्यानें सीतेला 'अयोनिजा' म्हटलें आहे. अयोनिजा या शब्दाचा इतका घाणेरडा अर्थ करणें म्हणजे काव्याविषयीं अज्ञान प्रकट करण्यासारखेंच आहे. विदेहराजदुहिता असें सीतेचें सर्वत्र वर्णन येतें. ज्या दशरथजातकाच्या गोष्टीवरून डांगे यांनीं प्रस्तुत वर्णन घेतलें आहे तें रामायणापूर्वीचें नसल्याचें संशोधकांनीं निर्विवादपणें सिद्ध केलेलें आहे डांगे यांच्यावर हें दायित्व येऊन पडतें कीं त्यांनीं तें पूर्वींचें आहे हें सिद्ध केलें पाहिजे. पण त्यांना सत्यसंशोधन करावयाचेंच नसून बुद्धिपुरःसर विकृतीकरण करावयाचें आहे हें ध्यानांत घेतलें म्हणजे वादच उरत नाहीं.

पृष्ठ १७१ वर श्री. डांगे लिहितात, The principle was again wielded by the ruling class against the toiling masses in the centuries to come in order to disarm the masses of their feelings of protest, their unhappiness and anger. It produced that wonderful legend of Janaka and others like him, where the rich king ate good food, but felt no pleasure in his tongue, wore good cloth, but was not attached to any feeling about it. So even the toiling slave must feel happy in starvation, control his emotions and reduce his body to a sensationless working machine to discharge the ordained duty. When everyone had attained that stage, poverty and misery vanish, as they lose their meaning for the man. The question of exploitation, slavery, share

of product, State and violence then no longer be raised on a social scale, when each individual can get happiness by this simple acrobatics of thought.

"पुन्हां एकदां वर्चस्व गाजविणाऱ्या वर्गांनी विरोध करून असंतोषानें व रागानें सत्तेला उलथून देऊं नये म्हणून एक युक्तिवाद काढला. त्यांनीं जनकाचें आणि तत्सम इतरांचें असें वर्णन तोंडावर फेकलें कीं, जेथें श्रीमंत राजा पक्वान्नें झोडीत होता पण जिभेच्या स्वादाचा आनंद त्याला भासत नव्हता. तो स्वतः उत्तम कपडे घाली पण त्याचा त्याला आनंद नव्हता. म्हणून रागावलेल्या दलित दासानेंही त्याच्याप्रमाणेंच उपासमारींतही आनंदांत राहावें आणि आपल्या भावना आवरून शरीरविकार शून्य करून स्वतःला मरेतों काम करण्याचें यंत्र बनवावें. प्रत्येकाला ही अवस्था प्राप्त झाली कीं, दारिद्रय व दुःख नष्ट होईल. कारण मनुष्याच्या दृष्टीनें त्याचें महत्त्वच राहणार नाहीं. पिळवणूक, दास्य, लाभाचा विभाग, राज्य व हिंसा हीं सामाजिक स्वरूपांत नंतर कधींच प्रकट होऊं शकणार नाहींत. जर प्रत्येक व्यक्तीला इतक्या सोप्या रीतीनें सुख मिळवितां येणें शक्य आहे तर मग या गोष्टींची गरजच काय ?"

श्री. डांगे यांनीं जनकाच्या कथेचा हा जो उपयोग केला, तो अत्यंत चुकीचा व खोडसाळ आहे. भारतीय राजसंस्थेचा आदर्श असा हीन कधींही नव्हता हें मी पुढें राज्यसंस्थेविषयींच्या व्याख्यानांत दाखविणारच आहें. तूर्त त्यांना इतकेंच सांगतों कीं त्यांनीं महाभारतांतील पुढील उक्तींकडे लक्ष द्यावें.

**युक्ता यदा जनपदा भिक्षन्ते ब्राह्मणा इव ।**
**अभीक्ष्णं भिक्षुरूपेण राजानं घ्नन्ति तादृशाः ॥ २३ ॥**

म. शांतिपर्व अ. ९१

**अहं वो रक्षितेत्युक्त्वा यो न रक्षति भूमिपः ।**
**स संहत्य निहन्तव्यः श्वेव सोन्माद आतुरः ॥ ३३ ॥**

म. भा. अनुशासनपर्व ६१

ज्यावेळीं काम करावयाची इच्छा व शक्ति असलेले लोक ब्राह्मणांप्रमाणें भिक्षा मागूं लागतात त्यावेळीं असंतुष्ट लोक राजाला

ठार मारल्याखेरीज राहात नाहींत. मी तुमचें संरक्षण करणार आहें असें सांगूनही जो राजा लोकांचें रक्षण करीत नाहीं त्याला सर्व लोकांनीं संघटित रीतीनें वेड लागलेल्या कुत्र्याप्रमाणें ठार मारावें. अशा दुष्ट राजांना 'बलिसद्भागतस्कर' 'राजकलि' इत्यादि विशेषणें महाभारतांतून अनेकवार योजलेलीं आहेत. जनक हा राजर्षि म्हणून गौरविलेला आहे. त्याचें वर्णन कर्मयोगी म्हणून येत असतें व तेंही मानसिक समतेच्या उच्च पातळीसंबंधीं आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

निराधार व खोटें प्रतिपादन करणें हा नर. डांगे यांच्या हातचा मळ आहे. पृष्ठ ३५ वर ते लिहितात,

How does the Hindu philosopher of history define these four yugas of social development:

The *Aitareya Brahman* of *Rigweda* defines them thus:– ( VII-15 )

The Kali is one sleeping or lying prostrate.

The Dwapar is slowly moving.

The Treta is standing.

The Krita is wandering.

The hunter, wandering in search of prey in groups with his stone tools, crude boulders, etc. is the epoch of *Krita,* very remote in man's memory. It is the stage of of savagery of man. The second is where he evolves from stone tools to the bow and arrow, discovers fire, domesticates animals and grows primitive pasturage. Life has become more stable, though one cannot talk of stability of the age of civilization. It is the *Treta,* say, of barbarism. From there the evolution is more rapid. Metal tools are evoled; smelting does it. The iron axe, the plough and agriculture come into existence. Populations in growing have to move but life is more stable. Finally, still greater development of tools, handicrafts

come in, town and country develop; property relations undergo a violent change. and *Kali* is usherd in, the age of civilisation.

हिंदुतत्त्वज्ञानी व इतिहासवेत्ते चतुर्युगाची कल्पना मांडून समाज-विकसन कसें दाखवितात ? अैतरेय ब्राह्मण म्हणतें,

**कलिः शयानो भवति संजिहानस्तु द्वापरः ।**
**उत्तिष्ठस्त्रेता भवति कृतं संपद्यते चरन् ।।**

कृत म्हणजे ज्या वेळीं भक्ष्य मिळविण्यासाठीं रानटी मनुष्य आपल्या साधनांनिशीं हिंडत होता ती प्राथमिक रानटी अवस्था. कारण 'चरन्' असें म्हटलें आहे. पुढें त्याच्या साधनांत धनुष्य-बाण, अग्नि, उपयुक्त जनावरें यांची वाढ झाल्यावर त्याला थोडी अधिक स्थिरता प्राप्त झाली. या दुसऱ्या अवस्थेला त्रेता असें म्हण-तात. त्यानंतर उत्पादनसाधनांत आणखी वाढ होऊन शेतीची स्थिति अस्तित्वांत आली. त्याला द्वापर असें म्हणतात. कारण त्यांत आणखी थोडी स्थिरता असते. शेवटीं या साधनांत आणखी उत्क्रांति होऊन लहान लहान उद्योगधंदे इत्यादि निर्माण होऊन जी नागर संस्कृति उत्पन्न झाली तिला कलियुग असें म्हणतात. कारण येथें जीवनाला पुष्कळ स्थिरत्व उत्पन्न झालेलें आहे.

एकतर डांगे यांना ही ऋचा समजली तरी नाहीं किंवा त्यांनीं हेतुतः तरी विपर्यास केला. भारतीयांच्या सर्व सांस्कृतिक ग्रंथांत व महाभारतांतही कृत ही आदर्श स्थिति नि कलि ही अधःपतनाची स्थिति म्हणून स्पष्ट दिग्दर्शित करण्यांत आलें आहे. डांगे यांनीं उद्धृत केलेली ऋचा युगांची व्याख्या म्हणून अैतरेय ब्राह्मणांत आलेली नाहीं व तिचा ते करतात तसा अर्थही नाहीं. त्यांनीं उप-क्रम, उपसंहार कां दडविले ? ऋग्वेदाच्या अैतरेय ब्राह्मणाच्या ३३ व्या अध्यायांतील तिसऱ्या खंडांत इंद्राचें वाक्य म्हणून ही ऋचा आलेली आहे. प्रकरण असें आहे कीं, हरिश्चंद्रानें वरुण देवतेचा अपराध केलेला असल्यामुळें वरुण त्याला रोगग्रस्त करतो. त्याला

भेटण्यास त्याचा मुलगा रोहित त्याच्याकडे येत असतो. इंद्र हा वरुणाचा मित्र असल्यामुळें रोहिताला अडथळा उत्पन्न होतो. त्या वेळीं इंद्र त्याला हें पटवून देऊं इच्छितो कीं, त्यानें घरीं न येतां भटकावें. येथें कृत, त्रेता, द्वापर, कलि या संज्ञा देखील भारतीयांच्या सांस्कृतिक संकेताप्रमाणें कृत ही सर्वोच्च अवस्था, त्रेता ही त्यापेक्षां कमी श्रेष्ठतेची, द्वापर ही त्याहून कमी श्रेणीची, नि कलि ही आत्यंतिक अधःपाताची हें गृहीत धरूनच वापरण्यांत आलेल्या आहेत.

**ताश्च उत्तरोत्तरश्रेष्ठत्वात् कलिद्वापरत्रेताकृतयुगैस्समानाः ।**
**ततश्चरणस्य सर्वोत्तमत्वात् चरेयुरेवेति ।**

तात्पर्य, रोहिताचें भटकणें इंद्राला अभिप्रेत आहे म्हणून तो त्याला तसें सांगत आहे.

या पद्धतीनें डांगे जर हिंदुस्थानच्या इतिहासांतून मार्क्सची प्रक्रिया सिद्ध करूं पहात असतील तर 'Save me from my friends' असेंच मार्क्सवाद्यांना त्यांच्या बाबतींत म्हणण्याची लवकरच पाळी येईल. मी दाखविलेल्या येवढ्या गोष्टींवरून देखील त्यांचें हें पुस्तक रानड्यांच्या नाना फडणिसांवरील भारुडाच्या योग्यतेचें ठरतें. गीतेवर त्यांनीं केलेले अत्याचार मी माझ्या व्याख्यानमालेंत गीतेवरील व्याख्यानांत सांगणार आहे. डांगे यांनीं आपल्या पुस्तकानेंच मार्क्सची इतिहासप्रक्रिया ही खोटी, अनैसर्गिक, चुकीची, विध्वंसक आणि अशास्त्रीय कशी आहे हें उत्कृष्टपणें सिद्ध केल्याबद्दल मात्र मी त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. तात्पर्य मला आपणांस इतकेंच सांगावयाचें आहे कीं, महाभारतासारख्या ग्रंथाकडे पाहतांना या विकृत दृष्टिकोनाच्या आहारीं जाऊं नये. विशुद्ध, सत्यान्वेषी दृष्टीनेंच या जीवनशास्त्रावरील महान् ग्रंथाकडे पाहणें अवश्य आहे.



# ५. सांस्कृतिक जीवनमूल्यांचा ऱ्हास

महाभारत हें आर्यांचें जीवनशास्त्र आहे. भारतीय राष्ट्राचीं लक्षणें व ध्येयें, विषम परिस्थितींत तीं साध्य करण्याचीं साधनें, आणि व्यक्ति व समाज यांच्या अंतिम विकसनाचें चित्र त्यांत उत्कृष्ट रीतीनें आढळेल. इतिहास, पुराण, काव्य, धर्मशास्त्र, राज्यशास्त्र, युद्धशास्त्र, आपत्तींत कसें वागावें इत्यादि सर्व गोष्टींचें त्यांत यथावत् दिग्दर्शन असल्यामुळें आणि तें आजही जीवनमार्ग उजळावयास पूर्णपणें समर्थ असल्यामुळें मी त्याला सांस्कृतिक ज्ञानकोश असें म्हटलें. लोकांच्या अंत:करणांतील सर्व अंधकार नाहींसा करून हा दीपस्तंभ कर्तव्याकर्तव्यांचा मार्ग त्यांच्यासाठीं उजळतो. हा इतिहास हिंदुराष्ट्राला आपण कोण आहोंत, व आपल्याला काय उत्पन्न करावयाचें आहे, याची स्पष्टपणें जाणीव देतो.

महाभारताला 'जय' नामक इतिहास म्हणतात. आणि या 'जय' नामक इतिहासाचें वाचन करीत असतां नारायण आणि नरोत्तम नर यांना वंदन केलें पाहिजे असा नियम आहे. कारण कीं, नरनारायणांनीं मिळविलेल्या विजयाचाच हा इतिहास आहे. येथें नर म्हणजे अर्जुन असून नारायण म्हणजे भगवान् श्रीकृष्ण होत.

## अवताराचें कारण

श्रीकृष्णाला महाभारतांतच चराचरांत भरून राहिलेल्या परमेश्वराचें स्वरूप मानलेलें असून भगवान् महाविष्णूचा तो अवतार होय असें प्रतिपादन केलें आहे. परमेश्वरानें अवतार घेण्यासारखी कोणती परिस्थिति महाभारतकाळीं निर्माण झाली होती हें पहाणें अवश्य आहे. श्रीमत् भगवद्गीतेंत परमेश्वराचे अवतार केव्हां होत असतात याचें वर्णन करतांना असें म्हटलें आहे कीं—

---

व्याख्यान ५ वें, दिनांक ३० मार्च १९५१.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७**
**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८** —गीता अ. ४

ज्या ज्या वेळीं धर्माची ग्लानि होते आणि अधर्माचा उत्कर्ष होतो त्या त्या वेळीं मी उत्पन्न होतों. साधूंचें संरक्षण करण्यासाठीं, दुराचारी लोकांना ठार मारण्यासाठीं आणि धर्माची प्रतिष्ठापना करण्यासाठीं मी अवतार घेतों.

भगवान् श्रीकृष्ण हे युगपुरुष होते हें निर्विवाद आहे. मनुष्य-स्वभावांतल्या सर्व विकारांच्या नि अपूर्णतेच्या ते अनंतपटीनें वर असून त्यांच्या धारणेला त्या अपूर्णतेचा स्पर्शही नव्हता. अशा या युगपुरुषानें धर्माची स्थापना केली, अधर्माचा विनाश केला नि साधूंचें संरक्षण केलें. परमेश्वराचे अवतार या भरतभूमींत वारंवार होत असतात. आत्मविस्मृतिरूप अधर्म परकीयांच्या आक्रमणामुळें वा स्वकीयांच्या अधःपतनामुळें जेव्हां वाढीस लागतो तेव्हां त्याचा नायनाट करून त्या जागीं आत्मज्ञानरूपी धर्माची प्रतिष्ठापना करणें हें युगपुरुषांचें काम आहे. त्यांना येथें अवतारी म्हटलें जातें. श्रीकृष्णजन्मापूर्वी भारतीय राष्ट्रांत आत्मविस्मृतिरूप अधर्माची गडद काळी छाया पसरली असली पाहिजे हें निर्विवाद आहे. खरो-खरी तशी वस्तुस्थिति उत्पन्न झाली होती काय हें पाहिल्यावांचून महाभारताच्या इतिहासांतील प्रतिपाद्य विषयाची संगति लागूं शक-णार नाहीं.

## भारतीय संस्कृतीचें वैशिष्टय

भारतीय राष्ट्राची समाजरचना चातुर्वण्यात्मक असून त्या समा-जांतील ब्राह्मणवर्णाला संस्कृतीच्या संरक्षणाचें काम दिलेलें आहे. योगयुक्त, तपस्यामय आणि ज्ञानसंपन्न जीवन जगणारा, मानवाच्या अंतःकरणांतील सर्व स्वाभाविक भावविकारांवर Natural instincts विजय मिळवून दारिद्रय हेंच परमधन मानणारा, असा एक वर्गच्या वर्ग भारतीय संस्कृतीनें उत्पन्न करून तो सहस्रावधि वर्षे

टिकवून दाखविला हें त्या संस्कृतीचें वैशिष्टच होय. पाश्चात्य इतिहाससंशोधक व कम्युनिस्ट पुढारी युरोपमधल्या पतित, भ्रष्ट आणि भोगसुखासीन झालेल्या भिक्षुक वर्गाशीं ब्राह्मणांची तुलना करतात तें चूक आहे. मानवी जीवन हें पशुत्व आणि देवत्व यांचें संग्रामस्थान आहे. या जीवनांतील मन:सामर्थ्याच्या भरंवशावर पशुत्वावर संपूर्णपणें विजय मिळवून विकारहीन चराचरांचे ठायीं आपली अस्मिता प्रत्यक्ष अनुभवणारें असें जीवन उत्पन्न करावयाचें हा या संस्कृतीचा संकेत आहे. असें जीवन प्रत्यक्ष उत्पन्न झाल्यावांचून, भांडवली लोकशाहीच्या पद्धतीनें उत्पादनसाधनें आणि अुत्पादन कितीही वाढविलें, अथवा साम्यवाद्यांच्या पद्धतीनें आर्थिक वांटपाच्या केवढ्याही योजना आंखल्या, तरीही त्याचा जगत्कल्याणाच्या दृष्टीनें कांहीं उपयोग होऊं शकत नाहीं. संकुचितता, मत्सर, क्रोध व लोभ यांच्यावर विजय मिळविल्यावांचून आणि कर्तव्यनिष्ठ बनल्यावांचून खऱ्या अर्थानें मानवतेचे प्रश्न कोण व कसे सोडविणार ?

अशा धारणेचा एक वर्गच्या वर्ग आर्य संस्कृतीनें उत्पन्न केला होता. त्याला कोणाच्या धनाची अपेक्षा नसे. उपजीवनासाठीं राज्यसंस्थेचें अंकित होऊन राहणें त्याच्या जीवनांत आवश्यक नसे. अल्पही अपराध झाला तरी त्याची शिक्षा आपण होऊन घेण्याचें धैर्य त्याच्या ठिकाणीं असे. म्हणून तो राजसत्तेला नियंत्रित करूं शकत असे. राजसत्तेला त्याचें नियंत्रण करण्याचा अधिकार नसे. सर्व इंद्रियांना ताब्यांत ठेवणारा, शम, दम, तप, सत्य, तितिक्षा, शांति, नम्रता, इत्यादि गुणांची केवळ मूस असा हा वर्ग आयुष्यभर देवघरांतल्या नंदादीपाप्रमाणें सांस्कृतिक जीवनमूल्यें प्रत्यक्ष जीवनांतून आविष्कृत करण्यासाठीं म्हणून सतत तिळतिळ जीवन जाळण्याचें व्रत पत्करीत असे. म्हणून तोच उलट राजसत्ता जर आपल्या हेतूपासून ढळली तर तिला नियंत्रित करी. राजसत्तेचे पाश त्याच्यावर पडत नसत. वेन हा अधार्मिक राजा असल्यामुळें त्याला या वर्गानें पदच्युत केलें होतें. त्याला सत्तेजवळून कांहीं नको होतें. ती उन्मार्ग-

गामी होऊं नये एवढीच त्याची इच्छा होती. घटनात्मक दृष्टयाच या वर्गाचें नियंत्रण राजसत्तेवर कसें असे हें मी माझ्या रामायणावरील व्याख्यानमालेंत स्पष्ट केलें आहे. जोंवर हा वर्ग अधःपतित झालेला नाहीं तोंवर भारतीय संस्कृतीला विनाशाचें भय नाहीं असें श्रीशंकराचार्यांनीं गीताभाष्यांतील "ब्राह्मणत्वस्य हि रक्षणेन रक्षितः स्यात् वैदिको धर्मः ।" या उक्तीनें सुचवून ठेविलें आहे. या वर्गाजवळ राजसत्ता कर मागत नसे आणि त्यास दंडही करीत नसे. याचा अर्थ कित्येक लोकांनीं चुकीचा केलेला आहे. हे विशेष-अधिकार नव्हते. स्वतः होऊनच आपल्या अपराधाबिषयीं जो दंड स्वीकारावयास सिद्ध आहे त्याला सत्तेनें आणखी नवा दंड तो काय द्यावयाचा ?

## शंख व लिखित

महाभारतांतील शांतिपर्वाच्या २३ व्या अध्यायांत यासंबंधीं एक मोठें उद्बोधक उदाहरण आलें आहे. शंख व लिखित या नांवाचे दोन ब्राह्मण होते. ते दोघे एकमेकांचे बंधु असून त्यांचे दोन स्वतंत्र वेगवेगळे आश्रम होते. एकदां शंखाला भेटावयास लिखित त्याच्या आश्रमांत आला. त्यावेळीं शंख आश्रमांत नव्हता. लिखितानें त्या आश्रमांतील एका वृक्षाचें फळ तोडून तोंडांत टाकलें. थोडया वेळानें शंख तेथें आला. त्यानें आपल्या भावाला फळ खातांना पाहून "हें फळ तूं कोठून आणलेंस" म्हणून विचारलें. त्यावर लिखितानें असें उत्तर दिलें कीं, "या तुझ्या आश्रमांतील वृक्षाचेंच हें फळ असून मीच तें तोडून घेतलें आहे." त्यावर शंख त्याला म्हणाला, "हें फळ तूं मला न विचारतां तोडण्यांत धर्मशास्त्राच्या अनुसार चोरी केली आहेस. तेव्हां या अपराधाची शिक्षा भोगणें हें तुझें कर्तव्य आहे. तूं ताबडतोब राजाकडे जा व चोरी करण्याची जी शिक्षा असेल ती भोगून परत ये." वडील भावाच्या या आज्ञेप्रमाणें लिखित त्या प्रांताच्या राजाकडे गेला व स्वतःला शिक्षा करण्यासाठीं त्याला आग्रह करूं लागला. राजानें त्याला पुष्कळ समजाविण्याचा प्रयत्न केला, पण त्यानें तें ऐकलें नाहीं. शेवटीं चोरीची

शिक्षा म्हणून राजानें त्याचे हात तोडले तेव्हां त्या ब्राह्मणाचें खरें समाधान झालें. अंतःकरणाची नैतिक भावना ज्यांची इतकी उच्च आहे त्यांना अदंडच मानण्यांत आलें असलें तर त्यांत नवल काय ? आणि उपजीवनार्थ कांहींच न करतां समाजाच्या कल्याणासाठीं "उरलों उपकारापुरता" असें जीवन जगणाऱ्या या वर्गाजवळून कर तरी कसा घ्यावयाचा ? हा वर्ग ज्या वेळीं नष्ट होतो अथवा भ्रष्ट होतो त्यावेळीं भारतीय संस्कृतीचा व राष्ट्राचाही नाश होतो. आणि हा वर्ग ज्यावेळीं आपल्या सर्व वैशिष्टयांनीं तळपत असतो त्यावेळीं राष्ट्रही आपल्या ऐश्वर्यानें तळपत असतें असें महाभारताचें म्हणणें आहे.

ब्राह्मण्य नष्ट झालेल्या आणि लौकिक जीवन पत्करलेल्या ब्राह्मणांजवळून करभार घेऊं नये असें महाभारतांत कोठेंही म्हटलेलें नाहीं. उलट ब्राह्मणांतही ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र असतात. आणि भ्रष्ट ब्राह्मणांकडून अथवा लौकिक जीवन जगणाऱ्या ब्राह्मणांकडून करभारही घ्यावा, इतकेंच नव्हे तर त्याला वेठीला धरून त्याच्याकडून विनावेतन काम करून घ्यावें असेंही महाभारतांत स्पष्ट म्हटलें आहे. महाभारतांतील पुढील कांहीं वचनें पहाः—

**जन्मकर्मविहीना ये कदर्या ब्रह्मबन्धवः ।**
**एते शूद्रसमा राजन् ब्राह्मणानां भवन्त्युत ।।** ४
**अश्रोत्रियाः सर्व एव सर्वे चानाहिताग्नयः ।**
**तान् सर्वान् धार्मिको राजा बलिं विष्टिं च कारयेत ।।** ५
**ऋत्विक् पुरोहितो मन्त्री दूतो वार्तानुकर्षकः ।**
**एते क्षत्रसमा राजन् ब्राह्मणानां भवन्त्युत ।।** ७
**अश्वारोहा गजारोहा रथिनोऽथ पदातयः ।**
**एते वैश्यसमा राजन् ब्राह्मणानां भवन्त्युत ।।** ८
**एतेभ्यो बलिमादद्याद्धीनकोशो महीपतिः ।**
**ऋते ब्रह्मसमेभ्यश्च देवकल्पेभ्य एव च ।।**९
**अब्राह्मणानां वित्तस्य स्वामी राजेति वैदिकम् ।**
**ब्राह्मणानां च ये केचिद्विकर्मस्था भवन्त्युत ।।** १०

**विकर्मस्थाश्च नोपेक्ष्या विप्रा राज्ञा कथंचन ।**
**नियम्याः संविभज्याश्च धर्मानुग्रहकारणात् ।। ११ ।।**

—महाभारत शांतिपर्व अ. ७६

अर्थ—जे जन्मसिद्ध कर्मापासून विन्मुख असणारे, दळभद्रे, ब्राह्मणब्रुव आहेत ते सर्व शूद्र होत. वेदाध्ययन न केलेले, अग्नीची उपासना न करणारे अशा सर्व ब्राह्मणांना धार्मिक राजानें वेठीला धरून कामाला लावावें व त्यांच्याकडून करही घ्यावा. ऋत्विज, पुरोहित, मंत्री, दूत, व बातम्या काढणारे हे ब्राह्मणांमधले क्षत्रिय होत. अश्व, गज, रथ यांवर आरोहण करणारे अशा ब्राह्मणांना वैश्याप्रमाणें समजावें आणि या सर्वांपासून क्षीणकोश राजानें करभार घ्यावा. केवळ जे देवासारखे अथवा ब्रह्मासारखे ब्राह्मण असतील त्यांच्याच जवळून करभार घेऊं नये. अब्राह्मणांच्या वित्ताचा धनी राजाच आहे अशी वैदिक धर्माची धारणा आहे. जे ब्राह्मण संस्कृतिसंरक्षणाचें आपलें काम सोडून देणारे व भलत्याच कामास हात घालणारे असतील त्यांची राजानें केव्हांही उपेक्षा करूं नये. इतकेंच नव्हे तर त्यांचें नियंत्रण करावें व इतर प्रजाजनांप्रमाणेंच त्यांना वागवावें.

ब्रह्मसम व देवसम ब्राह्मण कोणते याचें महाभारतानें पुढीलप्रमाणें लक्षण दिलें आहे.

**युधिष्ठिर उवाच :—**

**स्वकर्मण्यपरे युक्तास्तथैवान्ये विकर्मणि ।**
**तेषां विशेषमाचक्ष्व ब्राह्मणानां पितामह ।। १**

**भीष्म उवाच :—**

**विद्यालक्षणसंपन्नाः सर्वत्र समदर्शिनः ।**
**एते ब्रह्मसमा राजन् ब्राह्मणाः परिकीर्तिताः ।। २**
**ऋग्यजुःसामसंपन्नाः स्वेषु कर्मस्ववस्थिताः ।**
**एते देवसमा राजन् ब्राह्मणानां भवन्त्युत ।। ३**

**—महाभारत शान्तिपर्व अ. ७६**

विद्वान्, चारित्र्यसंपन्न आणि सर्वत्र समभावना ठेवणारे जे ब्राह्मण त्यांना ब्रह्मसम म्हणतात आणि देवत्रयीमध्यें निष्णात असून आपल्या वर्णधर्मानुसार जे चालणारे त्यांना 'देवसम' म्हणतात.

## ब्राह्मण्य भंगलें

महाभारतकालीन अथवा श्रीकृष्णजन्मापूर्वीच्या परिस्थितींत समाजाचें सांस्कृतिक नेतृत्व करणाऱ्या या वर्गाचा दारुण अधःपात झालेला होता. नेत्याचा अधःपात झाला कीं साऱ्या राष्ट्राचा अधःपात झाल्यावांचून राहात नाहीं. व्यक्तीचा अधःपात एकवार क्षम्य समजतां येतो. कारण त्यामुळें व्हावयाची हानि त्या व्यक्तीपुरतीच काय ती मर्यादित असते. पण नेत्याचा अधःपात कधींही क्षम्य असू शकत नाहीं. कारण त्यांत त्या व्यक्तीची हानि नसून संपूर्ण समाजाचाच त्यामुळें अधःपात होत असतो. अशा या वर्गाच्या दारुण अधःपतनाचें चित्र महाभारतांत द्रोणाचार्यांच्या रूपानें महर्षि व्यासांनीं चित्रित केलेलें आहे.

आचार्य द्रोण हे महर्षि होते हें प्रसिद्ध आहे. असें जीवन त्यांना लाभलें होतें, कीं ज्या जीवनांत सर्व कोमल विकारांवर व मानवस्वभावसुलभ भावनानिष्ठतेवर त्यांनीं विजय मिळविणें हें त्यांच्या वर्णधर्माच्या दृष्टीनें आणि स्वभावसिद्ध सामाजिक नेतृत्वाच्या दृष्टीनें परम आवश्यक होतें. परन्तु त्यांनीं विकारांवर विजय मिळविण्याऐवजीं विकारांनींच त्यांच्यावर विजय मिळविला.

द्रोणांनीं शस्त्र हातांत घेतलें म्हणून कांहीं त्यांना कोणी अधःपतित म्हणू शकत नाहीं. ब्राह्मणांनीं शस्त्र हातांत घेण्याचा कुठेंही निषेध नाहीं. कांहीं विशिष्ट प्रसंगीं तर शस्त्र हातांत घेणें हें त्यांचें धार्मिक कर्तव्यच होऊन बसतें. पण द्रोणांचा अधःपात वेगळ्या प्रकारचा होता. द्रोण हे भरद्वाज ऋषींचे पुत्र. धनुर्वेदांत त्यावेळच्या सर्व क्षत्रिय समाजाचे ते गुरु होते. लहानपणीं आपल्या वडिलांच्या आश्रमांत ते अध्ययन करीत असतां तेथेंच पांचाल राजपुत्र द्रुपदही त्यांच्याबरोबरच अध्ययन करीत होता. लहानपणीं मित्रप्रेमानें प्रेरित होऊन द्रुपदानें या आश्रमांत द्रोणांना असें सांगितलें कीं मी पुढें राजा झाल्यावर मित्र म्हणून तुला माझें अर्धें राज्य देईन. अध्ययन पूर्ण झाल्यावर द्रुपद आपल्या राजनगरींत जाऊन पांचालांचा राजा झाला. पुढें द्रोणांनीं ववाह केला. त्यांना अश्वत्थामा नांवाचा मुलगा झाला. आणि

आश्रमांत ते दारिद्र्याचें ऋषितुल्य जीवन कंठू लागले. काय वाटेल तें झालें तरी राजाची सेवा पत्करून हीन जीवन स्वीकारावयाचें नाहीं असा द्रोणांचा निश्चय होता. पण स्वतःचें जीवन कंठीत असतां द्रोणांच्यावर विकारांनीं विजय मिळविला नसला तरी शेवटीं पुत्र-स्नेहानें—मानवांच्या अंतःकरणांतील सर्व भावनांना व्यापून टाकणाऱ्या या अत्यंत कोमल बंधनानें द्रोणांच्या खदिरांगारासारख्या तेजस्वी ब्राह्मण्यालाही शेवटीं जिकलें. त्यांचा पुत्र अश्वत्थामा त्यांच्या घरच्या दारिद्र्यामूळें दूध घेऊं शकत नसे. त्याचे समवयस्क सोबती आपल्या घरून दूध पिऊन येत. पण अश्वत्थाम्याला दूध मिळेना. तो हट्ट धरून बसला त्यावेळीं त्याच्या आईनें पांढरें पीठ पाण्यांत कालवून तेंच दूध म्हणून त्याला दिलें. आणि तोही यापूर्वी दूधाचा स्वाद कधींहीं घेतलेला नसल्यामुळें तेंच दूध समजून पिऊन आनंदानें नाचूं लागला. आचार्यांनीं स्वतःच तो प्रसंग पाहिला. बरोबरींचीं मुलें त्याची थट्टा करूं लागलीं. आणि तें पहातांच उग्र चारित्र्यापासून द्रोणांचे दृढनिश्चयी मन ढळलें. आचार्य स्वतःच या प्रसंगाचें वर्णन करतांना म्हणतातः—

**हास्यतामुपसंप्राप्तं कश्मलं तत्र मेऽभवत् ।**
**द्रोणं धिगस्त्वधनिनं यो धनं नाधिगच्छति ॥** ५६
**पिष्टोदकं सुतो यस्य पीत्वा क्षीरस्य तृष्णया ।**
**नृत्यति स्म मुदाविष्टः क्षीरं पीतं मयाऽप्युत ॥** ५७
**इति संभाषतां वाचं श्रुत्वा मे बुद्धिरच्यवत् ।** ५८

— महाभारत आदिपर्व अ. १३१

अर्थ—दरिदी द्रोणाला धिक्कार असो ! ज्याचा मुलगा दूध समजून पिठाचें पाणी पिऊन नृत्य करतो, त्या द्रोणाला धिक्कार असो! असा माझा उपहास ऐकून मला अत्यंत दुःख झालें व माझ्या चित्ताचें स्थैर्य ढळलें. तरीपण

"**परोपसेवां पापिष्ठां न च कुर्यां धनेप्सया**" ॥ ५९—आदिपर्व अ. १३१

धनासाठीं दुसऱ्याची सेवा करण्याचें हीनत्व मी कधींही पत्करणार नाहीं असा त्यांचा उग्र निश्चय होताच. त्यांनीं असें ठरविलें

कीं, आपला मित्र जो द्रुपद त्याच्याकडे जाऊन आणि त्याच्या पूर्वींच्या वचनांची नि मित्रत्वाची त्याला आठवण देऊन कांहीं साहाय्य मिळालें तर बघावें. त्याप्रमाणें ते द्रुपदाकडे गेले. पण त्या उन्मत्त राजानें त्यांचा उपहास करून त्यांनाच उलट असें सांगितलें कीं,

आसीत्सख्यं द्विजश्रेष्ठ त्वया मेऽर्थनिबन्धनम् ।
न ह्यनाढ्यः सखाढ्यस्य नाविद्वान्विदुषः सखा ॥६९
न शूरस्य सखा क्लीबः सखिपूर्वं किमिष्यते ।
न हि राज्ञामुदीर्णानामेवं भूतैर्नरैः क्वचित् ॥७०
नाराजा पार्थिवस्यापि सखिपूर्वं किमिष्यते ।
अहं त्वया न जानामि राज्यार्थे संविदं कृताम् ॥७२
एकरात्रं तु ते ब्रह्मन्कामं दास्यामि भोजनम् ।
एवमुक्तस्त्वहं तेन सदारः प्रस्थितस्तदा ॥७३

—महाभारत आदिपर्व अ. १३१

अर्थ— हे ब्राह्मणा, माझ्या स्वार्थासाठीं मी तुझ्याशीं सख्य केलें होतें. दरिद्री श्रीमंताचा, मूर्ख विद्वानाचा, नि षंढ शूराचा सखा कधींही असूं शकत नाहीं. श्रीमंत राजे अशा प्रकारच्या लोकांशीं कधींही सख्य करीत नसतात. जो राजा नाहीं तो राजाचा मित्र कसा होणार ? मी तुला राज्यासाठीं कांहीं वचन दिलें होतें हें मला मुळींच आठवत नाहीं. फारतर आलाच आहेस म्हणून एका रात्रीं-पुरतें तुझ्या इच्छेनुसार पोटभर जेवण मी तुला देईन.

त्या उन्मत्त राजाची ही वागणूक पहातांच द्रोणांना अतिशय राग आला. पुढें ते कौरवांच्या राजसत्तेकडे गेले आणि भीष्मांनीं त्यांची योग्यता पाहून कौरव राजकुमारांचे गुरु म्हणून त्यांची नियुक्ति करून त्यांना सन्मानपूर्वक आश्रय दिला. स्वतंत्र द्रोण आतां राजसत्तेचे आश्रित झाले. आश्रमस्थ मुनीप्रमाणें ते गुरुसंस्था चालवीत नव्हते तर ते शिष्यांनीं दिलेल्या वेतनावर अगतिकतेनें उपजीवन चालविणारे शिक्षक झाले होते. महाभारतांत असें म्हटलें आहे कीं,

**राज्यप्रेष्यो यश्च भवेत् विकर्मा । राजन्नेताम् वर्जयेत् देवकृत्ये ।** ८, ५
—शांतिपर्व अ. ६३

आचार्य द्रोण राज्यप्रेष्य झाले आणि त्यामुळेंच विकृत व निःस्पृह ब्राह्मण्याला अधःपतित करणारीं कृत्येंही त्यांच्या हातून घडलीं. वसिष्ठांची तेजस्विता आचार्यांना संभाळतां आली नाहीं. वसिष्ठ हे अयोध्येच्या राजसत्तेचे गुरु होते तर आचार्य द्रोण कौरवांच्या राजसत्तेचे आश्रित होते. या दोघांची कधींही तुलना करतां यावयाची नाहीं. वसिष्ठ गुरु असल्यामुळें लक्ष्मणाच्या बाबतींत राजसत्तेच्या तोंडावर ते आपला कटुकठोर निर्णय ऐकवूं शकले तर याच्या उलट आचार्यांना आपलें स्वत्व गमावून बसावें लागलें होतें.

## द्रोणांचा अधःपात

राजसत्तेचे आश्रित बनल्यावर तिचे अन्याय्य निर्णय देखील द्रोणांना अगतिकतेनें मान्य करावे लागले. इतकेंच नव्हे तर राजसत्तेचे त्यांच्याहून कमी योग्यतेचे उन्मत्त आश्रितही तोंडावर त्यांचा अवमान करावयास मागेंपुढें पहात नसत. परंतु आपल्या तेजानें सत्ता जाळून टाकण्याऐवजीं स्वास्थ्य नि सुखासीन जीवन न सोडतां आल्यामुळें त्यांना शेवटीं तो अवमान गिळून सहन करणेंच भाग पडलें. त्यांच्या अवमानाचे कित्येक प्रसंग महाभारतांत आहेत त्यांतील एकच येथें देतों.

द्रुपदनगरींत पांडव प्रकट झाल्यानंतर त्यांना परत हस्तिनापुरांत बोलवावें कीं, पांचालांवर चढाई करून त्यांचा नाश करावा असा विचार कौरवांच्या राजसभेंत चालू होता. त्यावेळीं द्रोणांनीं पांडवांना सन्मानपूर्वक परत बोलावणेंच हिताचें आहे असें सांगितलें असतां सूतपुत्र कर्णानें त्यांच्या तोंडावर दुर्योधनाला उद्देशून पुढीलप्रमाणें उद्‌गार काढले:—

**योजितावर्थमानाभ्यां सर्वकार्येष्वनन्तरो ।**
**न मन्त्रयेतां त्वच्छ्रेयः किमद्‌भुततरं ततः ।।** १३
**दुष्टेन मनसा यो वै प्रच्छन्नेनान्तरात्मना ।**
**ब्रूयान्निःश्रेयसं नाम कथं कुर्यात्सतां मतम् ।।** १४

एवं विद्वन्नुपादत्स्व मन्त्रिणां साध्वसाधुताम् ।
दुष्टानां चैव बोद्धव्यमदुष्टानां च भाषितम् ॥ २५

— महाभारत आदिपर्व अ. २०४

अर्थ—नेहमींच धन व सन्मान देऊन आणि प्रत्येक प्रसंगांत प्रथम-श्रेणीचें स्थान देऊनही हे भीष्म व द्रोण तुझें हित व्हावें अशी इच्छा करीत नाहींत. यापेक्षां आश्चर्यकारक दुसरें कांहीं असू शकेल काय? स्वतःच्या मित्रांचा द्रोह करणारा आणि तोंडावर गोड बोलून शत्रू-चेंच हित पाहणारा कधींही मित्र असू शकत नाहीं. मंत्र्यांच्या मध्यें दुष्ट कोण आणि सज्जन कोण हें नेहमींच ओळखून असलें पाहिजे.

भार्गवराम अथवा वसिष्ठ यांच्यावर हे शब्द ऐकण्याचा प्रसंग आला असता तर त्याचें उत्तर फार वेगळ्या रीतीनें देण्यांत आलें असतें. पण द्रोण हे उपजीवनाच्या प्रश्नावर अगतिक होऊन बसले होते म्हणूनच पांचालीनें वस्त्रहरणप्रसंगांत "द्रोणस्य च नास्ति सत्त्वम्।" असा आपला अभिप्राय प्रकट केला आहे. महासती द्रौपदीला भर सभेंत फरफटत ओढीत आणल्यानंतर द्रोण आपल्या महास्त्रांच्या प्रभावानें कुलीन स्त्रियांची विटंबना करावयास सरसावलेल्या राज-सत्तेला दग्ध करूं शकले असते. ब्राह्मण हा कोणाचाही दास असू शकत नाहीं हें तत्त्व द्रोणांनीं आचरणांत आणलें नाहीं. इतकेंच नाहीं तर त्यांचा त्याहूनही अधिक अधःपात झाला.

ब्राह्मणांनीं शस्त्र हातांत केव्हां घ्यावें याचा निर्णय करीत अस-तांना धर्मशास्त्रानें असें सांगितलें आहे कीं, "शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते ।" ज्या ठिकाणीं धर्माचा उपरोध होईल तेथेंच ब्राह्मणांनीं शस्त्र हातांत घ्यावें. द्रौपदीच्या विटंबनांत कौरवांनीं धर्माचा विध्वंस केला होता. द्यूतांत पांडवाचें राज्य हरण करून घेण्यांत त्यांनीं धर्ममर्यादेचा भंग केला होता. इतकेंच नव्हे तर पांड-वांच्यावर विषप्रयोग करून त्यांना जिवंत जाळून टाकण्याची कार-स्थानें उभारून ते पंच महापातकांचे धनी बनले होते. द्रोणांचें हें कर्तव्य होतें कीं त्यांनीं त्यांचें निखंदन करावें. आपल्या तेजस्वी गुरूचें, आपल्याला अस्त्रविद्या देऊन सदाचें कृतार्थ करणाऱ्या सर्व-

श्रेष्ठ भार्गवरामाचें अनुकरण करून द्रोणांनाही मदांध सत्तेच्या ठिकऱ्या उडवीत अधार्मिक सत्तेच्या अन्तकाची परंपरा पुढें चालवितां आली असती; पण तें त्यांनीं केलें नाहीं. उलट द्रौपदीच्या वस्त्रहरणांत प्रत्यक्ष भाग घेणारा दुःशासन, तिच्या वस्त्रहरणाची आज्ञा देणारा कर्ण, व तिला डावी मांडी उघडी करून दाखविणारा नराधम दुर्योधन या पतितांच्या संरक्षणाचा भार मात्र त्यांनीं स्वतःच्या मस्तकावर घेतला. कौरवांच्या विनाशाची प्रतिज्ञा करून पांडव वनवासांत गेल्यानंतर त्यांच्या सामर्थ्यामुळें भयकंपित झालेल्या दुर्योधन, कर्ण, दुःशासन नि शकुनि यांनीं द्रोणांचा आश्रय केला नि द्रोणांनीं त्यांना आश्रय दिला असें महाभारतांत वर्णन आहे.

**ततो दुर्योधनः कर्णः शकुनिश्चापि सौबलः ।**
**द्रोणं द्वीपममन्यन्त राज्यं चास्मै न्यवेदयत् ।। ३६**
**अथाब्रवीत्ततो द्रोणो दुर्योधनममर्षणम् ।**
**दुःशासनं च कर्णं च सर्वानेव च भारतान् ।। ३७**
**अहं वै शरणं प्राप्तान्वर्तमानो यथा बलम् ।। ३८**
**गन्ता सर्वात्मना भक्त्या धार्तराष्ट्रान्सराजकान् ।**
**नोत्सहेयं परित्यक्तुं दैवं हि बलवत्तरम् ।। ३९**

— महाभारत सभापर्व अ. ८०

अर्थ—नंतर दुर्योधन, कर्ण, आणि सौबल शकुनि हे द्रोणांना त्या आपत्तींत आश्रयस्थान समजून त्यांच्याकडे आले नि त्यांनीं त्यांना संरक्षणासाठीं प्रार्थना केली. तेव्हां दुर्योधन, दुःशासन, कर्ण व कौरवांच्या राजसभेंतील सर्वच लोकांना उद्देशून द्रोणाचार्य असें म्हणाले कीं मला शरण आलेल्या या धृतराष्ट्रपुत्रांचे नि त्यांच्या सहायकांचें माझ्या शक्त्यनुसार प्रयत्न करून मी संरक्षण करीन. प्रेमपूर्वक मी त्यांना साहाय्य करीन. दैव बलवत्तर आहे. मी त्यांना सोडूं शकत नाहीं.

ब्राह्मण्याचें हें केवढें दारुण विडंबन! भीष्मपर्वाच्या प्रारंभीं "अर्थस्य पुरुषो दासः!" हे उद्गार द्रोणासारख्या ब्राह्मणाच्या तोंडून निघावे हा केवढा अधःपात! शेवटीं कौरवांच्या अधार्मिक पक्षाच्या

संरक्षणासाठींच द्रोणांनीं आपलें खड्ग निष्कोशित केलें, इतकेंच नव्हे तर अस्त्रज्ञांनीं अनस्त्रज्ञांना मारूं नये हा साधा नियमही दृष्टीआड करून अधर्मानें त्यांनीं विकराल मनुष्यसंहार केला. द्रोणपर्वांत भीम द्रोणांना म्हणतो,

> **श्वपाकवन्म्लेच्छगणान् हत्वा चान्यान्पृथग्विधान् ।**
> **अज्ञानान्मूढवद् ब्रह्मन् पुत्रदारधनेप्सया ।। ३९**
>
> —द्रोणपर्व अ. १९२

पुत्र, दारा व धनाच्या नादीं लागून एखाद्या अज्ञानी मूढाप्रमाणें तुम्हीं हा भीषण मनुष्यसंहार करीत आहांत. भीमाचें हें म्हणणें अक्षरशः खरें आहे. कारण ऋषींच द्रोणांना म्हणतात कीं,

> **ब्रह्मास्त्रेण त्वया दग्धा अनस्त्रज्ञा नरा भुवि ।**
> **यदेतदीदृशं विप्र कृतं कर्म न साधु तत् ।। ३९**
>
> —द्रोणपर्व अ. १९०

हे ब्राह्मणा ! अनस्त्रज्ञ लोकांना तूं ब्रह्मास्त्रानें भस्म केलें आहेस. तें तुझें कर्म अत्यंत अनुचित आहे. अधःपात तो आणखी कशाला म्हणत असतात? जें अनुचित कर्म करूं नये म्हणून द्रोणांनीं कर्णाला ब्रह्मास्त्र दिलें नाहीं नि अश्वत्थाम्यालाही तें अर्धवटच शिकविलें तेंच अनुचित कर्म त्यांच्या हातून स्वतःच घडलें आहे. मनाची स्थिति धर्मपक्षाकडे व शरीरमात्र अधर्माकडे असें द्रोणांच्या आंदोलित मनोवृत्तीचें भगवान् वेदव्यासांनीं जें हृदयंगम चित्र चित्रित केलें आहे त्याला काव्यसृष्टींत तुलना आढळणार नाहीं. द्रोणपुत्र अश्वत्थाम्याच्या रूपानें तर ब्राह्मण्याच्या अधःपतनाचें हें चित्र परिपूर्ण होतें.

## अश्वत्थामा

अश्वत्थाम्यामध्य बुद्धीची क्षुद्रता व दुष्टता किती होती हें त्यानें युद्धानंतर रात्रीं झोपलेल्या पांडवांच्या शिबिरांतील सैनिकांचा जो क्रूर वध केला त्यावरून स्पष्ट होतें. त्याच्या त्या अपकृत्यानें महाभारतांतील सौप्तिक पर्वाचे कित्येक अध्याय भरलेले असून कपटानें वध करणाऱ्या गर्ह्य कृत्याला अश्वत्थामी संप्रदाय असें नांवच पड-

लेलें आहे. अश्वत्थाम्याची ही दुष्टता ओळखून त्याला प्रथम ब्रह्मास्त्र शिकविण्याचेंच द्रोणांनीं नाकारलें होतें. पुढें त्याच्या आग्रहास्तव द्रोणांनीं पुत्रस्नेहानें प्रेरित होऊन त्याला तें शिकविलें तरी त्याची दुष्टता त्यांना पूर्णपणें माहीत होती, म्हणून त्यांनीं ब्रह्मास्त्राचा प्रयोग कुठेंही करूं नये अशी अटही घातली होती.

विदितं चापलं ह्यासीदात्मजस्य दुरात्मनः ।
सर्वधर्मविदाचार्यः सोऽन्वशात्स्वसुतं ततः ॥ ७
परमापद्गतेनापि न स्म तात त्वया रणे ।
इदमस्त्रं प्रयोक्तव्यं मानुषेषु विशेषतः ॥ ८

—महाभारत सौप्तिकपर्व अ. १२

स्वतःच्या दुराचारी मुलाचें चापल धर्मवेत्त्या द्रोणांना माहीत असल्यामुळें त्यांनीं त्याला असें सांगितलें कीं, अत्यंत आपत्तींत देखील विशेषतः मनुष्यावर या अस्त्राचा तूं प्रयोग करूं नकोस; पण, त्यानें उत्तरेच्या गर्भावर देखील त्या अस्त्राचा प्रयोग करावयास कमी केलें नाहीं! त्याच्या मनाची क्षुद्रता तर इतकी होती कीं, भगवान् श्रीकृष्णांनाच तो सुदर्शन चक्र मागून त्यांचाच पराभव करूं इच्छीत होता असें महाभारताच्या सौप्तिक पर्वाच्या १२ व्या अध्यायांत वर्णन आहे. तात्पर्य भ्रूणहत्येपासून नि बालहत्येपासूनचीं कोणतींही गर्ह्य पापें करण्याचीं त्यानें शिल्लक ठेविलीं नव्हतीं. सामाजिक नीतिमत्तेचा जो आधार, संस्कृतिसंरक्षण हें ज्याचें कार्य, व ज्याला भारतीय संस्कृतीमध्यें राष्ट्राच्या स्थैर्यासाठीं सामाजिक नेतृत्वाचा सन्मान दिला, त्या वर्गाची महाभारताच्या काळीं ही अवस्था होऊं लागली होती. जीवनांतून धनाचें मूल्य काढून टाकणें व त्या जागीं वैराग्य नि ज्ञानाच्या मूल्यांची प्रतिष्ठापना करणें हें महत्कार्य तिनें ज्यांच्या भरंवशावर करावें त्यांचाच हा अधःपात होता. अधर्माचें अभ्युत्थान तें आणखी दुसरें कोणतें असतें? ब्राह्मण-वर्गाची ही दुरवस्था पाहिल्यावर क्षत्रियांकडे वळणें त्याहूनही अधिक बोधक ठरणार आहे. महाभारतकालीन भारतीय राज्यसंस्थेचें स्वरूप कसें झालें होतें हें आपण पुढच्या व्याख्यानांत पाहूं.

# ६. भारतीय राज्यसंस्थेचें स्वरूप

महाभारतामधील राज्यसंस्था, किंबहुना भारतीय संस्कृतीनेंच दिग्दर्शित केलेली राज्यसंस्था स्वयंभू नसून कांहीं विशिष्ट हेतूस्तव उत्पन्न झालेली आहे. दंडनीति अथवा राज्यानुशासन समाजाच्या धारणेसाठीं, पोषणासाठीं नि विकसनासाठीं अत्यंत आवश्यक असल्याचा साक्षात्कार भारतीय समाजशास्त्रज्ञांना फार प्राचीन काळीं झालेला आहे. महाभारतांत ठिकठिकाणी अध्यायचे अध्याय राज्यधर्माच्या महत्त्वाच्या वर्णनाप्रीत्यर्थ खर्ची पडलेले आहेत. उदाहरणार्थ, महाभारताच्या शांतिपर्वाच्या ६३ व्या अध्यायांतील पुढील वर्णन पहा.

**यथा राजन्हस्तिपदे पदानि संलीयन्ते सर्वसत्त्वोद्भवानि ।**
**एवं धर्मान् राजधर्मेषु सर्वान् सर्वावस्थं संप्रलीनान्निबोध ।। २५**
**अल्पाश्रयानल्पफलान्वदन्ति धर्मानन्यान्धर्मविदो मनुष्याः ।**
**महाश्रयं बहुकल्याणरूपं क्षात्रं धर्मं नेतरं प्राहुरार्याः ।। २६**
**सर्वे धर्मा राजधर्मप्रधानाः सर्वे वर्णाः पाल्यमाना भवन्ति ।**
**सर्वस्त्यागो राजधर्मेषु राजंस्त्यागं धर्मं चाहुरग्र्यं पुराणम् ।। २७**
**मज्जेत्त्रयी दण्डनीतौ हतायां सर्वे धर्माः प्रक्षयेयुर्विबुद्धाः ।**
**सर्वे धर्माश्चाश्रमाणां हताः स्युः क्षात्रे त्यक्ते राजधर्मे पुराणे ।। २८**
**सर्वे त्यागा राजधर्मेषु दृष्टाः सर्वा दीक्षा राजधर्मेषु चोक्ताः ।**
**सर्वा विद्या राजधर्मेषु युक्ताः सर्वे लोका राजधर्मे प्रविष्टाः ।। २९**

**—महाभारत, शांतिपर्व अध्याय ६३**

" ज्याप्रमाणें हत्तीच्या पायांत सारे पाय समाविष्ट होतात, त्याच प्रमाणें राजधर्मांत सर्व धर्म समाविष्ट होतात. बाकी सर्व धर्मांचे आधारही लहान व परिणामही मर्यादित. अनेकविध प्रकारांनीं लोकांचें पुष्कळ कल्याण करूं शकणारा व सर्वांना मोठा आधार असणारा असा केवळ क्षात्रधर्मच होय, दुसरा नाही, असें आर्यांचें

म्हणणें आहे. सर्व धर्म राजधर्मामुळेंच रक्षिले जातात. सर्व वर्णांचें संरक्षण राजधर्मामुळेंच होतें. राजधर्मांत सर्व गोष्टींचा त्याग अभिप्रेत आहे आणि त्याग हा सर्वश्रेष्ठ धर्म आहे असेंच प्राचीनांचें म्हणणें आहे. राजधर्म जर नष्ट झाला तर त्रयी नष्ट होते. वाढलेले आणि बद्धमूल झालेले धर्म देखील नष्ट होतात. क्षत्रप्रधान राजधर्माचा परित्याग केला तर सर्व आश्रमधर्म नष्ट होतात. राजधर्मांत सर्व प्रकारचा त्याग आहे. राजधर्मांत सर्व प्रकारच्या दीक्षा आहेत. राजधर्मांत सर्व प्रकारच्या विद्यांचा समावेश होतो. राजधर्मांतच सर्व प्रकारचे लोक समाविष्ट आहेत."

## दण्डाचें महत्त्व

दण्डाचें महत्त्व भारतीयांनीं फार पूर्वीपासून ओळखलें होतें. जगांतील दुष्प्रवृत्तींवर दंडासारखा दुसरा तोडगा नसून भौतिक सामर्थ्याची पार्श्वभूमि लाभल्यावांचून धर्म, संस्कृति, आणि नीतिमूल्यें यांचें संरक्षण होणें शक्य नाहीं, हा जगाचा त्रिकालाबाधित न्याय महाभारतांत वारंवार उल्लेखिण्यांत आला आहे.

महाभारत म्हणतें—

**कर्मणा वै पुरा देवा ऋषयश्चामितौजसः ।**
**त्राताः सर्वे प्रसह्यारीन्क्षत्रधर्मेण विष्णुना ॥ २३**
**यदि ह्यसौ भगवन्नाहनिष्यद्रिपून्सर्वानसुरानप्रमेयः ।**
**न ब्राह्मणा न च लोकादिकर्ता नायं धर्मो नादिधर्मोऽभविष्यत् ॥२४**

**— महाभारत, शांतिपर्व अ. ६४**

"क्षात्रधर्माच्या शत्रूंना मारण्याच्या कर्माचा अंगीकार करून महाविष्णूंनीं शत्रूंना ठार मारून पूर्वी देव नि तेजस्वी ऋषि यांचें संरक्षण केलें. जर अप्रमेय पराक्रमी भगवन्तानें असुरांना ठार मारलें नसतें तर ब्राह्मण, प्रजापति, धर्म नि आदिधर्म राहूंच शकले नसते. वैषम्यावर उभारलेल्या, स्वार्थी प्रवृत्तींनीं भरलेल्या, बळी तो कानपिळी हा न्याय असलेल्या आणि सर्व प्रकारच्या हीन प्रवृत्तींनीं युक्त असलेल्या अशा प्रकारच्या जगांत राजदंडावांचून, न्याय तर काय, पण जीवन देखील अशक्य आहे हें महाभारतांत स्पष्ट करण्यांत आलें

आहे. ॲरिस्टॉटल आणि प्लेटो यांच्या शतावधि वर्षांपूर्वी हें महान् सत्य भारतीयांनीं कंठरवानें प्रतिपादिलें आहे.

## अराजकाचा निषेध

**राष्ट्रस्यैतत्कृत्यतमं राज्ञ एवाभिषेचनम् ।**
**अनिन्द्रमबलं राष्ट्रं दस्यवोऽभिभवन्त्युत ॥ २ ॥**
**अराजकेषु राष्ट्रेषु धर्मो न व्यवतिष्ठते ।**
**परस्परं च खादन्ति सर्वथा धिगराजकम् ॥ ३**
**नाराजकेषु राष्ट्रेषु वस्तव्यमिति रोचते ।**
**नाराजकेषु राष्ट्रेषु हव्यमग्निर्वहत्युत ॥ ५**
**न हि पापात्परतरमस्ति किञ्चिदराजकात् ॥ ७**
**स चेत्समनुपश्येत समग्रं कुशलं भवेत् ॥ ८**
**अदासः क्रियते दासो ह्रियन्ते च बलात् स्त्रियः ।**
**एतस्मात्कारणाद्देवाः प्रजापालान्प्रचक्रिरे ॥ १५**
**राजा चेन्न भवेल्लोके पृथिव्यां दण्डधारकः ।**
**जले मत्स्यानिवाभक्ष्यन्दुर्बलं बलवत्तराः ॥ १६**
**अराजकाः प्रजाः पूर्वं विनेशुरिति नः श्रुतम् ।**
**परस्परं भक्षयन्तो मत्स्या इव जले कृशान् ॥ १७**

**—महाभारत, शांतिपर्व अ. ६७**

"राष्ट्रानें राज्यतंत्र उत्पन्न केलेंच पाहिजे. अधिपति नसलेल्या निर्बल राष्ट्राला अनार्य आक्रमक नेहमींच त्रास देतात. अराजक राष्ट्रांत धर्म राहूं शकत नाहीं. सगळे लोक एकमेकांना खाऊन टाकतात. अराजकाचा सर्वथा धिक्कार असो. अराजक राष्ट्रांत कधींही राहूं नये. अराजक राष्ट्रांत अग्नि देवांना हविर्भाग पोचवीत नाहीं. अराजकापेक्षां अधिक पापकारक जगांत दुसरें कांहींही असूं शकत नाहीं. तेथें अदासांना दास करण्यांत येतें. बलात्कारानें स्त्रियांचें अपहरण होतें. म्हणूनच देवांनीं प्रजापालक राज्यतंत्र उत्पन्न केलें. जर दण्डधारक राजा पृथ्वीवर नसेल तर पाण्यामध्यें सबल मासे दुर्बलांना खाऊन टाकतात त्याप्रमाणें बलवान् लोक दुर्बलांना नष्ट केल्याविना राहणार नाहींत. अराजक प्रजांचा मात्स्यन्यायानें पूर्वीं नाश झाला असें आम्ही ऐकलें आहे."

याप्रमाणें राजदण्डाचें व क्षात्रधर्माचें महत्त्व मानणाऱ्या या संस्कृतींत ॲरिस्टॉटलप्रमाणें राज्यतंत्राला स्वयंभू मात्र मानण्यांत आलेलें नाहीं. राजदण्ड नि राज्यतंत्र उत्पन्न कसें झालें याचें महाभारतांत अत्यंत सुंदर वर्णन आहे. भारतीय समाजशास्त्रज्ञ ज्ञानस्वरूप चेतनाला जगाचें कारण नि मूलतत्त्व समजत असल्यामुळें "पूर्णापासुनि ढळलेलें जग जाते पूर्णाकडे" असा त्यांचा सिद्धांत आहे. तदनुसार रागद्वेषविहीन स्थितप्रज्ञांची समाजविकसनाची एक अतिश्रेष्ठ अवस्था ते मानतात. विश्वात्मभावनेनें अंतःकरण भरून राहिलेल्या आणि "पडलें वळण इंद्रियां सकळां" इतक्या सहजतेनें आपआपलीं कर्तव्यें सतत करीत राहणाऱ्या अत्युच्च सामाजिक अवस्थेची त्यांनीं कल्पना केलेली असून तिचें वर्णन ते 'कृतयुग' या नांवानें करतात. या अवस्थेंत समाजांतील यच्चयावत् व्यक्ति पूर्ण सत्त्वगुणसंपन्न असल्यामुळें त्यांना हंसवर्णाचे म्हणून संबोधिलें आहे. हंस हा भारतीय काव्यसृष्टींतली अत्यंत शुचितम कल्पना आहे. बिसतंतूंचा फराळ करून मोत्यांच्या चाऱ्यावर जगणारा निरुपद्रवी पण सामर्थ्यसंपन्न आणि ज्याचें सर्वच कांहीं अत्यंत विलोभनीय, असा राजहंस हा अत्यंत विलोभनीय म्हणून काव्यसृष्टीचा सदाचा अलंकार होऊन राहिलेला आहे. म्हणूनच सामाजिक विकसनाच्या परिपूर्ण अवस्थेला त्याची उपमा देण्यांत आली. मानवी अंतःकरणांतील पशुत्व पूर्णपणें नष्ट होऊन ज्यावेळीं तेथें संपूर्ण देवजीवन उत्पन्न होतें, त्यावेळीं त्या अवस्थेला 'कृतयुग' म्हणून संबोधितात. या अवस्थेंत राजा, राजदण्ड, राज्यतंत्र इत्यादि सर्व गोष्टी समाजविकसनाच्या अत्युच्च अवस्थेंत विलीन होऊन जात असतात. Higher phase of the Communism मध्यें याच अवस्थेचें वर्णन करण्यांत आलें असून जगांतील सर्व समाजशास्त्रज्ञांना ध्येय म्हणून याच अवस्थेची अथवा सुवर्णयुगाची तहान लागल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. Withering away of the State या मार्क्सो-लेनिनिझमच्या सूत्रानें याच अवस्थेचें दिग्दर्शन केलें आहे. मात्र ही अवस्था प्रत्यक्षांत कशी निर्माण करावी हें भोगवासनांच्या नादीं लागलेल्या

मार्क्सला नि त्यांच्या सांप्रदायिकांना कधींच उलगडलें नाहीं. केवळ आर्थिक वांटपानें ही अवस्था उत्पन्न होईल असा एकदेशीय दृष्टिकोन पत्करून विध्वंसनाचें आपलें आसुरी शास्त्र त्यांनीं निर्माण केलें. भारतीयांनीं समाजांत ही अवस्था पुन:पुन्हां उत्पन्न व्हावी आणि सामाजिक विकसनाचें सुवर्णयुग निर्माण व्हावें म्हणूनच राज्यतंत्र निर्माण केलें आहे. अराजक वेगळें व ही राज्यतंत्रविहीन अवस्था वेगळी. या सुवर्ण युगाच्या अवस्थेंत राज्यतंत्रानें जें साधावयाचें तें सिद्ध झालेलें असल्यामुळें राज्यतंत्र समाजांत विलीन होऊन जातें, तर अराजकांत राज्यतंत्राची आवश्यकता असूनही तें नसतें. भारतीयांच्या मतें ही अवस्था पूर्वीं केव्हां तरी होती, इतकेंच नव्हे तर ती वारंवार उत्पन्न होणें, पुन्हांपुन्हां नष्ट होणें, हा चक्रनेमिक्रमानें चालणाऱ्या जगाचा आणि त्याच्या गतिस्वरूपाचा स्वभावविशेष आहे असें मानलें आहे.

मार्क्सिस्टांनीं त्यांच्या प्रगतीच्या अशास्त्रीय सिद्धान्तानुरूप ही अवस्था पूर्वीं कधींही नसून आमच्या प्रयत्नांनीं ती पुढें आम्ही उत्पन्न करूं असें प्रतिपादन केलें आहे. उर्वरित सर्व समाजशास्त्रज्ञांनीं ही अवस्था पूर्वीं कधींही नव्हती नि पुढें कधींही उत्पन्न व्हावयाची नाहीं असें म्हटलें असून तिला केवळ कविप्रतिभेचा विलास ठरविलें आहे, असो.

राज्यतंत्र म्हटलें कीं तें एकतंत्रात्मक असो कीं लोकतंत्रात्मक असो, त्यांत एका अथवा कांहीं थोड्या व्यक्तींनीं अनेकांवर अधिकार गाजवावयाचा नि त्या अनेकांनीं त्या एका अथवा कांहीं व्यक्तींच्या आज्ञेंत राहावयाचें ही विषम अवस्था आलीच. अशा स्थितींत असें कां असावें? या प्रश्नाला महाभारतांत जें उत्तर देण्यांत आलेलें आहे त्यांतूनच कृतयुगाच्या सुवर्णावस्थेंतून राज्यतंत्र कसें उत्पन्न होतें याचें मनोरम वर्णन आहे. अभारतीय राज्यशास्त्रज्ञांप्रमाणें त्यांत अस्वाभाविक गूढवादाचा मुळींच अवलंब केलेला नाहीं हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

## राज्यसंस्था कशी उत्पन्न झाली ?

युधिष्ठिर राज्यसंस्था कशी उत्पन्न झाली असा प्रश्न भीष्मांना विचारतांना म्हणतात :--

य एष राजन् राजेति शब्दश्चरति भारत ।
कथमेष समुत्पन्नस्तन्मे ब्रूहि परंतप ।। ५
तुल्यपाणिभुजग्रीवस्तुल्यबुद्धीन्द्रियात्मकः ।
तुल्यदुःखसुखात्मा च तुल्यपृष्ठमुखोदरः ।। ६
तुल्यशुक्रास्थिमज्जश्च तुल्यमांसासृगेव च ।
निःश्वासोच्छ्वासतुल्यश्च तुल्यप्राणशरीरवान् ।। ७
समानजन्ममरणः समः सर्वैर्गुणैर्नृणाम् ।
विशिष्टबुद्धीन् शूरांश्च कथमेकोऽधितिष्ठति ।। ८
कथमेको महीं कृत्स्नां शूरवीरार्यसंकुलाम् ।
रक्षत्यपि च लोकस्य प्रसादमभिवाञ्छति ।। ९
एकस्य तु प्रसादेन कृत्स्नो लोकः प्रसीदति ।
व्याकुले चाकुलः सर्वो भवतीति विनिश्चयः ।। १०
एतदिच्छाम्यहं श्रोतुं तत्त्वेन भरतर्षभ ।
कृत्स्नं तन्मे यथातत्त्वं प्रब्रूहि वदतां वर ।। ११
नैतत्कारणमल्पं हि भविष्यति विशांपते ।
यदेकस्मिन् जगत्सर्वं देववद्याति सन्नतिम् । १२

---महाभारत, शांतिपर्व अ. ५९

" राजा, राजा, असा जो शब्द समाजामध्यें रूढ झालेला आहे तो शब्द अथवा ती कल्पना समाजामध्यें उत्पन्न कशी झाली? ते आपण मला सांगा. सर्वसामान्य लोकांप्रमाणेंच हात, पाय, मान, बुद्धि, इंद्रियें, सुखदुःखांच्या संवेदना, पार्श्वभाग, मुख,उदर, सप्तधातु-संस्था, रक्त, मांस, श्वासनिश्वास, सामर्थ्य, शरीर, सारखेंच असतां जन्म आणि मरण आणि इतरही सर्व गुण इतर माणसांसारखेच असतां समाजांतील अत्यंत बुद्धिमान व शूर लोकांवरही आधिपत्य गाजविणारा एकच मनुष्य कसा उत्पन्न होतो ? शूर, वीर नि श्रेष्ठ

लोकांनीं भरलेल्या या पृथ्वीचें एकच मनुष्य संरक्षण कसें करतो ? एकाच्याच प्रसन्नतेंत सर्व लोकांची प्रसन्नता नि एकाच्याच विफलतेंत सर्वांची विफलता कां असावी ? मला या गोष्टीचें तात्त्विक उत्तर हवें आहे. एकालाच देवाप्रमाणें मानून त्याच्या पायाशीं सर्व जग नम्र व्हावें अशी परिस्थिति उत्पन्न होण्याचें कारण काय ?

याचें उत्तर देतांना भीष्म म्हणतात :-

नियतस्त्वं नरव्याघ्र शृणु सर्वमशेषतः ।
यथा राज्यं समुत्पन्नमादौ कृतयुगेऽभवत् ।। १३
न वै राज्यं न राजाऽसीन्न च दण्डो न दाण्डिकः ।
धर्मेणैव प्रजाः सर्वा रक्षन्ति स्म परस्परम् ।। १४
पाल्यमानास्तथान्योऽन्यं नरा धर्मेण भारत ।
खेवं परमुपाजग्मुस्ततस्तान्मोह आविशत् ।। १५
ते मोहवशमापन्ना मनुजा मनुजर्षभ ।
प्रतिपत्तिविमोहाच्च धर्मस्तेषामनीनशत् ।। १६
नष्टायां प्रतिपत्तौ च मोहवश्या नरास्तदा ।
लोभस्य वशमापन्नाः सर्वे भरतसत्तम । १७
अप्राप्तस्याभिमर्शं तु कुर्वन्तो मनुजास्ततः ।
कामो नामापरस्तत्र प्रत्यपद्यत वै प्रभो ।। १८
तांस्तु कामवशं प्राप्तान् रागो नामाभिसंस्पृशत् ।
रक्ताश्च नाभ्यजानन्त कार्याकार्ये युधिष्ठिर ।। १९
अगम्यागमनं चैव वाच्यावाच्यं तथैव च ।
भक्ष्याभक्ष्यं च राजेंद्र दोषादोषं च नात्यजन् ।। २०
विप्लुते नरलोके वै ब्रह्म चैव ननाश ह ।
नाशाच्च ब्रह्मणो राजन्धर्मो नाशमथागमत् ।। २१
नष्टे ब्रह्मणि धर्मे च देवांस्त्रासः समाविशत् ।। २२

—महाभारत शांतिपर्व अध्याय ५९

अर्थ—राज्य कसें उत्पन्न झालें तें मी तुला सांगतों. पूर्वीं कृत युगांत अशी वस्तुस्थिति होती कीं त्यावेळीं राज्य नव्हतें, राजा नव्हता, दण्ड नव्हता, दण्ड देणारा नव्हता, कारण कीं ज्याला दंड

करावयाचा असा कोणी अपराधीच नव्हता. सर्व प्रजा स्वस्वकर्तव्याची जाणीव स्वभावतःच अंतःकरणांत जागृत असलेल्या स्थितींत परस्परांचें संरक्षण करीत असत. याप्रमाणें धर्मानें लोक परस्परांचें पालन करीत असतां अशी एक सामाजिक अवस्था उत्पन्न झाली कीं ज्यावेळीं नंदादीपाप्रमाणें सतत तिळतिळ जीवन जाळण्याच्या या संयमी अवस्थेचा ताण लोकांना सहन होईना. त्यामुळेंच त्यांच्यांत मोह उत्पन्न झाला. हळुहळू मोहाच्या प्रभावानें त्यांची स्वाभाविक ज्ञानावस्था भंग पावली. आणि कर्तव्याची तेजस्वी जाणीव त्यांच्या अंतःकरणांतून नष्ट झाली. या धर्मनाशाबरोबर लोभ त्यांच्या अंतःकरणांत उत्पन्न झाला नि अस्मितेचें क्षितिज मर्यादित झालें. नंतर ज्याच्यावर आपला अधिकार नाहीं तीही गोष्ट केवळ आपल्याला मिळावी नि दुसऱ्याला मिळू नये अशी कुवासना अंतःकरणांत उत्पन्न होऊन कामविकाराच्या ते आधीन झाले. लवकरच कामाची जागा अभिलाषानें घेतली आणि त्यांचा कार्याकार्यविवेक पूर्णपणें नष्ट झाला. ते अगम्यागमन करूं लागले, त्यांचा भक्ष्याभक्ष्य विवेक नाहींसा झाला, वाणीचें पावित्र्य नष्ट होऊन काय बोलावें नि काय बोलू नये यासंबंधींचा तोल गेला, इतकेंच नव्हें तर चांगल्या वाइटासंबंधींचाही विवेक नष्ट होऊन त्यांचें सत्याचें अधिष्ठान नष्ट झालें. त्याबरोबर धर्म नष्ट झाला आणि दैवी शक्तींना मानवाची ही दुरवस्था पाहून अत्यंत उद्वेग वाटूं लागला.

अशा अवस्थेंत पुनश्च ती श्रेष्ठ अवस्था उत्पन्न करण्यासाठीं राज्यतंत्र उत्पन्न झालें आहे. तें उत्पन्न झालें आहे म्हणण्यापेक्षां तें उत्पन्न केलें आहे. कम्युनिस्ट अपप्रचारक आपल्या अशास्त्रीय इतिहासप्रक्रियेंत भारताचा इतिहास कोंबण्यासाठीं कृतयुगाच्या या वर्णनाला Primitive Communism च्या अवस्थेंत ढकलतात. डांगे यांनीं यासाठीं संस्कृत भाषेला, नव्हे तिच्यांतील प्रत्येक शब्दाला निरुक्तीचें व व्युत्पत्तीचें शास्त्र लागतें ही गोष्ट लक्षांत न घेतां ब्रह्म शब्दाचा अर्थ 'कम्यून' असा सांगून Primitive Commune चें हें वर्णन आहे असें प्रतिपादन केलें आहे. पण तें केवळ दडपून देतों

ऐसाजे अशा वर्गांत समाविष्ट होईल. ब्रह्मचा अर्थ 'कम्यून' असा होत नाहीं. आणि कृतयुगाची अवस्था जर 'प्रिमिटिव्ह'मानावयाची असेल तर 'हायर फेज' तरी दुसरी काय असू शकते? महाभारतांत कृतयुगाचें वर्णन करतांना, 'कृतलक्षणाः' असें म्हटलें आहे. या युगाचें वर्णन करतांना महाभारतकार वनपर्वांत म्हणतातः—

न तस्मिन्युगसंसर्गे व्याधयो नेन्द्रियक्षयः ।
नासूया नापि रुदितं न दर्पो नापि वैकृतम् ।। १५
न विग्रहः कुतस्तन्द्री न द्वेषो न च पैशुनम् ।
न भयं नापि संतापो न चेर्ष्या न च मत्सरः ।। १६
ततः परमकं ब्रह्म सा गतिर्योगिनां परा ।
आत्मा च सर्वभूतानां शुक्लो नारायणस्तदा ।।१७
ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्राश्च कृतलक्षणाः ।
कृते युगे समभवन्स्वकर्मनिरताः प्रजाः ।। १८

—महाभारत, वनपर्व अध्याय १४९

"त्या अवस्थेंत व्याधी नव्हत्या, इंद्रियक्षय, असूया, रोदन, अहंकार, विकृति, संघर्ष, द्वेष, दुष्टता, भय, संताप, ईर्ष्या, मत्सर, आळस इत्यादि कांहींही नव्हतें. त्यावेळीं सर्वश्रेष्ठ परब्रह्म हेंच योग्यांचें अंतिम साध्य असून सर्वभूतात्मा जो परमेश्वर त्याचा वर्ण शुक्ल होता. चातुर्वर्ण्यांतील लोक आपल्या सर्व मानसिक वैशिष्टयांनीं युक्त होते. याचा सरळ अर्थ असा आहे कीं, पशुत्वाच्या सर्व विकारांवर मानवानें पूर्णपणें विजय मिळविलेली ही अवस्था असून मानसशास्त्रज्ञांनीं मूलभूत मानलेली अस्मितेची धारणादेखील लोकांनीं जिंकून टाकलेली होती. अंतःकरणांतील वृत्तींचा निरोध, बाह्य इंद्रियप्रवृत्तींचा निरोध, अखंड तपस्या, सत्यधारणा, खोटेपणा मनांतही न येणें, शरीराचें व मनाचें पावित्र्य, सामर्थ्यसंपन्नता, एकमेकांसाठीं खपण्याचें स्वाभाविक वळण इत्यादि चातुर्वर्ण्यसमाजांतील सर्व लक्षणें परिपूर्णावस्थेंत दृष्टोत्पत्तीस येणें हेंच 'कृतलक्षणाः' याचें खरें स्वरूप आहे. स्वाभाविक प्रवृत्तींना ( Natural instincts ) जिंकून टाकल्यावांचून ही गोष्ट उत्पन्न होणें शक्य नाहीं असें मानस-

शास्त्रज्ञही मानतात. त्यामुळें हें Primitive अवस्थेचें वर्णन असूं शकत नाहीं हें स्पष्ट आहे. आजच्या कम्युनिस्टांच्या पितृभूमींत स्वतःच्या लहरींच्या विरुद्ध असणाऱ्या शास्त्रज्ञांना, संशोधकांना, इतकेंच नव्हें तर एकेकाळाच्या सहकाऱ्यांनादेखील ठार मारण्याचा जो खाटिकखाना चालू आहे. त्यावरून आतां उत्पन्न व्हावयाची ती अवस्था मात्र खऱ्या Primitive अवस्थेंत मानवाला नेऊन सोडण्याचा संभव आहे. असो.

## भारतीय राज्यतंत्र

अशा उदात्त उद्देशानें निर्माण झालेल्या भारतीय राज्यतंत्राचा " राजा प्रकृतिरंजनात् " या शब्दांनीं सर्वत्र हेतु व्यक्त करण्यांत आलेला आहे. प्रजारक्षण हाच राजाचा सर्वश्रेष्ठ अशा प्रकारचा धर्म होय. "एष एव परो धर्मो यद्राजा रक्षति प्रजाः ।" असें महाभारतांत स्पष्ट शब्दांत सांगण्यांत आलें आहे. राज्यतंत्र संभाळणें हें जरी क्षत्रिय वर्णाचें मुख्यतः काम असलें तरी जर क्षत्रिय तें काम करावयास अयोग्य असेल तर जो कोणी तें काम करील त्यालाच महाभारतांत श्रेष्ठ म्हटलेलें आहे.

**अपारे यो भवेत्पारमप्लवे यः प्लवो भवेत् ।**
**शूद्रो वा यदि वाऽप्यन्यः सर्वथा मानमर्हति ॥ ३८**
**यमाश्रित्य नरा राजन्वर्तयेयुर्यथासुखम् ।**
**अनाथाः परिकाल्यंतो दस्युभिः परिपीडिताः ॥ ३९**
**तमेव पूजयेयुस्ते प्रीत्या स्वमिव बान्धवम् ।**
**अभीरभीक्ष्णं कौरव्य कर्ता सन्मानमर्हति ॥ ४०**
**किं तेनाऽनडुहा नोह्यः किं धेन्वा वाऽप्यदुग्धया ।**
**वन्ध्यया भार्यया कोऽर्थः कोर्थो राज्ञाऽप्यरक्षता ॥ ४१**
**यथा दारुमयो हस्ती यथा चर्ममयो मृगः ।**
**यथा ह्यनर्थः षण्ढो वा पार्थ क्षेत्रं यथोषरम् ॥ ४२**
**एवं विप्रोऽनधीयानो राजा यश्च न रक्षिता ।**
**मेघो न वर्षते यश्च सर्वथा ते निरर्थकाः ॥ ४३**

नित्यं यस्तु सतो रक्षेदसतश्च निवर्तयेत् ।
स एव राजा कर्तव्यस्तेन सर्वमिदं धृतम् ॥ ४४
—महाभारत, शांतिपर्व अध्याय ७८

"जो कोणी अपार अशा संकटांत लोकांचें संरक्षण करील, तो शूद्र असो कीं कोणी असो, त्याच्याचकडे मान जाईल. दस्यूंनीं पीडिलेले अनाथ लोक ज्याच्या आश्रयानें सुखानें नांदतील त्यालाच ते श्रेष्ठ समजतील. आपल्या बांधवांप्रमाणें ते त्यालाच मानतील. हे कौरव्या, नेहमीं जो काम करतो त्यालाच सन्मान मिळत असतो. भार वाहूं न शकणारा बैल, दूध न देणारी गाय, वांझ स्त्री, नि रक्षण न करूं शकणारा राजा यांचा काय उपयोग आहे? लाकडाचा हत्ती, चामड्याचा हरीण, षंढ मनुष्य, नापीक जमीन, अध्ययन न करणारा ब्राह्मण, रक्षण न करणारा राजा, नि वर्षाव न करणारा मेघ हे सर्वस्वी निरर्थक होत. जो सज्जनांचें रक्षण करतो आणि दुष्टांचें निवारण करतो त्यालाच राजा करावें. तोच या सर्वांचा आधार होऊं शकतो." हिंदुराज्यपद्धतीप्रमाणें प्रत्येक राजाला सिंहासनावर बसतांना प्रतिज्ञा घ्यावी लागे. वेदवाङ्मयापासूनच्या सर्व वाङ्मयांत या प्रतिज्ञेचे उल्लेख आहेत. महाभारतांत पृथूच्या राज्यारोहणाचे वेळीं त्यानें जी प्रतिज्ञा घेतली ती दिलेली आहे. त्या प्रतिज्ञेचा जर विचार केला तर राज्य ही भारतवर्षांत तरी भोगसुखासाठीं निर्माण झालेली वस्तुस्थिति नव्हती हें स्पष्टपणें ध्यानांत येतें. ती प्रतिज्ञा पुढीलप्रमाणें :—

नियतो यत्र धर्मो वै तमशङ्कः समाचर ॥ १०३
प्रियाप्रिये परित्यज्य समः सर्वेषु जन्तुषु ।
कामं क्रोधं च लोभं च मानं चोत्सृज्य दूरतः । १०४
यश्च धर्मात्प्रविचलेल्लोके कश्चन मानवः ।
निग्राह्यस्ते स्वबाहुभ्यां शश्वद्धर्ममवेक्षता ॥ १०५
प्रतिज्ञां चाधिरोहस्व मनसा कर्मणा गिरा ।
पालयिष्याम्यहं भौमं ब्रह्म इत्येव चासकृत् ॥ १०६
यश्चात्र धर्मो नित्योक्तो दण्डनीतिव्यपाश्रयः ।
तमशङ्कः करिष्यामि स्ववशो न कदाचन ॥ १०७
—महाभारत, शांतिपर्व अध्याय ५९

याठिकाणीं जो ठरलेला धर्म आहे, त्याचें तूं निःशंकपणें आचरण कर. प्रियाप्रिय भावना व व्यक्तिगत मनोविकार यांचा परित्याग करून यच्चयावत् प्राणिमात्राशीं तुला समबुद्धीनेंच वागलें पाहिजे. काम, क्रोध, लोभ, मान इत्यादि भावना सोडून प्रजारक्षण करणें हेंच तुझें कर्तव्य होय. शाश्वत धर्माचें स्वरूप ध्यानांत घेऊन जो कोणी आपल्या कर्तव्यापासून विचलित होईल त्याचा स्वतःच्या बाहुबलानें तू निग्रह केला पाहिजेस. तूं मनानें, वाणीनें व कर्मानें नि वारंवार या पृथ्वीला ब्रह्म समजून तिचें पालन करीन अशी प्रतिज्ञा कर. दण्डनीतीच्या आधारानें नित्यधर्माचें निःशंक मनानें परिपालन करण्याची तूं प्रतिज्ञा कर. यापुढें स्वतःच्या लहरीनें तुला वागतां येणार नाहीं.

हिंदुराजाची ही प्रतिज्ञा पाहिली म्हणजे जगांतील यच्चयावत् प्राचीन राज्यपद्धतींतील प्रतिज्ञेच्या विभागांतील ठराविक गूढवाद तिच्यांत मुळींच नसल्याचें प्रत्ययास येतें. ही प्रतिज्ञा नुसती उच्चारावयाची नसून ती प्रत्यक्ष पाळावयाची असे. जो ती पाळी त्यालाच विष्णूचा अवतार व लोकपालांचा अंश समजत. जो भोगसुखासीन राहून ती पाळण्याच्या बाबतींत कुचराई करील त्याला असत्यसंध व भ्रष्टप्रतिज्ञ समजून सिंहासनावरून पदच्युत करण्यांत येई. क्वचित प्रसंगीं ठारही मारण्यांत येई. राजा हा वध्य केव्हां मानला जात असे याचा विचार मी पुढें करणारच आहें. राजाला भारतीय लोक विष्णूचा अंश व लोकपालांचा अंश समजत म्हणजे काय याची कल्पना पुष्कळ लोकांना येत नाहीं. त्यामुळें अभारतीय राज्यघटनांमधून ‘King does no wrong’ अशासारखें जें गूढवलय निर्माण केलेलें असतें, तेंच भारतीय राजांच्या भोंवतींही निर्माण केलें असावें अशी कल्पना होते. वास्तविक त्याला लोकपालांचा अंश म्हणण्यांत त्याच्याकडून कांहीं विशिष्ट कर्तव्यें अभिप्रेत आहेत. तीं जर त्यानें पार न पाडलीं तर महाभारत त्याला लोकपालांचा अंश मानावयास मुळींच सिद्ध नाहीं. या बाबतींत प्रत्यक्ष महाभारतानें टाकलेला प्रकाश अत्यंत महत्त्वाचा आहे.

न हि जात्ववमन्तव्यो मनुष्य इति भूमिपः ।
महती देवता ह्येषा नररूपेण तिष्ठति ।। ४०
कुरुते पञ्चरूपाणि कालयुक्तानि यः सदा ।
भवत्यग्निस्तथाऽऽदित्यो मृत्युर्वैश्रवणो यमः ।। ४१
यदा ह्यासीदतः पापान्दहत्युग्रेण तेजसा ।
मिथ्योपचरितो राजा तदा भवति पावकः ।। ४२
यदा पश्यति चारेण सर्वभूतानि भूमिपः ।
क्षेमं च कृत्वा व्रजति तदा भवति भास्करः ।। ४३
अशुचींश्च यदा क्रुद्धः क्षिणोति शतशो नरान् ।
सपुत्रपौत्रान्सामात्यांस्तदा भवति सोऽन्तकः ।। ४४
यदा त्वधार्मिकान्सर्वांस्तीक्ष्णैर्दण्डैर्नियच्छति ।
धार्मिकांश्चानुगृह्णाति भवत्यथ यमस्तदा ।। ४५
यदा तु धनधाराभिस्तर्पयत्युपकारिणः ।
आच्छिनत्ति च रत्नानि विविधान्यपकारिणाम् ।। ४६
श्रियं ददाति कस्मैचित्कस्माश्चिदपकर्षति ।
तदा वैश्रवणो राजा लोके भवति भूमिपः ।। ४७

---महाभारत, शांतिपर्व अ. ६८

"मनुष्य म्हणून राजाचा कधींही अपमान करूं नये. कारण कीं, मनुष्यरूपानें ती प्रत्यक्ष देवताच नांदत असते. विशिष्ट काळीं राजा विशिष्ट प्रकारच्या देवतांचीं रूपें धारण करतो. ज्या वेळीं राजा आपल्या उग्र तेजानें पापी लोकांना दग्ध करतो त्या वेळीं तो अग्नि होतो. ज्यावेळीं सर्व लोकांचें कल्याण करण्याच्या इच्छेनें आपल्या चाररूपी डोळयांनीं तो समाजस्थितीचें ज्ञान करून घेतो, त्यावेळीं त्याला सूर्य असें म्हणतात. चारित्र्यभ्रष्ट लोकांना त्यांच्या परिवारासहित जाळून तो ठार मारतो त्या वेळीं त्याला मृत्यूचें स्वरूप येतें. ज्यावेळीं तो अधार्मिकांना तीक्ष्ण दंड देतो व धार्मिकांचें कल्याण करतो, त्यावेळीं त्याला यमधर्म म्हणतात; व ज्या वेळीं तो धनाचा वर्षाव करून उपकारकर्त्यांवर प्रतिउपकार करतो आणि अपकारी लोकांच्या संपत्तीचा अपहार करून कोशसंग्रह करतो

त्यावेळीं त्याला कुबेर म्हणतात." हीं कर्तव्यें पार न पाडणाऱ्या राजाला 'राजकलि' व 'बलिषड्भागतस्कर' अशीं विशेषणें लावलेलीं आहेत. राज्ययंत्राच्या सूत्रचालकानें सर्वांत प्रथम जर कोणती गोष्ट जिंकावयाची असेल तर तें त्याचें स्वतःचें मन होय.

**आत्मा जेयः सदा राज्ञा ततो जेयाश्च शत्रवः ।**
**अजितात्मा नरपतिर्विजयेत कथं रिपून् ।। ५**

—महाभारत, शांतिपर्व अ. ६९

राजानें प्रथम स्वतःचें मन जिंकावें व नंतर शत्रु जिंकावेत. जो स्वतःला जिंकणार नाहीं तो शत्रूंना काय जिंकूं शकणार ?

## राज्ययंत्राचें उत्तरदायित्व

समाजाच्या अधःपतनाचें व विकसनाचें सर्व दायित्व महाभारतानें राजावर टाकलेलें आहे. राष्ट्र जर अत्यंत चारित्र्यसंपन्न, समृद्ध, सुखी नि समर्थ असलें तर त्याविषयीं राजाला जसें गौरविलें आहे, त्याचप्रमाणें जर त्याचा अधःपात होत असला, तें शीलभ्रष्ट, दुःखी, असंरक्षित नि दुर्बल असलें, तर त्यासंबंधींही निंदेला पात्र दुसरा कोण होणार ? राज्ययंत्राच्या या उत्तरदायित्वाचें नि महत्त्वाचें वर्णन करतांना महाभारत म्हणतें :—

**राज्ञा सप्तैव रक्ष्याणि तानि चैव निबोध मे ।**
**आत्माऽमात्याश्च कोशश्च दण्डो मित्राणि चैव हि ।। ६४**
**तथा जनपदाश्चैव पुरं च कुरुनन्दन ।**
**एतत्सप्तात्मकं राज्यं परिपाल्यं प्रयत्नतः ।। ६५**
**किं तस्य तपसा राज्ञः किं च तस्याध्वरैरपि ।**
**सुपालितप्रजो यः स्यात्सर्वधर्मविदेव सः ।। ७३**
**कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम् ।**
**इति ते संशयो मा भूद्राजा कालस्य कारणम् ।। ७९**
**राजा कृतयुगस्रष्टा त्रेताया द्वापरस्य च ।**
**युगस्य च चतुर्थस्य राजा भवति कारणम् ।। ९८**
**कृतस्य करणाद्राजा स्वर्गमत्यन्तमश्नुते ।**
**त्रेतायाः करणाद्राजा स्वर्गं नात्यन्तमश्नुते ।। ९९**

—महाभारत शांतिपर्व अध्याय ६९

"राजानें मन, अमात्य, कोश, दण्ड, मित्र, जनपद, आणि पुर या राज्याच्या सातही अंगांचें संरक्षण करावें. राजाला तपश्चर्या अथवा यज्ञयाग यांचें काय करावयाचें आहे? जो आपल्या प्रजेचें उत्तम पालन करील तो सर्व धर्मशास्त्रज्ञ आहेच. राजा परिस्थिति निर्माण करतो कीं परिस्थिति राजा निर्माण करते असा संशय बाळगण्याचें कारण नाहीं. राजाच परिस्थिति निर्माण करीत असतो. कृत, त्रेता, द्वापर व कलि या नांवानें दिग्दर्शित केलेली समाजविकसनाची अथवा समाजाच्या अधःपतनाची परिस्थिति निर्माण करण्याचें सामर्थ्य राजाचेंच आहे. राजानें कृतयुग उत्पन्न केलें तर त्याला सर्वश्रेष्ठ सद्गति मिळते. जर त्यानें त्रेतायुग उत्पन्न केलें तर त्याला तितकी श्रेष्ठ सद्गति मिळत नाहीं. जर त्यानें द्वापर युग उत्पन्न केलें तर त्याला सद्गति व असद्गति दोन्ही प्राप्त होतात व जर त्यानें कलियुग उत्पन्न केलें तर मात्र त्याला घोर पाप लागतें." या निमित्तानें भारतीयांनीं आपला समाजशास्त्राचाही सिद्धांत स्पष्ट केला आहे.

परिस्थिति नेतृत्व उत्पन्न करते कीं नेतृत्व परिस्थिति उत्पन्न करते हा अलीकडे समाजशास्त्रज्ञांत वादाचा प्रश्न झालेला असून त्याबाबतींत नेतृत्वच परिस्थिति उत्पन्न करीत असतें असा भारतीय समाजशास्त्रज्ञांचा सिद्धांत आहे. परिस्थिति नेतृत्व उत्पन्न करते असें कम्युनिस्ट म्हणतात. पण मानवी इतिहासाचा ओघ त्यांच्याविरुद्ध साक्ष देतो. खास कम्युनिस्टांचा इतिहास घेतला तरी समाजवादी क्रांति जर्मनीमध्यें होण्याऐवजीं अथवा इंग्लंडमध्यें होण्याऐवजीं भांडवलशाहीच्या अवस्थेंत न आलेल्या रशियांतच ती झाली ही गोष्ट त्यांच्या इतिहासप्रक्रियेच्या सर्वस्वी विरुद्ध आहे. व रशियांत ही गोष्ट घडून यावयास शेवटीं लेनिनचें समर्थ नेतृत्व हेंच कारण दिसून येतें. हा अपवाद आहे असें म्हणावयाचें असलें तर ज्यांच्या शास्त्राला अपवादापासूनच सुरुवात होते त्यांना केवळ धन्य म्हटलें पाहिजे. असो. महाभारत म्हणतें—

**राजैव कर्ता भूतानां राजैव च विनाशकः ।**
**धर्मात्मा यः स कर्ता स्यादधर्मात्मा विनाशकः ॥ ९**

—महाभारत, शांतिपर्व अ. ९१

राजा हाच जसा लोकांचें कल्याण करणारा आहे तसाच तो लोकांचा विनाशही करणारा आहे. तो जर धार्मिक असला तर तो जसें लोकांचें कल्याण करूं शकतो त्याचप्रमाणें तो जर अधार्मिक असला तर तो लोकांचें अकल्याणही करूं शकतो.

भारतीयांच्या धर्मग्रंथांत केवळ पालन करण्याच्या क्रियेसाठींच राजाला भूमिपति मानण्यांत येत होतें असें दृष्टोत्पत्तीस येईल. राजा राष्ट्राचा धनी नाहीं तर तो सेवक आहे म्हणूनच त्याला इतर कोणतेंही दान करतां आलें तरी भूमिदान करतां येत नाहीं. "सार्वभौमस्यापि न तस्यां सत्त्वं ।" असें धर्मशास्त्रकारांनीं स्पष्ट म्हटलें आहे. राज्ययंत्र परतंत्र आहे कीं स्वयंभू आहे असा प्रश्न राज्यशास्त्रज्ञांत नेहमी उत्पन्न होत आलेला आहे. भारतीय राज्ययंत्र सर्वस्वी प्रजातंत्र असून राजाला सिंहासनावर बसविण्याचा अथवा त्याला काढून टाकण्याचाही प्रजेला अधिकार आहे. जन्मानुसार राज्याचा वारस असूनही प्रजेला जर तो नको असेल, तर त्याच्या जागीं प्रजेनें दुसऱ्याची नियुक्ति केल्याचीं महाभारतांत अनेक उदाहरणें आहेत. किंबहुना या बाबतींत प्रजांचा अधिकार राज्ययंत्राला दुःखद वाटला तरी डावलतां येत नसे व मुकाट्यानें मान्य करण्याखेरीज गत्यंतर उरत नसे अशी वस्तुस्थिति आहे.

महाभारताच्या उद्योगपर्वांत शंतनु राजा कसा झाला याचें जें वर्णन आहे त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते. 'प्रतीप' नांवाच्या राजाला देवापि, बाह्लीक व शंतनु अशीं तीन मुलें होतीं. त्यांपैकीं देवापि हा राज्याचा वारस होता. कारण तो ज्येष्ठ पुत्र होता. या तीनही भावांत अलौकिक बंधुप्रेम नांदत होतें. देवापीच्या ठिकाणीं एकच दोष होता व तो म्हणजे त्याला कातडीचा रोग होता. इतर सर्व दृष्टीनें तो योग्य असल्यामुळें त्यालाच राज्य द्यावयाचें असें ठरवून राजानें त्याप्रमाणें त्याच्या अभिषेकाची सिद्धता केली. पण प्रजांनीं

त्याला राजा करण्यास्तव विरोध करून ती गोष्ट हाणून पाडली. महाभारतांत या घटनेचें वर्णन पुढीलप्रमाणें आलें आहे :—

देवापिस्तु महातेजास्त्वग्दोषी राजसत्तमः ।
धार्मिकः सत्यवादी च पितुः शुश्रूषणे रतः ।। १७
पौरजानपदानां च सम्मतः साधुसत्कृतः ।
सर्वेषां बालवृद्धानां देवापिर्हृदयंगमः ।। १८
वदान्यः सत्यसन्धश्च सर्वभूतहिते रतः ।
वर्तमानः पितुः शास्त्रे ब्राह्मणानां तथैव च ।। १९
बाह्लीकस्य प्रियो भ्राता शान्तनोश्च महात्मनः ।
सौभ्रात्रं च परं तेषां सहितानां महात्मनाम् ।। २०
अथ कालस्य पर्याये वृद्धो नृपतिसत्तमः ।
सम्भारानभिषेकार्थं कारयामास शास्त्रतः ।। २१
कारयामास सर्वाणि मङ्गलार्थानि वै विभुः ।
तं ब्राह्मणाश्च वृद्धाश्च पौरजानपदैः सह ।। २२
सर्वे निवारयामासुर्देवापेरभिषेचनम् ।
स तच्छ्रुत्वा तु नृपतिरभिषेकनिवारणम् ।
अश्रुकण्ठोऽभवद्राजा पर्यशोचत चात्मजम् ।। २३
एवं वदान्यो धर्मज्ञः सत्यसन्धश्च सोऽभवत् ।
प्रियः प्रजानामपि संस्त्वग्दोषेण प्रदूषितः ।। २४
ततः प्रव्यथिताङ्गोऽसौ पुत्रशोकसमन्वितः ।
निवारितं नृपं दृष्ट्वा देवापिः संश्रितो वनम् ।। २६
बाह्लीको मातुलकुलं त्यक्त्वा राज्यं समाश्रितः ।
पितृभ्रातॄन् परित्यज्य प्राप्तवान् परमर्द्धिमत् ।। २७
बाह्लीकेन त्वनुज्ञातः शान्तनुर्लोकविश्रुतः ।
पितर्युपरते राजन् राजा राज्यमकारयत् ।। २८

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १४९

" देवापि कातडीच्या दोषानें युक्त असला तरी अत्यंत तेजस्वी, धार्मिक, सत्यवादी, पितृभक्त, सर्वांना आवडणारा, सर्वांचें प्रेम असलेला, उदार, सत्यप्रतिज्ञ, प्राणिमात्रांच्या हिताविषयीं जागृत असा होता. कालांतरानें वृद्ध राजानें त्याच्या राज्याभिषेकाची

सिद्धता केली. पण ऐन अभिषेकाचे वेळीं ब्राह्मण, वृद्ध लोक, व पौर-जानपद यांनीं तो अभिषेक थांबविला. शारीरिक दोषानें युक्त असलेला पुरुष, दुसरा तोही दोष नसलेला वारस मिळत असतां, राज्यावर बसूं शकत नाहीं असें त्यांचें म्हणणें होतें. राजाचा अभिषेक त्यांनीं बंद पाडला. राजाला अत्यंत दुःख झालें व देवापि अरण्यांत निघून गेला. मधला बंधु बाह्लीक याला आजोळचें राज्य मिळाल्यामुळें तो तिकडे निघून गेला. म्हणून पित्यानंतर शंतनूला राज्य मिळालें. धृतराष्ट्राला देखील युधिष्ठिराचें यौवराज्य आपण नाकारल्यास प्रजा आपणांस ठार मारील हीच भीति मुख्यतः वाटते. तो म्हणतोः

ते पुरा सत्कृतास्तात पाण्डुना नागरा जनाः ।
कथं युधिष्ठिरस्यार्थे न नो हन्युः सबान्धवान् ॥ ११

—महाभारत आदिपर्व, अध्याय १४२

" हे दुर्योधना ! पांडूनें पूर्वीं नागर जनांचें सर्वस्वीं कल्याण केलेलें आहे. आतां युधिष्ठिरासाठीं ते आपणांस ठार मारल्यावांचून राहतील काय ? "

राजा व प्रजा यांचे संबंध किती मधुर होते नि प्रजांचें राजांना किती महत्त्व वाटत असे याचें अत्यंत करुणास्पद वर्णन महाभारताच्या आश्रमवासिक पर्वांत धृतराष्ट्रानें प्रजांचा शेवटचा निरोप घेते वेळीं आलेलें आहे. तें असें :—

शान्तनुः पालयामास यथवद्वसुधामिमाम् ।
तथा विचित्रवीर्यश्च भीष्मेण परिपालितः ॥ १

पालयामास नस्तातो विदितार्थो न संशयः ।
यथा च पाण्डुर्भ्राता मे दयितो भवतामभूत् ॥ २

स चापि पालयामास यथावत्तच्च वेत्थ ह ।
मया च भवतां सम्यक् शुश्रूषा या कृताऽनघाः ॥ ३

असम्यग्वा महाभागास्तक्षन्तव्यमतन्द्रितैः ।
यदा दुर्योधनेनेदं भुक्तं राज्यमकण्टकम् ॥ ४

तन्मया साधु वाऽपीदं यदि वासाधु वै कृतम् ॥ ६

तद्वो हृदि न कर्तव्यं मया बद्धोऽयमञ्जलिः ।
वृद्धोऽयं हतपुत्रोऽयं दुःखितोऽयं नराधिपः ॥ ७

पूर्वराज्ञां च पुत्रोऽयमिति कृत्वाऽनुजानथ ।
इयं च कृपणा वृद्धा हतपुत्रा तपस्विनी ॥ ८
हतपुत्राविमौ वृद्धौ विदित्वा दुःखितौ तथा ॥ ९
अनुजानीत भद्रं वो व्रजाव शरणं च वः । १०
अवश्यमेव वक्तव्यमिति कृत्वा ब्रवीमि वः ।
एष न्यासो मया दत्तः सर्वेषां वो युधिष्ठिरः ॥ १४
भवन्तोऽस्य च वीरस्य न्यासभूताः कृता मया ।
यदेव तैः कृतं किञ्चिद्व्यलीकं वः सुतैर्मम ॥ १५

—महाभारत आश्रमवासिक पर्व अध्याय ९

धृतराष्ट्र म्हणतो :

शंतनूनें धर्मशास्त्रानुसार या पृथ्वीचें पालन केलें. त्यानंतर भीष्मानें ज्याचें पालन केलें आहे असा माझा पिता जो विचित्रवीर्य त्यानेंही आपलें यथाशास्त्र पालन केलें. त्यानंतर माझा भाऊ पंडू हा गादीवर आला. तो तर आपणांस अत्यंत प्रियच होता. त्यानंतर मी आपली सेवा केली. ती योग्य किंवा अयोग्य जशी काय केली असेल त्याविषयीं आपण मला क्षमा करावी. मी जें काय चांगलें वाईट केलें असेल त्याविषयीं आपण मला क्षमा करावी नि मनांत कांहीं ठेवू नये. मी आपणांस हात जोडतों. हा वृद्ध आहे, याचीं सर्व मुलें मारली गेलीं आहेत हा अत्यंत दु:खी आहे, आणि परंपरेनें आपलें संरक्षण करीत असणाऱ्या राजांच्या वंशांतच याचा जन्म झालेला आहे हें ध्यानीं आणून तरी आपण मला क्षमा करावी. मुलेंबाळें नष्ट झालेलीं व दु:खी असणारीं दोन वृद्ध माणसें आपणांस शरण आलीं आहेत हें ध्यानीं आणावें. हा युधिष्ठिर माझी ठेव म्हणून मी आपल्या स्वाधीन करतों व आपणांसही माझी ठेव म्हणूनच मी युधिष्ठिराच्या स्वाधीन करतों."

राज्ययंत्र स्वयंभू नसून परतंत्र असल्याची महाभारताची साक्ष असल्याचें मी आपणांस सांगितलें. तें परतंत्र असण्यांत त्याचीं नियंत्रणें आलींच. राज्ययंत्राचीं तीं नियंत्रणें कोणतीं हें पुढील व्याख्यानांत पाहूं.

*

# ७. भारतीय राज्यसंस्थेवरील नियंत्रणें

भारतीय राज्यतत्र स्वतंत्र नसून तें नियंत्रित असल्याचें मीं आपणांस सांगितलें. तीं नियंत्रणें कोणतीं होतीं अथवा शास्त्रानुसार आहेत हें पहाणें मोठें महत्त्वाचें ठरेल. त्यांपैकीं पहिलें नियंत्रण पौरजानपदांचें होय.

## (१) पौर व जानपद

राज्यकारभारांतल्या घटनाविषयक व राज्यविषयक धोरणाच्या सर्व बाबी पौर व जानपद यांच्या संमतीनेंच कराव्या लागत. पौर व जानपद असे दोन वेगवेगळे शब्द ज्याप्रमाणें भारतीय वाङ्मयांत येतात त्याप्रमाणें कधींकधीं ते शब्द एकमेकांचे पर्याय म्हणूनही वापरले जातात. राष्ट्रांतील लोक व प्रत्यक्ष राजधानींत राहणारे नागर जन या दोघांच्याही दोन स्वतंत्र अशा समिति अथवा प्रातिनिधिक मंडळें असत. कोणतीही गोष्ट त्या मंडळाला विचारल्यावांचून करतां येत नसे. रामायणांत तर ब्राह्मण लोकांनीं निवडलेले प्रतिनिधि आणि पौर नि जानपद यांनीं एकत्र येऊन अयोध्येच्या राजसिंहासनाला कोण युवराज असावा याविषयीं प्रत्यक्ष विचार केलेला असून त्यांनीं तो विचार राजा दशरथाला सुचविल्यावरच श्रीरामचंद्रांच्या राज्याभिषेकाचा प्रश्न विचारार्ह ठरलेला आहे. कालच्या व्याख्यानांत राज्ययंत्र प्रजातंत्र असे, असें मीं जें सांगितलें त्याची ही घटनात्मक व्यवस्था होती. रामायण, महाभारत तर काय पण चंद्रगुप्त मौर्यांच्या काळापर्यंतही या पौर-जानपदांचें अस्तित्व नि घटनात्मक महत्त्व प्रत्यक्षांत होतें. कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत पौर-जानपदांचा राज्ययंत्रावर विश्वास आहे कीं नाहीं हें पहाण्यासाठीं त्यांच्यांत हेर सोडावे आणि त्या हेरांनीं राजाविषयीं निंदास्पद बोलावयास सुरुवात करावी आणि त्या बोलण्यावरून

---

व्याख्यान ७ वें, दि. १ एप्रिल १९५१

त्यांची आपल्यावर किंवा राज्ययंत्रावर निष्ठा किती आहे हें पहाण्याचा प्रयत्न करावा असें सांगितलेलें आहे. कौटिल्य म्हणतोः—

"गूढपुरुषप्रणिधिः कृतमहामात्यापसर्पः पौरजानपदानपसर्पयेत् । सत्रिणो द्वन्द्विनस्तीर्थसभाशालापूगजनसमवायेषु विवादं कुर्युः । सर्वगुणसंपन्नश्चायं राजा श्रूयते । न चास्य कश्चिद् गुणो दृश्यते, यः पौरजानपदान् दण्डकराभ्यां पीडयतीति ॥"

( कौटिलीय अर्थशास्त्र अ. १३ )

अर्थः— "आपले हेर राजानें पौरजानपदांच्या जमण्याच्या ठिकाणीं पेरून ठेवावेत व त्या हेरांनीं नागरिक लोक ऐकत असतां आपसांतच असा वादविवाद सुरू करावा कीं, हा राजा सर्वगुणसंपन्न आहे असें आम्ही ऐकतों आहोंत खरें, पण हा सर्व लोकांना कर लादून व दंड करून अकारण पीडा देत असल्याचेंच दृष्टोत्पत्तीस येतें. त्यामुळें हा चांगला आहे असें कसें म्हणावें ?"

महाभारतांत असें सांगितलें आहे की, राज्याचा मुख्य प्रधान पौरजानपदांच्या संमतीवांचून निश्चित करतां येत नाहीं.

**तस्मै मन्त्रः प्रयोक्तव्यो दण्डमाधित्सता नृप ॥ ४५**
**पौरजानपदा यस्मिन्विश्वासं धर्मतो गताः ॥ ४६**

—महाभारत शांतिपर्व अ. ८३

अर्थ—"दण्डनीति नीट चालवूं इच्छिणाऱ्या राजानें पौरजानपदांना ज्याच्याविषयीं अत्यंत विश्वास असेल अशालाच राज्याचा मुख्य प्रधान करावें." इतकेंच नव्हे तर जानपद व त्यांचे अध्यक्ष यांची संमति असल्यावांचून त्यास राज्ययंत्राविषयींचा कोणताही व्यवहार किंवा राज्ययंत्राचें धोरण ठरवितां येत नसे. राज्ययंत्राच्या धोरणाविषयीं अष्टप्रधानमंडळांत पूर्णपणें खल करूनही तेवढ्यानें न भागतां राजानें प्रधानमंडळाशीं चर्चा करून धोरण निश्चित केल्यावर तें पौरांकडून संमत करून घ्यावयाचें व नंतर त्यांच्या अधिकृत प्रतिनिधींना दाखवून त्याच्या संमतीनेंच व्यवहारांत आणावयाचें म्हणजे तें घटनात्मक दृष्टीनें योग्य होत असे. महाभारतांत म्हटलें आहे कीं,—

अष्टानां मन्त्रिणां मध्ये मन्त्रं राजोपधारयेत् ॥ ११
ततः संप्रेषयेद्राष्ट्रे राष्ट्रीयाय च दर्शयेत् ।
अनेन व्यवहारेण द्रष्टव्यास्ते प्रजाः सदा ॥ १२

—महाभारत शांतिपर्व अ. ८५

अर्थ—"आठ मंत्र्यांच्यामध्यें बसून राजानें चर्चा केल्यानंतर ठरविलेलें धोरण पौरजानपदांकडे पाठवावें व त्यांच्या प्रतिनिधीला दाखवावें. धोरण गंभीर विषयासंबधींचें असो किंवा सामान्य विषयासंबंधीं असो, राजानें प्रजेशीं वागतांना याच धोरणाचा अवलंब केला पाहिजे."

महाभारतकाळीं पौरजानपदांचें असलेलें हें महत्त्व मौर्यांच्या वेळेपर्यंत चालू असल्याचे पुरावे इतिहासांतून मिळतात. तक्षशिलेच्या नागरिकांनीं एकदां राज्ययंत्राविरुद्ध आंदोलन घडवून आणलें. त्यावेळीं सम्राट अशोकाचें राज्य चालू होतें. अशोकानें आपल्या युवराजाला प्रजांचें काय म्हणणें आहे तें ऐकून घेण्यासाठीं पाठविलें तेव्हां प्रजांनीं युवराजाची भेट घेऊन आम्हांला राज्ययंत्राविषयीं कांहींच म्हणावयाचें नसून आमच्यावर नेमलेले जे अधिकारी आहेत ते वारंवार आमचा अपमान करीत असल्यामुळें त्यांना काढून लावा असें सांगितलें. तें ऐकतांच सम्राट अशोकानें त्या अधिकाऱ्यांना काढून लावलें, असें वृत्त मौर्यांच्या इतिहासांतून आढळतें. राज्ययंत्राला पौरजानपदांच्या बाबतींतलें नियंत्रण इतकें असे कीं धर्मशास्त्रानुसार ठरलेल्यापेक्षां अधिक कर त्याला त्यांच्यावर लादतां येत नसत. पण राष्ट्राचा संसार म्हटला कीं त्यामध्यें संपत्तीआपत्तींचे उन्हाळेपावसाळे यावयाचेच. कोश हेंच राज्ययंत्राचें खरें बळ आहे, ही गोष्ट महाभारतांत वारंवार सांगितलेली आहे. अशा स्थितींत विशिष्ट आपत्तीच्या प्रसंगीं प्रजांवर अधिक कर लादून कोशसंग्रह करण्याची आवश्यकता राज्ययंत्राला निर्माण होणें अपरिहार्य आहे. या स्थितींत राज्ययंत्राला ते प्रासंगिक कर लादण्याच्या वेळीं पौरजानपदांची संमति घेणें क्रमप्राप्त असे. आणि ती संमति त्याला प्रार्थनापूर्वक अनुनयाच्या मार्गानेंच घ्यावी लागत

असे. ही संमति राज्ययंत्र कशी घेत असे याचें महाभारतांत अत्यंत हृदयंगम वर्णन आहे तें पुढीलप्रमाणें:—

प्रागेव तु धनादानमनुभाष्य ततः पुनः ।
सन्निपत्य स्वविषये भयं राष्ट्रे प्रदर्शयेत् ।। २६
इयमापत्समुत्पन्ना परचक्रभयं महत् ।
अपि चान्ताय कल्पन्ते वेणोरिव फलागमाः ।। २७
अरयो मे समुत्थाय बहुभिर्दस्युभिः सह ।
इदमात्मवधायैव राष्ट्रमिच्छन्ति बाधितुम् ।। २८
अस्यामापदि घोरायां संप्राप्ते दारुणे भये ।
परित्राणाय भवतः प्रार्थयिष्ये धनानि वः ।। २९
प्रतिदास्ये च भवतां सर्वं चाहं भयक्षये ।
नारयः प्रतिदास्यन्ति यद्धरेयुर्बलादितः ।। ३०
कलत्रमादितः कृत्वा सर्वं वो विनशेदिति ।
अपि चेत्पुत्रदारार्थमर्थसंचय इष्यते ।। ३१
नन्दामि वः प्रभावेण पुत्राणामिव चोदये ।
यथा शक्त्युपगृह्णामि राष्ट्रस्यापीडया च वः ।। ३२
आपत्स्वेव च वोढव्यं भवद्भिः पुङ्गवैरिव ।
न च प्रियतरं कार्यं धनं कस्याञ्चिदापदि ।। ३३
इति वाचा मधुरया श्लक्ष्णया सोपचारया ।
स्वरश्मीनभ्यवसृजेद्योगमाधाय कालवित् ।। ३४

—महाभारत शांतिपर्व अध्याय ८७

अर्थ—" राष्ट्रावर अधिक कर लादून कोशसंग्रह करावयाचा असेल तर तसें करण्यापूर्वींच ही गोष्ट राष्ट्राला अनुनयपूर्वक सांगावी. राष्ट्रावर आलेल्या आपत्तींचें प्रजाजनांसमोर वर्णन करावें. त्यांना असें सांगावें कीं, राष्ट्रावर परचक्राची मोठी आपत्ति येत आहे. गांवांगांवांतून आपत्तींची कल्पना द्यावी. अनेक दस्यूंचें साहाय्य घेऊन आमचे शत्रु या राष्ट्रावर तुटून पडूं इच्छीत आहेत, स्वतः-चाच विनाश होण्यासाठीं ते या राष्ट्राला उपसर्ग करूं इच्छीत आहेत, या अत्यंत घोर आपत्तीच्या वेळीं दारुण भय उत्पन्न झालें

असतांना तुमचेंच रक्षण व्हावें म्हणून मी तुमचें धन मला देण्याविषयीं तुमची प्रार्थना करीत आहें. आज जें धन मी तुमच्याजवळून मागतों तें केवळ तात्पुरतें असून आपत्ति नष्ट झाल्यावर तें मी तुम्हांस परत केल्यावांचून राहणार नाहीं. शत्रूंनीं जर चढाई करून बलात्कारानें तुमचें धन हरण केलें तर ते कांहीं तुम्हांला परत देणार नाहींत. नुसतें धनच तर काय, पण ते तुमचें सर्वस्व हरण करतील. स्त्रियासुद्धां पळवतील. अशी आपत्ति येऊं नये म्हणून आज आपण आपलें धन मला द्यावें. जर धनाचाही संग्रह पोराबाळांसाठीं व स्त्रियांच्या संरक्षणासाठींच करावयाचा असतो, तर त्यांच्याच विनाशाची ही वेळ आल्यानंतर नुसतें धन जवळ बाळगून तरी उपयोग काय ? आपल्याच प्रभावानें मी आनंदांत आहे. पुत्रांच्या उदयांत पित्याला जसा आनंद त्याचप्रमाणें आपल्या उदयांत मला आनंद आहे. राष्ट्राला मुळींच पीडा न देतां माझ्या राज्ययंत्रानें नेहमींच त्याचें यथाशक्ति रक्षण केलें आहे हें आपण जाणतांच. आपण श्रेष्ठ आहांत. आपत्तीचा भार आपणच सहन केला पाहिजे. आपत्तिनिवारण कीं धन अशा द्वंद्वांत आपत्तीचें निवारण हीच आपण सर्वश्रेष्ठ गोष्ट मानाल, असा मला विश्वास वाटतो." याप्रमाणें अत्यंत मधुर, संस्कारित, नि अनुनयाच्या भाषेनें प्रार्थना करूनच आपलें काम करून घ्यावें. भारतीय राज्यतंत्रांत पौरजानपदांचें महत्त्व इतकें श्रेष्ठ मानलें आहे कीं,

**'पौरजनपदा यस्य स्वनुरक्ता अपीडिताः ।**
**राष्ट्रकर्मकरा ह्येते राष्ट्रस्य च विरोधिनः ।।**

ज्याचे पौर आणि जानपद न छळण्यांत आलेले नि म्हणूनच अनुरक्त असतील ते त्याच्या राष्ट्राचें संरक्षण करूं शकतात. तसें नसतील तर ते राष्ट्र नष्टही करूं शकतात. कोणती राज्यसत्ता दृढमूल होते याचें वर्णन करीत असतांना महाभारतांत असें म्हटलें आहे कीं--

**यस्य स्फीतो जनपदः संपन्नप्रियराजकः ।**
**संतुष्टपुष्टसचिवो दृढमूलः स पार्थिवः ।। ३**

**पौरजानपदा यस्य भूतेषु च दयालवः ।**
**सधना धान्यवन्तश्च दृढमूलः स पार्थिवः ॥ ५**

—महाभारत शांतिपर्व अध्याय ९४

ज्याचा जनपद अत्यंत समृद्ध असून राजावर प्रेम करणारा असतो व ज्याचे मंत्री संतुष्ट आणि पुष्कळ धन देऊन प्रसन्न केलेले असतात त्या राजाचें राज्ययंत्र सुस्थिर होय. ज्याचे पौरजानपद श्रीमंत, धनधान्यादिकांनीं समृद्ध व प्राणिमात्रांवर दया करणारे असतात त्यांचें राज्ययंत्र सुस्थिर असतें. भारतीय धर्मशास्त्रांत तर असें सांगितलें आहे कीं पौरजानपद यांचें धन जर चोरीला गेलें तर राजानें तें मिळवून देणें त्याला शक्य नसल्यास स्वतःच्या कोशांतून त्याची भरपाई केली पाहिजे.

**देयं चौरहृतं द्रव्यं राज्ञा जानपदाय तु ।**
**अददद्धि समाप्नोति किल्बिषं यस्य यस्य तत् ॥ ३६**

—याज्ञवल्क्य, व्यवहाराध्याय २

**प्रत्याहर्तुमशक्तस्तु धनं चौरैर्हृतं यदि ।**
**स्वकोशात्तद्धि देयं स्यादशक्तेन महीक्षिता ॥**

—(वरील श्लोकावरील मिताक्षरा पहा.)

चोरांनीं जर प्रजाजनांचें द्रव्य चोरलें तर राजानें तें त्यांना परत दिलें पाहिजे. राजानें जर तें त्यांना परत दिलें नाहीं तर त्याला घोर पाप लागतें. जो राजा चोरांनीं प्रजांचें चोरलेलें द्रव्य चोरांना पकडून देऊन, त्यांच्याकडून ज्यांचे त्याला परत करूं शकत नसेल त्यानें त्यांचें द्रव्य स्वतःच्या कोशांतून परत केलें पाहिजे.

महाभारतांत या बाबतींत रोजच्या रोजच पौरजानपदांचीं कार्यें राजानें केलीं पाहिजेत असें म्हटलें आहे. रोजच्या रोज होणारा राज्यकारभारदेखील प्रजांना संमत आहे कीं नाहीं याची राजानें माहिती मिळवावी.

**अतीतदिवसे वृत्तं प्रशंसन्ति न वा पुनः ।**
**गुप्तैश्चारैरनुमतैः पृथिवीमनुसारयेत् ॥ १५**
**जानीयुर्यदि मे वृत्तं प्रशंसन्ति न वा पुनः ।**
**कच्चिद्रोचेज्जनपदे कच्चिद्राष्ट्रे च मे यशः ॥ १६**

—महाभारत, शांतिपर्व अ. ८९

आदल्या दिवशीं केलेलें कृत्य लोक प्रशंसा करण्याजोगें समजतात कीं निंदा करण्याजोगें समजतात हें पहाण्यासाठीं राजानें रोज गुप्त चारांना लोकांमध्यें सोडावें आणि राष्ट्रांतील लोक मला चांगलें म्हणतात कीं वाईट म्हणतात हें नीट शोध करून मला कळवा असें त्यांना सांगावें. राजाला द्यावयाचा दानधर्म देखील पौरजानपदांच्या अनुमतीच्या अनुसारच द्यावा लागेल अशी वस्तुस्थिति होती. तात्पर्य पौर नि जानपद हें राजाचें नि राज्ययंत्राचें सर्वांत महत्त्वाचें नियंत्रण असून त्यांच्या हातीं पुढीलप्रमाणें अधिकार असत:–

(१) पौर व जानपद राज्याला वारस सुचवूं शकत.

(२) असलेला वारस ते नाकारूं शकत, व त्याच्या जागीं दुसरा बसवूं शकत.

(३) राज्यावरील राजाला ते पदच्युत करूं शकत.

(४) कर ठरलेले होते पण विशिष्ट आपत्तींच्या प्रसंगीं राजाला ते वाढवावयाचे असल्यास त्या आपत्तींची पौरजानपदांना पूर्णपणें कल्पना देऊन त्यांची मनधरणी करून व त्यांनीं संमति दिल्यास राजाला ते वाढवितां येत असत.

(५) प्रधानमंत्री नियुक्त करतांना त्यांची संमति अवश्य असे.

(६) अधिकारी कोणचा असावा वा नसावा हें ते ठरवीत. निदान त्यांनीं विरोध केल्यास अधिकारी बदलणें क्रमप्राप्त असे.

(७) राज्याचें धोरण त्यांच्या संमतीनें ठरवावें लागे. त्यासाठीं अष्टप्रधान मंडळांत ठरलेली गोष्ट त्यांच्याकडे संमतीसाठीं पाठवून त्यांच्या प्रतिनिधींच्या निदर्शनास आणावी लागे.

## राज्ययंत्राचें दुसरें नियंत्रण–तपस्वी ब्राह्मण

राज्ययंत्राचें दुसरें मोठें नियंत्रण म्हणजे तपस्व्यांचें होतें. या तपस्वी लोकांचा प्रभाव आर्यांच्या सर्व संस्कृतीवर पडलेला आहे. आर्य संस्कृतीची खूण जर विचारली तर ती हीच निर्विवादपणें सांगतां येईल.

धनमानादिकांचा परित्याग करून अरण्यांत राहणारे हे तेजस्वी ऋषि राजे नि प्रजा या दोहोंच्याही सारख्याच विश्वासास पात्र असत. त्यांना राज्ययंत्रापासून कांहींही नको होतें. त्यामुळें राग-द्वेषाचा त्यांच्यावर कांहींही परिणाम होत नसे. हिंदू इतिहासांतील कितीतरी भाग त्यांच्या श्रेष्ठत्वाच्या वर्णनानें भरलेला आहे. राष्ट्र संकटांत सांपडलें अथवा राज्ययंत्रांत कांहीं महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न झाला, म्हणजे या वर्गालाच उपाययोजना विचारावयास मोठमोठे सत्ताधीश येत. महाभारतांत गणराज्यांत भेद उत्पन्न झाल्यावर तो नष्ट करून ते सुखी कसे करावेत यासंबंधीं प्रत्यक्ष भगवान् श्री-कृष्णांनीं नारदाचा विचार घेतला असल्याचें लिहिलें आहे. इतकेंच नव्हें तर हे तपस्वी वारंवार राज्यकर्त्यांची भेट घेऊन त्यांच्या राष्ट्रांत धर्मसंरक्षण नीट चालू आहे कीं नाहीं हें पहात असत. महा-भारतांतील सभापर्वांत प्रत्यक्ष नारद येऊन यासंबंधीं युधिष्ठिराला प्रश्न विचारीत असल्याचें वृत्त वर्णिलें आहे.

तपस्व्यांच्या बाबतींत महाभारत असें म्हणतें कीं:—

> **आत्मानं सर्वकार्याणि तापसे राष्ट्रमेव च ।**
> **निवेदयेत्प्रयत्नेन तिष्ठेत्प्रह्वश्च सर्वदा ॥ २६**
>
> —महाभारत, शांतिपर्व अ. ८६

राजानें आपण आपला राज्यकारभार नि सारें राष्ट्र तपस्व्यां-च्या पायावर अर्पण करून नेहमीं नम्रपणानें त्यांच्यासमोर उभें राहावें. संपूर्ण हिंदू इतिहासांत दारिद्र्य हा अलंकार समजून बुद्धि अधिकाधिक सूक्ष्म व तीक्ष्ण करीत जाण्याचें पिढ्यान् पिढ्या व्रत पत्करलेला असा हा तपस्वी ब्राह्मणांचा वर्ग होता. पौरजानपदांचा निदान स्वतःच्या उपजीवनासंबंधींचा तरी स्वार्थ असू शकेल. या वर्गाला तोही नव्हता. त्याचें महत्त्व नि नियंत्रण स्पष्ट करतांना महाभारत म्हणतें:—

> **ब्राह्मणो हि कुले जातः कृतप्रज्ञो विनीतवान् ॥ १५**
> **श्रेयो नयति राजानं ब्रुवंश्चित्रां सरस्वतीम् । १६**
>
> —महाभारत, शांतिपर्व अ. ७२

ब्रह्मवृक्षो रक्ष्यमाणो मधु हेम च वर्षति ।
अरक्ष्यमाणः सततमश्रु पापं च वर्षति ।। १४

—महाभारत, शांतिपर्व अ. ७३

तपो मन्त्रबलं नित्यं ब्राह्मणेषु प्रतिष्ठितम् ।
अस्त्रबाहुबलं नित्यं क्षत्रियेषु प्रतिष्ठितम् ।। १४
ताभ्यां संभूय कर्तव्यं प्रजानां परिपालनम् । १५

—महाभारत, शांतिपर्व अ. ७४

अर्थ—"कुलीन, विद्वान्, नि विनयनम्र ब्राह्मण योग्य तें सुव्यवस्थित सांगून राजाचें कल्याण करतो. ब्रह्मवृक्षाचें संरक्षण केलें तर तो मधु आणि सुवर्ण यांचा वर्षाव करतो. पण जर त्याचें संरक्षण न केलें तर मात्र तो सतत अश्रु नि पाप यांचाच वर्षाव करतो. तपश्चर्या आणि मंत्रबल नेहमीं ब्राह्मणांत प्रतिष्ठा पावलेलें असून अस्त्रविद्या नि बाहुबल क्षत्रियांत प्रतिष्ठा पावलें आहे. म्हणून त्या दोघांनीं मिळूनच प्रजांचें परिपालन केलें पाहिजे. धर्मसंरक्षणाचें खड्ग क्षत्रियांना ब्राह्मणांनीं दिलेलें आहे असें महाभारतांतच स्पष्ट सांगितलें आहे.

भारतकार म्हणतात :—

असिं धर्मस्य गोप्तारं ददौ सत्कृत्य विष्णवे ।
विष्णुर्मरीचये प्रादान्मरीचिर्भगवानपि ।। ६६
महर्षिभ्यो ददौ खड्गमृषयो वासवाय च ।
महेन्द्रो लोकपालेभ्यो लोकपालास्तु पुत्रक ।। ६७
मनवे सूर्यपुत्राय ददुः खड्गं सुविस्तरम् ।
उचुश्चैनं तथा वाक्यं मानुषाणां त्वमीश्वरः ।। ६८
असिना धर्मगर्भेण पालयस्व प्रजा इति ।। ६९

—महाभारत, शांतिपर्व अ. १६६

या खड्गस्तोत्रांतील परंपरेचा विचार केला तर असें आढळून येईल कीं, ऋषींनीं मनू व मनुपुत्र यांना खड्ग दिलेलें आहे. अर्थात् तें वापरावें कसें यावर त्यांचें नियंत्रण असणारच. या महर्षींचें राज्ययंत्रावरील नियंत्रण अप्रत्यक्षपणें तर असेच, पण प्रत्यक्षपणेंही तें

पुरोहिताच्या रूपानें असे. महाभारतांत राजानें पुरोहित केलाच पाहिजे असें सांगितलें असून शांतिपर्वाच्या ७४ व्या अध्यायांत पुरोहितानें राजाला संकटांतून कसें तारलें त्याचें वृत्तही दिलें आहे. महाभारत म्हणतें:–

**राज्ञा पुरोहितः कार्यो भवेद्विद्वान्बहुश्रुतः ।**
**उभौ समीक्ष्य धर्मार्थावप्रमेयावनन्तरम् ॥ १**

—महाभारत, शान्तिपर्व अ. ७३

राजानें धर्म, अर्थ आणि त्यांचें गूढ असें स्वरूप ध्यानांत घेऊन विद्वान् आणि बहुश्रुत पुरोहित करावा. श्रीमत् वाल्मीकीय रामायणांत तर या तपस्वी लोकांचीच राज्ययंत्रावर नियंत्रण ठेवणारी मंत्रिसंस्था असल्याचें वर्णिलें असून महत्त्वाच्या प्रसंगीं तिनें राज्ययंत्राचें नियंत्रण केल्याचें दाखविलें आहे. विद्वत्ता, दक्षता, नि कार्यकुशलता या सर्व बाबतींत राज्ययंत्रानें जे श्रेष्ठ असतील त्यांचा संग्रह केलाच पाहिजे. शंभर मूर्खांपेक्षां एका विद्वानाचें मत अधिक ग्राह्य होय असें महाभारताचें स्पष्ट मत आहे. 'शतं विहाय मूर्खाणां एकं वृणासि पण्डितम्' असें युधिष्ठिराला नारदानेंच विचारलें आहे.

इतिहासकाळांतही या मार्गदर्शकांचें महत्कार्य अनेकवार दृष्टीस पडतें. हें राज्ययंत्राचें दुसरें नियंत्रण होय.

## राज्ययंत्राचें तिसरें नियंत्रण म्हणजे अमात्य–संस्था

राजा म्हटला कीं त्याला मंत्री असलेच पाहिजेत असें भारतीय धर्मशास्त्राचें नि राज्यशास्त्राचें स्पष्ट मत आहे. मनु म्हणतो :—

**सोऽसहायेन मूढेन लुब्धेनाकृतबुद्धिना ।**
**न शक्यो न्यायतो नेतुं सक्तेन विषयेषु च ॥ ३०**
**शुचिना सत्यसन्धेन यथाशास्त्रानुसारिणा ।**
**प्रणेतुं शक्यते दण्डः सुसहायेन धीमता ॥ ३१**
**अपि यत्सुकरं कर्म तदप्येकेन दुष्करम् ।**
**विशेषतोऽसहायेन किमु राज्यं महोदयम् ॥ ५५**
**तैः सार्धं चिन्तयेन्नित्यं सामान्यं सन्धिविग्रहम् ।**
**स्थानं समुदयं गुप्तिं लब्धप्रशमनानि च ॥ ५६**

—मनुस्मृति अ. ७

सर्वविद्यासु कुशलो नृपो ह्यपि सुमन्त्रवित् ।
मन्त्रिभिस्तु विना मन्त्रं नैकोऽर्थं चिन्तयेत् क्वचित् ॥
सभ्याधिकारि–प्रकृति–सभासत्सुमते स्थितः ।
सर्वदा स्यान्नृपः प्राज्ञः स्वमते न कदाचन ॥
प्रभुः स्वातन्त्र्यमापन्नो ह्यनर्थायैव कल्पते ।
भिन्नराष्ट्रो भवेत्सद्यो भिन्नप्रकृतिरेव च ॥
तेषां स्वं स्वमभिप्रायमुपलभ्य पृथक् पृथक् ।
समस्तानां च कार्येषु विदध्याद्धितमात्मनः ॥ मनुस्मृति ७–५७

असहाय, मूर्ख, अनुभवहीन, व विषयासक्त व्यक्तीला राजधर्म सुव्यवस्थित पाळतां येणें कधींही शक्य नाहीं. पवित्र, सत्यसंध, यथाशास्त्र वागणारा, बुद्धिमान, व साहाय्यसंपन्न असा राजाच शासनयंत्र नीट चालवूं शकतो. अत्यंत सुलभ कामें देखील असहाय अशा एकटया व्यक्तीला दुष्कर होऊन बसतात. मग राज्य तर फारच भव्य गोष्ट आहे. मंत्र्यासहित राज्यव्यवहार, संधिविग्रह, स्थान, उत्कर्ष, गुप्तता कशी राखावी, नि मिळेल तें पचनीं कसें पाडावें याचें उत्कृष्ट प्रकारें चिंतन करावें. स्वतःला उत्कृष्ट विचार करतां येत असला आणि केवढेंही कौशल्य अंगीं असलें तरी मंत्र्याविरहित एकटया राजानें कधींही कोणतीही गोष्ट ठरवूं नये. सभ्य, अधिकारी, प्रजा नि सभासद यांच्याच मतानुसार बुद्धिमान राजांनींही वागावें. कधींही आपल्या मतानुसार वागूं नये. स्वतंत्र वागणारा राजा स्वतःवर अनर्थ ओढवून घेतो. प्रजा त्याला दुरावतात व त्याच्या राष्ट्राचे तुकडे तुकडे उडतात. त्यांचे विचार घेतांना एकेकटया मंत्र्याचे व सर्वांचे मिळून घ्यावेत. महाभारतांत मंत्रिसंस्थेचें महत्त्व अतिशय वर्णन केलेलें आहे. मंत्री कसे असावेत याचें वर्णन करतांना महाभारत म्हणतें :–

कुलीनान् शीलसंपन्नानिङ्गितज्ञाननिष्ठुरान् ।
देशकालविधानज्ञान् भर्तृकार्यहितैषिणः ॥ ८
नित्यमर्थेषु सर्वेषु राजा कुर्वीत मन्त्रिणः ।
अर्थमानार्घसत्कारैर्भोगैरुच्चावचैः प्रियैः ॥ ९

संबन्धिपुरुषैः सर्वैरभिजातैः स्वदेशजैः ।
अहार्यैरव्यभीचारैः सर्वशः सुपरीक्षितैः ।। १९
योनाः श्रौतास्तथा मौलास्तथैवाप्यनहंकृताः ।
कर्तव्या भूतिकामेन पुरुषेण बुभूषता ।। २०
एषां वैनायिकी बुद्धिः प्रकृतिश्चैव शोभना ।
तेजो धैर्यं क्षमा शौचमनुरागः स्थितिर्धृतिः ।। २१
परीक्ष्य च गुणांन्नित्यं प्रौढभावान्धुरंधरान ।
पञ्चोपधा व्यतीतांश्च कुर्याद्राजाऽर्थकारिणः ।। २२
पर्याप्तवचनान्वीरान्प्रतिपत्तिविशारदान् ।
कुलीनान्सत्त्वसंपन्नानिङ्गितज्ञाननिष्ठुरान् ।। २३
देशकालविधानज्ञान्भर्तृकार्यहितैषिणः ।
नित्यमर्थेषु सर्वेषु राजन्कुर्वीत मन्त्रिणः ।। २४
धर्मार्थकामज्ञमुपेत्य पृच्छेद्युक्तो गुरुं ब्राह्मणमुत्तरार्थम् ।
निष्ठा कृता तेन यदा सह स्यात्तं मन्त्रमार्गं प्रणयेदसक्तः ।। ५४

—महाभारत, शांतिपर्व अ. ८३

"कुलीन, शीलसंपन्न, अभिप्राय ओळखणारे, देशकालादिकांचें ज्ञान असणारे, आणि आपल्या धन्याचें कार्य नि हित व्हावें अशी इच्छा करणारे, अशा प्रकारचे अमात्य राजानें सर्व प्रकारच्या राज्यव्यवहारासाठीं अवश्य करावे. आपल्या देशांत असलेल्या संबंधी, कुलीन, व्यभिचारी निष्ठा नसलेल्या, पैसे देऊन ज्यांना फोडतां येणार नाहीं अशा सर्व दृष्टींनीं परीक्षा केलेल्या, तरुण, उत्साही, ज्ञानसंपन्न, परंपरागत मोठमोठीं कामें करीत आलेल्या अशाच लोकांना मंत्रिपदावर नेमावें. ज्यांचे संस्कार चांगले आहेत, ज्यांची वाणी सत्यनिष्ठ पण मृदु आहे, शत्रूंचा पराभव करण्यासारखा ज्यांचा पराक्रम आहे, भयानक आपत्तींतही ज्यांचें धैर्य टिकून राहूं शकतें, मोठा अपराध केला तरी राष्ट्रकल्याणाच्या दृष्टीनें राज्ययंत्राला क्षम करण्यासारखें ज्यांचें सामर्थ्य आहे, ज्यांचें आपल्या प्रभूवर अत्यंत प्रेम आहे असे मंत्री राजानें करावे. मंत्र्यांशीं विचारविनिमय केल्यानंतर धर्म, काम नि अर्थ यांच्यांत अत्यंत कुशल असलेल्या गुरूकडे जाऊन

राजानें त्यांचा सल्ला विचारावा व तो सांगेल त्याप्रमाणें आचरण करावें. या शेवटच्या उल्लेखावरून तपस्वी संस्थेचें नियंत्रण मंत्रि-संस्थेपेक्षां अधिक सामर्थ्यवान् होतें हें स्पष्ट दिसतें.

## मंत्र्यांची संख्या

मंत्र्यांची संख्या किती असावी आणि राजानें विचारविनिमय करावयाचा तो तरी किती जणांसहित करावा या प्रश्नाचा विचार भारतीय राज्यशास्त्रांत सूक्ष्मतेनें केलेला आहे. कौटिल्यानें इंद्राच्या सहस्रनेत्रांचा अर्थ लावीत असतां असें म्हटलें आहे कीं,

" इंद्रस्य हि मंत्रपरिषद् ऋषीणां सहस्रम् । स तच्चक्षुः । तस्मादिमं द्व्यक्षं सहस्राक्षमाहुः ॥ " ( कौटिलीय अर्थशास्त्र अ. १५ )

इंद्राची मंत्रिपरिषद सहस्र लोकांची होती म्हणून तो दोन डोळ्यांचा असतांनादेखील त्याला सहस्राक्ष असें म्हटलें आहे. मंत्र्यांची संख्या आठ ही रूढ असल्याचें आपल्याला पुष्कळ ठिकाणीं आढळून येतें. हिंदुराज्यपद्धति म्हणजे अष्टप्रधान संस्थेचीच असली पाहिजे असा जणू कांहीं संकेतच ठरलेला आहे. भारतीय राज्य-शास्त्रांत यासंबंधानें अमूक इतकीच संख्या असली पाहिजे असा कांहीं निश्चित नियम नाहीं. काय वाटेल तें झालें तरी तीनपेक्षां मंत्र्यांची संख्या कमी असू नये, असें महाभारताचें मत आहे.

> **तस्मात्सर्वैर्गुणैरेतैरुपपन्नाः सुपूजिताः ।**
> **मन्त्रिणः प्रकृतिज्ञाः स्युस्त्र्यवरा महदीप्सवः ॥ ४७**
>
> —महाभारत, शांतिपर्व अ. ८३

सर्व गुणांनीं युक्त असलेले मंत्री पांच जर न मिळाले तर तीन तरी असावेतच असें महाभारताचा सुविख्यात टीकाकार नीलकंठ म्हणतो. मंत्र्यांची संख्या एक किंवा दोन न असतां तीन तरी कां असली पाहिजे याचें स्पष्टीकरण करतांना कौटिल्य म्हणतोः—

एको मन्त्री न कर्तव्यः । एको निरवग्रहश्चरति मुह्यति च कार्यकृच्छ्रेषु । द्वावपि मंत्रिणौ न कर्तव्यौ, तौ संहतौ चरन्तौ भक्षयन्तौ गृहीतौ च विनाशयतः । अतः पञ्च सप्त वा मंत्रिणः कार्याः ॥

एक मंत्री कधींही करूं नये. कारण तो एकतर लहरीनुसार तरी कामें करूं लागतो किंवा कठीण प्रसंगीं त्यालाच कांहीं न सुचतां मोह उत्पन्न होण्याचा संभव असतो. दोन मंत्रीही करूं नयेत. कारण ते परस्परांत एकी करून आपली तुंबडी भरण्याचा उद्योग सुरू करतात व तें राजाच्या ध्यानांत आलें कीं सत्तेचाच नायनाट करतात. तीन, पांच, किंवा सात मंत्री करावेत. या मंत्र्यांनीं राजसंस्थेचें नेहमीं नियंत्रण केलें पाहिजे. महाभारतानें असें म्हटलें आहे कीं:–

**परतंत्रः सदा राजा कुतो राज्ञः स्वतंत्रता ।**
**मंत्रे चामात्यसहिते कुतस्तस्य स्वतंत्रता ॥**

राजा नेहमीं परतंत्र असतो. त्याला स्वातंत्र्य कोठलें ? अमात्यासहित राजानें विचार करावयास पाहिजे असल्यामुळें त्याला स्वातंत्र्य असूंच शकत नाहीं.

शुक्रनीतींत तर असें सांगितलें आहे कीं——

**रोधनं न भवेत्तस्माद्राज्ञस्ते स्युः सुमंत्रिणः ॥**
**न बिभेति नृपो येभ्यस्तैः स्यात्किं राज्यवर्धनम् ।**
**यथालङ्कारवस्त्राद्यैः स्त्रियो भूष्यास्तथा हि ते ॥**

(कौटिल्य)

जर मंत्री अकार्यापासून राजाला अडवून त्याचें नियंत्रण करणार नाहींत तर त्यांना चांगले मंत्री म्हणतां येणार नाहीं. जे मंत्री राजानें अकार्य करूं नये म्हणून त्याच्या अंतःकरणांत स्वतःबद्दलचा धाक उत्पन्न करणार नाहींत ते राज्य काय वाढवूं शकतील ? अलंकारादिकांनीं भूषविलेल्या स्त्रिया व असे मंत्री यांची योग्यता सारखीच आहे.

या मंत्रिसंस्थेपेक्षांही राजाचें सर्वश्रेष्ठ नियंत्रण म्हणजे धर्म होय. राजानें काम करतांना नेहमीं धर्मशास्त्रानुसारच केलें पाहिजे असें स्पष्ट म्हटलें आहे. राजदण्ड धर्मसंरक्षणार्थच निघालेला आहे असें महाभारतांत सर्व जगताचा आद्य राजा जो पृथु त्याला ज्यावेळीं राजदण्ड महर्षींनीं दिला त्यावेळीं " नियतो यत्र धर्मो वै तमशंकः समाचर " म्हणजे "ठरलेल्या धर्मानुसारच तूं वाग" असें

स्पष्ट म्हटलेलें आहे. धर्म हा राजांचाही राजा आहे असें मनूनें म्हटलेलें असून राजानें 'धर्मशास्त्रानुसारेण' वागावें असें शुक्रनीतींत स्पष्ट शब्दांत सांगितलेलें आहे. अभारतीय राज्यतंत्राप्रमाणें भारतांतील राजा विधींच्या (कायद्यांच्या) अतीत नाहीं. तो विधान (कायदे) निर्माण करण्यासाठीं उपन्न झालेला नसून ते पूर्वींच रागद्वेषहीन तपस्व्यांनीं जसे निर्माण केले असतील तसे व्यवहारांत आणण्यासाठीं निर्माण झाला आहे. किंबहुना राजाच काय, पण या सर्वच राज्यसंस्था धर्मनियंत्रित आहेत, नि धर्माचें नियंत्रण सर्व समाज आणि व्यक्ति यांच्या जीवनावर सदाचें आहे. तात्पर्य भारतीय राज्यसंस्था ही इतक्या नियंत्रणांनीं युक्त आहे. त्या राज्यसंस्थेची कांहीं व्यावहारिक वैशिष्टयें विचार करण्यासारखीं आहेत. 'King does no wrong' ही प्रवृत्ति तर बाजूसच राहिली, पण येथें राजा नुसता नियंत्रितच नसून तो जर धर्मशास्त्रानुसार राज्यकारभार चालवीत नसेल तर इतर सामान्य अपराध्याप्रमाणें त्यालाही अपराधी समजण्यांत येई. इतकेंच नव्हें तर सामान्य अपराध्याला जेथें एकपट दंड सांगितला तेथें राजाला त्याच्या अपराधास्तव सहस्रपट अधिक दंड करावा असें स्पष्ट म्हटलें आहे. मनु म्हणतो:---

> **कार्षापणं भवेत् दण्डचो यत्रान्यः प्राकृतो जनः ।**
> **तत्र राजा भवेत् दण्डचः सहस्रमिति धारणा ।।** ३३६
>
> मनु. अ. ८

सामान्य मनुष्याला जेथें एकपट दण्ड असेल तेथें राजाला एक सहस्र कार्षापण (त्या वेळचें नाणें) दंड करावा. विधि (कायदा) व त्याचें विधान (अंमलबजावणी) हीं दोन भारतीय राज्यसंस्थेंत पृथक् खातीं होतीं. नियम सांगणारे व निर्णय करणारे हे धर्मशास्त्र पंडित नि ब्राह्मण राहात. त्यांनाही संशय उत्पन्न झाला तर ते महान् तपस्व्यांना विचारीत. तसे कोणी न आढळले तर बहुमतानुसार निर्णय होई. आणि प्रत्यक्ष दंडविधान राजाज्ञेवरून अथवा क्षत्रिय अधिकाऱ्यांच्या हातूनही होत असे. आज जो विधि (Law) व

विधान ( Administration ) यांच्या बाबतींत नेहमींच प्रश्न उत्पन्न होतो त्याचें महाभारतानुसार हें उत्तर आहे.

## करपद्धति ( Taxation )

महाभारताप्रमाणें व भारतीयांच्या राज्यशास्त्राप्रमाणेंही राजा हा धर्म आणि प्रजा यांचा सेवक असून त्याचें वेतन म्हणजे लोकांच्या उत्पन्नापैकीं सहावा हिस्सा असेंच मानलेलें आहे.

**बलिषष्ठेन शुल्केन दण्डेनाथापराधिनाम् ।**
**शास्त्रनीतेन लिप्सेथाः वेतनेन धनागरम् ॥**

असें या बाबतींत स्पष्ट म्हटलेलें आहे. अपराध्यांना देण्यांत येणारा दंड आणि बलिषष्ठ हेंच राजाचें वेतन होय. या बाबतींत महाभारतामध्यें अशा स्पष्ट सूचना दिलेल्या आहेत कीं, नोच्छिद्यादात्मनो मूलं परेषां चापि तृष्णया । (शांतिपर्व ८८·१८) म्हणजे आपण आणि दुसरे लोक यांचीं मुळेंच उखडून जातील असें कधींही वागूं नये. तृष्णेला देखील मर्यादा आहे. "प्रद्विष्यन्ति परिख्यातं राजानमतिखादिनम् ।" (शांतिपर्व, ८८-१९) अतिशय खादाड असलेला राजा हा सर्व लोकांचा द्वेष्य होतो. कोशाचें बळ महाभारतकारांना माहीत असूनही कर लोकांवर लादण्याच्या बाबतींत महाभारतकारांनीं दिलेले इषारे आजच्याही राज्यसंस्थांनीं ध्यानांत घेण्यासारखे आहेत. राज्ययंत्र निवळ कोशसंग्रहासाठींच वापरणाऱ्या लोकांच्या बाबतींत महाभारतकार पुढीलप्रमाणें इषारा देतातः—

**कामक्रोधौ पुरस्कृत्य योऽर्थं राजाऽनुतिष्ठति**
**न स धर्मं न चाप्यर्थं प्रतिगृह्णाति बालिशः ॥ ७**
**मास्म लुब्धांश्च मूर्खांश्च कामार्थे च प्रयूयुज ।**
**अलुब्धान्बुद्धिसम्पन्नान्सर्वकर्मसु योजयेत् ॥ ८**
**मूर्खो ह्यधिकृतोऽर्थेषु कार्याणामविशारदः ।**
**प्रजाः क्लिश्नात्ययोगेन कामक्रोधसमन्वितः ॥ ९**
**बलिषष्ठेन शुल्केन दण्डेनाथापराधिनाम् ।**
**शास्त्रनीतेन लिप्सेथाः वेतनेन धनागरम् ॥ १०**
**दापयित्वा करं धर्म्यं राष्ट्रं नीत्वा यथाविधि ॥ ११**

अर्थशास्त्रपरो राजा धर्मार्थान्नाधिगच्छति ।
अस्थाने चास्य तद्वित्तं सर्वमेव विनश्यति ॥ १४
अर्थमूलोऽपि हिंसां च कुरुते स्वयमात्मनः ।
करैरशास्त्रदृष्टैर्हि मोहात्संपीडयन् प्रजाः ॥ १५
ऊधश्छिन्द्यात्तु यो धेन्वा क्षीरार्थी न लभेत्पयः ।
एवं राष्ट्रमयोगेन पीडितं न विवर्धते ॥ १६
यो हि दोग्ध्रीमुपास्ते च स नित्यं विन्दते पयः ।
एवं राष्ट्रमुपायेन भुञ्जानो लभते फलम् ॥ १७
अथ राष्ट्रमुपायेन भुज्यमानं सुरक्षितम् ।
जनयत्यतुलां नित्यं कोशवृद्धिं युधिष्ठिर ॥ १८

-- महाभारत, शांतिपर्व अ. ७१

प्रद्विषन्ति परिख्यातं राजानमतिखादिनम् ॥ १९
प्रद्विष्टस्य कुतः श्रेयो न प्रियो लभते फलम् ।
वत्सौपम्येन दोग्धव्यं राष्ट्रमक्षीणबुद्धिना ॥ २०
भृतो वत्सो जातबलः पीडां सहति भारत ।
न कर्म कुरुते वत्सो भृशं दुग्धो युधिष्ठिर ॥ २१
राष्ट्रमप्यतिदुग्धं हि न कर्म कुरुते महत् ।
यो राष्ट्रमनुगृह्णाति परिरक्षन्स्वयं नृपः ॥ २२

--महाभारत, शांतिपर्व अध्याय ८७

मधुदोहं दुहेद्राष्ट्रं भ्रमरा इव पादपम् ।
वत्सापेक्षी दुहेच्चैव स्तनांश्च न विकुट्टयेत् ॥ ४
जलौकावत्पिबेद्राष्ट्रं मृदुनैव नराधिपः ।
व्याघ्रीव च हरेत्पुत्रान्संदशेन्न च पीडयेत् ॥ ५
यथा शल्यकवानाखुः पदं धूनयते सदा ।
अतीक्ष्णेनाभ्युपायेन तथा राष्ट्रं समापिबेत् ॥ ६
अल्पेनाल्पेन देयेन वर्धमानं प्रदापयेत् ।
ततो भूयस्ततो भूयः क्रमवृद्धिं समापिबेत् ॥ ७
दमयन्निव दम्यानि शश्वद्भारं विवर्धयेत् ।
मृदुपूर्वं प्रयत्नेन पाशानभ्यवहारयेत् ॥ ८

सकृत्पाशावकीर्णास्ते न भविष्यन्ति दुर्दमाः ।
उचितेनैव भोक्तव्यास्ते भविष्यन्ति यत्नतः ॥ ९
न चास्थाने न चाकाले करांस्तेभ्यो निपातयेत् ।
आनुपूर्व्येण सान्त्वेन यथाकालं यथाविधि ॥ १२

महाभारत, शांतिपर्व अध्याय ८८

अर्थ—कामक्रोधांच्या आहारीं जाऊन जो राजा आपलें राज्य चालवितो त्याला धर्म व अर्थ दोन्ही प्राप्त न होतां केवळ मूर्खपणा मात्र पदरीं येतो. मूर्ख आणि लोभी अधिकाऱ्यांचा अर्थकाम साधण्याच्या कामीं कधींही उपयोग करूं नय. जर या कामावर अशांची योजना केली तर कामें कशी करावीं हें त्यांना माहीत नसल्यामुळें कामक्रोधांच्या आहारीं जाऊन हे लोक शहाणपणाच्या अभावीं प्रजांना छळतात. लोभी नसलेल्या बुद्धिसंपन्न लोकांनाच कोणत्याही कामावर नियुक्त करावें. प्रजांच्या उत्पन्नापैकीं केवळ सहावा भाग, त्यांत कोणतीही लबाडी न करतां, राजानें घ्यावा. तसेंच अपराध्यांना देण्यांत येणाऱ्या दंडावरही राजांना अधिकार आहे. नीतीचा पुरस्कार करून प्रजेजवळून करभार घेऊनच राजानें आपला योगक्षेम चालविला पाहिजे. केवळ अर्थाच्या पाठीमागें लागलेल्या राजांचे धर्म व अर्थ नष्ट होतात. धनाचेंच महत्त्व एकदां उत्पन्न झालें म्हणजे वाटेल तसे कर प्रजांवर लादून शेवटीं राजेलोक आपलाच विनाश ओढवून घेत असतात. जो गाईचा स्तनभागच कापून घेईल त्याला जसें दूध मिळूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें जो राष्ट्र पिळून काढील त्याच्याही पदरांत कांहीं पडणार नाहीं. ज्याप्रमाणें गाईची शुश्रूषा करून नीट दूध काढणाऱ्यालाच लाभ होतो, त्याचप्रमाणें युक्तीनें, संरक्षण करून राष्ट्राजवळून धन घेणारांचीच कोशवृद्धि होत असते. प्रजा खादाड राजाचा द्वेष करतात. प्रजांकडून ज्याचा द्वेष होतो तो टिकणार कसा ? वत्साप्रमाणेंच राष्ट्राला राजानें पाहिलें पाहिजे. ज्याप्रमाणें व्यवस्थित राखलेला वत्स पीडा सहन करतो, त्याचप्रमाणें व्यवस्थित राखलेलेंच राष्ट्र संकटकालीं टिकाव धरूं शकतें. भ्रमर ज्याप्रमाणें झाडाला पीडा न देतां त्यांतील मध फक्त काढून घेतात

किंवा वत्साची अपेक्षा करणारा ज्याप्रमाणें स्तनांना पीडा न देतां दूध काढतो अथवा वाघीण ज्याप्रमाणें दातांत पिलांना धरूनही त्यांना दांत रुतूं देत नाहीं किंवा उंदीर ज्याप्रमाणें पाय कुरतडत असतांना आग होऊं देत नाहीं, त्याचप्रमाणें या बाबतींत राज्य-यंत्राचें वर्तन असलें पाहिजे. हळुहळू, लक्षांत न येतां कोश वाढ-वावा. अत्यंत मृदु असे उपाय त्यासंबंधीं योजावे. अकालीं नि अस्थानीं कर कधींही लादूं नये. योग्य कारण दाखवून नैतिकदृष्टया समर्थनीय व काळाच्या दृष्टीनें योग्य असेच कर पोटांतील पाणी-देखील हालूं न देतां वाढविले पाहिजेत.

## कोश कसा वाढवावा ?

राज्ययंत्राचें खरें बळ कोशच होय. ह्याची महाभारतकारांना पूर्ण कल्पना आहे. ते सांगतात:—

**‘ राज्ञः कोशक्षयादेव जायते बलसंक्षयः ॥ १२**

महाभारत, शांतिपर्व अ. १३०

राजाचा कोश नष्ट झाला कीं त्याचें बळ नष्ट होतें. किंबहुना भारतकार असें म्हणतात कीं:—

**राज्ञः कोशबलं मूलं कोशमूलं पुनर्बलम् ।**
**तन्मलं सर्वधर्माणां धर्ममूलाः पुनः प्रजाः ॥ ३५**
**नान्यानपीडयित्वेह कोशः शक्यः कुतो बलम् ।**
**तदर्थं पीडयित्वा च दोषं प्राप्तुं न सोऽर्हति ॥ ३६**

**शान्तिपर्व अ. १३०**

अर्थ :– “ कोश हेंच राज्याचें मूळ होय. कोश समृद्ध असेल तरच राष्ट्र सामर्थ्ययुक्त असतें. सैन्यही त्याच्याच भरंवशावर जगतें. तेंच सर्व धर्मांचें मूळ आहे व धर्म हाच प्रजांचा आधार होय. दुस-ऱ्यांना पीडा दिल्यावांचून कोश वाढणें शक्य नाहीं. कोश नाहीं म्हणजे बळही नाहीं. म्हणून कोशासाठीं लोकांना पीडा दिली तरी त्यासाठीं राजाला दोष देतां येणार नाहीं. पण कोणाला पीडा द्यावी व कोणावर अधिक कर बसवावे याचेही नियम ठरलेले होते. उदाहरणार्थ महाभारत यासंबंधीं म्हणतें :–

पानागारनिवेशाश्च वेश्याः प्रापणिकास्तथा ।
कुशीलवाः सकितवा ये चान्ये केचिदीदृशाः ।। १४

— महाभारत, शान्तिपर्व अ. ८८

मद्यपान गृहें, वेश्यागारें, कुंटिणखाने, विट, व द्यूतकार हे सर्व राष्ट्राचें धन अकारण शोषण करणारे असल्यामुळें त्यांच्यावर नानाप्रकारचे कर लादून व त्यांना दंड करून राजाला आपला कोश समृद्ध करावयास कांहींही अडचण नाहीं. असा एक उगाचच अपसमज पसरविण्यांत येतो कीं, ब्राह्मणांनीं करापासून स्वतःची सुटका करून घेतली असून त्यांना कर वा दंड द्यावा लागत नसे. पण हें निव्वळ चुकीचें आहे. जो अरण्यांत राहून षट्कर्मे करीत तपस्यामय, ज्ञानसंपन्न असें जीवन जगेल त्यालाच केवळ कर द्यावा लागत नसे. ब्राह्मणांतही मागें सांगितल्याप्रमाणें क्षत्रिय, वैश्य व शूद्र वृत्तीचे ब्राह्मण असत. त्यांच्याजवळून राजानें अवश्य कर घ्यावा. इतकेंच नव्हें तर त्यांना वेठीलाही धरावें असें महाभारताचें स्पष्ट मत आहे.

अश्रोत्रियाः सर्व एव सर्वे चानाहिताग्नयः ।
तान् सर्वान् धार्मिको राजा बलिं विष्टिंच कारयेत् ।। ५
आह्वायका देवलका नाक्षत्रा ग्रामयाजकाः ।
एते ब्राह्मणचाण्डाला महापथिकपञ्चमाः ।। ६
ऋत्विक् पुरोहितो मन्त्री दूतो वार्तानुकर्षकः ।
एते क्षत्रसमा राजन् ब्राह्मणानां भवन्त्युत ।। ७
अश्वारोहा गजारोहा रथिनोऽथ पदातयः ।
एते वैश्यसमा राजन् ब्राह्मणानां भवन्त्युत ।। ८
एतेभ्यो बलिमादद्याद्धीनकोशो महीपतिः ।
ऋते ब्रह्मसमेभ्यश्च देवकल्पेभ्य एव च ।। ९
अब्राह्मणानां वित्तस्य स्वामी राजेति वैदिकम् ।
ब्राह्मणानां च ये केचिद्विकर्मस्था भवन्त्युत ।। १०
विकर्मस्थाश्च नोपेक्ष्या विप्रा राज्ञा कथंचन ।
नियम्याः संविभज्याश्च धर्मानुग्रहकारणात् ।। ११

यस्य स्म विषये राजन्स्तेनो भवति वै द्विजः ।
राज्ञ एवापराधं तं मन्यन्ते तद्विदो जनः ।। १२
अवृत्त्या यो भवेत्स्तेनो वेदवित्स्नातकस्तथा ।
राजन्स राज्ञा भर्तव्य इति वेदविदो विदुः ।। १३
स चेन्नो परिवर्तेत कृतवृत्तिः परंतप ।
ततो निर्वासनीयः स्यात्तस्माद्देशात्स बांधवः ।। १४

—महाभारत, शांतिपर्व अ. ७६

"जे ब्राह्मण श्रोत्रिय नसतील, अग्नींची उपासना करणारे नसतील त्या सर्वांना धार्मिक राजानें कर द्यावयास लावावें, इतकेंच नव्हें तर वेठीला धरून कामालाही लावावें. देवविषयक कामें पैसे घेऊन करणारे ब्राह्मण हे चांडाळ होत. ऋत्विज, पुरोहित, मंत्री, दूत, बातम्या सांगणारे हे ब्राह्मणांतील क्षत्रिय होत. अश्वावर बसणारे, गजावर आरोहण करणारे रथी व पदाती हें ब्राह्मणांमधील वैश्यासारखे होत. राजानें विशेषतः हीन कोश राजानें यांच्याजवळून करभार घ्यावा. जे देवतुल्य व ब्रह्मतुल्य ब्राह्मण असतील, केवळ त्यांच्याजवळूनच करभार घेऊं नये. अब्राह्मणाच्या वित्ताचा राजा स्वामी आहे याचा खरा अर्थ हाच आहे. ब्राह्मणांपैकीं जे आपला वर्णधर्म सोडून दुसऱ्या वर्णधर्मानुसार वागणारे असतील त्यांची राजानें कधींही उपेक्षा करूं नये. त्यांचें नियमन करावें व त्यांना नीट मार्गावर आणून धर्माचें संरक्षण करावें. ज्याच्या राज्यांत ब्राह्मण चोर होईल तो त्या राजाचाच अपराध होय असें मानतात. वेदवेत्त्या व व्रतस्थ ब्राह्मणाला जर उपजीवन नसेल आणि म्हणून जर तो चोरी करीत असेल तर राजानें त्याचें पोषण करावें. त्याच्या उपजीवनाची व्यवस्था करूनही जर तो आपलें दुर्वर्तन सोडीत नसेल तर त्याला त्याच्या संबंधी परिवारासहित देशाबाहेर हांकलून लावावें.

## उपजीवन व राज्यसंस्था

हिंदु राज्यसंस्था ही उपजीवनाचा विचार अतिशय बारकाईनें व शास्त्रशुद्ध रीतीनें करीत असे. धर्म व संस्कृतीच्या वेली भुकेच्या

आगीनें करपून जातात म्हणून उपजीवन हें धर्म व संस्कृतीच्या संरक्षणाचें एक अत्यंत महत्त्वाचें अंग आहे याची त्यांना पूर्ण कल्पना होती. म्हणून त्याच्यासंबंधीं जितकें अधिक शास्त्रशुद्ध नियमन करतां येईल तितका प्रयत्न करण्यांत आलेला आहे. राजकर्तव्यांत शेती, उद्योगधंदे, कला व व्यापार या सर्वांच्याच उत्तेजनाविषयीं दक्षता घ्यावयास वारंवार सांगितलें आहे. 'पालन' हा शब्द राजसंस्थेचा आत्मा म्हणूनच वारंवार येतो. सामाजिक व आर्थिक प्रश्न राजकर्तव्याचें प्रथम श्रेणीचें कर्तव्य म्हणून मानले जात. सर्व वर्णांच्या, जातींच्या आणि वर्गांच्या लोकांच्या उपजीवनाच्या व्यवसायांना समृद्ध करण्यासाठीं त्याच्या आड जे जे येतील त्यांना कठोर शिक्षा सांगितलेल्या आहेत. एका वर्गानें दुसऱ्या वर्गाच्या उपजीवनाच्या व्यवसायांत हस्तक्षेप न करण्यासंबंधींची दक्षता घेण्यांत आलेली आहे. वार्ताशास्त्र अथवा उत्पादनाच्या विविध विभागांचें शास्त्र अत्यंत महत्त्वाचें म्हणून मानण्यांत येऊन महाभारताच्या शांतिपर्वांत तर वेदत्रयी म्हणजे कर्मकांड व आन्विक्षिकी म्हणजे अध्यात्म यांच्याबरोबरीनें वार्तेला अथवा महाभारताच्याच शब्दांत सांगावयाचें तर जीविकाकांडाला अत्यंत महत्त्वाचें स्थान देण्यांत आलें आहे.

**त्रयी चान्विक्षिकी चैव वार्ता च भरतर्षभ**
**दण्डनीतिश्च विपुला विद्यास्तत्र निर्दशिताः ।।**

—महाभारत, शान्तिपर्व अ. ५९

वार्तेचें महत्त्व महाभारतानें 'वार्तामूलो ह्ययं लोको, (शान्तिपर्व अ. ६८·३५) कृषिगोरक्ष वाणिज्यं लोकानामिह जीवनम् (शान्तिपर्व अ. ८९·७) अशा शब्दांनीं दिग्दर्शित केलें आहे. भारताच्या वनपर्वांत तर या जीवनशास्त्राचें महत्त्व वर्णन करतांना हनुमंतांनीं चातुर्वर्ण्यात्मक समाजरचनेचें धारणपोषण वार्तेच्या भरंवशावर होतें असें स्पष्टपणें म्हटलें आहे. जो राजा या उपजीवनाकडे लक्ष देणार नाहीं त्याला बलिषड्भागतस्कर म्हटलें असून राजाचें रोजचें कर्तव्य म्हणून या बाबीकडे राजानें लक्ष दिलें पाहिजे असें प्रतिपादन केलें आहे. या बाबतींत महाभारतानें एक अतिशय उत्कृष्ट उपमा वापरली आहे. महाभारत म्हणते :—

**भवितव्यं सदा राज्ञा गर्भिणीसहधर्मिणा । ४४**

—महाभारत, शान्तिपर्व अ. ५६.

ज्याप्रमाणें गरोदर स्त्री आपल्या मुलाच्या रक्षणावांचून दुसऱ्या कशाचाही विचार करूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें राजानेंही प्रजेच्या उपजीवनाशिवाय स्वतःविषयींच्या दुसऱ्या कोणत्याही विचारास आपल्या मनांत स्थान देऊं नये. इतकेंच नव्हें तर भारतपुढें म्हणते :—

**मा ते राष्ट्रे याचनकाऽभूवन्मा चापि दस्यवः ।**
**एषां दातार एवैते नैते भूतस्य भावकाः ॥**

तुझ्या राष्ट्रांत याचक उत्पन्न होऊं नयेत व चोरही उत्पन्न होऊं नयेत. किंबहुना या आपल्या कर्तव्याला चुकणाऱ्या राज्ययंत्राविषयीं भारतानें अत्यंत तिरस्कार प्रकट केला आहे.

## लोक सम्राटसुद्धां निवडीत

अशा या सुनियंत्रित व प्रजांनींच निर्माण केलेल्या राज्ययंत्रांत 'सम्राट' देखील निवडीत असें दिसतें. सर्वसामान्य लोक हे ज्याप्रमाणें राजाचे प्रजाजन, त्याचप्रमाणें सर्व राजे हे सम्राटाचे प्रजाजन असत. आपल्यापैकीं एकेकटयाला गांठून दस्यूंनीं आपला पराजय करूं नये म्हणून सम्राट म्हणून आपल्याचपैकीं जो सर्वांत अधिक गुणसंपन्न असेल त्याला निवडण्याची प्रथा होती. साम्राज्यही याप्रमाणें लोकमतानुवर्ती व लोकांच्या आवश्यकतेंतूनच निर्माण झालेली बाब होती. महाभारताच्या आदिपर्वांत शंतनूला याच पद्धतीतें सम्राट् केल्याचें वर्णन आहे तें पुढीलप्रमाणें :—

**न चास्य सदृशः कश्चिद्धर्मतः पार्थिवोऽभवत् ॥ ६**
**वर्तमानं हि धर्मेषु सर्वधर्मभृतां वरम् ।**
**तं महीपा महीपालं राजराज्येऽभ्यषेचयन् ॥ ७**
**वीतशोकभयाबाधाः सुखस्वप्ननिबोधनाः ।**
**पतिं भारतगोप्तारं समपद्यन्त भूमिपाः ॥ ८**

—महाभारत, आदिपर्व अ. १००

शंतनूसारखा त्यावेळीं कोणीही धर्मनिष्ठ राजा नव्हता. तो सर्व धार्मिकांमध्यें अत्यंत श्रेष्ठ असल्यामुळें सर्व राजांनीं एकत्र जमून

त्याला साम्राज्यपदाचा अभिषेक केला आणि अखिल भारतवर्षाच्या त्या महान् सम्राटाच्या साम्राज्यांत शोक, भय इत्यादिकांची बाधा नाहींशी होऊन सर्व राजे आनंदाचीं सुखस्वप्नें पहात नांदू लागले. या पद्धतीनें चंद्रसूर्य वंशांच्या साम्राज्याखालीं नांदण्याची प्रथाच भारतवर्षांत पडलेली होती. महाभारताच्या सभापर्वाच्या १४ व्या अध्यायांत भगवान् श्रीकृष्णांनीं स्वतःच या कथेचा उल्लेख केलेला आहे. ते म्हणतात :—

ऐलस्येक्ष्वाकुवंशस्य प्रकृतिं परिचक्षते ।
राजानः श्रेणिबद्धाश्च तथान्ये क्षत्रिया भुवि ।। ४

—महाभारत, सभापर्व अ. १४

ऐल आणि इक्ष्वाकु या दोन राजवंशांचे भारतांतील सर्व क्षत्रिय व राजे हे प्रजाजनच होत.

## राजा वध्य आहे कीं नाहीं ?

याप्रमाणें राजा व त्याचीं नियंत्रणें नि त्या संस्थेचें स्वरूप महाभारतांत वर्णिलें आहे. राज्यसंस्थेचें हें स्वरूप कलंकित करणाऱ्या, स्वार्थी ठरलेल्या, व केवळ स्वतःच्या लहरीनुसार राज्य करूं इच्छिणाऱ्या सुलतानाला राज्यावर तर बसण्याचा अधिकार नाहींच नाहीं पण जिवंतही राहण्याचा अधिकार नाहीं असें महाभारतांत स्पष्ट म्हटलें आहे. इतकेंच नव्हें तर अशा राजांना राजकलि म्हणून ठार मारल्याचीं उदाहरणेंही आहेत. वेन राजाला ऋषींनीं याच कारणास्तव ठार मारलें असें महाभारताच्या शांतिपर्वांत म्हटलें आहे.

तं प्रजासु विधर्माणं रागद्वेषवशानुगम् ।
मन्त्रभूतैः कुशैर्जघ्नुर्ऋषयो ब्रह्मवादिनः ।। ९४ —शान्तिपर्व अ. ५९.

प्रजांच्या बाबतींत धर्मानुसार न वागणाऱ्या व रागद्वेषादि विकारांना बळी पडून आपल्या लहरीनुसार वागणाऱ्या वेनाला ब्रह्मवादी ऋषींनीं मंत्रभूत कुशांनीं ठार मारलें. महाभारताच्या उद्योगपर्वांत अशा चौदा कुलांगार राजकलींची यादीच दिलेली आहे.

हैहयानां मुदावर्तो नीपानां जनमेजयः ।
बहुलस्तालजङ्घानां कृमीणामुद्धतो वसुः ।। १३
अजबिन्दुः सुवीराणां सुराष्ट्राणां रुषर्द्धिकः ।
अर्कजश्च बलीहानां चीनानां धौतमूलकः ।। १४
हयग्रीवो विदेहानां वरयुश्च महौजसाम् ।
बाहुः सुन्दरवंशानां दीप्ताक्षाणां पुरूरवाः ।। १५
सहजश्चेदिमत्स्यानां प्रवीराणां वृषध्वजः ।
धारणश्चन्द्रवत्सानां मुकुटानां विगाहनः ।। १६
शमश्च नन्दिवेगानामित्येते कुलपांसनाः ।
युगान्ते कृष्णसम्भूताः कुले कुपुरुषाधमाः ।। १७

—महाभारत, उदयोगपर्व अ. ७४

राजा वध्य केव्हां होतो हें सांगतांना महाभारताच्या शांतिपर्वांत "असत्पापिष्ठसचिवो वध्यो लोकस्य धर्मः ।" दुष्ट व पापी असे ज्याचे मन्त्री असतात, असा धर्मनाश करणारा राजा हा प्रजांच्या दृष्टीनें वध्य होतो असें सांगितलेलें असून अनुशासन पर्वाच्या ६१ व्या अध्यायांत त्याचें पुढीलप्रमाणें विस्तृत वर्णन आहे :—

धिक् तस्य जीवितं राज्ञो राष्ट्रे यस्यावसीदति ।
द्विजोऽन्यो वा मनुष्योऽपि शिबिराह वचो यथा ।। २९
यस्य स्म विषये राज्ञः स्नातकः सीदति क्षुधा ।
अवृद्धिमेति तद्राष्ट्रं विन्दते सहराजकम् ।। ३०
क्रोशन्त्यो यस्य वै राष्ट्राद् ध्रियन्ते तरसा स्त्रियः ।
क्रोशतां पतिपुत्राणां मृतोऽसौ न च जीवति ।। ३१
अरक्षितारं हर्तारं विलोप्तारमनायकम् ।
तं वै राजकलिं हन्युः प्रजाः संनह्य निर्घृणम् ।। ३२
अहं वो रक्षितेत्युक्त्वा यो न रक्षति भूमिपः ।
स संहत्य निहंतव्यः श्वेव सोन्माद आतुरः ।

——महाभारत, अनुशासनपर्व अ. ६१

ज्याच्या राज्यांत द्विज अथवा कोणत्याही वर्णाचा मनुष्य कष्ट पावतो, त्या राजाच्या जीविताला धिक्कार असो. ज्याच्या राष्ट्रांत

तपस्वी व्रतस्थांना अन्न न मिळून ते भुकेच्या आगीनें होरपळून निघतात तें राष्ट्र समृद्ध तर होत नाहींच, पण राज्ययंत्रासहित विनाश पावतें. ज्या राष्ट्रांतून पति–पुत्र हे असहाय होऊन रडत असतांना बलात्कारानें स्त्रियांचें, त्या रडत ओरडत असलेल्या स्थितींत, अपहरण होतें त्या राज्ययंत्राचा सूत्रचालक हा जिवंत नसून मेलेला आहे व तें एक जिवंत प्रेत आहे असें समजावें. संरक्षण न करणाऱ्या, लुबाडणाऱ्या, उपजीवन नष्ट करणाऱ्या, व राज्यसंस्थेचीं कोणतींही नियंत्रणें न मानणाऱ्या राजाला प्रजांनीं राजकलि समजून संघटितरीत्या निर्घृणपणें कसलीही दयामाया न ठेवतां ठार मारावें. मी तुमचें संरक्षण करीन असें सांगूनही जो राजा आपल्या प्रजांचें संरक्षण करीत नाहीं त्याला सर्वांनीं मिळून संघटितपणें पिसाळलेल्या व मरणपंथास लागलेल्या कुत्र्याप्रमाणें ठार मारावें. महाभारतकाळीं केवळ राज्येंच होतीं व राजा नसलेली राज्यव्यवस्था नव्हती असें नाहीं. वैदिककाळापासूनच भारतवर्षांत गणराज्यें (Republics) असल्याचा उल्लेख येतो. इतकेंच नव्हे, तर या गणराज्यांच्या प्रतापानेंच अलेक्झांडरला अखेरीस हिंदुस्थान सोडून जाण्याची पाळी आल्याचा स्पष्ट उल्लेख इतिहासांत सांपडतो. हीं गणराज्यें अत्यंत समृद्ध, संपन्न, व समर्थ असत. तीं अत्यंत सुव्यवस्थित चालत. ज्या भगवान् श्रीकृष्णांच्या कर्तृत्वाच्या वर्णनासाठीं वेदव्यासांच्या दिव्य प्रतिभेंतून श्रीमन्महाभारताची निर्मिति झाली आहे त्या श्रीकृष्णांचें यादवांचें राज्य हें गणराज्य होतें. इतकेंच नव्हें तर त्या गणराज्यांत बभ्रु, उग्रसेन, व श्रीकृष्ण हे तीन लोकनियुक्त अध्यक्ष होते व लोकसभेंत त्यांचे कडाक्याचे वाद होत असत असें महाभारतावरून स्पष्ट दिसतें. गणराज्यें सुरक्षित व समर्थ कशीं होतात आणि त्यासाठीं कोणतें पथ्य सांभाळणें अत्यंत आवश्यक आहे याचेंही महाभारतांत उत्कृष्ट वर्णन आलेलें आहे. तें आपण पुढील व्याख्यानांत पाहूं.

# ८. राजसत्तेचा अधःपात

## गणराज्यें ( Republics )

महाभारताच्या शांतिपर्वांत सर्वसामान्य व्यक्तीला गणराज्य चालवितांना अडचणी काय येतात व त्यांचें निवारण कसें करावें याचें अत्यंत उत्कृष्ट वर्णन आलें आहे. तें पुढीलप्रमाणें:--

यथा गणाः प्रवर्धन्ते न भिद्यन्ते च भारत ।
अरींश्च विजिगीषन्ते सुहृदः प्राप्नुवन्ति च ।। ७
भेदमूलो विनाशो हि गणानामुपलक्षये ।
मंत्रसंवरणं दुःखं बहूनामिति मे मतिः ।। ८
एतदिच्छाम्यहं श्रोतुं निखिलेन परंतप ।
यथा च ते न भिद्येरंस्तच्च मे वद पार्थिव ।। ९

भीष्म उवाच--

गणानां च कुलानां च राज्ञां भरतसत्तम ।
वैरसंदीपनावेतौ लोभामर्षौ नराधिप ।। १०
लोभमेको हि वृणुते ततोऽमर्षमनन्तरम् ।
तौ क्षयव्ययसंयुक्तावन्योन्यं च विनाशिनौ ।। ११
चारमन्त्रबलादानैः सामदानविभेदनैः ।
क्षयव्ययभयोपायैः प्रकर्षन्तीतरेतरम ।। १२
तत्रादानेन भिद्यन्ते गणाः संघातवृत्तयः ।
भिन्ना विमनसः सर्वे गच्छन्त्यरिवशं भयात् ।। १३
भेदे गणा विनश्युर्हि भिन्नास्तु सुजयाः परैः ।
तस्मात्संघातयोगेन प्रयतेरन् गणाः सदा ।। १४
अर्थाश्चैवाधिगम्यन्ते संघातबलपौरुषैः ।
बाह्याश्च मैत्रीं कुर्वन्ति तेषु संघातवृत्तिषु ।। १५
ज्ञानवृद्धाः प्रशंसन्ति शुश्रूषन्तः परस्परम् ।

---

व्याख्यान ८ वें, दि. ३ एप्रिल १९५१

विनिवृत्ताभिसन्धानाः सुखमेधन्ति सर्वशः ॥ १६
धर्मिष्ठान् व्यवहारांश्च स्थापयन्तश्च शास्त्रतः ।
यथावत्प्रतिपश्यन्तो विवर्धन्ते गणोत्तमाः ॥ १७
पुत्रान्भ्रातॄन्निगृह्णन्तो विनयन्तश्च तान्सदा ।
विनीतांश्च प्रगृह्णन्तो विवर्धन्ते गणोत्तमाः ॥ १८
चारमन्त्रविधानेषु कोषसंनिचयेषु च ।
नित्ययुक्ता महाबाहो वर्धन्ते सर्वतो गणाः ॥ १९
प्राज्ञान्शूरान्महोत्साहान्कर्मसु स्थिरपौरुषान् ।
मानयन्तः सदा युक्ता विवर्धन्ते गणा नृप ॥ २०
द्रव्यवन्तश्च शूराश्च शस्त्रज्ञाः शास्त्रपारगाः ।
कृच्छ्रास्वापत्सु संमूढान् गणाः सन्तारयन्ति ते ॥ २१
क्रोधो भेदो भयं दण्डः कर्षणं निग्रहो वधः ।
नयत्यरिवशं सद्यो गणान्भरतसत्तम ॥ २२
तस्मान्मानयितव्यास्ते गणमुख्याः प्रधानतः ।
लोकयात्रा समायत्ता भूयसी तेषु पार्थिव ॥ २३
मन्त्रिगुप्तिः प्रधानेषु चारश्चामित्रकर्षण ।
न गणाः कृत्स्नशो मन्त्रं श्रोतुमर्हन्ति भारत ॥ २४
गणमुख्यैस्तु संभूय कार्यं गणहितं मिथः ।
पृथग्गणस्य भिन्नस्य विततस्य ततोऽन्यथा ॥ २५
अर्थाः प्रत्यवसीदन्ति तथाऽनर्था भवन्ति च ।
तेषामन्योन्यभिन्नानां स्वशक्तिमनुतिष्ठताम् ॥ २६
निग्रहः पण्डितैः कार्यः क्षिप्रमेव प्रधानतः ।
कुलेषु कलहा जाताः कुलवृद्धैरुपेक्षिताः ॥ २७
गोत्रस्य नाशं कुर्वन्ति गणभेदस्य कारकम् ।
आभ्यन्तरं भयं रक्ष्यमसारं बाह्यतो भयम् ॥ २८
आभ्यन्तरं भयं राजन् सद्यो मूलानि कृन्तति ।
अकस्मात्क्रोधमोहाभ्यां लोभाद्वापि स्वभावजात् ॥ २९
अन्योन्यं नाभिभाषन्ते तत्पराभवलक्षणम् ।
जात्या च सदृशाः सर्वे कुलेन सदृशास्तथा ॥ ३०

न चोद्योगेन बुद्ध्या वा रूपद्रव्येण वा पुनः ।
भेदाश्चैव प्रदानाच्च भिद्यन्ते रिपुभिर्गणाः ।। ३१
तस्मात्संघातमेवाहुर्गणानां शरणं महत् ।। ३२

—महाभारत, शांतिपर्व अ. १०७

म्हणजे संघराज्यें वाढतात कशीं ? शत्रूंना जिंकतात कशीं ? मित्र नि साहाय्यक मिळवितात कशीं ? व त्यांच्यांत परस्परांत भेद निर्माण कसा होतो? गणराज्यांचा नाश त्यांच्यांत होणाऱ्या फुटीवर अवलंबून आहे असें मला वाटतें. त्याचप्रमाणें त्यांच्यांत राज्याला अवश्यक ते महत्त्वाचे विचार गुप्त ठेवणेंही अशक्य होत असावें. कारण कीं, तें एकतंत्रात्मक नसून बहुतंत्रात्मक असल्यामुळें व त्यांच्यांतील सर्वच लोक समान अधिकारी असल्यामुळें मसलती गुप्त ठेवणें त्यांना शक्य होत नसावें. मला या बाबतींत आपलें प्रतिपादन ऐकण्याची इच्छा आहे. त्यावर भीष्म म्हणतात, "संघराज्यें व कुलराज्यें यांच्यांत परस्परांत लोभ व मत्सराच्या पोटीं जन्माला येणारा क्रोध हेच वैर उत्पन्न करतात व वाढवितात. प्रथम लोभ उत्पन्न होतो. त्याच्या-मागोमाग क्रोध उत्पन्न होतो व तेच गणांतील लोकांना एकमेकांचा नाश करावयास व त्यासाठीं हवें तें गमवावयास लावून दोन्ही स्पर्धाळू व्यक्तींचा नाश करतात. एकाच्या अंतःकरणांत लोभ व त्याच्या पाठोपाठ मत्सर उत्पन्न झाला कीं, तो हेर गुप्त मसलती व सैनिक सामर्थ्य यांचा उपयोग करून साम, दाम, भेद यांचाही भर-पूर प्रमाणांत उपयोग करून तसेंच नाश, व्यय व भय उत्पन्न कर-ण्याचा प्रयत्न करून आपल्या प्रतिपक्षाची छळणूक मांडतो. संघ-राज्यामध्यें हे प्रकार परस्परांविरुद्ध सुरू झाले कीं, फुटीरपणा कमालीचा वाढून समान ध्येयाच्या बाबतींत अथवा सांघिक कामाच्या बाबतींत ते परस्परांविषयीं उदासीन व एकमेकांपासून विलग होतात. त्यामुळें त्यांची संघशक्ति विलयास जाऊन आप-आपसांतच जीवितसंरक्षणासाठीं ते एकमेकांना भिऊं लागतात व शेवटीं शत्रूच्या हस्तगत होतात. गणांतलें सांघिक जीवन नष्ट होऊन ते फुटले कीं त्यांचा नाश ओढवलाच म्हणून समजावें. ते विलग झाले

कीं शत्रूचें भक्ष्य झालेच. म्हणून त्यांनीं नेहमीं आपलें संघजीवन मुळींच कसें फुटणार नाहीं याची पूर्णपणें काळजी घेतली पाहिजे. गणांतील सर्वच लोक सैनिक असतात त्यामुळें तें नेहमींच बलवान राष्ट्र असतें. सांघिक बळामुळें व सांघिक पराक्रमामुळें गणराज्य समृद्ध तर होतेंच, परंतु बाहेरचे लोक देखील त्यांच्याशीं मैत्री व सौहार्द उत्पन्न करण्याचा प्रयत्न करतात. चांगल्या गणराज्यांत जें ज्ञानवृद्ध लोक असतात ते सर्वांच्या अंतःकरणांतील संघजीवनांत विलीन होऊन जाण्याच्या व व्यक्तित्व उरूं न देण्याच्या वृत्तीला नेहमींच उत्तेजन देतात. परस्परांशीं आंतलें बाहेरचें कांहीं एक न ठेवतां ते परस्परांशीं शुद्ध व सरळ व्यवहार करतात व त्यामुळेंच गणराज्यांत सर्व प्रकारचें सुख नांदतें. गणराज्यांतील लोक धर्मं शास्त्रानुसार आपले व्यवहार चालवितात व विधिविधानें बनवितात म्हणूनच ते समृद्ध व सुखी जीवन जगू शकतात. एकमेकांशीं त्यांचें वागणें नेहमींच परस्परसहकार्याचें व कोणाचीही हानि न करणारें असतें. गणराज्यांत वरिष्ठ नेते आपल्या मुलांना व बंधूंना व सर्वच युवकांना शिस्तीनें कसें वागावें याचें सुव्यवस्थित शिक्षण देतात व हें शिक्षण परिपूर्ण होऊन तदनुसार उत्कृष्ट कौशल्य दाखविण्याची त्यांनीं खात्री उत्पन्न केली म्हणजेच त्यांजवर जबाबदारीचीं कामें सोंपविण्यांत येतात म्हणूनच गणराज्यें समृद्ध होतात. हेर खातें, मंत्रविधान, कोश वाढविण्याचें शास्त्र, या बाबतींत गणराज्यें नेहमीं दक्ष असलीं तर वाढतात. आपल्या प्राज्ञ, शूर, उत्साही, व स्वतःच्या कर्तव्यांत अत्यंत दक्ष असलेल्या अशा अधिकाऱ्यांना संघराज्यांत जोंवर मान व स्थान देण्याची प्रवृत्ति असते तोंवर गणराज्यें वाढतात. गणराज्यांतील श्रीमंत, शूर, शास्त्रज्ञ, शस्त्रधारणांत अत्यंत कुशल असलेले असे लोक आपत्तींत सांपडलेल्या आपल्या सहकाऱ्यांना संभाळून तारून नेण्याची वृत्ति जोंवर राखतात तोंवर गणराज्यें समृद्ध व समर्थ असतात. आपआपसांत क्रोध, भेद, भय, दण्ड, पिळवणूक, बंधन, व वध यांचें तांडव सुरू झालें कीं गणराज्यें विलय पावतात. म्हणून गणराज्याचा जो प्रमुख असेल व गणराज्याचे जे इतर

मुख्य असतील त्यांचा त्या राज्यांत नेहमींच सन्मान राखला गेला पाहिजे. गणांच्या मुख्य अशा अधिकाऱ्यांच्यामध्येंच मसलती चालतात. त्यांच्याबाहेर त्या कधींही जाऊं नयेत. संघराज्यांतील सर्वच नागरिकांना मसलती कधींही सांगत नसतात. मंत्रगुप्तीचा हा उत्कृष्ट उपाय होय. गणांतील मुख्यांनीं एकत्र येऊनच गणांच्या हिताचा विचार केला पाहिजे. फुटीरपणा उत्पन्न झाला कीं, प्रत्येक गणप्रमुख आपआपली शक्ति वेगवेगळी वाढवूं लागतो व त्यामुळें गण विनाश पावतात. ज्या ठिकाणीं अन्याय होईल तेथें गणांतील विचक्षण पुरुषांनीं ताबडतोब अपराध्यांना शासन करून अपराध न होण्याची व्यवस्था केली पाहिजे. कुलांत होणारे कलह जर कुलवृद्धांनीं त्यांच्याकडे दुर्लक्ष केलें व थांबविले नाहींत तर ते कुलांचा व गणांचा नाश करतात. बाह्य व अंतर्गत अशा दोन प्रकारच्या भयांपैकीं संघराज्याच्या दृष्टीनें आंतल्या फुटीर वृत्तीच्या भयाचें महत्त्व अधिक मोठें आहे. त्या मानानें बाह्य शक्तीच्या आक्रमणाचें भय कांहींच नव्हे. म्हणून हें अंतर्भय नष्ट करण्याचा कसोशीनें प्रयत्न केला पाहिजे. कारण अंतर्भय गणराज्याचा पायाच नष्ट करतें. ज्यावेळीं गणराज्यांतील लोक उगाचच एकमेकांवर रागावून केवळ लोभामुळें, मोहामुळें अथवा केवळ मूर्खपणामुळें एकमेकांशीं बोलणें टाकून देतात त्यावेळीं त्यांच्या विनाशाचीं पदचिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं असें समजावें. जातिकुळांची विषमता अथवा त्याच्यावर आधारलेलें मोठेंपण गणराज्यांत नसून सर्वांना समान संधि हेंच त्याचें तत्त्व असतें. रूपाचा वा द्रव्याचा मोह दाखवून अथवा आक्रमणाचा प्रयत्न करून संघराज्य कधींही नष्ट होऊं शकत नाहीं. संघराज्यांत आपआपसांत फूट उत्पन्न करून व तिला उत्तेजन देऊनच शत्रूंनीं संघराज्यें नष्ट केलेलीं आहेत. म्हणून संघजीवन हाच संघराज्याचा प्राण आहे, हें नेहमींच लक्षांत ठेवलें पाहिजे व ज्यांना संघराज्य टिकवावयाचें असेल त्यांनीं तेथील संघजीवन कसें कधींही नष्ट होणार नाहीं याविषयीं पूर्णपणें दक्षता घेतली पाहिजे.

महाभारतकारांनीं संघराज्यासंबंधीं केलेलें हें विवेचन आजही प्रत्येकानें हृत्पटलावर कोरून ठेवण्यासारखें शाश्वत स्वरूपाचें आहे.

संघराज्यांतील नेत्यांनीं तें राज्य टिकवून धरण्यासाठीं, कोणतें पथ्य पाळणें अवश्य आहे हेंही महाभारतांत अत्यंत उत्कृष्ट रीतीनें श्रीकृष्ण व नारद यांच्या संवादाच्या द्वारें दाखविलेलें आहे. तें पुढीलप्रमाणें:--

वासुदेव उवाच—

नासुहृत्परमं मन्त्रं नारदार्हति वेदितुम् ।
अपण्डितो वाऽपि सुहृत् पण्डितो वाऽप्यनात्मवान् ।। ३
स ते सौहृदमास्थाय किञ्चिद्वक्ष्यामि नारद ।
कृत्स्नं बुद्धिबलं प्रेक्ष्य संपृच्छेत्त्रिदिवंगम ।। ४
दास्यमैश्वर्यवादेन ज्ञातीनां न करोम्यहम् ।
अर्धं भोक्ताऽस्मि भोगानां वाग्दुरुक्तानि च क्षमे ।। ५
अरणीमग्निकामो वा मथ्नाति हृदयं मम ।
वाचा दुरुक्तं देवर्षे तन्मे दहति नित्यदा ।। ६
बलं संकर्षणे नित्यं सौकुमार्यं पुनर्गदे ।
रूपेण मत्तः प्रद्युम्नः सोऽसहायोऽस्मि नारद ।। ७
अन्ये हि सुमहाभागा बलवन्तो दुरुत्सहाः ।
नित्योत्थानेन संपन्ना नारदान्धकवृष्णयः ।। ८
यस्य न स्युर्न वै स स्याद्यस्य स्युः कृत्स्नमेव तत् ।
द्वाभ्यां निवारितो नित्यं वृणोम्येकतरं न च ।। ९
स्यातां यस्याहुकाक्रूरौ किं नु दुःखतरं ततः ।
यस्य चापि न तौ स्यातां किं नु दुःखतरं ततः ।। १०
सोऽहं कितव मातेव द्वयोरपि महामते ।
एकस्य जयमाशंसे द्वितीयस्यापराजयम् ।। ११
ममैवं क्लिश्यमानस्य नारदोभयतः सदा ।
वक्तुमर्हसि यच्छ्रेयो ज्ञातीनामात्मनस्तथा ।। १२

नारद उवाच—

आपदो द्विविधाः कृष्ण बाह्याश्चाभ्यंतराश्च ह ।
प्रादुर्भवन्ति वार्ष्णेय स्वकृता यदि वाऽन्यतः ।। १३

सेयमाभ्यंतरा तुभ्यमापत्कृच्छ्रा स्वकर्मजा ।
अक्रूरभोजप्रभवा सर्वे ह्येते तदन्वयाः ॥ १४
अर्थहेतोर्हि कामाद्वा वाचा बीभत्सयाऽपि वा ।
आत्मना प्राप्तमैश्वर्यमन्यत्र प्रतिपादितम् ॥ १५
कृतमूलमिदानीं तज्ज्ञातिशब्दं सहायवान् ।
न शक्यं पुनरादातुं वान्तमन्नमिव त्वया ॥ १६
बभ्रूग्रसेनयो राज्यं नाप्तुं शक्यं कथञ्चन ।
ज्ञातिभेदभयात् कृष्ण त्वया चापि विशेषतः ॥ १७
तच्च सिध्येत्प्रयत्नेन कृत्वा कर्म सुदुष्करम् ।
महाक्षयं व्ययो वा स्याद्विनाशो वा पुनर्भवेत् ॥ १८
अनायसेन शस्त्रेण मृदुना हृदयच्छिदा ।
जिह्वामुद्धर सर्वेषां परिमृज्यानुमृज्य च ॥ १९

वासुदेव उवाच—

अनायसं मुने शस्त्रं मृदु विद्यामहं कथम् ।
येनैषामुद्धरे जिह्वां परिमृज्यानुमृज्य च ॥ २०

नारद उवाच—

शक्त्याऽन्नदानं सततं तितिक्षार्जवमार्दवम् ।
यथार्हप्रतिपूजा च शस्त्रमेतदनायसम् ॥ २१
ज्ञातीनां वक्तुकामानां कटुकानि लघूनि च ।
गिरा त्वं हृदयं वाचं शमयस्व मनांसि च ॥ २२
नामहापुरुषः कश्चिन्नानात्मा नासहायवान् ।
महतीं धुरमाधत्ते तामुद्यम्योरसा वह ॥ २३
सर्व एव गुरुं भारमनड्वान्वहते समे ।
दुर्गे प्रतीकः सुगवा भारं वहति दुर्वहम् ॥ २४
भेदाद्विनाशः संघानां संघमुख्योऽसि केशव ।
यथा त्वां प्राप्य नोत्सीदेदयं संघस्तथा कुरु ॥ २५
नान्यत्र बुद्धिक्षान्तिभ्यां नान्यत्रेन्द्रियनिग्रहात् ।
नान्यत्र धनसंत्यागाद्गणः प्राज्ञेऽवतिष्ठते ॥ २६
धन्यं यशस्यमायुष्यं स्वपक्षोद्भावनं सदा ।
ज्ञातीनामविनाशः स्याद्यथा कृष्ण तथा कुरु ॥ २७

**आयत्यां च तदात्वे च न तेऽस्त्यविदितं प्रभो ।**
**षाड्गुण्यस्य विधानेन यात्री यानविधौ तथा ॥ २८**
**यादवाः कुकुरा भोजाः सर्वे चान्धकवृष्णयः ।**
**त्वय्यासक्ता महाबाहो लोका लोकेश्वराश्च ये ॥ २९**
**उपासन्ते हि त्वद्बुद्धिमृषयश्चापि माधव ।**
**त्वं गुरुः सर्वभूतानां जानीषे त्वं गतागतम् ॥ ३०**
**त्वामासाद्य यदुश्रेष्ठ मेधन्ते यादवाः सुखम् ॥ ३१**

—महाभारत, शांतिपर्व अध्याय ८१

अर्थः—"अंधक व वृष्णी गणांचे नेते भगवान् श्रीकृष्ण एके दिवशीं नारदाला म्हणाले कीं, मला तुला अत्यंत महत्त्वाच्या गोष्टींत कांहीं विचारावयाचें आहे. राज्यतंत्राच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाच्या गोष्टी जो मित्र नाहीं त्याच्याशीं बोलतां येत नाहींत. ज्याच्याशीं त्या गोष्टी बोलावयाच्या तो चांगला विचक्षण नसेल आणि विचक्षण असला तरी त्याचें मन जर त्याच्या पूर्णपणें आधीन नसेल तर त्याच्याशींही बोलतां येत नाहीं. अशा तऱ्हेचें मित्रत्व तुझ्या ठिकाणीं असल्याचें पाहून कांहीं महत्त्वाच्या गोष्टी मी तुला विचारीत आहें. तुझ्या बुद्धिमत्तेवर माझा विश्वास आहे. लोक मला अंधकवृष्णी गणांचा ऐश्वर्यशाली नेता असें समजतात. पण वास्तविक ऐश्वर्याच्या नांवाखालीं माझ्या गणांचें दास्यच मी करीत आहें. जरी अर्धा अधिकार माझ्या आधीन असला तरी केवळ दुरुत्तरें ऐकून तीं सहन करणें एवढ्यापुरताच तो आहे. जिच्यांतून अग्नि उत्पन्न होतो अशी अरणी ज्याप्रमाणें जळावी तशी या दुरुत्तरांनीं माझ्या अंतःकरणाची अवस्था झाली आहे. माझें अंतःकरण रोज जळत आहे. माझ्या सहायकांकडे पहावें तर माझा बंधु संकर्षण हा बलवान् म्हणून विख्यात आहे आणि दादाला सर्व राज्यवैशिष्ट्यें लाभलीं आहेत. तो अत्यंत सुकुमार आहे. प्रद्युम्न तर माझ्याहीपेक्षां सुन्दर असून त्याला स्वतःच्या सौंदर्याचा अतिशय गर्व आहे. तरीही मी अत्यंत असहाय आहें असें मला वाटतें. बाकीचे अंधक आणि वृष्णी अत्यंत बलवान् आणि कोणीही ज्यांचें धर्षण करूं शक-

णार नाहीं असे सामर्थ्यशील आहेत. त्या साऱ्यांच्यांत राजकीय संघर्षाचा उत्साह अमर्याद आहे. ते ज्याच्या बाजूला असतील त्याला लाभणार नाहीं अशी गोष्टच नाहीं. व ते ज्याच्या बाजूला नसतील त्याचें अस्तित्वच अशक्य आहे. आहुक आणि अक्रूर हे ज्याच्या बाजूला असतील त्याच्यापेक्षां त्याची अधिक दुर्दशा असूं शकणार नाहीं. त्याचप्रमाणें ते ज्याच्या बाजूला नसतील त्याच्याही दुर्दशेला पारावार उरणार नाहीं. मला या दोघांपैकीं कोणत्याही एका पक्षाचा जसा जय इच्छितां येत नाहीं त्याचप्रमाणें कोणत्याही एका पक्षाचा पराजय व्हावा असेंही इच्छितां येत नाहीं. दोन जुगाऱ्यांच्या आईसारखी माझी अनुकंपनीय अवस्था झाली आहे. ते परस्परांत द्यूत खेळत असतां दोन्ही स्वतःचींच मुलें असल्यामुळें त्यांच्या आईला ज्याप्रमाणें एकाचा विजय इच्छून दुसऱ्याच्या पराजयाची कल्पना करणें अशक्य आहे, तीच माझी अवस्था आहे. तूं माझ्या या अवस्थेचा आणि माझ्या ज्ञातीच्याही अवस्थेचा विचार करून आमच्या कल्याणाचें कार्य कोणतें तें मला सांग."

त्यावर नारद म्हणाले: "संघराज्यांत दोन प्रकारचीं संकटें असतात. एक आभ्यंतर संकट व दुसरें बाह्य संकट. तूं माझ्याजवळ जें सांगितलेंस तें आभ्यंतर संकट असून संघाच्या सभासदांकडूनच उत्पन्न झालेलें आहे. अक्रूर आणि भोज हे व त्यांचे अनुयायी यांना ज्यांच्यापासून लाभ झाला त्यांना ते लोक साहाय्य करणारच. त्यांना ज्ञातीचें साहाय्य असल्यामुळें त्यांचे अधिकार दृढमूल झालेले आहेत. अशा स्थितींत त्यांचे अधिकार काढून घेणें केव्हांही उचित नाहीं. त्याच्यामुळें आपापसांत भेद उत्पन्न होईल व त्याला तूं कारण होऊं नयेस असें मला वाटतें. ओकलेलें अन्न ज्याप्रमाणें पुनः घेतां येत नाहीं त्याचप्रमाणें दिलेला अधिकारही या प्रकरणांत काढून घेऊं नये. वृष्णी आणि अंधक गणांच्या अध्यक्षपदावरून उग्रसेनाला काढलें तर त्याच्यासाठीं मोठा प्रयत्नही लागेल आणि या दुष्कर कृत्याचा परिणाम म्हणून भयानक स्वरूपाची हानि व सामर्थ्याचा व्यर्थ व्यय होऊन शिवाय गणराज्याच्या

सदाच्या विनाशाची भीति उत्पन्न होईल. या संकटावर एक उपाय आहे व तो उपाय म्हणजे एका विशेष शस्त्राचा वापर होय. तें शस्त्र पोलादाचें बनविलेलें नाहीं. तें अत्यंत मृदु आहे, तरीही तें कोणाचेंही हृदय चिरावयास समर्थ आहे. तें शस्त्र वारंवार पाजळून तूं अधिकाधिक तीक्ष्ण कर व सर्व ज्ञातींच्या जिव्हांचें सामर्थ्य सदाचें नष्ट करून टाक."

श्रीकृष्णानें नारदाला विचारलें, 'तें शस्त्र कोणतें ?'

"नारदांनीं सांगितलें कीं, दुसऱ्यांच्या योग्यतेची आपण पूर्णपणें जाणीव ठेवतों असें दाखवून त्यांचा सन्मान करणें, सौम्यपणा, कपट न ठेवतां सरळ वागणें, असीम सहनशीलता व आपल्या शक्त्यनुसार सर्वांचा आदरसत्कार करणें हें तें परिणामकारक शस्त्र होय. अत्यंत कडू आणि क्षुद्रपणाचीं बोलणीं वारंवार बोलूं इच्छिणाऱ्या नातलगांचीं बोलणीं तूं मनावर घेऊं नकोस. उलट आपल्या सुमधुर वाणीनें तूं त्यांचीं अंत:करणें शांत व जिव्हा बोथट कर. स्वत:च्या मनावर ताबा असणारा, अनेक लोकांचें साहाय्य असलेला असा महापुरुषच एवढ्या मोठ्या राज्याचा अधिकार सांभाळू शकतो. सामान्य व विकारांच्या आधीन होणाऱ्या व्यक्तीचें हें काम नव्हे. सरळ रस्त्यावरून भारवाहक होणें कोणत्याही बैलाला शक्य होतें पण मोठा भार विषम मार्गावरून सामान्य पशु नेऊं शकत नाहीं. भेदांतच संघ-राज्याचा नाश आहे. तूं या संघराज्याचा मुख्य आहेस. तुझ्या-सारखा नेता लाभला असतां संघ नष्ट होणार नाहीं असेंच तुला वागलें पाहिजे. केवळ युक्ति आणि सहनशीलता, स्वत:च्या सैराट धांवणाऱ्या मनोवृत्तींवर पूर्ण ताबा असणें, आणि नेहमीं अने-कांचा सत्कार करण्याची प्रवृत्ति असणें व त्यासाठीं लागेल ती घस सोसणें या गोष्टी ज्या शहाण्या माणसाजवळ असतील तोच संघ-राज्याचा नेता होऊं शकतो. आपला पक्ष याप्रमाणें बलवान् करणें हेंच संघराज्याचें आयुष्य,यश व वैभव वाढावयास कारणीभूत होतें. तूं अशाच पद्धतीनें वाग कीं ज्याच्यामुळें संघराज्याचा नाश होणार नाहीं. भूत, भविष्य, वर्तमानाच्या बाबतींत आणि राज्य-

तंत्राच्या इतर सर्व कक्षांच्या बाबतींत तुला माहीत नाहीं असें कांहींही नाहीं. यादव, त्रिपुर, भोज, यांचे गण व गणमुख्य या साऱ्यांचें अस्तित्व तुझ्यावर अवलंबून आहे हें ध्यानांत ठेवूनच तूं वागलें पाहिजेस."

महाभारतांत प्रदर्शित केलेले हे गणराज्याविषयींचे विचार कोणत्याही लोकतंत्रात्मक व्यवस्थेला आजही जसेच्यातसे लागू आहेत. महाभारतकाळीं राज्यतंत्राचें आतांपर्यंत दाखविलेलें हें आदर्शस्वरूप राहिलें होतें काय? जर तें तसें राहिलें असतें तर भगवान् श्रीकृष्णांना भारतीय संस्कृति व जीवनमूल्यें यांच्या संरक्षणासाठीं खड्ग उपसण्याचें कांहींच कारण नव्हतें. त्यांनीं राजमस्तकांचें उपायन धर्माच्या मूलतत्त्वासाठीं जें दिलें त्याचें कारण राजसंस्थेचा अध:पात हेंच होय.

## साम्राज्यसत्तेचा अध:पात

शंतनूच्या उदाहरणावरून आपण हें पाहिलें आहे कीं, ज्याच्याहातीं धर्म सुरक्षित राहील असा राजा आपलें संरक्षण करण्यास समर्थ आहे असें दिसून आल्यास राजे लोक आपण होऊनच त्याला साम्राज्यपदावर बसवीत व सम्राट म्हणून त्याचें नेतृत्व मान्य करीत. Might is right अथवा 'बळी तो कान पिळी' हा निसर्गाचा न्याय आहे असें म्हणतात. याचा अर्थ, तो पशुत्वाचा स्वयंसिद्ध असा प्रकार आहे, इतकाच आहे. "सर्व बलवतां सुखम्," हें कांहीं कोणास शिकवावयास नको. ही परिस्थिति बदलवून त्या जागीं विचारांचें विकारांवर व न्यायाचें बळावर नियंत्रण उत्पन्न करण्यासाठींच भारतीय संस्कृतीचा जन्म झालेला आहे. म्हणूनच भारतीयांची राज्यसंस्था ही पाशवी बळानें उत्पन्न झालेली नसून धर्मसंरक्षणार्थ उत्पन्न झालेली आहे व म्हणूनच ती पूर्ण त्यागमय आहे हें आपण पाहिलें आहे. भगवान् श्रीकृष्णाच्या काळीं धर्माऐवजीं बळाला महत्त्व चढलें व प्राचीन साम्राज्यघटनेला पूर्णपणें अर्धचंद्र मिळून जो बलवान् असेल त्यानें इतरांचें न्याय्य हक्कही लुबाडून अधिराज्य गाजवावें, साम्राज्यपदावर आरूढ

व्हावें, व जें आपण करूं तेंच धर्म्य आहे असा दर्प मिरवावा अशी वस्तुस्थिति उत्पन्न झाली. प्राचीन साम्राज्याचें विशुद्ध स्वरूप पूर्णपणें नष्ट होऊन व त्याचीं नियंत्रणेंही गळून पडून त्या जागीं नवी, बळावर अधिष्ठित झालेली राज्यसत्ता अधिरूढ झाली. मगधांच्या आक्रमणकारी साम्राज्यसत्तेनें हा नवा साम्राज्यवाद उत्पन्न केला. ज्याच्या समर्थ नेतृत्वाखालीं हा आक्रमणकारी साम्राज्यवाद उत्पन्न झाला, त्याचें नांव जरासंध असें होतें. भगवान् श्रीकृष्णांनीं स्वतःच जरासंधाच्या या आक्रमणाचें व सामर्थ्याचें स्वरूप विशद केलें आहे. ते म्हणतातः--

जामदग्न्येन रामेण क्षत्रं यदवशेषितम् ।
तस्मादवरजं लोके यदिदं क्षत्रसंज्ञितम् ।। २
कुतोयं कुलसंकल्पः क्षत्रियैर्वसुधाधिप ।
निदेशवाग्भिस्तत्ते ह विदितं भरतर्षभ ।। ३
ऐलस्येक्ष्वाकुवंशस्य प्रकृतिं परिचक्षते ।
राजानः श्रेणिबद्धाश्च तथान्ये क्षत्रिया भुवि ।। ४
ऐलवंशाश्च ये राजंस्तथैवेक्ष्वाकवो नृपाः ।
तानि चैकशतं विद्धि कुलानि भरतर्षभ ।। ५
ययातेस्त्वेव भोजानां विस्तरो गुणतो महान् ।
भजतेद्य महाराज विस्तरं स चतुर्दिशम् ।। ६
तेषां तथैव तां लक्ष्मीं सर्वक्षत्रमुपासते ।
इदानीमेव वै राजञ्जरासंधो महीपतिः ।। ७
अभिभूय श्रियं तेषां कुलानामभिषेचितः ।
स्थितो मूर्ध्नि नरेन्द्राणामोजसाक्रम्य सर्वशः ।। ८
सोऽवनीं मध्यमां भुक्त्वा मिथो भेदममन्यत ।
प्रभुर्यस्तु परो राजा यस्मिन्नेकवशे जगत् ।। ९

—महाभारत, सभापर्व अध्याय १४

"जामदग्न्य रामाच्या आक्रमणानंतर हल्लीं जे क्षत्रिय उरले आहेत त्या सर्व क्षत्रियांनीं आपल्यामध्यें असा संकेत केला आहे कीं, जो आम्हांमध्यें सर्वांत श्रेष्ठ तो आमचा सम्राट होईल. चंद्र आणि सूर्य

या वंशांतील लोक सम्राट् व इतर सर्व राजे आणि क्षत्रिय ही त्यांची प्रजा असा हा संकेत चालत आलेला आहे. या चंद्र व सूर्य राजवंशांचीं एकंदर शंभर कुळें झालीं व चारही दिशांना हीं राजकुळें पसरलीं. कुलक्रमागत त्यांचें नेतृत्व आजवर सर्व क्षत्रियांनीं मान्य केलेलें होतें व तें चालत आलेलें होतें. अलीकडेच राजा जरासंधानें त्या सर्व कुलांचा पराजय करून स्वत:ला अभिषेक करून घेतलेला आहे व तो आपल्या बळानें सर्व साम्राज्याचा एकमात्र एकछत्री सम्राट झालेला आहे."

वास्तविक सर्व जगांतील क्षत्रियांना जिंकून सम्राट होणें हा कांहीं अपराध नाहीं; पण सगर, मांधाता, भरत, इत्यादिकांप्रमाणें केवळ क्षत्रियांना जिंकणें येवढेंच कांहीं जरासंधाच्या साम्राज्यवादाचें स्वरूप नव्हतें. आपला कोणीही विरोधक उरूं नये म्हणून जुने राजवंश नष्ट करून टाकणें व उग्रदंडाच्या भयानें धार्मिकांनाही आपल्या सत्तेचे दास करणें हें त्याच्या साम्राज्याचें स्वरूप होतें. तो अत्यंत पराक्रमी होता. महाभारतांत त्याचें जें वृत्त दिलें आहे तें पहाण्यासारखें आहे. महभारताच्या सभापर्वांत १७ व्या, १८ व्या, व १९ व्या अध्यायांत त्याचें हें वृत्त आलेलें आहे.

## जरासंधाचें पूर्ववृत्त

बृहद्रथ नांवाचा मगध देशाचा (बिहार) एक राजा होता. तो सर्व गुणांनीं संपन्न असून सामर्थ्यसंपन्न व अत्यंत धार्मिक होता. काशी राजाच्या दोन मुलींशीं त्यानें विवाह केला पण दैवयोगानें त्याला पुत्र झालाच नाहीं. कांहीं दिवसांनीं तो पुत्रप्राप्तीविषयीं अत्यंत निराश झाला. एकदा चंडक कौशिक या नांवाचे एक ऋषी त्याच्या राज्यांत आले. राजानें व त्याच्या दोन्ही राण्यांनीं त्या ऋषींची दक्षतेनें सेवा केली. ऋषींनीं त्या सेवेनें प्रसन्न होऊन पुत्रप्राप्तीस्तव त्याला एक फळ दिलें. राजानें त्या फळाचे दोन विभाग करून ते आपल्या दोन राण्यांना दिले. योग्यसमयीं राण्या प्रसूत झाल्या; पण त्यांना मानवी बालकाच्या शरीराचे मधोमध दोन तुकडे केले असतां तें जसें दिसेल तसें एकेक शकल झालें. तें पाहून राण्यांना

अत्यंत शोक झाला. त्यांनीं आपल्या दासीकरवीं तीं शकलें चौरस्त्यावर टाकून दिलीं. रात्रीच्या वेळीं 'जरा' नांवाच्या राक्षसीनें तीं शकलें घेऊन एकत्र जुळविलीं तों तीं बरोबर जुळून एक जिवंत बालक निर्माण झालें तोच 'जरासंध' होय. जरा नांवाच्या राक्षसीनें त्याला सांधलें म्हणून त्याला जरासंध असें म्हणतात. राक्षसीनें तें बालक राजा बृहद्रथाच्या स्वाधीन केलें. ( महाभारत सभापर्व अध्याय १७–१८).

कांहीं दिवसांनीं पुनश्च चण्ड कौशिक ऋषि राजा बृहद्रथाच्या राज्यांत आले. त्यांनीं आपल्या वरदानानें उत्पन्न झालेल्या त्या पुत्राला अनेकविध आशीर्वाद दिले. 'जरासंध' तरुण झाल्यावर राजा बृहद्रथानें प्राचीन आर्यांच्या पद्धतीप्रमाणें त्याच्या स्वाधीन राज्य करून आपल्या जीविताचें सार्थक व्हावें म्हणून अरण्यवास पत्करला. जरासंध मगधाच्या गादीवर येतांच त्यानें हंस व डिंभक या नांवांच्या दोन पराक्रमी पुरुषांना आपलें सेनपतित्व दिलें. हंस, डिंभक व जरासंध हे तिघे मिळून त्या वेळच्या कोणत्याही सत्तेचा पराभव करूं शकतील इतके समर्थ होते.

## जरासंधाच्या आक्रमणाचें स्वरूप

जरासंधाचें आक्रमण ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हती. त्याच्या पराक्रमाचा गौरव कोणीही करावा असाच त्याचा पराक्रम होता. त्याच्या उत्पत्तीच्या या कथेंतील दैवी भाग सोडून दिला तरी त्याचा पराक्रम निर्विवादपणें मान्य केलाच पाहिजे. तो ब्राह्मणांचा पूजक होता. आपल्या प्रजाजनांना तो चांगलें वागवीत असे. क्षत्रमंडळाला त्यानें जिंकून घेतलें असलें तर ती त्याच्या दृष्टीनें अभिमानाचीच गोष्ट होती. पण तेवढ्यानें त्याचें भागेना. आर्य राजांच्या पद्धतींत आपल्या पराक्रमाच्या प्रतिष्ठापनेप्रीत्यर्थ विजय संपादन केल्यानंतर ज्यांचीं राज्यें सम्राटांनीं जिंकलीं असतील त्यांचीं तीं राज्यें नष्ट करून टाकणें व त्यांच्या अंतर्गत व्यवस्थेंत ढवळाढवळ करणें या गोष्टीचा मुळींच अंतर्भाव होत नसे. जिंकलेल्या सत्तेनें पराक्रमाच्या बाबतींत आपलें श्रेष्ठत्व मान्य करणें ही एकच गोष्ट

तेथें अभिप्रेत होती. जिकलेली सत्ता धर्मानें वागली म्हणजे विजेता अंतर्गत कारभाराचे बाबतींत त्या सत्तेला पूर्णपणें स्वातंत्र्य देत असे. दाशरथी रामचंद्रांनीं किष्किंधेच्या वानर राज्याला जिंकूनही तेथील लोकांच्या स्वातंत्र्याचें अपहरण न करतां ती त्यांच्या हातींच ठेविली. राक्षस राष्ट्राचा विध्वंस करूनही राक्षस राष्ट्राचें स्वातंत्र्य त्यांनीं नष्ट केलें नाहीं. केवळ धर्मानें वागण्याची अट घालून त्यांनीं त्यांचें स्वातंत्र्य अबाधित राखलें. आर्य सम्राटांची ही परंपरा ध्यानांत घेतली म्हणजे जरासंधाच्या आक्रमणाचें खरें स्वरूप ध्यानांत येतें. जरासंधानें सत्ता नुसत्या जिकल्याच नाहींत तर त्या पूर्णपणें आपल्या अधीन करून घेऊन तेथील राजांना सदाचें बंदिवासांत टाकलें. इतकेंच नव्हे, तर सूर्य व चंद्र वंशांच्या सर्व राजांना यज्ञांत महादेवाच्या नांवानें बलिदान करण्याचा आणि याप्रमाणें चंद्र–सूर्य राजवंश संपूर्ण नष्ट करून टाकण्याचा त्यानें निश्चय केला. चंद्र–सूर्य वंशांचीं जीं शंभर कुळें होतीं त्यांतील ८६ राजांना त्यानें आपल्या पराक्रमानें जिकलें व त्यांचें यज्ञीय पशु म्हणून बलिदान करण्यासाठीं त्यानें त्यांना आपल्या गिरिव्रज नांवाच्या राजधानींत बंदिवासांत आणून टाकलें. केवळ १४ राजांना त्यानें जिकावयाचें राहिलें होतें व या कुळांतील शंभरही राजे स्वाधीन झाले कीं या शतराजबलींचा तो भीषण नरमेध 'समारंभ' व्हावयाचा होता. त्यासंबंधीं त्याला कोणीही अडथळा उत्पन्न करूं शकत नव्हता. त्याच्या आक्रमणाच्या या विशिष्ट स्वरूपाचें श्रीकृष्णांनीं सभापर्वांत पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे :–

**तेन रुद्धा हि राजानः सर्वे जित्वा गिरिव्रजे ।**
**कन्दरे पर्वतेन्द्रस्य सिंहेनेव महाद्विपाः ।। ६३**

**स हि राजा जरासंधो यियक्षुर्वसुधाधिपः ।**
**महादेवं महात्मानमुमापतिमरिंदमम् ।। ६४.**

**आराध्य तपसोग्रेण निर्जितास्तेन पार्थिवाः ।**
**प्रतिज्ञायाश्च पारं स गतः पार्थिवसत्तम ।। ६५**

**—महाभारत सभापर्व अ. १४**

तस्मादिह बलादेव साम्राज्यं कुरुते हि सः ॥ १९
रत्नभाजो हि राजानो जरासंधमुपासते ।
न च तुष्यति तेनापि बाल्यादनयमास्थितः ॥ २०
मूर्धाभिषिक्तं नृपतिं प्रधानपुरुषो बलात् ।
आदत्ते न च नो दृष्टो भागः पुरुषतः क्वचित् ॥ २१
एवं सर्वान्वशे चक्रे जरासंधः शतावरान् ।
तं दुर्बलतरो राजा कथं पार्थ उपैष्यति ॥ २२
प्रोक्षितानां प्रमृष्टानां राज्ञां पशुपतेर्गृहे ।
पशूनामिव का प्रीतिर्जीविते भरतर्षभ ॥ २३
क्षत्रियः शस्त्रमरणो यदा भवति सत्कृतः ।
ततः स्म मागधं संख्ये प्रतिबाधेम यद्वयम् ॥ २४
षडशीतिः समानीताः शेषा राजंश्चतुर्दश ।
जरासंधेन राजानस्ततः क्रूरं प्रवर्त्स्यते ॥ २५
प्राप्नुयात्स यशो दीप्तं तत्र यो विघ्नमाचरेत् ।
जयेद्यश्च जरासंधं स सम्राण्नियतं भवेत् ॥ २६

—महाभारत, सभापर्व अध्याय १५

"राजा जरासंधानें सर्व राजे जिंकून गिरिव्रजांत बंदिवासांत ठेवले आहेत. त्या राजांना पशु कल्पून महादेवाच्या नांवानें यज्ञ करावयाची त्याची इच्छा आहे. जे जे युद्धार्थ आले त्यांना त्यांना बांधून राजधानींत आणून त्यानें बंदिवासांत ठेविलें आहे. केवळ बळानें साम्राज्यें करावींत ही त्याची प्रवृत्ति आहे. मोठमोठे राजे रत्नांचे ओघ त्याच्या पायावर अर्पण करून त्याचें आधिपत्य स्वीकारावयास सिद्ध आहेत. तरीही त्याचें समाधान नाहीं. आपल्या बळाच्या दर्पानें धर्म व परंपरा पायाखालीं तुडवून वागण्याची त्याची प्रवृत्ति आहे. मूर्धाभिषिक्त राजांपैकीं असा कोणीही नाहीं कीं ज्याला जरासंधानें ताब्यांत घेतलें नाहीं. यज्ञपशूप्रमाणेंच जरासंधानें त्यांचें प्रोक्षण केलें असून तो त्यांचें बलिदान निश्चित करणार असल्यामुळें त्यांना आतां जगण्यांत काय गोडी वाटणार आहे? ८६ राजे त्यानें जिंकलेच आहेत. उरलेले १४ त्याला जिंकावयाचे आहेत. ते त्यानें जिंकले कीं राजांचा तो क्रूर नरमेध सुरू होईल."

जरासंधाच्या क्रौर्याची व दुरात्मतेची जाणीव पांडवांनादेखील पूर्वीपासूनच होती. युधिष्ठिर म्हणतो,

**वयं चैव महाभाग जरासंधभयात्तदा ।**
**शङ्किताः स्म महाभाग दौरात्म्यात्तस्य चानघ ।। ७**

—महाभारत सभापर्व अ. १५

"आम्हीही तेव्हांच जरासंधाची दुरात्मता व त्याच्या पराक्रमाचें भय यामुळें शंकितच होतों ! जरासंधाचें ज्या चौदा शेषराजांच्यावर लक्ष होतें, त्यांत चंद्रवंशीय राजांमध्यें हस्तिनापूरच्याही कुरुवंशीयांचें स्थान होतेंच. केवळ भीष्माच्या प्रतापानेंच ते वांचले असें धृतराष्ट्रानें उद्योगपर्वांत स्वतःच म्हटलें आहे."

**कृत्स्नेयं पृथिवी देवी जरासंधेन धीमता ।**
**मागधेन्द्रेण बलिना वशे कृत्वा प्रतापिता ।। ३८**
**भीष्मप्रतापात् कुरवो नयेनान्धकवृष्णयः ।**
**यन्न तस्य वशे जग्मुः केवलं दैवमेव तत् ।। ३९**

—महाभारत, उदद्योगपर्व अ. ५१

जरासंधाच्या आक्रमणाच्या या विशिष्ट पद्धतीमुळें भारतवर्षांतील सर्व राजकुलांत एक प्रकारचा हाहाःकार माजून राहिला होता. ज्यांना पळून जातां येणें शक्य होतें ते पळून गेले. जे इतर रीतींनीं प्राण वांचवूं शकत होते त्यांनीं ते ते उपाय अवलंबिले व उरलेले मोठमोठे पराक्रमी लोक जरासंधाच्या साम्राज्याखालीं येऊन त्याचें आधिपत्य मान्य करून व दास्य पत्करून त्याच्या आज्ञेंत वागूं लागले. या धर्मविरोधी शासनाचा धर्म आणि नीति यांच्या दृष्टीनें विनाश होणें आवश्यक होऊन बसावें अशी वस्तुस्थिति त्यावेळीं निर्माण झाली होती. जरासंधाच्या साम्राज्यसत्तेचें तांडव परंपरेनें चालत आलेल्या राजवंशांच्या परिसरांत सुरू होऊन त्यांच्या परंपरांचे पूर्णपणें विडंबन चाललेलें होतें. दुष्ट राजेलोकांचा एक मोठा संघ त्याच्या नेतृत्वाखालीं भारतांत उत्पन्न झालेला होता. मोठमोठ्या पराक्रमी लोकांनाही या नव्या मगध साम्राज्याचें आधिपत्य स्वीकारणें अथवा त्याच्या नरमेधांतील एक पशु होऊन राहणें यावांचून

दुसरा मार्ग उरलेला नव्हता. कोण कोण अधिपति व प्रबल राजे त्याच्या अंकित झाले होते याचें महाभारतांत पुढीलप्रमाणें वर्णन आहे :—

राजन्सेनापतिर्जातः शिशुपालः प्रतापवान् ।
तमेव च महाराज शिष्यवत्समुपस्थितः ॥ ११
वक्रः करुषाधिपतिर्मायायोधी महाबलः ।
अपरौ च महावीर्यौ महात्मानौ समाश्रितौ ॥ १२
जरासंधं महावीर्यं तौ हंसडिम्भकावुभौ ।
वक्रदन्तः करूषश्च करभो मेघवाहनः ।
मूर्ध्ना दिव्यमणिं बिभ्रद्यमद्भुतमणिं विदुः ॥ १३
मुरं च नरकं चैव शास्ति यो यवनाधिपः ।
अपर्यन्तबलो राजा प्रतीच्यां वरुणो यथा ॥ १४
भगदत्तो महाराज वृद्धस्तव पितुः सखा ।
स वाचा प्रणतस्तस्य कर्मणा च विशेषतः ॥ १५
स्नेहबद्धश्च मनसा पितृवद्भक्तिमांस्त्वयि ।
प्रतीच्यां दक्षिणं चान्तं पृथिव्याः प्रति यो नृपः ॥ १६
मातुलो भवतः शूरः पुरुजित्कुन्तिवर्धनः ।
स ते सन्नतिमानेकः स्नेहतः शत्रुसूदनः ॥ १७
जरासंधं गतस्त्वेव पुरा यो न मया हतः ।
पुरुषोत्तमविज्ञानो योऽसौ चेदिषु दुर्मति ॥ १८
आत्मानं प्रतिजानाति लोकेस्मिन्पुरुषोत्तमम् ।
आदत्ते सततं मोहाद्यः स चिह्नं च मामकम् ॥ १९
वङ्गपुण्ड्रकिरातेषु राजा बलसमन्वितः ।
पौण्ड्रको वासुदेवेति योऽसौ लोकेभिविश्रुतः ॥ २०
चतुर्थभाङ्महाराज भोजं इंद्रसखो बली ।
विद्याबलाद्यो व्यजयत्सपाण्डचक्रथकैशिकान् ॥ २१
भ्राता यस्याकृतिः शूरो जामदग्न्यसमोऽभवत् ।
स भक्तो मागधं राजा भीष्मकः परवीरहा ॥ २२
प्रियाण्याचरतः प्रह्वान्सदा संबन्धिनस्ततः ।
भजतो न भजत्यस्मानप्रियेषु व्यवस्थितः ॥ २३

**नकुलं सबलं राजन्नभ्यजानात्तथात्मनः ।**
**पश्यमानो यशोदीप्तं जरासंधमुपस्थितः ।। २४**
**उदीच्याश्च तथा भोजाः कुलान्यष्टादश प्रभो ।**
**जरासंधभयादेव प्रतीचीं दिशमास्थिताः ।। २५**
**शूरसेना भद्रकारा बोधाः शाल्वाः पटच्चराः ।**
**सुस्थलाश्च सुकुट्टाश्च कुलिन्दाः कुन्तिभिः सह ।। २६**
**शाल्वायनाश्च राजानः सोदर्यानुचरैः सह ।**
**दक्षिणा ये च पाञ्चालाः पूर्वाः कुन्तिषु कोशलाः ।। २७**
**तथोत्तरां दिशं चापि परित्यज्य भयार्दिताः ।**
**मत्स्याः संन्यस्तपादाश्च दक्षिणां दिशमाश्रिताः ।। २८**
**तथैव सर्वपाञ्चाला जरासंधभयार्दिताः ।**

—महाभारत, सभापर्व अ. १४

चेदिराज शिशुपाल अत्यंत पराक्रमी असतांही शिष्याप्रमाणें त्याला शरण जाऊन त्याचा सेनापति झाला. कपटयुद्ध करणारा करुषाधिपति वक्रदंत, करभ मेघवाहन, भगदत्त, पौण्ड्रक वासुदेव, श्रीकृष्णांचे श्वशुर भीष्मक इत्यादि मोठे मोठे राजे जरासंधाचे कुणी मित्र तर कोणी सेवक झाले होते. पंचाल, यादव इत्यादिकांचीं गणराज्यें व संघराज्यें पार धुळीला मिळालीं होतीं असें या वर्णनावरून दिसतें. तात्पर्य धार्मिक साम्राज्यसत्तेऐवजीं बलाढ्य, दुसऱ्याचें स्वातंत्र्य हिरावून घेणारी, नरमेधासारख्या भयानक कर्माला प्रवृत्त होणारी, उन्मार्गवर्ती सत्ता जरासंधाच्या रूपानें प्रत्यक्ष अस्तित्वांत आली असून त्या एकछत्री सत्तेचें प्रजातंत्र संघराज्यांना जीवघेऊं भय उत्पन्न झालें होतें. यादवांचें संघराज्य तेथीलच कंस नांवाच्या तरुण व अविचारी गणनायकाच्या द्वारें जरासंधानें मोडून टाकलें होतें असें दिसतें.

**बलेन तेन स्वज्ञातीनभिभूय वृथामतिः ।। ३१**
**श्रैष्ठ्यं प्राप्तः स तस्यासीदतीवापनयो महान् । ३२**

—महाभारत सभापर्व अ. १४

कंसानें जरासंधाच्या सामर्थ्यानें आपल्या ज्ञातींचा पराभव केला व तो गणराज्याचें आधिपत्य बळकावून बसला हा मोठाच अन्याय

होय. रक्ताला चटावलेला, शोषण हा आत्मा असलेला, प्रजातंत्र नष्ट करूं पहाणारा व स्वातंत्र्याचा अपहारक असा हा साम्राज्यवाद भारतीय साम्राज्यकल्पनेला विरोधी होता. हें त्या कल्पनेचें अधःपतन होतें. स्वाभाविकपणेंच या साम्राज्यवादाच्या छाये-खालीं नांदणाऱ्या राजमंडळाच्या 'राज्यसंस्थेचा अधःपात' व तिच्या मूल तत्त्वांचा विपर्यास सुरू झाला असल्यास त्यांत नवल नाहीं. विवाहित स्त्रियांना पळवून नेईपर्यंत राज्यसत्ताधारी व्यक्तींच्या अधःपतनाची मजल गेली होती असें दिसतें. शिशुपालाच्या अप-राधांचें वर्णन करीत असतां शिशुपालानें एका विवाहित स्त्रीचें अपहरण केल्याचें भगवान् श्रीकृष्णांनीं स्वतःच वर्णन केलें आहे. ते म्हणतातः--

**सौवीरान्प्रतियातां च बभ्रोरेष तपस्विनः।**
**भार्यामभ्यहरन्मोहादकामां तामितो गताम् ।। १०**
**एष मायाप्रतिच्छन्नः कारुषार्थे तपस्विनीम् ।**
**जहार भद्रां वैशालीं मातुलस्य नृशंसकृत् ।। ११**

--महाभारत, सभापर्व अ. ४५

कुलस्त्रियांचा अपमान झाला तर त्याला वधदण्ड द्यावा असें आर्यांचें नीतिशास्त्र सांगणाऱ्या भगवान् श्री रामचंद्रांच्या, भारतीय राज्यसत्तेच्या त्या महान् प्रतिनिधीच्या उज्ज्वल चारित्र्याच्या प्रका-शांत हें वर्णन वाचलें म्हणजे महाभारतकालीन राज्यसत्तेचें केवढें पतन झालें होतें याची नीट कल्पना करतां येईल. भगवान वेद-व्यासांच्या दिव्यदर्शी प्रतिभेनें राज्यसत्तेच्या या अधःपतनाचें संपूर्ण चित्रच महाभारतांत एका व्यक्तिचित्रणाच्या रूपानें मांडलें आहे. व्यासांनीं निर्माण केलेल्या या व्यक्तिचित्राचें नांव मी आप-णांस सांगितलें तर आपणांस आश्चर्य वाटेल. त्या व्यक्तीचें नांव 'राजा धृतराष्ट्र'.

# १. राजा धृतराष्ट्र

जन्मानें अंध पण तीव्र बुद्धिमत्तेनें अनेक डोळसांवर मात करणारा, वाणीनें अत्यंत मृदु,पण हृदयानें पाजळलेल्या तरवारीपेक्षां अधिक तीक्ष्ण असणारा, तोंडानें धर्म, नीति व तत्त्वज्ञान यांचा एकसारखा उद्‌घोष करीत राहून कमळाच्या पानाला जलबिंदूचा नसावा तसाच या गोष्टींचा प्रत्यक्ष चारित्र्याशीं व आचरणाशीं किंचिन्मात्रही संबंध नसलेला राजा धृतराष्ट्र हा कुशल प्रतिभेंतून निर्माण झालेल्या कोणत्याही काव्याच्या खलनायकापेक्षां अधिक श्रेष्ठ आहे. वास्तविक धृतराष्ट्र हा विचित्रवीर्याचा ज्येष्ठ पुत्र असल्यामुळें कुरु राज्याचा जन्मतः वारस होता. पण हीनांग व्यक्तीला सिंहासनावर बसतां येत नाहीं या तत्कालीन नियमानुसार राजा धृतराष्ट्राला कुरु राज्याच्या सिंहासनाचा वारसा मिळूं शकला नाहीं.ज्या कारणास्तव शंतनूचे वडील बंधु देवापि हे राज्याचे वारस होऊं शकले नाहींत, त्याच कारणास्तव धृतराष्ट्रही कुरु राज्याचा वारस होऊं शकला नाहीं. या संबंधांत महाभारतांत पुढीलप्रमाणें म्हटलें आहे :—

**धृतराष्ट्रस्त्वचक्षुष्ट्वाद्राज्यं न प्रत्यपद्यत ।**
**पारसवत्वाद्विदुरो राजा पाण्डुर्बभूव ह ।। २५**

**—महाभारत, आदिपर्व अ. १०९**

धृतराष्ट्राला डोळे नसल्यामुळें त्याला राज्य मिळालें नाहीं. विदुर दासीपुत्र असल्यामुळें तोही राज्याचा वारस होऊं शकला नाहीं म्हणून शेवटीं पाण्डूलाच राज्य मिळालें. महाभारताच्या उद्योगपर्वांत धृतराष्ट्राविषयीं उल्लेख करतांना भीष्मांनींही याच गोष्टीचा उल्लेख केलेला आहे. ते म्हणतात :–

**अन्धः करणहीनत्वान्न वै राजा पिता तव ।**
**राजा तु पाण्डुरभवन्महात्मा लोकविश्रुतः ।। ३९**

**——महाभारत, उद्योगपर्व अ. १४७**

---

**व्याख्यान ९ वें, दि. ४ एप्रिल १९५१**

अंध व अवयवहीन असल्यामुळें तुझा पिता धृतराष्ट्र हा राजा होऊं शकत नाहीं म्हणून पाण्डूच राजा झाला. पाण्डूनें राज्य अत्यंत उत्कृष्ट रीतीनें सांभाळलें व दिग्विजय करून कौरवांच्या सिंहासनाला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. सिंहासनाधीश्वर असतांना त्यानें धृतराष्ट्राचे वडिलकीचे सर्व मान सांभाळले इतकेंच नव्हे तर त्याच्याच भरंवशावर धृतराष्ट्रानें नाना प्रकारचे यज्ञयाग करून ऐश्वर्याचा यथावत् उपभोग घेतला. महाभारतांत म्हटलें आहे:-

**तस्य वीरस्य विक्रान्तैः सहस्रशतदक्षिणैः ।**
**अश्वमेधशतैरीजे धृतराष्ट्रो महामखैः ॥ ५**

—महाभारत, आदिपर्व अ. ११४

पाण्डूच्या पराक्रमानें मिळविलेल्या द्रव्यानें राजा धृतराष्ट्रानें अनेक प्रकारचे अश्वमेधाशीं बरोबरी करणारे यज्ञ केले. धार्मिक दृष्टीनें पाण्डु धृतराष्ट्राशीं फार चांगल्या रीतीनें वागत असे. यासंबंधीं स्वतः धृतराष्ट्रानेंच साक्ष दिली आहे. तो दुर्योधनाला पाण्डूविषयीं सांगतांना असें म्हणतो कीं,

**धर्मनित्यः सदा पाण्डुस्तथा धर्मपरायणः ।**
**सर्वेषु ज्ञातिषु तथा मयि त्वासीद्विशेषतः ॥ ६**
**नासौ किंचिद्विजानाति भोजनादिचिकीर्षितम् ।**
**निवेदयति नित्यं हि मम राज्यं धृतव्रतः ॥ ७**

—महाभारत, आदिपर्व अ. १४२

पाण्डु अत्यंत धर्मपरायण असून सर्वच संबंधी लोकांचे बाबतींत तो आपल्या धर्मप्राप्त कर्तव्यानुसारच वागत असे. माझ्यावर तर त्याचें विशेषच प्रेम होतें. माझी तो सर्व प्रकारची काळजी घेऊन जणू कीं काय मीच राज्याचा धनी आहे अशाच समजुतीनें वागत असे. राजा धृतराष्ट्राचा हाच मान पाण्डवांनींही पुढें चालविला.

धृतराष्ट्राविषयीं सर्व सामान्यपणें अशी एक रूढ समजूत आहे कीं तो स्वभावतः चांगला, धर्मनिष्ठ व सत्प्रवृत्त असून पांडवांच्या राज्याचा अपहार करण्याची त्याची इच्छा नव्हती. इतकेंच नव्हे, तर दुर्योधनाच्या दुष्प्रवृत्तींना आवरण्याचा त्यानें आटोकाट प्रयत्न

केला; पण त्याचें कांहीं एक न चालून दुर्योधनाच्या दुराग्रहामुळें एवढ्या मोठ्या संहाराचा क्षण उगवला. वास्तविक दुर्योधन असला तर दुष्ट आहे, पण धृतराष्ट्र निश्चित नाहीं. तो अगतिक असल्यामुळें त्याचें कांहीं चालूं शकलें नाहीं इतकेंच. या चुकीच्या समजुतीमुळें दोषाचा भागीदार फक्त दुर्योधन ठरून धृतराष्ट्र मात्र सर्वांच्या अनुकंपेचा विषय ठरतो. त्यामुळें महाभारताच्या आश्रम-वासी पर्वांत युधिष्ठिराच्या निर्बंधांना बाजूला सारून आंतरिक संतापानें भीम ज्यावेळीं केवळ शब्दांनींच कां होईना पण धृतराष्ट्राच्या अंत:करणाला यातना देण्यासारखें वर्तन करतो व त्यानें दु:खित धृत-राष्ट्र आहारविहारादि सोडून आपल्याच दु:खांत चूर होऊन बसतो, त्यावेळीं त्याच्याबद्दल अनुकंपा वाटून त्या हतपुत्र, निराश्रित, वृद्ध व परावलंबी राजाविषयीं मर्यादातीत दयेचे भाव कोणाच्याही अंत:-करणांत उत्पन्न होऊन उलट भीमाविषयींच एक प्रकारची अढी निर्माण होते. आश्रमवासी पर्वांत धृतराष्ट्राच्या या दु:खद परिस्थि-तीचें वर्णन करतांना म्हटलें आहे:—

अथ भीमः सुहृन्मध्ये बाहुशब्दं तथाऽकरोत् ।
संश्रवे धृतराष्ट्रस्य गान्धार्याश्चाप्यमर्षणः ।। ५
स्मृत्वा दुर्योधनं शत्रुं कर्णदुःशासनावपि ।
प्रोवाचेदं सुसंरब्धो भीमः स परुषं वचः ।। ६
अन्धस्य नृपतेः पुत्रा मया परिघबाहुना ।
नीता लोकममुं सर्वे नानाशस्त्रास्त्रयोधिनः ।।७
इमौ तौ परिघप्रख्यौ भुजौ मम दुरासदौ ।
ययोरन्तरमासाद्य धार्तराष्ट्राः क्षयं गताः ।। ८
ताविमौ चन्दनेनाक्तौ चन्दनार्हौ च मे भुजौ ।
याभ्यां दुर्योधनो नीतः क्षयं ससुतबान्धवः ।। ९
एताश्चान्याश्च विविधाः शल्यभूता नराधिप ।
वृकोदरस्य ता वाचः श्रुत्वा निर्वेदमागमत् ।। १०
सा च बुद्धिमती देवी कालपर्यायवेदिनी ।। ११
राजा निर्वेदमापेदे भीमवाग्बाणपीडितः ।
तान्वबुध्यत तद्राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।। २४

अस्य पापस्य शुद्ध्यर्थं नियतोऽस्मि सुदुर्मतिः ।
चतुर्थे नियते काले कदाचिदपि चाष्टमे ।। २५
तृष्णाविनयनं भुञ्जे गान्धारी वेद तन्मम ।
करोत्याहारमिति मां सर्वः परिजनः सदा ।। २६
युधिष्ठिरभयाद्वेत्ति भृशं तप्यति पाण्डवः ।
भूमौ शये जप्यपरो दर्भेष्वजिनसंवृतः ।। २७

—महाभारत, आश्रमवासिक पर्व अ. ३.

"धृतराष्ट्र जवळपास असतांना भीमसेनानें आपल्या बाहूंचा शब्द करावा व रागाच्या भरांत धृतराष्ट्राला व गान्धारीला ऐकू जाईल अशा बेतानें दण्ड थोपटून दुर्योधन, कर्ण व दुःशासनाचें शत्रुत्व ध्यानीं आणून असें कठोर बोलावें कीं, मी माझ्या परिघासारख्या प्रबळ बाहूंनीं नाना प्रकारचीं शस्त्रास्त्रें घेऊन या अंधराजाचे युद्ध करणारे सर्व पुत्र ठार मारले. हे माझे पुष्ट बाहू पहा. धार्तराष्ट्र याच्याच आधीन होऊन नष्ट झाले आहेत. माझे चंदनाची उटी लावलेले व ती उटी लावण्यास अत्यंत योग्य असलेले हेच ते हात होत कीं, ज्यांनीं सपुत्रबांधव दुर्योधनाला ठार मारलें. या व अशाच प्रकारच्या अंतःकरणाला घरें पाडणाऱ्या वाक्यांनीं धृतराष्ट्राला अत्यंत वैताग उत्पन्न झाला.

आपली ही परिस्थिति त्यानें पुष्कळ दिवस लपविली. अखेरीस वनवासांत जाऊन देहाचें सार्थक करावें या हेतूनें युधिष्ठिराला त्याविषयींची आज्ञा मागतांना तो म्हणतो :—

"माझ्या पापाच्या शुद्धीसाठीं प्रयत्न करावयाचा मी निश्चय केला आहे. मी उपवास करीत आहें. चवथ्या किंवा आठव्या दिवशीं अगदीं राहवलेंच नाहीं तर भूक मंदावण्यापुरताच मी आहार करतों. ही गोष्ट केवळ गांधारीलाच माहीत आहे. सर्व परिजनांना मी रोज जेवतों असेंच वाटतें व तूं त्यांच्यावर रागावूं नयेस नि तुला दुःख होऊं नये म्हणून मी परिजनांना तसेंच भासवीत असतों. मी शय्या सोडली आहे. दर्भावर हरिणाजिन अंथरून मी भूमिशयन करतों व सदासर्वदा जपजाप्यांत आपला काळ घाल-

वितों." युधिष्ठिराशीं नुसतें येवढें बोलण्यानेंही धृतराष्ट्राला इतका थकवा आला कीं

वयसा च प्रकृष्टेन वाग्व्यायामेन चैव ह ।। ६०
गान्धारीं शिश्रिये धीमान् सहसैव गतासुवत् ।। ६१

—महाभारत, आश्रमवासिक पर्व अ. ३

वृद्ध वय झाल्यामुळें व थकल्यामुळें तेवढ्याच बोलण्यानें राजा धृतराष्ट्राला इतके श्रम झाले कीं तो निश्चेष्ट स्थितींत गांधारीच्या अंगावर पडला. धृतराष्ट्रानें अरण्यवास पत्करावयाचें ठरविलें त्या वेळीं आपल्या सर्व नातलगांचीं व पुत्रांचीं श्राद्धें करावयाचें ठरविलें. त्यावेळीं त्यानें युधिष्ठिराजवळ द्रव्याची याचना केली. युधिष्ठिर व अर्जुन यांनीं मोठ्या आनंदानें आपआपले धनकोश त्याच्या स्वाधीन केले. पण भीमानें मात्र भर राजसभेंत अशी वाणी काढली कीं :—

भीमसेनस्तु सक्रोधः प्रोवाचेदं वचस्तदा ।
वयं भीष्मस्य दास्यामः प्रेतकार्यं तु फाल्गुन ।। १६
श्राद्धानि पुरुषव्याघ्र मा प्रादात्कौरवो नृपः ।। १८
इति मे वर्तते बुद्धिर्मा नो निन्दन्तु शत्रवः ।
कष्टात्कष्टतरं यान्तु सर्वे दुर्योधनादयः ।। १९
यैरियं पृथिवी कृत्स्ना घातिता कुलपांसनैः ।
कुतस्त्वमसि विस्मृत्य वैरं द्वादशवार्षिकम् ।। २०
अज्ञातवासं गहनं द्रौपदीशोकवर्धनम् ।
क्व तदा धृतराष्ट्रस्य स्नेहोऽस्मद्गोचरो गतः ।। २१
कृष्णाजिनोपसंवीतो हृताभरणभूषणः ।
सार्धं पाञ्चालपुत्र्या त्वं राजानमुपजग्मिवान् ।। २२
क्व तदा द्रोणभीष्मौ तौ सोमदत्तोऽपि वाऽभवत् ।
यत्र त्रयोदशसमा वने वन्येन जीवथ ।। २३
न तदा त्वां पिता ज्येष्ठः पितृत्वेनाभिवीक्षते ।
किं ते तद्विस्मृतं पार्थ यदेष कुलपांसनः ।। २४
दुर्बुद्धिर्विदुरं प्राह द्यूते किं जितमित्युत ।

—महाभारत, आश्रमवासिक पर्व अ. ११

" भीमसेन त्या वेळीं रागानें म्हणाला कीं, हे अर्जुना ! आम्हांला भीष्मांच्या उत्तरक्रियेसाठीं जें काय करावयाचें तें आम्ही स्वतंत्रपणें करूं. राजा धृतराष्ट्राला श्राद्ध करूं द्यावें असें मला मुळींच वाटत नाहीं. शत्रूंनीं आमची निंदा करावी व आम्ही त्यांच्या उपहासास व अवहेलनेस पात्र व्हावें असें मला मुळींच वाटत नाहीं. दुर्योधनादिकांच्या सद्‌गतीसाठीं आपण कांहीं करावें असें मला मुळींच वाटत नाहीं. वाइटांतील वाईट नरक गति त्यांना प्राप्त होवो. त्या कुलकलंक नराधमांनीं या संपूर्ण पृथ्वीचा नाश केलेला आहे. ते भयानक बारा वर्षांचें वैर, तो कष्टदायक अज्ञातवास, ते द्रौपदीला झालेले कष्ट, व तिचा करुणविलाप तू विसरलास काय? आमच्यावरचें धृतराष्ट्राचें प्रेम त्या वेळीं कोठें गेलें होतें ? ज्या वेळीं अंगावरील सर्व भूषणें काढून घेतलेल्या अवस्थेंत कटीला कृष्णाजिन व गळ्यांत केवळ उपवीत धारण करून भणंग भिकारी अवस्थेंत तू पंचालराजकन्या द्रौपदीसहित या धृतराष्ट्राकडे गेलास त्या वेळीं याचें प्रेम अटलें होतें काय? तेरा वर्षें दुर्दैवाचे दशावतार आम्ही अरण्यांत उपभोगीत असतां ते भीष्म व द्रोण आणि तो सोमदत्त कोठें होता ? त्या वेळीं आपला हा ज्येष्ठ पिता तुझ्याशीं पित्याप्रमाणें वर्तन करावयास मुळींच सिद्ध नव्हता. हे पार्था ! हा कुलांगार दुर्बुद्धि धृतराष्ट्र द्यूतामध्यें विदुराला वारंवार काय जिंकलें ! काय जिंकलें ! ! म्हणून विचारीत होता तें तूं विसरलास काय ? भीमाचे हे उद्‌गार ऐकतांच कोणालाही दुःख झाल्याखेरीज राहात नाहीं. पण मी याच्याच जोडीला दोन वेगळीं शब्दचित्रें आपणांसमोर मांडतों. पहा बरें ! आश्रमवासी पर्वांतील रेखाचित्रांचा आपणावर अणुमात्र तरी परिणाम होतो काय ? राजा धृतराष्ट्राविषयीं आपणांस अणुमात्र तरी अनुकंपा वाटते काय ?

(१) कपटपटु शकुनि कपटद्यूतानें युधिष्ठिराची नागवणूक करीत आहे. सर्वस्व हरलेला युधिष्ठिर हट्टाला पेटून स्वतःलाही पणाला लावून गमावून बसला आहे. अशा वेळीं शकुनि त्याला म्हणतो :—

**अस्ति ते वै प्रिया राजन्ग्लह एकोऽपराजितः ।**
**पणस्व कृष्णां पाञ्चालीं तयात्मानं पुनर्जय ॥ ३२**

—महाभारत, सभापर्व अ. ६५

"हे राजन्! अजून एक पराजित न झालेली वस्तु तुझ्याजवळ आहे. ती वस्तु म्हणजे तुझी प्रिया पांचाली होय. तिला पणाला लाव व जें हरलास तें जिंकून घे." शकुनीच्या या वाक्यानंतर द्यूताच्या कैफांत कार्याकार्यविवेक विसरलेला युधिष्ठिर हातांत फांसे घेऊन द्रौपदीलाच पणाला लावावयास निघाला. तो म्हणाला :

**शारदोत्पलसेविन्या रूपेण श्रीसमानया ॥ ३४**
**तथैव स्यादानृशंस्यात्तथा स्याद्रूपसंपदा ।**
**तथा स्याच्छीलसंपत्या यामिच्छेत्पुरुषः स्त्रियम् ॥ ३५**
**तयैवंविधया राजन्पाञ्चाल्याहं सुमध्यया ।**
**ग्लहं दीव्यामि चार्वङ्ग्या द्रौपद्या हन्त सौबल ॥ ३९**

—महाभारत, सभापर्व अ. ६५

"शरद्ऋतूंतील कमलाप्रमाणें जिचे विस्तीर्ण डोळे आहेत, शारदीय कमलाप्रमाणें जिचा गंध आहे, शारदीय कमळें जिला अत्यंत आवडतात, रूपानें जिला प्रत्यक्ष लक्ष्मी म्हणावें लागेल, हृदयाची श्रीमंती, रूपसंपत्ति व शीलचारित्र्य या सर्व गोष्टी जिच्या ठिकाणीं पुरुषांच्या कल्पनासृष्टींत असाव्या इतक्या परिपूर्ण आहेत, त्या पांचालीला मी भरसभेंत पणास लावतों." युधिष्ठराच्या तोंडून हीं वाक्यें निघालीं मात्र, महाभारतकार वर्णन करतातः—

**एवमुक्ते तु वचने धर्मराजेन धीमता ।**
**धिग्धिगित्येव वृद्धानां सभ्यानां निःसृता गिरः ॥ ४०**
**चक्षुभे सा सभा राजन्राज्ञां संजज्ञिरे शुचः ।**
**भीष्मद्रोणकृपादीनां स्वेदश्च समजायत ॥ ४१**
**शिरो गृहीत्वा विदुरो गतसत्त्व इवाभवत् ।**
**आस्ते ध्यायन्नधोवक्त्रो निःश्वसन्निव पन्नगः ॥ ४२**
**धृतराष्ट्रस्तु तं हृष्टं पर्यपृच्छत्पुनः पुनः ।**
**किं जितं किं जितमिति ह्याकारं नाभ्यरक्षत ॥ ४३**

—महाभारत, सभापर्व अ. ६५

याप्रमाणें युधिष्ठिराच्या तोंडून वाणी निघतांच सभ्यांच्या तोंडून 'धिक्कार' 'धिक्कार' अशा प्रकारचे शब्द बाहेर पडले. सर्व सभा अत्यंत क्षुब्ध झाली व सभेंतील सर्व सामंत दुःखांत बुडून गेले. भीष्म, द्रोण व कृपाचार्य यांच्या शरीराचा भीतीनें थरकांप उडून त्यांना घाम आला. मस्तक तळहातावर टेकून विदुर एखाद्या प्रेताप्रमाणें निश्चल बनला. पण हें सर्व द्यूत थांबविण्याचें सामर्थ्य ज्याच्या एका शब्दांत होतें तो डोळयांनीं अंध पण कानांनीं मुळींच बधिर नसलेला राजा धृतराष्ट्र मात्र त्या निश्चेष्ट विदुराला पुन्हां पुन्हां स्पर्श करून आनंदानें काय जिंकलें! काय जिंकलें!! म्हणून विचारीत होता. स्वतःचा हर्ष व अंतःकरणाची क्षुद्रता त्याला मुळींच लपवितां आली नाहीं. त्यानंतरही द्रौपदीच्या वस्त्रहरणाचा भीषण प्रकार तो ऐकत असतांनाच घडला. दुःशासन द्रौपदीच्या केसांना हिसडे देत तिला सभेंत ओढीत आणूं लागला, त्या वेळी तिनें केलेला करुण विलाप धृतराष्ट्रानें आपल्या कानांनीं ऐकला, पण द्रौपदीच्या विलापानें त्याच्या हृदयाला करुणेचा पाझर फुटला नाहीं. कुलवधूला नग्न करण्याच्या दुःशासनाच्या प्रवृत्तीचा निषेध करावा असें त्याला कधींही वाटलें नाहीं. दुर्योधनानें तिला मांडी उघडी करून दाखविली व नाना प्रकारें तिची विटंबना चालविली त्यामुळेंही त्याचें मन विचलित झालें नाहीं. शेवटीं प्रत्यक्ष गांधारीनें अंतःपुरांतून बाहेर येऊन ज्यावेळीं रदबदली केली, त्यावेळीच पुढील अनिष्ट प्रकार टळले आहेत. भारताची महान् सम्राज्ञी नग्न होण्याच्या अप्रतिष्ठेच्या गर्तेत फेंकली जाऊन अश्रूंच्या प्रवाहानें न्हाऊन निघत आहे व अशाही स्थितींत आपल्या प्रजेचे डोळे झांकून आपण कपटानें संपत्ति पदरांत पाडून ऐश्वर्याच्या शिखरावर कसे आरूढ झालों आहोंत याच तन्मयतेंत राजा धृतराष्ट्र गर्क आहे, हें दृश्य आपल्या डोळयासमोर आणा आणि आश्रमवासी पर्वांतील भीम केवळ अप्रत्यक्षपणें धृतराष्ट्राला करीत असलेल्या शब्दताडनाच्या दृश्याशीं त्याची तुलना करा. म्हणजे कोणतें दृश्य अधिक करुणास्पद आहे याची कल्पना येते. धृतराष्ट्राविषयीं किंचित् मात्र

तरी अनुकंपा यानंतर वाटूं शकते काय? आणखी एक दृश्य आपल्या मनःचक्षूसमोर आणा.

(२) पाण्डूनें राजा धृतराष्ट्राला किती सन्मानपूर्वक वागविलें हें आपण पाहिलेंच. तो अवचित् अरण्यांत कालवश झाल्यानंतर त्याची विधवा स्त्री आपल्या पांच पुत्रांना घेऊन धृतराष्ट्राकडे आश्रय मागावयास आल्यानंतर विश्वासानें मांडीवर डोकें टेकलेल्या त्या अनाथ विधवेचा तिच्या पांच पुत्रांसहित विनाश करावा म्हणून नानाप्रकारचीं कारस्थानें करण्यांत राजा धृतराष्ट्र गुंग झाला, इतकेंच नव्हे, तर तिला तिच्या इच्छेविरुद्ध वारणावतांत पाठविण्यांत येऊन तिला जाळून टाकण्याचेंही कारस्थान उभारलें गेलें. त्यांतून कशी तरी वांचून ती रानोमाळ आपल्या पुत्रांसहित नरमांसभक्षक वन्य जाती व हिंस्र श्वापदें यांचा अनिरुद्ध संचार असलेल्या विजनांतून फिरते आहे व उभारलेलें नाटक आनंदपर्यवसायी होऊन लोकक्षोभाला आपण बळी पडूं नये म्हणून राजा धृतराष्ट्र विलापाचें ढोंग करण्यांत गुंतला आहे या दृश्याशीं, केवळ शब्दताडनामुळें व तेंही अप्रत्यक्षपणें केलेल्या शब्दताडनामुळें विव्हळ होणाऱ्या आश्रमवासीपर्वांतील धृतराष्ट्राशीं तुलना करा म्हणजे आपणांस कोणतें दृश्य अधिक करुणास्पद वाटतें याची खात्री पटेल. धृतराष्ट्र हाच खरा महाभारताचा 'खलनायक' होय. तो अत्यंत गूढ आहे. सर्पाची गति ज्याप्रमाणें अप्रत्यक्ष असते व दंश फक्त प्रचीतीस येतो, अशीच धृतराष्ट्राच्या आक्रमणाची वाटचाल अत्यंत गुप्त आहे. त्यामुळें महाभारत संहितेचें वरवर वाचन करणारास धृतराष्ट्राच्या खऱ्या व्यक्तिमत्त्वाची कल्पना येत नाहीं. त्यानें दुर्योधनाला ठिकठिकाणीं दिलेलीं दूषणें, त्यानें त्याची भरसभेंत अनेकवार केलेली निंदा आपण अत्यंत सोज्ज्वळ असून केवळ अगतिकतेमुळेंच आपणांस हें सर्व सहन करावें लागतें हें सर्व दाखविण्याची त्याची प्रवृत्ति, पांडवांची त्यानें वारंवार केलेली प्रशंसा, धर्म व न्याय यांसाठीं त्यानें वारंवार केलेले आक्रोश हीं सर्व त्याचीं बाह्यस्वरूपें अथवा ढोंगें आहेत. बगळा ज्याप्रमाणें साधूचा आव आणून नदीच्या तीरावर

एकाच पायावर उभा राहून माशांना फसविण्यापुरतीच तपश्चर्या करतो व ते आटोक्यांत येतांच त्यांना गिळंकृत करतो त्याचप्रमाणें राजा धृतराष्ट्राचेंही आहे. " बकवत् साधयेदर्थान् " या कूटनीतीची धृतराष्ट्र ही केवळ मूस होय. राजा धृतराष्ट्र याच्या या स्वभाव-विशेषांचा, महाभारत सूक्ष्मतेनें पाहिल्यास, ठिकठिकाणीं प्रत्यय आल्यावांचून रहात नाहीं. दुर्योधनावर त्याचें प्रेम होतें, येवढ्याच कारणास्तव तो त्याच्या कुकृत्यांना संमति देतो असें नसून त्याच्या स्वतःच्याच अंतःकरणांत पांडवांच्याविषयीं असूयेनें पेट घेतलेला असतो असें महाभारतांत म्हटलें आहे. राज्य पांडूचें असल्या-मुळें तें त्याच्या ज्येष्ठ पुत्राला मिळावें ही गोष्ट उघडच होती. पांडूनें अरण्यांत जातांना आपलें राज्य धृतराष्ट्राच्या स्वाधीन केलें व तसें तें पांडूनें केलें म्हणूनच त्याचीं मुलें अल्पवयी असल्यामुळें प्रजांनींही धृतराष्ट्राला तात्पुरती संमति दिली. अर्थात् धृतराष्ट्र याप्रमाणें सिंहासनाचा कारभार चालवूं लागला तरी राज्याचा पुढचा वारस धृतराष्ट्रानंतर कां होईना पण युधिष्ठिरच होता ही गोष्ट निर्विवाद होती. या बाबतीत महाभारतांत असें म्हटलें आहे कीं:—

तथा पाण्डुर्नरपतिः सत्यसंधो जितेन्द्रियः ।
राजा कुरूणां धर्मात्मा सुव्रतः सुसमाहितः ।। ३
ज्येष्ठाय राज्यमददद् धृतराष्ट्राय धीमते ।
यवीयसे तथा क्षत्रे कुरूणां वंशवर्धनः ।। ४
ततः सिंहासने राजन् स्थापयित्वैनमच्युतम् ।
वनं जगाम कौरव्यो भार्याभ्यां सहितो नृपः ।। ५
नीचैः स्थित्वा तु विदुर उपास्ते स्म विनीतवत् ।
प्रेष्यवत् पुरुषव्याघ्रो वालव्यजनमुत्क्षिपन् ।। ६
ततः सर्वाः प्रजास्तात धृतराष्ट्रं जनेश्वरम् ।
अन्वपद्यन्त विधिवद्यथा पाण्डुं जनाधिपम् ।। ७
विसृज्य धृतराष्ट्राय राज्यं सविदुराय च ।
चचार पृथिवीं पाण्डुः सर्वां परपुरञ्जयः ।। ८

कोशसंवनने दाने भृत्यानां चान्ववेक्षणे ।
भरणे चैव सर्वस्य विदुरः सत्यसङ्गरः ।। ९
सन्धिविग्रहसंयुक्तो राज्ञां संवाहनक्रियाः ।
अवैक्षत महातेजाः भीष्मः परपुरञ्जयः ।। १०
सिंहासनस्थो नृपतिर्धृतराष्ट्रो महाबलः ।
अन्वास्यमानः सततं विदुरेण महात्मना ।। ११

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १४८

"कौरवांचा धर्मात्मा, सत्यसंध, व्रतनिष्ठ, जितेंद्रिय राजा जो पाण्डु त्यानें वनांत जाण्याचा निश्चय करून राज्य धृतराष्ट्राच्या आधीन केलें व तो आपल्या स्त्रियांसहित मृगया, व विहार करण्यास्तव वनसंचार करूं लागला. राजा धृतराष्ट्र राज्यप्रमुख म्हणून कारभार पाहूं लागल्यानंतर विदुर अत्यंत नम्रपणें चामर हातांत घेऊन त्याची सेवा करूं लागला. प्रजा ज्याप्रमाणें पाण्डूला भजत, त्याचप्रमाणें त्या पाण्डूनेंच राज्य स्वाधीन केलेल्या धृतराष्ट्राचाही सन्मान राखू लागल्या. विदुरासहित धृतराष्ट्राच्या स्वाधीन राज्य करून पाण्डु पृथ्वीवर संचार करूं लागला. कोशसंग्रह, कोशव्यय, अधिकारी नियुक्त करणें व सर्वांचें पालनपोषण इत्यादि कामें विदुरानें यथावत् चालविलीं. राज्यव्यवहार व संधिविग्रहादिक कार्यें भीष्म पाहूं लागले व सिंहासनावर धृतराष्ट्र राहिला."

हें द्रोणांचें भाषण आहे. धृतराष्ट्राला याप्रमाणें सिंहासनावर येण्याची संधि पाण्डूच्याच कृपेनें मिळाली असली तरी तें कांहीं पाण्डूनें राजा धृतराष्ट्राला सतत दिलेलें राज्याचें दानपत्र नव्हतें कीं वंशपरंपरागत तें त्याच्याकडे रहावें. ती एक तात्पुरत्या स्वरूपाची व्यवस्था आहे. त्यामुळें त्या राज्याचा भावी वारस अर्थात्च युधिष्ठिर होता. राज्याचे प्रमुख सूत्रचालक भीष्म, यांनीं स्वतःच ही गोष्ट उद्योगपर्वांत सांगितलेली आहे. ती पुढीलप्रमाणें :—

राजा तु पाण्डुरभवन्महात्मा लोकविश्रुतः ।। ३९
स राजा तस्य ते पुत्राः पितुर्दायाद्यहारिणः ।। ४०

—महाभारत, उद्योगपर्व अ. १४७

सर्व लोकांत विख्यात कीर्ति असलेला पाण्डु हाच राजा असल्यामुळें त्याचे पुत्र हेच त्याच्या संपत्तीचे धनी ठरतील ही गोष्ट निर्विवाद आहे. त्याप्रमाणें सर्व अध्ययन पूर्ण झाल्यावर सर्वांच्या संमतीनेंच युधिष्ठाराला धृतराष्ट्रानें यौवराज्याचा अभिषेक केला. युधिष्ठिर युवराज झाल्यानंतर तो आपल्या अंगच्या गुणांनी अत्यंत लोकप्रिय झाला. त्याचे बंधु त्याच्या आज्ञेंत राहून राज्यविस्तार करूं लागले. त्यांची परस्परांतील एकी, त्यांचा प्रभाव व पराक्रम यांमुळें ते जसजसे लोकप्रिय होऊं लागले तसतसा राजा धृतराष्ट्राला त्यांच्याविषयीं अकारण मत्सर वाटू लागून त्याचें अंतःकरण त्यांच्याविषयींच्या दुष्टभावनेनें भरून गेलें. महाभारत म्हणतें :—

ततः संवत्सरस्यान्ते यौवराज्याय पार्थिव ।
स्थापितो धृतराष्ट्रेण पाण्डुपुत्रो युधिष्ठिरः ।। १
धृतिस्थैर्यसहिष्णुत्वादानृशंस्यात्तथार्जवात् ।
भृत्यानामनुकम्पार्थं तथैव स्थिरसौहृदात् ।। २
ततोऽदीर्घेण कालेन कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
पितुरन्तर्दधे कीर्ति शीलवृत्तसमाधिभिः ।। ३
असियुद्धे गदायुद्धे रथयुद्धे च पाण्डवः ।
संकर्षणादशिक्षद्वै शश्वच्छिक्षां वृकोदरः ।। ४
समाप्तशिक्षो भीमस्तु द्युमत्सेनसमो बले । ५
अर्जुनस्य समो लोके नास्ति कश्चिद्धनुर्धरः ।। १६
गदायुद्धेऽसियुद्धे च रथयुद्धे च पाण्डवः ।
पारगश्च धनुर्युद्धे बभूवाथ धनंजयः ।। १७
नीतिमान्सकला नीतिं विबुधाधिपतेस्तदा ।
अवाप्य सहदेवोऽपि भ्रातॄणां वर्तते वशे ।। १८
द्रोणेनैव विनीतश्च भ्रातॄणां नकुलः प्रियः ।
चित्रयोधी समाख्यातो बभूवातिरथोदितः ।। १९
धनौघं प्रापयामास कुरुराष्ट्रं धनंजयः ।। २५
एवं सर्वे महात्मानः पाण्डवा मनुजोत्तमाः ।
परराष्ट्राणि निर्जित्य स्वराष्ट्रं ववृधुः पुरा ।। २६
ततो बलमतिख्यातं विज्ञाय दृढधन्विनाम् ।। २७

—महाभारत, आदिपर्व अ. १३९

त्यानंतर एक वर्षानें धृतराष्ट्रानें यौवराज्यावर पांडुपुत्र युधिष्ठिराची स्थापना केली. धैर्य, स्थैर्य, सहिष्णुता, प्रेमळपणा, नम्रता, ज्याच्यावर प्रेम केलें त्यावर तें स्थिर राखणें, व हाताखालच्या अधिकाऱ्यांवरील ममत्व, शील, चारित्र्य व मनाचा खंबीरपणा, यामुळें लौकरच कुंतीपुत्र युधिष्ठिरानें आपले वडील पाण्डु यांच्या कीर्तीवरही मात केली व तो अत्यंत लोकप्रिय होऊन राहिला. खड्गयुद्ध, गदायुद्ध, रथयुद्ध या सर्वांच्यांत भीमसेनानें अत्यंत प्रावीण्य मिळविलें. त्यानें बलरामाजवळून शस्त्रास्त्र विद्येचें खास शिक्षण घेतलें व त्यानंतर तो अत्यंत बलशाली व पराक्रमसंपन्न म्हणून गणला जाऊं लागला. तो आपल्या ज्येष्ठ भ्रात्याच्या नेहमीं आज्ञेंत असे. अर्जुन धनुर्विद्येंत तर अलौकिकच होता. त्याचप्रमाणें गदायुद्ध, खड्गयुद्ध व रथयुद्ध यांतही तो अत्यंत प्रवीण होता. सहदेव हा बृहस्पतीच्या नीतिशास्त्रांत अत्यंत प्रवीण होता. नकुलही कलात्मक युद्ध करणारा असून अतिरथी म्हणून विख्यात होता. अर्जुनानें अनेक राज्यें जिंकून आपल्या पराक्रमानें अपार धन कुरु राष्ट्राला मिळवून दिलें. याप्रमाणें सर्वश्रेष्ठ पांडवांनीं विजय संपादन करून आपलें राष्ट्र वाढवावयास प्रारंभ केला. त्यांचें विख्यात बळ, पराक्रम, लोकप्रियता, अभेद्य एकी इत्यादि पाहून धृतराष्ट्राचें अंतःकरण त्यांच्याविषयीं दूषित झालें व त्यांचा विनाश कसा करतां येईल आणि हातीं असलेलें सर्व राज्य सदाचेंच कसें गिळंकृत करतां येईल याचा विचार त्याच्या अंतःकरणांत सुरू झाला. त्यानें कणिक नांवाच्या एका कूटनीतिज्ञाला एकांतांत बोलावून आणून त्याच्याशीं गुप्तपणानें बोलणें केलें व त्याच्याजवळून कूटनीतीचे पाठ घेऊन तदनुसार आपल्या कारस्थानांना प्रारंभ केला. धृतराष्ट्राचें स्वभावचित्र उलगडण्याच्या दृष्टीनें कणिकनीतींतील प्रमेयांचें फार महत्त्व आहे. महाभारतकारांनीं आदिपर्वाच्या १४० व्या अध्यायांत कणिकनीति सांगून १४१ व्या अध्यायापासून धृतराष्ट्राच्या कपट कारस्थानाच्या वर्णनाला प्रारंभ केलेला आहे. यांत काव्याच्या दृष्टीनें पौर्वापर्य क्रम अत्यंत उत्कृष्ट

रीतीनें साधण्यांत आलेला आहे. जणू कीं काय कणिकनीति हा प्रतिपाद्य विषय व धृतराष्ट्र हें त्याचें प्रात्यक्षिक वाटतें. या दृष्टीनें धृतराष्ट्राचें स्वरूप ध्यानांत येण्यास कणिकानें त्याला केलेल्या उपदेशाचें स्वरूप लक्षांत घेणें अत्यंत आवश्यक आहे. कणिकानें धृतराष्ट्राला काय सांगितलें ?

## कणिकाचा उपदेश

वैशंपायन उवाच ।

श्रुत्वा पाण्डुसुतान्वीरान्बलोद्रिक्तान्महौजसः ।
धृतराष्ट्रो महीपालश्चिन्तामगमदातुरः ।।१
तत आहूय मन्त्रज्ञं राजशास्त्रार्थवित्तमम् ।
कणिकं मंत्रिणां श्रेष्ठं धृतराष्ट्रोऽब्रवीद्वचः ।। २

धृतराष्ट्र उवाच ।

उत्सक्ताः पाण्डवा नित्यं तेभ्योऽसूये द्विजोत्तम ।
तत्र मे निश्चिततमं संधिविग्रहकारणम् ।
कणिक त्वं ममाचक्ष्व करिष्ये वचनं तव ।। ३

वैशंपायन उवाच ।

स प्रसन्नमनास्तेन परिपृष्टो द्विजोत्तमः ।
उवाच वचनं तीक्ष्णं राजशास्त्रार्थदर्शनम् ।। ४
नास्य छिद्रं परः पश्येच्छिद्रेण परमन्वियात् ।
गूहेत्कूर्म इवाङ्गानि रक्षेद्विवरमात्मनः ।। ८
नासम्यक्कृतकारी स्यादुपक्रम्य कदाचन ।
कण्टको ह्यपि दुश्छिन्न आस्रावं जनयेच्चिरम् ।। ९
वधमेव प्रशंसन्ति शत्रूणामपकारिणाम् ।
सुविदीर्णं सुविक्रान्तं सुयुद्धं सुपलायितम् ।। १०
आपद्यापदि काले च कुर्वीत न विचारयेत् ।
नावज्ञेयो रिपुस्तात दुर्बलोऽपि कथंचन ।। ११
अन्धः स्यादन्धवेलायां बाधिर्यमपि चाश्रयेत् ।। १२
कुर्यात्तृणमयं चापं शयीत मृगशायिकाम् ।
सान्त्वादिभिरुपायैस्तु हन्याच्छत्रुं वशे स्थितम् ।। १३

दया न तस्मिन्कर्तव्या शरणागत इत्युत ।
निरुद्विग्नो हि भवति न हताज्जायते भयम् ।। १४
अग्न्याधानेन यज्ञेन काषायेण जटाजिनैः ।
लोकान्विश्वासयित्वैव ततो लुम्पेद्यथा वृकः ।। १९
वहेदमित्रं स्कंधेन यावत्कालस्य पर्ययः ।। २१
ततः प्रत्यागते काले भिन्द्याद्घटमिवाश्मनि ।
अमित्रो न विमोक्तव्यः कृपणं बह्वपि ब्रुवन् ।। २२
कृपा न तस्मिन्कर्तव्या हन्यादेवापकारिणम् ।
हन्यादमित्रं सान्त्वेन तथा दानेन वा पुनः ।। २३
पुत्रः सखा वा भ्राता वा पिता वा यदि वा गुरुः ।
रिपुस्थानेषु वर्तन्तो हन्तव्या भूतिमिच्छता ।। ५२
शपथेनाप्यरिं हन्यादर्थदानेन वा पुनः ।
विषेण मायया वापि नोपेक्षेत कथंचन ।। ५३
उभौ चेत्संशयोपेतौ श्रद्धावांस्तत्र वर्धते ।।५३
क्रुद्धोऽप्यक्रुद्धरूपः स्यात्स्मितपूर्वाभिभाषिता ।
न चाप्यन्यमपध्वंसेत्कदाचित्कोपसंयुतः ।। ५५
प्रहरिष्यन्प्रियं ब्रूयात्प्रहरन्नपि भारत ।
प्रहृत्य च कृपायीत शोचेत च रुदेत च ।। ५६
आश्वासयेच्चापि परं सान्त्वधर्मार्थवृत्तिभिः ।
अथास्य प्रहरेत्काले यदा विचलिते पथि ।। ५७
अपि घोरापराधस्य धर्ममाश्रित्य तिष्ठतः ।
सहि प्रच्छाद्यते दोषः शैलो मेघैरिवासितैः ।।५८
यः स्यादनुप्राप्तवधस्तस्यागारं प्रदीपयेत् ।। ५९
प्रत्युत्थानासनाद्येन संप्रदानेन केनचित् ।
प्रतिविश्रब्धघाती स्यात्तीक्ष्णदंष्ट्रो निमग्नकः ।। ६०
वाचा भृशं विनीतः स्याद् हृदयेन तथा क्षुरः ।
स्मितपूर्वाभिभाषी स्यात्सृष्टो रौद्रेण कर्मणा ।। ६६
अञ्जलिः शपथः सान्त्वं शिरसा पादवन्दनम् ।
आशाकरणमित्येवं कर्तव्यं भूतिमिच्छता ।। ६७

नाच्छित्त्वा परमर्माणि नाकृत्वा कर्म दारुणम् ।
नाहत्वा मत्स्यघातीव प्राप्नोति महतीं श्रियम् ॥ ७७
नास्य कृत्यानि बुध्येरन्मित्राणि रिपवस्तथा ।
आरब्धान्येव पश्येरन्सुपर्यवसितान्यपि ॥ ८१
भ्रातृव्या बलिनो यस्मात्पाण्डुपुत्राः नराधिप ।
पश्चात्तापो यथा न स्यात्तथा नीतिर्विधीयताम् ॥ ८२

—महाभारत, आदिपर्व, अध्याय १४०

पाण्डुपुत्र वीर, अत्यंत बलवान, अत्यंत तेजस्वी आहेत हें पाहून राजा धृतराष्ट्राला अतिशय चिंता वाटूं लागली. म्हणून राज्यशास्त्रामध्यें अत्यंत निष्णात असलेल्या मंत्रिश्रेष्ठ कणिकाला बोलावून धृतराष्ट्र त्याला म्हणाला कीं, हे ब्राह्मणश्रेष्ठा ! पाण्डव एकसारखे उत्कर्ष पावत असल्यामुळें माझ्या अंतःकरणांत त्यांच्याविषयीं असूया निर्माण झालेली आहे. अशा स्थितींत संधि व विग्रहाच्या धोरणाचें यथावत् विवेचन करणारें शास्त्र तूं मला समजावून सांग. तूं जसें सांगशील त्याप्रमाणेंच मी वागेन. हें ऐकतांच अत्यंत प्रसन्न होऊन त्या ब्राह्मणानें राजनीतिशास्त्रांतील लाभकारक अशीं अत्यंत कठोर प्रमेयें धृतराष्ट्राला समजावून सांगितलीं. तो म्हणाला : आपलें छिद्र कोणीही पाहूं नये, याची पूर्णपणें काळजी घेऊन ज्याप्रमाणें कासव आपलीं सर्व अंगें गुप्त करून ठेवतो, त्याप्रमाणेंच ज्यामुळें आपला नाश होण्याचा संभव आहे अथवा ज्याच्यांत दुसरे आपलें ग्रहण करूं शकतात अशा आपल्या सर्व बाबी अत्यंत गुप्त ठेवाव्या. याच्या उलट अत्यंत सावधगिरीनें शत्रूंचीं छिद्रें मात्र कसोशीनें पहात असावें. एकदां शत्रुविनाशाला प्रारंभ केला कीं, त्याचा संपूर्ण विध्वंस केल्याशिवाय कधींही राहूं नये. कांटा पायांत अर्धवट मोडला तर तो सतत रक्त वाहविल्याशिवाय राहात नाहीं. शत्रु उन्मत्त असो, खूप पराक्रमी असो, युद्धांत कुशल असो, वेळेचें महत्त्व जाणून व त्याच्या आपत्तींत त्याला हार खावयास लावून त्याच्याबद्दल दयेचा विचारही अंतःकरणांत न आणतां त्याला संपूर्णपणें नष्ट केल्याशिवाय कधींही राहूं नये. शत्रु दुर्बळ असला तरी

त्याची उपेक्षा कधींही करूं नये. थोडासा अग्नि देखील सर्व अरण्य जाळून भस्म केल्याशिवाय कधींही राहात नाहीं. वेळेनुसार कधीं अंध व्हावें तर कधीं बधिर व्हावें; व आपल्या समोर गोष्टी घडत असतांही आपल्याला त्या मुळींच कळत नाहींत असें दाखवावें. कान चांगले तीक्ष्ण असतांनादेखील खुशाल बहिरेपणाचें सोंग घ्यावें. कधीं तृणाचे चाप करावे व व्याध ज्याप्रमाणें मृगांच्या अंतःकरणांत विश्वास उत्पन्न करतो त्याप्रमाणें ढोंगीपणानें नि गरिबीनें वागून व सांत्वन, नम्रता इत्यादि सर्व उपायांचें अवलंबन करून शत्रूच्या मनांत आपल्याविषयीं विश्वास उत्पन्न करून त्याला ताब्यांत घ्यावें व ठार मारावें. याला गवतांत झांकलेलें धनुष्य म्हणतात. कारण वरून दिसायला तें जरी गवत वाटलें तरी आंत असतें प्राणहारक धनुष्य. शत्रु शरण आला आहे म्हणून त्याच्यावर कधींही दया करूं नये. कारण त्याला स्वास्थ्य मिळालें कीं तो भय उत्पन्न केल्यावांचून राहात नाहीं. एकदां ठारच मारल्यावर भय कोठचें? अग्निपूजेचें व्रत धारण करून, यज्ञयागादि कर्माचें ढोंग उभारून, काषाय वस्त्रें परिधान करून, जटा व हरिणाजिनांचा अवलंब करून लोकांच्या अंतःकरणांत आपल्याविषयीं विश्वास उत्पन्न करावा. नंतर लांडग्याप्रमाणें त्यांचें सर्वस्व लुबाडावें. जोंवर आपला काळ वाईट आहे तोंवर शत्रूलाही खुशाल खांद्यावरून वाहावें, व पुन्हां काळ अनुकूल आला कीं घडा ज्याप्रमाणें दगडावर आपटून फोडून टाकतात त्याप्रमाणें आपल्या शत्रूला नष्ट करावें. शत्रु कितीही प्रार्थना करीत असला तरीही त्याला कधींही सोडूं नये. त्याच्यावर कधीं दया दाखवूं नये. त्याला ठारच मारावें. साम, दाम, भेद, दण्ड इत्यादि सर्व उपायांचा अवलंब करून शत्रूला ठार मारावें. शत्रूच्या नात्यांत खाजगी नातीं येत नसतात. पुत्र, मित्र, बंधु, पिता अथवा गुरु कोणीही असो, एकदां तो आपला शत्रु आहे असें ठरविलें कीं, ज्याला स्वतःचें कल्याण व्हावें अशी इच्छा आहे त्यानें त्यांना ठार मारल्याशिवाय कधींही राहूं नये. ज्याला आपल्याला मारावयाचें आहे त्याच्या मनांत आपल्याविषयीं अपार प्रेम आहे असें दाखवून धार्मिकतेचें ढोंग उभारून व त्याचा मोठा

आदरसत्कार करीत असल्याचेंही दाखवून त्याची वंचना करावी व वेळ आली तर त्याला ठार मारावें. अत्यंत घोर जरी अपराध केला तरी वरून जो धर्माचें भरपूर ढोंग करूं शकतो त्याचे दोष व अपराध मेघांनीं पर्वत झांकला जावा त्याप्रमाणें झांकले जातात. ज्याला आपल्याला ठार मारावयाचें आहे त्याला कसलाही संशय येऊं देऊं नये. त्याला उत्थापन देऊन व आसनादिकांनीं आदरसत्कार करून, क्वचित् देणग्याही देऊन शत्रूच्या मनांत प्रथम विश्वास उत्पन्न करावा व त्याच्या अंतःकरणांत भरपूर विश्वास उत्पन्न झाला कीं त्याच्यावर असा जीवघेऊ प्रहार करावा कीं त्याला उठूं म्हणून देऊं नये. वाणीनें अत्यंत विनीत असावें पण हृदय वस्तऱ्याच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण असावें. अंतःकरणांत केवढेंही क्रूर कृत्य करावयाची इच्छा असली तरीही बोलतांना मात्र नेहमीं स्मितपूर्वकच बोलावें. हात जोडणें, वचनें देणें, सांत्वना दाखविणें, पायावर डोकें ठेवणें, वाटेल तशीं आश्वासनें देऊन आशा उत्पन्न करणें, यापैकीं कोणत्याही गोष्टीचा वेळ पडेल त्याप्रमाणें अवश्य उपयोग करावा. ज्याला आपलें कल्याण करून घ्यावयाचें आहे त्यानें या सर्व गोष्टींचा अवलंब करावयास हृदय कचरूं देऊं नये. दुसऱ्याच्या मर्मावर आघात केल्यावांचून, अत्यंत दारुण कर्म केल्यावांचून व बगळ्याप्रमाणें ढोंग करून आघात केल्यावांचून जगांत कोणालाही मोठें ऐश्वर्य प्राप्त झालेलें नाहीं. इतक्या गुप्तपणानें कोणतेंही काम करावें कीं आपले शत्रु मित्र दोघांनाही तिच्या प्रयोगाचा पत्ता लागूं नये. केवळ परिणामांवरूनच त्यांना काय ज्ञान व्हावयाचें असेल तें होईल. इतक्या दक्षपणें या बाबतींत वागावें. जर पाण्डुपुत्र बलवान् आहेत व जर तूं त्यांना आपले शत्रु समजतोस तर तुला ज्यायोगें पश्चात्ताप होणार नाहीं अशाच पद्धतीनें या नीतीचा तूं अवलंब कर."

मी येथें सर्व कणिकनीति उद्धृत केलेली नाहीं. धृतराष्ट्राचें व्यक्तिचित्र उलगडावयास तिच्या ज्या तत्त्वांचा परिचय असणें आवश्यक आहे, तेवढ्यांचाच मी येथें उल्लेख केलेला आहे. हीं तत्त्वें ध्यानांत ठेवून राजा धृतराष्ट्राच्या व्यक्तिचित्राकडे पाहिलें तर काय दृष्टोत्पत्तीस येईल ? तें आपण पुढच्या व्याख्यानांत पाहूं.

# १०. धृतराष्ट्राचें स्वभावचित्र

मागच्या व्याख्यानांत उद्‌धृत केलेल्या कूटनीतीच्या अथवा कणिक नीतीच्या संबंधीं नेहमींच अशी एक गोष्ट सांगण्यांत येते कीं, या नीतीचे प्रयोग जगांतील सर्वच राजकारणधुरंधर पुरुषांनीं केलेले असल्यामुळें व जगांतील इतिहासाच्या ओघांत आजवर आलेल्या व पुढें येणाऱ्या कोणत्याही राजकारणी पुरुषाला यश मिळणें दुरापास्त असल्यामुळें त्या नीतीचा अवलंब करणें कोणत्याही पुरुषाला अत्यंत आवश्यक ठरतें; व त्यामुळें या नीतीचा अवलंब करणारा पुरुष अनीतिमान्, अधार्मिक अथवा अधःपतित म्हणून समजण्यांत येत नाहीं. आजवर तरी तो तसा समजला गेलेला नाहीं. केवळ भारतवर्षाच्या इतिहासापुरतें पाहिलें तरी भगवान् श्रीकृष्णासारख्या पूर्णावताराला देखील या नीतीचा अवलंब करणें क्रमप्राप्त ठरलें. इतकेंच नव्हे तर नंदवंशाचा नाश याच नीतीनें करणारा व आपल्या कौटिलीय अर्थशास्त्र या ग्रंथांत तिचा वेगवेगळ्या अंगांनीं परिचय करून देणारा आर्य चाणक्य अतिशय श्रेष्ठ पुरुष म्हणून इतिहासांत प्रसिद्धीस आला. मग ज्या नीतीच्या अवलंबामुळें भगवान् श्रीकृष्णाचें पूर्णावतारत्व नष्ट होऊं शकत नाहीं, त्याच नीतीचा अवलंब राजा धृतराष्ट्रानें केल्याबरोबर त्याच्या बाबतींत मात्र दोषारोप करावयास कां तयार व्हावें? महाभारताच्या शांतिपर्वांतील राजधर्म प्रकरणांत ज्याप्रमाणें विशुद्ध नीतिधर्माचा पुरस्कार केलेला आहे त्याचप्रमाणें राज्य मिळवूं, रक्षूं व वाढवूं इच्छिणाऱ्या व्यक्तीसाठीं म्हणून या कूट नीतीचाही पुरस्कार करण्यांत आलेला आहे. अशा स्थितींत राजा धृतराष्ट्रानें या नीतीचा पुरस्कार केला असतां त्याला दोषी समजण्याचें कारण काय? या प्रश्नाचा परिहार सोपा आहे. जगांतील ज्या थोर व्यक्तींनीं या नीतीचा पुरस्कार केला त्यांनीं तो अपरिहार्य म्हणून, अगतिक होऊन केलेला आहे. प्राप्त धार्मिक कर्तव्य म्हणून नव्हे. किंबहुना या विशिष्ट नीतीच्या बाबतींत व्यक्तिगत धार्मिक

---

व्याख्यान १० वें, दिनांक ५ एप्रिल १९५१

आचरणापेक्षां सामाजिक कल्याणाचा हेतु अधिक श्रेष्ठ समजून तिचा पुरस्कार करण्यांत आलेला आहे. जग हें लबाडांनीं भरलेलें आहे. अशा स्थितींत समाजकल्याणाच्या दृष्टीनें काटयानें काटा काढावा या न्यायानें लबाडांचेंच हत्यार त्यांच्यावर उलटवून त्यांचा नाश केल्यावांचून भागावयाचें नाहीं. म्हणून जगांतील महापुरुषांचें या नीतीचा अवलंब करणें हें प्राप्तकर्तव्य ठरलें. रोज संध्या करावी, प्रत्येक वसंत ऋतूंत सोमयाग करावा, परस्त्रियांना मातेसमान मानावें अथवा नेहमीं खरें बोलावें हीं जशीं नीतिशास्त्रांतलीं कर्तव्यें आहेत, त्याप्रमाणें स्वार्थासाठीं खोटें बोलावें, लोकांचीं घरें जाळावीं, दुसऱ्यांना विषप्रयोग करावे व अकारण परस्वापहरण करावें हीं कांहीं नीतिशास्त्रांतलीं प्राप्तकर्तव्यें नव्हेत. दुसऱ्यानें आपलें राष्ट्र बुडवूं नये म्हणून आपण त्यांचीं घरें जाळावींत, दुसऱ्यांनीं आपल्याला विषप्रयोग करूं नये म्हणून शक्य ती दक्षता बाळगून त्यालाच नष्ट करावें, या आत्मसंरक्षणात्मक प्रतिक्रियेंतून अगतिकतेनें या नीतीचा पुरस्कार करण्यांत आलेला आहे. कोणत्याही गोष्टीची नीतिमयता अथवा अनीतिमयता तिच्या मुळाशीं असलेल्या प्रेरक हेतूवरूनच पारखली जाते. आर्य चाणक्यानें कौटिल्याचा अंगीकार करून नंदराज्य धुळीला मिळविलें व त्या जागीं दुसरी सत्ता प्रस्थापित केली असली तरी त्या सत्तेपैकीं कपर्दिकेचाही त्यानें अभिलाष धरला नाहीं व नव्या प्रस्थापित सत्तेकडून ग्रीकयवनांच्या आक्रमणाला थोपवून धरून भारत त्यांच्या आक्रमणापासून मुक्त केल्यावर एकाद्या महान् साम्राज्याचे वास्तविक सूत्रधार बनण्याच्या प्रभुत्वाच्या आकांक्षेचा देखील परित्याग करून तो आपलें तपश्चर्येचें कर्तव्य पार पाडण्यासाठीं निघून गेला. या गोष्टींत त्याचें आर्यत्व, भारतीयत्व अथवा माहात्म्य व्यक्त झालें आहे. जर तो तसें कांहीं न करतां स्वतःच राज्य बळकावून बसला असता अथवा त्या राज्याचें सूत्रचालकत्व मरेपर्यंत न सोडतां जळू ज्याप्रमाणें रक्ताला चिकटून बसते त्याप्रमाणें जर तो जन्मभर चंद्रगुप्ताची प्रधानकीच करीत राहिला असता तर इतिहासाच्या दृष्टीनें तो आज ठरला आहे तसा महापुरुष खात्रीनें ठरला नसता. काव्यवाङ्मयावर देखील

या महापुरुषाच्या महत्तेची त्याच्या या त्यागबुद्धीमुळेंच छाप बसलेली आहे हें मुद्राराक्षस नाटकांतून चांगलेंच प्रत्ययास येतें. तेथील कंचुकी चाणक्याचें वर्णन करतांना म्हणतो :—

**अहो राजाधिराज मन्त्रिणो विभूतिः । तथाहि**
**उपलशकलमेतत् भेदकं गोमयानाम् ।**
**बटुभिरुपहृतानां बर्हिषां स्तूपमेतत् ।।**

—मुद्राराक्षस, ३-१५

चाणक्याची महत्ता या गोष्टींत सामावलेली आहे व म्हणून कौटिल्य करूनही 'पद्मपत्रमिवांभसा' या न्यायानें त्याची महत्ता नष्ट होऊं शकत नाहीं. भगवान् श्रीकृष्णांच्या बाबतींतही हेंच आहे. नृशंसकृत्यें करणाऱ्या स्वार्थी लबाडांची वाटचाल ओळखून जे त्यांच्याशीं तेंच हत्यार वापरून धोरण आंखीत नाहींत ते अखेरीस जगांत बावळट व मूर्ख समजले जाऊन स्वतःचा व राष्ट्राचाही सर्वनाश ओढवून घेतात, हें हातीं आलेल्या महंमद घोरीला जीवदान देऊन शेवटीं स्वतःचा व राष्ट्राचाही नाश ओढवून घेणाऱ्या पृथ्वीराज चव्हाणाच्या उदाहरणावरून चांगलें स्पष्ट होण्यासारखें आहे. तात्पर्य केवळ स्वार्थी हेतूनें, दुसऱ्यांच्या सर्वस्वापहरणाची नीच वृत्ति ठेवून या नीतीचा वापर करणें हें अधःपाताचेंच लक्षण समजलें पाहिजे. आर्य महापुरुषांनीं व राजांनीं तें तसेंच मानलें होतें. शाश्वत धर्म, मानव कल्याण अथवा राष्ट्रहित या उदात्त ध्येयाप्रीत्यर्थ स्वतःचा स्वार्थ मनांतही न आणतां या नीतीचा अवलंब करणें वेगळें व स्वार्थी हेतु पुरविण्यास्तव तिचा अवलंब करणें वेगळें. प्रतिक्रिया व अगतिकता म्हणून तिला नीतिशास्त्रांत स्थान मिळालें आहे; विधिप्राप्त कर्तव्य किंवा आवश्यक नैतिक गोष्ट म्हणून नव्हे. हें या गोष्टीचा विचार करतांना नेहमींच लक्षांत ठेवलें पाहिजे. राजा धृतराष्ट्राचा हेतु श्रीकृष्ण, कौटिल्य अथवा जगांतील इतर महापुरुष यांच्याप्रमाणेंच उदात्त होता काय?

## राजा धृतराष्ट्राचा हेतु

महाभारताच्या शांतिपर्वांत राजधर्मप्रकरणांत राजकर्तव्य म्हणून असें सांगितलें आहे कीं :—

नाधर्मेण महीं जेतुं लिप्सेत जगतीपतिः ।
अधर्मविजयं लब्ध्वा को नु मन्येत भूमिपः ।। १
अधर्मयुक्तो विजयो ह्यध्रुवोऽस्वर्ग्य एव च ।
सादयत्येष राजानं महीं च भरतर्षभ ।। २

—महाभारत, शांतिपर्व अ. ९६

"राजानें अधर्मानें पृथ्वी जिकण्याचा विचारही मनांत आणू नये. अधर्मानें मिळविलेला विजय कोणत्या राजास अभिमानास्पद वाटेल? अधर्मानें मिळविलेला विजय या लोकीं टिकू शकत नाहीं व परलोकींही तो दुर्गतीसच कारणीभूत होतो. इतकेंच नव्हे तर शेवटीं तो त्या राजाचा व त्यानें मिळविलेल्या जमिनीचाही नाश करतो." राजा धृतराष्ट्रानें युधिष्ठिराला यौवराज्यपदावर बसविलें होतें हें आपण पाहिलेंच. एकदां युधिष्ठिराला यौवराज्यपदावर बसविल्यावर त्याच्या पराक्रमाविषयीं व योग्यतेविषयीं आपल्याला मत्सर वाटू लागला हेंही त्यानें स्पष्ट शब्दांत कबूल केलें आहे हेंही आपण मागच्या व्याख्यानांत पाहिलें. तत्कालीन रूढ कायद्याप्रमाणें अंध म्हणून त्याचा राज्यावरील अधिकार संपल्यानंतर त्याचे आजोबा देवापि यांच्याप्रमाणें धीरोदात्त वर्तन राखणें हेंच त्याचें कर्तव्य होतें. देवापि हीनांग असल्यामुळें धृतराष्ट्राप्रमाणें ज्येष्ठ पुत्र असतांना देखील त्याचा राज्यावरील अधिकार संपतांच कूटनीतीचा आश्रय न करतां धाकट्या भावाला म्हणजे शंतनूला गादीवर बसवून तो स्वतः अरण्यांत निघून गेल्याचें आपण पाहिलें. त्याच परंपरेंत जन्म पावलेल्या धृतराष्ट्राचेंही तेंच कर्तव्य होतें तें त्यानें न पाळतां उलट राज्याचीं अधिकारसूत्रें आपल्याच हातीं ठेविलीं हा त्याचा पहिला अधःपात व नुसतींच आपल्या हातीं ठेविलीं असें नसून युधिष्ठिराला यौवराज्याचा अभिषेक करून कुरुराजाचा भावी वारस म्हणून नियुक्त केल्यानंतर मग त्यानें त्याच्या पदच्युतीची व राज्य गिळंकृत करण्याची कारस्थानें सुरू केलीं हा त्याचा दुसरा अधःपात. आपल्या मनांत उत्पन्न झालेले विचार पापमय आहेत याची धृतराष्ट्राला स्वतःला जाणीव होती इतकेंच नव्हे तर त्या बाबतींत तो आपला उद्देश स्पष्ट करून सांगावयास भीतही होता असें दिसतें. तो स्वतःच म्हणतो :

दुर्योधन ममाप्येतद् हृदि संपरिवर्तते ।
अभिप्रायस्य पापत्वान्नैवं तु विवृणोम्यहम् ।। १६
न च भीष्मो न च द्रोणो न च क्षत्ता न गौतमः ।
विवास्यमानान्कौन्तेयाननुमंस्यन्ति कर्हिचित् ।। १७
समा हि कौरवेयाणां वयं ते चैव पुत्रक ।
नैते विषममिच्छेयुर्धर्मयुक्ता मनस्विनः ।। १८
ते वयं कौरवेयाणामेतेषां च महात्मनाम् ।
कथं न वध्यतां तात गच्छाम जगतस्तथा ।। १९

—महाभारत, आदिपर्व अध्याय १४२

"दुर्योधना ! माझ्याही अंतःकरणांत हीच गोष्ट आहे. पण हा अभिप्राय पापमय असल्यामुळें तो मी कोणासमोर सांगूं शकत नाहीं. आपण जर पाण्डवांना काढून लावलें तर भीष्म, द्रोण, विदुर, व कृपाचार्य या कृत्याला कधींच संमति देणार नाहींत. आपण व पाण्डव यांच्याविषयीं त्यांची समबुद्धि असल्यामुळें व ते धार्मिक आणि मनस्वी लोक असल्यामुळें आपलें मात्र हित व्हावें आणि केवळ पाण्डवांचें मात्र अहित व्हावें ही गोष्ट ते केव्हांही मान्य करणार नाहींत. इतकेंच नाहीं तर कौरवराज्यांतील कुलधुरंधर पुरुष राज्य-कारभारांतील द्रोणादि श्रेष्ठ लोक व नीति व अनीति यांची ओळख असणारें सर्व जग यांच्या दृष्टीनें आपण वध्य ठरल्याशिवाय राहा-णार नाहीं अशी भीति वाटते."

दुर्योधनानें त्याला आपल्या कारस्थानांची माहिती दिल्यानंतर मागें वर्णिलेल्या कूट नीतींतील पुत्र, सखा, भाऊ, पिता, वा गुरू कोणीही असो, जो कोणी आपल्या स्वार्थाच्या आड येईल त्याला ठार मारावें या प्रमेयाचा त्यानें अंगीकार केला. आपल्या मुलाला प्रजांशीं स्पष्ट संबंध ठेवतां यावा म्हणून त्यानें पाण्डवांना वारणाव-तांत काढून लावावयाचें निश्चित केलें; पण त्यांना सरळ काढून लावणें अशक्य होतें म्हणून त्यासाठीं त्यानें मागें उल्लेखिलेल्या 'तृणमय चाप वापरावें' या नीतीचा अंगीकार केला व कारस्थान उभारलें.

## धृतराष्ट्राचें कारस्थान

हस्तिनापुराच्या प्रजाजनांपासून पाण्डवांना पुष्कळ दिवसपर्यंत दूर ठेवून त्या अवधींत दुर्योधनाला आपलें आसन दृढमूल करण्याची संधि द्यावी असें या कारस्थानाचें धृतराष्ट्राच्या मतें स्वरूप होतें. त्यासाठीं त्यानें वारणावत नांवाच्या नगरींत त्यांना पाठवावयाचें निश्चित केलें. पण उघडपणें तर त्यांना तसें पाठवितां येणें शक्य नव्हतें म्हणून त्यानें पाण्डवांच्याच मनांत वारणावताला जाण्याची इच्छा उत्पन्न व्हावी असा प्रयत्न सुरू केला. महाभारतांत म्हटलें आहे :--

धृतराष्ट्रप्रयुक्तास्ते केचित्कुशलमन्त्रिणः ।
कथयांचक्रिरे रम्यं नगरं वारणावतम् ॥ २
अयं समाजः सुमहान्रमणीयतमो भुवि ।
उपस्थितः पशुपतेर्नगरे वारणावते ॥ ३
सर्वरत्नसमाकीर्णे पुंसां देशे मनोरमे ।
इत्येवं धृतराष्ट्रस्य वचनाच्चक्रिरे कथाः ॥ ४
कथ्यमाने तथा रम्ये नगरे वारणावते ।
गमने पाण्डुपुत्राणां जज्ञे तत्र मतिर्नृप ॥ ५
यदा त्वमन्यत नृपो जातकौतूहला इति ।
उवाचैतानेत्य तदा पाण्डवानम्बिकासुतः ॥ ६
ममैते पुरुषा नित्यं कथयन्ति पुनः पुनः ।
रमणीयतमं लोके नगरं वारणावतम् ॥ ७
ते ताता यदि मन्यध्वमुत्सवं वाराणावते ।
सगणाः सान्वयाश्चैव विहरध्वं यथामराः ॥ ८
ब्राह्मणेभ्यश्च रत्नानि गायनेभ्यश्च सर्वशः ।
प्रयच्छध्वं यथाकामं देवा इव सुवर्चसः ॥ ९
कंचित्कालं विहृत्यैवमनुभूय परां मुदम् ।
इदं वै हस्तिनपुरं सुखिनः पुनरेष्यथ ॥ १०

--महाभारत, आदिपर्व अध्याय १४३

"धृतराष्ट्रानें नियुक्त केलेले कांहीं कुशल मंत्री पांडवांच्या आंवतीं भोंवतीं वारणावत शहर अत्यंत रम्य असल्याबद्दल वारंवार गोष्टी

करूं लागले. त्या वारणावतांत भगवान् महादेवाचें अत्यंत रम्य स्थान असून तेथें मोठी यात्रा भरणार आहे, तें नगर अत्यंत समृद्ध असून मनोरमतेंत तें सर्वश्रेष्ठ ठरेल, इत्यादि गोष्टी धृतराष्ट्राच्या प्रेरणेवरून त्याचे कुशल स्नेही वारंवार करूं लागले. त्याच त्या गोष्टी एकसारख्या कानावर पडत गेल्यामुळें हें 'वारणावत' प्रकरण आहे तरी काय, तें एकदां डोळ्यांनीं बघावें अशी इच्छा पांडवांच्याही मनांत स्वाभाविकपणें उत्पन्न झाली. पांडव तें नगर पहाण्याविषयीं पुरेसे उत्सुक झालेले आहेत अशी राजा धृतराष्ट्राची जेव्हां पूर्णपणें खात्री पटली, तेव्हां त्यानें त्यांची भेट घेऊन त्यांना असें सांगितलें कीं "हीं माझीं माणसें वारंवार वारणावत नगर अत्यंत चांगलें असल्याविषयीं व तेथील रमणीयता अपूर्व असल्याविषयीं सांगत असतात. जर तुमची तेथें जाण्याची इच्छा असेल तर आपल्या परिवारासह तुम्ही तेथें जाऊं शकतां. देवांप्रमाणें तेथें आनंदानें विहार करा. आपल्या नांवलौकिकाला साजेल अशा रीतीनें ब्राह्मणांना रत्नादिकांचीं उत्कृष्ट दानें द्या. गायनादि ऐका. जितका आनंद उपभोगितां येईल तितका भोगून व कांहीं दिवस तेथें सुखानें राहून पुन्हां हस्तिनापुराला येतां येईल." किती मायावी होतें हें भापण ! व किती कौशल्यानें टाकलेला होता हा डाव ! ! सहजच पाण्डव त्यानें फसले व सर्व वडील मंडळींची आज्ञा घेऊन त्यांनीं वारणावतास जाण्याची सिद्धता चालविली. धृतराष्ट्राची इच्छा पाण्डवांनीं दूर व्हावें एवढीच असली तर दुष्ट इच्छेच्या बाबतींत दुर्योधन त्याच्यावर मात करणारा होता. पाण्डव नुसते वारणावतास जाऊन त्याचें समाधान होणार नव्हतें. शत्रु निःशेष करावा या कल्पनेच्या अनुसार त्यानें गेलेले पांडव पुन्हां परत येण्याचा संभवही उरूं नये म्हणून त्यांना तेथें जाळून टाकण्याचा बेत केला. व पुरोचन नांवाच्या एका अत्यंत दुष्ट व्यक्तीची त्या कामावर नियुक्ति करून तेथें 'लाक्षागृह' बनविलें. चक्राला गति मिळण्याचाच अवकाश होता. एकदां ती गति मिळाल्यावर त्याचें पर्यवसान किती भयानकतेंत होईल याची कोण कशी कल्पना करूं शकणार ! व तें थांबवूं तरी कोण शकणार ? पांडवांचा धृतराष्ट्रा-

वर पूर्णपणें विश्वास होता. त्यांना त्याच्या अंतरंगाची व या कारस्थानाची कांहींच कल्पना नव्हती. जातांना स्वत: युधिष्ठिरच यासंबंधीं असें म्हणतो ——

**पिता मान्यो गुरुः श्रेष्ठो यदाह पृथिवीपतिः ।**
**अशङ्कमानैस्तत्कार्यमस्माभिरिति नो व्रतम् ।। १५**

"पृथ्वीपति धृतराष्ट्र आमचा पिता, गुरु व आमच्यापेक्षां श्रेष्ठ असून तो जें सांगेल तें आमच्या हिताचेंच असल्यामुळें त्याविषयीं आम्हांला कांहींएक संशय न घेतां तो सांगेल त्याप्रमाणेंच वागणें उचित आहे." असो.

## राजशक्ति व सचिवशक्ति यांचें द्वंद्व

याप्रमाणें धृतराष्ट्रानें कितीही गुप्त कारस्थान रचलें असलें तरी कुरुराज्याचा अत्यंत धार्मिक व विचक्षण मंत्री विदुर यानें तें कारस्थान ओळखलें व त्यांतून पांडवांना वांचवावयाचा निश्चय केला. आदर्श राज्यपद्धतींत सचिवशक्ति व राजशक्ति यांच्यांत मतैक्य असणें आवश्यक असतें असें आपण भारतीय राज्यशास्त्राचें स्वरूप विशद करतांना पाहिलें आहे. या ठिकाणीं सचिव धार्मिक, तर राजा अधार्मिक असें द्वंद्व उत्पन्न होऊन अधार्मिक राजावर धार्मिक सचिवानें मात करण्याचा निश्चय केला. महाभारत म्हणतें :——

**तेषामिङ्गितभावज्ञो विदुरस्तत्त्वदर्शिवान् ।**
**आकारेण च तं मन्त्रं बुबुधे दुष्टचेतसाम् ।। ३**
**ततो विदितवेद्यात्मा पाण्डवानां हिते रतः ।**
**पलायने मतिं चक्रे कुन्त्याः पुत्रैः सहानघः ।। ४**

—— महाभारत, आदिपर्व अध्याय १४१

चेहऱ्यावरूनच भाव ओळखण्यांत अत्यंत कुशल अशा तत्त्वदर्शी विदुरानें कौरवांचे भाव त्यांच्या चेहऱ्यावरूनच ओळखले व काय करावें नि काय करूं नये या संबंधीं तो अत्यंत विचक्षण असल्यामुळें पाण्डवांचें हित करावयाचा निश्चय करून कुन्तीला तिच्या पुत्रांसहित तेथून पळवून नेण्याचा बेत त्यानें योजिला. अनेक लोक पाण्डव हस्तिनापुराहून निघत असतां त्यांना निरोप देण्या-

साठीं हस्तिनापुराच्या वेशीपर्यंत आले होते. विदुरानें तेथेंच थोडा वेळ थांबून युधिष्ठिराला सांकेतिक भाषेंत त्याच्यावरील संकटाची कल्पना दिली. युधिष्ठिरानेंही सांकेतिक परिभाषेंतच त्याला उत्तर दिलें व सावध होऊन आगामी संकटांतून स्वतःची मुक्तता करून घेण्याच्या सिद्धतेनेंच त्यानें दक्षता राखली. महाभारतांत असें वर्णन आहे कीं—

**पौरेषु विनिवृत्तेषु विदुरः सत्यधर्मवित् ।**
**बोधयन्पाण्डवश्रेष्ठमिदं वचनमब्रवीत् ।। १९**
**गृहादग्निश्च बोद्धव्य इति मां विदुरोऽब्रवीत् ।**
**पन्थाश्च वो नाविदितः कश्चित्स्यादिति धर्मधीः ।। ३२**
**जितेन्द्रियश्च वसुधां प्राप्स्यतीति च मेऽब्रवीत् ।**
**विज्ञातमिति तत्सर्वं प्रयुक्तो विदुरो मया ।। ३३**

—महाभारत, आदिपर्व अ. १४५

"वेशीपर्यंत पोंचवावयास आलेले सर्व पौरजन निघून गेल्यानंतर पाण्डवांतील ज्येष्ठ बंधु युधिष्ठिर याला आगामी संकटाची सूचना धर्मवेत्त्या विदुरानें दिली. युधिष्ठिरानें ती आपल्याला समजली असल्याचें त्याला सांगितलें. पुढें कुन्तीनें हा काय प्रकार आहे म्हणून विचारल्यानंतर विदुराचा निरोप म्हणून सांगतांना युधिष्ठिर तिला म्हणाला कीं, 'तुम्ही ज्या घरांत राहाल त्याला अग्नीपासून भय आहे, पण तेथून बाहेर कसें पडावयाचें याची व्यवस्था होईल. आपणाला कारस्थान समजलें आहे असें मुळींच दाखवूं नका. मन ज्याच्या ताब्यांत असतें त्यालाच शेवटीं विजय प्राप्त होत असतो.' मीही विदुराला मला सर्व समजल्याचें सांगितलें." पाण्डव स्वस्थपणें वारणावतांत आले व लाक्षागृहांत राहूं लागले. त्या घराची परीक्षा करून युधिष्ठिरानें तें लाक्षागृह असल्याची तेव्हांच कल्पना केली. पण विदुराच्या सूचनेनुरूप त्यानें तसें मुळींच भासविलें नाहीं. पुरोचन नेहमींच सेवेच्या मिषानें त्यांच्या सन्निध राहात असल्यामुळें तेथून बाहेर कसें पडावें व तेही आपण सुरक्षित बाहेर पडलों नसून दग्ध झालों असा आभास उत्पन्न करूनच बाहेर कसें पडावें याचा विचार युधिष्ठिर करूं लागला. महाभारतांत युधिष्ठिर भीमाला म्हणतो कीं:—

जिघ्राणोस्य वसागन्धं सर्पिर्जतुविमिश्रितम् ।
कृतं हि व्यक्तमाग्नेयमिदं वेश्म परंतप ॥ १४
इह यत्तैर्निराकारैर्वस्तव्यमिति रोचये ।
अप्रमत्तैर्विचिन्वद्भिर्गतिमिष्टां ध्रुवामितः ॥ २१
भौमं च बिलमद्यैव करवाम सुसंवृतम् ।
गूढश्वासान्न नस्तत्र हुताशः संप्रधक्ष्यति ॥ ३०
वसतोऽत्र यथा चास्मान्न बुध्येत पुरोचनः ।
पौरो वापि जनः कश्चित्तथा कार्यमतन्द्रितैः ॥ ३१

—महाभारत, आदिपर्व अ. १४६

"हे भीमसेना ! ह्या घरांतील भिंतींना जो ज्वालाग्राही पदार्थांचा वास येत आहे त्यावरून हें दाहक पदार्थांनींच बनविलें आहे ही गोष्ट अगदीं स्पष्ट होते. तरीपण ही गोष्ट आपणाला माहीत आहे असें आपण आपल्या चेहऱ्यावरून कोणालाही दिसूं देतां कामा नये. मात्र अत्यंत दक्ष राहून यांतून बाहेर पडण्याचा मार्ग आपण शोधून काढूं. एक गुप्त भुयार कोणाच्या लक्षांत न येईल अशा पद्धतीनें आपण येथेंच या घरांतच निर्माण करूं व तेथून बाहेर पडूं. मात्र तें भुयार या पुरोचनाच्या ध्यानांत न येईल अथवा इतरही कोणी नगरवासी जन समजूं शकणार नाहींत अशा बेतानेंच आपणांस केलें पाहिजे." पण पाण्डवांनीं असें ठरविलें तरी भुयार निर्माण कसें करावें हा त्यांच्याहीसमोर मोठाच प्रश्न होता. त्यांची तीही अडचण विदुरानें दूर केली. महाभारतांत म्हटलें आहे:—

विदुरस्य सुहृत्कश्चित्खनकः कुशलो नरः ।
विविक्ते पाण्डवान्राजन्निदं वचनमब्रवीत् ॥ १
प्रहितो विदुरेणास्मि खनकः कुशलो ह्यहम् ।
पाण्डवानां प्रियं कार्यमिति किं करवाणि वः ॥ २
स तथेति प्रतिश्रुत्य खनको यत्नमास्थितः ।
परिखामुत्किरन्नाम चकार च महाबिलम् ॥ १६
चक्रे च वेश्मनस्तस्य मध्येनातिमहद्बिलम् ।
कपाटयुक्तमज्ञातं समं भूम्याश्च भारते ॥ १७
पुरोचनभयादेव व्यदधात्संवृतं मुखम् ।
स तस्य तु गृहद्वारि वसत्यशुभधीः सदा १८

—महाभारत, आदिपर्व अध्याय १४७

विदुराचा कोणी एक मित्र खणण्याच्या कामांत अत्यंत कुशल होता. त्यानें एकांतांत पाण्डवांची भेट घेतली व त्यांना असें सांगितलें कीं, मी खनक असून आपलें प्रिय कार्य करावयास विदुरानें मला आज्ञा केली आहे. युधिष्ठिराच्या आज्ञेवरून त्यानें त्या घरांतूनच एक मोठें भुयार तयार केलें. पुरोचनाच्या तें ध्यानांत येऊं नये म्हणून त्याला वरून कपाट केलें होतें. त्यानें तें नेहमीं झांकलेलें असे. पुढें पांडवांनीं योग्य वेळीं त्या घराला स्वतःच आग लावून देऊन त्यांत पुरोचनालाच भस्मसात् केलें. दारू पिऊन उन्मत्त झालेली एक भिल्लीण आपल्या पांच पुत्रांसहित तेथें राहावयास आली होती तीही त्यांत जळून गेली. पांडव भुयाराच्या वाटेनें कुन्तीसहित तेथून निघून गेले. पुढें जातांना त्यांना वाटेंत नदी लागली. ती नदी तरून जाण्यासाठीं विदुरानें आपलीं माणसें व नाःव तेथें आधींच सिद्ध ठेवलेली होती. त्यांनीं पाण्डवांना गंगापार करून दिलें. पांडवही कोणाच्या लक्षांत न येतांच तेथून निघून गेले.

महाभारतांत म्हटलें आहे—

एतस्मिन्नेव काले तु यथासंप्रत्ययं कविः ।
विदुरः प्रेषयामास तद्वनं पुरुषं शुचिम् ॥ १
स गत्वा तु यथोद्देशं पाण्डवान्ददृशे वने ।
जनन्या सह कौरव्य मापयानान्नदीजलम् ॥ २
ततः प्रवासितो विद्वान्विदुरेण नरस्तदा ।
पार्थानां दर्शयामास मनो मारुतगामिनीम् ॥ ४
सर्ववातसहां नावं यन्त्रयुक्तां पताकिनीम् ।
शिवे भागीरथीतीरे नरैर्विस्रम्भिभिः कृतान् ॥ ४
इत्युक्त्वा स तु तान्वीरान्पुत्रान्विदुरचोदितः ।
तारयामास राजेंद्र गंगां नावा नरर्षभान् ॥ १३
तारयित्वा ततो गंगां पारं प्राप्तांश्च सर्वशः ।
जयाशिषः प्रयुज्याथ यथागतमगाद्धि सः ॥ १४
पांडवाश्च महात्मानः प्रतिसंदिश्य वै कवेः ।
गंगामुत्तीर्य वेगेन जग्मुर्गूढमलक्षिताः ॥ १५

—महाभारत, आदिपर्व अ. १४९

याच वेळीं पूर्वींच ठरल्याप्रमाणें विदुरानें आपला मनुष्य नदीवर पाठविला. नदी तरून जाण्यासाठीं पाण्डव नदीचें पाणी किती खोल आहे हें पाहात असलेले त्यानें पाहिले. त्यानें लगेच त्यांची भेट घेऊन अतिशय वेगवान् यंत्रयुक्त व ध्वज फडकत असलेली नाव त्यांना दाखवून तिच्यांत बसविलें व नदीपार करून दिलें. त्यांचा निरोप घेऊन तो पुरुष निघून गेला व पांडवही गुप्तपणें आपल्या वाटेस लागले. कदाचित् घर पहातांना भुयार दृष्टीस पडलें तर पांडव गुप्तपणें निसटल्याचें शत्रूच्या ध्यानांत येईल म्हणून तें ताबडतोब बुजवून टाकण्याचीही काळजी घ्यावयास विदुर विसरला नाहीं. भारतांत म्हटलें आहे:—

**खनकेन तु तेनैव वेश्म शोधयता बिलम् ।**
**पांसुभिः पिहितं तच्च पुरुषैस्तैर्न लक्षितम् ।। ८**

—–महाभारत, आदिपर्व अ. १५०.

ज्या खनकाकरवीं विदुरानें तें भुयार तयार करविलें होतें त्याच खनकाकरवीं त्यानें तें गुप्तपणें बुजवूनही टाकलें. इकडे लाक्षागृहांत पाण्डव दग्ध झाल्याच्या वार्ता हस्तिनापुरांत येऊन ठेपल्या. सर्व लोक शोकांत निमग्न झाले. कारस्थानें करणाऱ्या लोकांना अत्यंत आनंद झाला. तरी तो दाखविणें त्यांना उचित नसल्यामुळें त्यांनीं व विशेषतः राजा धृतराष्ट्रानें सर्वांपेक्षां आपणालाच अधिक शोक झाला आहे असा भाव आणून खूप शोक केला. समारंभानें पांडवांचीं श्राद्धें व त्यांचें तर्पण उरकलें. विदुराला सर्व प्रकार माहीत असल्यामुळें शोक करण्याचें जरी त्याला कांहींच कारण नव्हतें तरीही कोणाला तें माहीत असू नये म्हणून त्याला शोकाचें सोंग करणें भागच होतें. तेवढें सोंग त्यानें व्यवस्थितपणें पार पाडलें. महाभारतांत म्हटलें आहे :—

**अद्य पाण्डुर्मृतो राजा मम भ्राता महायशाः ।**
**तेषु वीरेषु दग्धेषु मात्रा सह विशेषतः ।। ११**
**गच्छन्तु पुरुषाः शीघ्रं नगरं वारणावतम् ।**
**सत्कारयन्तु तान्वीरान्कुन्तीराजसुतां च ताम् ।। १२**

एवमुक्त्वा ततश्चक्रे ज्ञातिभिः परिवारितः ।
उदकं पाण्डुपुत्राणां धृतराष्ट्रोऽम्बिकासुतः ॥ १५
रुरुदुः सहिताः सर्वे भृशं शोकपरायणाः ।
हा युधिष्ठिर कौरव्य हा भीम इति चापरे ॥ १६
हा फाल्गुनेति चाप्यन्ये हा यमाविति चापरे ।
कुन्तीमार्ताश्च शोचन्त उदकं चक्रिरे जनाः ॥ १७
अन्ये पौरजनाश्चैवमन्वशोचन्त पाण्डवान् ।
विदुरस्त्वल्पशश्चक्रे शोकं वेद परं हि सः ॥ १८

—महाभारत, आदिपर्व अ. १५०

"आज पाण्डव व कुन्ती यांच्या या निधनानें माझा अत्यंत कीर्तिमान भाऊ पाण्डू हा खरोखरीच मेला आहे. आजवर तो पुत्रांच्या रूपानें तरी जिवंत होता. सर्व लोक, ताबडतोब वारणावतास जा व कुन्ती आणि पाण्डव यांचे त्यांच्या योग्यतेस शोभतील असे थाटानें प्रेत-संस्कार करा. याप्रमाणें बोलून राजा धृतराष्ट्रानें सर्व ज्ञातिबांधवां-सहित पाण्डवांचें तर्पण केलें. हे युधिष्ठिर, हे भीमा, हा अर्जुन, हे कुन्ती याप्रमाणें विलाप करीत सर्व लोक पाण्डवांचें तर्पण करीत असतां जोरजोरानें रडत होते. विदुराला खरें काय हें सर्व माहीत होतें; तथापि त्यास तें दाखवावयाचें नसल्यामुळें लौकिक आचारास अनुसरून त्यानेंही थोडा वेळ शोक केला." तात्पर्य राजशक्ति व सचिवशक्ति या दोहोंचेंच येथें द्वंद्व उत्पन्न होऊन त्यांत अखेरीस राजशक्तीचा पराजय झाला.

## धृतराष्ट्राचें ढोंग

पण पाण्डव दग्ध झाले याचा खरोखरीचा शोक धृतराष्ट्राला झाला होता काय? तसें दिसत नाहीं. उलट त्याला मनांतून आनं-दच झाला होता. द्रौपदी स्वयंवराचे वेळीं पाण्डव प्रकट झाल्यानंतर त्यानें त्यांच्या संबंधीं जें धोरण स्वीकारलें त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते. विदुरानें द्रौपदीस्वयंवराहून येतांच पाण्डव प्रकट झाल्याची व त्यांनीं द्रौपदीला वरल्याची वार्ता धृतराष्ट्राला सांगतांच केवळ विदुरानें आपला अभिप्राय ओळखूं नये म्हणून त्यानें पांडवांना अति-शय वाखाणिलें. तो म्हणतो :—

यथैव पाण्डोः पुत्रास्तु तथैवाभ्यधिका मम ।
यथा चाभ्यधिका बुद्धिर्मम तान्प्रति तच्छृणु ।। २३

—महाभारत, आदिपर्व अ. २००

"पाण्डव हे नुसते पाण्डूचेच पुत्र नसून मला ते माझ्या पुत्रांपेक्षांही अधिक आवडतात, माझें त्यांच्यावर अत्यंत प्रेम कां आहे तें मी तुला सांगतों." एका बाजूला विदुराशीं याप्रमाणें गोष्टी बोलत असतांच त्याच रात्रीं दुर्योधन व कर्ण यांच्यासह पाण्डवांच्या विनाशाचें कारस्थान रचण्यांत तो गढून गेला होता. तो कर्ण व दुर्योधन यांना म्हणतो :—

अहमप्येवमेवैतच्चिकीर्षामि यथा युवाम् ।
विवेक्तुं नाहमिच्छामि त्वाकारं विदुरं प्रति ।। १
ततस्तेषां गुणानेव कीर्तयामि विशेषतः ।
नावबुध्येत विदुरो ममाभिप्रायमिङ्गितैः ।। २
यच्च त्वं मन्यसे प्राप्तं तद्ब्रवीहि सुयोधन ।
राधेय मन्यसे यच्च प्राप्तकालं वदाशु मे ।। ३

—महाभारत, आदिपर्व अ. २०१

"तुमच्या विचारांशीं मी पूर्णपणें सहमत आहें. पण माझ्या चेहऱ्यावरून व बोलण्यावरून विदुराला माझें खरें अंतरंग कळूं नये अशी माझी इच्छा आहे. माझ्या हालचालीवरून विदुराला कांहींही कळूं नये म्हणून तो जवळ असला कीं मी पाण्डवांच्या गुणांची विशेषच प्रशंसा करतों. तथापि तें कांहींही मनावर न घेतां तुम्ही जें योग्य ठरवाल त्याप्रमाणें वागावयास मी सिद्ध आहें."

त्यानें प्रथम मुत्सद्देगिरीनें पाण्डवांचा विनाश करतां येणें शक्य आहे काय याचें समालोचन केलें. पण सुचविलेल्या कोणत्याही छद्मी उपायानें पांडवांचा नाश होणें शक्य नाहीं अशी त्याची खात्री पटली. त्याचा स्वतःचा भीष्मद्रोणांच्या पराक्रमावर विश्वास होता. पण ते पाण्डवांवर हल्ला करून त्यांचा विनाश आपल्यासाठीं करावयास सिद्ध होतील कीं नाहीं याचा जेव्हां त्यानें अंदाज घेतला त्या वेळीं त्या दोघांनीही त्याच्या या हेतूंना विरोध केला. भीष्म म्हणतात :—

यदा प्रभृति दग्धास्ते कुन्तीभोजसुतासुताः ।
तदा प्रभृति गान्धारे न शक्नोम्यभिवीक्षितुम् ॥ १४
लोके प्राणभृतां कंचिच्छ्रुत्वा कुन्तीं तथागताम् ।
न चापि दोषेण तथा लोको मन्येत्पुरोचनम् ।
यथा त्वां पुरुषव्याघ्र लोको दोषेण गच्छति ॥ १५
—महाभारत, आदिपर्व अ. २०३

ज्या दिवसापासून कुन्ती व तिचे पुत्र जळल्याचें मीं ऐकलें त्या दिवसापासून मला तोंड काढावयास देखील जागा उरली नाहीं. लोक पुरोचनाला जितके दोष देत नाहींत तितके ते तुला दोष देत आहेत असें त्यांनीं स्पष्ट शब्दांत सांगितलें. तेव्हां एकट्या कर्णाच्या भरंवशावर युद्धाचें साहस करण्याच्या भानगडींत पडणें त्याला हितावह वाटेना. आपल्या दुष्कृत्यांची जाणीव झाल्यास अमात्य व प्रजा आपला सर्वनाश करतील अशी त्याला जाणीव होती. म्हणून त्यानें यावेळीं माघार घेणें हेंच शहाणपणाचें होईल असें ठरविलें. शिवाय पाण्डव या वेळीं पूर्वींप्रमाणें असहाय अवस्थेंत राहिलेले नसून त्यांना एका बाजूला पंचालांच्या सत्तेचें व दुसऱ्या बाजूला यादवांच्या सत्तेचें साहाय्य मिळालेलें होतें. त्यामुळें त्यानें समारंभ-पूर्वक विदुराला त्यांच्याकडे पाठवून मोठ्या आर्जवी भाषेनें त्यांना आपल्याकडे बोलावून घेतलें.

वाचा भृशं विनीतः स्यात् हृदयेन यथा क्षुरः ।
स्मितपूर्वाभिभाषी स्यात् सृष्टो रौद्रेण कर्मणा ॥ ६६
—महाभारत, आदिपर्व अ. १४०

या कणिकाच्या उद्देशाचें जणू कीं काय हें प्रात्यक्षिकच आहे.

## अर्धें राज्य बळकाविलें

पाण्डव धृतराष्ट्राच्या निमंत्रणानुसार हस्तिनापुरांत येऊन स्थिर होतांच त्यांचें पूर्वीचेंच पद त्यांना मिळणें ही गोष्ट क्रमप्राप्त होती. युधिष्ठिर लाक्षागृहांत दग्ध होण्यापूर्वीं कुरु राज्याचे अनभिषिक्त युवराज होते. त्यामुळें परत आल्यावरही ते त्याच पदावर रहाणें क्रमप्राप्तच होतें. पण त्याऐवजीं धृतराष्ट्रानें भांडण होऊं नये या

सबबीवर अर्धे राज्य पाण्डवांनीं घ्यावें व अर्धे राज्य स्वतःकडे ठेवावें असें ठरविलें. कुलभेद होऊं नये या सबबीवर ही गोष्ट त्यानें आपल्या बाजूच्या जबाबदार मुत्सद्यांना पटविली व पाण्डवांना हस्तिनापूर सोडून खाण्डवप्रस्थाच्या विभागांत पाठवून दिलें. पाण्डव तेथें गेले त्या वेळीं तें नुसतें अरण्य होतें. त्यांना नगररचनेपासून सर्व गोष्टी स्वतःच्या स्वतंत्र कराव्या लागल्या. धृतराष्ट्रानें मात्र या युक्तीनें कुरु जांगल प्रांताचे समृद्ध, दृढमूल व सुव्यवस्थित राज्य स्वतःच्या पदरांत पाडून घेतलें. महाभारतांत या प्रसंगाचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे :—

**धृतराष्ट्र उवाच :**

**भ्रातृभिः सह कौन्तेय निबोध गदतो मम ।**
**पुनर्नो विग्रहो मा भूत्खाण्डवप्रस्थमाविश ॥ २४**
**न च वो वसतस्तत्र कश्चिच्छक्तः प्रबाधितुम् ।**
**संरक्ष्यमाणान्पार्थेन त्रिदशानिव वज्रिणा ॥ २५**
**अर्धं राज्यस्य संप्राप्य खाण्डवप्रस्थमाविश ।**

वैशंपायन उवाच :

**प्रतिगृह्य तु तद्वाक्यं नृपं सर्वे प्रणम्य च ॥ २६**
**प्रतस्थिरे ततो घोरं वनं तन्मनुजर्षभाः ।**
**अर्धं राज्यस्य संप्राप्य खाडवप्रस्थमाविशन् ॥ २७**
**ततस्ते पाण्डवास्तत्र गत्वा कृष्णपुरोगमाः ।**
**मण्डयांचक्रिरे तद्वै परं स्वर्गवदच्युताः ॥ २८**
**ततः पुण्ये शिवे देशे शान्तिं कृत्वा महारथाः ।**
**नगरं मापयामासुर्द्वैपायनपुरोगमाः ॥ २९**

—महाभारत, आदिपर्व अ. २०७

"हे युधिष्ठिरा ! आपल्या सर्व बंधूंसहित तूं माझें म्हणणें ऐक. पुनश्च आपआपसांत वैर उत्पन्न होऊं नये म्हणून तूं येथें न राहतां खाण्डवप्रस्थांत राहावें असें मला वाटतें. त्या ठिकाणीं तुम्ही राहात असतां कोणीही तुम्हांला पीडा देऊं शकणार नाहीं. सर्व संकटांतून तुमचें रक्षण करावयास अर्जुन पूर्ण समर्थ आहे. ज्या-

प्रमाणें महेंद्र देवांचें रक्षण करतो, त्याचप्रमाणें तो तुमचें रक्षण करील. तेव्हा मी अर्धे राज्य देतों तें घ्या व खाण्डवप्रस्थांत जा."

राजाची ही आज्ञा ऐकून युधिष्ठिरासह सर्व पाण्डवांनीं त्याला प्रणाम केला व श्रीकृष्णासहित त्यांनीं खाण्डवप्रस्थाच्या गहन अरण्यांत प्रवेश केला. नंतर पवित्र स्थळ पाहून व्यासादि महर्षींच्या उपस्थितींत त्यांनीं नगररचनेप्रीत्यर्थ शांति करून जमीन मापली. तात्पर्य केवळ आपसांतील संघर्षाचें भय दाखवून धृतराष्ट्रानें कणिकानें वर्णन केलेल्या सामाच्याच मार्गानें युधिष्ठिराचें अर्धे राज्य तरी पदरांत पाडून घेतलें. पण दैवयोगानें त्याचा तो डाव उलटला. किंबहुना त्यानें केलेल्या या कपटनीतीच्या प्रयोगाचा श्रीकृष्णांनींच आपल्या विशिष्ट उद्दिष्टाप्रीत्यर्थ उपयोग करून घेतल्यामुळें तो डाव सर्वस्वीं धृतराष्ट्राच्याच अंगाशीं आला.

## डाव अंगाशीं आला

जर धृतराष्ट्रानें पाण्डवांना अर्धे राज्य दिलें नसतें तर पाण्डवांनीं केवढाही पराक्रम केला असता तरी युधिष्ठिराच्या सद्बुद्धीमुळें तो शेवटपर्यंत युवराज राहून धृतराष्ट्र सिंहासनावर राहिला असता. त्यामुळें साम्राज्य पाण्डवांनीं मिळविलें असतें तरी सम्राट म्हणून राजा धृतराष्ट्राचीच कीर्ति वाढली असती. पण काळाच्या पोटांतील सुवर्णमय भविष्याच्या गोष्टी कोणत्याही व्यक्तीला आधीं कधींच कळत नसतात. अर्धे राज्य मिळतांच पाण्डव स्वतंत्र झाले नि धृतराष्ट्राच्या राज्याशीं त्यांचा कांहींही संबंध उरला नाहीं. अर्थात् ते आपलें राज्य वाढवावयास पूर्णपणें मोकळे झाले. त्याप्रमाणें त्यांनीं बाहुबलानें दिग्विजय केला. श्रीकृष्णासारख्या महानुभावाच्या साहाय्यानें आपला राज्यविस्तार केला. ज्ञात जगांतील सर्व सत्ता आपल्या पायाशीं नमविल्या, व युक्तीनें पदरांत पाडून घेतलेलें कुरुजांगलाचें राज्य धृतराष्ट्र व दुर्योधन करीत असतांच ते त्यांच्या डोळ्यादेखत भारतवर्षाचे सम्राट् झाले.

आतां या साम्राज्यावर धृतराष्ट्राला कांहीं एक हक्क सांगतां येण्यासारखा नव्हता. तरी पण आपल्या डोळ्यांदेखत पांडवांचा

झालेला हा उत्कर्ष दुर्योधनाला सहन झाला नाहीं. युधिष्ठिराचा विशेष स्वभाव ओळखून जें खड्गानें शक्य नाहीं तें द्यूतानें पदरांत पाडावें असा दुर्योधनानें निश्चय केला. राजा धृतराष्ट्रानेंही पुत्र-मोह व राज्यलोभ या दोन गोष्टींमुळें त्यास संमति दिली. विदुरानें त्याला पुष्कळ उपदेश केला, तरीही त्यानें त्याचें न ऐकतां केवळ दैवाकडे बोल देऊन पांडवांना मंत्रिसत्तेच्या इच्छेविरुद्ध द्यूतासाठीं आवाहन केलें. धृतराष्ट्र जर या प्रकरणांत पडला नसता तर द्यूत खात्रीनें झालें नसतें. बलवंतांना याप्रकारें फसविण्यांत आपण स्वतःवर संकट ओढवून घेत आहोंत याची त्याला जाणीव होती. पण संकटाचें स्वरूप संशयास्पद होतें व द्यूताचा लाभ निश्चित होता. म्हणून त्यानें युधिष्ठिराला द्यूतासाठीं बोलावून आणावयास विदुरालाच आज्ञा दिली. तो विदुराला म्हणतो :--

**नेह क्षत्तः कलहस्तप्स्यते मां न चेद्दैवं प्रतिलोमं भविष्यत्।**
**धात्रा तु दिष्टस्य वशे किलेदं सर्वं जगच्चेष्टति न स्वतन्त्रम् ॥ ४**
**तदद्य विदुर प्राप्य राजानं मम शासनात ।**
**क्षिप्रमानय दुर्धर्षं कुन्तीपुत्रं युधिष्ठिरम् ॥ ५**

—महाभारत, सभापर्व अ. ५७

"विदुरा! दैवच प्रतिकूल आहे. एरवीं कलहाचें हें मूळ मी स्वतःच काय म्हणून लावावयास बसलों असतों? परमेश्वरानें जग हें दैवाच्या स्वाधीन केलेलें आहे, तें स्वतंत्र नाहीं. म्हणून तूं कुन्ती-पुत्र युधिष्ठिराला माझ्या आज्ञेवरून येथें घेऊन ये."

## द्यूत धृतराष्ट्राला नापसंत होतें काय?

विदुर अथवा भीष्म यांच्याप्रमाणें धृतराष्ट्र द्यूताच्या मुळींच विरुद्ध नव्हता. त्याचें एक मोठें प्रमाण हें आहे कीं, द्रौपदीसारख्या स्त्रीला युधिष्ठिरानें द्यूताच्या कैफांत पणाला लावल्यानंतर व शकुनीनें तिला जिंकल्याची गर्जना केल्यानंतर सभोंवार सर्व सभ्य धिक्कार करीत असतां, भीष्मद्रोणादि थरकापून उठले असतां व विदुर एखाद्या प्रेताप्रमाणें निश्चल झाला असतां राजा धृतराष्ट्र आनं-दित होऊन विदुराच्या खांद्याला वारंवार स्पर्श करून त्याला "काय

जिंकलें! काय जिंकलें!!" म्हणून एकसारखा विचारीत होता. अनायासें एवढी संपत्ति पदरांत पडल्याचा आनंद त्या कपटपटु व्यक्तीलाही लपवितां आला नाहीं. ज्या चार अधम प्रवृत्तीच्या लोकांना कुलस्त्री पणाला लावून जिंकल्यानंतर लज्जेऐवजीं आनंद वाटला त्यांची गणना करीत असतां महाभारतकारांनीं त्यांच्यांत धृतराष्ट्राला अग्रस्थान दिलें आहे. ते म्हणतात :—

**धृतराष्ट्रस्तु तं हृष्टः पर्यपृच्छत्पुनः पुनः ।**
**किं जितं किं जितमिति ह्याकारं नाभ्यरक्षत ॥ ४३**
**जहर्ष कर्णोतिभृशं सह दुःशासनादिभिः ।**
**इतरेषां तु सभ्यानां नेत्रेभ्यः प्रापतज्जलम् ॥ ४४**
**सौबलस्त्वभिधायैवं जितकाशी मदोत्कटः ।**
**जितमित्येव तानक्षान्पुनरेवान्वपद्यत ॥ ४५**

—महाभारत, सभापर्व अ. ६५

आनंदित झालेला धृतराष्ट्र वारंवार पुनःपुन्हां काय जिंकलें! काय जिंकलें!! असें विचारूं लागला. कर्णाला अत्यंत आनंद झाला. दुःशासनादि दुष्ट लोकही आनंदित झाले. धृतराष्ट्र, दुर्योधन, कर्ण, दुःशासन, शकुनि हे दुष्ट लोक सोडून बाकी सर्व सभ्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. जिंकण्याचा मद शकुनीला इतका चढला होता कीं तो वारंवार 'जितं, जितं' अशी गर्जना करीत होता. राजा धृतराष्ट्राला या अधर्मानें मिळविलेल्या संपत्तीबद्दल व ती मिळवून भाग्यास चढलेल्या दुर्योधनाबद्दल अंतःकरणपूर्वकच इतकें प्रेम वाटत होतें कीं पाण्डवांविषयींचें त्याचें अंतरंग फार काळ गुप्त राहूं शकलें नाहीं. अशुद्ध रक्त रोगाच्या रूपानें केव्हां तरी बाहेर येतेंच त्याचप्रमाणें पाण्डव वनांत जाऊन थोडे दिवस लोटतात न लोटतात तोंच एका प्रसंगानें त्याचें खरें अंतरंग स्पष्टपणें प्रकट झालें. झालेला अन्याय केवळ धृतराष्ट्रालाच सांवरून धरतां येण्यासारखा होता तो त्यानें सांवरून धरून पुढील अनर्थपात टाळावा म्हणून विदुरानें त्याला वारंवार विनवणी केली असतां धृतराष्ट्रानें त्याला उलटें राज्यांतून निघून जावयास सांगितलें. महाभारतांतील वनपर्वांत पुढीलप्रमाणें वर्णन आहे :—

एतद्वाक्यं विदुर यत्त सभायामिह प्रोक्तं पाण्डवान्प्राप्य मां च ।
हितं तेषामहितं मामकानामेतत्सर्वं मम नावैति चेतः ।। १८
इदं त्विदानीं गत एव निश्चितं तेषामर्थे पाण्डवानां यदात्थ ।
तेनाद्य मन्ये नासि हितो ममेति कथं हि पुत्रं पाण्डवार्थे त्यजेयम् ।। १९
असंशयं तेऽपि ममैव पुत्रा दुर्योधनस्तु मम देहात्प्रसूतः ।
स्वं वै देहं परहेतोस्त्यजेति को न ब्रूयात्समतामन्ववेक्ष्य ।। २०
स मां जिह्मं विदुर सर्वं ब्रवीषि मानं च तेहमधिकं धारयामि ।
यथेच्छकं गच्छ वा तिष्ठ वा त्वं सुसान्त्व्यमानाप्यसती स्त्री जहाति ।।२१
एतावदुक्त्वा धृतराष्ट्रोऽन्वपद्यदन्तर्वेश्म सहसोत्थाय राजन् । २२
—महाभारत, वनपर्व अ. ४

"विदुरा तुझीं या प्रकरचीं भाषणें पाण्डव सभेंत नांदत असतां मीं जशीं ऐकलीं आहेत त्याचप्रमाणें तुझें आतांचेंही भाषण मीं ऐकलें. तुझ्या सर्व बोलण्यांत पाण्डवांचें हित व्हावें व माझ्या पुत्रांचें मात्र अहित व्हावें अशी प्रबळ इच्छा दिसून येते. त्यावरून तूं माझ्या हिताचा नाहींस ही गोष्ट मला स्पष्टपणें कळून चुकली आहे. पाण्डवांसाठीं मी माझ्या पुत्राला कसें टाकणार? पाण्डव जरी एका अर्थानें माझे पुत्रच असले तरीही दुर्योधन माझ्या प्रत्यक्ष शरीरापासून उत्पन्न झालेला आहे. काय वाटेल तें झालें तरी दुसऱ्यासाठीं आपला देह टाकावयास कोण सिद्ध होईल? तूं लबाडीनें माझें अहित करूं इच्छीत आहेस. मी मात्र तुझा व्यर्थच मान राखला. तुला वाटलें तर जा, वाटलें तर रहा. कितीही सांत्वन केलें तरी व्यभिचारी स्त्री शेवटीं एकनिष्ठ राहूं शकत नाहीं हीच गोष्ट खरी. याप्रमाणें बोलून धृतराष्ट्र अंतःपुरांत निघून गेला." यामुळें धृतराष्ट्राच्या अंतःकरणावर स्वच्छ प्रकाश पडण्यासारखा आहे. द्यूत काय पण त्यानंतर झालेलें द्रौपदीचें केशाकर्षण, तिच्या वस्त्रहरणापर्यंत येऊन ठेपलेला प्रसंग, दुर्योधनानें तिला हलकटपणानें डावी मांडी दाखविणें इत्यादि सर्व गोष्टी धृतराष्ट्रासमोरच घडत असतात. राजा धृतराष्ट्रानें त्या थांबविण्याचा यत्किंचित्ही प्रयत्न केला नाहीं. हे सर्व अधमपणाचे प्रकार थांबविणें केवळ त्याच्या एकट्याच्या आधीन होते. तरीही ते मुळींच न थांबवितां त्यानें उलट आसुरी आनंदानें ते तसेच चालू

दिले. शेवटींही ते जर केवळ त्याच्याच आज्ञेवरून थांबले आहेत तर आधींही ते त्याच्याच आज्ञेनें थांबले असते. पण त्यानें ते थांबविलेले नाहींत. त्यावरून दुर्योधनाइतकाच त्याला आसुरी आनंद वाटत होता ही गोष्ट निश्चित आहे. शेवटीं गान्धारी ज्या वेळीं अंतः-पुरांतून बाहेर आली व तिनें राजाची कानउघाडणी केली तेव्हांच कायते ते प्रकार थांबले. महाभारतांत असें वर्णन आहे कीं :—

> ततो गान्धारी विदुरश्चापि विद्वांस्तमुत्पातं घोरमालक्ष्य राज्ञे ।
> निवेदयामासतुरार्तवत्तदा ततो राजा वाक्यमिदं बभाषे ॥ २४
>
> —महाभारत, सभापर्व अ. ७१

नंतर गान्धारी व विदुर यांनीं नाना प्रकारचे उत्पात पाहून राजा धृतराष्ट्राची आर्ततेनें जेव्हां विनवणी केली त्या वेळीं त्यानें दुर्यो-धनाला उद्देशून आज्ञा करून ते प्रकार थांबविले. पुढें आपल्या औदार्याच्या प्रदर्शनाच्या सोंगांत त्यानें पांडवांना त्यांचें सर्वस्व दिलें तरी त्यांत त्याची झालेली चूक दुर्योधनानें त्याला दाखवून देतांच त्यानें पुनश्च पाण्डवांना द्यूतार्थ आव्हान करून सर्वांच्या इच्छे-विरुद्ध दुसरें द्यूत घडवून आणलें व त्यांना देशोधडीला लावलें.

> अकामानां च सर्वेषां सुहृदामर्थदर्शिनाम् ।
> अकरोत्पाण्डवाह्वानं धृतराष्ट्रः सुतप्रियः ॥ २७
>
> —महाभारत, सभापर्व अ. ७४

## धृतराष्ट्राचा मुत्सद्दीपणा

राजा धृतराष्ट्र हा केवढा सूक्ष्म बुद्धीचा मुत्सद्दी व चाणाक्ष पुरुष होता, याचे पुरावे महाभारताच्या उद्योगपर्वांत ठिकठिकाणीं आढ-ळत आहेत. त्यांतील एक पुरावा म्हणजे ‘ द्रुपद ’पुरोहिताचें दौत्य-प्रकरण होय. राजसत्ता जेव्हां एकमेकांकडे दूत पाठवीत असतात, तेव्हां तो नेहमींच बुद्धिमान् व दीर्घदर्शी मनुष्य पाठविला जातो. व त्याच्याकडून उघड दौत्यापेक्षांही वेगळींच कामें करून घ्याव-याचीं असतात. पाण्डव प्रकट झाल्यावर वचनाप्रमाणें राज्याची पहिली मागणी करण्याकरितां द्रुपदानें पाण्डवांच्या बाजूनें आपला अत्यंत दीर्घदर्शी प्रतिभेचा पुरोहित कौरवांच्या राजसभेंत पाठविला.

तो पाठविण्याचीं अनेक कारणें होतीं. दौत्य कर्माचा येथें कांहीं एक उपयोग होणार नाहीं याची पाण्डवपक्षाला पूर्णपणें कल्पना होती. किंबहुना त्याऐवजीं आणखी दुसरीं महत्त्वाचीं कामें साधण्यासाठींच त्या पुरोहिताला पाठविण्यांत आलें होतें. त्यानें काय काय करावें हें त्याला समजावून सांगतांता द्रुपद सांगतो.

**मनांसि तस्य योधानां ध्रुवमावर्तयिष्यति ।**
**विदुरश्चापि तद्वाक्यं साधयिष्यति तावकम् ॥ ९**
**भीष्मद्रोणकृपादीनां भेदं संजनयिष्यति ।**
**अमात्येषु च भिन्नेषु योधेषु विमुखेषु च ॥ १०**
**पुनरेकत्रकरणं तेषां कर्म भविष्यति ।**
**एतस्मिन्नन्तरे पार्थाः सुखमेकाग्रबुद्धयः ॥ ११**
**सेनाकर्म करिष्यन्ति द्रव्याणां चैव सञ्चयम् ।**
**विद्यमानेषु च स्वेषु लम्बमाने तथा त्वयि ॥ १२**

—महाभारत, उदयोगपर्व अ. ६

" तूं तेथें राहून दुर्योधनाच्या बाजूच्या योद्धयांना त्याच्यापासून फोड. विदुर या बाबतींत तुला मदत करील. भीष्म, द्रोण, कृपाचार्य या सर्वांचीं अंतःकरणें तूं कौरवांपासून विन्मुख करण्याचा प्रयत्न कर. एकदां योद्धे व अमात्य यांची फळी फुटली म्हणजे स्वाभाविकपणेंच त्यांना एकत्र आणण्यासाठीं कौरवांना पुष्कळ प्रयास पडतील व त्यासाठीं त्यांना पुष्कळ वेळ खर्ची घालावा लागेल. तेवढ्या अवधींत पाण्डव आपलें सर्व लक्ष केंद्रित करून सैन्याची जमवाजमव व युद्धाला आवश्यक तो द्रव्यसंचय सहज करतील. तुला जितका अधिक विलंब लागेल तितकें हें काम अधिक सुकर आहे. पण इतके विचक्षण दूत कशासाठीं येत असतात व ते आपलें बोलणें कशासाठीं लांबवीत असतात याची सूक्ष्मदर्शी धृतराष्ट्राला पूर्णपणें कल्पना होती. म्हणून त्यानें द्रुपद पुरोहित येतांच त्याला तेथें मुळींच थांबूं न देतां ताबडतोब त्याची सभेंत भेट घेऊन आपला उलट निरोप घेऊन पाण्डवांकडे त्याला लावून दिलें व द्रुपदाच्या मुत्सद्दीपणावर विजय संपादन केला.

चिन्तयित्वा तु पार्थेभ्यः प्रेषयिष्यामि सञ्जयम् ।
स भवान् प्रतियात्वद्य पाण्डवानेव मा चिरम् ॥ २०

स तं सत्कृत्य कौरव्यः प्रेषयामास पाण्डवान् ।
सभामध्ये समाहूय सञ्जयं वाक्यमब्रवीत् ॥ २१

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय २१

"आपला निरोप मीं ऐकला. पूर्ण विचार करून मी पांडवांकडे माझा दूत संजयच पाठवितों. तुम्ही शक्य तितक्या त्वरेनें पांडवांकडे जा. याप्रमाणें बोलून त्यानें सत्कारपूर्वक द्रुपदाच्या पुरोहिताची बोळवण केली."

## धृतराष्ट्राचा पाताळयंत्रीपणा

यानंतर धृतराष्ट्रानें आपला दूत संजय याला रात्रीं सुव्यवस्थितपणें पढवून युधिष्ठिराकडे पाठविलें. युधिष्ठिराच्या धार्मिक मनोवृत्तीचा व दयाशील स्वभावाचा धृतराष्ट्राला इतका परिचय होता कीं काय बोललें असतां त्याचा परिणाम युधिष्ठिरावर होईल या गोष्टीची त्याला पूर्णपणें कल्पना होती. पराक्रमाचा दर्प दाखवून पाण्डवांच्यावर कांहींही परिणाम व्हावयाचा नाहीं. आपली बाजूच अन्यायाची असल्यामुळें तिला न्यायाचा उजळा देण्याचा कांहीं उपयोग नाहीं हें धृतराष्ट्राला पूर्णपणें माहीत होतें. पण त्याबरोबर त्याला हेंही माहीत होतें कीं केवळ अगतिक म्हणूनच पांडव युद्ध करीत आहेत. वास्तविक सर्व कुळाचा विध्वंस करणारें हें युद्ध त्यांना मुळींच नको असून कोणत्याही उपायानें तें जितकें टळेल तितकें त्यांना हवेंच आहे. त्यांच्या या ऋजु स्वभावाचा अधिकांत अधिक लाभ कसा उठवितां येईल याचा धृतराष्ट्रानें पूर्णपणें विचार केला होता. त्या अनुरोधानेंच त्यानें संजयाला पढवून पांडवांकडे पाठविलें. संजय शिष्टाई हें महाभारतांतील धृतराष्ट्राच्या कौटिल्याचें अद्वितीय उदाहरण आहे. संजयानें येऊन युधिष्ठिराला धृतराष्ट्राचा म्हणून जो निरोप सांगितला तो अभ्यास करण्यासारखा आहे.

संजय म्हणतो :

शमं राजा धृतराष्ट्रोऽभिनन्दन्नयोजयत्त्वरमाणो रथं मे ।
सभ्रातृपुत्रस्वजनस्य राज्ञस्तद्रोचतां पाण्डवानां शमोऽस्तु ॥ ४
सर्वैर्धर्मैः समुपेतास्तु पार्थाः संस्थानेन मार्दवेनार्जवेन ।
जाताः कुले ह्यनृशंसा वदान्या ह्रीनिषेवाः कर्मणां निश्चयज्ञाः ॥५
न युज्यते कर्म युष्मासु हीनं सत्त्वं हि वस्तादृशं भीमसेनाः ।
उद्भासते ह्यञ्जनबिन्दुवत्तच्छुभ्रे वस्त्रे यद् भवेत् किल्बिषं वः ॥ ६
सर्वक्षयो दृश्यते यत्र कृत्स्नः पापोदयो निरयोऽभावसंस्थः ।
कस्तत्र कुर्याज्जातु कर्म प्रजानन् पराजयो यत्र समो जयश्च ॥ ७
ते वै धन्या यैः कृतं ज्ञातिकार्यं ते वै पुत्राः सुहृदो बान्धवाश्च ।
उपक्रुष्टं जीवितं सन्त्यजेयुर्यतः कुरूणां नियतो वै भवः स्यात् ॥ ८
ते चेत् कुरूननुशिष्याथ पार्था निर्णीय सर्वान् द्विषतो निगृह्य ।
समं वस्तज्जीवितं मृत्युना स्याद्यज्जीवध्वं ज्ञातिवधे न साधु ॥ ९
को ह्येव युष्मान् सह केशवेन सचेकितानान् पार्षतबाहुगुप्तान् ।
ससात्यकीन् विषहेत प्रजेतुं लब्ध्वाऽपि देवान् सचिवान् सहेन्द्रान् ॥१०
को वा कुरून् द्रोणभीष्माभिगुप्तानश्वत्थाम्ना शल्यकृपादिभिश्च ।
रणे विजेतुं विषहेत राजन् राधेयगुप्तान् सहभूमिपालैः ॥ ११
महद्बलं धार्तराष्ट्रस्य राज्ञः को वै शक्तो हन्तुमक्षीयमाणः ।
सोऽहं जये चैव पराजये च निःश्रेयसं नाधिगच्छामि किञ्चित् ॥ १२
कथं हि नीचा इव दौष्कुलेया निर्धर्मार्थं कर्म कुर्युश्च पार्थाः ।
सोऽहं प्रसाद्य प्रणतो वासुदेवं पञ्चालानामधिपं चैव वृद्धम् ॥ १३
कृताञ्जलिः शरणं वः प्रपद्ये कथं स्वस्ति स्यात् कुरुसृञ्जयानाम् ।
न ह्येवमेवं वचनं वासुदेवो धनञ्जयो वा जातु किंचिन्न कुर्यात् ॥ १४
प्राणान् दद्याद्याचमानः कुतोऽन्यदेतद्विद्वन् साधनार्थं ब्रवीमि ।
एतद्राज्ञो भीष्मपुरोगमस्य मतं यद्वः शान्तिरिहोत्तमा स्यात् ॥ १५

— महाभारत उद्योगपर्व अध्याय २५

संजय उवाच :—

धर्मनीत्या पाण्डव ते विचेष्टा लोके श्रुता दृश्यते चापि पार्थ ।
महाश्रावं जीवितं चाप्यनित्यं संपश्य त्वं पाण्डव मा व्यनीनशः ॥ १

न चेद्भागं कुरवोऽन्यत्र युद्धात् प्रयच्छेरंस्तुभ्यमजातशत्रो ।
भैक्षचर्यामन्धकवृष्णिराज्ये श्रेयो मन्ये न तु युद्धेन राज्यम् ।। २
अल्पकालं जीवितं यन्मनुष्ये महास्रावं नित्यदुःखं चलं च ।
भूयश्च तद्यशसो नानुरूपं तस्मात् पापं पाण्डव मा कृथास्त्वम् ।। ३
कामा मनुष्यं प्रसजन्त एते धर्मस्य ये विघ्नमूलं नरेंद्र ।
पूर्वं नरस्तान् मतिमान् प्रणिघ्नन् लोके प्रशंसां लभतेऽनवद्याम् ।। ४
निबन्धनी ह्यर्थतृष्णेह पार्थ तामिच्छतां बाध्यते धर्म एव ।
धर्मं तु यः प्रवृणीते स बुद्धः कामे गृध्नो हीयतेऽर्थानुरोधात् ।। ५
धर्मं कृत्वा कर्मणां तात मुख्यं महाप्रतापः सवितेव भाति।
हीनो हि धर्मेण महीमपीमां लब्ध्वा नरः सीदति पापबुद्धिः ।। ६
इह क्षेत्रे क्रियते पार्थ कार्यं न वै किञ्चित् क्रियते प्रेत्य कार्यम् ।
कृतं त्वया पारलौक्यं च कर्म पुण्यं महत्सद्भिरतिप्रशस्तम् ।। १२
तच्चेदेवं द्वेषरूपेण पार्थाः करिष्यध्वं कर्म पापं चिराय ।
निवसध्वं वर्षपूगान् वनेषु दुःखं वासं पाण्डवा धर्म एव ।। १६
अप्रव्रज्ये मा स्म हित्वा पुरस्तादात्माधीनं यद्बलं ह्येतदासीत् ।
नित्यं च वश्याः सचिवास्तवेमे जनार्दनो युयुधानश्च वीरः ।। १७
मत्स्यो राजा रुक्मरथः सपुत्रः प्रहारिभिः सह पुत्रैर्विराटः ।
राजानश्च ये विजिताः पुरस्तात् त्वामेव ते संश्रयेयुः समस्ताः ।। १८
महासहायः प्रतपन् बलस्थः पुरस्कृतो वासुदेवार्जुनाभ्याम् ।
वरान् हनिष्यन् द्विषतो रङ्गमध्ये व्यनेष्यथा धार्तराष्ट्रस्य दर्पम् ।। १९
बलं कस्माद्वर्धयित्वा परस्य निजान् कस्मात् कर्शयित्वा सहायान् ।
निरुष्य कस्माद्वर्षपूगान् वनेषु युयुत्ससे पाण्डव हीनकालम् ।। २०
अप्राज्ञो वा पाण्डव युध्यमानोऽधर्मज्ञो वा भूतिमथोऽभ्युपैति ।
प्रज्ञावान् वा बुध्यमानोऽपि धर्मं संरम्भाद्वा सोऽपि भूतेरपैति ।। २१
नाधर्मे ते धीयते पार्थ बुद्धिर्न संरम्भात् कर्म चकर्थ पापम् ।
आत्थ किं तत्कारणं यस्य हेतोः प्रज्ञाविरुद्धं कर्म चिकीर्षसीदम् ।। २२
अव्याधिजं कटुकं शीर्षरोगि यशोमुषं पापफलोदयं वा ।
सतां पेयं यन्न पिबन्त्यसन्तो मन्युं महाराज पिब प्रशाम्य ।। २३
पापानुबन्धं को नु तं कामयेत क्षमैव ते ज्यायसी नोत भोगाः ।
यत्र भीष्मः शान्तनवो हतः स्याद्यत्र द्रोणः सहपुत्रो हतः स्यात् ।। २४

कृपः शल्यः सौमदत्तिर्विकर्णो विविंशतिः कर्णदुर्योधनौ च ।
एतान् हत्वा कीदृशं तत्सुखं स्यात्तद्विन्देयास्तदनु ब्रूहि पार्थ ॥ २५
लब्ध्वाऽपीमां पृथिवीं सागरान्तां जरामृत्यू नैव हि त्वं प्रजह्याः ।
प्रियाप्रिये सुखदुःखे च राजन्नेवं विद्वान्नैव युद्धं कुरु त्वम् ॥ २६
अमात्यानां यदि कामस्य हेतोरेवं युक्तं कर्म चिकीर्षसि त्वम् ।
अपक्रामेः स्वं प्रदायैव तेषां मा मास्त्वं वै देवयानात् पथोऽद्य ॥ २७

—महाभारत, उदयोगपर्व अध्याय २७.

राजा धृतराष्ट्राला शांति असावी अशी उत्कट इच्छा आहे. तेवढ्याचसाठीं त्यानें मला येथें पाठविलें. पांडव आणि कौरव या सर्व स्वजनांचें सख्य व्हावें आणि ती गोष्ट पांडवांना रुचावी असें त्याला अंतःकरणपूर्वक वाटतें. धर्मनिष्ठा, दयाशीलता, कपटाचा अंतःकरणाला स्पर्शही नसणें, उग्रतेचा मुळींच स्पर्श नसणें, अकृत्याबद्दल स्वभावतःच संकोच वाटणें, दानशूरपणा, दृढनिश्चयीपणा, व घरंदाजपणा या बाबतींत पांडव सर्वश्रेष्ठ आहेत असें राजाचें मत आहे. तुमच्याजवळ सैन्यबळ अत्यंत श्रेष्ठ आहे हें खरें; पण सद्गुणांचे तुम्ही आधारस्तंभ असल्यामुळें तुमच्या हातून कोणतेंही हीनपणाचें कार्य होणें ही गोष्ट लोकांच्या दृष्टीनें धक्का देणारी होईल. कौरव जाणूनबुजूनच अधम आहेत. त्यांच्या हातून कोणतेंही हीन कृत्य झालें तरी लोक त्यांना नवीं नांवें कोणतीं ठेवणार? मूळच्याच काळ्या कापडावर कितीही काळा रंग ओतला तरी त्याचा डाग कांहीं पडत नाहीं, पण अतिशय शुभ्र वस्त्रावर बिंदुमात्र जरी डाग पडला तरीदेखील तो उठून दिसल्याखेरीज राहात नाहीं. या न्यायानें तुमच्यासारख्या अतिश्रेष्ठ चारित्र्याच्या, धर्माच्या आधारस्तंभांकडून अत्यंत लहान जरी दोष घडला तरी तो लोकांच्या डोळ्यांत भरल्याशिवाय राहणार नाहीं. होणारें युद्ध अत्यंत भीषण आहे. त्यांत सर्वांचाच सर्वनाश होणार आहे. सर्वच कर्ती पिढी कापली गेल्यावर दुराचार माजेल व त्यांतून नरकगामी अशीं कुकृत्यें उत्पन्न होतील. सर्वनाशाच्या नरकांतच ज्यामुळें जावें लागेल व ज्याच्यांतून मिळणारा जयदेखील पराजयासारखाच आहे तें भयानक कृत्य जाणून बुजून कोण कशासाठीं करील? ते

लोक जगांत धन्य होत कीं जे या महान् विनाशापासून कौरव कुलाला वांचविण्याचें ज्ञातिकार्य करतील. जें कौरव कुल जगावें म्हणून स्वतःचें जीवितदेखील द्यावयास सिद्ध होतील ते खरोखरी सर्व जगाकडून धन्यतेस पात्र झाल्यावांचून राहणार नाहींत. तुम्ही ज्यांना शत्रु समजतां ते व तुम्ही एकाच कुलांतील आहांत. त्यांना ठार मारून टाकल्यावर तुम्हांला स्वतःलाच त्यांच्यावांचून जगणें मृत्यूइतकेंच यातनामय व भीषण वाटेल. तुमच्या सामर्थ्याची कोण कल्पना करूं शकणार आहे ? ज्याच्या बाजूला स्वतः श्रीकृष्ण आहे, सात्यकिप्रभृति योद्धे ज्यांच्याकडून लढावयास सिद्ध आहेत, धृष्ट-द्युम्नानें ज्यांच्या संरक्षणाचा भार उचलला आहे, त्या तुमच्याशीं युद्ध करून महेंद्रदेखील आपल्या सर्व देवसैन्यासह यशस्वी होऊं शकणार नाहीं. त्याचप्रमाणें भीष्म, द्रोण, अश्वत्थामा, कर्ण, शल्य व कृपाचार्य यांनीं ज्याचें संरक्षण चालविलें आहे असें राजा दुर्यो-धनाचें अमर्याद सामर्थ तरी स्वतःचा नाश ओढवून घेतल्यावांचून कोण धुळीस मिळवूं शकेल ? म्हणून जय अथवा पराजय मला समा-नच वाटतात. केवळ स्वतःचाच स्वार्थ साधावा म्हणून ज्यांत कस-ल्याही प्रकारचा धर्म नाहीं असें हें ज्ञातिवधाचें भीषण कार्य अत्यंत अधम अशा कुलांगारावांचून दुसरा कोण करूं शकेल ? पाण्डावां-सारखे धार्मिक व श्रेष्ठ पुरुष हें कार्य करावयास कधींही प्रवृत्त होणार नाहींत म्हणून मी श्रीकृष्ण व पंचालांचा वृद्ध राजा द्रुपद या दोघांनाही हात जोडून अशी विनंति करतों कीं, कौरव व पाण्डव यांचें कल्याण व्हावें म्हणून काय वाटेल तें झालें तरी हा सर्वनाश त्यांनीं होऊं देऊं नये. माझी ही विनंति श्रीकृष्ण मान्य केल्याखेरीज राहणार नाहींत व अर्जुनही ती मान्य करील असा मला भरंवसा आहे. मी सर्वांच्या प्राणांची भिक्षा मागतों. जें माझें मत आहे तेंच भीष्मादि सर्वश्रेष्ठ लोकांचेंही मत आहे. विशेषतः युधिष्ठिराला माझें असें सांगणें आहे कीं तुझी प्रवृत्ति स्वाभाविकच धर्माकडे आहे. लोकही त्यासाठीं वारंवार तुझी प्रशंसा करीत असतात व ती नुसती वरवर नसून अगदीं खरी आहे याविषयीं मला मुळींच संशय वाटत नाहीं. म्हणून मी तुलाच असें म्हणूं इच्छितों कीं जीव-

नाचें मूल्य अत्यंत श्रेष्ठ आहे हें ओळखून त्याचा विनाश करूं नकोस. जर कौरव युद्धावांचून तुला तुझा भाग द्यावयास सिद्ध नसतील तर तूं खुशाल अंधकवृष्णींच्या राज्यांत भिक्षा मागणें पत्कर. पण युद्ध करून राज्य घेऊं नकोस. यांतच तुझ्यासारख्या धार्मिक प्रवृत्तीच्या महापुरुषाचें कल्याण आहे. आयुष्य अत्यंत चंचल आहे. त्यांतही दुःखाचे प्रसंग अनेक, सुख नेहमींच थोडें. अशा या जीविताच्या विनिमयानें सर्वश्रेष्ठ असें जगत्कल्याणाचें यश संपादन करावयाचें कीं लोक आपल्याला पापी म्हणतील असें कुकृत्य करावयाचें? उपभोगाची इच्छाच मनुष्याचा खरा शत्रु होय. धर्माचें खरें विघ्न तेंच होय. तुला मारावयाचेंच असलें तर त्या इच्छेलाच मारून टाक. जो कोणी विचक्षण मनुष्य या इच्छेलाच मारून टाकतो, त्याच्या कीर्तीचें गायन जगांत सदोदित होत असतें. संपत्तीची तृष्णा हीच या सर्व वाईट गोष्टींची प्रेरक आहे. जो कोणी तिच्या तावडींत सांपडतो त्याचा धर्म ती नष्ट करून टाकते. जो कोणी खरा विचक्षण असतो तो नेहमीं धर्मबुद्धीचाच आश्रय करतो. व जो उपभोगेच्छेच्या आहारीं जातो तो केवळ हीन म्हणून लोक त्याची निंदा करतात. आपल्या सर्व प्रवृत्ति जो केवळ धर्माच्या अनुरोधानेंच ठेवतो, तो अत्यंत तेजस्वी सूर्याप्रमाणें जगांत तळपतो. व जो धर्म सोडून देतो त्याला सर्व पृथ्वी जरी मिळाली तरीही त्याच्या पापबुद्धीमुळें तो नेहमीं आंतरिक क्लेशांतच काळ घालवितो. आपण या लोकीं जें कर्म करूं त्याचाच आपल्याला परलोकीं उपयोग होईल. परलोकांत कांहीं कर्म करावयाचें नसतें. आजपर्यंत तूं परलोकासाठीं इतकें उत्कृष्ट पुण्यकर्म केलें आहेस कीं त्यामुळें जगांतील सर्व थोर थोर महात्मेही तुझी प्रशंसा करीत असतात. आज द्वेषाच्या आहारीं जाऊन जर तूं पापकर्म करावयास सिद्ध होशील तर तें अत्यंत वाईट होईल व हेंच जर तुम्हांस करावयाचें असलें तर तेरा वर्षें तुम्हांला वनांत रहावें लागलें ही गोष्ट चांगलीच झाली असें म्हटलें पाहिजे. कारण तेवढीं वर्षें तरी मानव जातीचा विनाश टळला. जर तुला अखेरीस हेंच करावयाचें होतें तर मग तेरा वर्षें तरी धार्मिकतेचें सोंग आणून वनवास

कशाला पत्करलास? आजचे तुझे साहाय्यकारी त्या वेळींही तुझ्या स्वाधीनच होते. श्रीकृष्ण, सात्यकि, विराट, द्रुपद ही सर्व मंडळी त्यावेळींही तूं म्हणशील तें करावयास सिद्ध होती. त्यांचें साहाय्य घेऊन तूं त्याच वेळीं अर्जुन व श्रीकृष्ण यांच्या नेतृत्वाखालीं दुर्योधनाचा गर्व शस्त्रांचा वापर करून कां मोडून काढला नाहींस? इतके दिवस थांबून दुसऱ्याला आपलें बळ वाढविण्याची पूर्णपणें संधि देऊन, आपल्या साहाय्यकारी लोकांना मनस्ताप देऊन, वर्षेंचीं वर्षें वनांत कष्ट सहन करून तूं आतां कशासाठीं युद्धघोषणा करीत आहेस? आज युद्ध करण्यांत शहाणपण, धर्म, लोककल्याण कांहींच नाहीं हें तुलाही माहीत आहे. तुझी बुद्धि अधर्माकडे वळूं नये, पापकर्म तुझ्या हातून घडूं नये असें मला वाटतें. सदसद्बुद्धीला हरताळ फांसणारें हें कुकर्म करण्यासाठीं तूं कां प्रवृत्त झालास तेंच मला कळत नाहीं. कांहींही रोग ज्याच्यापासून उत्पन्न होऊं शकत नाहीं असें सर्वत्र लाभदायक कर्मच मनुष्यानें करावें. माझें ऐकशील तर तूं राग गिळून टाक. त्यांतच तुझें कल्याण आहे. पाप उत्पन्न होणारें असें कर्म महापुरुषांना कधींही आवडत नाहीं. क्षमा व भोग यांच्यामध्यें क्षमा श्रेष्ठ होय. ज्या कर्मामुळें तुला तुझें आजोबा भीष्म यांना ठार मारावें लागेल, तुझे गुरु द्रोण यांची त्यांच्या पुत्रासहित हत्या करावी लागेल, कृपाचार्य, शल्य, सौमदत्ति, विकर्ण, विवंशति, कर्ण, व दुर्योधन यांची हत्त्या करावी लागेल, त्या कर्मापासून काय सुख उत्पन्न होणार? मनुष्याच्या भाग्यांत असतें तेंच त्याला मिळणार. जय, मृत्यु, सुखदुःख या गोष्टी केवळ भाग्यानुसारच लाभत असतात. साऱ्या समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य जरी तूं मिळविलेंस तरी या गोष्टी तुला टाळतां येणार नाहींत. ज्या गोष्टी तुझ्या भाग्यांतच नाहींत, त्या काय वाटेल तें केलेंस तरी कशा मिळणार? म्हणून युद्धाच्या पापकर्मास प्रवृत्त होऊं नकोस. जर तुझ्या सल्लागारांच्या अनुरोधानें तूं हें कृत्य करावयास प्रवृत्त झाला असशील तर त्यांना तूं नीट समजावून सांग व आजवरचें चारित्र्य ध्यानांत घेऊन सद्गतीच्या मार्गापासून स्वतःला भ्रष्ट करून घेऊं नकोस.

युधिष्ठिराचें मनोविज्ञान लक्षांत घेतां धृतराष्ट्रानें हा किती कुशलतेनें डाव टाकला होता! त्याचे परिणाम श्रीकृष्णांच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वानें जरी धृतराष्ट्राला हवे होते तसे घडून आले नाहींत तरी ते खोलवर रुजले होते यांत शंका नाहीं.

कणिकानें उपदेशिलेल्या

अग्न्याधानेन यज्ञेन काषायेण जटाजिनैः ।
लोकान्विश्वासयित्वैव ततो लुम्पेद्यथा वृकः ॥१९

—महाभारत, आदिपर्व अध्याय १४०

या तत्त्वाचा संजयशिष्टाईइतका परिपूर्ण आविष्कार अन्यत्र दृष्टीस पडणें दुरापास्त आहे. युधिष्ठिराची विशिष्ट धार्मिक मनोवृत्ति व दयाबुद्धि ध्यानांत घेऊनच धृतराष्ट्रानें हा प्रयोग त्याच्यावर केलेला होता. केवळ भगवान् श्रीकृष्णाच्या उपस्थितीमुळें व प्रभावी विभूतिमत्त्वामुळेंच त्याचा हा डाव यशस्वी होऊं शकला नाहीं ही गोष्ट वेगळी. युधिष्ठिराला धृतराष्ट्राचें हें कपट उलगडलें नाहीं असें नाहीं. तो श्रीकृष्णांना म्हणतो :—

श्रुतं ते धार्तराष्ट्रस्य सपुत्रस्य चिकीर्षितम् ।
एतद्धि सकलं कृष्ण सञ्जयो मां यदब्रवीत् ॥६
तन्मतं धृतराष्ट्रस्य सोऽस्यात्मा विवृतान्तरः ।
यथोक्तं दूत आचष्टे वध्यः स्यादन्यथा ब्रुवन् ॥ ७
अप्रदानेन राज्यस्य शान्तिमस्मासु मार्गति ।
लुब्धः पापेन मनसा चरन्नसममात्मनः ॥ ८
यत्तद्द्वादशवर्षाणि वनेषु ह्युषिता वयम् ।
छद्मना शरदं चैकां धृतराष्ट्रस्य शासनात् ॥९
स्थाता नः समये तस्मिन् धृतराष्ट्र इति प्रभो ।
नाहास्म समयं कृष्ण तद्धि नो ब्राह्मणा विदुः ॥१०
गृद्धो राजा धृतराष्ट्रः स्वधर्मं नानुपश्यति ।
वश्यत्वात् पुत्रगृद्धित्वान्मन्दस्यान्वेति शासनम् ॥११
सुयोधनमते तिष्ठन् राजाऽस्मासु जनार्दन ।
मिथ्या चरति लुब्धः सन् चरन् हि प्रियमात्मनः ॥१२

— महाभारत उद्योगपर्व अ. ७२

"श्रीकृष्ण! संजयाच्या तोंडून सपुत्र धृतराष्ट्राचे सर्व विचार आपल्याला कळलेच आहेत. हें धृतराष्ट्राचें मत आहे. त्याचें अंतःकरण येथें अगदीं उघड झालेलें आहे. कारण राजनीतिशास्त्राप्रमाणें जसें धन्यानें बोलावयास सांगितलें असेल तसेंच दूताला बोलावें लागतें. जर तो वेगळें बोलला तर त्याला ठार मारतात. स्वतःला शोभणार नाहींत असें विचार लोभाविष्ट होऊन पापात्मा धृतराष्ट्र आपल्या अंतःकरणांत वागवीत आहे. राज्य मुळींच न देतां त्याला शांतता हवी आहे, व ती आम्ही राखावी अशी त्याची इच्छा आहे. केवळ धृतराष्ट्राच्या आज्ञेसाठीं आम्ही बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास केला. आम्ही आपलें वचन पाळलें. पण धृतराष्ट्र कांहीं आपलें वचन पाळावयास सिद्ध नाहीं. धृतराष्ट्र लोभी आहे, तो धर्म पाळूं इच्छीत नाहीं. त्याचा आपल्या मनावर ताबा नाहीं. पुत्रलोभामुळें मूर्ख दुर्योधनाच्या लहरीनुसार तो वागतो. लोभीपणा, केवळ स्वतःकडेच पाहण्याची वृत्ति या गोष्टींतून त्याचें कपटाचरण जन्म पावलेलें आहे व दुर्योधनाचेंच तेवढें बरें पाहून तो आमचें मात्र अकल्याण करूं इच्छीत आहे."

याप्रमाणें युधिष्ठिरानें धृतराष्ट्राची लबाडी पूर्णपणें ओळखली असली तरी त्याच्या मनावर संजयाच्या वाक्यांचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. संजयाच्या वाक्यांचे बाण केवळ युधिष्ठिराच्या सात्त्विक मनावरच काय, पण महारथी अर्जुनाच्याही मनावर परिणाम केल्यावांचून राहिले नाहींत असें श्रीमत् भगवद्गीतेच्या प्रथमाध्यायांतील अर्जुनाच्या विलपनावरूनही दिसतें. तो म्हणतो :

**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८**
**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति । २९**

**येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।**
**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥३३**

**एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोपि मधुसूदन ।**
**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किन्नु महीकृते ॥३५**

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।**
**पापमेवाश्रयेदस्मान् हत्वैतानाततायिनः ॥३६**
**यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।**
**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥३८**
**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।**
**यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥४५**
**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥४६**

**—महाभारत, भीष्मपर्व अध्याय २५**

"हे श्रीकृष्णा ! माझे सगळे स्वजनच युद्धार्थ उपस्थित असलेले पाहून माझ्या अंगाला कांपरें भरलें आहे व तोंड कोरडें पडलें आहे. ज्यांच्यासाठीं म्हणून राज्य, भोग व सुख यांची इच्छा करावयाची ते सगळे हे लोक धनाचा व प्राणांचा परित्याग करून आमच्याशीं युद्ध करावयास ठाकले आहेत. त्रैलोक्याचें राज्य जरी मिळत असलें तरीही मी यांना मारणार नाहीं, मग पृथ्वीवरच्या राज्याची कथाच काय ? हे लोक मला मारीत असले तरीही मी त्यांना मारणार नाहीं. यांना मारून आम्हांला काय आनंद मिळणार आहे ? उलट या आततायींना मारल्यामुळें आम्हांला पाप मात्र लागेल. हे लोभाविष्ट झाल्यामुळें मित्रद्रोह व कुलक्षय हें केवढें मोठें पाप आहे याची त्यांना कल्पना नाहीं. पण आम्हांला ती कल्पना न ठेवून कसें चालेल. केवळ राज्यसुखाच्या लोभानें स्वजनांनाच ठार मारण्याची सिद्धता करण्यांत आम्ही केवढें मोठें पापकृत्य करावयास उद्युक्त झालों होतों. मी हातांत शस्त्र घेणार नाहीं. प्रतिकार करणार नाहीं. अशा स्थितींतही या कौरवांनीं मला ठार मारलें तरीही माझी हरकत नाहीं."

संजय तरी यापेक्षां वेगळें काय सांगत होता ? श्रीकृष्णामुळेंच धृतराष्ट्राचा हा डाव फसल्यानंतर शिष्टाईच्या वेळीं पुनश्च श्रीकृष्ण येणार आहेत हें ऐकून लोभानें त्यांना पाण्डवांपासून फोडण्याचा अथवा नाना प्रकारच्या उपायांनीं त्यांना ताब्यांत घेण्याचा धृतराष्ट्रानें प्रयत्न केला. पण श्रीकृष्ण या सर्व गोष्टी ओळखूनच

असल्यामुळें ते कांहीं त्याच्या कोणत्याही प्रलोभनाला बळी पडले नाहींत किंवा त्याच्या कपटजालांत सांपडूं शकले नाहींत. त्याच्या उद्गारांवरून ही गोष्ट सहसा त्याच्या अमात्यांच्या ध्यानांत येऊं शकली नाहीं तरी विदुरानें ती गोष्ट अखेरीस ओळखलीच. श्रीकृष्ण येणार आहेत हें ऐकून धृतराष्ट्र म्हणतो :

एकवर्णैः सुक्लृप्ताङ्गैर्बाह्लिजातैर्हयोत्तमैः ।
चतुर्युक्तान् रथांस्तस्मै रौक्मान् दास्यामि षोडश ॥६
नित्य प्रभिन्नान् मातङ्गानीषादन्तान् प्रहारिणः ।
अष्टानुचरमेकैकमष्टौ दास्यामि कौरव ॥७
दासीनामप्रजातानां शुभानां रुक्मवर्चसाम् ।
शतमस्मै प्रदास्यामि दासानामपि तावताम् ॥८
आविकं च सुखस्पर्शं पार्वतीयैरुपाहृतम् ।
तदप्यस्मै प्रदास्यामि सहस्राणि दशाष्ट च ॥९
अजिनानां सहस्राणि चीनदेशोद्भवानि च ।
तान्यप्यस्मै प्रदास्यामि यावदर्हति केशवः ॥१०
दिवा रात्रौ च भात्येष सुतेजा विमलो मणिः ।
तमप्यस्मै प्रदास्यामि तमर्हति हि केशवः ॥११
एकेनाभिपतत्यह्ना योजनानि चतुर्दश ।
यानमश्वतरीयुक्तं दास्ये तस्मै तदप्यहम् ॥१२
यावन्ति वाहनान्यस्य यावन्तः पुरुषाश्च ते ।
ततोऽष्टगुणमप्यस्मै भोज्यं दास्याम्यहं सदा ॥१३
स्वलंकृताश्च कल्याण्यः पादैरेव सहस्रशः ।
वारमुख्या महाभागं प्रत्युद्यास्यन्ति केशवम् ॥ १५
नगरादपि याः काश्चिद्गमिष्यन्ति जनार्दनम् ।
द्रष्टुं कन्याश्च कल्याण्यस्ताश्च यास्यन्त्यनावृताः ॥१६
दुःशासनस्य च गृहं दुर्योधनगृहाद्वरम् ।
तदद्य क्रियतां क्षिप्रं सुसंमृष्टमलंकृतम् ॥१९
सर्वमस्मिन् गृहे रत्नं मम दुर्योधनस्य च ।
यद्यदर्हति वार्ष्णेयस्तत्तद्देयमसंशयम् ॥२१

—महाभारत उद्योगपर्व अ. ८६

"मी कृष्णाला बाह्लिकदेशांत जन्म पावलेले, एकाच रंगाचे, सर्व अलंकार अंगावर घातलेले, असे चार चार घोडे एकेकाला जुंपलेले सुवर्णाचे सोळा रथ देईन. उत्कृष्ट असे आठ हत्ती मी त्याला अर्पण करीन. प्रत्येक हत्तीच्या मागें आठ आठ अनुचर असतील. सोन्याचे अलंकार अंगावर घातलेल्या तरुण, प्रसूत न झालेल्या अशा शंभर दासी मी श्रीकृष्णाला देईन. उत्कृष्ट प्रकारचीं हजारों वस्त्रें व चीन देशांत उत्पन्न झालेलीं सहस्रावधि अजिनें मी श्रीकृष्णांना देईन. दिवसरात्र आपल्या तेजानें तळपणारा असा हा माझ्या ज़वळचा उत्कृष्ट मणि (रत्न) मी कृष्णाला देईन. तोच ही गोष्ट घ्यावयास योग्य आहे. एकाच दिवसांत चौदा योजनें जाऊं शकणाऱ्या अश्वतरींनीं युक्त असें वाहन मी श्रीकृष्णाला देईन. त्याच्याबरोबर जितकीं माणसें व लोक असतील त्यांना लागणाऱ्या अन्नापेक्षां आठपट अधिक पदार्थ मी त्यांना देईन. उत्कृष्ट अलंकार अंगावर घातलेल्या अतिशय सुंदर अशा सहस्रावधि वेश्या श्रीकृष्णांबरोबर राहतील. दुर्योधनापेक्षांही दुःशासनाचा प्रासाद अधिक उत्कृष्ट आहे. तो अधिक अलंकृत व सुशोभित करा व तेथेंच श्रीकृष्णांना उतरवा. माझ्या व दुर्योधनाच्या घरचीं जेवढीं रत्नें असतील तेवढीं तेथें नेऊन भरा. श्रीकृष्णाची ज्याच्यावर दृष्टि पडेल व त्याला जें आवडेल तें त्याला खुशाल द्या." त्याच्या या सूचनांत असलेलें कपटजाल विदुरानें ओळखलें व त्याला स्वच्छ शब्दांत असें सांगितलें कीं :—

**मायैषा सत्यमेवैतच्छद्मैतद्भूरिदक्षिण ।**
**जानामि त्वन्मतं राजन् गूढं बाह्येन कर्मणा ।। ८**
**पञ्च पञ्चैव लिप्स्यन्ति ग्रामकान् पाण्डवा नृप ।**
**न च दित्ससि तेभ्यस्तांस्तच्छद्मं न करिष्यसि ।। ९**
**अर्थेन तु महाबाहुं वार्ष्णेयं त्वं जिहीर्षसि ।**
**अनेन चाप्युपायेन पाण्डवेभ्यो विभेत्स्यसि ।। १०**
**न च वित्तेन शक्योऽसौ नोद्यमेन न गर्हया ।**
**अन्यो धनञ्जयात् कर्तुमेतत्तत्त्वं ब्रवीमि ते ।। ११**

—महाभारत, उद्योगपर्व अ. ८७

"राजन्, हें सर्व कपट आहे. तुझ्या काळ्या अंतःकरणाची मला पूर्ण कल्पना आहे. पाण्डव केवळ पांच गांवें मागतात तीं तूं त्यांना देऊं इच्छीत नाहींस व श्रीकृष्णावर मात्र धनाचा वर्षाव करूं इच्छितोस यांतील कपट मला स्पष्ट माहीत आहे. पण या उपायांनीं तुला श्रीकृष्णाला जिंकतां येणार नाहीं अथवा पाण्डवांपासून फोडतांही येणार नाहीं. धन, नानाविध उपाय व गर्हणा यांनीं अर्जुनापासून श्रीकृष्णाला वेगळें करणें अशक्य आहे." धृतराष्ट्रानें केलेली ही सिद्धता दिसते तितकी साधी नाहीं. कौटिलीय अर्थशास्त्राच्या कूटप्रयोगांचें नीट निरीक्षण केलें, कणिकनीति डोळ्यासमोर ठेविली व विष देण्यापासून तर जाळून मारण्यापर्यंतच्या सर्व प्रकारच्या दुराचारांचा उपयोग करून स्वतःचा स्वार्थ साधणाऱ्या धृतराष्ट्राचा पूर्वेतिहास लक्षांत घेतला तर त्याच्या या प्रयत्नाचें खरें स्वरूप ध्यानांत येतें. पण श्रीकृष्णांनीं त्याचा हा पट पार उधळून लावला. त्यांनीं कौरवांचें भोजन टाळलें, त्यांचे सत्कार धिक्कारले. विदुराच्या घरीं रात्र काढली. बरोबर लढवय्ये खंदे सैनिक घेऊनच ते आले असल्यामुळें व कृतवर्म्यासारखा त्यांचा सामंत लक्षावधि यादव सैनिकांनिशीं आधींच हस्तिनापुरांत उपस्थित असल्यामुळें त्यांच्या बाबतींत कोणालाही सामर्थ्याच्या उपयोग करतां येणें शक्य झालें नाहीं. या गोष्टीचा विशेष विस्तार श्रीकृष्णांच्या व्यक्तिचित्राचे वेळीं करतां येईल. धृतराष्ट्राचें कौटिल्य ध्यानांत येण्याकरितांच वरील उल्लेख येथें केला आहे. युद्ध ही त्याचीच इच्छा होती, व स्वतःच्या सैन्यसागराच्या भरंवशावर आपण युद्ध जिंकूं शकूं असा त्याला विश्वास वाटत होता. यासंबंधीं त्याच्या व दुर्योधनाच्या अनुमानांत फारसा फरक नाहीं. म्हणूनच भीष्मद्रोणांनीं युद्धाचे भीषण परिणाम व त्यांत होणारा स्वतःचा विनाश त्याला सांगूनही तो त्यांच्याकडे बुद्धिपुरस्सर दुर्लक्ष करी. महभारतांत म्हटलें आहे :—

> अनादृत्य तु तद्वाक्यमर्थवद्द्रोणभीष्मयोः ।
> ततः स सञ्जयं राजा पर्यपृच्छत पाण्डवान् ॥ ४७
> तदैव कुरवः सर्वे निराशा जीवितेऽभवन् ।
> भीष्मद्रोणौ यदा राजा न सम्यगनुभाषते ॥ ४८
>
> —महाभारत, उद्योगपर्व अ. ४९

किमसौ पाण्डवो राजा धर्मपुत्रोऽभ्यभाषत ।
श्रुत्वेह बहुलाः सेनाः प्रीत्यर्थं नः समागताः ॥ १
किमसौ चेष्टते सूत योत्स्यमानो युधिष्ठिरः ।
के वाऽस्य भ्रातृपुत्राणां पश्यन्त्याज्ञेप्सवो मुखम् ॥ २

—महाभारत, उद्योगपर्व अ. ५०

भीष्म व द्रोणांचें कल्याणकारक भाषण दुर्लक्षित करून धृतराष्ट्र जेव्हां संजयाकडेच वळून बोलूं लागला तेव्हांच कौरवांनीं आपल्या जीविताची आशा सोडली. तो म्हणाला : आमच्या प्रीतीसाठीं येथें जमलेला हा सेनासागर पाहून युद्धाची इच्छा धरणाऱ्या युधिष्ठिराची काय अवस्था झाली आहे तें मला सांग. त्याच्या लोकांपैकीं कोण त्याच्या आज्ञेची वाट पाहात आहेत? कोण या सैन्यसागराचा धाक घेऊन युद्धेच्छेपासून त्याचें निवारण करीत आहेत तें मला सांग. धृतराष्ट्राला निव्वळ पुत्रमोह नसून स्वतःचा राज्यलोभही होता हें आपण पाहिलेंच. पण निव्वळ पुत्रमोह जरी म्हटला तरी त्याच्या कुकृत्यांचें समर्थन होऊं शकत नाहीं. ज्या पुत्रमोहाला कुलस्त्रियांची अब्रू दिसत नाहीं, धर्म दिसत नाहीं, केवळ कापटच कायतें समर्थनीय वाटतें, त्याचें अस्तित्व आर्य राष्ट्राच्या उज्ज्वल परंपरेच्या दृष्टीनें दूषणीय आहे. आर्यावर्तांत धर्माप्रीत्यर्थ पुत्राचा त्याग करणारे लोक झाले. पुत्रलोभांतून मानवराक्षस उत्पन्न होतील तर ते अर्थात् वध्य होत. बापापेक्षां आईला खरें म्हटलें तर हा मोह अधिक असावयास पाहिजे. पण धर्म व कल्याण या दोन्ही दृष्टींनीं दुर्योधनाची आई गान्धारी हिनें धृतराष्ट्राला असें स्पष्ट सांगितलें होतें कीं :—

त्वन्नेत्राः सन्तु ते पुत्रा मा त्वां दीर्णाः प्रहासिषुः ।
तस्मादयं मद्वचनात्त्यज्यतां कुलपांसनः ॥ ८

—महाभारत, सभापर्व अ. ७५

"तुझ्या पुत्रांना तूंच सन्मार्ग दाखविला पाहिजेस. तुझ्यामुळें त्यांचा विनाश न होवो. मी दुर्योधनाची आई आहे तरीही मी तुला सांगतें कीं तूं या कुलांगारांचा माझ्या वचनासाठीं तरी परित्याग कर." गांधारीच्या या उद्गारांचा पार्श्वभूमीवर धृतराष्ट्राचें व्यक्ति-

चित्र अधिकच हिणकस दिसू लागतें. त्याच्या या मोहाविष्टते-मुळेंच बहुधा महाभारतकारांनीं त्याला संभवपर्वांत गंधर्वांच्या मोह-मय सृष्टीचा प्रतिनिधि म्हणून म्हटलें असावें. तोच सर्व अनर्थाचें खरें मूळ असल्यामुळें भारताच्या उद्योगपर्वांत भगवान् श्रीकृष्णांनीं ' मूलं राजा धृतराष्ट्रोऽमनीषी ' असें म्हटलें आहे. श्रीकृष्ण ज्या वेळीं भारतीय युद्धानंतर धृतराष्ट्राच्या सांत्वनास्तव हस्तिनापुरांत गेले, त्यावेळींही त्यांनीं साऱ्या अनर्थाबद्दल धृतराष्ट्रावरच दायित्व टाकलें आहे. ते म्हणतात :

**त्वया कालोपसृष्टेन लोभतो नापवर्जिताः ।**
**तवापराधान्नृपते सर्वं क्षत्रं क्षयं गतम् ॥ ४५**

—महाभारत, शल्यपर्व अ. ६३

पाण्डवांच्या प्रथम भेटीच्या वेळीं धृतराष्ट्रानें रागानें जेव्हां भीमाची लोखंडी प्रतिमा भीम आहे असें समजून चूर्ण केली त्या वेळींही श्रीकृष्णांनीं त्याला पुनश्च तेंच बजावून सांगितलें आहे. ते म्हणतात.:—

**आत्मापराधादापन्नस्तत्किं भीमं जिघांससि ।**
**तस्मात् संयच्छ कोपं त्वं स्वमनुस्मर दुष्कृतम् ॥ ९**

—महाभारत, स्त्रीपर्व अध्याय १३

आपल्या स्वतःच्याच अपराधानें तूंच ही परिस्थिति ओढवून आणली असतां भीमाला ठार मारण्याचा प्रयत्न कशासाठीं करीत आहेस ? आपल्या दुष्कृत्यांचें स्मरण करून स्वतःचा क्रोध तूं आवरला पाहिजेस. तात्पर्य धृतराष्ट्र हाच महाभारतांतील खरा ' खलनायक ' असून राज्यसंस्थेच्या अधःपतनाचें चित्र त्याच्या रूपानें महर्षि व्यासांनीं रेखाटलें आहे. त्याच्याच जोडीला दुर्योध-नाच्या व्यक्तिचित्राचें समालोचन केलें म्हणजे या अधःपतनाची खरी कल्पना येते.

# दुर्योधन

दुर्योधनाचें वर्णन करतांना महाभारताच्या आदिपर्वाच्या पहिल्याच अध्यायांत "दुर्योधनो मन्युमयो महाद्रुमः ।" म्हणजे "दुर्योधन हा अमर्याद क्रोधाचा प्रचंड वृक्षच होय" असें म्हटलें असून भारताच्या उद्योगपर्वांत श्रीकृष्णांच्या त्याच्याविषयींच्या उद्गारांतून याच वाक्याचा पुनरुच्चार झालेला आहे. कमालीचा मत्सर, तीव्र क्रोध, अमर्याद पीळ, अलौलिक ताठपणा, व आत्मगौरवाची अथवा प्रभुत्वाची विलक्षण आकांक्षा हे युवराज दुर्योधनाचे विशेष प्रकृतिधर्म होत. राजा दुर्योधन झालेला अपमान कधींही विसरत नसे व त्यामुळें त्याच्या क्रोधाचें पर्यवसान वाटेल त्या भीषण प्रकारांत सहज होई. लहानपणीं राज्याच्या आकांक्षेचा उदय अंतःकरणांत झालेला नसतांना देखील केवळ लहानपणांतील खेळांच्या स्पर्धेवरून भीमाला विषप्रयोग करण्यापर्यंत त्याची मजल गेल्याचें महाभारतांत वर्णन आहे.

भारतकार म्हणतातः—

जवे लक्ष्याभिहरणे भोज्ये पांसुविकर्षणे ।<br>
धार्तराष्ट्रान्भीमसेनः सर्वान्स परिमर्दति ।। १६

एवं स धार्तराष्ट्रांश्च स्पर्धमानो वृकोदरः<br>
अप्रियेऽतिष्ठदत्यन्तं बाल्यान्न द्रोहचेतसा ।। २४

ततो बलमतिख्यातं धार्तराष्ट्रः प्रतापवान् ।<br>
भीमसेनस्य तज्ज्ञात्वा दुष्टभावमदर्शयत् ।। २५

अयं बलवतां श्रेष्ठः कुन्तीपुत्रो वृकोदरः ।<br>
मध्यमः पाण्डुपुत्राणां निकृत्या स निगृह्यताम् ।। २७

एवं स निश्चयं पापः कृत्वा दुर्योधनस्तदा ।<br>
नित्यमेवान्तरप्रेक्षी भीमस्यासीन्महात्मनः ।। ३०

ततो दुर्योधनः पापस्तद्भक्ष्ये कालकूटकम् ।<br>
विषं प्रक्षेपयामास भीमसेनजिघांसया ।। ४५

---

व्याख्यान ११ वें व १२ वें, दि. ६ व ७ एप्रिल १९५१

स्वयमुत्थाय चैवाथ हृदयेन क्षुरोपमः ।
स वाचा मृतकल्पश्च भर्तृवच्च सुहृद्यथा ।। ४६
स्वयं प्रक्षिपते भक्ष्यं बहु भीमस्य पापकृत् ।
प्रतीक्षितं स्म भीमेन तं वै दोषमजानता ।। ४७
प्रमाणकोटयां वासार्थी सुष्वापावाप्य तत्स्थलम् ।। ५२
शीतं वातं समासाद्य श्रान्तो मदविमोहितः ।
विषेण च परीताङ्गो निश्चेष्टः पाण्डुनन्दनः ।। ५३
ततो बध्वा लतापाशैर्भीमं दुर्योधनः स्वयम् ।
मृतकल्पं तदा वीरं स्थलाज्जलमपातयत् ।। ५४

—महाभारत, आदिपर्व अ. १२८

"वेग, वृक्षविहरण, भोज्य, धूळ उडविणें इत्यादि सर्व गोष्टींत एकटा भीमसेन धृतराष्ट्राच्या सर्व मुलांची खोडकी जिरवीत असे. त्यामुळें स्पर्धेनें भीम धृतराष्ट्राच्या सर्व मुलांना अत्यंत अप्रिय झाला. अर्थात् त्यांत लहानपणच्या बालिशतेवांचून दुसरें कांहीं नव्हतें. भीमाचें तें विख्यात बळ पाहून स्पर्धा करणाऱ्या दुर्योधनानें त्याच्याविषयीं आपल्या अंतःकरणांत दंश धरला व कपटानें त्याचा सूड घ्यावयाचें ठरविलें. भीम आपल्या तावडींत कसा सांपडेल हेंच पहाण्याचा तो प्रयत्न करूं लागला. लहानपणाच्या खेळांतील अपमानानें चिडून जाऊन व भीमाच्या सामर्थ्यासमोर आपलें कांहीं चालत नाहीं हें पाहून त्यानें त्याला ठार मारण्याचा निश्चय केला. भीमाच्या अन्नांत त्यानें विष मिसळविलें व तें त्याला भरपूर खावयास घातलें. त्याचें अंतःकरण जरी वस्तऱ्याप्रमाणें अत्यंत तीक्ष्ण होतें तरीही त्याच्या वाणींत त्या तीक्ष्णतेचा मुळींच अंश नसल्यामुळें भीमाला त्याचा संशय आला नाहीं. विषाचा प्रभाव भीमावर पडून तेथीलच एका जागीं भीम जाऊन झोंपला. तो खेळून दमला होता त्यांतच थंड वारा शरीराला झोंबूं लागल्यामुळें त्याला झोंप आली. व त्याच वेळीं विषाचाही प्रभाव दिसूं लागून त्याच्या हालचाली अगदीं बंद होऊन गेल्या. एखाद्या मृताप्रमाणें तो निश्चेष्ट पडला आहे असें पाहून स्वतः दुर्योधनानें त्याला लतापाशांनीं बांधलें व जमिनीवरून पाण्यांत फेकून दिलें." लहानपणच्या खेळांत जो गृहस्थ

साध्या अपमानाबद्दल दुसऱ्यांना ठार मारावयास उद्युक्त होतो, तो मोठेंपणीं योजनाबद्ध अवस्थेंत त्याच क्रोधामुळें केवढा सूड घेऊं पहात असेल व खुनशी स्वभाव व्यक्त करीत असेल हें सांगावयास नकोच. पाण्डवांना द्यूतांत हरून त्यांची संपत्ति गिळंकृत केल्यानंतर त्यांची एकवस्त्रा व रजस्वला पत्नी द्रौपदी तिची विटंबना करावयास तो कां धजला असेल ? मर्यादातीत क्रोधाचा व दंश घेऊन सूड घेण्याचा त्याचा हा स्थायीभावच पांडव व द्रौपदी यांची माणुसकीविरहित अप्रतिष्ठा करावयास कारणीभूत झाला. पाण्डवांच्या राजसूय यज्ञांत तो उपस्थित असतां मयसभेंत त्याची जी फजिती झाली तिचा त्यानें घेतलेला सूड म्हणजेच सभापर्वांतील पांडवांच्या अप्रतिष्ठेचें गर्ह्य प्रकरण होय. मयसभेंत त्याच्या अनभिज्ञतेला लोक जे सहज हसले तें त्याच्या अंतःकरणांत किती खोलवर रुजून बसलें होतें याचें त्यानें स्वतःच पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे :—

कृतां बिन्दुसरोरत्नैर्मयेन स्फटिकच्छदाम् ।
अपश्यं नलिनीं पूर्णामुदकस्येव भारत ॥ २५
वस्त्रमुत्कर्षति मयि प्राहसत्स वृकोदरः ।
शत्रोर्ऋद्धिविशेषेण विमूढं रत्नवर्जितम् ॥ २६
तत्र स्म यदि शक्तः स्यां पातयेहं वृकोदरम् ।
यदि कुर्यां समारम्भं भीमं हन्तुं नराधिप ॥ २७
शिशुपाल इवास्माकं गतिः स्यान्नात्र संशयः ।
सपत्नेनावहासो मे स मां दहति भारत ॥ २८
पुनश्च तादृशीमेव वापीं जलजशालिनीम् ।
मत्वा शिलासमां तोये पतितोऽस्मि नराधिप ॥ २९
तत्र मां प्राहसत्कृष्णः पार्थेन सह सुस्वरम् ।
द्रौपदी च सह स्त्रीभिर्व्यथयन्ती मनो मम ॥ ३०
क्लिन्नवस्त्रस्य तु जले किंकरा राजनोदिताः ।
ददुर्वासांसि मेऽन्यानि तच्च दुःखं परं मम ॥ ३१
प्रलम्भं च शृणुष्वान्यद् वदतो मे नराधिप ।
अद्वारेण विनिर्गच्छन्द्वारसंस्थानरूपिणा ।
अभिहत्य शिलां भूयो ललाटे नास्मि विक्षतः ॥ ३२

तत्र मां यमजौ दूरादालोक्याभिहतं तदा ।
बाहुभिः परिगृह्णीतां शोचन्तौ सहिताबुभौ ।। ३३
उवाच सहदेवस्तु तत्र मां विस्मयन्निव ।
इदं द्वारमितो गच्छ राजन्निति पुनः पुनः ।। ३४

--महाभारत, सभापर्व अध्याय ५०

"त्या ठिकाणीं मयासुरानें बिंदुसरोवरावरील रत्नांनीं निर्माण केलेली व स्फटिकाचा भरपूर उपयोग करण्यांत आलेली अशा प्रकारची एक जागा होती. मला ती पाण्यानें कांठोकांठ भरलेली पुष्करिणी आहे असेंच वाटलें. मी आधींच शत्रूची विशेष प्रकारची समृद्धि पाहून भान हरपलों होतों. अशा स्थितींत वस्त्रें भिजूं नयेत म्हणून मीं माझीं वस्त्रें सांवरून चालूं लागलों तेव्हां भीम माझ्याकडे पाहून जोरानें हसला. जर माझ्यांत सामर्थ्य असतें तर मीं भीमाला ठार मारलें असतें. पण जर मी तसें केलें असतें तर शिशुपालासारखीच माझीही गति झाली असती यांत मला संशय नाहीं. सपत्नांनीं हा जो माझा उपहास केला तो माझें अंतःकरण जाळीत आहे. त्यानंतर त्या सभेंत एक कमलें प्रफुल्लित झालेली जलाशयाचीं जागा होती. मला तेथें पाण्याऐवजीं भूमीच आहे असें वाटलें. व मी त्या पाण्यांत पडलों. तें पाहून अर्जुनासहित श्रीकृष्ण तर जोरजोरानें हसलेच, पण जमलेल्या सर्व स्त्रियांसहित द्रौपदीही हसली. त्याची माझ्या अंतःकरणांत जखम झालेली आहे. माझीं वस्त्रें भिजलीं होतीं. राजानें सांगितल्यावरून सेवकांनीं मला दुसरीं वस्त्रें आणून दिलीं. त्यामुळें माझें दुःख अधिकच भडकलें. दुःखानें व संतापानें मी त्या सभेच्या बाहेर जाऊं लागलों. समोर होती भिंत. मला वाटलें दार आहे. म्हणून मी वेगानें तेथून जाऊं लागलों असतां माझें कपाळ त्या भिंतीवर आपटलें. नकुल–सहदेवांनीं दुरून माझी ती अवस्था पाहिली व खेद करीत आपल्या बाहूंनीं त्यांनीं मला सांवरून धरलें. सहदेवानें मला विस्मयचकित होऊन, हें दार आहे येथून जा असें वारंवार म्हटलें. भीमानें तर हे धृतराष्ट्रात्मजा, 'नीट दारानें बाहेर जा' असें म्हणून मला दार दाखविलें." वास्तविक दुर्योधन ज्या मंडळींत मयसभेंत होता ती सर्व नात्यानें त्याच्या

बरोबरीची, व योग्यतेनें त्याच्याहून अणुमात्रही हीन नसलेली अशीच मंडळी होती. अशा मंडळींत नको तेथें जर अज्ञानतः कोणाची फजिती झाली तर हास्यविनोद नेहमींच चालतो. तो कोणी मनाला लावून घेत नाहीं. द्रौपदी ही दुर्योधनाची भावजय तर भगवान् श्रीकृष्ण हे एका अर्थानें त्याचे मेव्हणे होते. त्यानेंच आपल्या वेंधळेंपणानें लोकांनीं आपणांला हसावें असा प्रसंग उत्पन्न केल्यानंतर जीं माणसें नात्यानेंच त्याची थट्टा करूं शकत होतीं तीं हसलीं असलीं व त्याच्या बरोबरीच्या लोकांनीं त्याची थट्टा केली असली तर त्यांत दंश धरून सूड घेण्यासारखें काय आहे ? पण जाणून बुजून लहानपणापासूनच साध्या खेळांतील अपमानाचादेखील जीवघेऊ सूड घेईपर्यंत ज्याचा नैसर्गिक स्वभाव अमर्याद क्रोधाचाच आहे त्या व्यक्तीनें प्रौढपणीं स्वतःचे शत्रु म्हणून ठरविलेल्या व त्यांच्या विनाशाचीं स्वप्नें सतत पहात बसलेल्या अवस्थेंत त्यांच्या साध्या थट्टेचा विपर्यास करणें व ते आपल्या हातीं येतांच सगळ्या प्रकारचीं धर्मबंधनें विसरून त्यांच्या घोर विडंबनास प्रवृत्त होणें ही गोष्ट आश्चर्याची नाहीं. त्यानें पाण्डवांचा दंश धरून व त्यांचा पक्षपात करणाऱ्या विदुराचाही दंश धरून द्रौपदी जिंकली जातांच द्यूताच्या शेवटीं मयसभेंत ती हसल्याबद्दल तिला प्रायश्चित्त देण्यासाठीं भरसभेंत तिला दासी म्हणून घेऊन येण्याची आज्ञा केली. तो म्हणतो :

**एहि क्षत्त द्रौपदीमानयस्व प्रियां भार्यां संमतां पाण्डवानाम् ।**
**संमार्जतां वेश्म परैतु शीघ्रं तत्रास्तु दासीभिरपुण्यशीला ।। १**

**—महाभारत, सभापर्व अध्याय** ६६

"हे विदुरा ! पाण्डवांची प्रिय भार्या जी द्रौपदी तिला येथें घेऊन ये. तिनें येथें शीघ्र येऊन अन्यदासींसहित झाडलोटीचीं कामें केलीं पाहिजेत. तिला शील कसलें आलें आहे?" विदुर जाईना तेव्हां त्यानें दुःशासनालाच अशी आज्ञा दिली कीं, तूंच जाऊन द्रौपदीला बलात्कारानें येथें घेऊन ये. तो म्हणतो :—

**दुःशासनैष मम सूतपुत्रो वृकोदरादुद्विजतेऽल्पचेताः ।**
**स्वयं प्रगृह्यानय याज्ञसेनीं किं ते करिष्यन्त्यवशाः सपत्नाः ।। २५**

—महाभारत, सभापर्व अध्याय ६७

"दुःशासना ! हा मूर्ख सूत भीमाला भीत आहे. तूंच जाऊन द्रौपदीला बलात्कारानें येथें घेऊन ये. हे आपले जिंकलेले दास झाले आहेत. अवश झालेले हे शत्रु आतां आपल्याला काय करणार ?" कर्णानें द्रौपदीचा केलेला उपहास पाहून त्यानें त्यांत आनंद मानला. तिच्या केसांना हिसडे देऊन दुःशासन तिची अप्रतिष्ठा करीत असतां आपल्या अपमानाचा सूड घेतल्याचें समाधान त्याला लाभत होतें. इतकेंच नव्हे तर जी आपल्याला आपल्या फजितीबद्दल हंसली त्या द्रौपदीला दासीपेक्षांही अधिक छळून एखाद्या शीलभ्रष्ट भोगदासीपेक्षां आपण तिला अधिक महत्त्व देत नाहीं याचें प्रदर्शन करण्यासाठीं भरसभेंत वस्त्र वर करून तिला आपली डावी मांडी उघडी करून दाखवावयासही त्याला लाज वाटली नाहीं. महाभारतांत म्हटलें आहे :—

भीमसेनवचः श्रुत्वा राजा दुर्योधनस्तदा ।
युधिष्ठिरमुवाचेदं तूष्णीं भूतमचेतनम् ।। ८
भीमार्जुनौ यमौ चैव स्थितौ ते नृपशासने ।
प्रश्नं ब्रूहि च कृष्णां त्वमजितां यदि मन्यसे ।। ९
एवमुक्त्वा तु कौन्तेयमपोह्य वसनं स्वकम् ।
स्मयन्निवेक्ष्य पाञ्चालीमैश्वर्यमदमोहितः ।। १०
कदलीदण्डसदृशं सर्वलक्षणसंयुतम् ।
गजहस्तप्रतीकाशं वज्रप्रतिमगौरवम् ।। ११
अभ्युत्स्मयित्वा राधेयं भीममाधर्षयन्निव ।
द्रौपद्याः प्रेक्षमाणायाः सव्यमूरुमदर्शयत् ।। १२

—महाभारत, सभापर्व अध्याय ७१

"भीमसेनाचीं भाषणें ऐकून अचेतनपणें स्वस्थ बसलेल्या राजा युधिष्ठिराला उद्देशून दुर्योधन म्हणाला: 'भीमसेन, अर्जुन, नकुल व सहदेव हे तुझ्या आज्ञेंत आहेत. द्रौपदी जित नाहीं काय ? जर ती जित नाहीं असें तूं समजत असशील तर तसें उत्तर दे.' असें युधिष्ठिराशीं बोलून ऐश्वर्याच्या मदाच्या धुंदींत येऊन त्यानें आपलें वस्त्र वर केलें व केळीच्या खांबासारखी सर्व लक्षणांनीं युक्त, हत्तीच्या सोंडेप्रमाणें पुष्ट व वज्राप्रमाणें कठीण अशी आपली डावी मांडी

भीमाची धर्षणा करीत व कर्णाला उत्तेजन देत द्रौपदीला दाखविली." साध्या उपहासाच्या सुडाची मर्यादा तो या अवस्थेपर्यंत नेऊं शकत होता. यावरून त्याचा क्रोधी व दंश ठेवणारा स्वभाव चांगलाच व्यक्त होतो. या विकारांत सांपडल्यावर साध्या माणुसकीच्या मर्यादाही विसरून त्यानें पशूंनाही लाज आणणारें वर्तन केलें आहे. सामान्य व्यक्तीनें अपराध केला तर तिला जो दंड देण्यांत येईल तोच अपराध जर राजसिंहासनावरील व्यक्तीच्या हातून घडला तर तिला सामान्य व्यक्तीहून सहस्रपट अधिक दंड केला पाहिजे असें आर्यांचें दण्डविधान सांगतें हें आपण मागें पाहिलेंच आहे. दुर्योधनानें केलेला हा अपराध सामान्य माणसाचे बाबतींत देखील वध-दंड देण्याच्या योग्यतेचा आहे. मग तो दुर्योधनासारख्या राजपुरुषांनीं केल्यास आर्यांच्या दंडविधानशास्त्राच्या दृष्टीनें किती भयानक स्वरूपाचा असेल हें सांगावयास नकोच. त्याच्या क्रोधाचें हें भीषण स्वरूप पाहिल्यावर "मन्युमय महाद्रुम" हें महाभारतकारांनीं त्याला लावलेलें विशेषण किती यथार्थ होतें याची खात्री पटते.

## मत्सराची प्रत्यक्ष मूर्ति

क्रोधाप्रमाणेंच दुर्योधन हा मत्सराची केवळ मूर्ति होता. दुसऱ्यांचें ऐश्वर्य पाहून तें त्याला हवेसें तर वाटेच पण कोणत्याही उपायानें तें मिळविण्याची शक्यता नसली तर त्याचें जीवित त्याला अशक्य होऊन जाई. राज्याचे दोन विभाग केल्यानंतर वास्तविक त्याचा अधिकार असो वा नसो पण त्याच्या इच्छेप्रमाणें वेगळें राज्य त्याला स्वतःला मिळून कुरुपाण्डवांच्या भांडणाचा प्रसंग संपला होता. पण स्वतःच्या व साहाय्यकांच्या कर्तृत्वावर युधिष्ठिरानें केलेला आपल्या राज्याचा विस्तार, मिळविलेलें साम्राज्य व वाढविलेलें अपार वैभव पाहून मत्सराग्नीनें त्याच्या अंतःकरणांत पेट घेतला. तो इतका कीं जर कोणत्याही उपायानें पाण्डवांचें तें ऐश्वर्य त्याला न मिळालें तर जिवंत राहणें देखील त्याला अशक्य होऊन बसलें. शकुनीला तो म्हणतो :-

श्रियं तथागतां दृष्ट्वा ज्वलंतीमिव पाण्डवे ।
अमर्षवशमापन्नो दह्यामि न तथोचित: ।। २९
एवं स निश्चयं कृत्वा ततो वचनमब्रवीत् ।
पुनर्गान्धारनृपतिं दह्यमान इवाग्निना ।। ३०
वह्निमेव प्रवेक्ष्यामि भक्षयिष्यामि वा विषं ।
अपो वापि प्रवेक्ष्यामि नहि शक्ष्यामि जीवितुम् ।। ३१

—महाभारत, सभापर्व अध्याय ४७

पाण्डवांची देदीप्यमान संपत्ति पाहून माझें अंत:करण जळून गेलें आहे. अशा स्थितींत मी जगूं शकत नाहीं. अग्नींत जळून जावें, पाण्यांत उडी घेऊन जीव द्यावा, अथवा विष भक्षण करावें पण जगूं नये असें मला वाटूं लागलें आहे. मी तसें केल्यावांचून राहणार नाहीं. पुन्हां राजा धृतराष्ट्राजवळ पांण्डवांच्या ऐश्वर्याचें वर्णन करून तो हीच गोष्ट स्पष्टपणें सांगतो.

अश्नाम्याच्छादयामीति प्रपश्यन्पापपूरुष: ।
नामर्षं कुरुते यस्तु पुरुष: सोधम: स्मृत: ।। १७
न मां प्रीणाति राजेन्द्र लक्ष्मी: साधारणी विभो ।
ज्वलितामेव कौन्तेये श्रियं दृष्ट्वा च विव्यथे ।। १८
सर्वां च पृथिवीं चैव युधिष्ठिरवशानुगाम् ।
स्थिरोस्मि योहं जीवामि दु:खादेतद् ब्रवीमि ते ।। १९

—महाभारत, सभापर्व अध्याय ५०

"मी खातों, पितों, व एखाद्या अधम पुरुषाप्रमाणें सर्व व्यवहार करतों. पण जो मनुष्य दुसऱ्याच्या संपत्तीचा हेवा करीत नाहीं व त्यामुळें आपण संपत्तिमान् व्हावें असें ज्याला वाटत नाहीं तो केवळ अधम होय. हे राजेंद्र धृतराष्ट्रा! स्वाधीन असलेल्या सामान्य राज्यलक्ष्मीनें माझें आतां समाधान होत नाहीं. पांडवांची देदीप्यमान संपत्ति मीं पाहिली आहे व त्यामुळेंच माझ्या अंत:करणांत वेदना होत आहेत. युधिष्ठिराच्या ताब्यांत सर्व पृथ्वी आली तरीही मीं जिवंत रहावें याचेंच मला अत्यंत दु:ख होत आहे." त्याच्या मर्यादातीत अमर्षाचें व त्याच स्थितींत अपमानित झाला तर अतिशय संतापानें जीव देण्याच्या प्रवृत्तीचें अत्यंत मोठें प्रत्यंतर घोष-

यात्रेच्या प्रसंगीं घडलें आहे. पांडव द्वैतवनांत राहात असतां आपलें ऐश्वर्य दाखवून त्यांचा अपमान व उपहास करावा या बुद्धीनें दुर्योधन आपल्या सर्व सेनेसह व ऐश्वर्यासह घोषयात्रेच्या निमित्तानें तेथें गेला. पण नियतीच्या प्रभावानें त्यानें पांडवांचा उपहास करण्याऐवजीं पांडवांनीं त्याचा उपहास करावा अशी परिस्थिति उत्पन्न झाली. चित्रसेन गंधर्वानें त्याचा पराभव केला, त्याचे सहकारी त्याला सोडून निघून गेले व शेवटीं गंधर्वांनीं त्याला जिंकून जिवंतपणें स्वर्गयात्रा घडवावयाचा प्रसंग आणल्यावर युधिष्ठिराच्या आज्ञेवरून पांडवांनींच त्याची सुटका केली. ज्यांचा आपण उपहास करावयास गेलों त्यांनींच आपणांस शेवटीं जीवदान दिलें या कल्पनेचेंच त्याला इतकें दु:ख झालें कीं त्याला जिवंतच राहावेसें वाटेना. तो कर्णाला म्हणू लागला :—

स्त्रीसमक्षमहं दीनो बद्धः शत्रुवशं गतः ॥ ६
युधिष्ठिरस्योपहृतः किं नु दुःखमतःपरम् ।
ये मे निराकृता नित्यं रिपुर्येषामहं सदा ॥ ७
तैर्मोक्षितोऽहं दुर्बुद्धिर्दत्तं तैरेव जीवितम् ।
प्राप्तः स्यां यद्यहं वीरवधं तस्मिन् महारणे ॥ ८
श्रेयस्तद्भविता मह्यं नैवंभूतस्य जीवितम् ।
अभूद्यशः पृथिव्यां मे ख्यातं गन्धर्वतो वधात् ॥ ९
प्राप्ताश्च पुण्यलोकाः स्युर्महेन्द्रसदनेऽक्षयाः ।
यत्त्वद्य मे व्यवसितं तच्छृणुध्वं नरर्षभाः ॥ १०
इह प्रायमुपासिष्ये यूयं व्रजत वै गृहान् ।
भ्रातरश्चैव मे सर्वे यान्त्वद्य स्वपुरं प्रति ॥ ११
कर्णप्रभृतयश्चैव सुहृदो बान्धवाश्च ये ।
दुःशासनं पुरस्कृत्य प्रयान्त्वद्य पुरं प्रति ॥ १२
न ह्यहं सम्प्रयास्यामि पुरं शत्रुनिराकृतः ।
शत्रुमानापहो भूत्वा सुहृदां मानकृत् तथा ॥ १३
स सुहृच्छोकदो जातः शत्रूणां हर्षवर्धनः ॥ १४
अहो नार्हमिदं कर्म कष्टं दुश्चरितं कृतम् ।
स्वयं दुर्बुद्धिना मोहाद्येन प्राप्तोऽस्मि संशयम् ॥ १९

तस्मात् प्रायमुपासिष्ये न हि शक्ष्यामि जीवितुम् ।
चेतयानो हि को जीवेत् कृच्छ्राच्छत्रुभिरुद्‌धृतः ॥ २०
शत्रुभिश्चावहसितो मानी पौरुषवर्जितः ।
पाण्डवैर्विक्रमाढ्यैश्च सावमानमवेक्षितः ॥ २१

वैशम्पायन उवाच ।

एवं चिन्तापरिगतो दुःशासनमथाब्रवीत् ।
दुःशासन निबोधेदं वचनं मम भारत ॥ २२
प्रतीच्छ त्वं मया दत्तमभिषेकं नृपो भव ।
प्रशाधि पृथिवीं स्फीतां कर्णसौबलपालिताम् ॥ २३

—महाभारत, वनपर्व अध्याय २४९

"स्त्रियांच्या समक्ष मी दीन होऊन शत्रूच्या तावडींत सांपडलों. त्यांनीं मला बांधलें. युधिष्ठिराच्या लोकांनीं मला सोडवून त्याच्या स्वाधीन केलें. याच्या इतकें दुःखप्रद दुसरें कांहीं असेल काय ! मी पूर्वीं जिंकलेले जे माझे शत्रु व मी ज्यांचा नेहमींचाच शत्रु त्यांनीं माझी सुटका करावी व त्यांनींच मला जीवदान द्यावें, याच्या-इतकी दुःखाची दुसरी कोणती गोष्ट आहे? यापेक्षां गंधर्वांशीं झालेल्या युद्धांत माझा वध झाला असता तरी मला अधिक बरें वाटलें असतें. रणांत शत्रूशीं संग्राम करीत मी वध पावल्यानें शूर म्हणून माझी कीर्ति झाली असती व पुण्यवंतांना मिळतात ते लोक मला मिळाले असते. आतां मला हें अपमानित तोंड घेऊन हस्तिनापुरांत जाण्याची इच्छा नाहीं. मी येथेंच प्रायोपवेशन करून मरावयाचें ठरविलें आहे. कर्णप्रभृति माझे सुहृद व बंधुजन यांनीं दुःशासनाला पुढें घालून परत जावें. शत्रूचा अपमान व मित्राचा सन्मान करणारा मी आज शत्रूकडून अपमानित झालेल्या अवस्थेंत कधींही हस्तिना-पुरांत येणार नाहीं. आज माझी अवस्था मित्रांना शोककारक व शत्रूंना हर्षप्रद झालेली आहे. स्वतःच्याच दुर्बुद्धीमुळें मोहांत सांपडून अपमानित अवस्था मी प्राप्त करून घेतली आहे. शत्रूंनीं ज्याला जीवदान दिलें असा मी जिवंत कसा राहणार ? प्रायोपवेशन करून मी जीविताचा अंत करावयाचें निश्चित केलें आहे. मी अत्यंत मानी असतांना आज पराक्रमहीन ठरलों. शत्रूकडून अपमानित झालों.

आपल्या अमोघ पराक्रमाच्या जाणिवेनें पाण्डवांनीं तुच्छबुद्धीनें माझ्याकडे पाहिलें. शत्रूकडून ज्याची ही अवस्था झाली असा कोणता तेजस्वी पुरुष जिवंत रहाण्याची इच्छा करील ? पुढें चिंतेंत निमग्न होऊन दुर्योधन दुःशासनाला म्हणाला कीं, मी तुला हें राज्य देतों. स्वतःला अभिषेक करून घेऊन तूं कौरवांचा राजा हो व कर्णशकुनींनीं पाळिलेल्या या राज्याचें संरक्षण कर." तात्पर्य अमर्याद क्रोध व अमर्याद अमर्ष हे दुर्योधनाचे स्थायीभाव होते.

अलीकडे पतितपरावर्तनाची व पतितोद्धाराची एक वाङमयीन चळवळ निघालेली आहे. इतिहासाच्या ओघांत जे जे पतित म्हणून ठरतात अथवा ठरले आहेत ते ते सर्व अत्यंत थोर पुरुष होते, व जे पुण्यश्लोक म्हणून ठरले तेच त्यांच्यापेक्षां हीन होते हें दाखविण्याचा त्या चळवळीचा हेतु आहे. त्याचें एक प्रात्यक्षिक नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या ? या प्रचंड भारुडाच्या रूपानें विचक्षण महाराष्ट्रीयांच्या प्रत्ययास आलेंच आहे. पतितपरावर्तनाच्या व पतितोद्धाराच्या या चळवळीनें सम्राट दुर्योधनालाही हात दिलेला आहे. त्या दृष्टीनें दुर्योधनाच्या स्वभावविशेषांतील क्रोध व अमर्ष या दोन गोष्टी ध्यानांत धरून ज्या कांहीं चांगल्या वा वाईट गोष्टी दृष्टोत्पत्तीस येतात त्यांचें निरीक्षण करणें बोधप्रद ठरेल. तसेंच त्याची स्वतःचीही या बाबतींत एक विचारसरणी आहे, तीही त्याचें व्यक्तिचित्र समजण्याच्या दृष्टीनें ध्यानांत घेणें अवश्य आहे. वास्तविक राजा धृतराष्ट्र हा अंध असल्यामुळें तत्कालीन नियमानुसार त्याचा राज्यावरील अधिकार संपला होता, तथापि बाप अंधळा असल्यामुळें त्याचा राज्याधिकार नष्ट झाला तरी आपण सर्व दृष्टींनीं योग्य असतां आपल्याला राज्य कां मिळूं नये असें दुर्योधनाला वाटत होतें. व जर पाण्डूचें राज्य म्हणून त्याचा जेष्ठ पुत्र युधिष्ठिर याला राज्य प्राप्त झालें तर तें पुढें त्याच्या मुलाला प्राप्त होईल, आपण कधींच राजे होणार नाहीं अशी त्याला भीति वाटत होती. हीच त्याची विचारसरणी होती. त्याच्या बाजूचें हें समर्थन त्याच्याच तोंडून महर्षि व्यासांनीं आदिपर्वांत वदविलें आहे.

श्रुता मे जल्पतां तात पौराणामशिवा गिरः ।
त्वामनादृत्य भीष्मं च पतिमिच्छन्ति पाण्डवम् ॥ ३२
मतमेतच्च भीष्मस्य न स राज्यं बुभुक्षति ।
अस्माकं तु परां पीडां चिकीर्षन्ति पुरे जनाः ॥ ३३
पितृतः प्राप्तवान्राज्यं पाण्डुरात्मगुणैः पुरा ।
त्वमन्धगुणसंयोगात्प्राप्तं राज्यं न लब्धवान् ॥ ३४
स एष पाण्डोर्दायाद्यं यदि प्राप्नोति पाण्डवः ।
तस्य पुत्रो ध्रुवं प्राप्तस्तस्य तस्यापि चापरः ॥ ३५
ते वयं राजवंशेन हीनाः सह सुतैरपि ।
अवज्ञाता भविष्यामो लोकस्य जगतीपते ॥ ३६
सततं निरयं प्राप्ताः परपिण्डोपजीविनः ।
न भवेम यथा राजंस्तथा नीतिर्विधीयताम् ॥ ३७
यदि त्वं हि पुरा राजन्निदं राज्यमवाप्तवान् ।
ध्रुवं प्राप्स्याम च वयं राज्यमप्यवशे जने ॥ ३८

—महाभारत आदिपर्व अध्याय १४१

दुर्योधन धृतराष्ट्राला म्हणतो : "प्रजाजनांच्या तोंडून मी पुष्कळ आपल्याला अमंगलकारक अशा गोष्टी ऐकल्या. आपला व भीष्मांचा अनादर करून पाण्डव राजा व्हावा अशी ते इच्छा करीत आहेत. भीष्म त्यांच्या दृढनिश्चयानुसार कधींच राज्य घेणार नाहींत. आम्हांला मात्र संकटांत टाकण्याची प्रजाजनांची इच्छा आहे. स्वतःच्या गुणांनीं पाण्डूनें या राज्याचें स्वामित्व मिळविलें व आपण अंध असल्यामुळें तें आपल्याला मिळालें नाहीं. जर हें राज्य पाण्डूचें म्हणून युधिष्ठिराला मिळालें तर त्याच्यानंतर ते त्याच्या मुलाला मिळणार व त्यानंतर तेंही त्याच्याच मुलाला मिळून युधिष्ठिराचा वंश हाच राज्याचा स्वामी होऊन बसणार ही गोष्ट निश्चित आहे. याचा अर्थ आमचा कांहीं एक अपराध नसतांना आम्ही आमच्या पुत्रपौत्रांसहित राज्याला आंचवलों ही गोष्ट उघड आहे. याप्रमाणें एकदां आम्ही राज्याला सदांचे आंचवलों म्हणजे लोकांच्या दृष्टीनें आम्ही सदांचे हीन ठरलों. दुसऱ्यानें दिलेल्या पिण्डावर उपजीविका करणें हाच मग आमचा जीवनाचा मार्ग व नरक हीच आमची गति.

आमची अशी अवस्था होणार नाहीं अशा नीतीचा अवलंब करणें हेंच आपलें कर्तव्य आहे. जर पूर्वीं हें राज्य आपणांस मिळालें असतें तर तें आम्हांलाही निःसंशय मिळालें असतें."

दुर्योधनाचें हें म्हणणें तत्कालीन सामाजिक दंडविधानांत बसण्यासारखें नाहीं. समाजाच्या कल्याणार्थ निर्माण झालेलें राज्ययंत्र कांहीं विशेष नियमांनुसारच चालतें. त्या नियमांचा परिणाम अधिकांत अधिक लोकांना सुख लाभण्यांत होतो कीं नाहीं एवढेंच पाहिलें पाहिजे. कारण दुर्योधनाचेंच तर्कशास्त्र पुढें चालवावयाचें म्हटलें तर फारच अनर्थ उत्पन्न होतो. राजाच्या जेष्ठ पुत्राला राज्य मिळावयाचें हा नियम लक्षांत घेतला तर कोणत्याही कारणास्तव कां असेना धृतराष्ट्र हा राजा नाहीं ही गोष्ट निश्चित ठरल्यावर व या बाबतींतला निर्णय पांडूला राज्य मिळून कसलाही वाद वा संघर्ष न होतां प्रत्यक्ष कार्यवाहींत आल्यानंतर जो राजाच नाहीं त्याच्या मुलाला राज्य मिळण्याचें कारण काय? बापाच्या अपराधासाठीं मीं दण्ड कां भोगावा? हें तर्कशास्त्र येथें लागू पडू शकत नाहीं. एरवीं भीम व अर्जुनदेखील सहजच असें म्हणू शकतात कीं आम्हीं आमच्या पराक्रमावर जर हें राज्य मिळविलें व त्याचा विस्तार केला तर तेंच आम्हांला कां मिळू नये? युधिष्ठिराऐवजीं आम्हींच राज्यावर कां बसू नये? आम्ही मागाहून जन्माला आलों हा कांहीं आमचा अपराध नव्हे व युधिष्ठिर हा आधीं जन्माला आला ही कांहीं मोठी कर्तृत्वाची गोष्ट नव्हे. निसर्गानें एक आधीं जन्माला आला नि दुसरा मागाहून इतकेंच. या तर्कशास्त्रालाही कांहीं उत्तर नाहीं. तरीपण कुळांत भांडणें उत्पन्न होऊन तीं चव्हाट्यावर येऊं नयेत व संघर्षाच्या बीजाचें सदांचें समारोपण होऊं नये म्हणून द्रौपदी स्वयंवरानंतर पाण्डव प्रकट झाल्यावर अर्धें राज्य युधिष्ठिराला व अर्धें दुर्योधनाला देऊन राज्याची फाळणी करण्यांत आली होती. कोणत्याही कारणास्तव असो, दुर्योधनाला एकदां स्वतंत्र राज्य मिळाल्यावर त्यानें तें संतोषानें चालवावयास हवें होतें. अथवा कर्तृत्वानें वाढवावयास हवें होतें. पण तसें कांहींएक न करतां त्यानें पाण्डवांनीं स्वकर्तृत्वानें वाढविलेलेंही राज्य

पदरांत पाडून घेण्यासाठीं परस्वापहरणाची नीच बुद्धि ठेवून द्यूतासारख्या वाम मार्गाची कांस धरली व त्यासाठीं सारे सूक्तासूक्त विचार सोडले हें लक्षांत घेतलें म्हणजे विचारांत घेण्यासारखी कोणतीही बाजू त्याला नाहीं हें स्पष्ट होतें. एकतर त्याला समर्थनीय अशी कांहीं एक बाजूच नाहीं व त्यानंतर असलीच तर राज्याच्या फाळणीनंतर ती संपलेली आहे. त्यानंतरही युद्धानें त्यानें राज्य मिळविण्याचा प्रयत्न केला असता तर गोष्ट वेगळी होती. त्या ऐवजीं द्यूतासारख्या वाममार्गाची त्यानें कांस धरली यांत तर त्यानें शौर्यप्रधान क्षत्रिय धर्माचाही परित्याग केला. अशा स्थितींत त्याचें पुढच्या साम्राज्यलोभाच्या दृष्टीनें कांहीं एक समर्थन असूं शकत नाहीं. म्हणनच त्याला "पापात्मा व कलीचा अंश" हीं महाभारतानें विशेषणें जोडलीं आहेत.

## खोलवर विचार करणारा

दुर्योधनाच्या स्वभावविशेषांत अत्यंत दूरगामीपणानें विचार करणें हाही एक विशेष दृष्टीस पडतो. हव्या त्या सूक्तासूक्त मार्गानें राज्य मिळवावयाचें असें ठरल्यावर त्यानें त्यासाठीं आवश्यक त्या सचिवसंस्थेला व पौर जानपदांना आपलेसें करून घ्यावयाचें ठरवून तदनुसार धोरण पहिल्यापासूनच आंखलें. त्यांत ऋजुता, सद्गुण व औदार्य यांच्या बाबतींत युधिष्ठिरावर मात करणें केवळ अशक्य असल्यामुळें व तो जोंवर सतत प्रजांच्या डोळ्यासमोर आहे तोंवर त्याच्यासमोर आपला प्रभाव पडणेंही अशक्य वाटल्यानें बरेच दिवस त्याला राज्ययंत्रापासून दूर ठेवणें व त्या अवधींत पौर जानपद व सचिव संस्था आपलीशी करून घेणें हें दुर्योधनाला आवश्यक वाटलें. या दृष्टीनें त्यानें पूर्णपणें विचार केलेला होता; इतकेंच नव्हे तर आपल्या राजसभेंतील प्रत्येक व्यक्तीचा त्यानें आपल्या कर्तृत्वाच्या प्रारंभिक अवस्थेंतच अतिशय सूक्ष्म अभ्यास केला होता असें त्याच्या उद्गारांवरून दिसून येतें. तो म्हणतो :

**एवमेतन्मया तात भावितं दोषमात्मनि ।**
**दृष्ट्वा प्रकृतयः सर्वा अर्थमानेन पूजिताः ॥ १२**

ध्रुवमस्मत्सहायास्ते भविष्यन्ति प्रधानतः ।
अर्थवर्गः सहामात्यो मत्संस्थोऽद्य महीपते ।। १३
स भवान्पाण्डवानाशु विवासयितुमर्हति ।
मृदुनैवाभ्युपायेन नगरं वारणावतम् ।। १४
यदा प्रतिष्ठितं राज्यं मयि राजन्भविष्यति ।
तदा कुन्तीसहापत्या पुनरेष्यति भारत ।। १५
मध्यस्थः सततं भीष्मो द्रोणपुत्रो मयि स्थितः ।
यतः पुत्रस्ततो द्रोणो भविता नात्र संशयः ।। २०
कृपः शारद्वतश्चैव यत एतौ ततो भवेत् ।
द्रोणं च भागिनेयं च न स त्यक्ष्यति कर्हिचित् ।। २१
क्षत्ताऽर्थबद्धस्त्वस्माकं प्रच्छन्नं संयतः पुरैः ।
न चैकः ससमर्थोऽस्मान्पाण्डवार्थेऽधिबाधितुम् ।। २२
सुविस्रब्धः पाण्डुपुत्रान्सह मात्रा प्रवासय ।
वारणावतमद्यैव यथा यान्ति तथा कुरु ।। २३
विनिद्रकरणं घोरं हृदि शल्यमिवार्पितम् ।
शोकपावकमुद्भूतं कर्मणैतेन नाशय ।। २४

महाभारत, आदिपर्व अध्याय १४२

मीं सर्व गोष्टींचा विचार करून धन व सन्मान समर्पण करून प्रजांना प्रसन्न करून घेतलें आहे. अमात्यसंस्था याच उपायांनीं मीं माझ्याकडे वळविली आहे. अशा स्थितींत हे सर्व लोक आपल्यालाच साहाय्य करतील असें मला वाटतें. तुम्ही युक्तीनें पाण्डवांना वारणावतास पाठवून द्या. ज्या वेळीं माझें राज्य दृढमूल होईल, त्या वेळीं कुन्ती पांडवांसह पुनश्च येथें परत येईल. आपल्या सभेंतील सर्व लोकांचा मी पूर्ण विचार केला आहे. भीष्म पूर्णपणें पाण्डवांचेही नाहींत व आमचेहीनाहींत. दोन्हीकडे त्यांचें सारखेंच प्रेम असल्यामुळें ते मध्यस्थ आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. द्रोणांची तशी चिंता बाळगण्याचें कारण नाहीं. कारण अश्वत्थामा पूर्णपणें माझ्या बाजूचा आहे व द्रोणांचें पुत्रावर अतोनात प्रेम असल्यामुळें कोणत्याही परिस्थितींत जिकडे अश्वत्थामा तिकडेच द्रोण राहतील यांत कांहीं शंका नाहीं. शारद्वत कृपाचार्य हेही अश्वत्थामा व द्रोण यांच्याच

बाजूला राहणार. स्वतःचे मेव्हणे द्रोण व बहिणीचा मुलगा अश्वत्थामा यांचा कोणत्याही परिस्थितींत ते परित्याग करूं शकत नाहींत येऊन जाऊन प्रश्न उरला विदुराचा. एकतर तो आमचा सेवक असून उपजीवनार्थ तो आमच्यावर अवलंबून आहे. त्याचा ओढा पाण्डवांच्याकडे असला तरी तो प्रच्छन्नपणेंच पाण्डवांना साहाय्य करूं शकतो. एकटा तो पाण्डवांच्या बाजूनें आम्हांला त्रास द्यावयास समर्थ नाहीं. म्हणून आपण पाण्डवांना शांत अंतःकरणानें वारणावतास पाठवा व अंतःकरणांतील हें शल्य दूर करा.

दुर्योधनाच्या या उद्गारांवरून पहिल्यापासूनच त्यानें किती बारकाईनें सर्व गोष्टींचा विचार केला होता हें स्पष्ट होतें. कारस्थानीपणा व स्वतःचें उद्दिष्ट प्राप्त करून घेण्यासाठीं वाटेल त्या गर्ह्य उपायांचें अवलंबन करण्याची त्याच्या मनाची सिद्धता लहानपणापासूनच झालेली होती असें दिसतें. धृतराष्ट्राच्याही ध्यानांत न येऊं देतां वारणावतास गेलेल्या पाण्डवांना जाळून मारावें म्हणजे आपल्या राज्यप्राप्तीच्या मार्गांत कसलाही अडथळा उरणार नाहीं असा विचार करूनच त्यानें हा बेत केला. ‘लाक्षागृह प्रकरण’ हा त्याच्या निर्घृण कारस्थानीपणाचा स्पष्ट पुरावाच होय.

## निर्घृण कारस्थानीपणा

धृतराष्ट्रानें पाण्डवांना वारणावतास जावयाची आज्ञा दिल्यावर महाभारतकार वर्णन करतात—

**एवमुक्तेषु राज्ञा तु पाण्डुपुत्रेषु भारत ।**
**दुर्योधनः परं हर्षमगच्छत्स दुरात्मवान् ।। १**
**स पुरोचनमेकान्तमानीय भरतर्षभ ।**
**गृहीत्वा दक्षिणे पाणौ सचिवं वाक्यमब्रवीत् ।। २**
**ममेयं वसुसंपूर्णा पुरोचन वसुंधरा ।**
**यथेयं मम तद्वत्ते स तां रक्षितुमर्हसि ।। ३**
**नहि मे कश्चिदन्योस्ति विश्वासिकतरस्त्वया ।**
**सहायो येन संधाय मन्त्रयेयं यथा त्वया ।। ४**
**संरक्ष तात मन्त्रं च सपत्नांश्च ममोद्धर ।**
**निपुणेनाभ्युपायेन यद्ब्रवीमि तथा कुरु ।। ५**

पाण्डवा धृतराष्ट्रेण प्रेषिता वारणावतम् ।
उत्सवे विहरिष्यन्ति धृतराष्ट्रस्य शासनात् ॥ ६
स त्वं रासभयुक्तेन स्यन्दनेनाशुगामिना ।
वारणावतमद्यैव यथा यासि तथा कुरु ॥ ७
तत्र गत्वा चतुःशालं गृहं परमसंवृतम् ।
नगरोपान्तमाश्रित्य कारयेथा महाधनम् ॥ ८
शणसर्जरसादीनि यानि द्रव्याणि कानिचित् ।
आग्नेयान्युत सन्तीह तानि तत्र प्रदापय ॥ ९
सर्पिस्तैलवसाभिश्च लाक्षया चाप्यनल्पया ।
मृत्तिकां मिश्रयित्वा त्वं लेपं कुड्येषु दापय ॥ १०
शणं तैलं घृतं चैव जतु दारूणि चैव हि ।
तस्मिन्वेश्मनि सर्वाणि निक्षिपेथाः समन्ततः ॥ ११
यथा च तन्न पश्येरन्परीक्षन्तोऽपि पाण्डवाः ।
आग्नेयमिति तत्कार्यमपि चान्येऽपि मानवाः ॥ १२
वेश्मन्येवं कृते तत्र गत्वा तान्परमार्चितान् ।
वासयेथाः पाण्डवेयान्कुन्तीं च ससुहृज्जनाम् ॥ १३
आसनानि च दिव्यानि यानानि शयनानि च ।
विधातव्यानि पाण्डूनां यथा तुष्येत वै पिता ॥ १४
यथा च तन्न जानन्ति नगरे वारणावते ।
तथा सर्वं विधातव्यं यावत्कालस्य पर्ययः ॥ १५
ज्ञात्वा च तान्सुविश्वस्तान् शयानानकुतोभयान् ।
अग्निस्त्वया ततो देयो द्वारतस्तस्य वेश्मनः ॥ १६
दह्यमाने स्वके गेहे दग्धा इति ततो जनाः ।
न गर्हयेयुरस्मान्वै पाण्डवार्थाय कर्हिचित् ॥ १७

—महाभारत, आदिपर्व अ. १४४

"याप्रमाणें राजा धृतराष्ट्रानें पाण्डवांना सांगितल्यावर दुरात्मा दुर्योधनाला अत्यंत आनंद झाला. त्यानें पुरोचनाला एकांतांत आणून व आपल्या उजव्या हातानें त्याचा हात धरून असें सांगितलें कीं, हे पुरोचना! ही संपूर्ण धनधान्यासहित पृथ्वी माझी आहे. ती जशी माझी तशीच ती तुझीही आहे. म्हणून तूं तिचें संरक्षण केलें

पाहिजेस. तुझ्याहून अधिक विश्वासू असा सहायक मला दुसरा कोणीही दिसत नाहीं कीं ज्याच्याशीं विचारविनिमय करून मी एखादा बेत ठरवावा. मी तुला सांगतों तें कर. मात्र आपलें हें बोलणें अतिशय गुप्त ठेव. माझ्या शत्रूचा नाश कर व मी सांगतों त्याप्रमाणें कुशलतेनें सर्व योजना पार पाड. धृतराष्ट्रानें पांडवांना वारणावतास पाठविलेलें असून त्या ठिकाणीं राजा धृतराष्ट्राच्या आज्ञेवरून ते कांहीं दिवस आनंदानें राहतील. तूं शक्य तितक्या लवकर गाढवें जोडलेल्या रथानें वारणावतास जा. तेथें जाऊन शहराच्याच एका बाजूला एक अत्यंत उत्कृष्ट चारही बाजूंनीं झांकलेला व ज्याच्यामध्यें सर्व प्रकारच्या सुखसोयी आहेत असा उत्कृष्ट प्रासाद तेथें बांध. त्यासाठीं जें सामान वापरशील तें सर्व अत्यंत ज्वालाग्राही व लौकर पेट घेणाऱ्या पदार्थांनीं युक्त असलें पाहिजे. शक्य तोंवर लांकडें वापरून त्यांच्यावर लवकर पेट घेण्याइतकें तेल, तूप वगैरे टाकून ठेव. सर्व घरच या प्रकारच्या साहित्यानें भरलेलें असावें; पण, हें सारें इतक्या गुप्तरीतीनें व कौशल्यानें झालें पाहिजे कीं परीक्षा करूनही पाण्डवांना अथवा इतर कोणालाही हें घर 'लाक्षागृह' आहे हें न कळलें पाहिजे. इतरही कोणाला तसा संशय मुळींच येऊं नये. पाण्डव तेथें आल्यावर कुन्तीसहित त्यांचा थाटाचा आदरसत्कार करून त्या घरीं त्यांना राहावयास घेऊन जा. तेथें दिव्य आसनें, उत्कृष्ट वाहनें, सुंदर शय्या, इत्यादिकांची रेलचेल असावी. पाण्डवांना तर तें सारें पाहून बरें वाटेलच, पण राजा धृतराष्ट्रालाही त्यांची ही केलेली व्यवस्था पाहून अत्यंत आनंद झाला पाहिजे. तूं त्यांच्याजवळ अत्यंत लीनता पत्करून अशा सुव्यवस्थितपणें राहा कीं कोणालाही कसलाही संशय न आला पाहिजे. जोंपर्यंत योग्य अवसर प्राप्त होत नाहीं तोंवर अत्यंत दक्षतेनें त्यांच्या अंतःकरणांत विश्वास उत्पन्न होण्याजोगें वर्तन तूं कर. एकदां त्यांच्या मनांत तुझ्याविषयीं विश्वास उत्पन्न झाला कीं एके दिवशीं रात्रीं त्यांना गाढ झोप लागली आहे असें पाहून तूं त्या घराला आग लाव. उठल्याबरोबर त्यांना पळून जातां येऊं नये म्हणून आग दाराच्या बाजूनेंच लाव. लोक असें समजतील कीं एकाएकीं घर पेटल्यामुळें पाण्डवांना जळण्याचें अपघाती मरण

आलें. आमचे शत्रु पाण्डव हेही नष्ट होतील व आमच्यावर जनापवादही येणार नाहीं." या एकाच उदाहरणावरून दुर्योधनाचें कारस्थानपटुत्व, त्याची निर्घृणता, व सर्पाप्रमाणें ध्यानांत न येतां दंश करण्याची प्रवृत्ति स्पष्ट होते.

## विलक्षण पीळ

त्याचप्रमाणें 'मोडेन पण वाकणार नाहीं' अशीही त्याची विलक्षण ताठपणाची मनोवृत्ति महाभारतांत सर्वत्र दृष्टीस पडते. अगदीं सामान्य प्रसंगांतदेखील कोणत्याही कारणास्तव आपण शत्रूसमोर वाकलों आहोंत अथवा त्याच्या भयानें आपल्या मनावर कांहीं परिणाम झाला आहे हें यत्किंचित्‌देखील कोणाच्याही लक्षांत येऊं नये अशी त्याची उत्कट इच्छा आहे. भगवान् श्रीकृष्ण शिष्टाईसाठीं आपल्या राजसभेंत येणार हें ऐकतांच कोणत्या पद्धतीनें त्यांचा सत्कार करावा याविषयीं कौरवांच्या राजसभेंत मुत्सद्दी लोक विचार करूं लागले असतां व विदुरानें तुम्ही श्रीकृष्णाचा कितीही थाटाचा सत्कार केला तरी कृष्णाला पांडवांपासून फोडतां येणें केवळ अशक्य होय असें स्पष्ट सांगितल्यावर दुर्योधनानें राजसभेंत धृतराष्ट्राला उद्देशून जें भाषण केलें तें त्याच्या या मनोवृत्तीवर उत्कृष्ट प्रकाश टाकणारें आहे. तो म्हणतो :—

**यदाह विदुरः कृष्णे सर्वं तत् सत्यमच्युते ।**
**अनुरक्तो ह्यसंहार्यः पार्थान् प्रति जनार्दनः ॥ १**
**यत्तत्सत्कारसंयुक्तं देयं वसु जनार्दने ।**
**अनेकरूपं राजेन्द्र न तद्देयं कदाचन ॥ २**
**देशः कालस्तथाऽयुक्तो न हि नार्हति केशवः ।**
**मंस्यत्यधोक्षजो राजन् भयादर्चति मामिति ॥ ३**
**अवमानश्च यत्र स्यात् क्षत्रियस्य विशाम्पते ।**
**न तत् कुर्याद्बुधः कार्यमिति मे निश्चिता मतिः ॥ ४**
**स हि पूज्यतमो लोके कृष्णः पृथुललोचनः ।**
**त्रयाणामपि लोकानां विदितं मम सर्वथा ॥ ५**
**न तु तस्मै प्रदेयं स्यात्तथा कार्यगतिः प्रभो ।**
**विग्रहः समुपारब्धो न हि शाम्यत्यविग्रहात् ॥ ६**

—महाभारत उद्योगपर्व अध्याय ८८

"विदुरानें जें श्रीकृष्णाविषयीं सांगितलें तेंच सत्य आहे असें माझें मत आहे. श्रीकृष्णाचें पांडवांवर इतकें प्रेम आहे कीं, कोणत्याही परिस्थितींत आपण त्यांना पांडवांपासून फोडूं शकणार नाहीं. अशा स्थितींत जीं कांहीं श्रीकृष्णांच्या सत्कारार्थ तुम्ही त्याला अनेक प्रकारचीं उपायनें द्यावयाचीं ठरविलीं आहेत, त्यांपैकीं कांहींही देऊं नये असें माझें मत आहे. आपण जो थाटाचा सत्कार करूं इच्छितों त्याला श्रीकृष्ण योग्य अथवा पात्र नाहीं असें माझें मुळींच मत नाही. पण सध्यांची परिस्थिति व वेळ या गोष्टी करण्यास योग्य नाहीं असें माझें मत आहे. आपण श्रीकृष्णाचा सत्कार करूं व तो असें समजेल कीं त्याच्या व पांडवांच्या सामर्थ्याला भिऊनच आपण त्याचा सत्कार करीत आहों. क्षत्रियाच्या बांबतींत असा समज पसरणें अत्यंत लांछनास्पद आहे. ज्यामुळें आपला अपमान होण्याचा संभव आहे अशी कोणतीही गोष्ट विचक्षण क्षत्रियानें कधींही करूं नये. विशाललोचन श्रीकृष्ण या लोकांतच काय पण त्रैलोक्यांतील सर्वच लोकांना अत्यंत पूज्य आहे हें मला पूर्णपणें माहीत आहे. पण त्याच्या सत्काराची ही वेळ नव्हे. एकदां संघर्षास प्रारंभ झाला कीं शांततेच्या सौम्य उपायांनीं कधींही काम होत नसतें." संपूर्ण पृथ्वीचें अन्यायानें गिळंकृत केलेलें राज्य, इतरांचे न्यायतः प्राप्त होणारे अधिकारदेखील तुडवून एकट्यानेंच उपभोगण्याची दुर्दान्त महत्त्वाकांक्षा वस्तुतः अत्यंत निषेध्य असतांही त्या बाबतींतल्या दुर्योधनाच्या विलक्षण ताठपणाच्या भूमिकेमुळें व तिच्यांतच परिणामांची काडीइतकीही पर्वा न करतां त्यानें दाखविलेल्या असीम निर्भयतेमुळें एक प्रकारच्या विकृत कां होईना, पण काव्यमय आकर्षणानें भरलेली आहे यांत शंका नाहीं. श्रीकृष्णांना अखेरचें उत्तर म्हणून देत असतां तो म्हणतो :—

**मुख्यश्चैवैष नो धर्मः क्षत्रियाणां जनार्दन ।**
**यच्छयीमहि संग्रामे शरतल्पगता वयम् ॥ १६**
**ते वयं वीरशयनं प्राप्स्यामो यदि संयुगे ।**
**अप्रणम्यैव शत्रूणां न नस्तप्स्यन्ति माधव ॥ १७**
**कश्च जातु कुले जातः क्षत्रधर्मेण वर्तयन् ।**
**भयाद् वृत्तिं समीक्ष्यैवं प्रणमेदिह कर्हिचित् ॥ १८**

उद्यच्छेदेव न नमेदुद्यमो ह्येव पौरुषम् ।
अप्यपर्वणि भज्येत न नमेदिह कर्हिचित् ।। १९
इति मातंगवचनं परीप्सन्ति हितेप्सवः ।
धर्माय चैव प्रणमेद्ब्राह्मणेभ्यश्च मद्विधः ।। २०
अचिन्तयन् कञ्चिदन्यं यावज्जीवं तथाऽऽचरेत् ।
एष धर्मः क्षत्रियाणां मतमेतच्च मे सदा । २१
राज्यांशश्चाभ्यनुज्ञातो यो मे पित्रा पुराऽभवत् ।
न स लभ्यः पुनर्जातु मयि जीवति केशव ।। २२
यावच्च राजा ध्रियते धृतराष्ट्रो जनार्दन ।
न्यस्तशस्त्रा वयं ते वाऽप्युपजीवाम माधव ।
अप्रदेयं पुरा दत्तं राज्यं परवतो मम ।। २३
अज्ञानाद्वा भयाद्वाऽपि मयि बाले जनार्दन ।
न तदद्य पुनर्लभ्यं पाण्डवैर्वृष्णिनन्दन ।। २४
ध्रियमाणे महाबाहौ मयि सम्प्रति केशव ।
यावद्धि तीक्ष्णया सूच्या विध्येदग्रेण केशव ।
तावदप्यपरित्याज्यं भूमेर्नः पाण्डवान् प्रति । २५

—महाभारत, उदयोगपर्व अध्याय १२७.

" जर संग्रामामध्यें आम्हांला बाणांनीं ठार मरावें लागलें तर तो क्षत्रियांचा धर्मच होय. शरतल्पावर शयन करण्यांत क्षत्रियाची काय हानि आहे? शत्रूंच्या समोर नम्र न होतां जर आम्हांला संग्रामांत वीरोचित शय्या मिळाली तर त्यांत मुळींच दुःख वाटणार नाहीं. कोण घरंदाज क्षत्रिय भयानें आपल्या शत्रूसमोर मान वाकवील? मनुष्यानें ताठ असावें त्यांतच खरें पौरुष आहे. मोडून गेलें तरी हरकत नाहीं, पण वाकूं मात्र नये असें मातंगांचें वचन आहे. खरे क्षत्रिय असेंच वागत असतात. नमस्कारच करावयाचा तर माझ्यासारखा क्षत्रिय धार्मिक कर्तव्य म्हणून ब्राह्मणासमोर नमेल. पण शत्रूसमोर कधींही नमणार नाहीं. ब्राह्मण सोडून इतर कोणासमोर कधींही न नमणें हा क्षत्रियांचा धर्म आहे व असेंच वागण्याचा माझाही निश्चय आहे. माझ्या वडिलांनीं पूर्वीं पाण्डवांना जो राज्याचा विभाग दिला होता तोदेखील मी जिवंत असेपर्यंत पुन्हां पाण्डवांना मिळणें केवळ

अशक्य आहे. जोंवर राजा धृतराष्ट्र जिवंत आहे तोंवर कोणाला राज्य देण्याचा प्रश्नच नाहीं. मी पूर्वी परवश असल्यामुळें माझ्या बाल्यावस्थेंत अज्ञानामुळें म्हणा, अथवा भयामुळें म्हणा, पाण्डवांना राज्य दिलें गेलें. आतां मी या राज्याचा सूत्रचालक असतांना तें पाण्डवांना कोणत्याही उपायानें मिळणें अशक्य आहे. अत्यंत तीक्ष्ण अशा सुईच्या अग्रावर राहील इतकी मातीदेखील मी पाण्डवांना देणार नाहीं, मग राज्य तर लांबच राहिलें."

दुर्योधनाच्या या उद्‍गारांत न्यायाच्या दृष्टीनें समन्थनीय असें कांहीं नाहीं. एकदां धृतराष्ट्रानेंच राज्य तोडून दिलेलें असल्यावर व मनांत कांहींही असलें तरी उघडपणें तो तें मान्य करावयास सिद्ध असल्यावर न्यायदृष्टीनें धृतराष्ट्र जिवंत असेपर्यंत तरी दुर्योधनाला या वाटाघाटी करण्याचा अथवा निर्णय घेण्याचा काडीइतकाही अधिकार नाहीं, असें असतांही तो वरीलप्रमाणें बोलूं शकतो. या त्याच्या उद्‍गारांवरून त्याच्या उद्धटपणाची कल्पना येऊं शकेल.

## स्पर्धेतून उत्पन्न झालेले सद्‍गुण

युधिष्ठिराची स्पर्धा हा दुर्योधनाचा स्थायीभाव असल्यामुळें सर्व प्रकारच्या उपायांनीं त्याच्यापेक्षां आपण वरचढ ठरावें असा त्यानें प्रयत्न चालविलेला आहे. पाण्डव राजसूय यज्ञ करतात म्हणून त्यानें वनांत पाण्डव असतां राजसूय यज्ञाचा घाट घातला. पाण्डवांनीं ज्याप्रमाणें स्वतःच्या बाहुबलावर सर्व क्षत्रियांना जिंकलें त्याप्रमाणें दुर्योधनानें कांहीं बाहुबलानें राज्य संपादन केलेलें नव्हतें. त्यामुळें त्याला त्या बाबतींत पाण्डवांचें पद मिळूं शकत नव्हतें. कर्णानें त्याची ती इच्छा पूर्ण केली व स्वतःच्या बाहुबलानें पृथ्वीवरील बहुतेक क्षत्रिय जिंकून दुर्योधनाच्या साम्राज्यास सामर्थ्याची जोड मिळवून दिली. मित्राच्या कां होईना पण पराक्रमानें आपण पृथ्वीचे विजेते झालों हें पाहतांच त्याच्या अंतःकरणांत युधिष्ठिराप्रमाणें राजसूय यज्ञ करून क्षत्रियांत सर्वश्रेष्ठ पद मिळविण्याची इच्छा झाली. तो कर्णाला म्हणूं लागला.

**एवमुक्तस्तु कर्णेन कर्णं राजाऽब्रवीत्पुनः ।**
**न किञ्चिद्दुर्लभं तस्य यस्य त्वं पुरुषर्षभ ॥ ४**

**सहायश्चानुरक्तश्च मदर्थं च समुद्यतः ।**
**अभिप्रायस्तु मे कश्चित् तं वै शृणु यथातथम् ।। ५**
**राजसूयं पाण्डवस्य दृष्ट्वा क्रतुवरं महत् ।**
**मम स्पृहा समुत्पन्ना तां सम्पादय सूतज ।। ६**
**—महाभारत, वनपर्व अध्याय २५५**

तूं ज्याचा मित्र आहेस त्याला जगांत दुर्लभ अशी कोणतीही गोष्ट नाहीं. पण माझ्या अंतःकरणांत एक विशेष विचार घोळत आहे. युधिष्ठिराचा श्रेष्ठ राजसूय यज्ञ मीं पाहिला आहे, तितक्याच थाटाचा राजसूय यज्ञ आपण स्वतःही करावा अशी माझी इच्छा आहे. कर्णानें त्याला सांगितलें कीं, आज सर्व राजे व त्यांचे राजमुकुट मी तुझ्या पायीं समर्पण केल्यावर राजसूय यज्ञ करावा कीं करूं नये हा प्रश्नच उत्पन्न होण्याचें कारण काय ? तूं अवश्य राजसूय यज्ञ कर व त्या दृष्टीनें तुझ्या पुरोहितांना सिद्धता करावयास सांग. पण पुरोहितानें राजाला राजसूय यज्ञ करावयास विरोध करून त्या ऐवजीं "विष्णु याग" करावयाची सूचना दिली. तो म्हणाला :

**स एवमुक्तो नृपतिमुवाच द्विजसत्तमः ।**
**न सशक्यः क्रतुश्रेष्ठो जीवमाने युधिष्ठिरे ।। १३**
**आहर्तुं कौरवश्रेष्ठ कुले तव नृपोत्तम ।**
**दीर्घायुर्जीवति च ते धृतराष्ट्रः पिता नृप ।। १४**
**अतश्चापि विरुद्धस्ते क्रतुरेष नृपोत्तम ।**
**अस्ति त्वन्यन्महत् सत्रं राजसूयसमं प्रभो ।। १५**
**तेन त्वं यज राजेन्द्र शृणु चेदं वचो मम । १६**
**—महाभारत, वनपर्व अध्याय २५५**

"पुरोहितानें सांगितलें कीं, युधिष्ठिर जिवंत असेपर्यंत तुला राजसूय यज्ञ करतां येणार नाहीं. जोंवर तूं युधिष्ठिराला जिकलें नाहींस तोंवर सर्व क्षत्रियांना जिकलें असें होत नाहीं. तसेंच तुझे वडील धृतराष्ट्र जिवंत असतांना तुला राजसूय कसा करतां येणार ? हवें तर राजसूयासारखाच दुसरा एक मोठा याग आहे तो तुला करतां येईल." दुर्योधनानें त्याप्रमाणें मोठा याग करून तपस्वी, याचक व ब्राह्मण यांच्या दृष्टीनें दानशूर म्हणून कीर्ति मिळविली. पण येथें हें

लक्षांत ठेवलें पाहिजे कीं या दानाचा उगम स्पर्धेंतून झालेला आहे. अत्यंत शीघ्रकोपी दुर्वास ऋषींनादेखील त्यानें आपल्या औदार्यानें व सेवेनें प्रसन्न करून घेतलें होतें असें वर्णन आहे. पण पाण्डवांचें नांव काढतांच भरसभेंत मांडी थोपटून अपमानित करणाऱ्या दुर्योधनाला मैत्रेयासारख्या तपस्व्यांची मोठी प्रतिष्ठा होती असें मुळींच नव्हे. ज्या ज्या शक्तींचा पाण्डवांविरुद्ध उपयोग करतां येईल त्यांचा तो संग्रह करीत होता. याच धोरणानें त्यानें दुर्वासांची सेवा केली हें त्यानें शेवटीं जें वरदान मागितलें त्यावरून दिसतें. महाभारतांत या संबंधानें पुढीलप्रमाणें वर्णन आहेः--

श्रुत्वा तेषां तथा वृत्तिं नगरे वसतामिव ।। ५
दुर्योधनो महाराज तेषु पापमरोचयत् ।
तथा तैर्निकृतिप्रज्ञैः कर्णदुःशासनादिभिः ।। ६
नानोपायैरघं तेषु चिन्तयत्सु दुरात्मसु ।
अभ्यागच्छत् सधर्मात्मा तपस्वी सुमहायशाः ।। ७
शिष्यायुतसमोपेतो दुर्वासा नाम कामतः ।
तमागतमभिप्रेक्ष्य मुनिं परमकोपनम् ।। ८
दुर्योधनो विनीतात्मा प्रश्रयेण दमेन च ।
सहितो भ्रातृभिः श्रीमानातिथ्येन न्यमन्त्रयत् ।।९
विधिवत् पूजयामास स्वयं किङ्करवत् स्थितः ।
अहानि कतिचित् तत्र तस्थौ स मुनिसत्तमः ।। १०
तं च पर्यचरद्राजा दिवारात्रमतन्द्रितः ।
दुर्योधनो महाराज शापात्तस्य विशंकितः ।। ११
क्षुधितोऽस्मि ददस्वान्नं शीघ्रं मम नराधिप ।
इत्युक्त्वा गच्छति स्नातुं प्रत्यागच्छति वै चिरात् ।
न भोक्ष्याम्यद्य मे नास्ति क्षुधेत्युक्त्वैत्यदर्शनम् ।। १२
अकस्मादेत्य च ब्रूते भोजयास्मांस्त्वरान्वितः ।
कदाचिच्च निशीथे स उत्थाय निकृतौ स्थितः ।। १३
पूर्ववत् कारयित्वाऽन्नं न भुङ्क्ते गर्हयन् स्म सः ।
वर्तमाने तथा तस्मिन् यदा दुर्योधनो नृपः ।। १४

विकृतिं नैति न क्रोधं तदा तुष्टोऽभवन्मुनिः ।
आह चैनं दुराधर्षो वरदोऽस्मीति भारत ॥ १५

दुर्वासा उवाच ।

वरं वरय भद्रं ते यत् ते मनसि वर्तते ।
मयि प्रीते तु यद्धर्म्यं नालभ्यं विद्यते तव ॥ १६

वैशम्पायन उवाच ।

एतच्छ्रुत्वा वचस्तस्य महर्षेर्भावितात्मनः ।
अमन्यत पुनर्जातमात्मानं स सुयोधनः ॥ १७
प्रागेव मन्त्रितं चासीत् कर्णदुःशासनादिभिः ।
याचनीयं मुनेस्तुष्टादिति निश्चित्य दुर्मतिः ॥ १८
अतिहर्षान्वितो राजन् वरमेनमयाचत ।
शिष्यैःसह मम ब्रह्मन् यथा जातोऽतिथिर्भवान् ॥ १९
अस्मत्कुले महाराजो ज्येष्ठः श्रेष्ठो युधिष्ठिरः ।
वने वसति धर्मात्मा भ्रातृभिः परिवारितः ॥ २०
गुणवान् शीलसम्पन्नस्तस्य त्वमितिथिर्भव ।
यदा च राजपुत्री सा सुकुमारी यशस्विनी ॥ २१
भोजयित्वा द्विजान् सर्वान् पतींश्च वरवर्णिनी ।
विश्रान्ता च स्वयं भुक्त्वा सुखासीनां भवेद्यदा ॥ २२
तदा त्वं तत्र गच्छेथा यद्यनुग्राह्यता मयि ।
तथा करिष्ये त्वत्प्रीत्येत्येव मुक्त्वा सुयोधनम् ॥ २३
दुर्वासा अपि विप्रेन्द्रो यथागतमगात् ततः ।
कृतार्थमपि चात्मानं तदा मेने सुयोधनः ॥ २४
करेण च करं गृह्य कर्णस्य मुदितो भृशम् ।
कर्णोऽपि भ्रातृसहितमित्युवाच नृपं मुदा ॥ २५

कर्ण उवाच ।

दिष्ट्या कामः सुसंवृत्तो दिष्ट्या कौरव वर्धसे ।
दिष्ट्या ते शत्रवो मग्ना दुस्तरे व्यसनार्णवे ॥ २६
दुर्वासःक्रोधजे वन्हौ पतिता पाण्डुनन्दनाः ।
स्वैरेव ते महापापैर्गता वै दुस्तरं तमः ॥ २७

—महाभारत, वनपर्व अध्याय २६२

पाण्डव वनांत असतांना दुर्योधनाच्या अंतःकरणांत त्यांच्याविषयींचे दुष्ट विचार सतत घोळत असत. कर्ण आणि दुःशासन या कपटपटूंच्या बरोबर तो त्याविषयीं नेहमीं विचार करीत असे. असें असतां एके दिवशीं सहजगत्या फिरत फिरत महान् तपस्वी व धर्मात्मा दुर्वास ऋषि आपल्या दहा हजार शिष्यांसमवेत तेथें आले. दुर्योधनानें अत्यंत विनयानें अतिथि म्हणून त्यांना निमंत्रण दिलें. त्यांची विधियुक्त पूजा करून एखाद्या दासाप्रमाणें तो दिवसरात्र त्यांची सेवा करूं लागला. कांहीं दिवस दुर्वास तेथें राहिले. त्यांच्या शापाची सदोदित मनांत भीति बाळगून दुर्योधन अत्यंत दक्षतेनें त्यांची सेवा करीत असे. ऋषींनीं एखाद्यावेळीं लहरींत येऊन, 'मला अत्यंत भूक लागली आहे. लवकर भोजन तयार करा' अशी आज्ञा द्यावी. व स्नानासाठीं म्हणून नदीवर जावें, व परत आल्यावर मला जेवावयाचें नाहीं असें सांगून तें सगळें अन्न वाया घालवावें. कधीं कांहींच तयार नसतां एकदम भोजन मागावें. भलत्याच रात्रीं उठून भूक लागली म्हणून अन्न तयार करावयास लावावें, व त्या अन्नाचीच निंदा करून तें फेकून द्यावयास लावावें. याप्रमाणें दुर्वास ऋषि सतत छळ करीत असूनही तो दुर्योधनानें सहन केला. शेवटीं दुर्वास त्याच्यावर प्रसन्न झाले व त्यांनीं तुला काय हवें तें माग म्हणून दुर्योधनाला सांगितलें. तेव्हां दुर्योधनानें आपल्या दुष्ट मंत्र्यांशीं विचारविनिमय करून दुर्वासांना असें सांगितलें कीं आमच्या कुळांत सर्वांत ज्येष्ठ व श्रेष्ठ युधिष्ठिर असून तो धर्मात्मा आपल्या बंधूजनांसहित वनांत राहतो. तो गुणवान् असून चारित्र्यसंपन्न आहे. आपण त्याचे अतिथि व्हावें. मात्र जर आपणांस खरोखरीच माझें कांहीं प्रिय करावयाचें असेल तर सुकुमारी, यशस्विनी, राजकन्या द्रौपदी सर्व ब्राह्मणांना व पतींना भोजन घालून व स्वतःचेंही भोजन संपवून ज्यावेळीं विश्रांति घेत असेल, त्यावेळींच आपण तेथें जावें व भोजन मागावें. दुर्वास ऋषींनीं 'तथास्तु' म्हणून त्याला वरदान दिलें व ते निघून गेले. ते गेल्यावर दुर्योधनाला आपण कृतार्थ झालों असें वाटूं लागलें, व कर्णाचा हात आपल्या हातांत घेऊन तो स्वतःचा आनंद व्यक्त

करूं लागला. कर्णही त्याला असें म्हणाला कीं, मोठी भाग्याची गोष्ट आहे कीं तुझी इच्छा परिपूर्ण झाली. तुझे सर्व शत्रु दुस्तर, संकट-समुद्रांत निमग्न झाले हें फार चांगलें झालें. आपल्या स्वतःच्याच पापानें दुर्वासांसारख्या मूर्तिमंत क्रोधाच्या अग्निकुंडांत आतां पाण्डव जळून भस्म होतील. तात्पर्य दुर्योधनाची ब्राह्मण्यता ही अशा प्रकारच्या दुष्ट हेतूंतून अथवा युधिष्ठिरापेक्षां आपली अधिक कीर्ति व्हावी अशा प्रकारच्या स्पर्धेतून निर्माण झालेली आहे हें नेहमींच लक्षांत ठेवलें पाहिजे. त्याच्या ब्राह्मण्यतेचें समर्थन करतांना त्याचे समर्थक नेहमीं संजयानें शिष्टाईच्या वेळीं " कुतो दायानोपयेत् ब्राह्मणानाम्। " असें जें म्हटलें आहे तें त्याच्या ब्राह्मण्यतेचें उदाहरण म्हणून पुढें करीत असतात. पण त्यांनीं त्याला सदुपदेश करतांच तो त्यांचा अपमान करीत असे असें दिसतें. मैत्रेयाशीं त्यानें केलेल्या वागणुकीविषयीं लिहितांना महाभारतकारांनीं लिहिलें आहे कीं :–

**एवं तु ब्रुवतस्तस्य मैत्रेयस्य विशांपते ।। २८**
**ऊरुं गजकराकारं करेणाभिजघान सः ।। २९**

—महाभारत, वनपर्व अ. १०

याप्रमाणें मैत्रेय बोलत असतां त्याला उत्तर म्हणून हत्तीच्या सोंडेप्रमाणें पुष्ट असणाऱ्या आपल्या मांडीवर दुर्योधनानें हात मारिला.

त्याच्या ब्राह्मण्यतेप्रमाणेंच त्याचें उत्कृष्ट प्रजापालनही युधिष्ठिराच्या स्पर्धेतूनच निर्माण झालेलें आहे. आश्रमवासी पर्वांत राजा धृतराष्ट्र प्रजांचा अखेरचा निरोप घेऊन व आपल्याकडून नि मुलांकडून कांहीं आगळिक झाली असल्यास तिची क्षमा करा म्हणून प्रजांना या शेवटच्या क्षणीं विनवीत असतां या कुळांतील सर्व राजांनीं आमचें परिपालनच केलेलें आहे. पाण्डव तर करीतच आहेत. पण दुर्योधनानेंही आमचें उत्कृष्ट परिपालन केलें असें त्यांनीं म्हटलें आहे. प्रजा म्हणतात :—

**तथा दुर्योधनेनापि राज्ञा सुपरिपालिताः ।। २०**
**न स्वल्पमपि पुत्रस्ते व्यलीकं कृतवान्नृप ।**
**पितरीव सुविश्वस्तास्तस्मिन्नपि नराधिपे ।। २१**

**वयमास्म यथा सम्यक् भवतो विदितं तथा ।**

**तथा वर्षसहस्राणि कुन्तीपुत्रेण धीमता ॥ २२**

—महाभारत, आश्रमवासिक पर्व अध्याय १०

"राजा दुर्योधनानेंदेखील आमचें उत्तम रीतीनें परिपालन केलें. तुझ्या पुत्रानें आमचें थोडेंही वाईट केलें नाहीं. स्वतःच्या पित्याप्रमाणेंच त्यानें विश्वासानें आमचें पालन केलें आहे". दुर्योधनाच्या प्रजावत्सलतेचा हा पुरावा त्याच्या उच्च धारणेचा द्योतक नसून तो फुसका आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. एकतर सदाचा निरोप घेऊन जात असलेल्या धृतराष्ट्राला उगाच दुःख देण्याचें हृदयहीन वर्तन कोणीही करणें शक्य नसल्यामुळें प्रजांच्या तोंडीं हीं वाक्यें आलीं असलीं पाहिजेत. दुसरें असें आहे कीं पौरजानपद ही भारतीय राज्यतंत्राची एक महान् शक्ति असून कोणत्याही राजाला तिला भ्यावेंच लागत असे हें आपण मागेंच पाहिलें आहे. प्रत्यक्ष दुर्योधनाच्याच देवापि नांवाच्या पूर्वजाला या शक्तीच्या प्रभावानें पूर्वजांच्या राज्यसिंहासनाचा जन्मसिद्ध वारसा गमवावा लागला होता हेंही आपण मागें पाहिलेंच आहे. अशा स्थितींत सिंहासनाच्या दक्षतेसाठीं दुर्योधनासारख्या अन्यायानें तें गिळंकृत करूं इच्छिणाऱ्या व्यक्तीनें तरी या बाबतींत जपणें अत्यंतच आवश्यक होतें. स्वतः धृतराष्ट्राला व दुर्योधनाला आपल्या कुकृत्यांमुळें प्रजांचा आपल्यावर संताप ओढवेल याची स्पष्ट जाणीव असल्याचें धृतराष्ट्रावरील व्याख्यानांत मी उल्लेखिलेंच आहे. व म्हणून दुर्योधनानें राज्य गिळंकृत करण्याच्या मार्गांतील एक आवश्यक बाब म्हणून हें धोरण स्वीकारलेलें होतें, असें त्यानें स्वतःच म्हटलेलें आहे. तो म्हणतो :

**एवमेतन्मया तात भावितं दोषमात्मनि ।**

**दृष्ट्वा प्रकृतयः सर्वा अर्थमानेन पूजिताः ॥ १२**

**ध्रुवमस्मत्सहायास्ते भविष्यन्ति प्रधानतः ॥ १३**

—आदिपर्व अध्याय १४२

**ततो दुर्योधनो राजा सर्वाः प्रकृतयः शनैः ।**
**अर्थमानप्रदानाभ्यां संजहार सहानुजः ॥ १**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १४३

" प्रजांचा आपल्या बाबतींत असंतोष होण्याचा संभव आहे ही गोष्ट मी यापूर्वीच ओळखून त्या धोरणानें सन्मान व धनदान यांच्या साहाय्यानें त्यांना प्रसन्न करून घेतलें आहे. ते आपलेच सहायक होतील असें आतां मला वाटतें."

असें म्हणून दुर्योधनानें सन्मान व धनदान यांच्या साहाय्यानें सर्व प्रजांना सतत प्रसन्न करून घ्यावयाचें धोरण प्रत्यक्षांत आणावयास प्रारंभ केला.

## धोरणीपणा व नेतृत्व

एकदां उद्दिष्ट ठरल्यावर तें प्राप्त करून घेण्यासाठीं त्यानें आवश्यक ते मित्र, नाना प्रकारचा त्याग करून जोडले. इतकेंच नव्हे तर त्या बाबतींत ज्यांचें ज्यांचें सामर्थ्य संगृहीत करणें आवश्यक वाटलें त्यांना त्यांना त्यानें दूरदर्शीपणानें पूर्वींपासूनच आपल्या बाजूला बांधून टाकलेले आहेत. अर्जुनाच्या महास्त्रज्ञतेला भिऊन त्यानें कर्णाला जवळ केलें. त्यानें कर्णाला अंगराज्य दिलें व कर्ण त्याचा अनुचर व सेवक असूनही त्यानें कर्णाजवळ फक्त सख्याचीच भिक्षा मागितली. महाभारतकारांनीं असें म्हटलें आहे कीं :—

**अभिषिक्तोऽङ्गराज्ये स श्रियायुक्तो महाबलः ।**
**सच्छत्रवालव्यजनो जयशब्दोत्तरेण च ॥ ३८**
**उवाच कौरवं राजन्वचनं स वृषस्तदा ।**
**अस्य राज्यप्रदानस्य सदृशं किं ददानि ते ॥ ३९**
**प्रब्रूहि राजशार्दूल कर्ता ह्यस्मि तथा नृप ।**
**अत्यन्तं सख्यमिच्छामीत्याह तं स सुयोधनः ॥ ४०**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १३६

**दुर्योधनस्यापि तदा कर्णमासाद्य पार्थिव ।**
**भयमर्जुनसंजातं क्षिप्रमन्तरधीयत ॥ २४**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १३७

" अंगराज्याचा अभिषेक झाल्यावर सर्व राजैश्वर्यानें युक्त असा कर्ण दुर्योधनाला म्हणाला कीं, या राज्यप्रदानाचें मी तुला काय द्यावें अशी तुझी इच्छा आहे ? तूं मला जें दिलेंस त्यांतून मी कसा उतराई होऊं ? " त्यावर दुर्योधन कर्णाला इतकेंच म्हणाला कीं, 'अत्यंत सख्याशिवाय मला दुसरें कांहींही नको'. कर्णाशीं सख्य होतांच दुर्योधनाच्या अंतःकरणांतील अर्जुनाविषयींचें सर्व भय नष्ट झालें. आणि कर्णासाठीं दुर्योधनानें काय केलें नाहीं? श्रीकृष्णांना पाण्डवांच्या सभेंत जो मान होता तो दुर्योधनानें कर्णाला समर्पण केला व इतका अविरत प्रेमाचा त्यानें कर्णावर वर्षाव केला कीं, जगांतली कोणतीही मोठी शक्ति कोणत्याही कारणास्तव कर्णाला दुर्योधनापासून विलग करावयास समर्थ ठरूं शकली नाहीं. यासंबंधीं स्वतः कर्णाचेच उद्गार अत्यंत उद्बोधक ठरतात. भगवान् श्रीकृष्ण व कुन्ती कर्णाला दुर्योधनापासून फोडावयास आले असतां नकार देतांना त्यानें त्यांना जीं अनेक कारणें सांगितलीं आहेत त्यांत दुर्योधनाविषयीं बोलतांना तो म्हणतो :--

**धृतराष्ट्रकुले कृष्ण दुर्योधनसमाश्रयात् ।**
**मया त्रयोदशसमा भुक्तं राज्यमकण्टकम् ।। १३**
**वधाद्बंधाद्भयाद्वाऽपि लोभाद्वाऽपि जनार्दन ।**
**अनृतं नोत्सहे कर्तुं धार्तराष्ट्रस्य धीमतः ।। १७**
**प्राप्य चापि महद्राज्यं तदहं मधुसूदन ।**
**स्फीतं दुर्योधनायैव संप्रदद्यामरिन्दम ।। २२**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १४१

**सर्वकामैः संविभक्तः पूजितश्च यथासुखम् ।**
**अहं वै धार्तराष्ट्राणां कुर्यां तदफलं कथम् ।। ११**
**उपनह्य परैर्वैरं ये मां नित्यमुपासते । १२**
**अयं हि कालः संप्राप्तो धार्तराष्ट्रोपजीविनाम् ।**
**निर्वेष्टव्यं मया तत्र प्राणानपरिरक्षता ।। १५**
**कृतार्थाः सुभृता ये हि कृत्यकाले ह्युपस्थिते ।**
**अनवेक्ष्य कृतं पापा विकुर्वन्त्यनवस्थिताः ।। १६**

—महाभारत, उदयोगपर्व अध्याय १४६

हे कृष्णा ! धृतराष्ट्राच्या या राज्यांत दुर्योधनाच्या आश्रयानें मी तेरा वर्षें अकंटक राज्याचा उपभोग घेतला. अशा स्थितींत आज वध, बंधन, भय अथवा लोभ यांपैकीं कोणत्याही गोष्टीमुळें राजा दुर्योधनाचें अनिष्ट करण्याची माझी इच्छा नाहीं. जर तूं पाण्डवांना मीं त्यांचा वडील बंधु आहें असें सांगून मला हें राज्य मिळावें अशी खटपट केलीस तर तें सारें समृद्ध राज्य मी दुर्योधनालाच परत दिल्यावांचून राहाणार नाहीं.

कुन्तीशीं बोलतांना तो म्हणतो : सर्व राजविलासांत दुर्योधनानें मला स्वतःच्या योग्यतेचा विभाग दिला असून माझ्या सर्व इच्छा त्यानें परिपूर्ण केल्या आहेत. सतत त्यानें माझा इतका आदर केल्यावर मी त्याला तोंडघशीं पाडणार नाहीं. कौरवांनीं माझ्या भरंवशावर हें वैर उत्पन्न केलें आहे. देवगण ज्याप्रमाणें इंद्राला वंदन करतात त्याचप्रमाणें ते सतत माझ्या पायांशीं विनम्र राहात आले आहेत. अशा स्थितींत धृतराष्ट्रपुत्राच्या भरंवशावर ज्यांनीं आजवर सन्मानानें उपजीविका केली त्यांनीं आज त्यांच्यासाठीं स्वतःचे प्राण वेंचण्याची संधि आलेली आहे. कृतज्ञ लोक नेहमीं उपकारकर्त्याच्या उपकाराची फेड करीत असतात. कृतघ्न मात्र उपकारांची फेड अपकारानें करीत असतात.

दुर्योधन नुसता कर्णाच्याच भरंवशावर होता असें नाहीं. भीष्मद्रोणांना प्रसन्न राखून त्यांना आपल्या पक्षांत बांधून न ठेविल्यास आपला पक्ष बलहीन होण्याचा संभव आहे हें ओळखून त्यानें त्यांचा सन्मान राखून त्यांचा संग्रह करण्यासाठीं जें त्याला शक्य तें सर्व केलें होतें. शेवटीं " बद्धोऽस्म्यर्थेन कौरवैः " अशी त्यांपैकीं प्रत्येकाला लाजिरवाणी वाणी उच्चारून त्याच्याकडून लढणें भाग पडलें आहे. इतकेंच नव्हे तर त्यानें त्यांना ज्ञातिक्षयाचें भय दाखवून पांडव वनांत गेले त्या वेळींच आपल्याकडून लढण्याच्या वचनानें बांधून घेतलें होतें. हा वृत्तान्त सांगतांना तो म्हणतो :

**वने प्रव्राजितान् पार्थान् यदाऽऽयान्मधुसूदनः ।**
**महता बलचक्रेण परराष्ट्रावमर्दिना ।। २**

कृष्णप्रधानाः संहत्य पर्युपासन्त भारत ॥ ५
प्रत्यादानं च राज्यस्य कार्यमूचुर्नराधिपाः ।
भवतः सानुबन्धस्य समुच्छेदं चिकीर्षवः ॥ ६
ते राज्ञो धृतराष्ट्रस्य सामात्यस्य महारथाः ।
वैरं प्रतिकरिष्यन्ति कुलोच्छेदेन पाण्डवाः ॥ १६
ततो द्रोणोऽब्रवीद्भीष्मः कृपो द्रौणिश्च भारत ।
मत्वा मां महतीं चिन्तामास्थितं व्यथितेन्द्रियम् ॥ १७
अभिद्रुग्धाः परे चेन्नो न भेतव्यं परन्तप ।
असमर्थाः परे जेतुमस्मान् युधि समास्थितान् ॥ १८
एकैकशः समर्थाः स्मो विजेतुं सर्वपार्थिवान् ।
आगच्छन्तु विनेष्यामो दर्पमेषां शितैः शरैः ॥ १९

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ५५

दुर्योधन म्हणतो : पाण्डव वनांत गेल्यावर परराष्ट्राचें मर्दन करूं शकण्याचें सामर्थ्य असलेलें आपलें सैन्य घेऊन श्रीकृष्णानें त्यांची वनांत भेट घेतली. कृष्णाच्या नेतृत्वाखालीं जमलेल्या सर्व लोकांनीं राज्य परत घेतलें पाहिजे असा निश्चय करून राजा धृतराष्ट्राच्या कुलाचा समूळ उच्छेद करण्याची प्रतिज्ञा केली. अमात्यासहित राजा धृतराष्ट्राच्या कुलाचा समूळ उच्छेद करूनच आपल्या वैराचें उत्तर द्यावयाचें असा पाण्डवांनीं केलेला निश्चय सर्वांना सांगितला. त्यावेळीं मी अत्यंत चिंताकुल झालों आहें हें पाहून भीष्म, द्रोण, कृपाचार्य, अश्वत्थामा यांनीं मला असें वचन दिलें कीं, दुसरे लोक जर आपला विद्वेष करीत आहेत तर तुला भिण्याचें कांहींच कारण नाहीं. आम्ही युद्धांत उभे राहिल्यावर हे लोक आमचा पराभव करण्यास पूर्णपणें असमर्थ आहेत. आम्ही एकएकटेदेखील त्या सर्वांचा नाश करूं शकतों. मग संघटितरीत्या उभे राहिल्यावर विचारावयासच नको. ते आमच्यावर चालून येत असतील तर त्यांचा सगळा गर्व आम्ही आमच्या तीक्ष्ण बाणांनीं नष्ट केल्यावांचून राहणार नाहीं.

आधींच या प्रकारें या धर्मनिष्ठ महारथींना त्यांची सत्यसंधता पाहून आपल्याकडे गुंतवून ठेवण्यांत दुर्योधनानें केवढी अपूर्व दूरदर्शिता व्यक्त केली आहे ! कर्ण त्याचा मित्र असून त्यानें सेना-

पतित्वाचा पहिला अभिषेक, भीष्म जिवंत असेपर्यंत मी हातांत हत्यार घेणार नाहीं असें म्हणून त्यांचा परित्याग करण्याची अप्रत्यक्ष सूचना दिली असतांही दुर्योधनानें त्याला दूर सारून भीष्मांनाच सेनापतित्वाचा पहिला अभिषेक केला. आपसांतील सेनापतींचीं सर्व भांडणें त्यानें ज्या कुशलतेनें तोडलेलीं आहेत व परस्परांशीं जीव घ्यावयास उठेपर्यंत तंडणारे सर्व लोक त्यांनीं ज्या कुशलतेनें शेवटपर्यंत एकाच सूत्रांत बांधून ठेवले आहेत तें पाहिलें म्हणजे त्याच्या असामान्य नेतृत्वाची खात्री पटल्यावांचून राहात नाहीं. नुसतें 'विशिष्टन् देवकीपुत्रान्' तूं कृष्णापेक्षांही थोर आहेस असें प्रेमळपणानें म्हणून शल्यासारख्या तीक्ष्ण मानधनाला त्यानें कर्णाचें सारथ्य करावयास लावलें आहे. प्रत्येक भांडणाच्या वेळीं उत्तर गोग्रहणापासून तों कर्णवधापर्यंत कर्ण व द्रोणाचार्य, कर्ण व भीष्म, कर्ण व अश्वत्थामा, कर्ण व शल्य, या सगळ्यांचीं भांडणें त्यानें ज्या सफाईनें निकालांत काढलीं आहेत व तसें करतांना कोणालाही अप्रसन्न न करण्यांत त्यानें जें कौशल्य प्रकट केलें आहे तें पाहून मनुष्य थक्क झाल्यावांचून राहात नाहीं. आपआपसांत लोक कितीही भांडोत त्याच्यासाठीं मात्र सर्व प्राण द्यावयास सिद्ध आहेत ही गोष्ट त्याचें असामान्य नेतृत्वच सिद्ध करते. पण यासर्वांवर ताण करणारी व भगवान् श्रीकृष्णाचेंही अंतःकरण क्षणभर स्तिमित करणारी गोष्ट म्हणजे त्याचें मृत्यूशींही झुंज घेऊन त्याला जिंकून टाकणारें अलौकिक धैर्य होय.

## अलौकिक धैर्य

पाण्डवांशीं लढण्याचा त्याचा उत्साह त्याच्या बाजूच्या अनेक लोकांनीं कमी केल्यावर त्यानें त्यांना उत्तरादाखल जीं भाषणें केलीं आहेत त्यांत त्याचें अलौकिक धैर्य व्यक्त झालें आहे. ज्यांच्या भरंवशावर तूं हें युद्ध उभारलेंस ते लोक तुला प्रतिकूल आहेत असें त्याला धृतराष्ट्रानें जाणविल्यावर व देवताही तुला प्रतिकूल आहेत असें सांगितल्यावर तो धृतराष्ट्राला उत्तर देतांना म्हणतो :

**समर्थं मन्यसे यच्च कुन्तीपुत्रं वृकोदरम् ।**
**तन्मिथ्या न हि मे कृत्स्नं प्रभावं वेत्सि भारत ॥ ३१**

मत्समो हि गदायुद्धे पृथिव्यां नास्ति कश्चन ।
नासीत् कश्चिदतिक्रान्तो भविता न च कश्चन ।। ३२
युक्तो दुःखोषितश्चाहं विद्यापारगतस्तथा ।
तस्मान्न भीमान्नान्येभ्यो भयं मे विद्यते क्वचित् ।। ३३
दुर्योधनसमो नास्ति गदायामिति निश्चयः ।
संकर्षणस्य भद्रं ते यत्तदैनमुपावसम् ।। ३४
युद्धे संकर्षणसमो बलेनाभ्यधिको भुवि ।
गदाप्रहारं भीमो मे न जातु विषहेद्युधि । ३५
एकं प्रहारं यं दद्यां भीमाय रुषितो नृप ।
स एवैनं नयेद्घोरः क्षिप्रं वैवस्वतक्षयम् ।। ३६
इच्छेयं च गदाहस्तं राजन् द्रष्टुं वृकोदरम् ।
सुचिरं प्रार्थितो ह्येष मम नित्यं मनोरथः ।। ३७
गदया निहतो ह्याजौ मया पार्थो वृकोदरः ।
विशीर्णगात्रः पृथिवीं परासुः प्रपतिष्यति ।। ३८

—महाभारत, उदयोगपर्व अध्याय ५५

नाहं भवति न द्रोणे नाश्वत्थाम्नि न सञ्जये ।
न भीष्मे न च काम्बोजे न कृपे नच बाह्लिके ।। १०
सत्यव्रते पुरुमित्रे भूरिश्रवसि वा पुनः ।
अन्येषु वा तावकेषु भारं कृत्वा समाह्वयम् ।। ११
अहं च तात कर्णश्च रणयज्ञं वितत्य वै ।
युधिष्ठिरं पशुं कृत्वा दीक्षितौ भरतर्षभ ।। १२
रथो वेदी स्रुवः खड्गो गदास्रुक् कवचं सदः ।
चातुर्होत्रं च धुर्या मे शरा दर्भा हविर्यशः ।। १३
आत्मयज्ञेन नृपते इष्ट्वा वैवस्वतं रणे ।
विजित्य च समेष्यावो हतामित्रौ श्रिया वृतौ ।। १४
अहं च तात कर्णश्च भ्राता दुःशासनश्च मे ।
एते वयं हनिष्यामः पाण्डवान् समरे त्रयः ।। १५
अहं हि पाण्डवान् हत्वा प्रशास्ता पृथिवीमिमाम् ।
मां वा हत्वा पाण्डुपुत्रा भोक्तारः पृथिवीमिमाम् ।। १६

**त्यक्तं मे जीवितं राज्यं धनं सर्वं च पार्थिव ।**
**न जातु पाण्डवैः सार्धं वसेयमहमच्युत ॥ १७**
**यावद्धि सूच्यास्तीक्ष्णाया विध्येदग्रेण मारिष ।**
**तावदप्यपरित्याज्यं भूमेर्नः पाण्डवान् प्रति ॥ १८**

महाभारत, उदयोगपर्व अध्याय ५८

**मयाऽभिमन्त्रितः शश्वज्जातवेदाः प्रशाम्यति ।**
**दिधक्षुः सकलाँल्लोकान् परिक्षिप्य समन्ततः ॥ ९**
**यद्वा परमकं तेजो येन युक्ता दिवौकसः ।**
**ममाप्यनुपमं भूयो देवेभ्यो विद्धि भारत ॥ १०**

—महाभारत, उदयोगपर्व अध्याय ६१

कुन्तीपुत्र भीमसेन अत्यंत समर्थ आहे असें जें आपणांस वाटतें तें सर्वस्वीं खोटें आहे. माझ्या प्रभावाची आपणास कल्पना नाहीं. या पृथ्वीवर माझ्यासारखा गदायुद्धांत विचक्षण कोणीही नाहीं. इतकेंच काय पण असा कोणी पूर्वीही नव्हता व पुढेंही शक्य नाहीं. मी कष्टानें विद्या संपादन केली आहे त्यामुळें भीम किंवा इतर कोणाहीपासून मला काडीइतकेंही भय नाहीं. मी ज्यावेळीं बलरामांच्या जवळ गदायुद्धाचा अभ्यास केला, त्यावेळीं दुर्योधनासारखा या युद्धप्रकारांत कोणीही विचक्षण नाहीं असें ते म्हणत असत. मी बलरामांप्रमाणें किंवा त्यांच्यापेक्षांही अधिक समर्थ आहें. माझ्या गदेचा प्रहार भीम सहन करूं शकणार नाहीं. एक प्रहार जरी मी रागावून टाकला तरीही तो जिवंत राहूं शकणार नाहीं. गदा हातांत घेऊन माझ्यावर चालून येणाऱ्या भीमाला पाहाण्याचीच माझी इच्छा आहे. एकदां मी त्याला ठार मारलें म्हणजे तो धुळींत तडफडत मरून पडेल. आपण, द्रोणाचार्य, अश्वत्थामा, संजय, भीष्म, काम्बोज, कृपाचार्य, बाह्लीक, सत्यव्रत, पुरुमित्र, भूरिश्रवा इत्यादिकांच्या भरंवशावर मी मुळींच पाण्डवांना आव्हान करीत नाहीं. मी व कर्ण या दोघांनीं मिळून या रणयज्ञाची दीक्षा घेतली असून युधिष्ठिर हा पशु, रथ ही वेदी, खड्ग म्हणजेच स्रुवा, गदा म्हणजे स्रुक्, कवच हेंच सद्, धुरी म्हणजे चातुर्होत्र, बाण हेच दर्भ, यश हाच हविर्भाग, कल्पून आत्मयज्ञानें यमदेवतेला प्रसन्न करून घ्यावयाचा मीं

निश्चय केला आहे. शत्रूंना ठार मारून विजय संपादन करणें हेंच या यज्ञाचें फल होय. मी, कर्ण व दुःशासन असे आम्ही तिघेच पांडवांना ठार मारूं. मी पाण्डवांना ठार मारून या सर्व पृथ्वीचें राज्य करीन किंवा ते तरी मला ठार करून पृथ्वीचें राज्य करतील. मी जीवित, राज्य, धन इत्यादि सर्व गोष्टी गमवाव्या लागल्या तरीही पाण्डवांच्याबरोबर एकत्र म्हणून राहणार नाहीं. फार काय सुईच्या अग्रावर राहील इतकी मातीदेखील मी त्यांना देणार नाहीं. मी अभिमंत्रण केलें कीं सर्व लोकांना जाळावयास सिद्ध होणारा अग्नीदेखील शांत होतो. देव ज्या परम तेजानें युक्त आहेत त्यापेक्षांही माझें तेज अधिक प्रखर आहे.

दुर्योधन ज्यावेळीं हीं वाक्यें बोलला त्यावेळीं त्याच्याजवळ त्याचे सर्व सहायक तरी होते. पण ज्यावेळीं त्याचे सर्व सहायक नष्ट झाले व त्याचा सर्वांत मोठा भरंवशाचा वीर कर्णही अर्जुनाच्या हातानें मारला गेला, त्यावेळीं उरलेले सर्व सुहृद, त्याला संधि करण्याचा उपदेश करीत असतांना, त्यानें त्यांना जीं उत्तरें दिलीं आहेत त्यांत त्याच्या धैर्याचें खरें तेज तळपलें आहे. कृपाचार्य त्याला संधीचा उपदेश करीत असतां त्यानें त्यांना जें उत्तर दिलें आहे तें या दृष्टीनें मननीय आहे. तो म्हणतो :

**पाण्डवानां प्रसादेन भोक्ष्ये राज्यमहं कथम् ।**
**उपर्युपरि राज्ञां वै ज्वलित्वा भास्करो यथा ।।** २३
**युधिष्ठिरं कथं पश्चादनुयास्यामि दासवत् ।**
**कथं भुक्त्वा स्वयं भोगान् दत्वा दायांश्च पुष्कलान् ।।** २४
**नायं क्लीबयितुं कालः संयोद्धुं काल एव नः ।**
**इष्टं मे बहुभिर्यज्ञैर्दत्ता विप्रेषु दक्षिणाः ।।** २७
**गृहे यत्क्षत्रियस्यापि निधनं तद्विगर्हितम् ।**
**अधर्मः सुमहानेष यच्छय्यामरणं गृहे ।।** ३२
**कृपणं विलपन्नार्तो जरयाऽभिपरिप्लुतः ।**
**म्रियते रुदतां मध्ये ज्ञातीनां न स पूरुषः ।।** ३४
**त्यक्त्वा तु विविधान् भोगान् प्राप्तानां परमां गतिम् ।**
**अपीदानीं सुयुद्धेन गच्छेयं यत्सलोकताम् ।।** ३५

शूराणामार्यवृत्तानां संग्रामेष्वनिवर्तिनाम् ।
धीमतां सत्यसन्धानां सर्वेषां क्रतुयाजिनाम् ।। ३६
शस्त्रावभृथपूतानां ध्रुवं वासस्त्रिविष्टपे ।
मुदा नूनं प्रपश्यन्ति युद्धे ह्यप्सरसां गणा ।। ३७
पश्यन्ति नूनं पितरः पूजितान्सुरसंसदि ।
अप्सरोभिः परिवृत्तान्मोदमानांस्त्रिविष्टपे ।। ३८
ये मदर्थे हताः शूरास्तेषां कृतमनुस्मरन् ।
ऋणं तत्प्रतियुञ्जानो न राज्ये मन आदधे ।। ४४

—महाभारत, शल्यपर्व अध्याय ५

सर्व राजांच्या मस्तकांवर प्रखर सूर्याप्रमाणें तळपून आतां मी पांडवांच्या प्रसादानें राज्याचा उपभोग घेऊं काय? स्वतःच्या सामर्थ्यानें अनेक प्रकारचे भोग भोगून व अनेकांना हवें तितकें देऊन आतां मी युधिष्ठिराच्या पाठीमागें एखाद्या दासाप्रमाणें चालू काय? मी अनेक प्रकारचे यज्ञ केले आहेत व विद्वान् ब्राह्मणांना खूप दक्षिणा दिलेली आहे. एखाद्या शूराप्रमाणें लढून मरण्याचा हा काळ आहे. षंढाप्रमाणें शरणागतीचा नव्हे. क्षत्रियानें घरीं शय्येवर मरणें हें निंदास्पद तर आहेच, पण अधर्माचेंही आहे. लाचारीनें विलाप करीत आर्त होऊन, अंगाला कांपरें भरून, आपले ज्ञातिबांधव सभोंवार बसून रडत असतां जो मरतो, त्याला पुरुष म्हणत नाहींत. सर्व प्रकारचे भोग टाकून परम गतीला गेलेल्या अशा शूर, श्रेष्ठ, चारित्र्यसंपन्न संग्रामांत कधींही पाठ न दाखविणाऱ्या, बुद्धिमान्, सत्यसंध व यजनशील अशा लोकांच्या गतीला मी जाईन. शस्त्राच्या अवभृथ स्नानानें पवित्र होऊन जे लोक रणांगणांत मरतात, त्यांना स्वर्गांत चिरकाल स्थान मिळून अप्सरांचे संघ त्यांच्यावर लुब्ध होतात. माझ्यासाठीं मेलेल्या शूरांनीं माझ्यावर जें उपकारांचें ओझें करून ठेविलें आहे, त्यांतून मुक्त होण्यासाठीं मला युद्ध करणेंच आवश्यक आहे.

त्याचें सर्व सैन्य व बांधव मेल्यानंतर एकाकी अवस्थेंत तो डोहांत बसला असतां युधिष्ठिर आपल्या सैनिकांसह व बंधूंसह तीरावर उभा राहून त्याचा ज्या वेळीं उपहास करूं लागला त्या वेळीं त्यानें दिलेलें उत्तरही त्याच्या अलौकिक धैर्याचें द्योतक आहे. तो म्हणतो:

अरथश्चानिषंगी च निहतः पार्ष्णिसारथिः ।
एकश्चाप्यगणः संख्ये प्रत्याश्वासमरोचयम् ।। ३९
न प्राणहेतोर्न भयान्न विषादाद्विशांपते ।
इदमंभः प्रविष्टोऽस्मि श्रमात्त्विदमनुष्ठितम् ।। ४०
त्वं चाश्वसिहि कौन्तेय ये चाप्यनुगतास्तव ।
अहमुत्थाय वः सर्वान्प्रति योत्स्यामि संयुगे ।।४१

—महाभारत, शल्यपर्व अध्याय ३१

"माझ्याजवळ रथ नाहीं, भाते नाहींत, पृष्ठरक्षक व सारथी गेला, अशा स्थितींत माझा सर्वनाश झाल्यावर एकटचा मला जर थोडा वेळ विश्रांति घेणें अवश्य वाटलें तर त्यांत काय आश्चर्य आहे? केवळ श्रमामुळेंच मी येथें बसलों आहें. प्राण वांचवावे म्हणून नव्हे. भय अथवा विषादाचा मला स्पर्शही नाहीं. तूं थोडा वेळ विश्रांति घे, मीही घेतों व नंतर मी एकटा तुम्हां सर्वांशीं लढतों."

पुढें युधिष्ठिरानें वाटेल त्याच्याशीं लढ म्हणून त्याला संधि दिली असतांना त्यानें भीमालाच आव्हान दिलें. बलरामाच्या सूचनेवरून सर्व लोक कुरुक्षेत्राहून स्यमन्तपंचक क्षेत्रास युद्धार्थ जात असतां गदा खांद्यावर घेऊन कृतांताप्रमाणें एकटाच आपल्या गतीनें मदांध गजांनाही लाजवीत तो शत्रूच्या वाहनांची अपेक्षा न करतां पायींच जेव्हां जाऊं लागला, तेव्हां त्याच्या निर्भयतेनें कोणाचें अंतःकरण थरारलें नाहीं? देवांनींदेखील या अलौकिक धैर्यामुळें त्याचे स्तुतिपाठ गायिले असें महाभारतांत वर्णन आहे.

ततो दुर्योधनो राजा प्रगृह्य महतीं गदाम् ।
पद्भ्याममर्षी द्युतिमानगच्छत्पाण्डवैः सह ।। १२
तथाऽऽयान्तं गदाहस्तं वर्मणा चापि दंशितं ।
अन्तरिक्षचरा देवाः साधु साध्वित्यपूजयन् ।। १३
वातिकाश्चारणा ये तु दृष्ट्वा ते हर्षमागताः ।। १४

—महाभारत, शल्यपर्व अध्याय ५५

"मग राजा दुर्योधन हातांत प्रचंड गदा घेऊन तेजानें तळपत पांडवांसहित पायींच जाऊं लागला. तेव्हां कवच अंगांत घातलेल्या

व गदा हातांत असलेल्या त्या धैर्यमूर्तीकडे पाहातांच चारण व सूत तर हर्षित झालेच पण देवही त्याची स्तुति करूं लागले. पुढें भीमानें अधर्मानें त्याच्या मांडीवर आघात करून त्याचा ज्या वेळीं वध केला त्या वेळीं त्याच्या अलौकिक धैर्यानें प्रसन्न होऊन त्यांनीं त्याला वर-दानें तर दिलींच, पण भगवान् श्रीकृष्णही त्याच्या धैर्यानें इतके भारले गेले होते कीं भीमानें त्याच्या मस्तकावर लाथ मारतांच त्याचे गतापराध विसरून त्यांनींही युधिष्ठिराला तसें होऊं दिल्या-बद्दल पुढीलप्रमाणें ठपका दिला आहे:—

**दुर्योधनस्य भीमेन मृद्यमानं शिरः पदा ।**
**उपप्रेक्षसि कस्मात्त्वं धर्मज्ञः सन्नराधिप ।। ३४**

**—महाभारत, शल्यपर्व अध्याय ६०**

भीमानें दुर्योधनाचें मस्तक पायाखालीं तुडविलें ही गोष्ट धर्मज्ञ असूनही तूं कशी सहन केलीस ? श्रीकृष्णांनीं शेवटीं त्याचा उपहास केल्यानंतर त्यानें त्यांना जें बाणेदार उत्तर दिलें आहे तें तर आजही अलौकिक धैर्याचें निदर्शन म्हणून हृत्पटलावर कोरून ठेवण्यासारखें आहे. महाभारतकार म्हणतात:——

**अमर्षवशमापन्न उदतिष्ठद्विशांपते ।**
**स्फिग्देशेनोपविष्टः स दोर्भ्यां विष्टभ्य मेदिनीम् ।। २४**
**दृष्टिं भ्रूसंकटां कृत्वा वासुदेवे न्यपातयत् ।**
**अर्धोन्नतशरीरस्य रूपमासीन्नृपस्य तु ।। २५**
**क्रुद्धस्याशीविषस्येवं छिन्नपुच्छस्य भारत ।**
**प्राणान्तकरिणीं घोरां वेदनामप्यचिन्तयन् ।। २६**
**दुर्योधनो वासुदेवं वाग्भिरुग्राभिरार्दयत् ।**
**कंसदासस्य दायाद न ते लज्जाऽस्त्यनेन वै ।। २७**
**अधर्मेण गदायुद्धे यदहं विनिपातितः ।**
**ऊरू भिन्धीति भीमस्य स्मृतिं मिथ्या प्रयच्छता ।। २८**
**अधीतं विधिवद्दत्तं भूः प्रशास्ता ससागरा ।**
**मूर्ध्नि स्थितममित्राणां को नु स्वन्ततरो मया ।**
**यदिष्टं क्षत्रबन्धूनां स्वधर्ममनुपश्यताम् ।। ५१**

तदिदं निधनं प्राप्तं को नु स्वन्ततरो मया ।
देवार्हा मानुषा भोगाः प्राप्ता असुलभा नृपैः ।। ५२
ऐश्वर्यं चोत्तमं प्राप्तं को नु स्वन्ततरो मया ।
ससुहृत्सानुगश्चैव स्वर्गं गन्ताहमच्युत ।। ५३
यूयं निहतसंकल्पाः शोचन्तो वर्तयिष्यथ ।
न मे विषादो भीमेन पादेन शिर आहतम् ।
काका वा कंकगृध्रा वा निधास्यन्ति पदं क्षणात् ।। ५४
—महाभारत, शल्यपर्व अध्याय ६१

याप्रमाणें कृष्णानें दुर्योधनाचा अधिक्षेप केल्यानंतर मांड्या मोडल्या होत्या तरी रागाच्या भरांत दोन हात भूमीवर टेकून तसाच तो शरीर त्या हातांवर तोलून अर्धवट उठला व भिवई वक्र करून रागानें नेत्र लाल करून श्रीकृष्णाकडे पाहूं लागला. त्याच्या प्राणांतिक वेदनादेखील तो या वेळीं विसरला होता. छिन्नपुच्छ सर्पाप्रमाणें त्याचें त्या वेळचें स्वरूप भयानक होतें. कठोर वाक्यांनीं श्रीकृष्णाला तो म्हणाला : हे कंसाच्या दासाच्या पोरा ! माझा उपहास करतांना तुला लाज वाटत नाहीं काय ? भीमाला माझ्या मांडीवर आघात करण्याचा संकेत करून तूंच अधर्मानें मला मारलें आहेस. या मरणाला दुर्गति म्हणतात काय ? मी अध्ययन केलें, विधिपूर्वक दानें दिलीं, समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य केलें, व शत्रूच्या डोक्यावर पाय देऊन उभा राहिलों. माझ्यासारखें उत्तम मरण कोणाला लाभलें आहे ? क्षत्रियांना युद्धांत स्वधर्मानें लढतांना मरण येणें हेंच प्रशंसनीय आहे. राजांनाही मिळणार नाहींत असे, देवांनाच केवळ योग्य असे विलास मीं भोगले. उत्तम ऐश्वर्यांत मीं नांदलों व आतां सर्व सुहृद व बांधवांसहित स्वर्गास जाणार आहें. माझ्याइतकें चांगलें मरण कोणाला लाभलें ? तुम्ही मात्र विहतसंकल्प होऊन नातलगांच्या आठवणीनें खुशाल रडत बसा. भीमानें माझ्या मस्तकाला पायानें स्पर्श केला याचा मला मुळींच विषाद वाटत नाहीं. कारण थोड्याच वेळांत कावळे व गिधाडें माझ्या शरीराला स्पर्श करणार आहेतच !

जेथें लोकांनीं थरकांपावें तेथें 'अकुतोभय' वृत्ति दाखविणाऱ्या त्याच्या या असामान्य धैर्यानेंच त्याला सद्‌गति मिळालेली आहे. स्वर्गारोहणपर्वांत नारद युधिष्ठिराला सांगतांना म्हणतात :

दुर्योधनं प्रति नृपं शृणु चेदं वचो मम ॥ १२
एष दुर्योधनो राजा पूज्यते त्रिदशैः सह । १३
स एव क्षत्रधर्मेण स्थानमेतदवाप्तवान् ।
भये महति योऽभीतो बभूव पृथिवीपतिः ॥ १५

—महाभारत, स्वर्गारोहणपर्व अध्याय १

"हे राजा ! दुर्योधनाची देव प्रशंसा करीत आहेत व त्यानें हें जें स्थान मिळविलें त्याचें कारण ऐक. त्यानें क्षात्रधर्मानें हें स्थान मिळविलें आहे.

महान् भयाचा प्रसंग उत्पन्न झाला तरी त्याची निर्भय मृत्युंजय वृत्ति टिकून राहिली म्हणून तो या पदावर आला.

याप्रमाणें अलौकिक, धैर्यसंपन्न असूनही अभिलाषा, क्षुद्रता, क्रोध, मत्सर, महत्त्वाकांक्षा, अधमपणा, अनीतिमत्ता, दंश ठेवण्याची गर्ह्य वृत्ति इत्यादि अनेक मानवतेला कलंक फांसणाऱ्या दुर्गुणांमुळें महाभारतकारांच्या मतें 'राजकलि दुर्योधन' हा 'कलीचाच अंश' ठरला आहे. त्याला स्वर्गांत भलेंही स्थान मिळो. पण धर्म, न्याय व संस्कृति यांच्या शाश्वत मूल्यांच्या दृष्टीनें असे राजकलि वध्यच होत हें निर्विवाद आहे. भारतकालीन राज्यसंस्थेचें महर्षींनीं धृतराष्ट्र व दुर्योधनाच्या रूपानें चित्रित केलेलें हें अधःपतित स्वरूप सचिवसंस्थेच्या निरीक्षणाशिवाय पुरें होणार नाहीं. दुःशासन, शकुनि व कर्ण यांच्या रूपानें या सचिवसंस्थेचें अधःपतित स्वरूप महर्षींनीं रेखाटलें आहे तें आपण पुढच्या व्याख्यानांत पाहूं.

---

# १३. दु:शासन व शकुनि

दुर्योधनाच्याबरोबर जीं नांवें उच्चारलीं जातात त्यांत दु:शासन हें नांव नेहमींच उच्चारलें जातें. तो दुर्योधनाचा धाकटा बंधु होता. तसेंच दुर्योधन, दु:शासन, शकुनि व कर्ण या सुप्रसिद्ध चांडाळ चौकडीचा तो एक सभासद होता. दुर्योधनावर त्याचें अपरंपार प्रेम आहे. राजा धृतराष्ट्रानें घोषयात्रेंतील फजितीनंतर दुर्योधन ज्या वेळीं प्रायोपवेशन करून दु:शासनाला राज्य घेण्याचा आग्रह करूं लागला त्या वेळीं दु:शासनानें मोठा शोक करून त्याच्यावांचून राज्य घेण्याचें नाकारलें. त्याचें बंधुप्रेम चांगलेंच तीव्र असून दुर्योधनाच्या प्रत्येक कृत्यांत एखाद्या छायेप्रमाणें तो त्याचा अनुचर राहिलेला आहे. दुर्योधन ज्या वेळीं प्रायोपवेशन करून राज्य घेण्याचा दु:शासनाला आग्रह करूं लागला त्या प्रसंगाचें वर्णन महाभारतकारांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे:—

तस्य तद्वचनं श्रुत्वा दीनो दु:शासनोऽब्रवीत् ।
अश्रुकण्ठः सुदु:खार्तः प्राञ्जलिः प्रणिपत्य च ।। २८
सगद्गदमिदं वाक्यं भ्रातरं ज्येष्ठमात्मनः ।
प्रसीदेत्यपतद् भूमौ दूयमानेन चेतसा ।। २९
दु:खितः पादयोस्तस्य नेत्रजं जलमुत्सृजन् ।
उक्तवांश्च नरव्याघ्रो नैतदेवं भविष्यति ।। ३०
विदीर्येत् सकला भूमिर्द्यौश्चापि शकलीभवेत् ।
रविरात्मप्रभां जह्यात् सोमः शीतांशुतां त्यजेत् ।। ३१
वायुः शघ्र्यमथो जह्याद्धिमवांश्च परिव्रजेत् ।
शुष्येत् तोयं समुद्रेषु वह्निरप्युष्णतां त्यजेत् ।। ३२
न चाहं त्वदृते राजन् प्रशासेयं वसुन्धराम् ।
पुनः पुनः प्रसीदेति वाक्यं चेदमुवाच ह ।। ३३
त्वमेव नः कुले राजा भविष्यसि शतं समाः ।
एवमुक्त्वा स राजानं सुस्वरं प्ररुरोद ह ।। ३४
पादौ संस्पृश्य मानार्हौ भ्रातुर्ज्येष्ठस्य भारत ।

—महभारत, वनपर्व अध्याय २४९

---

व्याख्यान १३ वें, दि. ८ एप्रिल १९५१.

दुर्योधनाचें भाषण ऐकून दीन व दुःखानें आतुर झालेला दुःशासन सद्गदित होऊन, हात जोडून व नमस्कार करून भरल्या कंठानें प्रसन्न हो म्हणून आपल्या भावाची प्रार्थना करूं लागला. आपल्या डोळ्यांतील पाण्यानें त्यानें आपल्या ज्येष्ठ बंधूच्या पायावर अभिषेक केला व असें होणार नाहीं असें तो म्हणाला. पृथ्वी विदीर्ण होईल, द्युलोकाचे तुकडे पडतील, सूर्य आपलें तेज सोडील, अथवा चंद्र शीतलतेचा परित्याग करील, वायु गतीचा परित्याग करील, अग्नि आपली उष्णता टाकील, समुद्राचें पाणी आटेल, अथवा हिमाचल चालू लागेल, पण हे राजन् ! मी तुझ्या वांचून या पृथ्वीचें राज्य कधींही करणार नाहीं. तूं माझ्यावर प्रसन्न हो. तूंच आमच्या कुळांत दीर्घकाळपर्यंत राज्य कर ! असे म्हणून आपल्या ज्येष्ठ बंधूचे पाय धरून तो गळा काढून जोरजोरानें रडूं लागला.

## बालिशता

दुःशासन हा पूर्णपणें परतंत्र बुद्धीचा असून जें जें दुर्योधन म्हणेल तें तें त्याच्यापेक्षां सवाईनें करून दाखवावें ही त्याची प्रवृत्ति होती. एक प्रकारचा पोरकटपणा त्याच्या वागण्यांत सर्वत्र दिसून येतो. या पोरकटपणाच्या जोडीलाच औद्धत्यही आहे. कसलेंही धोरण अथवा शहाणपणाचा अंशदेखील त्याच्या ठिकाणीं असल्याचें दिसून येत नाहीं. त्याच्या या पोरकटपणाचें महाभारताच्या वनपर्वांत एक उदाहरण आलेलें आहे. दुर्योधनानें कर्णाच्या दिग्विजयानंतर विष्णुयाग केला त्यावेळीं कोणालाच न कळवितां दुःशासनानें एक दूत हेतुतः चिडविण्यासाठीं पांडवांकडे पाठविला. भारतकार म्हणतातः—

**तत्र कश्चित् प्रयातं तु दूतं दुःशासनोऽब्रवीत् ॥ ७**
**गच्छ द्वैतवनं शीघ्रं पाण्डवान् पापपूरुषान् ।**
**निमन्त्रय यथान्यायं विप्रांस्तस्मिन् वने तदा ॥ ८**

**—महाभारत, वनपर्व अध्याय** २५६

या दूत पाठविण्यांत बालिशतेशिवाय दुसरें काय असूं शकेल ? कारण पाण्डवांना त्यांत चीड आणण्यासारखें कांहींही नव्हतें. नुकतेंच त्यांच्या कृपाप्रसादावर जीवदान मिळालेल्या लोकांनीं द्युताच्या

पौरुषहीन मार्गानें मिळविलेल्या धनानें केवढाही यज्ञ केला तरी त्यांत पाण्डवांना कमीपणा येण्याचें कांहींच कारण नाहीं. ही साधी गोष्ट ओळखण्याइतकी देखील त्याच्यांत बुद्धिमत्ता नव्हती. तो एक दुर्योधनाची छाया आहे इतकेंच. कदाचित् तो एखाद्या महापुरुषाच्या सहवासांत असता तर अद्वितीय बंधु म्हणून भारतवर्षाच्या इतिहासांत वाखाणण्यांतही आला असता. कारण त्याच्यासारखे लतावृत्तीचे लोक ज्या व्यक्तित्वाच्या वृक्षाच्या आश्रयानें असतात त्यांच्यावरच त्यांच्या वाढीची दिशा अवलंबून असते. जितक्या निष्ठेनें त्यानें दुर्योधनाचीं दुष्कृत्यें पार पाडलीं, तितक्याच निष्ठेनें युधिष्ठिरासारखा बंधु त्याला मिळता तर त्यानें सत्कृत्येंही पार पाडलीं असतीं. पण एका कलिपुरुषाच्या छायेंत कांहीं तरी अधिक करून दाखविण्याच्या मूर्खपणास भरीस पडून त्याच्या हातून अनन्वित कृत्यें झालीं आहेत. दुर्योधनानें त्याचा आपल्या दुर्वासना शमविणाचें साधन म्हणून उपयोग करून घेतला व तो कमालीचा निर्लज्ज असल्यामुळें त्यानें तो तसा होऊंही दिला. त्याला त्यांत एक प्रकारचा आनंदच वाटत होता. धृष्टतेंत, निर्लज्जपणांत, औद्धत्यांत, व बालिशतेंत रममाण होण्याची कमालीची मानसिक विकृति त्याच्या रूपानें महर्षीनीं रेखाटली आहे. त्याच्या घोर अपकृत्यांनीं भारताच्या युद्धाला रौद्रता उत्पन्न झालेली आहे व शेवटीं भीमासारख्या पुरुषाला त्याच्या रक्तप्राशनासारखें भीषण कृत्य करण्यावांचून गत्यंतर उरलेलें नाहीं. त्याच्या या विकृतीचा कळस म्हणजे द्रौपदीवस्त्रहरणाचें प्रकरण होय. निर्लज्जता, अधमपणा, त्याच्या त्या वेळच्या वर्तनांत जणूं कीं काय उफाळून उठलेला आहे. महाभारतकारानीं त्याच्या अधमपणाचीं चित्रें पुढीलप्रमाणें रेखाटलीं आहेत :—

**दुःशासनैष मम सूतपुत्रो वृकोदराद्बुद्विजतेऽल्पचेताः ।**
**स्वयं प्रगृह्यानय याज्ञसेनीं किं ते करिष्यन्त्यवशाः सपत्नाः ।। २५**
**ततः समुत्थाय स राजपुत्रः श्रुत्वा भ्रातुः शासनं रक्तदृष्टिः ।**
**प्रविश्य तद्वेश्म महारथानामित्यब्रवीद् द्रौपदीं राजपुत्रीम् ।। २६**
**एह्येहि पाञ्चालि जितासि कृष्णे दुर्योधनं पश्य विमुक्तलज्जा ।**
**कुरून्भजस्वायतपत्रनेत्रे धर्मेण लब्धासि सभां परैहि ।।२७**

ततः समुत्थाय सुदुर्मना सा विवर्णमामृज्य मुखं करेण ।
आर्ता प्रदुद्राव यतः स्त्रियस्ता वृद्धस्य राज्ञः कुरुपुङ्गवस्य ।। २८
ततो जवेनाभिससार रोषाद्दुःशासनस्तामभिगर्जमानः ।
दीर्घेषु नीलेष्वथ चोर्मिमत्सु जग्राह केशेषु नरेंद्रपत्नीम् ।। २९
ये राजसूयावभृथे जलेन महाक्रतौ मन्त्रपूतेन सिक्ताः ।
ते पाण्डवानां परिभूय वीर्यं बलात्प्रमृष्टा धृतराष्ट्रजेन ।।३०
स तां पराकृष्य सभासमीपमानीय कृष्णामतिदीर्घकेशीम् ।
दुःशासनो नाथवतीमनाथवच्चकर्ष वायुः कदलीमिवार्ताम् ।।३१
सा कृष्यमाणा नमिताङ्गयष्टिः शनैरुवाचाथ रजस्वलाऽस्मि ।
एकं च वासो मम मन्दबुद्धे सभां नेतुं नार्हसि मामनार्य ।।३२
ततोऽब्रवीत्तां प्रसभं निगृह्य केशेषु कृष्णेषु तदा स कृष्णाम् ।
कृष्णं च जिष्णुं च हरिं नरं च त्राणाय विक्रोशति याज्ञसेनी ।। ३३

दुःशासन उवाच ।

रजस्वला वा भव याज्ञसेनि एकाम्बरा वाप्यथवा विवस्त्रा ।
द्यूते जिता चासि कृतासि दासी दासीषु वासश्च यथोपजोषम् ।। ३४
दुःशासनश्चापि समीक्ष्य कृष्णामवेक्षमाणां कृपणान्पतींस्तान् ।
आधूय वेगेन विसंज्ञकल्पामुवाच दासीति हसन्स शब्दम् ।। ४४

—महाभारत, सभापर्व अध्याय ६७

"दुर्योधन दुःशासनाला म्हणाला : हा सूतपुत्र भीमाला भितो आहे. तूं स्वतःच जाऊन बलात्कारानें द्रौपदीला सभेंत घेऊन ये. आपल्या स्वाधीन असलेले हे शत्रू आपल्याला काय करणार आहेत? ज्येष्ठ बंधूची ही आज्ञा ऐकतांच नेत्र लाल करून तो राजपुत्र अंतः-पुरांत गेला व द्रौपदीला म्हणाला : हे पांचालि! माझ्याबरोबर चल आम्हीं तुला जिंकलें आहे. लाज सोडून दुर्योधनाला पहा. व हे कमलनेत्रे! कुरूंची सेवा कर. धर्मानें तूं आमची झाली आहेस. सभेंत चल. हें ऐकतांच अत्यंत कष्टी होऊन द्रौपदीचा चेहरा पांढरा पडला. दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेऊन वृद्ध कौरव स्त्रिया जेथें होत्या तिकडे ती जाऊं लागली. त्याबरोबर रागानें गर्जना करीत दुःशासन वेगानें तिच्या मागोमाग धांवला व त्यानें तिचे दीर्घ, कुरळे काळे केस धरून तिला ओढलें. राजसूय यज्ञांत ज्या केंसावर मंत्रपूत

जलांचा अभिषेक झाला, ते केस पांडवांच्या पराक्रमाचा अवमान करून दुःशासनानें बलात्कारानें हातांत घेतले. वायूनें ज्याप्रमाणें कदलीला त्रास द्यावा त्याप्रमाणें द्रौपदीला ओढीत दुःशासन सभेच्या जवळ आला व एखाद्या अनाथ स्त्रीप्रमाणें त्या सम्राज्ञीला तो सभेंत नेण्यासाठीं जोरानें ओढूं लागला. याप्रमाणें ओढली जात असतां द्रौपदी त्याला म्हणाली, हे मूर्ख अनार्या, मी रजस्वला असून एकवस्त्रा आहे. अशा स्थितींत मला सभेंत नेऊं नकोस. त्याबरोबर तिचे केस अधिकच बळकट धरून तिला खेंचीत दुःशासन तिला म्हणाला: तूं रजस्वला अस, एकवस्त्रा अस, अथवा विवस्त्र असलीस तरी चालेल. आम्ही तुला द्यूतांत जिंकलें आहे. आम्ही तुला दासी केलें आहे व दासीला वस्त्र असावें कीं नसावें हें ठरविणें तिच्या धन्याच्या इच्छेवर अवलंबून आहे. सभेंत खेंचली जाणारी द्रौपदी आपल्या पतीकडे जेव्हां आर्त दृष्टीनें पाहूं लागली, तेव्हां दुःशासनानें तिला पुनःश्च जोरानें खेंचली. शरीराला व मनाला होणाऱ्या वेदनांनीं ती ज्या वेळीं मूर्छित होण्याच्या अवस्थेंत आली त्या वेळीं गर्जना करून दुःशासन पुनः पुन्हां तिला दासी म्हणूं लागला." कुलस्त्रीच्या अंगावर हात टाकून आपल्या वडीलधाऱ्या लोकांसमक्ष याप्रमाणें तिची अप्रतिष्ठा करणाऱ्या व्यक्तीला जगांत अकार्य असें काय असणार आहे? सारी अकार्यें करावयास तो अगदीं योग्य पुरुष आहे असें समजूनच कर्णानें द्रौपदीचें वस्त्र हिरावून घेण्याची त्याला आज्ञा केली. महाभारतकार म्हणतात:

**ततो दुःशासनो राजन्द्रौपद्या वसनं बलात् ।**
**सभामध्ये समाक्षिप्य व्यपाक्रष्टुं प्रचक्रमे ।। ४०**

—महाभारत, सभापर्व अध्याय ६८

भर सभेमध्यें दुःशासन द्रौपदीचें वस्त्र ओढूं लागला. या वेळीं द्रौपदी त्याच्या समजुतीप्रमाणें दासी तरी होती अर्थात् दासीच्याही संबंधीं असें वर्तन क्षम्य मानलें जात नाहीं हें वेगळें. पण त्याचा निलाजरेपणा इतक्या परमावधीला पोहोंचलेला आहे कीं दास्यांतून मुक्त होऊन पांडव ज्या वेळीं दुसऱ्या द्यूतानंतर वनवासी होऊन अरण्यांत जाऊं लागले त्या वेळीं पुनश्च त्यानें द्रौपदीचा असाच घोर

अपमान करून सहसा राजपुरुषांना न शोभणारें अधमपणाचें वर्तन पाण्डवांशीं केलें आहे. महाभारतकार म्हणतात :—

**महाप्राज्ञः सौमकिर्यज्ञसेनः कन्यां पाञ्चालीं पाण्डवेभ्यः प्रदाय ।**
**अकर्षीद्वै सुकृतं नेह किंचित् क्लीबाः पार्थाः पतयो याज्ञसेन्याः ॥ १०**
**सूक्ष्मप्रावारानजिनोत्तरीयान् दृष्ट्वारण्ये निर्धनानप्रतिष्ठान् ।**
**कां त्वं प्रीतिं लप्स्यसे याज्ञसेनि पतिं वृणोष्वेह यमन्यमिच्छसि ॥११**
**एवं ब्रुवाणमजिनैर्विवासितं दुःशासनस्तं परिनृत्यति स्म ।**
**मध्ये कुरूणां धर्मनिबद्धमार्गं गौर्गौरिति स्माह्वयन्मुक्तलज्जः ॥ १९**

—महाभारत, सभापर्व अध्याय ७७

"पंचालराज यज्ञसेन हा शहाणा असतांही षंढ पाण्डवांना द्रौपदी देऊन त्यानें मोठी चूकच केलेली आहे. या निर्धन पाण्डवांच्या पाठोपाठ जाऊन द्रौपदी, तुला कोणतें सुख मिळणार! त्यापेक्षां तूं दुसरा एकादा पति कर. नंतर तो सर्व कौरवांच्यासमोर गाय, गाय, म्हणून मुक्तलज्ज स्थितींत भीमासमोर नाचून दाखवूं लागला." पण त्यानें सापाच्या शेपटीवर पाय दिला होता. त्याचें उग्र फळ त्याला मिळालें. ज्या कर्णाच्या भरंवशावर त्यानें हें कुकृत्य केलें होतें त्या कर्णासमोरच भीमसेनानें पुढें युद्धांत त्याचे हालहाल करून त्याला ठार मारलें. ज्या हातानें त्यानें द्रौपदीची ही अप्रतिष्ठा केली होती तो हात भीमानें उखडून काढला व त्या हातानेंच त्याला झोडपून यमसदनास पाठविलें. मृत्यू देखील अशा नीचांना पुरेशी शिक्षा देऊं शकत नाहीं. ठार मारूनही भीमसेनाचें समाधान होईना. त्याच्या ज्या कंठनालांतून महापतिव्रता द्रौपदीला उद्देशून 'दासी' असे हीन शब्द निघाले तो चिरून त्यांतील उष्ण रक्ताचें कारंजें भीमानें रणभूमीवर उडविलें. व पुन्हां पुन्हां तो कंठनाल फोडून त्यांतील उष्ण रक्त ओठांना लावूनही तो अतृप्तच राहिला. तात्पर्य, दुःशासन ही दुर्योधनरूपी कलिपुरुषाची छाया असून लतावृत्ति, कसलेंही कुकर्म करण्याची सिद्धता, औद्धात्य, धृष्टता व बालिशता यांचा तो मूर्त आविष्कार होय. पण दुर्योधनाच्या सचिवांत व परिवारांत दुःशासन हा जर उघड दुष्ट असेल तर शकुनि हा खल पुरुषांच्या विशिष्ट गूढतेचा नमुना

म्हणतां येईल. कोणतीही गोष्ट आपण प्रेरिल्यामुळें झालेली आहे असें मुळींच न दाखवितां ती घडविण्याचें त्याचें कसब असामान्य आहे. राजा धृतराष्ट्राइतका तो चतुर नसला तरी त्याचे मार्ग धृतराष्ट्राच्या मार्गाप्रमाणेंच गूढ आहेत. द्यूत त्यानेंच केलें असलें तरी प्रत्यक्ष दुर्योधनालाही शकुनीनें प्रोत्साहित केलें म्हणून आपण द्यूत खेळलों असें म्हणतां आलें नसतें. उलट हालवून खुंटा बळकट करावा या न्यायानें त्यानें दुर्योधन आपल्या निश्चयावर किती स्थिर आहे याचा निश्चित शोध घेऊन नंतरच द्यूताचें सूतोवाच केलें आहे.

## गांधारराज शकुनि

गांधारराज शकुनि हा जरी गांधारांचा राजा असला तरी दुर्योधनाच्या परिवारांतच तो नित्य राही. गांधारी व शकुनि हीं दोन अपत्यें एकाच कुळांतील असूनही एक व्यक्ति मानवजातीचा सदाचा अलंकार होऊन बसली तर दुसरी सर्व प्रकारच्या कापटयाचा केवळ अर्क होऊन राहिली. एकाच वेलीवरचें एक अमृतफळ आहे. तर दुसरें विषफळ आहे. तो द्यूतविद्येंत अत्यंत प्रवीण होता. पण आपण दुर्योधनाला द्यूत खेळावयास लाविलें असें प्रत्यक्ष त्यालाही म्हणतां येऊं नये याची काळजी घेऊनच आपल्या कारस्थानास त्यानें सुरुवात केली आहे. राजसूयावरून परत येतांना दुर्योधन ज्या वेळीं पांडवांविषयींच्या आपल्या मर्यादातीत मत्सराचें प्रदर्शन करूं लागला त्या वेळीं याचें अंतःकरण क्षत्रियाप्रमाणें पराक्रम करून संपत्ति मिळविण्याइतकें तेजस्वी आहे कीं हज्या त्या क्षुद्र मार्गानें हा जावयास सिद्ध आहे हें पहाण्याआधीं द्यूतासारख्या हीन मार्गाचा प्रस्ताव करणें त्याला सुरक्षित वाटलें नाहीं. म्हणून त्यानें त्याची परीक्षा घेण्याच्या हेतूनें अत्यंत धूर्ततेचें भाषण केलें आहे. तो म्हणतो :—

> दुर्योधन न तेऽमर्षः कार्यः प्रति युधिष्ठिरम् ।
> भागधेयानि हि स्वानि पाण्डवा भुञ्जते सदा ॥ १
> विधानं विविधाकारं परं तेषां विधानतः ।
> अनेकैरभ्युपायैश्च त्वया न शकिताः पुरा ॥ २

आरब्धापि महाराज पुनःपुनररिंदम ।
विमुक्ताश्च नरव्याघ्रा भागधेयपुरस्कृताः ॥ ३
तैर्लब्धा द्रौपदी भार्या द्रुपदश्च सुतैः सह ।
सहायः पृथिवीलाभे वासुदेवश्च वीर्यवान् ॥ ४
लब्धश्चानभिभूतार्थैः पित्र्यंशः पृथिवीपते ।
विवृद्धस्तेजसा तेषां तत्र का परिदेवना ॥ ५
धनंजयेन गाण्डीवमक्षय्यौ च महेषुधी ।
लब्धान्यस्त्राणि दिव्यानि तोषयित्वा हुताशनम् ॥ ६
तेन कार्मकमुख्येन बाहुवीर्येण चात्मनः ।
कृता वशे महीपालास्तत्र का परिदेवना ॥ ७
अग्निदाहान्मयं चापि मोक्षयित्वा सदानवम् ।
सभां तां कारयामास सव्यसाची परंतपः ॥ ८
तेन चैव मयेनोक्ताः किंकरा नाम राक्षसाः ।
वहन्ति तां सभां भीमास्तत्र का परिदेवना ॥ ९
यच्चासहायतां राजन्नुक्तवानसि भारत ।
तन्मिथ्या भ्रातरो हीमे तव सर्वे वशानुगाः ॥ १०
द्रोणस्तव महेष्वासः सहपुत्रेण वीर्यवान् ।
सूतपुत्रश्च राधेयो गौतमश्च महारथः ॥ ११
अहं च सह सोदर्यैः सौमदत्तिश्च पार्थिवः ।
एतैस्त्वं सहितः सर्वैर्जय कृत्स्नां वसुंधराम् ॥ १२

—महाभारत, सभापर्व अ. ४८

"हे दुर्योधना ! तूं युधिष्ठिराचा मत्सर करणें योग्य आहे असें मला वाटत नाहीं. पाण्डव आपल्या भाग्यानेंच ऐश्वर्यास चढले आहेत. तूं अनेक उपायांनीं त्यांना मारण्याचे आजवर प्रयत्न केलेस पण ते सर्व फसून आपल्या भाग्यानें ते वैभवास चढले. त्यांना द्रौपदीसारखी पत्नी मिळाली, मोठमोठ्या राजांचें साहाय्य मिळालें, श्रीकृष्णासारखा समर्थ सहकारी मिळाला, व त्यांनीं स्वतःचें हक्काचें राज्य स्वसामर्थ्यानें वाढविलें. अर्जुनाला अग्नीच्या प्रसादानें दिव्य अस्त्रें व गाण्डीवासारखें श्रेष्ठ धनुष्य मिळून त्यानें आपल्या कर्तृत्वानें सर्व पृथ्वी जिंकली. त्यानें आपल्याच कर्तृत्वानें शिल्पकार मय दानवाला

उपकारबद्ध करून उत्कृष्ट मयसभा निर्माण केली. आपल्या कर्तृत्वानें याप्रमाणें अपार ऐश्वर्य मिळवून भाग्यास चढलेल्या लोकांचा नुसता मत्सर करून उपयोग काय? तूंही कांहीं असहाय नाहींस. तुझेही सर्व भ्राते तुझ्या स्वाधीन आहेत. अश्वत्थामा व महापराक्रमी द्रोणाचार्य, महारथी कृपाचार्य व कर्ण हे तुझे सहायक आहेत. मीही तुझें साहाय्य करावयास सिद्ध आहे. नुसता मत्सर करून स्वतःला त्रास करून घेण्याऐवजीं तूं विजय संपादन करून ऐश्वर्यसंपन्न कां होत नाहींस ?"

हें नुसतें भाषण वाचून कोणालाही शकुनीनें केवळ सद्बुद्धीनेंच भाषण केलें आहे असें वाटेल, पण वास्तविक तें तसें नाहीं. त्यानें हा प्रस्ताव करतांच दुर्योधन त्याला असें म्हणूं लागला कीं, सर्व सहायकांसह जग जिकण्याचा स्वतंत्र उद्योग करण्यापेक्षां पाण्डवच आज जगाचे धनी असल्यामुळें त्यांनाच जर जिंकलें तर अनायासेंच जग जिकल्यासारखें होईल. त्यावर शकुनीनें ज्या धूर्ततेनें द्यूताचा प्रस्ताव केलेला आहे तो पाहिला म्हणजे त्याचें वरील भाषण त्याच्या पुढच्या कौटिल्याची नांदी वाटल्यावांचून राहात नाहीं. तो म्हणतो :

**धनंजयो वासुदेवो भीमसेनो युधिष्ठिरः ।**
**नकुलः सहदेवश्च द्रुपदश्च सहात्मजैः ।। १५**
**नैते युधि पराजेतुं शक्या देवगणैरपि ।**
**महारथा महेष्वासाः कृतास्त्रा युद्धदुर्मदाः ।। १६**
**अहं तु तद्विजानामि विजेतुं येन शक्यते ।**
**युधिष्ठिरं स्वयं राजंस्तन्निबोध जुषस्व च ।। १७**

दुर्योधन उवाच ।

**अप्रमादेन सुहृदामन्येषां च महात्मनाम् ।**
**यदि शक्या विजेतुं ते तन्ममाचक्ष्व मातुल ।। १८**

शकुनिरुवाच ।

**द्यूतप्रियश्च कौन्तेयो न स जानाति देवितुम् ।**
**समाहूतश्च राजेन्द्रो न शक्ष्यति निवर्तितुम् ।। १९**
**देवने कुशलश्चाहं न मेस्ति सदृशो भुवि ।**
**त्रिषु लोकेषु कौरव्य तं त्वं द्यूते समाह्वय ।। २०**

तस्याक्षकुशलो राजन्नामस्येहमसंशयम् ।
राज्यं श्रियं च तां दीप्तां त्वदर्थं पुरुषर्षभ ।। २१
इदं तु सर्वं त्वं राज्ञे दुर्योधन निवेदय ।
अनुज्ञातस्तु ते पित्रा विजेष्ये तान्न संशयः ।। २२

—महाभारत सभापर्व अध्याय ४८

"हे दुर्योधना ! धनंजय, वासुदेव, भीमसेन, युधिष्ठिर नकुल, सहदेव, व आपल्या मुलांसहित द्रुपद यांचा पराभव देवांनादेखील करतां येणें शक्य नाहीं. हे सर्व महारथी असून कृतास्त्र व खंदे लढवय्ये आहेत. युधिष्ठिराला कसें जिकावें तें मला माहीत आहे. तुझी सिद्धता असेल तर मी सांगतों.

"दुर्योधनानें त्याला म्हटलें कीं, आपल्यापैकीं कोणाचा विनाश न होतां असा कांहीं उपाय असला तर सांग.

"त्यावर शकुनि म्हणालाः युधिष्ठिर द्यूतप्रिय असून त्याला द्यूत कसें खेळावें तें मात्र माहीत नाहीं व आव्हान दिलें तर तें नाकारतां येणें त्याला शक्य होणार नाहीं. मी अत्यंत कुशल द्यूतकार असून त्रैलोक्यांत माझ्यासारखा कुशल द्यूतकार नाहीं. तूं त्याला आव्हान दे. त्याची सर्व राज्यलक्ष्मी मी द्यूतांत जिंकून तुझ्या स्वाधीन करतों. मात्र तूं आपल्या पित्याची संमति घे."

किती खुबीनें शकुनीनें द्यूताची प्रस्तावना केलेली आहे ! जणूं कीं काय केवळ दुर्योधन म्हणतो म्हणूनच त्याला आतां द्यूत खेळावें लागणार आहे. तात्पर्य तो अत्यंत सावध आहे. दुराचारांतलें प्रत्येक पाऊल टाकतांना दुर्योधनाच्या अंतःकरणाचा ठाव घेत त्यानें तें टाकलेलें आहे. एरवीं त्याच्या दुष्टतेचें वर्णन करतांना द्रौपदीची अप्रतिष्ठा करण्याच्या दुःशासनाच्या कामगिरीबद्दल त्यानें त्याचें अभिनंदन केल्याचें महाभारतांत स्पष्ट उल्लेखिलें आहे.

गान्धारराजः सुबलस्य पुत्रस्तथैव दुःशासनमभ्यनन्दत् ।। ४५

—महाभारत, सभापर्व अध्याय ६७

राजसत्तेला आपल्या कच्छपीं लावन तिच्या सूत्रचालकांना त्यांचे वाटणारें प्रत्येक श्रेय आपल्यामुळेंच झालेलें आहे असें दाख-

विण्याची जी कांहीं लोकांची विशिष्ट पद्धति असते तिचें शकुनि हें निदर्शनच होय. पाण्डवांनीं घोषयात्रेंत दुर्योधनाला जीवदान दिल्यानंतर दुर्योधनाच्या अंतःकरणांत त्यांच्याविषयीं कृतज्ञेचे भाव उत्पन्न झाले आहेत कीं काय हें पाहण्यासाठीं त्यानें त्यास पाण्डवांशीं शक्यतर सौभ्रात्र राखून आपली कीर्ति व यश वाढविण्याचा उपदेश केलेला आहे. तो म्हणतोः

**यत्र हर्षस्त्वया कार्यः सत्कर्तव्याश्च पाण्डवाः ।**
**तत्र शोचसि राजेंद्र विपरीतमिदं तव ।। ७**
**प्रसीद मा त्यजात्मानं तुष्टश्च सुकृतं स्मर ।**
**प्रयच्छ राज्यं पार्थानां यशो धर्ममवाप्नुहि ।। ८**
**क्रियामेतां समाज्ञाय कृतज्ञस्त्वं भविष्यसि ।**
**सौभ्रात्रं पाण्डवैः कृत्वा समवस्थाप्य चैव तान् ।। ९ ।।**
**पित्र्यं राज्यं प्रयच्छैषां ततः सुखमवाप्स्यसि ।**

—महाभारत, वनपर्व अध्याय २५१

"जेथें तूं आनंदित होऊन पाण्डवांचा सत्कार करावा तेथें तूं शोक करीत आहेस हें किती विपरीत आहे? आपला जीव देऊं नकोस. तो वांचल्याबद्दल आनंद मान. पाण्डवांना राज्य दे. स्वतःचें तुला कांहीं द्यावयाचें आहे असें मुळींच नाहीं. या उपकाराच्या जाणिवेनें त्यांच्या पित्याचाच अंश त्यांना देऊन तूं कृतज्ञताबुद्धि प्रकट केलीस तर त्यांत तुझीच कीर्ति वाढणार आहे." शकुनीची कृतज्ञताबुद्धि हें बोलत नसून पाण्डवांनीं केलेल्या उपकाराच्या जाणिवेनें लज्जित होऊन जीव द्यावयास निघालेल्या दुर्योधनाच्या अंतःकरणांतील खळबळीचें संपूर्ण ज्ञान व्हावें म्हणून शकुनीनें चातुर्यानें योजिलेली ही एक 'मधुजिव्ह' युक्ति आहे. जर त्याच्या अंतःकरणांत खरोखरी सद्वासनांचा अंश असता तर त्यानें द्यूताची कल्पना काढण्याऐवजीं दुर्योधनाला स्वतंत्रपणें दिग्विजयासच प्रोत्साहन दिलें असतें किंवा युधिष्ठिराशीं सख्य करून त्याच्या साहाय्यानें आपलें ऐश्वर्य वाढविण्याविषयीं प्रोत्साहित केलें असतें. या दुसऱ्या प्रकरणीं देखील घोषयात्रेच्या निमित्तानें पाण्डवांचा उपहास करून त्यांत आनंद मानण्याची क्षुद्र कल्पना शकुनीच्याच अंतःकरणांत उत्पन्न झालेली आहे. महाभारतांत त्याचें पुढीलप्रमाणें वर्णन आहेः—

धृतराष्ट्रस्य तद्वाक्यं निशम्य शकुनिस्तदा ।
दुर्योधनमिदं काले कर्णेन सहितोऽब्रवीत् ॥ १
यैः स्म ते नाद्रियेताज्ञा न च ये शासने स्थिताः ।
पश्यामस्तान् श्रिया हीनान् पाण्डवान् वनवासिनः ॥ १२
स्थितो राज्ये च्युतान्राज्याच्छ्रिया हीनाञ्छ्रिया वृतः ।
असमृद्धान समृद्धार्थः पश्य पाण्डुसुतान् नृप ॥ १५
सुवाससो हि ते भार्या वल्कलाजिनसंवृताम् ।
पश्यन्तु दुःखितां कृष्णां सा च निर्विद्यतां पुनः ॥२१
विनिन्दतां तथाऽऽत्मानं जीवितं च धनच्युतम् ।
न तथा हि सभामध्ये तस्या भवितुमर्हति ।
वैमनस्यं यथा दृष्ट्वा तव भार्याः स्वलङ्कृताः ॥ २२

—महाभारत, वनपर्व अध्याय २३७

"धृतराष्ट्राचें वाक्य ऐकून शकुनि कर्णासहित त्याला म्हणाला कीं तुझी आज्ञा न ऐकणारे व तुझ्या नियंत्रणांत नसलेले पाण्डव आज धनहीन झालेले आहेत. त्यांच्या या दीन वनवासी अवस्थेंत आपण जर त्यांना पाहूं शकलों तर फार चांगलें होईल. मला वाटतें आपण वनांत पाण्डव आहेत तेथें जावें. तूं राज्यावर आहेस, ते राज्यभ्रष्ट झाले आहेत. तूं वैभवसंपन्न आहेस, ते धनहीन आहेत. तुझ्या सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या आहेत, त्यांचे सर्व मनोरथ भग्न झाले आहेत. अशा स्थितींत तूं त्यांना पहाणें केवढें आनंदाचें होईल? उत्तम वस्त्रें परिधान केलेल्या तुझ्या स्त्रियांनीं लक्तरें नेसलेल्या, दुःखी द्रौपदीला पहावें, त्यांचें वैभव पाहून स्वतःची निंदा करीत द्रौपदी जेव्हां विषण्ण होईल त्या वेळीं तिला पहाणें हा केवढा भाग्याचा क्षण ! सभेंत आपण तिची अप्रतिष्ठा केलीच आहे. पण अलंकृत अशा तुझ्या स्त्रियांना पाहून तिच्या चेहऱ्यावर जे भाव दिसतील ते पाहणें त्याहूनही अधिक रोचक आहे." इतके हीन विचार अंतःकरणांत बाळगणारी व्यक्ति मार्गदर्शनाच्यासंबंधीं दुर्योधनाच्या आचार्यपदावर विराजमान झाली होती हें ध्यानांत घेतलें म्हणजे सचिवसंस्थेच्या अधःपतनाचें चित्र डोळ्यांसमोर उभें राहिल्याशिवाय राहात नाहीं. धृतराष्ट्रापासून शकुनीपर्यंतच्या भारतांतील व्यक्तिचित्रांचें निरीक्षण करून राज्य-

संस्था व सचिवसंस्था किती अधःपतित झाली होती हें आपण आतां-पर्यंत पाहिलें आहे. पण या संस्थांचें नियंत्रण करणें कुरु राज्यांतील तत्कालीन पराक्रमी नि धर्मनिष्ठ लोकांना कां अशक्य झालें असेल? राजा धृतराष्ट्र स्वतः अंध असल्यामुळें दुर्बल होता. किंबहुना त्याच्या कापटयाचा जन्म त्याच्या अंधतेमुळें उत्पन्न झालेल्या अगतिकतेंतूनच झालेला आहे. दुर्योधन कितीही दुष्ट व निर्भय असला तरी पाण्डवां-सारख्या सर्वास्त्रज्ञ व अत्यंत बलसंपन्न अशा लोकांशीं उघड उघड वैर पत्करून शेवटपर्यत तें तसेंच तडीला नेणें त्याला एकटयाला केवळ अशक्य आहे. पाण्डवांच्या सामर्थ्याची त्याला पूर्णपणें जाणीव आहे. भीष्मद्रोणादि महास्त्रज्ञ त्याच्या अंतःकरणांतील हीन विचा-रांच्या प्रथमपासूनच विरोधी आहेत. या गोष्टीचीही त्याला पूर्णपणें जाणीव आहे. शकुनि अथवा दुःशासन हेही ज्यांच्याशीं त्याला वैर करावयाचें आहे त्यांच्या तुलनेनें अत्यंत सामर्थ्यहीन आहेत याची त्याला पूर्णपणें जाणीव आहे. अशा स्थितींत कोणाच्या भरंवशावर राजा दुर्योधन व त्याची सचिवसंस्था स्वतःच्या कर्तृत्वावर साम्राज्य उभारणाऱ्या महान् शक्तीशीं द्वंद्व खेळावयास सिद्ध झाली असेल? भारताचें युद्ध हें इतिहासकाळांतील अतिशय भीषण युद्ध असून त्या युद्धांत केवळ अठरा दिवसांत लक्षावधि मनुष्यांचा प्रचंड संहार झालेला आहे. ही गोष्ट घडून यावयास अधःपतित राज्यसत्तेला कित्येक दिवस आपल्या महत्त्वाकांक्षेचें थैमान घालावयास अवसर मिळाला असला पाहिजे. हा अवसर सामर्थ्याच्या भक्कम पार्श्वभूमी-वांचून मिळूं शकणार नाहीं हें उघड आहे. या राज्यसत्तेच्या पाठीशीं अशी कोणती भक्कम स्वरूपाची शक्ति उभी राहिली असेल कीं जिच्यामुळें तिचें नियंत्रण थोडक्यांत न होतां तिचें आसुरी तांडव कित्येक दिवस चालून व लक्षावधि लोकांचें बलिदान घेऊन नंतरच थांबलें? ती प्रचंड शक्ति म्हणजे महारथी कर्ण होय.

---

*

# १४. महारथी कर्ण

महाभारताच्या इतिहासांत महारथी कर्णाचें महत्त्व अनन्य-सामान्य आहे. किंबहुना पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांच्या नंतर या इतिहासाच्या घडणीवर ज्याच्या प्रभावशाली व्यक्तिमत्त्वाचा परिणाम झालेला दिसून येतो अशी कर्ण ही एकच व्यक्ति होय. कर्ण नसता तर भारताचें महाभारतच झालें नसतें इतकें त्याचें महत्त्व अनन्यसामान्य आहे. वस्तुतः महाभारत म्हणजे गृहयुद्धाचा इतिहास होय. तें युद्ध एकाच वंशाच्या दायादांत झालें असलें तरी त्यांत भारतांतील तत्कालीन सर्व राजसत्तांची आहुति पडलेली असून त्यांत झालेल्या मनुष्यसंहाराची संख्या सुमारें चाळीस लक्ष भरते. आजच्या युद्धाचें स्वरूप व त्यांतून होणाऱ्या मनुष्यसंहाराचें प्रमाण याहून अधिक असलें तरी भारतीय युद्धाचा विचार करतांना त्यांत झालेली प्रचंड मनुष्यहानि केवळ एका राष्ट्राची व तीही केवळ अठरा दिवसांत झालेली आहे. या युद्धानें अनेक राजवंश कापले गेले, क्षत्रियांचीं मोठमोठीं घराणीं नष्ट झालीं व भारतवर्षांतील कर्त्या पुरुषांची एक संपूर्ण पिढी विनाश पावली. युद्धाचें हें भयानक स्वरूप तत्कालीन सर्व विचारवंतांना उघड दिसत होतें. पण अनेक महनीय व्यक्तीं-कडून सर्वंकष स्वरूपाचे प्रयत्न होऊनही ते सारेच फसले व हें युद्ध कोणासही टळतां आलें नाहीं. ज्या एकाच महापुरुषाच्या व्यक्तिगत प्रभावामुळें ही गोष्ट घडून आली ती व्यक्ति म्हणजे कर्ण होय. भारतीय राष्ट्रावर ही भयानक स्वरूपाची आपत्ति ओढवून आणा-वयास अनेक व्यक्तींना उत्तरदायी म्हणून धरलें जातें व अनेक कारणें सांगितलीं जातात पण त्या सर्वांत महारथी कर्णाची राजा दुर्योधना-सारख्या स्वार्थांध कलिपुरुषाशीं जडलेली प्रगाढ मैत्री हेंच सर्वांत महत्त्वाचें कारण आहे. जर कर्ण कौरवांच्या पक्षाला नसता तर शकुनीची कपटपटुता, धृतराष्ट्राचें कौटिल्य, दुःशासनाची अधमता, व दुर्योधनाचा नीचपणा या सर्व गोष्टी गृहीत धरूनही असें निश्चित-

---

व्याख्यान १४ वें व १५ वें, दि. ९ व १० एप्रिल १९५१

पणें म्हणतां येतें कीं, एक तर युद्धापर्यंत प्रसंग न उद्भवतांच दुर्योधनाच्या साम्राज्याकांक्षेचें निर्माल्य होऊन राहिलें असतें किंवा युद्धाचें भारत जरी कदाचित उद्भवलें असतें तरी त्याचें महाभारत निश्चितच घडून आलें नसतें. या दृष्टीनें महाभारतांतील कर्णाचें व्यक्तिमत्त्व अत्यंत अभ्यसनीय आहे. कर्णाच्या व्यक्तिमत्त्वासंबंधीं अनेक परस्परविभिन्न मतें प्रचलित आहेत. त्याचा जो करुणामय शेवट झाला त्यामुळें त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा महाभारताच्या प्रत्येक वाचकाच्या मनावर खोलवर ठसा उमटल्यावांचून राहात नाहीं. कांहींच्या मतें कर्ण हा सद्गुणांचा केवळ पुतळा ठरतो तर कांहींच्या मतें मानवांतील अधम प्रतीच्या दुर्गुणांचें तो केवळ आगर ठरतो. सामाजिक अन्यायाविरुद्ध चिडलेली व्यक्ति म्हणून कित्येक विचक्षणांना कर्णाच्या प्रत्येक कृतींत गुणांचें दर्शन होतें. व समर्थनाचीं कारणें भासूं लागतात, तर तो पाण्डवांचा विरोधक असल्यामुळें त्याचा एकही सद्गुण मान्य करावयाचा नाहीं अशी दुसऱ्या महाभागांची धारणा असते. कित्येकांच्या मतें तो अर्जुनापेक्षां कितीतरी पटींनीं अधिक युद्धकुशल असून केवळ श्रीकृष्णांच्या साहाय्यानें व तेंही कपटानें अर्जुनानें त्याला ठार मारलें असें आहे व केवळ यामुळेंच पाण्डवांचा पक्ष हा सत्पक्ष असूनही त्यांच्या अभिप्रायाचा कांटा कर्ण व कौरव यांच्याकडे झुकूं लागतो. हीं सर्व मतें महाभारतकारांचा कर्णाविषयींचा अभिप्राय व त्यांनीं कर्णाच्या व्यक्तिमत्त्वाचें केलेलें रेखाचित्रण ध्यानांत न घेतांच बनविण्यांत आलीं आहेत. मनुष्याच्या श्रेष्ठकनिष्ठत्वाची महाभारतकारांची कसोटी, त्याचे व्यक्तिगत सद्गुण अथवा दुर्गुण यापेक्षांही शाश्वत स्वरूपाचीं नीतिमूल्यें व मानवाचें हिताहित हींच आहेत. महापुरुषांच्या ज्या लोकोत्तरत्वानें एरवीं राष्ट्राचें व मानवतेचें कल्याण व्हावें त्याच लोकोत्तरत्वानें केवळ व्यक्तिगत महत्त्वाकांक्षेपायीं केवढा भयानक स्वरूपाचा राष्ट्रीय विध्वंस घडून येऊं शकतो याचें मूर्तिमंत प्रतीक कर्णाच्या व्यक्तिचित्राच्या रूपानें भगवान् वेदव्यासांनीं रेखाटलें आहे. वेदव्यासांच्या प्रतिभेच्या परिपूर्णतेचा विशेष हा कीं या चित्राला अणुमात्रही अद्भुतता व अस्वाभाविकता यांचा स्पर्श नाहीं. नेहमींच

दृष्टीच्या जीवनप्रवाहांत आढळून येणारी ती एक दुर्दैवी घटना आहे. पण असें नसतें तर बरें झालें असतें अशा हताश उद्‌गारांपलीकडे मनुष्य त्या बाबतींत अधिक कांहीं म्हणूं शकत नाहीं. कर्ण किंवा त्याच्या योग्यतेचे महापुरुष व्यक्तिगत महत्त्वाकांक्षेला कां बळी पडतात याचें गूढ उकलणें अशक्य आहे. अशा व्यक्तींच्या हातून जें घडलें त्यापेक्षां वेगळें वर्तन घडलें असतें तर तें भगवान् श्रीकृष्णांप्रमाणेंच पूर्णावतार, अतिमानव, युगपुरुष म्हणविले गेले असते. पण श्रीकृष्ण एकदांच जन्मले, तर कर्ण ही या बहुरत्ना वसुन्धरेंत वारंवार पुनरावृत्त होणारी घटना आहे. महाभारतकारांनीं कर्णाचें वर्णन करीत असतां "कर्णस्कंध हा दुर्योधनरूपी क्रोधवृक्षाचा बुंधा" असें म्हटलें आहे. आत्मकेंद्रितता, अहंकार व अमर्याद महत्त्वाकांक्षा हे कर्णाच्या लोकोत्तर गुणसमुच्चयांतील दोषविशेष होते. हे दोषविशेष कर्णाच्या ठिकाणीं कां उत्पन्न झाले? त्यांची धार, शाश्वत नीतिमूल्यें व मानवाचें हिताहित यांवर वार करावयास कशी प्रवृत्त झाली? व शेवटीं त्याचें पर्यवसान राष्ट्रीय जीवनांतील एका अतिभयंकर प्रसंगांत कसें झालें? हें महर्षि व्यासांच्या प्रतिभेच्या दीपस्तंभाच्या प्रकाशांत पाहणें अतिशय उद्‌बोधक ठरेल. एका अनिवार्य सामाजिक घटनेंतून कर्णाची आत्मकेंद्रितता जन्म पावली. त्या आत्मकेंद्रिततेंतून त्याचा अहंकार जन्म पावला व त्या अहंकारांतूनच अमर्याद महत्त्वाकांक्षेच्या पिशाच्चिनीचा उदय झाला अशी महाभारतकारांची मांडणी आहे.

## एक दुर्दैवी पण अनिवार्य सामाजिक घटना

पुढील आयुष्यांत कुलवंत व घरंदाज क्षत्रियांकडून उपहासास पात्र झालेला कर्ण पाण्डवांप्रमाणेंच कौन्तेय म्हणजे कुन्तीचा मुलगा व देवसंभव म्हणजे देवापासून झालेला असा होता. पाण्डव ज्याप्रमाणें कौरवेश्वर पाण्डूचे पुत्र होते त्याप्रमाणें व तितक्याच अर्थानें कर्णही कौरवेश्वर पाण्डूचाच पुत्र होता. इतर पाण्डव जसे यमधर्म, वायु, देवेंद्र व अश्विनीकुमार यांच्या कृपाप्रसादानें जन्म पावले त्याच-

प्रमाणें कर्णही सूर्यनारायणाचा कुन्तीला मिळालेला कृपाप्रसादच होता. त्यामुळें पाण्डव व विशेषतः त्यांच्यांतील ज्येष्ठ युधिष्ठिर जितक्या अर्थानें कौरवांच्या राज्यसिंहासनाचा उत्तराधिकारी होता तितक्याच किंबहुना त्याहीपेक्षां अधिक अर्थानें कर्ण हा कौरवांच्या सिंहासनाचा अधिकारी होता. कारण कर्ण हा राज्याधिकाराच्या भाषेंत सर्वांत ज्येष्ठ असा कौन्तेय व म्हणूनच पाण्डव होता. युधिष्ठिरापासून सहदेवापर्यंतची कुन्तीची संतति ही विवाहोत्तर व पांडूच्या संमतीनें झालेली म्हणून ती पाण्डूची उत्तराधिकारी होती व कर्ण हा कौमार्यावस्थेंत कुन्तीला झाल्यामुळें तो अनधिकारी होता, असेंही महाभारतकालीन सामाजिक निर्बंधांकडे पाहिल्यास कोणाला म्हणतां यावयाचें नाहीं. कारण त्यावेळीं पुढील नियम रूढ होताः--

**कानीनश्च सहोढश्च कन्यायां यश्च जायते ।**
**वोढारं पितरं तस्य प्राहुः शास्त्रविदो जनाः ।। ८**

--महाभारत, उत्तरपर्व अध्याय १४०

लग्न झाल्यावर पतीच्या संमतीनें अथवा लग्नापूर्वीं कौमार्यावस्थेंत स्त्रीला झालेलें संतान हें धर्मतः त्या स्त्रीच्या पतीचेंच आहे व त्यानेंच त्याच्या पितृत्वाचे सर्वाधिकार घ्यावे असें शास्त्रज्ञांचें मत आहे. हा श्लोक महाभारतकारांनीं सामान्य व्यक्तीच्या तोंडीं घातला नसून तो प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णांच्याच तोंडीं घातलेला असल्यामुळें तसा सामाजिक नियमच त्या वेळीं रूढ असला पाहिजे हें निर्विवादपणेंच ठरतें. या श्लोकाच्याच पुढें भगवान् श्रीकृष्णांच्या तोंडीं पुढील श्लोक आहे :—

**सोऽसि कर्ण तथा जातः पाण्डोः पुत्रोऽसि धर्मतः ।**
**निग्रहाद्धर्मशास्त्राणामेहि राजा भविष्यसि ।। ९**

—महाभारत, उत्तरपर्व अध्याय १४०

हे कर्णा ! याप्रमाणें तुझी उत्पत्ति झाली असल्यामुळें धर्मानें तूं राजा पाण्डूचाच पुत्र आहेस. तूं माझ्याबरोबर चल. धर्मशास्त्राच्या आज्ञेनुसार तूंच कौरवांच्या राजसिंहासनाचा उत्तराधिकारी असल्यामुळें तूंच राजा होशील. पण शास्त्रज्ञांच्या या तत्कालीन मताचा कर्णाला विशिष्ट परिस्थितीमुळें कांहीं एक उपयोग होऊं शकला

नाहीं. जेव्हां तो कुन्तीचा मुलगा आहे हें त्याला कळणें अवश्य होतें व कळून कांहीं उपयोग झाला असता, तेव्हां तें त्याला मुळींच कळलें नाहीं. व युद्धाचे पडघम वाजण्याच्या वेळीं, सम्राट दुर्योधनाचा एकमात्र आधारस्तंभ म्हणून धनुष्याचा टणत्कार करीत तो उभा असतांना त्याच्या मानी मनाला हें कळूनही खंत करीत बसण्यापलीकडे त्याला त्याचा कांहीं उपयोग नव्हता. ज्या वेळीं त्याला या ज्ञानाचा उपयोग होऊं शकला असता त्यावेळीं त्याला यासंबंधीं सचेत करूं शकणारी केवळ एकच व्यक्ति होती व ती म्हणजे त्याची माता कुन्ती होय. मग कुन्तीनें त्याला त्या वेळीं हें न कळविण्यांत मोठाच अन्याय केला म्हणावयाचा! मला तसें म्हणवत नाहीं व हृदयहीन पाषाणाखेरीज दुसरें कोणी तसें म्हणेल असें वाटत नाहीं.

## कर्णाची जन्मकथा

महाभारतांत कर्णाची जन्मकथा पुढीलप्रमाणें वर्णिली आहे :—

**शूरो नाम यदुश्रेष्ठो वसुदेवपिताऽभवत् ।**
**तस्य कन्या पृथा नाम रूपेणाप्रतिमा भुवि ।। १**
**पितृष्वस्रीयाय स तामनपत्याय भारत ।**
**अग्र्यमग्रे प्रतिज्ञाय स्वस्यापत्यं स सत्यवाक् ।। २**
**अग्रजामथ तां कन्यां शूरोऽनुग्रहकांक्षिणे ।**
**प्रददौ कुन्तिभोजाय सखा सख्ये महात्मने ।। ३**
**नियुक्ता सा पितुर्गेहे ब्राह्मणातिथिपूजने ।। ४**
**उग्रं पर्यचरत्तत्र ब्राह्मणं संशितव्रतम् ।। ४**
**निगूढनिश्चयं धर्मे यं तं दुर्वाससं विदुः ।**
**तमुग्रं संशितात्मानं सर्वयत्नैरतोषयत् ।। ५**
**तस्यै स प्रददौ मन्त्रमापद्धर्मान्ववेक्षया ।**
**अभिचाराभिसंयुक्तमब्रवीच्चैव तां मुनिः ।। ६**
**यं यं देवं त्वमेतेन मन्त्रेणावाहयिष्यसि ।**
**तस्य तस्य प्रभावेण तव पुत्रो भविष्यति ।। ७**
**तथोक्ता सा तु विप्रेण कुन्ती कौतूहलान्विता ।**
**कन्या सती देवमर्कमाजुहाव यशस्विनी ।। ८**

सा ददर्श तमायान्तं भास्करं लोकभावनम् ।
विस्मिता चानवद्याङ्गी दृष्ट्वा तन्महदद्भुतम् ॥ ९
तां समासाद्य देवस्तु विवस्वानिदमब्रवीत् ।
अयमस्म्यसितापाङ्गि ब्रूहि किं करवाणि ते ॥ १०

कुन्त्युवाच ।

कश्चिन्मे ब्राह्मणः प्रादाद्वरं विद्यां च शत्रुहन्
तद्विजिज्ञासयाह्वानं कृतवत्यस्मि ते विभो ॥ ११
एतस्मिन्नपराधे त्वां शिरसाऽहं प्रसादये ।
योषितो हि सदा रक्ष्याः स्वापराद्धाऽपि नित्यशः ॥ १२

सूर्य उवाच ।

वेदाहं सर्वमेवैतद्यद्दुर्वासा वरं ददौ ।
संत्यज्य भयमेवेह क्रियतां संगमो मम ॥ १३
अमोघं दर्शनं मह्यमाहूतश्चास्मि ते शुभे ।
वृथाह्वानेऽपि ते भीरु दोषः स्यान्नात्र संशयः ॥ १४

वैशंपायन उवाच ।

एवमुक्ता बहुविधं सान्त्वपूर्वं विवस्वता ।
सा तु नैच्छद्वरारोहा कन्याहमिति भारत ॥ १५
बन्धुपक्षभयाद्भीता लज्जया च यशस्विनी ।
तामर्कः पुनरेवेदमब्रवीद्भरतर्षभ ॥ १६
मत्प्रसादान्न ते राज्ञि भविता दोष इत्युत ।
एवमुक्त्वा स भगवान्कुन्तिराजसुतां तदा ॥ १७
प्रकाशकर्ता तपनः संबभूव तया सह ।
तत्र वीरः समभवत्सर्वशस्त्रभृतां वरः ।
आमुक्तकवचः श्रीमान्देवगर्भः श्रियान्वितः ॥ १८
सहजं कवचं बिभ्रत्कुण्डलो द्योतिताननः ।
अजायत सुतः कर्णः सर्वलोकेषु विश्रुतः ॥ १९
प्रादाच्च तस्यै कन्यात्वं पुनः स परमद्युतिः ।
दत्वा च तपतां श्रेष्ठो दिवमाचक्रमे ततः ॥ २०
दृष्ट्वा कुमारं जातं सा वार्ष्णेयी दीनमानसा ।
एकाग्रं चिन्तयामास किं कृत्वा सुकृतं भवेत् ॥ २१

गूहमानापचारं सा बन्धुपक्षभयात्तदा ।
उत्ससर्ज कुमारं तं जले कुन्ती महाबलम् ॥ २२
तमुत्सृष्टं जले गर्भं राधाभर्ता महायशाः ।
पुत्रत्वे कल्पयामास सभार्यः सूतनन्दनः ॥ २३
नामधेयं च चक्राते तस्य बालस्य तावुभौ ।
वसुना सह जातोऽयं वसुषेणो भवत्विति ॥ २४ ॥

—महाभारत, आदिपर्व अध्याय १११

पाण्डवांची आई कुंती ही मूळची यादव घराण्यांतील असून तो वसुदेवाची सख्खी बहीण, शूराची मुलगी, म्हणूनच भगवान् श्रीकृष्णाची आत्या होय. ती अत्यंत सुन्दर असे. तिच्या पित्यानें पोटीं संतान मुलींच नसल्यामुळें मला जें पहिलें संतान होईल तें मी तुला देईन असें वचन दुःखी असलेल्या आपल्या आतेभावाला दिलें होतें. त्याप्रमाणें कुंती हेंच त्याचें पहिलें अपत्य असल्यामुळें त्यानें तिला त्याला देऊन टाकलें. या आतेभावाचें नांव कुंतीभोज. कुंतीभोजाच्या राज्यांत त्याची मुलगी या नात्यानें कुंती असतांना एके दिवशीं विख्यात क्रोधमूर्ति दुर्वासऋषि तेथें आले. कुंतीभोजानें राजकन्या कुंतीला त्यांच्या सेवेंत नियुक्त केलें. पावसाळयाचे चार महिने आपल्या पित्याच्या आज्ञेप्रमाणें कुन्तीनें त्या भस्मसंतापी रुद्रावताराला प्रसन्न करून घेतलें. दुर्वास जेव्हां त्या राज्यांतून जाऊं लागले त्या वेळीं त्यांनीं प्रसन्न होऊन कुंतीला एक मंत्र दिला व असें सांगितलें कीं या मंत्रानें तूं कोणत्याही देवतेला बोलावूं शकशील व ती देवता आपल्या प्रभावानें तुला पुत्र देईल. दुर्वास निघून गेल्यावर कुंतीला बालसुलभ अल्लडपणामुळें त्या मंत्राची परीक्षा पहाण्याची इच्छा झाली, व तिनें समोर दिसणाऱ्या भगवान् सूर्य नारायणाला त्या मंत्राच्या साहाय्यानें आवाहन केलें. त्याबरोबर त्या मंत्रप्रभावानें सूर्यनारायण सौम्य स्वरूप धारण करून कुंतीसमोर येऊन उभे राहिले. कुंतीला तो प्रकार पहातांच एकप्रकारची भीति वाटली व त्या देवतेला काय मागावें हें तिला सुचेना. सूर्यानें तिच्या कौमार्याचा भंग न करतां तिला एक मुलगा दिला. तो सूर्याप्रमाणें तेजस्वी असून त्याच्या अंगावर कातडीसारखें सहज कवच व

कानांत देदीप्यमान रत्नजडित कुंडलें होतीं. वस्तुतः कुंतीनें सूर्याला प्रार्थनापूर्वक अजाणतां बोलावून झालेल्या अपराधामुळें स्वतःला क्षमा करून परत जावयास सांगितलें होतें. पण तसेंच परत जाण्यांत आपला अपमान आहे असें समजून व तिच्या कौमार्याचा भंग होणार नाहीं असें तिला वरप्रदान करून सूर्यनारायण निघून गेले. कुमारी कुंतीला आपण पुत्रवती झालों यामुळें अतिशय संकोच व भीति वाटूं लागली. सभोंवतीं सगळ्या वडीलधाऱ्या माणसांची चौकसदृष्टि असल्यामुळें ती अगदीं घाबरून गेली व तिनें एका पेटींत त्या तेजस्वी व बलवान मुलाला बंद करून गंगेंत सोडून दिलें. सहजकवच-कुंडलधारी असा सूर्यनारायणाचा हा देदीप्यमान प्रसाद अधिरथ नांवाच्या सूताला सांपडला व त्यानें आपल्या राधा नांवाच्या पत्नी-सहित त्याला आपला मुलगाच मानून त्याचें पालन केलें. संपत्ती-सहित तो मुलगा मिळाला म्हणून अधिरथानें त्याचें नांव 'वसुषेण' असें ठेवलें.

## कुन्तीला दोष देतां येईल काय ?

झाल्या प्रकाराबद्दल महाभारताचे पुष्कळ वाचक कुंतीला दोष देत असतात. स्वतः कर्णानेंही तिला असा दोष दिला आहे. पण कर्ण आपल्या मानी स्वभावानुरूप कुंतीवर केवढाही संतापला असला तरी व त्यानें यासंबंधीं 'आपल्यासाठीं तूं माझा गळा काप-लास' म्हणून तिला अनेक प्रकारचीं दूषणें दिलीं असलीं तरी महा-भारताच्या विचारी वाचकांना कुंतीला या बाबतींत दोष देतां येत नाहीं. कुंती ही एक मानवी स्त्री होती. त्यामुळें लज्जा, भीति, संकोच, वय, अब्रूचें भय, पुढच्या आयुष्याचें कसें होईल याचा विचार, वयानुरूप असणारा अल्लड अवखळपणा यांपासून निर्मुक्त अशी ब्रह्मवादिनी ती खासच नव्हती. त्यामुळें कुंतीच्या वयाच्या व परिस्थितीच्या राजकन्येनें अथवा मुलीनें अशा प्रसंगीं जें केलें असतें तेंच कुंतीनें केलें. त्याबद्दल तिला दोष कसा देतां येईल ? शिवाय जेथें ती रहात होती तें तिच्या मानलेल्या पित्याचें घर होतें. याद-वांच्या घरीं प्रत्यक्ष आईबापांसमोर ज्या मोकळ्यापणानें तिला वावरतां येत असे त्याची जागा या मानीव पित्याच्या घरीं संकोच

व भीति यांनीं घेतली होती असें दिसतें. स्वत: कुंतीनेंच शिष्टाईसाठीं कौरवांच्या राजसभेंत आलेल्या श्रीकृष्णाला आपल्या दुर्दैवाच्या दशावताराचा वृत्तान्त सांगत असतां पित्यानें आपल्याला याप्रमाणें कुंतीभोजाला देऊन टाकल्याबद्दल दोष दिलेला आहे.

**पितरं त्वेव गर्हेयं नात्मानं न सुयोधनम् ॥६२**
**येनाहं कुन्तिभोजाय धनं वृत्तैरिवार्पिता ।**
**बालां मामार्यकस्तुभ्यं क्रीडन्तीं कन्दुहस्तिकाम् ॥ ६३**
**आदत्तु कुन्तिभोजाय सखा सख्ये महात्मने ॥ ६४**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १०५

"मी स्वत:ला व दुर्योधनाला दोष देण्याऐवजीं माझा पिता जो शूर त्यालाच दोष देतें. एखाद्या निर्जीव धनाप्रमाणें त्यानें माझ्या बाल्यावस्थेंत खुशाल मला आपल्या मित्राला देऊन टाकलें !" अशा परिस्थितींतील मानवी स्त्री कुन्तीनें जें केलें त्याहून वेगळें काय करूं शकणार होती? कर्णानें कुन्तीला पुढें तिची निर्भर्त्सना करीत असतानां असें सांगितलें आहे कीं, ज्या अवमानित अवस्थेंत तूं मला जन्मभर रहावयास भाग पाडलें आहेस, त्यापेक्षां तूं माझी जीवनयात्रा लहानपणीं संपवली असतीस तर माझ्यावर खरे उपकार झाले असते. खरेच ! कुन्तीनें लहानपणींच कर्णाची जीवनयात्रा कां संपविली नाहीं ? एक तर ती पुढच्या सगळ्या गोष्टींना जें स्वरूप आलें त्याचा सगळा चित्रपट डोळ्यासमोर उभी रहाण्यासारखी भविष्यदर्शिनी नव्हती. दुसरें म्हणजे बालहत्येचा कामांत निढावलेली अवदसाही नव्हती. तात्पर्य कुन्तीच्या भूमिकेचा, मनुष्यस्वभावांतील स्वाभाविक अपूर्णता ध्यानांत घेऊन विचार केला म्हणजे तिला दोष द्यायला जागाच उरत नाहीं. तसेंच कर्णाला ज्या परिस्थितींत दैवानें अकारण आणून सोडलें तिचा विचार केला तर संतापण्याबद्दल त्यालाही कांहींच दोष देतां येत नाहीं. जो जो अधिक विचार करूं लागावें तो तो नियतीचा खेळ यापेक्षां दुसरें कोणतेंच या घटनेचें समर्थन उरत नाहीं. सहानुकंपा हाच खरोखरी या बाबतींतला उपयुक्त दृष्टिकोन आहे. याप्रमाणें सूर्यापासून कुन्तीच्या ठिकाणीं झालेला तो देवसंभव, कौरवांच्या राजसिंहासनाचा खरा उत्तरा-

धिकारी व क्षत्रियकुमार कर्ण दैवाच्या दुर्विलसितानें सूतपुत्र बनून अधिरथी व राधेय या संबोधनांनीं जगांत ओळखला जाऊं लागला. अर्थातच जन्मानें जें कर्णाचें स्थान निर्माण केलें होतें त्याला तो या प्रकारें आंचवला. लहानपणीं जो प्रकार झाला तो सावरावयास कुन्ती पुढें कर्णाच्या प्रौढपणीं कां सिद्ध झाली नाहीं ? असा एक प्रश्न या ठिकाणीं उत्पन्न होईल. पण या घटनेनंतर कर्ण व कुन्ती यांचे जीवनमार्गच अगदीं विभिन्न झाले. इतके कीं त्यानंतर गंगेंत सोडलेला तो मुलगा वांचला आहे व आपल्या राज्याच्या सीमेंतच राहणाऱ्या अधिरथ नांवाच्या एका सूताच्या घरीं तो शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें वाढतो आहे अशी साधी कल्पनाही कुन्तीच्या मनाला शिवण्याचें कांहीं कारण नव्हतें. कर्णाच्या परित्यागानंतर कुन्तीचें स्वयंवर होऊन ती राजा पाण्डूची राणी व कौरवांच्या सिंहासनाची पट्ट महिषी बनून राहिली. पुढें नवऱ्याबरोबर ती वनवासांत राहिली व तेथेंच हृदयद्रावकपणें पतीचा देहान्त झाल्यानंतर पांच अनाथ मुलें घेऊन ती अनाथ विधवा धृतराष्ट्रासारख्या पाताळयंत्री दिराकडे स्वतःच्या दुःखांत चूर होऊन राहिली.

कर्णाच्या जगाहून कुन्तीचें जग अगदीं निराळें झालें होतें. त्याची ओळख तिला फार उशिरां पटली. राजा पण्डूच्या जीवितकाळीं जर ती पटली असती तर कर्णाचा व महाभारताचा इतिहासच वेगळा बनला असता. पण मग कदाचित व्यास महर्षींच्या दीर्घदर्शी प्रतिभेला महाभारत लिहिण्याचेंही कारण उरलें नसतें. असो.

ज्या वेळीं तिला कर्णाची ओळख पटली त्या वेळीं धृतराष्ट्राच्या पाताळयंत्रीपणाचे चटके तिला इतके झोंबत होते कीं त्यांतून कसें वांचावयाचें हा एकच प्रश्न तिच्यासमोर होता. त्यामुळें एका नव्या जिवाला दुःखांत टाकावयास ती धजली नाहीं. तिच्या उण्यावर सतत टपलेल्या व तिच्या सर्वस्व नाशासाठीं अविरत प्रयत्नशील असणाऱ्या लोकांच्या हातीं जीविताबरोबरच स्वतःच्या अब्रूचेंही दहन करणारें नवें कोलीत देण्याचें साहसही तिच्यानें करवलें नाहीं.

तात्पर्य याप्रमाणें परिस्थितीनें एका तात्पुरत्या घटनेवर अनिवार्यतेची राजमुद्रा अशा पद्धतीनें उमटविली कीं, तिच्याबद्दल नियती-

खेरीज दुसऱ्या कोणालाही दोष देतांच येऊं नये. म्हणूनच या सगळ्या प्रकरणाची संगति लावीत असतांना कर्णाच्या निधनोत्तर त्याचें नातें कळलेल्या युधिष्ठिराला देवर्षि नारदांनीं असें सांगितलें आहे कीं, या बाबतींत कोणत्याही व्यक्तीला उत्तरदायी ठरविण्याचा प्रयत्न करण्यांत व विनाकारण त्या व्यक्तीवर आग पाखडण्यांत कांहींच अर्थ नाहीं. राजा, तुझा भाऊ दुर्दैवी होता. नियतीच्या हातांतलें तें एक खेळणें होऊन राहिलें होतें. किंबहुना देवतांनींच मुद्दाम हा कन्यागर्भ कलहाच्या ठिणगीचें सारें वन जाळून राख करणाऱ्या वणव्यांत रूपांतर व्हावें म्हणून निर्माण केला होता. एरवीं सगळ्या क्षत्रियांना शस्त्रपूत होऊन उत्तम गतीला जातांच आलें नसतें. सगळ्या दुष्टांचा संघशः नाश करतांच आला नसता. म्हणून तुझा भाऊ नियतीच्या प्रेरणेनें देवकार्यार्थ खर्ची पडला असें समजून शोक आवर.

गुह्यमेतत्तु देवानां कथयिष्यामि तेऽनघ ।
तन्निबोध महाबाहो यथा वृत्तमिदं पुरा ।। ३
क्षत्रं स्वर्गं कथं गच्छेच्छस्त्रपूतमिति प्रभो ।
संघर्षजननस्तस्मात्कन्यागर्भो विनिर्मितः ।। ४

—महाभारत, शांतिपर्व अ. २

तात्पर्य प्रत्यक्ष महाभारतकारांनींच देववादाचा व दैववादाचा आश्रय करावा अशी ही अनिवार्य घटना आहे.

महाभारताच्या इतिहासांत या घटनेचा अनिवार्य परिणाम जो प्रत्यक्ष झालेला दिसून येतो तो तसा घडून यावयास कर्णाचें व्यक्तिमत्त्व असामान्य असणें क्रमप्राप्त आहे. आणि खरोखरीच कर्णाचें व्यक्तिमत्व म्हणजे असामान्य सद्गुण व असामान्य दुर्गुण यांचा संगमच होय. त्याचे सद्गुण जर इतके असामान्य नसते तर त्याच्या दुर्गुणांचाही इतका विलक्षण परिणाम खात्रीनेंच घडून आला नसता.

## कर्णाचें असामान्य शौर्य

महारथी कर्णाचा लहानपणापासूनच धनुर्विद्येकडे ओढा असे. स्वकीयांना जीवनरसाचा पुरवठा करणें व परकीयांना स्वतःच्या

तेजानें तळपून भाजून काढणें हे गुण कर्णाच्या ठिकाणीं त्याचे वडील भगवान् सूर्य यांच्यापासून जसे उपजत आले होते, त्याचप्रमाणें बुद्धिमत्ता, सौंदर्य, तेज, बल, महानुभावत्व, पराक्रम, व कर्तृत्व हे कुन्तीच्या क्षेत्राचे स्वभावसिद्ध गुणही त्याच्या ठिकाणीं उपजतच होते. तो महास्त्रसंपन्न असून सहज कवचकुण्डलें, ब्रह्मास्त्रज्ञता, भार्गवास्त्राची ठेव, व त्याचे गुरु क्षत्रियान्तक परशुराम यांनीं त्याला दिलेलें स्वतःचें माहेश्वर धनुष्य यांनीं तो अत्यंत दुर्धर्ष व अवध्य होऊन राहिला होता. पुढें कांहीं कारणास्तव अर्धरथी म्हणून त्याचा उपहास करणाऱ्या राजर्षि भीष्मांनीं देखील अन्तिम शरशय्येवरून तो भटीला आला असतां त्याचें जें वर्णन केलें आहे त्यावरून त्याच्या योग्यतेची खरी कल्पना येते. त्याच्या सर्वच सद्गुणांचें भीष्म या प्रसंगीं मुक्तकंठानें वर्णन करतात.

**जानामि समरे वीर्यं शत्रुभिर्दुःसहं भुवि ।**
**ब्रह्मण्यतां च शौर्यं च दाने च परमां स्थितिम् ।। १४**
**न त्वया सदृशः कश्चित् पुरुषेष्वमरोपम ।**
**कुलभेदभयाच्चाहं सदा परुषमुक्तवान् ।। १५**
**इष्वस्त्रे चास्त्रसंधाने लाघवेऽस्त्रबले तथा ।**
**सदृशः फाल्गुनेनासि कृष्णेन च महात्मना ।। १६**
**कर्ण काशिपुरं गत्वा त्वयैकेन धनुष्मता ।**
**कन्यार्थे कुरुराजस्य राजानो मृदिताः युधि ।। १७**
**तथा च बलवान् राजा जरासंधो दुरासदः ।**
**समरे समरश्लाघिन्न त्वया सदृशोऽभवत् ।। १८**
**ब्रह्मण्यः सत्त्वयोधी च तेजसा च बलेन च ।**
**देवगर्भसमः संख्ये मनुष्यैरधिको युधि ।। १९**
**व्यपनीतोऽद्य मन्युर्मे यस्त्वां प्रति पुरा कृतः ।**
**दैवं पुरुषकारेण न शक्यमतिवर्तितुम् ।। २०**

—महाभारत, भीष्मपर्व **अध्याय १२२**

तुझें अतुल वीर्य, अलौकिक निष्ठा, असामान्य पराक्रम, दुःसह तेज, व अनुपमेय दानप्रियता ह्याची मला पूर्णपणें कल्पना आहे. तूं देवतुल्यच आहेस. मनुष्य लोकांत तुझ्यासारखी प्रभावशाली व्यक्ति

मीं दुसरी पाहिली नाहीं. असें असतांही मी तुला नेहमीं कठोर बोललों याचें कारण तूं कलह माजवून कुलभेदास कारणीभूत झालास हें होय. बाणयोजनेंत, अस्त्रसंधानांत, हस्तचापल्यांत, व अस्त्रबलांत, तूं धनुर्धर पार्थ किंवा भगवान् श्रीकृष्ण यांच्या तोडीचा आहेस. कुरु सम्राट दुर्योधनाला वधू आणून देण्याच्या वेळीं तूं एकटा हातीं धनुष्य घेऊन काशी नगरीला गेलास व तेथें जमलेल्या सर्व राजांना स्वपराक्रमानें धूळ चारलीस. हे रणप्रिया! सम्राट जरासंधाला देखील तूं पराजित केलेंस. तुझ्या अनुपमेय पराक्रमाचें काय वर्णन करावें? वत्सा, तूं निष्ठावान्, अकपट योद्धा आहेस. एखाद्या देवपुत्रासारखें तुझें तेज अलौकिक आहे. तुझ्यावरचा माझा राग मीं यापुढें सोडला. मीं आतां दैववादाची कांस धरली आहे.

युधिष्ठिर शांतिपर्वांत कर्णाच्या प्रभावाचें वर्णन करतांना पुढीलप्रमाणें म्हणतात:

**यः स नागायुतबलो लोकेऽप्रतिरथो रणे ।**
**सिंहखेलगतिर्धीमान् घृणी दाता धृतव्रतः ॥ १९**
**आश्रयो धार्तराष्ट्राणां मानी तीक्ष्णपराक्रमः ।**
**अमर्षी नित्यसंरंभी क्षेप्ताऽस्माकं रणे रणे ॥ २०**
**शीघ्रास्त्रश्चित्रयोधी च कृती चाद्भुतविक्रमः ॥ २१**
**सभायां क्लिश्यमानस्य धार्तराष्ट्रैर्दुरात्मभिः ॥ ३९**
**सहसोत्पतितः क्रोधः कर्णं दृष्ट्वा प्रशाम्यति ।**
**यदा ह्यस्य गिरो रूक्षाः शृणोमि कटुकादयः ॥ ४०**
**सभायां गदतो द्यूते दुर्योधनहितैषिणः ।**
**तदा नश्यति मे रोषः पादौ तस्य निरीक्ष्य ह ॥ ४१**
**कुन्त्या हि सदृशौ पादौ कर्णस्येति मतिर्मम ।**
**सादृश्यहेतुमन्विच्छन् पृथायास्तस्य चवह ॥ ४२**
**कारणं नाधिगच्छामि कथञ्चिदपि चिन्तयन् ॥ ४३**

—महाभारत, शांतिपर्व अध्याय १

"दहा हजार हत्तींचें बळ ज्याच्या अंगांत आहे असा, अप्रतिम योद्धा, सिंहाप्रमाणें गति असणारा, अभिजात दाता, दृढनिश्चयी,

दुर्योधनादिकांचा आश्रय, अत्यंत मानी, तीक्ष्ण पराक्रमी, मत्सरी, एकदम क्षुब्ध होणारा, प्रत्येक युद्धांत आम्हांला उखडून टाकण्याची खटपट करणारा, अस्त्रांचा हवा तो प्रयोग अत्यंत शीघ्र करूं शकणारा, कलात्मक युद्ध करणारा, अद्‌भुत पराक्रमी, असा कर्ण होता. त्याचा प्रभाव माझ्यावर मोठ्या विलक्षण पद्धतीनें पडत असे. दुरात्म्या धृतराष्ट्रपुत्रांनीं सभेमध्यें मला कष्ट दिले असतां माझ्या अंतःकरणांत उफाळून उठणारा क्रोध कर्णाला पहातांच उपशम पावत असे. त्याची अत्यंत कठोर वाणी माझ्या अंतःकरणांत क्रोध उत्पन्न करी. पण त्याचे पाय पहातांच तो माझा क्रोध नष्ट होई. कर्णाचे पाय कुन्तीसारखेच आहेत असें मला वाटे. पण त्याचें कारण पुष्कळ विचार करूनही मला आजवर कळलें नाहीं." युधिष्ठिराला केवळ कर्णाची भीति वाटत आलेली आहे. तेरा वर्षें त्यानें कर्णामुळें हृद्‌रोगासारखी चिंता वाहिली. अर्जुनाच्या हातून कर्णवध झाल्यावर प्रत्यक्ष कर्णाचें प्रेत डोळ्यांनीं पाहिल्यावांचून त्याचें समाधान होईना. महाभारतकारांनीं या घटनेचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहेः—

**हतो वैकर्तनो राजन्सूतपुत्रो महारथः ।**
**दिष्टया जयसि राजेंद्र दिष्टया वर्धसि भारत ॥ २०**
**इति श्रुत्वा वचस्तस्य केशवस्य महात्मनः ।**
**धर्मपुत्रः प्रहृष्टात्मा दाशार्हं वाक्यमब्रवीत् ॥ २४**
**अन्ये च बहवः शूरा ये च तेषां पदानुगाः ॥ ३२**
**त्वद्‌बुद्धया निहते कर्णे हता गोविंद सर्वथा ।**
**इत्युक्त्वा धर्मराजस्तु रथं हेमविभूषितम् ॥ ३३**
**श्वेतवर्णैर्हयैर्युक्तं कालवालैर्मनोजवैः ।**
**आस्थाय पुरुषव्याघ्रः स्वबले नाभिसंवृतः ॥ ३४**
**प्रययौ स महाबाहुर्द्रष्टुमायोधनं तदा ।**
**कृष्णार्जुनाभ्यां वीराभ्यामनुमन्त्र्य ततः प्रियम् ॥ ३५**
**आभाषमाणस्तौ वीरावुभौ माधवफाल्गुनौ ।**
**स ददर्श रणे कर्णं शयानं पुरुषर्षभम् ॥ ३६**
**यथा कदम्बकुसुमं केसरैः सर्वतोवृतम् ।**
**चितं शरशतैः कर्णं धर्मराजो ददर्श सः ॥ ३७**

गन्धतैलावसिक्ताभिः काञ्चनीभिः सहस्रशः ।
दीपिकाभिः कृतोद्योतं पश्यन्ते वै वृतं तदा ।। ३८
संछिन्नभिन्नकवचं बाणैश्च विदलीकृतम् ।
सपुत्रं निहतं दृष्ट्वा कर्णं राजा युधिष्ठिरः ।। ३९
संजातप्रत्ययोऽतीव वीक्ष्य चैवं पुनः पुनः : ।
प्रशशंस नरव्याघ्रावुभौ माधवपाण्डवौ ।। ४०
अद्य राजास्मि गोविंद पृथिव्यां भ्रातृभिः सह ।
त्वया नाथेन वीरेण विदुषा परिपालितः ।। ४१
हतं श्रुत्वा नरव्याघ्रं राधेयमतिमानिनम् ।
निराशोऽद्य दुरात्माऽसौ धार्तराष्ट्रो भविष्यति ।। ४२
जीविते चैव राज्ये च हते राधात्मजे रणे ।
त्वत्प्रसादाद्वयं चैव कृतार्थाः पुरुषर्षभ ।। ४३
दिष्टया जयसि गोविन्द दिष्टया शत्रुर्निपातितः ।।
दिष्टया गाण्डीवधन्वा च विजयी पाण्डुनन्दनः ।। ४४
त्रयोदश समास्तीर्णा जागरेण सुदुःखिताः ।
स्वप्स्यामोऽद्य सुखं रात्रौ त्वत्प्रसादान्महाभुज ।। ४५

—महाभारत, कर्णपर्व अध्याय ९६

"भगवान् श्रीकृष्ण युधिष्ठिराला म्हणाले: हे राजन् ! विख्यात महारथी सूतपुत्र वैकर्तन मारला गेला. हे राजेंद्रा तुझा जयजयकार असो. तुझी भरभराट होवो. हें भगवंताचें भाषण ऐकून आनंदानें युधिष्ठिर म्हणाला : हे गोविंदा ! तुझ्याच बुद्धीनें कर्ण मृत्यु पावला आहे. कर्ण मेला म्हणजे उरलेले सर्व शूर कौरवपक्षीय योद्धे ठार मेलेच, असें बोलून धर्मराज शुभ्रवर्णाच्या घोड्यानें युक्त अशा सुवर्ण रथावर बसून कृष्णार्जुनांना बरोबर घेऊन आपल्या योद्ध्यां-सह कर्णाला पाहण्यासाठीं रणांगणावर गेले. तेथें त्यांनीं शतावधि बाण अंगांत रुतून असलेल्या अवस्थेंत गतप्राण होऊन पडलेल्या कर्णाकडे पाहिलें. दीपिका पेटवून पुनः पुन्हां कर्णाकडे पाहूनही त्यांचें समाधान होईना. त्याचें कवच छिन्नभिन्न झालें होतें. बाणांच्या आघातांनीं त्याच्या शरीराची चाळणी झाली होती. प्रत्यक्ष त्याला पाहिल्यावरच कर्ण संपला या गोष्टीवर युधिष्ठिराचा

विश्वास बसला. तो कृष्णार्जुनांची प्रशंसा करीत त्यांना म्हणूं लागला हे गोविंदा! आज मी माझ्या बंधूंसहित पृथ्वीचा राजा झालों. तुझ्या बुद्धीनेंच आमचें संरक्षण केलें. तूंच आमचा संरक्षक आहेस. हा अत्यंत मानी असलेला नरव्याघ्र कर्ण संपल्याचें कळल्यावर दुरात्मा दुर्योधन आज वस्तुतः निराश होईल. राज्य व जीवित या दोहोंचीही त्याची आशा आज खरी संपली. तुझा जयजयकार असो! अर्जुनाचाही उत्कर्ष होवो. खरा शत्रु त्यानें आज मारला आहे. सतत तेरा वर्षे ज्या भयानें आम्ही कधींच निद्रा घेऊं शकलों नाहीं तें भय आज संपलें. तुझ्या कृपेनें आज रात्रीं आम्ही स्वस्थ निद्रा घेऊं शकतों."

स्वतः श्रीकृष्णदेखील कर्णाचें नि त्याच्या व अर्जुनाच्या युद्धाचें महत्त्व ऋग्वेदांतील इंद्रवृत्रांच्या संग्रामाइतकें मानीत होते असें त्यांच्या उद्गारावरून दिसतें. कर्णवधानंतर अर्जुनाचें अभिनंदन करतांना ते म्हणतात :

**हतो वज्रभृता वृत्रस्त्वया कर्णो धनञ्जय ।**
**वृत्रकर्णवधं घोरं कथयिष्यन्ति मानवाः ।। २**
**वज्रेण निहतो वृत्रः संयुगे भूरितेजसा ।**
**त्वया तु निहतः कर्णो धनुषा निशितैः शरैः ।। ३**

**—महाभारत, कर्णपर्व अध्याय ९६**

हे धनंजया! इंद्रानें वृत्र ठार मारला, तूं कर्णाला ठार मारून तोच पराक्रम गाजविला आहेस. कर्ण व वृत्रवधाची प्रशंसा लोक सतत करतील. इंद्रानें वृत्रवधासाठीं आपलें वज्र आगंतुक कारणांनीं अधिक समर्थ तरी बनविलें होतें. तूं मात्र कर्णाला आपल्या बाणांनींच ठार मारलेंस.

यावरून कर्णाच्या व्यक्तिमत्त्वाचा धाक व प्रभाव त्याच्या शत्रूंवर व मित्रांवर किती विलक्षण होता याचा प्रत्यय आल्यावांचून राहात नाहीं. कर्णाच्या दिग्विजयाचें महाभारतांत वर्णन असून त्यानें दोनदां तरी भारतवर्षांतील तत्कालीन सामर्थ्यशील सत्तांना धूळ चारल्याचे उल्लेख आहेत. एकदां तर त्यानें सम्राट जरासंधा-

सारख्या महापराक्रमी मल्लयुद्धविशारदाला देखील मल्लयुद्धांतच जिंकून थरकांपविलें होतें. यावरून युद्धकलेच्या सर्वच अंगांत तो किती कुशल नि समर्थ होता हें स्पष्ट होतें. महाभारतांत त्याच्या या पराक्रमाचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे :—

ततः कदाचिद्राजानः समाजग्मुः स्वयंवरे ।
कलिङ्गविषये राजन् राज्ञश्चित्राङ्गदस्य च ॥ २
श्रीमद्राजपुरं नाम नगरं तत्र भारत ।
राजानः शतशस्तत्र कन्यार्थे समुपागमन् ॥ ३
श्रुत्वा दुर्योधनस्तत्र समेतान् सर्वपार्थिवान् ।
रथेन काञ्चनाङ्गेन कर्णेन सहितो ययौ ॥ ४
ततः स्वयंवरे तस्मिन्संप्रवृत्ते महोत्सवे ।
समाजग्मुर्नृपतयः कन्यार्थे नृपसत्तम ॥ ५
शिशुपालो जरासन्धो भीष्मको वक्र एव च ।
कपोतरोमा नीलश्च रूक्मी च दृढविक्रमः ॥ ६
सृगालश्च महाराजः स्त्रीराज्याधिपतिश्च यः ।
अशोकः शतधन्वा च भोजो वीरश्च नामतः ॥ ७
एते चान्ये च बहवो दक्षिणां दिशमाश्रिताः ।
म्लेच्छाचार्याश्च राजानः प्राच्योदीच्यास्तथैव च ॥ ८
काञ्चनाङ्गदिनः सर्वे शुद्धजाम्बूनदप्रभाः ।
सर्वे भास्वरदेहाश्च व्याघ्रा इव बलोत्कटाः ॥ ९
ततः समुपविष्टेषु तेषु राजसु भारत ।
विवेश रंगं सा कन्या धात्री वर्षवरान्विता ॥ १०
ततः संश्राव्यमाणेषु राज्ञां नामसु भारत ।
अत्यक्रामद्धार्तराष्ट्रं सा कन्या वरवर्णिनी ॥ ११
दुर्योधनस्तु कौरव्यो नामर्षयत लङ्घनम् ।
प्रत्यषेधच्च तां कन्यामसत्कृत्य नराधिपान् ॥ १२
स वीर्यमदमत्तत्वाद्भीष्मद्रोणावुपाश्रितः ।
रथमारोप्य तां कन्यामाजहार नराधिपः ॥ १३
तमन्वगाद्रथी खड्गी बद्धगोधाङ्गुलित्रवान् ।
कर्णः शस्त्रभृतां श्रेष्ठः पृष्ठतः पुरुषर्षभ ॥ १४

ततो विमर्दः सुमहान् राज्ञामासीद्युयुत्सतां ।
सन्नह्यतां तनुत्राणि रथान्यो जयतामपि ।। १५
तेऽभ्यधावन्त संक्रुद्धाः कर्णदुर्योधनावुभौ ।
शरवर्षाणि मुञ्चन्तो मेघाः पर्वतयोरिव ।। १६
कर्णस्तेषामापततामेकैकेन शरेण ह ।
धनूंषि च शरव्रातान्पातयामास भूतले ।। १७
तता विधनुषः कांश्चित् कांश्चिदुद्यतकार्मुकान् ।
कांश्चिच्चोद्वहतो बाणान् रथशक्तिगदास्तथा ।। १८
लाघवाद्व्याकुलीकृत्य कर्णः प्रहरतां वरः ।
हतसूतांश्च भूयिष्ठानवजिग्ये नराधिपान् ।। १९
ते स्वयं वाहयन्तोऽश्वान् पाहि पाहीति वादिनः ।
व्यपेयुस्ते रणं हित्वा राजानो भग्नमानसाः ।। २०
दुर्योधनस्तु कर्णेन पाल्यमानोऽभ्ययात्तदा ।
हृष्टः कन्यामुपादाय नगरं नागसाह्वयम् ।।

—महाभारत, शांतिपर्व अध्याय ४

नारद उवाच

आविष्कृतबलं कर्णं श्रुत्वा राजा स मागधः ।
आह्वयद्द्वैरथेनाजौ जरासन्धो महीपतिः ।। १
तयोः समभवद्युद्धं दिव्यास्त्रविदुषोर्द्वयोः ।
युधि नानाप्रहरणैरन्योन्यमभिवर्षतोः ।। २
क्षीणबाणौ विधनुषौ भग्नखड्गौ महीं गतौ ।
बाहुभिः समसज्जेतामुभावपि बलान्वितौ ।। ३
बाहुकण्टकयुद्धेन तस्य कर्णोऽथ युद्धतः ।
बिभेद सन्धि देहस्य जरया श्लेषितस्य हि ।। ४
सविकारं शरीरस्य दृष्ट्वा नृपतिरात्मनः ।
प्रीतोऽस्मीत्यब्रवीत्कर्णं वीरमुत्सृज्य दूरतः ।। ५
प्रीत्या ददौ स कर्णाय मालिनीं नगरीमथ ।
अंगेषु नरशार्दूल स राजाऽऽसीत्सपत्नजित् ।। ६
पालयामास चम्पां च कर्णः परबलार्दनः ।
दुर्योधनस्यानुमते तवापि विदितं तथा ।। ७
एवं शस्त्रप्रतापेन प्रथितः सोऽभवत्क्षितौ । ८

—महाभारत, शांतिपर्व अध्याय ५

क्षत्रियांच्या तत्कालीन चालीप्रमाणें कलिंगदेशांत चित्रांगद नांवाच्या राजाच्या कन्येचें या सुमारास स्वयंवर रचलें गेलें. त्या स्वयंवरानिमित्त त्या राज्याच्या राजधानीचें राजपूर नगर, येथें अनेक राजे जमले. शिशुपाल, जरासंध, भीष्मक, कपोतरोमा, नील, रूक्मी, सृगाल, अशोक, शतधन्वा, भोज इत्यादि अनेक पराक्रमी राजे तेथें जमले असून मगधाधीश जरासंध हा त्या वेळीं आपल्या पराक्रमानें साऱ्या भारतवर्षाचा सम्राट् झालेला असल्यामुळें तो त्या राजमंडळांत नक्षत्रसमुदायांतल्या चंद्राप्रमाणें शोभत होता. उपस्थित राजमंडळांत पाण्डव नि यादव मात्र आलेले नव्हते. दुर्योधन यावेळीं हस्तिनापूरच्या राजाचा युवराज असून कर्ण हा त्याचा सेनापति होता. या स्वयंवराप्रीत्यर्थ युवराज दुर्योधन आपला सखा जो कर्ण त्याच्याबरोबर कलिंग राजनगरींत गेला. रीतीप्रमाणें स्वयंवरमंडपांत राजमंडळ येऊन आपआपल्या अधिकारानुरूप आपआपल्या आसनांवर बसल्यानंतर ती राजकन्या योग्यवेळीं आपल्या एका सखीबरोबर हातांत स्वयंवराची माळ घेऊन प्रविष्ट झाली. तत्कालीन रूढीप्रमाणें अनेक राजे लोकांचीं वर्णनें ऐकत व त्यांना डावलून ती दुर्योधनाचें सिंहासन उल्लंघून जात असतांना युवराज दुर्योधनानें तिला अडथळा केला. व बळानें तिला रथांत बसविलें व तिचें क्षत्रियोचित हरण केलें. त्यावेळीं एकच कोलाहल माजून सर्व उपस्थित राजे दुर्योधनावर चाल करून आले. तें पाहून दुर्योधनाच्या संरक्षणार्थ एकटया कर्णानें त्या सर्व राजसमूहावर चाल केली व आपल्या अमोघ अस्त्रज्ञानाच्या प्रभावानें त्या सगळयांचा पराभव करून त्यांना पळतां भुई थोडी केली. कर्णाचा हा अभूतपूर्व पराक्रम पाहून त्या राजांच्या मनांत इतकी धास्ती निर्माण झाली कीं, पळण्याशिवाय त्यांना दुसरी कोणतीही रणनीति सुचूं शकली नाहीं. कर्णाचा हा विलक्षण पराक्रम पाहतांच मगधाधिपति जरासंधाला त्याचें मोठें वैषम्य वाटलें व त्यानें कर्णाला द्वंद्वयुद्धासाठीं आव्हान दिलें. कर्णानेंही तें आव्हान मोठ्या आनंदानें स्वीकारलें. वस्तुतः जरासंधाशीं द्वंद्व युद्धाचें आव्हान स्वीकारणें म्हणजे मृत्यूच्या वासलेल्या जबडयांत उडी घेणेंच होय

असें त्यावेळीं समजलें जाई. पण कर्णानें त्याची यत्किंचितही तमा न बाळगतां जरासंधावर दिव्यास्त्रांची वृष्टि करावयास प्रारंभ केला. शेवटीं दोघांचीं शस्त्रास्त्रें संपल्यावर आपल्या आवडीचें मल्लयुद्ध करण्यासाठीं जरासंधानें कर्णाला आव्हान दिलें. कर्णानेंही तें आव्हान स्वीकारलें व सुविख्यात बाहुकण्टक नांवाचा डाव करून त्यानें जरासंधाला प्राणसंकटांत टाकलें. प्रतिपक्षाला शिवणीपासून मधून चिरून टाकणें व तेंही केवळ बाहूंच्या बळावर याला 'बाहुकंटक' असें म्हणतात. जरासंध कर्णाच्या मल्लयुद्धांतील प्रावीण्याचा तो प्रकार पहातांच त्याला शरण गेला व त्यानें त्याची मैत्री संपादन केली. कर्णाचें व आपलें हें नवें झालेलें मित्रत्व सदाचें रहावें म्हणून त्याच्या विक्रमाचें स्मारक चिन्ह या नात्यानें जरासंधानें त्याला 'मालिनी' नांवाची नगरी अर्पण केली. कर्णाच्या जरसंधावरील या विजयामुळें त्याच्या पराक्रमाच्या कीर्तीनें सारे दिक्कोन गर्जून उठले. हा विजय कर्णानें प्रासंगिक तरी मिळविला होता पण त्यानें मिळविलेला दुसरा विजय हा केवळ पृथ्वी जिंकण्याच्या उद्देशानेंच, स्वतःच्या एकटयाच्या भरंवशावर व ईर्ष्येनें मिळविला होता. त्याच्या या दुसऱ्या दिग्विजयानें दुर्योधनाला खऱ्या अर्थानें सम्राटपद दिलें. इतकेंच नव्हे तर धृतराष्ट्रापासची सारी कौरवराजसत्ता त्याच्या खड्गधारेच्या भरंवशावर स्थिर आहे हें त्यानें दुर्योधनाच्या व जगाच्याही दृष्टीनें सिद्ध करून दाखविलें. वनपर्वांत त्याचें पुढीलप्रमाणें वर्णन आहे :-

अनुजानीहि मां राजन् सभृत्यबलवाहनम् ।। १९
जेष्यामि पृथिवीं राजन् सशैलवनकाननाम् ।
जिता च पाण्डवैर्भूमिश्चतुर्भिर्बलशालिभिः ।। २०
तामहं ते विजेष्यामि एक एव न संशयः ।
सम्पश्यतु सुदुर्बुद्धिर्भीष्मः कुरुकुलाधमः ।। २१
तच्छ्रुत्वा तु वचो राजन् कर्णस्य भरतर्षभ ।
प्रीत्या परमया युक्तः कर्णमाह नराधिपः ।। २४
धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि यस्य मे त्वं महाबलः ।
हितेषु वर्तसे नित्यं सफलं जन्म चाद्य मे ।। २५

यदा च मन्यसे वीर सर्वशत्रुनिबर्हणम् ।
तदा निर्गच्छ भद्रं ते ह्यनुशाधि च मामिति ।। २६
एवमुक्तस्तदा कर्णो धार्तराष्ट्रेण धीमता ।
सर्वमाज्ञापयामास प्रायात्रिकमरिन्दम ।। २७
प्रययौ च महेष्वासो नक्षत्रे शुभदैवते ।
शुभे तिथौ मुहूर्ते च पूज्यमानो द्विजातिभिः ।। २८
मङ्गलैश्च शुभैः स्नातो वाग्भिश्चापि प्रपूजितः ।
नादयन् रथघोषेण त्रैलोक्यं सचराचरम् ।। २९

—महाभारत, वनपर्व अध्याय २५३

ततः कर्णो महेष्वासो बलेन महतावृतः ।
द्रुपदस्य पुरं रम्यं रुरोध भरतर्षभ ।। १
युद्धेन महता चैनं चक्रे वीरं वशानुगम् ।
सुवर्णं रजतं चापि रत्नानि विविधानि च ।। २
करं च दापयामास द्रुपदं नृपसत्तम ।
तं विनिर्जित्य राजेन्द्र राजानस्तस्य येऽनुगाः ।। ३
तान् सर्वान् वशागांश्चक्रे करं चैनानदापयत् ।
अथोत्तरां दिशं गत्वा वशे चक्रे नराधिपान् ।। ४
भगदत्तं च निर्जित्य राधेयो गिरिमारुहत् ।
हिमवन्तं महाशैलं युध्यमानश्च शत्रुभिः ।। ५
प्रययौ च दिशः सर्वान् नृपतीन् वशमानयत् ।
स हैमवतिकान् जित्वा करं सर्वानदापयत् ।। ६
नेपालविषये ये च राजानस्तानवाजयत् ।
अवतीर्य ततः शैलात् पूर्वां दिशमभिद्रुतः ।। ७
अङ्गान् वङ्गान् कलिङ्गांश्च शुण्डिकान् मिथिलानथ ।
मागधान् कर्कखण्डांश्च निवेश्य विषये ऽऽत्मनः ।। ८
आवशीरांश्च योध्यांश्च अहिक्षत्रं च निर्जयत् ।
पूर्वादिशं विनिर्जित्य वत्सभूमिं तथाऽगमत् ।। ९
वत्सभूमिं विनिर्जित्य केवलां मृत्तिकावतीम् ।
मोहनं पत्तनं चैव त्रिपुरीं कोसलां तथा ।। १०

एतान् सर्वान् विनिर्जित्य करमादाय सर्वशः ।
दक्षिणां दिशमास्थाय कर्णो जित्वा महारथान् ॥ ११
रुक्मिणं दाक्षिणात्येषु योधयामास सूतजः ।
स युद्धं तुमुलं कृत्वा रुक्मी प्रोवाच सूतजम् ॥ १२
प्रीतोऽस्मि तव राजेंद्र विक्रमेण बलेन च ।
न ते विघ्नं करिष्यामि प्रतिज्ञां समपालयम् ॥ १३
प्रीत्या चाहं प्रयच्छामि हिरण्यं यावदिच्छसि ।
समेत्य रुक्मिणा कर्णः पाण्डयं शैलं च सोऽगमत् ॥ १४
स केरलं रणे चैव नीलं चापि महीपतिम् ।
वेणुदारिसुतं चैव ये चान्ये नृपसत्तमाः ॥ १५
दक्षिणस्यां दिशि नृपान् करान् सर्वानदापयत् ।
शैशुपालिं ततो गत्वा विजिग्ये सूतनन्दनः ॥ १६
पार्श्वस्थांश्चापि नृपतीन् वशे चक्रे महाबलः ।
आवन्त्यांश्च वशे कृत्वा साम्ना च भरतर्षभ ।
वृष्णिभिः सह सङ्गम्य पश्चिमामपि निर्जयत् ॥ १७
वारुणीं दिशमागम्य यावनान् बर्बरांस्तथा ।
नृपान् पश्चिमभूमिस्थान् दापयामास वै करान् ॥ १८
विजित्य पृथिवीं सर्वां स पूर्वापरदक्षिणाम् ।
सम्लेच्छाटविकान् वीरः सपर्वतनिवासिनः ॥ १९
भद्रान् रोहितकांश्चैव आग्नेयान् मालवानपि ।
गणान् सर्वान् विनिर्जित्य नीतिकृत् प्रहसन्निव ॥ २०
शशकान् यवनांश्चैव विजिग्ये सूतनन्दनः ।
नग्नजित्प्रमुखांश्चैव गणान् जित्वा महारथान् ॥ २१
एवं स पृथिवीं सर्वां वशे कृत्वा महारथः ।
विजित्य पुरुषव्याघ्रो नागसाह्वयमागमत् ॥ २२
तमागतं महेष्वासं धार्तराष्ट्रो जनाधिपः ।
प्रत्युद्गम्य महाराज सभ्रातृपितृबान्धवः ॥ २३
अर्चयामास विधिना कर्णमाहवशोभिनम् ।
आश्रावयश्च तत् कर्म प्रीयमाणो जनेश्वरः ॥ २४

यन्न भीष्मान्न च द्रोणान्न कृपान्न च बाल्हिकात् ।
प्राप्तवानस्मि भद्रं ते त्वत्तः प्राप्तं मया हि तत् ॥ २५
बहुना च किमुक्तेन श्रृणु कर्ण वचो मम ।
सनाथोऽस्मि महाबाहो त्वया नाथेन सत्तम ॥ २६
न हि ते पाण्डवाः सर्वे कलामर्हन्ति षोडशीम् ।
अन्ये वा पुरुषव्याघ्र राजानोऽभ्युदितोदिताः ॥ २७
स भवान् धृतराष्ट्रं तं गान्धारीं च यशस्विनीम् ।
पश्य कर्ण महेष्वास अदितिं वज्रभृद्यथा ॥ २८
ततो हलहलाशब्दः प्रादुरासीद्विशांपते ।
हाहाकारश्च बहवो नगरे नागसाह्वये ॥ २९
केचिदेनं प्रशंसन्ति निन्दन्ति स्म तथा परे ।
तूष्णीमासंस्तथा चान्ये नृपास्तत्र जनाधिप ॥ ३०
एवं विजित्य राजेन्द्र कर्णः शस्त्रभृतां वरः ।
सपर्वतवनाकाशां ससमुद्रां सनिष्कुटाम् ॥ ३१
देशैरुच्चावचैः पूर्णा पत्तनैर्नगरैरपि ।
द्वीपैश्चानूपसम्पूर्णैः पृथिवीं पृथिवीपते ॥ ३२
कालेन नातिदीर्घेण वशे कृत्वा तु पार्थिवान् ।
अक्षयं धनमादाय सूतजो नृपमभ्ययात् ॥ ३३
प्रविश्य च गृहं राजन्नभ्यन्तरमरिंदम ।
गान्धारीसहितं वीरो धृतराष्ट्रं ददर्श सः ॥ ३४
पुत्रवच्च नरव्याघ्र पादौ जग्राह धर्मवित् ।
धृतराष्ट्रेण चाश्लिष्य प्रेम्णा चापि विसर्जितः ॥ ३५
तदाप्रभृति राजा च शकुनिश्चापि सौबलः ।
जानते निर्जितान् पार्थान् कर्णेन युधि भारत ॥ ३६

—महाभारत, वनपर्व अध्याय २५४

"कर्ण दुर्योधनाला म्हणाला कीं, हे राजा! मला आज्ञा दे. मी माझ्या सैन्याच्या भरंवशावर ही सर्व पृथ्वी जिकीन. बलशाली पाण्डवांनीं ही पृथ्वी जिकली. मी एकटा त्या पृथ्वीचा विजय करीन. कुरुकुलाधम दुर्बुद्धि भीष्मानें माझा पराक्रम पहावा. हें ऐकतांच अत्यंत प्रेमानें दुर्योधन कर्णाला म्हणाला कीं, आज मी अत्यंत धन्य आहें.

तुझ्यासारखा बलवान् महापुरुष नेहमीं माझ्या हिताची चिंता करतो ही मोठी ईश्वरी कृपाच होय. यामुळें माझें जीवन सफल झाल्यासारखें वाटतें. ज्यावेळीं तुला सोयीचें वाटेल त्या वेळीं तूं अवश्य जा. याप्रमाणें दुर्योधनानें सांगितल्यावर शुभनक्षत्रीं नि शुभतिथीला स्वस्तिवाचन करून व सर्व प्रकारचीं मंगलें करून कर्णानें ब्राह्मणांचे आशीर्वाद घेतले व आपल्या रथघोषानें त्रैलोक्य निनादित करीत तो दिग्विजयार्थ निघाला. त्यानें आपल्या सैन्यानें प्रथम पांचालांना जिंकून राजा द्रुपदाजवळून मणि व रत्नांचा नि सुवर्णाचा पुष्कळ करभार घेतला. त्या वेळीं तर उत्तर दिशेकडील सर्व राजांना जिंकून भगदत्तालाही त्यानें जिंकलें. नंतर हिमालयाच्या पायथ्याजवळचीं सर्व राज्यें जिंकून त्यांचा करभार घेतला. नंतर नेपाळ, अंग-वंग, कलिंग, शुण्डिक, मिथिला, मगध इत्यादि देशांना जिंकून नंतर पूर्व दिशेचा त्यानें विजय केला. त्यानंतर दक्षिण दिशेकडे वळून रुक्मीप्रभृति राजांच्या जवळून करभार घेऊन नंतर पाण्डच, शल्य, केरळ इत्यादि राजांवर त्यानें विजय संपादन केला. त्यानंतर पश्चिमेकडे वळून चेदिदेश, अवंती, निरनिराळीं गण-राज्यें, इत्यादि त्यानें जिंकलीं. यादवांशीं युद्ध करण्याच्या भान-गडींत न पडतां त्यानें सामोपचारानेंच त्यांच्याशीं युद्ध टाळलें. याप्रमाणें सर्व पृथ्वीचा दिग्विजय करून कर्ण ज्या वेळीं हस्तिनापुरांत परत आला त्यावेळीं राजा दुर्योधन सर्वांसह त्याला सामोरा गेला. व त्याचा थाटानें आदरसत्कार करून सर्वांसमक्ष त्यानें त्याला असें म्हटलें कीं, भीष्म, द्रोण, कृपाचार्य, बाल्हीक यांच्याकडून जें मला मिळालें नाहीं तें पद तूं मला मिळवून दिलें आहेस. फार काय सांगावें, कर्णा, तुझ्यामुळें मी 'सनाथ' झालों आहें. पाण्डव अथवा इतर पराक्रमी राजे तुझ्या पराक्रमाच्या सोळाव्या अंशाची देखील बरोबरी करूं शकत नाहींत. महाराज धृतराष्ट्र व देवी गान्धारी यांचें तूं दर्शन घे. महेन्द्र ज्याप्रमाणें अदितीकडे जातो त्याप्रमाणें तूं गांधारीचें दर्शन घे. याप्रमाणें राजानें सांगतांच अंतःपुरांत जाऊन कर्णानें धृतराष्ट्र व गांधारी यांची भेट घेतली व पुत्राप्रमाणें त्यांच्या पायावर मस्तक ठेविलें. धृतराष्ट्रानेंही इतरांप्रमाणेंच त्याला हृदयाशीं लावून

निरोप दिला. त्या दिवसापासून शकुनि व दुर्योधन कर्णानें पाण्डवांना जिंकलेंच आहे असें मानूं लागले." कुरुपाण्डवांच्या महायुद्धांतही कर्णाच्या अशाच देदीप्यमान पराक्रमाचीं उदाहरणें आहेत. घटोत्कचासारख्या सर्वस्वीं अजेय होऊन राहिलेल्या मायावी योद्ध्याला त्यानेंच ठार मारलें. युधिष्ठिराच्या गळ्यांत धनुष्य टाकून त्याचा पराजय करण्याची जी प्रतिज्ञा आचार्य द्रोण पूर्ण करूं शकले नाहींत ती कर्णानें पूर्ण करून दाखविली आहे. इतकेंच काय, पण नकुलसहदेव व भीमसेनासारखा अद्वितीय योद्धाही त्यानें आपल्या सेनापतित्वाच्या पूर्वार्धांतच पराजित करून पाण्डवसेनेंतील पार्थ व श्रीकृष्ण सोडून इतर सर्व मोठमोठ्या योद्ध्यांना आपल्या पराक्रमानें चळचळां कांपावयास लावलें आहे. पण कर्ण हा नुसताच पराक्रमी योद्धा असता तर तो एखादा राक्षस ठरून त्याच्याविषयीं अलौकिक आकर्षण खात्रीनें निर्माण झालें नसतें. तसें तें निर्माण झालें याचें कारण अलौकिक पराक्रमाबरोबरच अनेक दिव्य अभिजात गुण त्याच्या ठिकाणीं होते. महारथी कर्ण हा जसा पराक्रमी त्याचप्रमाणें तो महान् दानशूर, तपस्वी व ब्राह्मण्य होता. महाभारताच्या आदिपर्वांत त्याच्या तपस्येचें व व्रतनिष्ठतेचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतें:

**आपृष्ठतापादादित्यमुपातिष्ठत वीर्यवान् ॥ २५**
**तस्मिन्काले तु जपतस्तस्य वीरस्य धीमतः ।**
**नादेयं ब्राह्मणेष्वासीत्किंचिद्वसु महीतले ॥ २६**

**—महाभारत, आदिपर्व अध्याय १११**

रोज सकाळीं कर्ण नदीतटाकावर जाऊन सूर्याकडे पहात त्याची उपासना करी. समोरचें ऊन पाठीवर येऊन पाठ चांगली तापून निघेपर्यंत त्याची ही उपासना चालत असे. त्या त्याच्या तपश्चर्येच्या वेळीं ब्राह्मणांना अदेय असें त्याच्याजवळ कांहींही नसे.

कर्णाचा वध झाल्यावर त्याचें असेंच वर्णन कर्णपर्वांतही केलेलें आढळतें.

**हतो वैकर्तनः कर्णः सपुत्रः सहवाहनः ।**
**अर्थिनां पक्षिसंघस्य कल्पवृक्षो निपातितः ॥ ४४**

ददानीत्येव योऽवोचन्न नास्तीत्यर्थितोऽर्थिभिः ।
सद्भिः सदा सत्पुरुषः स हतो द्वैरथे वृषः ।। ४५
यस्य ब्राह्मणसात्सर्वं वित्तमासीन्महात्मनः ।
नादेयं ब्राह्मणेष्वासीद्यस्य स्वमपि जीवितम् ।। ४६
सदा स्त्रीणां प्रियो नित्यं दाता चैव महारथः ।
स वै पार्थास्त्रनिर्दग्धो गतः परमिकां गतिम् ।। ४७

—महाभारत, कर्णपर्व अध्याय ९४.

वैकर्तन कर्ण मेला याचा अर्थ आज याचकरूपी पक्षांच्या थव्यांचा कल्पवृक्षच अर्जुनानें तोडून खालीं पाडला आहे. ज्यानें केवळ 'देतों' असा एकच शब्द याचकांना ऐकविला. 'नाहीं' असा शब्द कधींही ऐकवला नाहीं. सज्जनांकडून जो नेहमीं सत्पुरुषच म्हणविला गेला तो कर्ण आज संपला. ज्याचें सर्व वित्त केवळ ब्राह्मणांसाठींच होतें. व वित्तच काय पण ज्याचें जीवितदेखील ब्राह्मणांना अदेय म्हणून नव्हतें तो वैकर्तन कर्ण आज संपला. जो स्त्रियांना अत्यंत प्रिय, महान् दाता, व श्रेष्ठ महारथी म्हणून विख्यात होता तो आज अर्जुनाच्या अस्त्रानें दग्ध होऊन परम गतीला गेला. प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णांनींही कर्णाच्या ज्ञानासंबंधीं व विचक्षणतेसंबंधीं पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत :—

उपासितास्ते राधेय ब्राह्मणा वेदपारगाः ।
तत्त्वार्थं परिपृष्टाश्च नियतेनानसूयया ।। ६
त्वमेव कर्ण जानासि वेदवादान् सनातनान् ।
त्वमेव धर्मशास्त्रेषु सूक्ष्मेषु परिनिष्ठितः ।। ७

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १४०

"हे राधया ! तूं शुद्ध अंतःकरणानें व्रतस्थ राहून वेदविद्येंत पारंगत असलेल्या ब्राह्मणांची सेवा करून त्यांच्या जवळून रहस्यज्ञान प्राप्त करून घेतलें आहेस. सनातन वेदविद्येचें तुला यथार्थ ज्ञान असून धर्मशास्त्रांचें सूक्ष्म रहस्य कळून घेण्यासाठीं तूं अपार परिश्रम केले आहेस."

श्रीकृष्णांसारख्या व्यक्तीनें ज्याच्यासंबंधीं हे उद्गार काढावे त्या व्यक्तीची महत्ता तशीच असली पाहिजे यांत शंका नाहीं.

कर्णाच्या सर्व सद्‌गुणांत त्याची अद्वितीय दानशूरता नेहमींच देदीप्य-मान तेजानें तळपून उठलेली आहे.

## अलौकिक दानशूरत्व

कर्ण दानी होता याचा अर्थ त्याच्यापेक्षां अधिक संपत्ति कुणी कुणाला दिली नसेल असें नाहीं. मनुष्य जेव्हां एखाद्या विशेष गोष्टींत सर्व-श्रेष्ठ म्हणून समजला जातो तेव्हां त्याचें त्या बाबतींतलें खरें महत्त्व जीवितापेक्षांही तो ती बाब अधिक मोलाची समजतो व तिच्यासाठीं प्रसंगीं आपलें जीवितही पणास लावावयास सिद्ध असतो यांत आहे. कर्णाची दानशूरताही अशाच स्वरूपाची महाव्रताची बाब ठरलेली आहे. महाकवि कालिदासानें असें म्हटलें आहे कीं ' हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा ' सुवर्णाची खरी परीक्षा अग्नींतच होते. त्याचप्रमाणें ज्या गोष्टींच्यामुळें एखादी व्यक्ति महापुरुष ठरते त्या गोष्टीसंबंधींच्या तिच्या निष्ठेची परीक्षाही आपत्तीच्या भट्टींत जीवित कीं व्रत असा प्रश्न उत्पन्न होऊन त्यांत जीविताऐवजीं व्रताची बाजूच महत्त्वाची ठरण्यांत होत असते. कर्णाच्या आयुष्यांतही त्याच्या दानवीरतेचें सुवर्ण अशाच आपत्तीच्या अग्निपरीक्षेंतून तावून सुलाखून बाहेर पडलेलें आहे. म्हणूनच त्यासंबंधीं तो केवळ अद्वितीय होऊन राहिलेला आहे. अनेकांचे नेत्र त्यामुळें स्तिमित झाले आहेत तो प्रसंग असाः— त्याच्या दातृत्वाचा लाभ घेऊन, त्याच्या घातक क्रोधापासून अर्जुनाचें संरक्षण करावें अशी इच्छा अर्जुनाचा पिता देवराज इंद्र याला झाली. इंद्राला हें माहीत होतें कीं कर्णाच्या अंगा-जवळ जन्मतःच त्याला लाभलेलें सहज कवच आहे नि देदीप्यमान कुंडलें त्याच्या कानांना शोभवीत आहेत, तोंवर अर्जुनाला त्याचा पूर्ण निःपात करतां येणें शक्य नाहीं. कर्णाच्या अंगांतील कवच व त्याचीं कुंडलें ही अमृतापासून उत्पन्न झालेलीं असून त्यामुळें तो अवध्य आहे अशी समजूत असे. कपटानें या दोन्ही वस्तु कर्णाजवळून काढून घ्यावयाचें देवेंद्रानें ठरविलें. त्या वस्तू कर्णाजवळून काढून घ्याव-याचा केवळ एकच मार्ग होता. व तो म्हणजे ब्राह्मणवेषानें कर्णाजवळ त्यांची याचना करणें हा होय. कर्णाचा नियम माहीत असल्यामळें

त्याच्या सूर्योपासनेच्या वेळींच देवेंद्रानें आपला बेत सिद्धीस न्यावयाचें ठरविलें. इंद्रानें हा बेत आपल्याकडून गुप्त ठेवण्याची शक्य ती सारी दक्षता घेतली. पण शेवटीं त्या गुप्ततेला वाचा फुटून कर्णाचे वडील सूर्यनारायण यांना ती वार्ता कळली. देवराज इंद्र आपल्या पुत्राच्या संरक्षणासाठीं कर्णाचा सर्वनाश करावयास सिद्ध आहेत हें पहातांच सूर्याला स्वतःच्या पुत्राविषयीं मोठा कळवळा उत्पन्न झाला. इंद्राचा हा बेत कर्णाला आधींच कळवून त्याला सावध करावें या हेतूनें सूर्य इंद्र येण्याच्या आधल्याच दिवशीं स्वप्नांत ब्राह्मणवेषानें येऊन कर्णाला इंद्राचें हें कपट सांगून सचेत करूं लागला. तो म्हणाला कीं :

कर्ण मद्वचनं तात शृणु सत्यभृतां वर ।
ब्रुवतोऽद्य महाबाहो सौहृदात् परमं हितम् ॥ १०
उपायास्यति शक्रस्त्वां पाण्डवानां हितेप्सया ।
ब्राह्मणच्छद्मना कर्ण कुण्डलोपजिहीर्षया ॥ ११
विदितं तेन शीलं ते सर्वस्य जगतस्तथा ।
यथा त्वं भिक्षितः सद्भिर्ददास्येव न याचसे ॥ १२
त्वं हि तात ददास्येव ब्राह्मणेभ्यः प्रयाचितम् ।
वित्तं यच्चान्यदप्याहुर्न प्रत्याख्यासि कस्यचित् ॥ १३
त्वां तु चैवंविधं ज्ञात्वा स्वयं वै पाकशासनः ।
आगन्ता कुण्डलार्थाय कवचं चैव भिक्षितुम् ॥ १४
तस्मै प्रयाचमानाय न देये कुण्डले त्वया ।
अनुनेयः परं शक्त्या श्रेय एतद्धि ते परम् ॥ १५
कुण्डलार्थे ब्रुवंस्तात कारणैर्बहुभिस्त्वया ।
अन्यैर्बहुविधैर्वित्तैः सन्निवार्यः पुनः पुनः ॥ १६
रत्नैः स्त्रीभिस्तथा गोभिर्धनैर्बहुविधैरपि ।
निदर्शनैश्च बहुभिः कुण्डलेप्सुः पुरन्दरः ॥ १७
यदि दास्यसि कर्ण त्वं सहजे कुण्डले शुभे ।
आयुषः प्रक्षयं गत्वा मृत्योर्वशमुपैष्यसि ॥ १८
कवचेन समायुक्तः कुण्डलाभ्यां च मानद ।
अवध्यस्त्वं रणेऽरीणामिति विद्धि वचो मम ॥ १९

अमृतादुत्थितं ह्येतदुभयं रत्नसम्भवम् ।
तस्माद्रक्ष्यं त्वया कर्ण जीवितं चेत्प्रियं तव ॥ २०
—महाभारत, वनपर्व अध्याय ३००

हे कर्णा ! उद्यां सकाळीं पाण्डवांचें हित साधण्याच्या इच्छेनें ब्राह्मणाचा वेष घेऊन कपटी इंद्र तुझ्याजवळ येऊन कवचकुण्डलांची भिक्षा मागणार आहे. याचकांना व त्यांतून विशेषत: ब्राह्मणांना कधींही 'नाहीं' न म्हणण्याच्या तुझ्या अपूर्व व्रताची इंद्राला पूर्ण कल्पना असल्यामुळेंच तुझ्या विनाशाचें हें कारस्थान त्यानें शिजविलें आहे. पण त्याचें हें कपट समजल्यामुळें मला तुझ्याविषयीं चिंता वाटून केवळ प्रेम म्हणून या गोष्टीची तुला आधींच कल्पना द्यावी यास्तव मी या वेषानें स्वप्नांत तुझी गांठ घ्यावयास बुद्धयाच आलों. इंद्रानें यासंबंधीं तुला कितीही आग्रह केला तरी हवीं तीं कारणें दाखवून तूं त्याला निराश कर. रत्नें, स्त्रिया, वाटेल तें धन अथवा इतर कांहींही तूं त्याला देऊं कर. पण कवच नि कुंडलें देऊं नकोस. हीं कवचकुंडलें तुला जन्मापासूनच लाभलीं असून जर तीं तूं इंद्राला दिलींस तर तुला मृत्यु प्राप्त झाल्यावांचून राहणार नाहीं. जोंवर तूं या सहज कवचकुंडलांनीं युक्त आहेस, तोंवर शत्रु तुला युद्धांत मारूं शकत नाहींत. तूं केवळ अवध्य आहेस. तुझीं कवचकुंडलें अमृतापासून उत्पन्न झालेलीं असून देवांची दुर्लभ देणगी म्हणून तूं या वस्तूंना जपलें पाहिजेस. जर तुला स्वत:च्या जीविताची कांहीं आस्था असेल तर मी सांगतों त्याकडे नीट लक्ष दे व त्याप्रमाणें वाग. कर्णानें हें ऐकतांच त्याला मोठें आश्चर्य वाटलें. त्यानें विचारलें कीं माझ्याविषयीं इतकें अपरंपार प्रेम बाळगणारे आपण कोण आहांत? त्या ब्राह्मणानें कर्णाला सांगितलें कीं मी सूर्य असून मी तुझ्या हितासाठीं तळमळावें असाच तुझा व माझा संबंध ईश्वरेच्छेनें प्रस्थापित झालेला आहे. तो संबंध काय आहे हें मला तुला सांगतां येत नाहीं. पण माझ्या अंत:करणांत तुझ्याविषयीं स्वाभाविक प्रेम नांदत असून तुझ्या कल्याणाची सतत चिंता वहाणें व त्यासाठीं खटपट करणें हें माझें परम कर्तव्य आहे. कर्णानें सूर्य हीं अक्षरें कानावर पडतांच त्या ब्राह्मणाला साष्टांग वंदन केलें व विनयानें हात जोडून तो म्हणाला :

श्रेय एव ममात्यन्तं यस्य मे गोपतिः प्रभुः ।
प्रवक्ताऽद्य हितान्वेषी शृणु चेदं वचो मम ।। २३
प्रसादये त्वां वरदं प्रणयाच्च ब्रवीम्यहम् ।
न निवार्यो व्रतादस्मादहं यद्यस्मि ते प्रियः ।। २४
व्रतं वै मम लोकोऽयं वेत्ति कृत्स्नं विभावसो ।
यथाऽहं द्विजमुख्येभ्यो दद्यां प्राणानपि ध्रुवम् ।। २५
यद्यागच्छति मां शक्रो ब्राह्मणच्छद्मना वृतः ।
हितार्थं पाण्डुपुत्राणां खेचरोत्तम भिक्षितुम् ।। २६
दास्यामि विबुधश्रेष्ठ कुण्डले वर्म चोत्तमम् ।
न मे कीर्तिः प्रणश्येत त्रिषु लोकेषु विश्रुता ।। २७
मद्विधस्य यशस्यं हि न युक्तं प्राणरक्षणम् ।
युक्तं हि यशसा युक्तं मरणं लोकसम्मतम् ।। २८
सोऽहमिन्द्राय दास्यामि कुण्डले सह वर्मणा ।
यदि मां बलवृत्रघ्नो भिक्षार्थमुपयास्यति ।। २९
हितार्थं पाण्डुपुत्राणां कुण्डले मे प्रयाचितुम् ।
तन्मे कीर्तिकरं लोके तस्याकीर्तिर्भविष्यति ।। ३०
वृणोमि कीर्तिं लोके हि जीवितेनापि भानुमन् ।
कीर्तिमानश्नुते स्वर्गं हीनकीर्तिस्तु नश्यति ।। ३१
कीर्तिर्हि पुरुषं लोके सञ्जीवयति मातृवत् ।
अकीर्तिर्जीवितं हन्ति जीवतोऽपि शरीरिणः ।। ३२
अयं पुराणः श्लोको हि स्वयं गीतो विभावसो ।
धात्रा लोकेश्वर यथा कीर्तिरायुर्नरस्य ह ।। ३३
पुरुषस्य परे लोके कीर्तिरेव परायणम् ।
इह लोके विशुद्धा च कीर्तिरायुर्विवर्धनी ।। ३४
सोऽहं शरीरजे दत्वा कीर्तिं प्राप्स्यामि शाश्वतीम् ।
दत्वा च विधिवद्दानं ब्राह्मणेभ्यो यथाविधि ।। ३५
हुत्वा शरीरं सङ्ग्रामे कृत्वा कर्म सुदुष्करम् ।
विजित्य च परानाजौ यशः प्राप्स्यामि केवलम् ।। ३६
भीतानामभयं दत्वा सङ्ग्रामे जीवितार्थिनाम् ।
वृद्धान् बालान् द्विजातींश्च मोक्षयित्वा महाभयात् ।। ३७

**प्राप्स्यामि परमं लोके यशः स्वर्ग्यमनुत्तमम् ।**
**जीवितेनापि मे रक्ष्या कीर्तिस्तद्विद्धि मे व्रतम् ।। ३८**
**सोऽहं दत्वा मघवते भिक्षामेतामनुत्तमाम् ।**
**ब्राह्मणच्छद्मिने देव लोके गन्ता परां गतिम् ।। ३९**

—महाभारत, वनपर्व अ. ३००

"सर्व चराचरांचे स्वामी भगवान् सूर्यनारायण माझ्या हिताची काळजी वाहतात व मला हितोपदेश करावयास येतात ही जशी अत्यंत भाग्याची गोष्ट आहे त्याचप्रमाणें त्यांचा तो उपदेश मी प्रत्यक्ष आचरूं शकत नाहीं ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट आहे. आपणावर माझी अत्यंत निष्ठा आहे. अविनयाची क्षमा असावी. मी आपल्याला साष्टांग वंदन करतों. पण माझी आपल्या चरणांजवळ अशी नम्र प्रार्थना आहे कीं, जर आपलें माझ्यावर यत्किंचितही प्रेम असेल तर माझ्या व्रतापासून आपण मला भ्रष्ट करूं नये. याचक म्हणून माझ्या दारीं आलेल्या ब्राह्मणाला त्यानें जर माझे प्राण मागितले तर तेसुद्धां मी देईन. पण माझ्या दारांतून विन्मुख म्हणून जाऊं देणार नाहीं असें माझें व्रत आहे. प्रत्यक्ष देवराज महेन्द्र जर ब्राह्मणाचा वेष घेऊन माझ्या दारीं भिक्षा मागावयास येत असेल तर माझ्यासारख्या मानवाचें भाग्यच उजळलें म्हटलें पाहिजे. त्रैलोक्याचा राजा भिकारी होऊन माझ्या दाराशीं उभा राहिला असतां, त्याच्यासारख्याला विन्मुख जाऊं देणें मला शोभेल काय ? माझी त्रिभुवनविख्यात कीर्ति ज्यामुळें नष्ट होणार नाहीं असें वागणें हेंच याप्रसंगीं माझें कर्तव्य आहे. ब्राह्मणवेषधारी इंद्राला मी अवश्य कवचकुंडलांची भिक्षा देईन. मरण जगांत कोणाला चुकलें आहे? माझ्यासारख्या वीरांना यश कलंकित करून जगण्यापेक्षां आपल्या यशानें व कीर्तीनें साऱ्या त्रिभुवनाचे दिक्कोन गर्जवून लाभणारें मरण अधिक देदीप्यमान व श्रेयस्कर वाटतें. बल व वृत्रासुर यांना ठार मारणारा पराक्रमी इंद्र माझ्या दारीं भिक्षेकरी म्हणून उभा रहातो ही कल्पनाच माझ्या मनाला इतकी मोह पाडते कीं माझ्यावर केवढेंही संकट येऊन कोसळणार असलें तरी मी कवच नि कुंडलें दान म्हणून इंद्राला दिल्याविना

रहाणार नाहीं. पाण्डवांच्या हितासाठीं कां होईना पण इंद्रासारख्या समर्थ देवाधिदेवालाही कपटाचा व लाचारीचा मार्ग स्वीकारावा लागला यांत त्याची अपकीर्ति होणार आहे. उलट सर्वनाश दिसत असतांनाही मीं मात्र माझें व्रत सोडलें नाहीं ही माझी कीर्ति सगळ्या त्रिभुवनांत पसरणार आहे. असा मंगल क्षण कोणाच्याही आयुष्यांत क्वचितच उगवतो. तो मी कधींतरी व्यर्थ दवडीन काय ? प्राण गमावूनही मी अवश्य कीर्ति संपादन करीन. कीर्तिहीन मनुष्य जिवंत असला तरी वस्तुत: तो मेलेलाच असतो. व कीर्तिवन्तालाच स्वर्गाचा विजेता होण्याचा मान मिळतो. कीर्ति ही कर्तृत्ववान् पुरुषांना जीवन देणारी माताच होय. कीर्तिहीन जीवन म्हणजे मृताचें जीवन. तें कसलें जीवन ? प्रत्यक्ष मरणच तें ! एक जुनी म्हण आहे व ती प्रत्यक्ष ब्रह्मदेवानेंच प्रचलित केली असें मीं ऐकलें आहे. कीर्ति हेंच मनुष्याचें खरें आयुष्य होय ! हीच ती म्हण होय. पुरुषाचें सर्वश्रेष्ठ कर्तव्य, त्याचा सर्व श्रेष्ठ आधार, त्याचा सर्वश्रेष्ठ जीवनरस म्हणजे त्याची देदीप्यमान विमल कीर्तीच होय. म्हणून मी सहज कवचकुंडलांचें दान करून शाश्वत कीर्तीचा सदाचा लाभ करून घेईन. इंद्र ब्राह्मण म्हणून येतो आहे ना ? मग त्याच्यासारख्या अतिथीला ईप्सित वस्तूंचें यथावत् दान करणें हेंच माझें कर्तव्य ठरतें. तें दान केल्यानंतर संग्रामांत मी कवचहीन स्थितींतही अत्यंत दुर्धर पराक्रम प्रकट करून इतरांना अशक्य असें कर्म करून दाखवीन. संग्रामांत मी सर्व शत्रूंचा पराभव करीन. भयभीतांना अभय देईन. जीवदानाची याचना करणाऱ्यांना ऐन युद्धाच्या धुमश्चक्रींतही वांचवीन. वृद्ध, बाल नि ब्राह्मण यांची महान् संकटापासून मुक्तता करून अद्वितीय यश व स्वर्गाची प्राप्ति करून घेण्याकरितां अति प्रबळ शत्रूनें पेटविलेल्या रणसंग्रामाच्या महायज्ञांत स्वत:च्या शरीराचें व जीविताचेंही हवन करून शाश्वत अमरपद मी प्राप्त करून घेईन. जीवित कीं कीर्ति हा पेंच माझ्यापुढें तुम्ही टाकला आहे. कीर्ति कलंकित करून निलाजरें व भ्याड जीवन मी पत्करीत नाहीं. तर व्रतपालन करून जीवनाच्या विनिमयानें मिळणारी शाश्वत कीर्तीच मी पत्करतों. देवेंद्राचा मी मान करीन. त्याची भिक्षा मी

त्याला अवश्य देईन. शत्रूकडून मला मरण आलें तरी चालेल. पण देवेंद्राचा 'वरदाता' ही कीर्ति मिळवून अन्तीं श्रेष्ठलोक प्राप्त करून घेण्याचा लाभलेला परम मंगल असा हा क्षण मी कधींही व्यर्थ दवडणार नाहीं."

कर्णाचा हा हटवाद ऐकतांच सूर्याला तो अहंकारी वाटला. पण त्याचें अपत्यप्रेम जागृत होऊन त्यानें कर्णाला फिरून मोठ्या कळवळ्यानें उपदेश करावयास प्रारंभ केला. तो म्हणाला कीं :-

**माऽहितं कर्ण कार्षीस्त्वमात्मनः सुहृदां तथा ।**
**पुत्राणामथ भार्याणामथो मातुरथो पितुः ।। १**
**शरीरस्याविरोधेन प्राणिनां प्राणभृद्वर ।**
**इष्यते यशसः प्राप्तिः कीर्तिश्च त्रिदिवे स्थिरा ।। २**
**यस्त्वं प्राणविरोधेन कीर्तिमिच्छसि शाश्वतीम् ।**
**सा ते प्राणान् समादाय गमिष्यति न संशयः ।। ३**
**जीवतां कुरुते कार्यं पिता माता सुतास्तथा ।**
**ये चान्ये बान्धवाः केचिल्लोकेऽस्मिन् पुरुषर्षभ ।। ४**
**राजानश्च नरव्याघ्र पौरुषेण निबोध तत् ।**
**कीर्तिश्च जीवतः साध्वी पुरुषस्य महाद्युते ।। ५**
**मृतस्य कीर्त्या किं कार्यं भस्मीभूतस्य देहिनः ।**
**मृतः कीर्तिं न जानीते जीवन् कीर्तिं समश्नुते ।। ६**
**मृतस्य कीर्तिर्मर्त्यस्य यथा माला गतायुषः ।**
**अहं तु त्वां ब्रवीम्येतद् भक्तोऽसीति हितेप्सया ।। ७**
**भक्तिमन्तो हि मे रक्ष्या इत्येतेनापि हेतुना ।**
**भक्तोऽयं परया भक्त्या मामित्येव महाभुज ।। ८**
**ममापि भक्तिरुत्पन्ना स त्वं कुरु वचो मम ।**
**अस्ति चात्र परं किञ्चिदध्यात्मं देवनिर्मितम् ।**
**अतश्च त्वां ब्रवीम्येतत् क्रियतामविशङ्कया ।। ९**
**देवगुह्यं त्वया ज्ञातुं न शक्यं पुरुषर्षभ ।**
**तस्मान्नाख्यामि ते गुह्यं काले वेत्स्यति तद्भवान् ।। १०**
**पुनरुक्तं च वक्ष्यामि त्वं राधेय निबोध तत् ।**
**माऽस्मै ते कुण्डले दद्या भिक्षिते वज्रपाणिना ।। ११**

शोभसे कुण्डलाभ्यां च रुचिराभ्यां महाद्युते ।
विशाखयोर्मध्यगतः शशीव विमले दिवि ॥ १२
कीर्तिश्च जीवतः साध्वी पुरुषस्येति विद्धि तत् ।
प्रत्याख्येयस्त्वया तात कुण्डलार्थे सुरेश्वरः ॥ १३
शक्या बहुविधैर्वाक्यैः कुण्डलेप्सा त्वयाऽनघ ।
विहन्तुं देवराजस्य हेतुयुक्तैः पुनः पुनः ॥ १४
हेतुमदुपपन्नार्थैर्माधुर्युकृतभूषणैः ।
पुरन्दरस्य कर्ण त्वं बुद्धिमेतामपानुद ॥ १५
त्वं हि नित्यं नरव्याघ्र स्पर्धसे सव्यसाचिना ।
सव्यसाची त्वया चेह युधि शूरः समेष्यति ॥ १६
न तु त्वामर्जुनः शक्रः कुण्डलाभ्यां समन्वितम् ।
विजेतुं युधि यद्यस्य स्वयमिन्द्रः सखा भवेत् ॥ १७
तस्मान्न देये शक्राय त्वयैते कुण्डले शुभे ।
सङ्ग्रामे यदि निर्जेतुं कर्ण कामयसेऽर्जुनम् ॥ १८

—महाभारत, वनपर्व अध्याय ३०१

"ह्या कृत्यानें अभिमानाच्या वृथा भरीस पडून तूं स्वतः तर शोकांत पडणार आहेसच; पण तुझें पालनपोषण करणारे आई-बाप, स्त्रिया, मुलें व तुझ्या पराक्रमावर आपल्या वैभवमंदिराची सुखस्वप्नें पाहणारे तुझे सर्व सुहृद् कायमच्या दुःखांत पडणार आहेत. त्यांचें अहित घडून येण्यासारखें कृत्य करण्यांत तूं काय साधशील? स्वतःच्या शरीराशीं व प्राणांशीं विनाकरण खेळ न करतां जगांत अभूतपूर्व पराक्रम प्रकट करून तुला यश, कीर्ति, व स्वर्गातलें उच्चतम स्थानही मिळवितां येईल. जिवंत राहिलास तर कीर्तीचे अनेक प्रसंग तुला साधतां येतील. प्राण गमावून कीर्ति संपादन करण्याचा तूं जो विनाकारण हट्ट धरला आहेस तो जगांतील व्यवहार-वादी विचक्षण लोकांच्या मतें केवळ अहंकारी मूर्खपणाच ठरेल. त्यानें तुझे प्राण तर जातीलच पण कीर्तीही होणार नाहीं. जे जिवंत राहतात ते आपल्या सर्व नातलगांना सुख देत असतात व विनाकारण प्राण न गमवतां आजवर अनेक राजांनीं आपल्या देदीप्यमान पराक्र-माच्या भरंवशावर शाश्वत कीर्ति संपादन केली आहे. हे तेजस्वी कर्णा,

मरून एकदां देहाची राख झाल्यावर तुझ्या कीर्तीच्या आनंदाचा तुला काय उपयोग होणार आहे? जिवंत असतांना कीर्ति झाली तर तिच्यामुळें आत्मसमाधानाचें सुख तरी अनुभवतां येत असतें. पण मेल्यावर कीर्तीचा उपयोग काय? उत्तम फुलांची माळ जशी प्रेताला घालण्यापासून कांहीं एक फायदा नाहीं त्याचप्रमाणें मेल्यानंतर लाभणाऱ्या कीर्तीचा कांहीं उपयोग नाहीं. तूं माझा भक्त आहेस; तुझ्या हितासाठीं खपणें हें माझें कर्तव्य आहे. तूं माझी निष्ठेनें सतत उपासना करीत असल्यामुळें माझ्या मनांत तुझ्याविषयीं उत्कट प्रेम उत्पन्न झालें आहे. शिवाय, कर्णा, तुझ्या व माझ्यांत असा कांहीं नाजुक व ईश्वरी इच्छेनें उत्पन्न झालेला पण तुला न सांगतां येण्यासारखा संबंध आहे कीं तो लक्षांत घेतां तुझ्या हिताची खटपट करणें हें माझें कर्तव्य ठरतें. तुझ्या व माझ्या संबंधाची ही गोष्ट केवळ दैवी स्वरूपाची असून ती तुला कळणें शक्य नाहीं व मलाही तुला ती सांगतां येणार नाहीं. योग्य काळीं व योग्यवेळीं ती तुला कळेल. फक्त आडरानांत न शिरतां व तें गूढ उकलण्याचा प्रयत्न न करतां पुन: पुन: जें मी तुला सांगण्याचा प्रयत्न करीत आहें तें अवश्य आचरणांत आण. इंद्रानें कितीही आग्रह केला तरी कवचकुंडलें त्याला देऊं नकोस. कर्णा, तुझा वदनचंद्र विशाखा नक्षत्राच्या दोन ताऱ्यांच्या मध्यभागीं जसें चंद्रबिंब शोभावें त्याप्रमाणें या दोन कुण्डलांनीं शोभतो. स्वार्थांध व तुझ्याशीं कपट करावयास उद्युक्त झालेल्या इंद्राचें कारस्थान तूं कधींही यशस्वी होऊं देऊं नकोस. तो मोठा देवांचा राजा झाला तरी त्याला तुझ्या जीवनाशीं असा भयानक खेळ खेळण्याचें काय कारण आहे? महेंद्र मोठा लाघवी आहे. तो तुला काय वाटेल तें सांगून फसविण्याचा प्रयत्न करील. पण तूंही अतिशय बुद्धिमान् आहेस. इंद्राच्या युक्तिवादाच्या जाळ्यांत न अडकतां त्याचा युक्तिवाद तूं त्याच्यावर उलटवूं शकशील. मी तुला खरी गोष्ट सांगतों. हे नरव्याघ्रा! तूं नेहमीं सव्यसाची धनंजयाशीं स्पर्धा करीत असतोस. त्याच्या विनाशाची प्रतिज्ञाही तूं केलेली आहेस. लवकरच जें कुरुपांडवांचें राज्यासाठीं भयंकर युद्ध होणार आहे त्यांत सव्यसाची

धनंजय व तूं यांचें द्वंद्वयुद्ध होईल. तुझ्या कवचकुंडलांच्या दिव्यतेंत अशी विलक्षण शक्ति आहे कीं एकटा अर्जुनच काय पण अर्जुन व इंद्र असे दोघेही तुझ्यावर चाल करून आले तरी ते तुझा वध तर काय पण पराभवही करूं शकणार नाहींत. म्हणून तुझी वंचना करून तीं कवचकुंडलेंच पळवावींत व अर्जुनाच्या हातून तुला ठार मारावें असा इंद्राचा ह्या खटपटींतील हेतु आहे. अर्जुन इंद्राचा मुलगा असल्यामुळें पुत्रप्रेमासाठीं तो कोणतेंही अकार्य करावयास पूर्णपणें सिद्ध आहे. केवळ अभिमानाच्या भरीस पडून अर्जुनाला युद्धांत ठार मारण्याची तूं इतके दिवस उराशीं बाळगलेली प्रतिज्ञा धुळींत मिळवणार आहेस काय ? जर तुला युद्धांत अर्जुनाला जिंकण्याची अथवा ठार मारण्याची इच्छा असेल तर इंद्राची निराशा कर. कवचकुंडलें त्याला मुळींच देऊं नकोस ! ”

कर्णानें हें ऐकतांच सूर्याला साष्टांग नमस्कार केला व सांगितलें कीं :—

भगवन्तमहं भक्तो यथा मां वेत्थ गोपते ।
तथा परमतिग्मांशो नास्त्यदेयं कथञ्चन ॥ १
न मे दारा न मे पुत्रा न चात्मा सुहृदो न च ।
तथेष्टा वै सदा भक्त्या यथा त्वं गोपते मम ॥ २
इष्टानां च महात्मानो भक्तानां च न संशयः ।
कुर्वन्ति भक्तिमिष्टां च जानीषे त्वं च भास्कर ॥ ३
इष्टो भक्तश्च मे कर्णो न चान्यद्दैवतं दिवि ।
जानीत इति वै कृत्वा भगवानाह मद्धितम् ॥ ४
भूयश्च शिरसा याचे प्रसाद्य च पुनः पुनः ।
इति ब्रवीमि तिग्मांशो त्वं तु मे क्षन्तुमर्हसि ॥ ५
बिभेमि न तथा मृत्योर्यथा बिभ्येऽनृतादहम् ।
विशेषेण द्विजातीनां सर्वेषां सर्वदा सताम् ॥ ६
प्रदाने जीवितस्यापि न मेऽत्रास्ति विचारणा ।
यच्च मामात्थ देव त्वं पाण्डवं फाल्गुनं प्रति ॥ ७
व्येतु सन्तापजं दुःखं तव भास्कर मानसम् ।
अर्जुनं प्रति मां चैव विजेष्यामि रणेऽर्जुनम् ॥ ८

तवापि विदितं देव ममाप्यस्त्रबलं महत् ।
जामदग्न्यादुपात्तं यत् तथा द्रोणान्महात्मनः ॥ ९
इदं त्वमनुजानीहि सुरश्रेष्ठ व्रतं मम ।
भिक्षते वज्रिणे दद्यामपि जीवितमात्मनः ॥ १०

—महाभारत, वनपर्व अध्याय ३०२

"भगवंता, या आपल्या भक्ताचें हित करण्याच्या उद्देशानें आपण जे श्रम घेतलेत ते आपल्या थोरवीला साजेसेच आहेत. आपली भक्ति जितकी मला प्रिय आहे तितकें माझें प्रेम बायकामुलें व माझे सुहृद यांच्यावर तर नाहींच नाहीं; पण माझ्या स्वतःवर देखील नाहीं. जे तुमची भक्ति करतात त्यांची ती भक्तींतील उत्कटता ऐकून आपण त्यांचें हित करण्याविषयीं नेहमींच तत्पर असतां. हा कर्ण आपला प्रिय भक्त आहे व आपल्यावांचून जगांत दुसरें कोणतेंही श्रेष्ठ दैवत तो मानीत नाहीं म्हणून त्याचें हित करणें आपलें कर्तव्य आहे या आंतरिक जाणिवेनेंच आपण हे श्रम घेतले आहेत हें मी ओळखतों व म्हणूनच आपल्याला वाईट वाटेल अशी कोणतीही गोष्ट करावयाला माझें मन कचरतें. परंतु तेंच माझ्या नशिबी आलें आहे हें माझें दुर्दैव होय. मी आपल्याला साष्टांग नमस्कार करून पुनःपुनः हात जोडून विनंति करतों कीं मी आपलें न ऐकल्यास आपण मला क्षमा करावी. मी जगांत जितका मृत्यूला भीत नाहीं तितका खोटें बोलण्याला व उच्चारलेलीं वाक्यें अथवा स्वीकारलेलें व्रत भ्रष्ट करावयास भीत असतों. सोंगानें कां होईना पण सर्व प्राणिमात्रांच्या हितासाठीं अखंड तळमळणाऱ्या ब्राह्मण जातीचें नांव सांगून माझ्या दाराशीं याचना करावयास उभ्या राहिलेल्या व्यक्तीच्या हृदयांत कपटाचें केवढेंही कालकूट भरलें असलें तरी कोणालाही 'नाहीं' न म्हणण्याचें व्रत स्वीकारलेल्या माझ्यासारख्या व्यक्तीला आपली प्रतिज्ञा खोटी कशी पाडतां येईल ? देवेंद्र तर मला फक्त कवचकुंडलेंच मागतो आहे. पण ब्राह्मणवेषानें म्हणून उभ्या राहिलेल्या इंद्रानें मला माझे प्राण जरी मागितले तरीही मी ते त्याला देईन; पण विन्मुख जाऊं देणार नाहीं. येऊन जाऊन मी कवचकुंडलहीन झाल्यास तृतीय पाण्डव

अर्जुन युद्धांत मला ठार मारील ही एकच तुम्हांस भीति वाटत असेल तर ती व्यर्थ आहे. कवचकुंडलांच्या भरंवशावर माझें अर्जुनाला जिंकणें मुळींच अवलंबून नाहीं. माझ्या पराक्रमाच्या भरं-वशावर मी अर्जुनाला जिंकूं शकेन. तुम्हांला माझें दिव्य अस्त्रबल माहीत नाहीं काय ? आचार्य द्रोण व जमदग्निपुत्र भगवान् भार्गव-राम ह्यांच्या जवळून जें दिव्य अस्त्रांचें ज्ञान मी संपादन केलें आहे, त्यानें चेतविलेल्या संहाराच्या प्रचंड अग्नींत एकाद्या क्षुद्र शलभा-प्रमाणें अर्जुनाची राखरांगोळी होऊन गेल्याखेरीज राहणार नाहीं. परंतु माझें व्रत मात्र मी पाळणार व भिक्षेकरी इंद्राला तो जें मागेल तें देणार. ”

कर्णाचें हें उत्तर ऐकतांच सूर्य अत्यंत कष्टी झाला. त्या भग्न-मनस्क अवस्थेंत त्यानें कर्णाला अखेरीस असें सांगितलें कीं ‘तुला जर माझें मुळींच ऐकावयाचें नसेल तर मी सांगतों त्या पद्धतीनें तरी इंद्राची इच्छा पूर्ण कर. कांहीं अटीवर तूं कवचकुंडलें इंद्राला दे. पण मी तुला पुन्हां सांगतों कीं, कुंडलें जोंवर तुझ्या कानांत आहेत तोंपर्यंत तूं अवध्य आहेस व अर्जुनाच्या हातून तुझा वध व्हावा ह्या दुष्ट भावनेनेंच इंद्र तुझ्याजवळ ही भिक्षा मागावयास येत आहे. शक्य तोंवर तूं त्याला टाळच. पण तुला तें अगदीं अशक्य वाटलें तर इंद्राच्या जवळून तूं कवचकुंडलांच्या मोबदल्यांत त्याच्या दिव्य, अमोघ व प्रबळ शत्रूंचा नाश करणारें शक्ति नांवाचें आयुध तरी मागून घे. देवराजाजवळ ही शक्ति अतिशय अद्भुत आहे. ती एकदां शत्रूवर टाकली असतां तो शत्रु केवढाही प्रबळ असला तरी ती त्याचा नाश केल्यावांचून राहात नाहीं व अशा सहस्रावधि शत्रूंचा तिनें नाश केला तरी ती पुन्हां इंद्राच्या हातांत येत असतें. तूं जर ती शक्ति मागितलीस तर निदान शत्रुनाशाचें एक तरी अमोघ साधन तुझ्या हातांत राहील! याप्रमाणें कर्णाशीं बोलून स्वप्नांतच सूर्य गुप्त झाले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं जप करीत असतांना प्रकाशमान सूर्य-मंडळाकडे पाहून कर्णानें रात्रीच्या स्वप्नाचा वृत्तांत खरा आहे काय असें विचारलें असतां सूर्यमंडळापासून होय अशी वाणी बाहेर पडली. ती ऐकतांच मोठ्या औत्सुक्यानें कर्ण इंद्राची वाट पाहूं

लागला. यानंतरच्या प्रसंगाचें वर्णन महाभारतकारांनीं अतिशय सुंदर केलें आहे. तें पुढीलप्रमाणें:—

वैशंपायन उवाच ।

देवराजमनुप्राप्तं ब्राह्मणच्छद्मना वृतम् ।
दृष्ट्वा स्वागतमित्याह न बुबोधास्य मानसम् ।। १
हिरण्यकण्ठीः प्रमदा ग्रामान् वा बहुगोकुलान् ।
किं ददामीति तं विप्रमुवाचाधिरथिस्ततः ।। २

ब्राह्मण उवाच ।

हिरण्यकण्ठ्यः प्रमदा यच्चान्यत् प्रीतिवर्धनम् ।
नाहं दत्तमिहेच्छामि तदर्थिभ्यः प्रदीयताम् ।। ३
यदेतत्सहजं वर्म कुण्डले च तवानघ ।
एतदुत्कृत्य मे देहि यदि सत्यव्रतो भवान् ।। ४
एतदिच्छाम्यहं क्षिप्रं त्वया दत्तं परंतप ।
एष मे सर्वलाभानां लाभः परमको मतः ।। ५

कर्ण उवाच ।

अवनिं प्रमदा गाश्च निवापं बहुवार्षिकम् ।
तत्ते विप्र प्रदास्यामि न तु वर्म सकुण्डलम् ।। ६

वैशंपायन उवाच ।

एवं बहुविधैर्वाक्यैर्याच्यमानः स तु द्विजः ।
कर्णेन भरतश्रेष्ठ नान्यं वरमयाचत ।। ७
सान्त्वितश्च यथाशक्ति पूजितश्च यथाविधि ।
न चान्यं स द्विजश्रेष्ठः कामयामास व वरम् ।। ८
यदा नान्यं प्रवृणुते वरं वै द्विजसत्तमः ।
तदैनमब्रवीद्भूयो राधेयः प्रहसन्निव ।। ९
सहजं वर्म मे विप्र कुण्डले चामृतोद्भवे ।
तेनावध्योऽस्मि लोकेषु ततो नैतज्जहाम्यहम् ।। १०
विशालं पृथिवीराज्यं क्षेमं निहतकण्टकम् ।
प्रतिगृह्णीष्व मत्तस्त्वं साधु ब्राह्मणपुङ्गव ।। ११
कुण्डलाभ्यां विमुक्तोऽहं वर्मणा सहजेन च ।
गमनीयो भविष्यामि शत्रूणां द्विजसत्तम ।। १२

वैशम्पायन उवाच।

यदन्यं न वरं वव्रे भगवान् पाकशासनः।
ततः प्रहस्य कर्णस्तं पुनरित्यब्रवीद्वचः ।। १३
विदितो देवदेवेश प्रागेवासि मम प्रभो ।
न तु न्याय्यं मया दातुं तव शक्यं वृथा वरम् ।। १४
त्वं हि देवेश्वरः साक्षात्त्वया देयो वरो मम।
अन्येषां चैव भूतानामीश्वरो ह्यसि भूतकृत् ।। १५
यदि दास्यामि ते देव कुण्डले कवचं तथा ।
वध्यतामुपयास्यामि त्वं च शक्रावहास्यताम् ।। १६
तस्माद्विनिमयं कृत्वा कुण्डले वर्म चोत्तमम् ।
हरस्व शक्र कामं मे न दद्यामहमन्यथा ।।१७

शक्र उवाच

विदितोऽहं रवेः पूर्वमायानेव तवान्तिकम् ।
तेन ते सर्वमाख्यातमेवमेतन्न संशयः ।। १८
काममस्तु तथा तात तव कर्ण यथेच्छसि ।
वर्जयित्वा तु मे वज्रं प्रवृणीष्व यथेच्छसि ।। १९

वैशम्पायन उवाच

ततः कर्णः प्रहृष्टस्तु उपसङ्गम्य वासवम् ।
अमोघां शक्तिमभ्येत्य वव्रे सम्पूर्णमानसः ।। २०

कर्ण उवाच

वर्मणा कुण्डलाभ्यां च शक्तिं मे देहि वासव ।
अमोघां शत्रुसंघानां घातिनीं पृतनामुखे ।। २१
ततः सञ्चिन्त्य मनसा मुहूर्तमिव वासवः ।
शक्त्यर्थं पृथिवीपाल कर्णं वाक्यमथाब्रवीत् ।। २२
कुण्डले मे प्रयच्छस्व वर्म चैव शरीरजम् ।
गृहाण कर्ण शक्तिं त्वमनेन समयेन च ।। २३
अमोघा हन्ति शतशः शत्रून् मम करच्युता ।
पुनश्च पाणिमभ्येति मम दैत्यान् विनिघ्नतः ।।२४
सेयं तव करप्राप्ता हत्वैकं रिपुमूर्जितम् ।
गर्जन्तं प्रतपन्तं च मामेवैष्यति सूतज ।। २५

कर्ण उवाच

एकमेवाहमिच्छामि रिपुं हन्तुं महाहवे ।
गर्जन्तं प्रतपन्तं च यतो मम भयं भवेत् ।। २६

इंद्र उवाच

एकं हनिष्यसि रिपुं गर्जन्तं बलिनं रणे ।
त्वं तु यं पार्थयस्येकं रक्ष्यते स महात्मना ।। २७
यमाहुर्वेदविद्वांसो वराहंमपराजितम् ।
नारायणमचिन्त्यं च तेन कृष्णेन रक्ष्यते ।। २८

कर्ण उवाच

एवमप्यस्तु भगवन्नेकवीरवधे मम ।
अमोघां देहि मे शक्तिं यथा हन्यां प्रतापिनम् ।। २९
उत्कृत्य तु प्रदास्यामि कुण्डले कवचं च ते ।
निकृत्तेषु तु गात्रेषु न मे बीभत्सता भवेत् ।। ३०

इंद्र उवाच ।

न ते बीभत्सता कर्ण भविष्यति कथञ्चन ।
व्रणश्चैव न गात्रेषु यस्त्वं नानृतमिच्छसि ।। ३१
यादृशस्ते पितुर्वर्णस्तेजश्च वदतां वर ।
तादृशेनैव वर्णेन त्वं कर्ण भविता पुनः ।। १२
विद्यमानेषु शस्त्रेषु यद्यमोघामसंशये ।
प्रमत्तो मोक्ष्यसे चापि त्वय्येवैषा पतिष्यति ।। ३३

कर्ण उवाच ।

संशयं परमं प्राप्य विमोक्ष्ये वासवीमिमाम् ।
यथा मामात्थ शक्र त्वं सत्यमेतद् ब्रवीमि ते ।। ३४

वैशम्पायन उवाच ।

ततः शक्तिं प्रज्वलितां प्रतिगृह्य विशाम्पते ।
शस्त्रं गृहीत्वा निशितं सर्वगात्राण्यकृन्तत ।। ३५
ततो देवा मानवा दानवाश्च निकृन्तन्तं कर्णमात्मानमेवम् ।
दृष्ट्वा सर्वे सिंहनादान् प्रणेदुर्न ह्यस्यासीन्मुखजो वै विकारः ।। ३६
ततो दिव्या दुन्दुभयः प्रणेदुः पपातोच्चैः पुष्पवर्षं च दिव्यम् ।
दृष्ट्वा कर्णं शस्त्रसङ्कृत्तगात्रं मुहुश्चापि स्मयमानं नृवीरम् ।।३७

ततश्छित्वा कवचं दिव्यमङ्गात्तथैवार्द्रं प्रददौ वासवाय ।
तथोत्कृत्य प्रददौ कुण्डले ते कर्णात्तस्मात् कर्मणा तेन कर्णः ॥ ३८
—महाभारत, वनपर्व अध्याय ३१०

थोड्याच वेळानें एक अतिशय तेजस्वी ब्राह्मण याचक म्हणून कर्णाकडे आला. तो इंद्र आहे हें कर्णानें जरी ओळखलें तरी त्यानें आपणांस ओळखलें आहे याची त्या ब्राह्मणास मुळींच जाणीव नव्हती. कर्णानेंही आपण त्यास ओळखलें आहे याची मुळींच जाणीव न देतां त्याचें स्वागत केलें व प्रार्थना केली कीं, मी आपली कोणती इच्छा पूर्ण करावी अशी आपली इच्छा आहे? सुवर्णाप्रमाणें उज्ज्वल असलेल्या व शंखाप्रमाणें सुंदर कंठभाग असलेल्या त्रिभुवनसुंदरी स्त्रिया मी आपणांस दासी म्हणून देऊं काय? अथवा म्हणाल तर हवे तितके गौळवाडे आपणांस समर्पण करून गोधनाच्या दृष्टीनें आपणांस समृद्ध करूं? हें ऐकतांच त्या ब्राह्मणानें किंचित् स्मितहास्य केलें व सांगितलें कीं, या गोष्टींची ज्या याचकाला इच्छा असेल त्याची ती इच्छा पूर्ण करून तूं त्यास संतुष्ट करूं शकतोस. पण हे सत्यव्रत कर्णा, तुझ्यासारख्या महापुरुषाजवळ अशा सामान्य गोष्टींची याचना करावयास मी आलेलों नाहीं. मी अशी वस्तु मागावयास आलों आहे कीं जिचें नांव उच्चारतांच तुझ्या हृदयाचा थरकांप होईल व दानीपणाची तुझी कीर्ति डळमळीत होईल. हे महापुरुषा, जर तूं खरोखरीच सत्यव्रत असशील व नकाराला पाठ दाखविण्याचें तुझें व्रत तडीला नेण्याचें तुझ्यांत धैर्य असेल तर तुझ्या अंगावर विलसणारें हें सहज कवच व कुंडलें तोडून मला दे. सर्व लाभापेक्षां हा लाभ मला अत्यंत श्रेष्ठ वाटतो. कर्णानें तें ऐकतांच त्या ब्राह्मणाला सांगितलें कीं, पृथ्वी, स्त्रिया, कायमची भूमि, गोधन, रत्नें असें काय हवें तें आपण मला मागितलें तरी तें मी आपणांस देऊं शकेन पण भलतीच गोष्ट आपण मागणेंही शोभत नाहीं व मी ती आपणांस देणेंही योग्य नाहीं. कर्णानें त्या ब्राह्मणाची पुष्कळ अभ्यर्थना केली; पण तो कशानेंही वळत नाहीं हें पहातांच मंदहास्य करून तो महारथी म्हणाला, हे विप्रश्रेष्ठा, माझें कवच व कुंडलें प्रत्यक्ष अमृतापासून उत्पन्न झालेलीं असून जन्मापासून तीं माझ्या अंगावर आहेत. हें वरून घातलेलें

चिलखत नाहीं कीं जें काढून तुला देतां येईल. त्यासाठीं गाझी सगळी कातडी सोलून मला तें उकरून काढावें लागल व कुंडलेंही तशींच तोडून काढावीं लागतील व हें करून मी साधणार काय? या दोन वस्तूंमुळें मी अवध्य आहे. ब्राह्मणश्रेष्ठा! ही सर्वनाशाची मागणी सोडून तूं मला समुद्रवलयांकित पृथ्वीचें निष्कंटक असें एकछत्री साम्राज्य मागत असशील तर तेंही मी तुझ्या चरणांवर माझ्या पराक्रमानें जिंकून अर्पण करावयास तयार आहे. ह्या दोन वस्तू मी तुला दिल्या कीं मी इतका हीन होईन कीं त्या असमर्थ अवस्थेंत कोणीही शत्रु माझा पराभव करूं शकेल व मला ठार मारूं शकेल. आणि महाशय, तुम्ही कांहीं ब्राह्मण नाहीं कीं ज्यामुळें मी तुमची इच्छा पुरवलीच पाहिजे. मी ओळखलें कीं तुम्ही देवराज इंद्र आहांत तेव्हां तुमची भलतीच इच्छा मी काय म्हणून पूर्ण करावी ? देवेंद्रा, देवाधिदेवा, त्रैलोक्याचा राजा या नात्यानें आपण मला वर द्यावयाचा कीं तो माझ्याचजवळ मागावयाचा ? आपण सर्व प्राणिमात्रांचे ईश्वर व पालक आहांत. आपणांस कवचकुंडलें दिल्यास मी माझा वध तर ओढवून घेईनच पण तुमचीही त्रिखंड अपकीर्ति होईल. देवाच्या दर्शनानें प्राणिमात्राचें कल्याण होतें अशी आम्हां मानवांची समजूत आहे. तुमच्या भेटीनें माझें ज्या प्रकारचें कल्याण होत आहे त्याचा विचारही मनांत आल्यावर लोक तुमची निंदा केल्याशिवाय राहतील काय ? आपण दाराशीं भिक्षेकरी म्हणून आलांत तेव्हां त्याच्या मोबदल्यांत मी आपणांस कवचकुंडलें देतों पण माझें दान मी सशर्त देईन. आपण मला माझ्या या वस्तूंच्या मोबदल्यांत काय द्यावयास तयार आहांत ?

कर्णाचें हें वाक्य ऐकतांच इंद्र मनांत किंचित वरमून त्याला म्हणाला कीं, सूर्यानें पूर्वींच तुला माझ्या येण्याची कल्पना दिलेली दिसतें. कारण मी तुझ्याकडे यासाठीं येणार आहें ही गोष्ट सूर्याखेरीजकरून दुसऱ्या कुणालाही माहीत नव्हती. तुझें म्हणणें मला मान्य करणें भाग आहे. या वस्तूंच्या मोबदल्यांत तूं मला कोणतीही वस्तु मागूं शकतोस. ती मी तुला देईन. फक्त माझें वज्र मात्र मागूं नकोस. कारण तें माझें वैशिष्टच आहे. इंद्राचें हें वाक्य ऐकतांच

आनंदित होऊन कर्ण म्हणाला कीं, तुमची अमोघ व शत्रूंच्या केवढ्याही समुदायाला रणांगणांत भस्म करणारी घातक शक्ति मला देत असाल तर मी तुम्हांला कवचकुंडलें देतों. इंद्रानें कांहीं वेळ विचार केला व सांगितलें कीं, तूं मला मोठी विचित्र गोष्ट मागतो आहेस. ह्या शक्तीच्या भरंवशावर मी अनेक मोठमोठ्या दैत्यांना ठार मारलें आहे व मी कितीही वेळां शत्रूंवर ती सोडली तरी शत्रूंचा निःपात करून ती पुनश्च माझ्या हातांत परत येते. तुला ती शक्ति मी एका अटीवर देत आहें. ही शक्ति कायमची तुझ्याजवळ रहाणार नाहीं. दुसऱ्या कोणत्याही शस्त्रानें वा अस्त्रानें न जिंकतां येणारा, रणांगणांत गर्जना करणारा व तुझा सर्वनाश करण्याची शक्यता असलेला असा एकच शत्रु ठार मारून ही शक्ति स्वर्गांत माझ्याकडे परत येईल. घे ही शक्ति आणि दे तुझीं कवचकुंडलें. हें ऐकतांच कर्णानें त्या देवराजाला म्हटलें कीं, मलाही गर्जना करणाऱ्या, देदीप्यमान व भयप्रद अशा केवळ एकाच शत्रूला या शक्तीनें मारावयाचें आहे. तें ऐकतांच इंद्रानें त्याला उलट उत्तर दिलें कीं, ज्या एका प्रबळ शत्रूला तूं मारूं इच्छीत आहेस त्याला तूं मारूं शकणार नाहींस. माझी शक्ति केवढीही अमोघ असली तरी तुझ्या शत्रूचें रक्षण जगांतल्या सर्व सामर्थ्याहून अधिक समर्थ असलेल्या विभूतीनें करावयाचें ठरविलें आहे. वेदवेत्ते लोक ज्याला अजिंक्य, वरदायक व अचिंत्य शक्तिमान् आदिनारायण असें मानतात त्या मर्त्य शरीरानें या पृथ्वीवर वावरणाऱ्या भगवान् श्रीकृष्णानें तुझ्या त्या प्रबल शत्रूच्या संरक्षणाचा सर्व भार आपल्या समर्थ स्कंधावर घेतला आहे याची तुला जाणीव आहे काय ? कर्ण म्हणाला, तें कांहींही असो. माझ्या एका अवध्य शत्रूला ठार मारण्याची शक्ति तुझ्या या आयुधांत असली म्हणजे माझें काम झालें. तसेंच मला दुसराही एक वर हवा आहे. माझी कातडी सोलून मी आपणांस दान केल्यावर माझी कांति व माझ्या शरीराचें सौंदर्य यत्किंचित्‌ही कमी न होतां जसेंच्या तसेंच राहिलें पाहिजे. त्यावर इंद्रानें त्याला सांगितलें कीं, "सौंदर्यहानि तर लांबच राहील पण शरीरावर लहान व्रणदेखील शिल्लक राहणार नाहीं. तुझ्या

महामनस्कतेनें मी तुझ्यावर अत्यंत प्रसन्न झालों आहे. सूर्याप्रमाणें तुझा वर्ण व तुझें तेज सदैव देदीप्यमान राहील. या शक्तीच्या बाबतींत मात्र कर्णा, तुला सावध करणें हें माझें कर्तव्य आहे. शत्रूला मारण्यासारखीं हत्यारें तुझ्याजवळ असतांना व निश्चितपणें त्या हत्यारांनीं तूं आपल्या शत्रूला जिंकूं शकशील ही तुला खात्री असतांना, जर उन्मत्त होऊन आपल्यापेक्षां दुर्बल शत्रूवर तूं ह्या शक्तीचा प्रयोग करशील तर ती उलट परत फिरून तुलाच ठार मारल्याखेरीज राहणार नाहीं. कारण असें करणें म्हणजे ह्या शक्तीच्या सामर्थ्याचा अपमान करणेंच होय." यावर कर्णानें, मी व्यवस्थित रीतीनेंच तिचा उपयोग करीन असें आश्वासन दिल्यावर ती शक्ति इंद्रानें कर्णाच्या हातीं दिली. व तीं देदीप्यमान शक्ति दिल्याबद्दल कर्णानें देवेंद्राला धन्यवाद दिले. नंतर त्यानें एक तीक्ष्ण शस्त्र आपल्या हातांत घेतलें व सहजकवच इंद्राला देण्यासाठीं म्हणून तो अलोट धैर्यानें आपल्या शरीरावरील कातडें सोलून काढूं लागला. त्याला असह्य वेदना होत होत्या. पण त्याच्या चेहऱ्यावर यत्किंचितही विकार दिसूं शकला नाहीं. कर्णाचें अतिमानवी कृत्य पाहतांच सारे देव, दानव व सिद्ध आनंदानें सिंहनादपूर्वक कर्णाचा जयजयकार करूं लागले. देवलोकांत दिव्य दुंदुभींचा नाद होऊन स्वर्गांतून कल्पवृक्षाच्या दिव्य पुष्पांची कर्णावर वृष्टि होऊं लागली. रक्तानें भरलेलें तें कवच व तोडून काढलेलीं तीं कुंडलें त्यानें इंद्राच्या स्वाधीन केलीं. त्याबरोबर इंद्राला पांडवांच्या बाबतींत आपण कृतकार्य झालों असें वाटलें. जगाच्या व्यावहारिक दृष्टीनें अशी कर्णाची वंचना करून व परिणामाच्या दृष्टीनें साऱ्या त्रैलोक्याचे दिक्कोन त्याच्या कीर्तिदुंदुभीच्या नादानें गर्जवून देवेंद्र स्वर्गांत निघून गेला.

## कर्णाची सहनशीलता

दानशूरतेबरोबरच सहिष्णुता हाही कर्णाचा मोठा अलौकिक गुण होता. तो परशुरामाकडे असतांना त्याच्या या सहनशीलतेची पूर्णपणें परीक्षा झालेली आहे. गुरूच्या आश्रमांतील त्याच्या वास्त-

ण्यांत घडलेल्या या प्रसंगाचें वर्णन महाभारतांत पुढीलप्रमाणें केलेलें आहे :–

ततः कदाचिद्रामस्तु चरन्नाश्रममन्तिकात् ।
कर्णेन सहितो धीमानुपवासेन कर्शितः ॥ ४
सुष्वाप जामदग्न्यस्तु विश्रंभोत्पन्नसौहृदः ।
कर्णस्योत्सङ्ग आधाय शिरः क्लान्तमना गुरुः ॥ ५
अथ कृमिः श्लेष्म–मेदो–मांस–शोणितभोजनः ।
दारुणो दारुणस्पर्शः कर्णस्याभ्याशमागतः ॥ ६
स तस्योरुमथासाद्य बिभेद रुधिराशनः ।
न चैनमशकत्क्षेप्तुं हन्तुं वापि गुरोर्भयात् ॥ ७
संदश्यमानस्तु तथा कृमिणा तेन भारत ।
गुरोः प्रबोधनाशंकी तमुपैक्षत सूर्यजः ॥ ८
कर्णस्तु वेदनां धैर्यादसह्यां विनिगृह्य ताम् ।
अकम्पयन्न व्यथयन् धारयामास भार्गवम् ॥ ९
यदाऽस्य रुधिरेणाङ्गं परिस्पृष्टं भृगूद्वहः ।
तदाऽबुध्यत तेजस्वी संत्रस्तश्चेदमब्रवीत् ॥ १०
अहोस्म्यशुचितां प्राप्तः किमिदं क्रियते त्वया ।
कथयस्व भयं त्यक्त्वा याथातथ्यमिदं मम ॥ ११
तस्य कर्णस्तदाऽऽचष्ट कृमिणा परिभक्षणम् ।
ददर्श रामस्तं चापि कृमिं सूकरसन्निभम् ॥ १२
अष्टपादं तीक्ष्णदंष्ट्रं सूचीभिरिव संवृतम् ।
रोमभिः सन्निरुद्धाङ्गमलर्कं नाम नामतः ॥ १३

—महाभारत, शांतिपर्व अध्याय ३

एकदां परशुराम कर्णाबरोबर आश्रमाच्या जवळच फिरत होते. उपवासांनीं व व्रतांनीं ते अगदीं श्रांत झालेले होते. कर्णावर त्यांचें निरतिशय प्रेम जडल्यामुळें ते त्याच्या मांडीवर डोकें ठेवून निद्रा घेऊं लागले. इतक्यांत भयंकर स्वरूपाचा व रक्तप्रिय किडा, जिच्यावर परशुरामांनीं आपलें डोकें ठेविलें होतें त्या कर्णाच्या मांडीखालीं आला व मांडी फोडून रक्त पिऊं लागला. त्या किड्याच्या दंशानें कर्णाला मरणांतिक वेदना होत होत्या; पण आपण मांडी जराही

चाळविल्यास परशुरामांना जाग येईल व त्यांचा निद्राभंग होईल या कल्पनेनें कर्णाला त्या किडयाला दूर फेंकतांही येईना व मारतांही येईना ! तो घातक किडा वारंवार दंश करीत असतांही कर्णानें त्याची पूर्ण उपेक्षा केली व यत्किंचित्‌ही न थरकांपतां त्या असह्य वेदना सहन करून परशुरामांना तसेंच मांडीवर स्वस्थ झोपूं दिलें. कांहीं वेळानें त्याच्या मांडींतून वाहणारा उष्ण रक्ताचा प्रवाह परशुरामांना लागतांच ते एकदम जागे झाले. कर्णाची ती दयनीय अवस्था व रक्तानें भरलेलें आपलें अंग नि त्याची मांडी पाहून अनुकंपेनें ते म्हणाले: " अरे! रक्तस्पर्शानें मी अशुद्ध झालों. काय प्रकार आहे खरें खरें सांग. " त्याबरोबर कर्णानें त्यांना सगळा वृत्तांत सांगून तो किडा दाखविला. परशुरामांनीं पाहिलें तर तो डुकराच्या स्वरूपाचा, आठ पायांचा, तीक्ष्ण दंष्ट्रांचा व सुयांप्रमाणें तीक्ष्ण केसांनीं व्यापिलेला अलर्क नांवाचा किडा होता.

## कर्णाची समयज्ञता

कर्णाच्या या विलक्षण सहनशीलतेमुळेंच परशुरामासारख्या अत्यंत संतापी अशा व्यक्तीकडून शापाबरोबरच त्याला वरदानही मिळालेलें आहे. सहिष्णुतेबरोबरच कर्णाची समयज्ञताही अत्यंत अलौकिक होती. तिचा महाभारतांत निदान तीन वेळां तरी प्रत्यय येतो. पहिला प्रत्यय पांडवांनीं राजसूय यज्ञाचे वेळीं जो दिग्विजय केला त्यावेळीं आलेला आहे.

> **युयुधे पाण्डवश्रेष्ठः कर्णेनामित्रघातिना ॥ १९**
> **स कर्णं युधि निर्जित्य वशे कृत्वा च भारत । २०**
>
> —महाभारत, सभापर्व अध्याय ३०

या वर्णनांत कर्णानें भीमसेनाच्या स्वारीच्या वेळीं पाण्डवांचें मांडलिकत्व स्वीकारल्याचा उल्लेख आहे. अत्यंत मानी अशा कर्णानें पांडवांचें मांडलिकत्व कां स्वीकारावें हा मोठाच प्रश्न आहे. परंतु तत्कालीन वस्तुस्थितीकडे लक्ष पुरविलें तर त्याचें हें करणें त्याच्या समयज्ञतेचेंच निदर्शक ठरतें. द्रौपदी स्वयंवरांतून पांडव

प्रकट झाल्यानंतर त्यांना श्रीकृष्णासारखी कर्णाच्याही दृष्टीनें सर्व श्रेष्ठ असलेली विभूति व यादवांच्या गणराज्यासारखी अत्यंत प्रबल अशी राजसत्ता सहायक म्हणून लाभली होती. त्यामुळें ते अत्यंत प्रबळ झाले होते. धृतराष्ट्राच्या आज्ञेवरून इंद्रप्रस्थाला त्यांनीं जें स्वतःचें वेगळें स्वतंत्र राज्य स्थापन केलें होतें त्याला श्रीकृष्णांच्या सल्ल्यावरून महान् साम्राज्याचें स्वरूप द्यावयाचा निश्चय करून त्यासाठीं राजसूय नांवाचा मोठा यज्ञ करावयाचें त्यांनीं ठरविलें. या यज्ञांत सगळ्या राजसत्तांना अंकित करणें अत्यंत आवश्यक असतें. किंबहुना राजसूय यज्ञ म्हणजे साम्राज्याचें निर्मितिस्थानच होय. या यज्ञाला सगळ्यांत मोठा अडथळा मगधाधिपति सम्राट जरासंधाचा होणार होता. व सैन्यानिशीं त्याच्यावर चालून जाऊन त्याला नष्ट करणें अत्यंत दुर्घट होतें. पण श्रीकृष्णांनीं त्यासाठीं वेगळेंच कारस्थान उभारिलें. छद्म वेषानें त्या महाबलाढ्य सम्राटाला एकान्तीं गांठून त्यांनीं भीमाशीं त्याचें द्वंद्वयुद्ध घडवून आणलें. या युद्धांत भीमानें त्याला ठार मारतांच सगळ्या राजमंडळांतील त्याच्या नेतृत्वाखालीं असलेली अभेद्य संघटना मोडून जाऊन पांडवांच्या सामर्थ्यासंबंधींचा धाक सर्वत्र उत्पन्न झाला. त्याचा लाभ घेऊन युधिष्ठिरानें आपल्या बंधूंकरवीं त्यावेळच्या सर्व ज्ञात राजसत्तांना जिंकून मांडलिक केलें. जरासंधाच्या मृत्यूनें एक प्रकारें हादरा बसलेल्या कर्णानें पांडवांच्या मागचें यादवांच्या प्रबल राजसत्तेचें असलेलें पाठबळ ध्यानांत घेऊन व भारतवर्षाच्या सर्व राजसत्तांचें युधिष्ठिराला साहाय्य होण्याचा संभव आहे हें ओळखून अधिक ताणून धरलें नाहीं. अशीच समयज्ञता त्यानें दिग्विजयाच्या वेळींही यादवांच्यावर चढाई न करतां त्यांच्याशीं मिळतें घेऊनच प्रसंग निभावून नेण्यांत दाखविलेली आहे. त्याच्या पराक्रमाचें वर्णन करतांना महाभारतांतील या संबंधाचा उल्लेख येथें उद्धृत केलाच आहे. जर त्यानें त्यावेळीं यादवांवर स्वारी केली असती तर तें यादवांना हवेंच होतें. कारण या निमित्तानें पांडवांच्या वनवासानें क्रुद्ध झालेले यादव कर्णाला संपविल्यावांचून राहाते ना. पण कर्णानें ती वेळच येऊं दिली नाहीं.

त्याच्या समयज्ञतेचा व दूरदर्शीपणाचा खरा प्रत्यय महाभारतांतील द्रोणपर्वांत येतो. भीष्मांच्या पतनानंतर कर्णानें महायुद्धांत भाग घेतला ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. सैनिकांचा त्याच्यावर इतका विलक्षण विश्वास होता कीं, भीष्म पतन पावतांच कर्णाशिवाय आपल्याला कोणीही त्राता नाहीं असें सर्व सैनिकांना वाटत होतें व त्या दृष्टीनें त्यांनीं प्रथमपासूनच कर्णाचा जयजयकार चालविला होता. राजा दुर्योधनाचीही कर्णानेंच सेनापतित्व स्वीकारावें अशी इच्छा होती. स्वतः कर्णानेंही भीष्मांच्या पतनानंतर हातांत हत्यार घेऊन लढण्याची प्रतिज्ञा उच्चारण्यांत सेनेचें धुरीणत्व स्वीकारण्याचा आपला मनोदय पूर्वींच व्यक्त केला होता. दुर्योधनापासून तों एकाद्या फाटक्या व्यक्तीपर्यंत सर्वांचे नेत्र आपल्यावरच केंद्रित झाले आहेत हें माहीत असूनही कर्णानें आपल्यापेक्षां वरिष्ठ लोक तेथें उपस्थित असल्याचें पाहून व आपणच धुरीणत्वाचीं वस्त्रें स्वीकारल्यास मत्सर उत्पन्न होऊन प्रथमश्रेणीच्या योद्धयांत मानसिक तरी फूट पडण्याचा संभव आहे हें ओळखून पायाशीं चालत आलेला तो सन्मानाचा मुकुट बाजूला सारला. इतकेंच नव्हे तर कोणाला सेनापति केलें असतां आपसांत मानसिक वैमनस्य उत्पन्न होण्यास मुळींच कारण उरणार नाहीं याचा पूर्णपणें विचार करून त्यानें आयुष्यभर प्रसंग सांपडेल तेथें ज्यांची तो केवळ निर्भर्त्सना व निंदाच करीत आला त्या आचार्य द्रोणांनाच त्यानें आग्रहपूर्वक सेनापतिपदाचा अभिषेक करविला. हा निर्णय घेण्याचें कारण त्यानें स्वतःच त्या वेळीं स्पष्ट केलें आहे तो म्हणतो. :—

**कर्ण उवाच ।**

**सर्व एव महात्मान इमे पुरुषसत्तमाः ।**
**सेनापतित्वमर्हन्ति नात्र कार्या विचारणा ।। १३**

**कुलसंहननज्ञानैर्बलविक्रमबुद्धिभिः ।**
**युक्ताः श्रुतज्ञा धीमन्त आहवेष्वनिवर्तिनः ।। १४**

**युगपन्न तु ते शक्याः कर्तुं सर्वे पुरःसराः ।**
**एक एव तु कर्तव्यो यस्मिन् वैशेषिका गुणाः ।। १५**

अन्योन्यस्पर्धिनां ह्येषां तद्येकं यं करिष्यसि ।
शेषा विमनसो व्यक्तं न योत्स्यन्ति हितास्तव ।। १६
अयं च सर्वयोधानामाचार्यः स्थविरो गुरुः ।
युक्तः सेनापतिं कर्तुं द्रोणः शस्त्रभृतां वरः ।। १७
को हि तिष्ठति दुर्धर्षे द्रोणे शस्त्रभृतां वरे ।
सेनापतिः स्यादन्योस्माच्छुक्रांगिरसदर्शनात् ।। १८
न च सोऽप्यस्ति ते योधः सर्वराजसु भारत ।
द्रोणं यः समरे यान्तमनुयास्यति संयुगे ।। १९
एष सेनाप्रणेतॄणामेष शस्त्रभृतामपि ।
एष बुद्धिमतां चैव श्रेष्ठो राजन् गुरुस्तव ।। २०
एवं दुर्योधनाचार्यमाशु सेनापतिं कुरु ।
जिगीषन्तो सुरान् संख्ये कार्तिकेयमिवामराः ।। २१

—महाभारत, द्रोणपर्व अ. ५

येथें जमलेले सर्वच वीर थोर असून सेनापतिपदास योग्य आहेत. पण एकाच वेळीं सर्वांस सेनापति करतां येणें शक्य नाहीं. तेव्हां त्यांतल्या त्यांत जो विशेष गुणवान् असेल त्या एकासच हें पद दिलें पाहिजे. परंतु येथें जमलेले सर्व राजे एकमेकांची बरोबरी करणारे असल्यामुळें एकास सेनापति केलें तर इतरांस विषाद वाटेल व ते तुझ्या हितार्थ मनापासून झटून युद्ध करणार नाहींत हें उघडच दिसतें. अशा स्थितींत सैन्यांत एकजूट व उत्साह रहावा आणि मत्सरादि भावनांचा प्रादुर्भाव होऊं नये म्हणून या सर्व राजांचे गुरु गुरुतुल्य द्रोणाचार्य ह्यांनाच सेनापतिपदाचा अभिषेक करणें इष्ट आहे. द्रोणाचार्य हे सर्व शस्त्रधरांत श्रेष्ठ व वृद्ध असून आपले गुरु व सर्व योद्ध्यांचे आचार्य असल्यामुळें त्यांना सेनापति नियुक्त केल्यानें कोणासच विषाद वाटण्याचा संभव नाहीं.

## कर्णाचें निर्मळ अंतरंग व गुणग्राहकता

नेहमीं अधिक्षेपानें बोलत असलेला कर्ण हा वस्तुतः पिंडानें गुणग्राहक होता व कांहीं विशिष्ट मर्यादेनंतर व्यक्तीच्या महात्मतेची जाणीव अंतःकरणांत ठेवून तो वागल्यावांचून रहात नसे. अर्जुनाला

ठार मारण्याची वारंवार घोषणा करीत असतांही त्याच्या अंतःकरणांत पांडवांच्या गुणांची व अर्जुनाच्या प्रभावाची पूर्णपणें जाणीव असे. इतकेंच नव्हे तर तो ती व्यक्त केल्यावांचून राहातही नसे. प्रत्यक्ष शल्याजवळ देखील त्यानें अर्जुनाच्या गुणांची मुक्तकंठानें स्तुति केली आहे. श्रीकृष्णांच्या जवळ युधिष्ठिराला धर्मात्मा म्हणून वाखाणलें आहे. कुरुकुलाधम म्हणून भीष्मांचा वारंवार अधिक्षेप करणारा कर्ण मृत्यूनंतर आपला द्वेषविषय असलेल्या भीष्मांच्या व्यक्तिमत्त्वासमोर वांकला आहे. मृत्यु ही अशी विलक्षण शक्ति आहे कीं जी मनुष्याचे सारे दुर्गुण लोपवून त्याच्या सद्‌गुणांचा स्मृतिस्तंभ उभारते. राजर्षि भीष्म व दानवीर कर्ण यांचे परस्पर संबंध कितीही कटु असले, व त्यामुळें एकमेकांच्यावर त्यांनीं शस्त्रांपेक्षांही अधिक तीक्ष्ण शब्दांचा केवढाही मारा केला असला तरी त्यांच्या परस्पराविषयीं वस्तुतः काय भावना होत्या व ते परस्परांची थोरवी कशी जाणून होते हें भीष्मपतनाच्या प्रसंगीं जसें व्यक्त झालें तसें तें इतरत्र केव्हांच व्यक्त होऊं शकलें नाहीं. व्यक्तिगत लाभालाभ, कल्पना व परिणाम यांच्या सामीप्यानें जीवमान व्यक्तीची मनोवृत्ति नेहमींच रागद्वेषयुक्त होत असल्यामुळें तिचा जो आविष्कार असतो तो विकारहीन कधीं असूं शकतच नाहीं. पण मृत्यु ही अशी वस्तुस्थिति नाहीं. साऱ्या जगाचा अन्तिम निरोप घेणारा व त्याला अन्तिम निरोप देणारा मनुष्य व्यक्तिगत लाभालाभ, कल्पना व परिणाम यांच्या जवनिकेंतून केव्हांच बाहेर पडलेला असतो. त्यामुळें त्या स्थितींतला त्याच्या व्यक्तित्वाचा आविष्कार बहुधा रागद्वेषहीन म्हणूनच विकारहीन असूं शकतो. निदान आर्यसंस्कृतीचा संस्कार झालेल्या व्यक्तीची तरी वस्तुस्थिति हीच आहे. प्रेताची विटंबना करणारी, शरीर पंचत्वांत विलीन झाल्यावरही वैराची धग शमू न शकणारी नृशंस मनोवृत्ति आर्यांची असूं शकत नाहीं. अनार्य, आसुरी, राक्षसी नि म्लेंच्छ मनोवृत्ति मात्र अशी असते. रावणाच्या देखील देहपातानंतर प्रभु रामचंद्राच्या दृष्टीला त्याचा प्रताप व त्याचें कर्तव्य यांवांचून दुसरें कांहीं दिसूं

शकलें नाहीं. मग भीष्म व कर्ण हे तर महामनस्क आर्यश्रेष्ठच होते. भीष्माच्या पतनाची वार्ता ऐकतांच ज्या लोकांनीं अत्यंत दारुण विलाप केला त्यांत महारथी कर्ण प्रमुख होता. भीष्मासारख्या श्रेष्ठ युगपुरुषाच्या अंतकाळीं त्यांचें दर्शन घेणें हें कर्तव्य समजून कर्ण रणभूमीवर आला. त्यांची क्षमा मागून त्यांना वंदन करून तो परतला. भीष्मांचा निरोप घेऊन कर्ण परतत असतां त्याच्या नेत्रांतून अविरत अश्रुसरी ओसरत होत्या व तो दीर्घ निःश्वास टाकीत होता. तपस्वी, धर्ममूर्ति, आजन्म ब्रह्मचारी, इच्छामरणी व अजिक्य भीष्मांना जर मृत्यु येऊं शकतो तर जगांत शाश्वत तरी काय असूं शकेल असें त्याला वाटलें. कौरवांची जयाची आशा भीष्मांच्या पतनाबरोबरच संपली अशी त्याची खात्री झाली. भीष्मांच्या पतनानंतर कौरवांच्या सेनेची पांडवांनीं केलेली भीषण पारध त्यानें प्रत्यक्ष पाहिली व कर्णा, आम्हांला वांचव हा त्या सेनेनें फोडलेला टाहो त्याचें मस्तक बधिर करूं लागला. अखेरीस सेनेचें धुरीणत्व पत्करण्यासाठीं दुसऱ्या दिवशीं त्यानें आपलें धनुष्य व रथ सिद्ध केले. पुनश्च एकवार भीष्मांना वंदन करून त्यांचा आशीर्वाद घ्यावा म्हणून तो शरशय्येच्या जागीं आला. रथाखालीं उतरून त्यानें नम्रपणें त्यांच्या पायावर मस्तक ठेवून वंदन केलें. तो स्फुंदून स्फुंदून रडूं लागला. शेवटीं घोगऱ्या आवाजानें तो त्यांना म्हणाला :

अभिवाद्याञ्जलिं बद्ध्वा वन्दमानोऽभ्यभाषत ।
कर्णोऽहमस्मि भद्रं ते वद मामभि भारत ।। ९
पुण्यया क्षेम्यया वाचा चक्षुषा चावलोकय ।
न नूनं सुकृतस्येह फलं कश्चित् समश्नुते ।। १०
यत्र धर्मपरो वृद्धः शेते भुवि भवानिह ।
कोशसंचयने मन्त्रे व्यूहे प्रहरणेषु च ।। ११
नाहमन्यं प्रपश्यामि कुरूणां कुरुपुंगव ।
बुद्ध्या विशुद्धया युक्तो यः कुरूंस्तारयेद् भयात्।। १२
योधांस्तु बहुधा हत्वा पितृलोकं गमिष्यति ।
अद्यप्रभृति संक्रुद्धा व्याघ्रा इव मृगक्षयम् ।। १३

पाण्डवा भरतश्रेष्ठ करिष्यन्ति कुरुक्षयम् ।
अद्य गाण्डीवघोषस्य वीर्यज्ञाः सव्यसाचिनः ।। १४
कुरवः संत्रसिष्यन्ति वज्रपाणेरिवासुराः ।
अद्य गाण्डीवमुक्तानामशनीनामिव स्वनः ।। १५
त्रासयिष्यति बाणानां कुरूनन्यांश्च पार्थिवान् ।
समिद्धोऽग्निर्यथा वीर महाज्वालो द्रुमान् दहेत् ।। १६
धार्तराष्ट्रान्प्रधक्ष्यंति तथा बाणाः किरीटिनः ।
यन येन प्रसरतो वाय्वग्नी सहितौ वने ।। १७
तेन तेन प्रवहतो भूरिगुल्मतृणद्रुमान् ।
यादृशोऽग्निः समुद्भूतस्तादृक् पार्थो न संशयः ।। १८
यथा वायुर्नरव्याघ्र तथा कृष्णो न संशयः ।
नदतः पाञ्चजन्यस्य रसतो गाण्डिवस्य च ।। १९
श्रुत्वा सर्वाणि सैन्यानि त्रासं यास्यंति भारत ।
कपिध्वजस्योत्पततो रथस्यामित्रकर्षिणः ।। २०
शब्दं सोढुं न शक्ष्यन्ति त्वामृते वीर पार्थिवाः ।
कोह्यर्जुनं योधयितुं त्वदन्यः पार्थिवोऽर्हति ।। २१
यस्य दिव्यानि कर्माणि प्रवदन्ति मनीषिणः ।
अमानुषैश्च संग्रामस्त्र्यम्बकेण महात्मना ।। २२
तस्माच्चैव वरं प्राप्तो दुष्प्रापमकृतात्मभिः ।
कोऽन्यः शक्तो रणे जेतुं पूर्वं यो न जितस्त्वया ।। २३
जितो येन रणे रामो भवता वीर्यशालिना ।
क्षत्रियान्तकरो घोरो देवदानवदर्पहा ।। २४

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय ३

"हे भरतपितामह ! आपलें क्षेम असो. मी वैकर्तन कर्ण आहे. आपण माझ्याकडे कृपादृष्टीनें पहा व माझ्याशीं कल्याणमय बोला. हर हर ! आपण इतक्या वृद्धावस्थेपर्यंत इतके धर्मतत्पर राहूनही आपणांस ही अवस्था प्राप्त झाली याचा अर्थ इहलोकीं सद्वर्तनाचें फल मिळत नाहीं असाच करावा काय ? हे कुरुश्रेष्ठ, धनसंचय, मसलत, व्यूह व शस्त्रप्रहार या बाबतींत आपल्याशीं तुलना करावयास योग्य अशी व्यक्ति मला दुसरी आढळत नाहीं. या प्रसंगीं आपणांवांचून कौरवांचें रक्षण करण्याचें सामर्थ्य दुसऱ्या कोणांतही

नाहीं व आपण तर आपलें कर्तव्य पार पाडून पितृलोकीं गमन करीत आहांत. हे भरतश्रेष्ठ ! चवताळलेला वाघ जसा हरिणांचा संहार करतो तसेंच पांडव आजपासून कुरुसैन्याचा विध्वंस करतील. वज्रधर इंद्रापासून जसे असुर संत्रस्त होतात तसेंच हे कौरव आज अर्जुनाच्या गांडीव धनुष्याच्या टणत्काराचें सामर्थ्य अनुभवून संत्रस्त होतील. आज गांडीव धनुष्यापासून सुटणाऱ्या बाणांचा, विजांच्या कडकडाटासारखा प्रचंड ध्वनि कौरव व त्यांच्या पक्षाचे इतर राजे यांची दाणादाण उडवील. ज्याप्रमाणें महाज्वालांनीं युक्त असा प्रचंड अग्नि वृक्ष जाळून टाकतो त्याप्रमाणें अर्जुनाचे बाण आज धृतराष्ट्राच्या पुत्रांस जाळून टाकतील. हे नरश्रेष्ठ ! अग्नि व वायु एकत्र होऊन ज्या ज्या बाजूंनीं पसरत जातात त्या त्या बाजूचीं प्रचंड झुडपें, गवत व वृक्ष यांची राखरांगोळी करतात. अर्जुन हा निःसंशय अकस्मात् पेटलेल्या अग्नीप्रमाणें असून श्रीकृष्ण हा वायूप्रमाणें आहे. पांचजन्य शंखाचा नाद व गांडीवाचा टणत्कार यांचें एकत्रीकरण झालें कीं, या सैन्याचा काळच ओढवेल. अर्जुनाचा तो शत्रूस आकर्षण करणारा कपिध्वज रथ वेगानें फिरूं लागला म्हणजे शब्द सहन करण्याचें सामर्थ्य एकट्या आपल्यावांचून दुसऱ्यांत नाहीं. आणि पार्थाशीं द्वंद्व करण्यास तरी आपल्यावांचून दुसरा कोण समर्थ आहे ? पार्थाचीं सारींच कृत्यें अतिमानवी असून त्यांनीं साऱ्याच बुद्धिमंतांना थक्क करून सोडलें आहे. निवातकवच प्रभृति अमानुष शक्तींना त्यानें विध्वंसून टाकलें व प्रत्यक्ष भगवान् शंकरांशींही युद्ध केलें, शंकरादि देवांपासून धैर्य व पराक्रम यांच्या भरंवशावर त्यानें अनेक अलौकिक वर संपादन केले आहेत. क्षत्रियांचा संहार करून देवदानवांचा गर्व हरण करणाऱ्या परशुरामाचा पराभव करणाऱ्या आपणांसही ज्याचा पराभव करतां आला नाहीं, त्या पार्थास संग्रामामध्यें जिंकण्यास दुसरा कोण समर्थ आहे ? अर्जुन हा युद्धकलेंत निपुण, दृष्टिभूल करणारा, सर्पाप्रमाणें भयंकर व विलक्षण शूर आहे."

या विलापांतून व विशेषतः त्यांतील भीष्मांच्या बरोबरच त्यानें केलेल्या अर्जुनाच्या प्रशंसेवरून त्याच्या अंतःकरणाची विशालताच

प्रकट होते यांत शंका नाहीं. कर्णाचें नेतृत्वही असेंच अभिजात होतें. भीष्मांच्या पतनानंतर केवळ कर्णाकडेच संरक्षणार्थ सर्व सैनिकांनीं धांव घेतली हेंच त्याच्या महत्त्वाचें निदर्शन आहे. महाभारतकार म्हणतात :--

**एवं ते स्म हि राधेयं सूतपुत्रं तनुत्यजम् ।**
**चुक्रुशुः सहिता योधास्तत्र तत्र महाबलाः ।। ४५**
**जामदग्न्याभ्यनुज्ञातमस्त्रे दुर्वारपौरुषम् ।**
**अगमन्नो मनः कर्णं बन्धुमात्ययिकेष्विव ।। ४६**
**स हि सक्तो रणे राजंस्त्रातुमस्मान् महाभयात् ।**
**त्रिदशानिव गोविंदः सततं सुमहाभयात् ।। ४७**

**—महाभारत, द्रोणपर्व अध्याय १**

याप्रमाणें अनेक लोकोत्तर गुणांचा सांठा असलेला कर्ण अखेरीस सर्व जगाच्या व एका मोठया राष्ट्राच्या विनाशास कारणीभूत झाला आहे. कमालीची आत्मकेंद्रितता व तिच्या पोटीं जन्माला आलेला अहंकार यांनीं त्याच्या सर्व सद्‌गुणांची माती केली. या आत्मकेंद्रिततेचें मूळ मागें वर्णन केल्याप्रमाणें दैवानें त्याला जें सूतपुत्रत्व प्राप्त करून दिलें त्याच्यांत दडलेलें आहे. लहानपणींच या सूतपुत्रत्वामुळेंच त्याला सामाजिक अपमानाचे धक्के बसले व ती अकुंरित झाली.

## आत्मकेंद्रितता

कर्णाच्या लहानपणीं कौरवांच्या राजसभेंत द्रोणांचा प्रवेश होऊन कौरव राजकुमारांबरोबरच अनेक राजकुमार, क्षत्रियकुमार व कर्तृत्वशाली युवक आचार्य द्रोणांकडे शस्त्रास्त्रविद्येचें शिक्षण घेण्यासाठीं जात असत. कर्णही त्यांच्याचकडे धनुर्विद्येचें शिक्षण घेण्यासाठीं गेला. त्यावेळीं तेथें येणाऱ्या राजकुमारांच्या आवडीनिवडी व संवयीनुरूप सामान्यतः दोन गट पडत असत. एक पांडवांचा व दुसरा कौरवांचा. त्या तशा लहान वयांत दीर्घद्वेषभावनेचा जरी संभव नसला तरी असूया व स्पर्धा यांचा प्रादुर्भाव या दोन गटांपैकीं निदान एका गटांत तरी अवश्य झालेला होता. द्रोणांच्या

त्या महाविद्यालयांत पांडव आपल्या तेजानें ताऱ्याप्रमाणें चमकत होते. युधिष्ठिराची बुद्धि, समयज्ञता व गांभीर्य, भीमाचें अमानुष सामर्थ्य, पार्थाचें चापल्य व धनुर्विद्येंतील प्रावीण्य, नकुलाचें सौंदर्य व त्याचा विनय, सहदेवाचें खड्गविद्येंतील प्रावीण्य व त्याची सहजसिद्ध शालीनता आणि सर्व भावांची परस्परएकजूट व युधिष्ठिराच्या मतानें चालण्याची वृत्ति, यांचा प्रभाव साऱ्या महाविद्यालयावर पडला होता. जो जो तेथें येई तो तो पांडवांच्या सद्गुणांचा ठसा घेऊनच जात असे. विशेषत या पांचही बंधूमध्यें धनुर्धर पार्थाचा प्रभाव सगळ्यांत अधिक असे. आचार्य द्रोणांचा तो पट्टशिष्य होता व आचार्यांनीं पुत्रापेक्षांही अधिक प्रेम करून विद्येचा व महास्त्रांच्या ज्ञानाचा त्याच्यावर जणू कांहीं वर्षाव केला. पार्थ हा याप्रमाणें सर्वांच्या नेत्रांचें केंद्रस्थान झाल्यामुळें त्याच्याशीं मैत्री करणें व त्याच्या महान् व्यक्तित्वाभोंवतीं राहणें विद्यार्थ्यांत सुरू असे. जे कर्तृत्वानें पार्थाची बरोबरी करावयास सर्वस्वीं असमर्थ पण स्वतःच्या अहंभावानें त्याचें सर्वश्रेष्ठ स्थान मात्र ज्यांना हवें होतें त्यांच्या मनांत स्वाभाविकपणें असूया व गुप्त द्वेष यांनीं ठाणें दिलें. अशी सगळी मंडळी क्रोध, मत्सर व अहंकार यांचा पुतळा असलेल्या दुर्योधनाच्या व्यक्तित्वाभोंवतीं गोळा होऊं लागली. अशा अवस्थेंत कर्ण त्या महाविद्यालयांत येऊन दाखल झाला. सारी कर्तृत्वशक्ति अंगांत असूनही केवळ जन्मानें आपण हीन असल्यामुळेंच काय ते आपल्याला क्षत्रिय कुमारांच्या बरोबरीचें स्थान लाभू शकत नाहीं या जाणिवेचा उदय कर्णाच्या मनांत फार लहानपणींच झाला होता. त्यामुळें स्वतःकडे पाहाण्याची त्याची दृष्टि वाजवीपेक्षां फाजील ताठरपणाची बनली होती. अशा जाणीवेच्या कर्तृत्वशील व्यक्तीची दृष्टि जितकी आत्मकेंद्रित (Self-centred) व प्रौढीची बनते तशीच ती कर्णाचीही बनून राहिली होती. जणू काय आपणच कर्तृत्वशक्तीची सीमामर्यादा असून केवळ जन्मामुळें आपल्यावर एकसारखा अन्याय होत आहे व त्यामुळें एकप्रकारच्या कर्तव्यबुद्धीनेंच आपण सर्व गुणवंतांचा पाडाव करून व वरचढ होऊन त्यांचा पाणउतारा करावा असें त्याला वाटत असे. तात्पर्य कर्णाचें मन या

महाविद्यालयांत प्रवेश करण्याच्या सुमारास बालकासारखें अल्लड, अवखळ व उन्मादी होतें. पण त्यांत बालकाचा निरागसपणा अणुमात्रही उरला नव्हता. विद्यालयांत प्रवेश करतांच पांडवांची तेथील कीर्ति व धनुर्धर पार्थाचा प्रभाव यांची त्याला लवकरच ओळख झाली व त्याच्या त्या आत्मकेंद्रिततेनुरूप पार्थापेक्षां स्वतःचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याची महत्त्वाकांक्षा त्याच्या मनांत वाढली पण तिचें त्याला विद्यालयांत व्यक्तीकरण करणें अशक्य झालें. कारण त्या क्षत्रिय राजकुमारांच्या विद्यालयांत आधीं कर्णालाच तो सूत असल्यामुळें कोणी विचारीना. या अपमानाचा वचपा म्हणून अर्जुनाहून स्वःतचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याच्या संधीची कर्ण वाट पाहूं लागला. याप्रमाणें अर्जुन व पांडव यांच्याविषयींच्या असूयेची जी समान भूमिका उत्पन्न झाली त्यामुळें विद्यालयांत त्याचा स्वाभाविक ओढा समानशील या नात्यानें दुर्योधनाच्या गटाकडे होता. महाभारतकार म्हणतातः—

सूतपुत्रश्च राधेयो गुरुं द्रोणामियात्तदा ।। ११
स्पर्धमानस्तु पार्थेन सूतपुत्रोऽत्यमर्षणः ।
दुर्योधनं समाश्रित्य सोऽवमन्यत पाण्डवान् ।। १२
अभ्ययात्स ततो द्रोणं धनुर्वेदचिकीर्षया ।
शिक्षाभुजबलोद्योगैस्तेषु सर्वेषु पाण्डवः ।। १३
अस्त्रविद्यानुरागाच्च विशिष्टोऽभवदर्जुनः ।
तुल्येष्वस्त्रप्रयोगेषु लाघवे सौष्ठवेषु च ।। १४
सर्वेषामेव शिष्याणां बभूवाभ्यधिकोऽर्जुनः।। १५

—महाभारत, आदिपर्व अ. १३२

स बालस्तेजसा युक्तः सूतपुत्रत्वमागतः ।
चकाराङ्गिरसां श्रेष्ठाद्धनुर्वेदं गुरोस्तदा ।। ५
स बलं भीमसेनस्य फाल्गुनस्य च लाघवम् ।
बुद्धिं च तव राजेंद्र यमयोर्विनयं तदा ।। ६
सख्यं च वासुदेवेन बाल्ये गाण्डीवधन्वनः ।
प्रजानामनुरागं च चिन्तयानो व्यदह्यत ।। ७

स सख्यमकरोद्वाल्ये राज्ञा दुर्योधनेन च ।
युष्माभिर्नित्यसंद्विष्टो दैवाच्चापि स्वभावतः ।। ८
—महाभारत, शांतिपर्व अध्याय २

पण दुर्योधनाला त्या वेळीं कर्णाच्या महत्त्वाची व सामर्थ्याची मुळींच ओळख नव्हती. लवकरच असा एक प्रसंग उद्भवला कीं ज्यामुळें कर्णाच्या या साऱ्या मनोवृतीचें प्रकट आविष्करण होऊन त्यांतून दुर्योधन व कर्ण यांच्या मैत्रीचें कालकूट जन्म पावलें.

## दुर्योधनाशीं संबंध

महाविद्यालयांतील सगळे कुरुवंशीय राजकुमार शस्त्रास्त्रविद्येंत निष्णात झाल्याची खात्री पटल्यावर आचार्य द्रोणांनीं पितामह भीष्मांच्या नेतृत्वाखालीं एक मोठा समारंभ घडवून आणून त्या त्या राजकुमारांच्या शस्त्रास्त्रज्ञानाचे वेगवेगळे प्रयोग सर्वांना दाखविले. त्या वेळीं तेथें धनुर्धर पार्थाच्या अस्त्रविद्येचा व कलेचा उपस्थित लोकांना अतिशय विस्मय वाटून ते त्याची मुक्तकंठानें प्रशंसा करूं लागले. मत्सरानें जळणाऱ्या कर्णाला ती प्रशंसा असह्य झाली व आपण सर्वांत श्रेष्ठ आहोंत हें दाखवावयास अर्जुनाच्या पाण-उताऱ्यावांचून दुसरा मार्ग नाहीं व त्यासाठीं सर्व समाजाच्या मनाचें आकर्षण करावयास इतकी उत्कृष्ट संधि दुसरी नाहीं असें पाहून कर्णानें सर्वांचें लक्ष आपणाकडे केंद्रित करण्यासाठीं दाराजवळूनच आपली भुजा थोपटली. महाभारतकार म्हणतात :—

ततः समाप्तभूयिष्ठे तस्मिन्कर्मणि भारत ।
मन्दीभूते समाजे च वादित्रस्य च निःस्वने ।। २६
द्वारदेशात्समुद्भूतो माहात्म्यबलसूचकः ।
वज्रनिष्पेषसदृशः शुश्रुवे भुजनिःस्वनः ।। २७
दीर्यन्ते किं नु गिरयः किंस्विद्भूमिर्विदीर्यते ।
किंस्विदापूर्यते व्योम जलधाराघनैर्घनैः ।। २८
रङ्गस्यैवं मतिरभूत्क्षणेन वसुधाधिप ।
द्वारं चाभिमुखाः सर्वे बभूवुः प्रेक्षकास्तदा ।। २९
—महाभारत, आदिपर्व अध्याय १३५

त्याच्या बाहूंचा तो वज्रासारखा आवाज ऐकतांच सर्व लोक थक्क होऊन त्याच्याकडे पाहूं लागले. त्याबरोबर दारावरच्या पहारेकऱ्यांनीं कर्णास यावयास वाट दिली. व कर्ण ज्या ठिकाणीं गुरु द्रोण बसले होते तेथें येऊन त्यांना आपल्या कलेच्या प्रदर्शनाची आज्ञा मागण्याऐवजीं एक प्रकारच्या औद्धत्यानेंच त्यांना प्रणाम करून अर्जुनाचाच अधिक्षेप करूं लागला.

**स निरीक्ष्य महाबाहुः सर्वतो रङ्गमण्डलम् ।**
**प्रणामं द्रोणकृपयोर्नात्यादृतमिवाकरोत् ॥ ६**
**स समाजजनः सर्वो निश्चलः स्थिरलोचनः ।**
**कोऽयमित्यागतक्षोभः कौतूहलपरोऽभवत् ॥ ७**
**सोऽब्रवीन्मेघगम्भीरस्वरेण वदतां वरः ।**
**भ्राता भ्रातरमज्ञातं सावित्रः पाकशासनिम् ॥ ८**
**पार्थ यत्ते कृतं कर्म विशेषवदहं ततः ।**
**करिष्ये पश्यतां नृणामात्मना विस्मयंगमः ॥ ९**

—महाभारत, आदिपर्व अ. १३६

एकवार त्यानें रंगमंडपाकडे पाहून एक प्रकारच्या औद्धत्यानेंच कृपाचार्य व द्रोण यांना प्रणाम केला. व सर्व समाज तटस्थ होऊन हा कोण असावा याचा तर्क करीत आहेत तोंच गंभीर आवाजानें त्यानें अर्जुनाला उद्देशून म्हटलें, तूं जी कला आतां दाखविलीस तशीच किंबहुना त्याहूनही अधिक अशी माझ्या कौशल्याची प्रचीति मी लोकांना दाखवावयास सिद्ध आहे. द्रोणांनीं हा पार्थाला कां आव्हान करतो आहे हें न कळून त्याला त्याच्या कलेचें काय सामर्थ्य असेल तें शांतपणें दाखवावयास सांगितलें. कर्णानें अर्जुनाप्रमाणेंच आपल्या विद्येचें सामर्थ्य सर्वांना दाखविलें. पण तेवढ्यानें त्याचें समाधान होईना. याच वेळीं आपण जर अर्जुनाला जिंकलें तर आपलें महत्त्व व कीर्ति एकदम वाढतील अशा कल्पनेनें त्यानें अर्जुनाला द्वंद्वयुद्धाचें आव्हान दिलें. महाभारतकार वर्णन करतात :—

**द्वंद्वयुद्धं च पार्थेन कर्तुमिच्छाम्यहं प्रभो ॥ १५**

**वैशंपायन** उवाच ।

**ततः क्षिप्रमिवात्मानं मत्वा पार्थोऽभ्यभाषत ।**
**कर्णं भ्रातृसमूहस्य मध्ये चलमिव स्थितम् ॥ १७**

अर्जुन उवाच।

अनाहूतोपसृष्टानामनाहूतोपजल्पिनाम् ।
ये लोकास्तान्हतः कर्ण मया त्वं प्रतिपत्स्यसे ॥ १८

कर्ण उवाच।

रङ्गोऽयं सर्वसामान्य. किमत्र तव फाल्गुन।
वीर्यश्रेष्ठाश्च राजानो बलं धर्मोऽनुवर्तते ॥ १९
किं क्षेपैर्दुर्बलायासैः शरैः कथय भारत।
गुरोः समक्षं यावत्ते हराम्यद्य शिरः शरैः ॥ २०

--महाभारत, आदिपर्व अ. १३६

वारंवार कांहीं एक संबंध नसतां साऱ्या समाजांत हा आपणाला द्वंद्वयुद्धार्थ कां आव्हान देतो आहे हें अर्जुनाला समजेना. शेवटीं हा आपला अकारणच अधिक्षेप चालला आहे हें पाहून त्याला अत्यंत क्रोध आला व त्यानें त्याला सांगितलें कीं, ठीक आहे. मी तुझें द्वंद्वाचें आव्हान स्वीकारतों. अनाहूतपणें येणारे व उगाच बडबड करणारे जे नराधम असतात त्यांना जी दुर्गति प्राप्त होते त्याच गतीला मी द्वंद्वयुद्धांत माझ्या बाणांनीं तुला ठार मारल्यावर तूं गेल्यावांचून राहणार नाहींस. हें ऐकतांच कर्णानें अर्जुनास उत्तर दिलें कीं हा रंग सर्वसामान्य आहे. तूं येथें असा कोण लागून गेला आहेस? राजे हे पराक्रमानें श्रेष्ठ असतात व धर्म सामर्थ्याचा गुलाम असतो. उगाच बडबडण्यांत अर्थ काय ? जें काय तुला उत्तर द्यावयाचें तें आपल्या बाणांनीं दे. तुझ्या गुरूसमक्ष तुझें मस्तक मी माझ्या बाणांनीं तोडून अंतराळांत भिरकावून देईन. कर्णाचा मत्सर किती शिगेला पोंचला होता याचें हें उदाहरणच आहे. त्याचा तो अधिक्षेप अर्जुनाला सहन झाला नाहीं. तो आपलें धनुष्य घेऊन युद्धार्थ उभा राहिला. पांडवांच्या शौर्याला आव्हान देणारा, व आपल्याप्रमाणेंच त्यांच्याविषयीं अनिवार द्वेषभावना बाळगणारा एक तरी मनुष्य आहे असें पाहून तेथें असलेल्या दुर्योधनाला त्याच्याविषयीं स्वाभाविकपणेंच आत्मीयता वाटूं लागली. कर्ण व अर्जुन दोघेही द्वंद्वार्थ उभे राहतांच द्वंद्वाच्या नियमाप्रमाणें सर्वदृष्टींनीं समान असलेल्या लोकांतच द्वंद्व होऊं शकतें हें जाणणारे कृपाचार्य आपल्या जागेवरून उठून कर्णाला विचारूं लागले.

तावुद्यतमहाचापौ कृपः शारद्वतोऽब्रवीत् ।
द्वंद्वयुद्धसमाचारे कुशल. सर्वधर्मवित् ।। ३०
अयं पृथायास्तनयः कनीयान्पाण्डुनन्दनः ।
कौरवो भवता सार्धं द्वंद्वयुद्धं करिष्यति ।। ३१
त्वमप्येवं महाबाहो मातरं पितरं कुलम् ।
कथयस्व नरेन्द्राणां येषां त्वं कुलभूषणम् ।। ३२
ततो विदित्वा पार्थस्त्वां प्रतियोत्स्यति वा न वा ।
वृथा कुलसमाचारैर्न युध्यन्ते नृपात्मजाः ।। ३३
—महाभारत, आदिपर्व अ. १३६

हा तृतीय पाण्डुपुत्र कौरववंशांतील असून कुन्तीचा मुलगा आहे. हा तुझ्याबरोबर द्वंद्वयुद्ध करावयास सिद्ध आहे. हा राजपुत्र आहे हें तुला माहीतच आहे. द्वंद बरोबरीच्या लोकांतच खेळलें जातें असा नियम आहे. तू आपले माता, पिता, व ज्या नरेंद्रांच्या कुळांत जन्म घेतला असशील त्या कुळाचें नांव सांग. त्यानंतरच पार्थाच्या योग्यतेच्या पुरुषानें तुझ्याशीं युद्ध करावयाचें कीं नाहीं हें ठरेल. या तत्कालीन रूढीस अनुसरून कृपाचार्यांनीं विचारलेल्या या सहज प्रश्नानें हीन कुलजत्वाच्या कर्णाच्या अंतःकरणांतील दुःखावर चरचरीत डाग दिल्यासारखें झालें. त्यानें लाजेनें मान खालीं घातली. लहानपणापासून पांडवांच्या विनाशाच्या खटपटींत असलेल्या दुर्योधनाचें पांडवांच्या सामर्थ्यापुढें कांहींच चालत नसल्यामुळें त्याच्या अंतःकरणांतील महत्त्वाकांक्षेचा मालवत चाललेला दीप कर्णाच्या धैर्यानें व त्याच्या अस्त्रज्ञानाच्या नुकत्याच आलेल्या प्रत्ययानें स्वाभाविकपणें याचवेळीं प्रज्वलित होऊन उठला. अर्जुन व भीमसेन यांच्या सामर्थ्याला कर्णाचा पायबंद घालून आपल्याला आपली महत्त्वाकांक्षा सफल करून घेतां येईल असें त्याला वाटलें. व या संधीचा उपयोग करून त्याला आपला सदाचा अंकित करून घ्यावें असें मनांत आणून तो पुढें झाला, व त्यानें कृपाचार्यांसमक्ष त्याला अंगदेशाचें राज्य देऊन एकदम योग्यतेस चढविलें. दुर्योधन आचार्यांना म्हणू लागला कीं नुसत्या कर्णाला पार्थाशीं द्वंद्वयुद्ध खेळतां येणें शक्य नसेल; पण अंगराज कर्णाशीं द्वंद्वयुद्ध खेळावयास

कोणतीच अडचण उपस्थित होऊं शकत नाहीं. हें बोलणें चालू असे-पर्यंत कर्ण कोण आहे याची कोणाला कांहींच कल्पना नव्हती. पण जन्मदुर्दैवी कर्णाचें दुर्दैव नुकताच राजा झालेल्या कर्णाच्यासमोर नेमकें त्याच वेळीं येऊन उपस्थित झालें. महाभारतकार म्हणतातः—

ततः स्रस्तोत्तरपटः स्वप्रस्वेदः सवेपथुः ।
विवेशाधिरथो रंगं यष्टिप्राणो ह्वयन्निव ।। १
तमालोक्य धनुस्त्यक्त्वा पितृगौरवयन्त्रितः ।
कर्णोऽभिषेकार्द्रशिराः शिरसा समवन्दत ।। २
ततः पादाववच्छाद्य पटान्तेन ससंभ्रमः ।
पुत्रेति परिपूर्णार्थमब्रवीद्रथसारथिः ।। ३
परिष्वज्य च तस्याथ मूर्धानं स्नेहविक्लवः ।
अंगराज्याभिषेकार्द्रमश्रुभिः सिषिचे पुनः ।। ४
तं दृष्ट्वा सूतपुत्रोऽयमिति संचित्य पाण्डवः ।
भीमसेनस्तदा वाक्यमब्रवीत्प्रहसन्निव ।। ५
न त्वमर्हसि पार्थेन सूतपुत्र रणे वधम् ।
कुलस्य सदृशस्तूर्णं प्रतोदो गृह्यतां त्वया ।। ६
अंगराज्यं च नार्हस्त्वमुपभोक्तुं नराधम ।
श्वा हुताशसमीपस्थं पुरोडाशमिवाध्वरे ।।७

—महाभारत, आदिपर्व अ. १३७

तेवढ्यांत कर्णाचा पिता अधिरथ सूत हातांत कांठी घेऊन वार्ध-क्यामुळें थरथर कांपत तेथें येऊन उभा राहिला. त्याला पाहतांच धनुष्य टाकून पित्याच्या गौरवामुळें कर्णानें त्याला मस्तक लववून नमस्कार केला. त्या सारथ्यानें पुत्रा अशी हांक मारून कर्णाला आलि-गन दिलें व नुकतेंच राज्याभिषेकानें ओले झालेले त्याचे केस आपल्या प्रेमाश्रूंनीं पुनश्च भिजविले. या प्रकारानें तो सूतपुत्र आहे याची जाणीव सर्वांनाच झाली व भीमसेन उपहासपूर्वक त्याला म्हणाला कीं हे सूतपुत्रा आमच्या पार्थानें युद्धांत तुला ठार मारावें अशा योग्य-तेचा तूं नाहींस. आपल्या योग्यतेला अनुरूप असा चाबूक हातांत घेऊन तूं सारथ्यकर्म कर. हें ऐकतांच दुर्योधनानें त्याची बाजू उचलून धरली व बळानें तोच क्षत्रियांत अधिक श्रेष्ठ असें सांगून

त्याला सांवरून धरलें. राजकुमार दुर्योधनानें ऐनवेळीं रस्त्यावरून आपल्याला एकदम राजसिंहासनावर बसवून भव्य सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त करून दिली याचा कर्णाच्या मनावर विलक्षण परिणाम झाला व त्याच्या मोबदल्यांत आत्यंतिक सख्यावांचून दुर्योधन कांहींच मागत नाहीं हें पाहून गहिंवरलेला कर्ण दुर्योधनाचा सदाचा अंकित झाला. यांतूनच पुढें दुर्योधन व कर्ण यांचें अभेद्य सख्य निर्माण झालें व श्रीकृष्णार्जुनांप्रमाणेंच तें शेवटपर्यंत टिकलें. त्या रंगांत द्वंद्व अनिवार्य होऊन जमलेल्या राजकुमारांत दोन पक्ष निर्माण झाले व सगळेच आपआपलीं शस्त्रें सांवरून युद्धाच्या इच्छेनें गर्जना करूं लागले. पण कर्णाच्या सुदैवानें व राष्ट्राच्या दुर्दैवानें त्याच वेळीं सूर्यास्त होऊन तें भांडण भीष्मांच्या मध्यस्थीनें तेथेंच मिटलें. दुर्दैवानें म्हणण्याचें कारण असें कीं, त्यावेळीं अर्जुन हा ब्रह्मास्त्रवेत्ता असून कर्णापेक्षां निःसंशय अधिक अस्त्रज्ञ असल्यामुळें युद्ध झालेंच असतें तर त्यांत त्यानें कर्णाला निःसंशय ठार मारलें असतें. व त्यामुळें दुर्योधनाच्या दुष्टाव्याला सामर्थ्याचा नुकताच मिळालेला आधार सदाचा नष्ट होऊन दगडावर पडलेल्या निखाऱ्याप्रमाणें तो पार विजून तरी गेला असता किंवा षंढाप्रमाणें सदाचा निकामी तरी होऊन राहिला असता. पण भवितव्यतेच्या मनांत वेगळें होतें म्हणूनच तो प्रसंग टळला. तथापि आत्मकेंद्रिततेंतून उत्पन्न झालेल्या मत्सरानें निरपराध अर्जुनाच्या वधावांचून आपणांस खरें महत्त्व मिळणार नाहीं या मनोविकृतीच्या पूर्णपणें आहारीं गेल्यामुळें कर्णाचे सारे सद्गुण कवडीमोल झाले. इतकेंच नव्हें तर एरवी त्याच्यासारख्या तपस्वी व संयमी पुरुषाला सहजसाध्य होणारी विद्या देखील शापित म्हणूनच मिळाली.

## शापित विद्यादान

कर्णाला लवकरच असें आढळून आलें कीं अर्जुन आपल्यापेक्षां अस्त्रज्ञानांत वरचढ असून अमोघ ब्रह्मास्त्रामुळें तो केवळ अजिंक्य आहे. त्यानें एकांतांत द्रोणांची भेट घेतली व त्यांना अशी प्रार्थना केली कीं, प्रसादनविधि व उपसंहार यांसह ब्रह्मास्त्र शिकण्याची

माझी इच्छा आहे. कारण आपला प्रिय शिष्य जो अर्जुन त्याच्याबरोबर द्वंद्वयुद्ध करून त्याला जिकण्याची माझी इच्छा आहे. आपण समबुद्धीचे असून पुत्राप्रमाणें शिष्यांवरही प्रेम करतां. आपली कृपा झाली असतां विद्वान् लोक हा शस्त्रविद्येंत अनभ्यस्त आहे असें मला खात्रीनें म्हणणार नाहींत. कर्णाच्या या विद्या शिकण्याच्या मागचें अर्जुनाविषयींच्या अकारण मत्सराचें कालकूट पाहून द्रोणाचार्यांना अतिशय वाईट वाटलें. त्यांचें स्वतःच्या मुलापेक्षांही अर्जुनावर अधिक प्रेम असल्यामुळें त्याचा हा अकारण शत्रु विद्येचें दूध पाजून पोसावा असें त्यांना वाटेना. परंतु तें कारण कर्णाला न सांगतां त्यांनीं त्याला असें सांगितलें कीं, ज्यानें यथावत् व्रताचरण केलें आहे अशा ब्राह्मणाला किंवा ज्यानें तपश्चर्या केली आहे अशा क्षत्रियाला मी ब्रह्मास्त्र शिकवितों. इतरांना नाहीं. महाभारतांत हा संवाद पुढीलप्रमाणें वर्णिला आहे :–

**ब्रह्मास्त्रं वेत्तुमिच्छामि सरहस्यनिवर्तनम् ।**
**अर्जुनेन समं चाहं युध्येयमिति मे मतिः ।। १०**
**समः शिष्येषु वः स्नेहः पुत्रे चैव तथा ध्रुवम् ।**
**त्वत्प्रसादान्न मां ब्रूयुरकृतास्त्रं विचक्षणाः ।। ११**
**द्रोणस्तथोक्तः कर्णेन सापेक्षः फाल्गुनं प्रति ।**
**दौरात्म्यं चैव कर्णस्य विदित्वा तमुवाच ह ।। १२**
**ब्रह्मास्त्रं ब्राह्मणो विद्याद्यथावच्चरितव्रतः ।**
**क्षत्रियो वा तपस्वी यो नान्यो विद्यात्कथञ्चन ।। १३**

—महाभारत, शांतिपर्व अध्याय २

द्रोणांच्या या उत्तरानें कर्णाच्या मनांतील हीन कुलीनत्वाच्या जाणिवेची जखम चांगलीच दुखावली गेली. त्यानें त्यांच्याविषयींची अढी मनांत धरली ती सदाचीच. पुढें जेव्हां जेव्हां प्रसंग आला त्या त्या प्रत्येक वेळीं कर्णानें आचार्यांना विषारी नागासारखा दंश करून त्यांचा जो पाणउतारा केलेला आहे त्याचें खरें मूळ येथें आहे. द्रोणांच्या या उत्तरानें अतिशय संतापून त्यानें द्रोणांना ज्यांच्याजवळून अस्त्रविद्या प्राप्त झाली त्या परशुरामाजवळून अस्त्रविद्या संपादन करण्याचा निश्चय केला. महेंद्र पर्वतावर तो उप-

स्थित झाला. स्वतःच्या हीन कुलीनत्वाची अडचण येऊं नये म्हणून त्यानें असत्य भाषण करावयाचें ठरविलें. परशुरामांना वन्दन करून 'मी भार्गव गोत्राचा ब्राह्मण असून धनुर्वेद शिकावा यास्तव आलों आहें' असें तो म्हणाला.

स तु राममुपागम्य शिरसाऽभिप्रणम्य च ।
ब्राह्मणो भार्गवोऽस्मीति गौरवेणाभ्यगच्छत ।। १५
रामस्तं प्रतिजग्राह पृष्ट्वा गोत्रादि सर्वशः ।
उष्यतां स्वागतं चेति प्रीतिमांश्चाभवद्भृशम् ।। १६

—महाभारत, शांतिपर्व अध्याय २

त्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवून रामानें त्याला आपल्या आश्रमांत आश्रय दिला. तेथें असतां परशुरामाच्या दर्शनासाठीं येणाऱ्या अनक मोठमोठ्या लोकांशीं कर्णाचे संबंध आले. त्यानेंही गुरूंची मोठ्या निष्ठेनें सेवा करून त्यांच्यापासून दिव्य अस्त्रज्ञान संपादन केलें. या आश्रमांत असतांनाच कर्णावर आलेल्या एका घोर प्रसंगाचें महाभारतकारांनीं पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे :–

स कदाचित्समुद्रान्ते विचरन्नाश्रमान्तिके ।
एकः खड्गधनुष्पाणिः परिचक्राम सूर्यजः ।। १९
सोऽग्निहोत्रप्रसक्तस्य कस्यचिद्ब्रह्मवादिनः ।
जघानाज्ञानतः पार्थ होमधेनुं यदृच्छया ।। २०
तदज्ञानकृतं मत्वा ब्राह्मणाय न्यवेदयत् ।
कर्णः प्रसादयंश्चैनमिदमित्यब्रवीद्वचः ।। २१
अबुद्धिपूर्वं भगवन् धेनुरेषा हता तव ।
मया तत्र प्रसादं च कुरुष्वेति पुनः पुनः ।। २२
तं स विप्रोऽब्रवीत्क्रुद्धो वाचा निर्भर्त्सयन्निव ।
दुराचार वधार्हस्त्वं फलं प्राप्नुहि दुर्मते ।। २३
येन विस्पर्धसे नित्यं यदर्थं घटसेऽनिशम् ।
युध्यतस्तेन ते पाप भूमिश्चक्रं ग्रसिष्यति ।। २४
ततश्चक्रे महीग्रस्ते मूर्धानं ते विचेतसः ।
पातयिष्यति विक्रम्यः शत्रुर्गच्छ नराधम ।। २५

यथेयं गौर्हता मूढ प्रमत्तेन त्वया मम ।
प्रमत्तस्य तथाऽरातिः शिरस्ते पातयिष्यति ।। २६
शप्तः प्रसादयामास कर्णस्तं द्विजसत्तमम् ।
गोभिर्धनैश्च रत्नैश्च स चैनं पुनरब्रवीत् ।। २७
न हि मेऽव्याहृतं कुर्यात्सर्वलोकोऽपि केवलम् ।
गच्छ वा तिष्ठ वा यद्वा कार्यं ते तत्समाचर ।। २८
इत्युक्तो ब्राह्मणेनाथ कर्णो दैन्यादधोमुखः ।
राममभ्यगमद्भीतस्तदेव मनसा स्मरन् ।। २९

—महाभारत, शान्तिपर्व अध्याय २

समुद्रतटाकीं परशुरामाच्या आश्रमाजवळच कर्ण धनुर्विद्येचा अभ्यास करीत असे. एके दिवशीं तो या त्याच्या क्रमानुसार लक्षवेधाचा अभ्यास करीत असतांना एका तपस्वी व अग्निहोत्री ब्राह्मणाची गाय त्याच्या हातून मारली गेली. त्या ब्राह्मणाला कर्णाचा अतिशय संताप आला व कर्णाची निर्भर्त्सना करीत तो म्हणाला कीं, "हे दुराचारा, दुर्मते, तूं वधार्ह आहेस. मी तुझा कांहीं एक अपराध केला नसतांना माझें एकमात्र धन असलेली गाय मारून तूं माझ्या सर्वस्वाचें अपहरण केलें आहेस म्हणून या कर्माचें तुला तसेंच भयंकर फळ मिळेल. हे पाप्या, ज्याच्याशीं तूं स्पर्धा करीत आहेस आणि ज्याच्या पराजयाकरितां तुझी रात्रंदिवस खटपट चालली आहे त्याच्याशीं तूं अखेरचें युद्ध करीत असतांना तुझ्या रथाचें चाक पृथ्वी गिळून टाकील. हे नराधमा, तसें होऊन तुझें चित्त अस्वस्थ झालें असतांना तुझ्या अडचणीचा फायदा घेऊन तो शत्रु तुझ्यावर चाल करील व तुझा शिरच्छेद करील. ज्याप्रमाणें तूं उन्मत्तपणानें माझी गाय मारलीस, त्याचप्रमाणें तो तुझा शत्रूही तुझा शिरच्छेद केल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या हातून अज्ञानामुळें झालेल्या ह्या चुकीचा इतका भयंकर परिणाम पाहून कर्णाला अत्यंत दुःख झालें व त्यानें त्या ब्राह्मणाला शेंकडो गाई, तेजस्वी रत्नें, व अपार द्रव्य देऊन अज्ञानतः घडलेल्या ह्या अपराधाची क्षमा करण्याची विनंती केली. पण तो उग्र तपस्वी त्यामुळें मुळींच संतुष्ट न होतां अधिक क्षुब्ध मात्र झाला व त्यानें कर्णाला सांगि-

तलें कीं, माझ्या तोंडून एकदां जे शब्द बाहेर पडले ते कोणाच्याही सामर्थ्यानें कधींही बदलले जाणार नाहींत. तूं येथून निघून जा, अथवा पाहिजे असल्यास चिरकाल येथेंच उभा रहा, काय वाटेल तें कर, पण माझा शाप निश्चित खरा होईल. अत्यंत भयभीत झालेला कर्ण खालीं मान घालून व दीनपणानें स्वतःच्याच भाग्याला दोष देत आपल्या गुरूच्या आश्रमाकडे परत फिरला. त्याच्या मनांत सारखा तोच विषय घोळत होता. पण आपलें सारेंच सोंग बाहेर पडेल या भयानें त्यानें भगवान् परशुरामांना मात्र कांहींच सांगितलें नाहीं. या त्याच्या आत्मघातक मौनामुळें परशुरामासारख्या समर्थाकडून क्वचित् जो त्या भयानक शापाच्या प्रतिकाराचा कांहीं उपाय घडूं शकला असता, तोही घडण्याची मुळींच शक्यता उरली नाहीं.

कर्णाचें बाहुवीर्य, त्याचें प्रेम, विनय, इंद्रियजय, मनोनिग्रह व गुरुसेवा हे गुण उत्कटतेनें दृष्टीस पडल्यामुळें परशुराम त्याच्यावर अत्यंत प्रसन्न झाले व त्यांनीं कर्णाला ब्रह्मास्त्राचा संपूर्ण प्रयोग यथाविधि शिकविला. कदाचित् हें ज्ञान पदरांत पडल्याबरोबर कर्ण गुरूची आज्ञा घेऊन परत फिरला असता तर पुढची आपत्ति त्याच्यावर ओढवली नसती. पण विद्येचा हेतु हीन असल्यामुळें ती शापित ठरल्यावांचून कशी रहावी? त्याच्या सहनशीलतेच्या प्रकरणांत वर्णिल्याप्रमाणें किड्यानें कर्णाची मांडी खाऊन टाकल्यानंतर कर्णानें त्या वेळीं जें अपूर्व धैर्य दाखविलें त्यामुळेंच त्याचें खरें स्वरूप बाहेर पडलें व त्याची विद्या शापित ठरली. महाभारतकार म्हणतात :

**रामः कर्णं च सक्रोधमिदं वचनमब्रवीत् ॥ २४**

**अति दुःखमिदं मूढ न जातु ब्राह्मणः सहेत् ।**
**क्षत्रियस्येव ते धैर्यं कामया सत्यमुच्यताम् ॥ २५**

**तमुवाच ततः कर्णः शापाद्भीतः प्रसादयन् ।**
**ब्रह्मक्षत्रान्तरे जातं सूतं मां विद्धि भार्गव ॥ २६**

राधेयः कर्ण इति मां प्रवदन्ति जना भुवि ।
प्रसादं कुरु मे ब्रह्मन्नस्त्रलुब्धस्य भार्गव ।। २७
पिता गुरुर्न संदेहो वेदविद्याप्रदः प्रभुः ।
अतो भार्गव इत्युक्तं मया गोत्रं तवान्तिके ।। २८
तमुवाच भृगुश्रेष्ठः सरोषः प्रदहन्निव ।
भूमौ निपतितं दीनं वेपमानं कृताञ्जलिम् ।। २९
यस्मान्मिथ्योपचरितो ह्यस्त्रलोभादिह त्वया ।
तस्मादेतन्न ते मूढ ब्रह्मास्त्रं प्रतिभास्यति ।। ३०
अन्यत्र वधकालात्ते सदृशेन समीयुषः ।
अब्राह्मणेन हि ब्रह्मं ध्रुवं तिष्ठेत्कदाचन ।। ३१
न त्वया सदृशो युद्धे भविता क्षत्रियो भुवि ।
एवमुक्तः स रामेण न्यायेनोपजगाम ह ।। ३२

—महाभारत, शांतिपर्व अध्याय ३

भार्गवरामांना कर्णाच्या त्या अपूर्व सहनशक्तीचें नवल वाटून तो ब्राह्मण नसावा असें त्यांच्या मनानें घेतलें. ते त्याला म्हणाले, "खरें खरें सांग. कोणताहि ब्राह्मण आघाताच्या या वेदना इतक्या स्थैर्यानें कधींच सहन करूं शकणार नाहीं. आघात सहन करण्याच्या बाबतींतलें तुझें हें विलक्षण धैर्य पाहून तूं ब्राह्मण नसून क्षत्रिय असला पाहिजेस असें मला निश्चित वाटतें व तसें असेल तर तूं खोटें बोलून माझ्याजवळून विद्या संपादन केली आहेस. आपल्या गुरूशीं खोटें बोलण्यासारखें जगांत दुसरें कोणतेंही पाप नाहीं. तूं एकदां कपट केलेंस तें केलेंस. पण आतां तरी सत्य काय तें सांग. नाहींतर कपटाचरणाचे भयानक परिणाम तुला भोगावे लागतील." भगवान् परशुरामाचें अपार सामर्थ्य व त्यांचा भयंकर क्रोध याची कर्णाला पूर्णपणें कल्पना असल्यामुळें तो भीतीनें कांपत कांपत त्यांना म्हणाला कीं, मी ब्राह्मण व क्षत्रिय या दोन्ही वर्णांतील नसून सूत जातींत उत्पन्न झालों आहें. अधिरथ सुताचा मी मुलगा असून राधा हें माझ्या आईचें नांव आहे. म्हणून जगांत मला राधेय आधिरथी कर्ण असें म्हणतात. मी केवळ अस्त्रलोभानें आपल्याशीं असत्याचरण केलें, म्हणून आपण मजवर अनुग्रह करा. वेदविद्या शिकविणारा

गुरु हा खरोखरीच पिता होय. आपण मला धनुर्वेद शिकविला असल्यामुळें आपण माझे वडीलच आहांत. म्हणून मी आपल्याला माझी जात ब्राह्मण व गोत्र भार्गव असल्याचें सांगितलें. आपलें गोत्र भार्गव असल्यामुळें मीही त्याचाच आश्रय केला. असें बोलत अत्यंत दीन झालेल्या कर्णानें परशुरामांच्या पायावर लोटांगण घातलें. परशुराम अत्यंत क्रुद्ध झाले होते खरे; पण शापाच्या भीतीनें थरथर कांपणाऱ्या कर्णाची ती दीन अवस्था पाहून त्यांना तशा रागांतही किंचित हंसू आल्यावांचून राहिलें नाहीं. नंतर शीघ्रकोपी राम त्याला म्हणाले कीं, अस्त्रलोभानें तूं माझ्याशी कपटाचरण केलें असल्यामुळें मी तुला जसा शाप देणार आहे, त्याच प्रमाणें तूं स्वतःच्या देहाकडे न पहातां अविश्रांतपणें जी माझी सेवा केलीस त्यामुळें मी तुला वरदानही देणार आहे. तुला माझा शाप असा आहे कीं आपल्या बरोबरीच्या योद्धयाशीं तूं अखेरचें युद्ध करीत असतांना, तुझा वधकाल जवळ आल्यावर, मी दिलेल्या ह्या महास्त्राचा तुला कांहीं एक उपयोग होणार नाहीं. तुला त्याचें पूर्णपणें विस्मरण होईल. ब्रह्मास्त्र तुझ्यासारख्या कपटाचरणी हीनकुलीनाजवळ मरणघटकेपर्यंत केव्हांही टिकत नसतें. माझें तुला वरदान असें आहे कीं, हा विशिष्ट प्रसंग सोडून इतरवेळीं मी दिलेलें अस्त्र तुला निस्संशय उपयोगी पडेल व तुझ्यासारखा योद्धा पृथ्वीवर सहसा होणार नाहीं. तुझ्या पराक्रमानें तुझी कीर्ति त्रिखंड गाजेल. आतां मात्र तूं माझ्या आश्रमांत एक क्षणही न थांबतां येथून चालता हो. कारण तुझ्यासारख्या असत्यवादी व कपटाचरणी व्यक्तीला या आश्रमाच्या पवित्र परिसरांत मुळींच जागा नाहीं."

मनांत अत्यंत खिन्न झालेला कर्ण विद्येबरोबरच दोन भयानक अभिशाप घेऊन दुर्योधनाकडे परत फिरला. परशुरामांचा अनुग्रह होऊन कर्णानें ब्रह्मास्त्र संपादन केलें हें कळतांच अर्जुन व इतर पांडव यांना त्याच्या साहाय्यानें सहज धुळीस मिळवितां येईल या कल्पनेनें दुर्योधनाची त्याच्यावर अधिकच भक्ति जडली. तात्पर्य, दीर्घ प्रयत्नानें कर्णानें महास्त्रविद्या संपादन केली खरी; पण विद्याप्रेमासारखा सात्त्विक अथवा शुद्ध कीर्ति व सद्धर्माचें संरक्षण यासारखा

त्या प्रयत्नावादामागें कोणताही राजस हेतु नसून मत्सर व अकारण द्वेष यांवर आधारलेला पार्थाच्या विनाशाचा तामस हेतु असल्यामुळें त्याची विद्या शापित ठरली व कसोटीच्या प्रसंगी तिचा त्याला व्हावा तसा उपयोग झाला नाहीं. अर्जुनापेक्षां आपण ज्ञानांत वरचढ असावें या मनोवृत्तीची सात्त्विक स्पर्धा त्याची नव्हती. तशी ती असती तर अर्जुनाहून अधिक श्रेष्ठ असा शील, नीतिमत्ता व विनय यांचाच त्याच्या व्यक्तिमत्त्वांतून आविष्कार झाला असता. स्वतःच्या हातून अर्जुनाच्या विनाशांत आपल्या महास्त्रज्ञतेचें पर्यवसान त्याला हवें होतें. असूया व स्पर्धा यांची तामसी जात व त्याचें नागडें प्रदर्शन जर त्याच्याकरवीं झालें नसतें तर त्याला परशुरामापर्यंत जाण्याची यातातात न करतां घरबसल्याच द्रोणाचार्यांच्याकडून महास्त्रविद्या संपादन करतां आली असती व शापांची आपत्तीही ओढवली नसती. प्रत्यक्ष आपला मृत्यू धृष्टद्युम्नाच्या रूपानें उत्पन्न झालेला आहे हें माहीत असतानां देखील ज्या महात्म्यानें त्यालाही शस्त्रास्त्रविद्येचें सरहस्य ज्ञान मोकळ्या मनानें दिलें त्यानें तें कर्णाला तर खात्रीनेंच दिलें असतें. तामसी स्पर्धेच्या पोटीं कपटाचरणानें संपादित केलेल्या या शापित विद्येनें कर्णाच्या आत्मकेंद्रिततेंत दुर्दान्त अहंकाराची मात्र नवी भर पडली.

## कर्ण दुर्योधनाच्या पक्षाला कां मिळाला ?

कर्णानें जो दुर्योधनाचा पक्ष स्वीकारला होता तो कांहीं निव्वळ दुर्योधनाच्या उपकाराविषयींची कृतज्ञता म्हणून नव्हता. अत्यंत खोल अशा राजनैतिक स्वरूपाच्या विचारानें त्यानें हें धोरण स्वीकारलें होतें. कर्ण स्वतःच्या कर्तृत्वाच्या भरंवशावर जें अत्यंत मानाचें असें राज्यसूत्रचालकत्वाचें स्थान प्राप्त करून घेऊं इच्छीत होता तें त्याला पांडवांच्या पक्षांत मिळण्यासारखें निश्चित नव्हतें. युवराज दुर्योधन सर्वस्वीं त्याच्या भरंवशावर असल्यामुळें त्याला तेथें जें स्थान मिळूं शकत होतें तें त्यानें कितीही प्रयत्न केला असता तरी, पराक्रमांत व कर्तृत्वांत त्याच्यापेक्षां कोणत्याही दृष्टीनें कमी नसलेल्या, उलट कांकणभर अधिकच सरस असलेल्या पांडवांच्या पक्षांत त्याला कसें

मिळावें ? एक तर अर्जुन त्याच्यापेक्षां अधिक श्रेष्ठ धनुर्धर होता. शिवाय भीमासारख्या अभिमानी व तीव्र मनोवृत्तीच्या पुरुषासमोर कर्णाच्या गर्वोद्धतपणाला फारसा वाव नव्हता. पांडवांच्या इतर अनेक स्नेह्यांप्रमाणेंच कर्णही त्यांच्या पक्षांत राहिला असता इतकेंच. याहून त्याचें अधिक महत्त्व उरलें नसतें. शिवाय श्रीकृष्णांसारखा सर्वश्रेष्ठ पुरुषोत्तम हा अर्जुनाचा परममित्र असल्यामुळें व त्याच्यासमोर इतर कोणाच्याही साहाय्याची पांडवांना गरज नसल्यामुळें कर्णाला तेथें कांहींही महत्त्व प्राप्त झालें नसतें. पांडवांच्या पक्षांत श्रीकृष्णांचें जें स्थान होतें तें कर्णाला मिळणें केवळ दुर्योधनाच्या पक्षांतच शक्य होतें. म्हणून सर्व दृष्टींनीं खोलवर विचार करून आपल्या महत्त्वाकांक्षेच्या पूर्तीस्तव त्यानें दुर्योधनाचा आश्रय केला. एकच गोष्ट अशी होती कीं जिच्या भरंवशावर कर्णाला पांडवांच्या पक्षांत नुसतें महत्त्वच नव्हे तर सर्वश्रेष्ठ स्थानही प्राप्त झालें असतें. ती गोष्ट म्हणजे कर्ण आपला सर्वांत वडील भाऊ आहे हें पांडवांना कळणें ही होय. पण ह्या गोष्टीची जशी पांडवांना जाणीव नव्हती, तशीच ती कर्णालाही नव्हती. ज्या एका व्यक्तीला या गोष्टीची जाणीव असणें संभवनीय होतें ती व्यक्ति म्हणजे पांडवांची माता कुन्ती होय. पण तिनें या बाबतींत अनेक कारणांस्तव मौन स्वीकारलें होतें. याप्रमाणें एकदां जाणूनबुजून आत्मप्रतिष्ठेसाठीं दुर्योधनाचा पक्ष अनिवार्य म्हणून स्वीकारल्यानंतर चांगल्या व वाईट उपायांनीं दुर्योधनाचें जितकें महत्त्व वाढेल तितकेंच आपलेंही वाढेल हें कर्णानें ताबडतोब ओळखलें व म्हणून दुर्योधनाला सर्वतोपरीं प्रसन्न राखावयास, त्याचें महत्त्व व सामर्थ्य वाढवावयास, व छायेप्रमाणें त्याचें अनुकरण करावयास कर्ण प्राणपणानें झटूं लागला. केवळ स्वार्थसाधनाचा हेतु डोळ्यांसमोर असल्यामुळें, एरवीं अत्यंत श्रेष्ठ व उदारमनस्क असलेला कर्ण ह्या त्या अधमपणाच्या पातळीवर उतरावयास सिद्ध झाला.

याचें उदाहरण म्हणजे द्यूतप्रसंगीं घडून आलेल्या एका अक्षम्य दुराचाराच्या कृत्यांत दुर्योधनाला त्यानें वाजवीपेक्षां फाजील उत्साहानें साथ दिली व नीति–अनीतीची चाड बाळगली नाहीं हें होय

द्यूतप्रसंगीं घडून आलेलें तें भयानक अपकृत्य म्हणजे महासती द्रौपदीचें वस्त्रहरण होय. राजसूय यज्ञांत साम्राज्याच्या राज्ञीपदाचें सिंहासन जिनें नुकतेंच अलंकृत केलें होतें, पूर्णावतार श्रीकृष्णांना जिला आपली भगिनी म्हणून संबोधण्यांत अभिमान वाटत असे, त्या अग्निसंभवा, महापतिव्रता द्रौपदीला, द्यूताच्या कैफांत, एखाद्या निर्जीव वस्तूप्रमाणें युधिष्ठिरानें पणाला लावलें व छलद्यूताच्या विद्येंत अत्यंत निष्णात असलेल्या गांधारराज शकुनीनें तिला जिंकलें. त्याबरोबर मदांध दुर्योधनाचा तोल सुटून त्यानें एकदम, कौरवकुलाच्या अब्रूची कीर्तिपताका असलेल्या त्या साध्वीला, दासी म्हणून राजसभेंत आणण्याची आज्ञा दिली. द्रौपदी पणांत जिंकण्यांत आली हें ऐकतांच विदुर अचेतन झाला, भीष्मद्रोणांना थरकांप सुटला, व सगळे सभ्य 'धिक्कार, धिक्कार' म्हणून ओरडूं लागले. पण कर्ण मात्र अत्यंत आनंदित झाला!

**जहर्ष कर्णोऽतिभृशं सह दुःशासनादिभिः ।**
**इतरेषां तु सभ्यानां नेत्रेभ्यः प्रापतज्जलम् ॥ ४४**

**—महाभारत, सभापर्व अ. ६५**

द्रौपदीला सभेंत आणण्याची दुर्योधनाची आज्ञा ऐकून तर स्वयंवराच्या वेळीं तिनें केलेल्या आपल्या अपमानाच्या जाणिवेच्या दंशानें कर्णाचे डोळे सुडाच्या भावनेनें चमकून उठले. रजस्वला व एकवस्त्रा असलेल्या त्या राजरमणीला दुःशासनानें केस धरून भरसभेंत फरफरा ओढीत आणल्यावर सारे सभ्य लाजेनें माना खालीं घालून बसले. त्या साऱ्या राजसभेंत एकच असा धैर्यसंपन्न पुरुष निघाला कीं ज्यानें त्या दुष्कृत्याचा, सत्तेच्या रागालोभाची पर्वा न करतां स्पष्ट शब्दांत धिक्कार केला. तो पुरुष म्हणजे दुर्योधनाचा बंधु विकर्ण होय. त्यावेळीं विकर्णाला कर्णानें जें उत्तर दिलें आहे त्यांत त्याचा सारा नीचपणा खळाळून बाहेर पडला आहे. कर्ण म्हणाला कीं,

**दृश्यन्ते वै विकर्णेह वैकृतानि बहून्यपि ।**
**तज्जातस्तद्विनाशाय यथाग्निररणिप्रजः ॥ २७**
**एते न किंचिदप्याहुश्चोदिता ह्यपि कृष्णया ।**
**धर्मेण विजितामेतां मन्यन्ते द्रुपदात्मजाम् ॥ २८**

त्वं तु केवल बाल्येन धार्तराष्ट्र विदीर्यसे ।
यद्ब्रवीषि सभामध्ये बालः स्थविर भाषितम् ।। २९
न च धर्मं यथावत्त्वं वेत्सि दुर्योधनावर ।
यद्ब्रवीषि जितां कृष्णां न जितेति सुमन्दधीः ।। ३०
कथं ह्यविजितां कृष्णां मन्यसे धृतराष्ट्रज ।
यदा सभायां सर्वस्वं न्यस्तवान्पाण्डवाग्रजः ।। ३१
अभ्यन्तरा च सर्वस्वे द्रौपदी भरतर्षभ ।
एवं धर्मजितां कृष्णां मन्यसे न जितां कथम् ।। ३२
कीर्तिता द्रौपदी वाचा अनुज्ञाता च पाण्डवैः ।
भवत्यविजिता केन हेतुनैषा मता तव ।। ३३
मन्यसे वा सभामेतामानीतामेकवाससम् ।
अधर्मेणेति तत्रापि शृणु मे वाक्यमुत्तमम् ।। ३४
एको भर्ता स्त्रिया देवैर्विहितः कुरुनन्दन ।
इयं त्वेनकवशगा बन्धकीति विनिश्चिता ।। ३५
अस्याः सभामानयनं न चित्रमिति मे मतिः ।
एकाम्बरधरत्वं वाप्यथवापि विवस्त्रता ।। ३६
यच्चैषां द्रविणं किंचिद्या चैषा ये च पाण्डवाः ।
सौबलेनेह तत्सर्वं धर्मेण विजितं वसु ।। ३७
दुःशासन सुबालोऽयं विकर्णः प्राज्ञवादिकः ।
पाण्डवानां च वासांसि द्रौपद्याश्चाप्युपाहर ।। ३८

—महाभारत, सभापर्व अध्याय ६८

हे मूर्खा विकर्णा, अग्नि ज्याप्रमाणें ज्या अरणींतून जन्म पावतो तिलाच जाळीत असतो, त्याचप्रमाणें तूंही आपल्याच बांधवांना संताप आणणारें वर्तन करीत आहेस. येथें जमलेले सर्व सभ्य लोक व द्रौपदीचे प्रत्यक्ष पति पांडव हेही तिला धर्मतः आमची दासी समजत आहेत. तूं मात्र मूर्खपणामुळें ती आमची दासी झाली नाहीं असें समजून बोलत आहेस. आम्हां प्रौढांच्या सभेंत तुझ्यासारख्या मूर्खाचें कांहीं एक काम नाहीं. सभेंत युधिष्ठिराचें सर्वस्व त्यानें द्यूतांत पणाला लावल्यानंतर व तें तो हरल्यानंतर त्यांत द्रौपदीचा समावेश होत नाहीं काय? शिवाय त्यानंतरही धर्मानें स्वतः आपल्या

तोंडानें उच्चार करून तिला पणाला लावलें आहे व बाकीच्या पांडवांनीं या त्याच्या कृत्याला आपलें अनुमोदन दिलें आहे. अशा स्थितींत ती दासी नाहीं असें म्हणून आतां कसें चालेल? कदाचित् तुझ्या मनांत असें येईल कीं दासीगणांतही ह्या सभ्य व कुलवती स्त्रीला, ती रजस्वला व एकवस्त्रा असतांना राजसभेंत जबरदस्तीनें आणणें योग्य आहे काय? तर मूर्खा, त्याचें उत्तर ऐक. देवांनीं धर्मशास्त्रानुसार स्त्रीला एकच पति सांगितला आहे. हिला तर पांच पति आहेत. अशा स्थितींत अनेक पुरुषांना वश होऊन राहणाऱ्या या स्त्रीला साध्वी व कुलवती कोण म्हणेल? मला तर हिच्यांत व एखाद्या रखेल्या दासींत कांहीं एक फरक दिसत नाहीं. त्यामुळें वेश्याच असणाऱ्या हिच्यासारख्या स्त्रीला रजस्वला व एकवस्त्राच काय पण विवस्त्र स्थितींतही येथें जबरदस्तीनें ओढून आणावयास मुळींच हरकत नाहीं. हे दुःशासना! हा विकर्ण शिष्टपणाचा आव आणून कांहींही बोलत असला तरी तो महामूर्ख आहे. याचें तूं कांहीं एक ऐकूं नकोस. ह्या बन्धकी द्रौपदीचें वस्त्र तूं सर्वांसमक्ष हिरावून घे व तिला भरसभेंत नग्न करून तिची उघडी काया सर्वांना डोळे भरून पाहूं दे."

रथचक्र जमिनींत गाडलें गेल्यावर असहाय स्थितींत अर्जुनाच्या हातून मृत्यु पावत असलेल्या कर्णाविषयीं अणुमात्रही अनुकंपेचा उदय होऊं देण्यापूर्वी महाभारताच्या प्रत्येक अभ्यासकानें कर्णाच्या या आसुरी प्रवृत्तीचा व त्याच्या या पाशवी आज्ञेचा विचार केला पाहिजे. कुलवती स्त्रियांच्या अब्रूवर निखारे पसरण्याचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें प्रयत्न करणाऱ्या मांगांना सांपडतील त्या पद्धतीनें ठेंचून काढणें हें आर्यराष्ट्राचें नीतिशास्त्रच आहे. कर्णाबद्दल कोणताही सहानुभूतीचा विचार अंतःकरणांत येण्यापूर्वी रजस्वला व एकवसना अवस्थेंत केसांना हिसके बसत असतांना व वस्त्र फरफरा ओढलें जात असतांना डोळ्यांत आंसवें आणून हंबरडा फोडणाऱ्या याज्ञसेनीचें चित्र अंतःचक्षूंसमोर आणून पहा. अंतःकरणाचे सांदीकोपरे कोरडे ठणठणीत पडून हृदय जळून जाईल. तात्पर्य, द्रौपदीला नग्न करण्याची आसुरी आज्ञा कर्णानें दिलेली आहे; दुर्योधनानें

नाहीं. आत्मकेंद्रित, अहंकारी, स्वार्थी व मत्सरी पुरुष सुडाच्या व अनुरंजनाच्या भावनेनें पिसाळल्यावर किती अधमपणाचें वर्तन करूं शकतो याचें हें एक नमुनेदार उदाहरण आहे. द्रौपदीच्या स्वयंवराच्या वेळच्या अपमानाचा या थरापर्यंत सूड घ्यावयास कर्ण सिद्ध झाला यांतच त्याची सारी अधमता स्पष्ट होते. त्यानंतरही द्रौपदीचें दैवी चमत्कारानें संरक्षण झाल्यावर कर्णानें पुन्हां दुःशासनाला सांगितलें कीं, या दासीला ओढीत घरांत घेऊन जा! ती बिचारी विलाप करीत असतांना दुःशासन पुन्हां तिच्या वस्त्राला झोंबूं लागला. त्यावेळीं भीमसेन संतापून एकाहून एक घोर अशा प्रतिज्ञा करीत असतांना त्याला डिवचावें म्हणून कर्ण द्रौपदीला असें म्हणाला कीं "जगामध्यें तिघेजण परतंत्र असतात. एक दास, दुसरा पुत्र व तिसरी स्त्री होय. हे द्रौपदी, तुझे पति कौरवांचे गुलाम आहेत. त्यांची तुझ्यावर आतां कांहीं एक सत्ता उरलेली नाहीं. त्यामुळें स्वतंत्रपणेंच कौरवांची दासी झालेली तूं साऱ्या धृतराष्ट्रपुत्रांची उपभोग्य वस्तू झालेली आहेस. पांच पति करणाऱ्या तुला या शंभर कौरवांकरवीं आपली उपभोगेच्छा यथेच्छ पूर्ण करून घेतां येईल. या षंढ व पराजित पतींचा तुझ्यावर यापुढें काय अधिकार असूं शकतो? पांचालराज द्रुपदाच्या राजकन्येला एखाद्या वटकीप्रमाणें जुगारांत पणाला लावून या कुंतीपुत्र युधिष्ठिरानें पौरुष व पराक्रम यांसह आपला जन्म सार्थकींच लावला म्हणावयाचा!"

याप्रमाणें कर्ण बोलल्यानंतर उन्मत्त दुर्योधनानें त्यापासून प्रेरणा घेऊन भरसभेंत, साऱ्या वडीलधाऱ्या मंडळींच्या समक्ष, आपली डावी मांडी उघडी करून निलाजरेपणानें द्रौपदीला दाखविली. त्यानंतर मात्र त्या सभागृहाचेंच रणांगणांत रूपांतर होईल या भयानें राजा धृतराष्ट्रानें द्रौपदी व पांडव यांना दासभावांतून मुक्त केलें. त्यावेळीं कर्ण उपहासपूर्वक असें म्हणाला कीं, आजपर्यंत रूपवान् स्त्रियांची कीर्ति आम्हीं पुष्कळ ऐकली होती. परंतु त्यांत द्रौपदीसारखें कोणाचेंही कर्तृत्व झळकलें नाहीं. धार्तराष्ट्र व पांडव प्राणपणानें एकमेकांवर खवळून उठले असतांना द्रौपदीनेंच शांति प्रस्थापित केली आहे. अगाध व उफाळलेल्या समुद्रांत नष्ट

होऊन बुडत चाललेल्या पांडवांना द्रौपदीनेंच शेवटीं नौका होऊन वांचविलें."

दुर्योधनाशीं सख्य होतांच आपलें स्वतःचें महत्त्व वाढावें म्हणून कर्णानें दुर्योधनाच्या अंतःकरणाची ठेवण ओळखून त्या सभेंत आधींच ज्यांचें महत्त्व होतें त्या भीष्मद्रोणादिकांच्या व्यक्तित्वाला विरोध करावयास प्रारंभ केला. कितीही इच्छा असली तरी दुर्योधन ज्या गोष्टी त्यांच्या तोंडावर बोलूं शकत नसे त्या प्रथम कर्ण बोलूं लागला. त्यानें भरसभेंत भीष्म व द्रोण हे तुझे गुरु व पितामह नसून राज्याधिकाराच्या दृष्टीनें मंत्री आहेत, त्यांनीं तुझेंच ऐकलें पाहिजे, पण त्याऐवजीं तुझें अहित चिंतून ते पाण्डवांचें हितचिंतन करून आपलें मंत्रिपदाचें कर्तव्य पार पाडीत नाहींत, हें त्याला त्यांच्या तोंडावरच उपहास करून पटवून दिलें. या जुन्या मंत्रि-सत्तेवर केलेला आघात त्यानें राजाच्या अंतःकरणाची परीक्षा पहा-ण्याकरितांच केला. द्रौपदीच्या स्वयंवरानंतर यादव व पांचाल या दोन राजसत्तांचा पांडवांना एकदम पाठिंबा मिळून पूर्वीं त्यांना नष्ट करणें ही जी घरगुती वाटणारी बाब ती आतां महायुद्धाची द्योतक ठरली. कौरवांच्या राज्यदरबारीं आपलें भावी धोरण कसें आंखावें व कशा पद्धतीनें पांडवांचा नाश करावा याचा गंभीर विचार करण्यासाठीं सभा बोलविण्यांत आली असतां भीष्म-द्रोणांनीं त्या सभेंत राजाची निर्भर्त्सना करून त्याच्या हिताचा मार्ग त्याला सुचविला. कर्णानें त्या सभेंत पहिलेंच राजकीय स्वरूपाचें भाषण केलें. या त्याच्या भाषणांत त्यानें भीष्मद्रोणांवर पहिलेंच तोंडसुख घेतलें. इतकेंच नव्हे तर त्या वृद्धांचें कौरवांच्या दरबारां-तील मानाचें पद वस्तुतः सामान्य सेवकांच्या योग्यतेचेंच आहे असें युवराज दुर्योधनाला प्रकटपणें प्रथमच भासवून त्याच्या मनावरील त्यांच्या दडपणाचा ताण त्यानें नाहींसा केला. तो म्हणाला कीं,

**योजितावर्थमानाभ्यां सर्वकार्येष्वनन्तरौ ।**
**न मन्त्रयेतां त्वच्छ्रेयः किमद्भुततरं ततः ॥ १३**
**दुष्टेन मनसा यो वै प्रच्छन्नेनान्तरात्मना ।**
**ब्रूयान्निःश्रेयसं नाम कथं कुर्यात्सतां मतम् ॥ १४**

एवं विद्वन्नुपादत्स्व मन्त्रिणां साध्वसाधुताम् ।
दुष्टानां चैव बोद्धव्यमदुष्टानां च भाषितम् ।। २५

—महाभारत, आदिपर्व अध्याय २०४

परस्परेण भेदश्च नाधातुं तेषु शक्यते ।
एकस्यां ये रताः पत्न्यां न भिद्यन्ते परस्परम् ।। ६
आर्यव्रतश्च पाञ्चाल्यो न स राजा धनप्रियः ।
न संत्यक्षति कौन्तेयान् राज्यदानैरपि ध्रुवम् ।। ९
इदं त्वद्य क्षमं कर्तुमस्माकं पुरुषर्षभ ।
यावन्न कृतमूलास्ते पाण्डवेया विशांपते ।। ११
तावत्प्रहरणीयास्ते तत्तुभ्यं तात रोचताम् ।। १२
यावन्नायाति वार्ष्णेयः कर्षन्यादववाहिनीम् ।
राज्यार्थे पाण्डवेयानां पाञ्चाल्यसदनं प्रति ।। १५

—महाभारत, आदिपर्व अध्याय २०२

राजांच्या पदरीं जे सेवक असतात ते त्याचें हित करणारे असावे लागतात. राज्य शक्य तितकें निष्कंटक करणें व राज्याच्या मर्यादांची वाढ करणें हेंच राज्याचें हितसाधन होय. परंतु दुर्योधना, यासंबंधांत तुझ्यासारखा दुर्दैवी राजा मीं पाहिला नाहीं. भीष्म व द्रोण हे दोन वृद्ध तूं आजपर्यंत वाढविलेले व धन, मान आणि स्थान देऊन संरक्षिलेले आहेत. पण तूं केलेल्या ह्या सर्व उपकारांचा मोबदला म्हणून ते तुझ्या शत्रूंचें साहाय्य करीत आहेत. ह्यांच्या अंगीं इतका पराक्रम आहे कीं ह्यांच्या भरंवशावर तुला पांडवांना भिण्याचें मुळींही कारण नाहीं. पण हे इतके कृतघ्न आहेत कीं तूं केलेले उपकार पूर्णपणें विसरून तुझ्या शत्रूंची तळी उचलून धरीत आहेत. वास्तविक पांडवांशीं युद्ध करून त्यांना ठार करणें आजच शक्य आहे. पांडवांचाच एकोपा इतका आहे कीं त्यांच्यांत परस्परांत भेद उत्पन्न करून त्यांचा नाश करणें सर्वथा अशक्य आहे. द्रौपदी ही त्यांची समान वधू असल्यामुळें तर त्यांच्यांतील एकोपा अधिकच दृढ झालेला आहे. द्रुपद धनलोभी नसल्यामुळें व भेकडही नसल्यामुळें तुमच्या धनाच्या लोभानें तो पांडवांचा पक्ष कधींही सोडणार नाहीं. उलट त्याच्या कन्येचें

भाग्यसूत्र त्यांच्याशीं संबद्ध असल्यामुळें तो सदैव त्यांनाच साहाय्य करील. आज आपण इतके निश्चित समर्थ आहोंत कीं, द्रुपदासुद्धां पांडवांचा युद्धांत फडशा पाडणें आपल्याला शक्य आहे. त्यांना खरें साहाय्य श्रीकृष्णाचें व यादवांच्या राज्यसत्तेचें मिळण्याचा संभव आहे. पण आपण आपलें कारस्थान षट्कर्णी न होऊं देण्याची पूर्ण सावधगिरी बाळगली व यादवांच्या कानांवर आपले बेत जाण्या-पूर्वीच आपण पांडवांवर हल्ला केला तर आपण त्यांचा पूर्ण फडशा पाडू शकूं. पांडवांच्या विनाशाचें कार्य पूर्ण झाल्यानंतर मागाहून श्रीकृष्ण आपल्याशीं भांडण उकरून काढणें शक्य नाहीं. म्हणून पांडव दृढमूल होण्याच्या आधीं आपण आजच त्यांच्यावर हल्ला करणें सर्वथा श्रेयस्कर आहे."

या विशिष्ट वेळीं धृतराष्ट्रानें कर्णाचें जरी ऐकलें नाहीं तरी भीष्मद्रोणांच्या व विदुराच्या सचिवसंस्थेचें महत्त्व येथून कर्णानें पद्धतशीर रीतीनें कमी केलें. स्वत: दिग्विजय संपादन करून त्यानें दुर्योधनावर इतकी छाप बसविली कीं राजसत्तेनें बोलाविलें म्हणजे जावें, याशिवाय जुन्या सचिवसत्तेचें कौरवांच्या सभेंत कांहींही महत्त्व उरलें नाहीं. कर्णाकरवीं तिचा उपहास करून दुर्योधन आपली इच्छा भागवून घेई. उत्तरगोग्रहणापासून तर उद्योग-पर्वापर्यंतचा व त्याच्या आधींचाही इतिहास हीच गोष्ट सिद्ध करतो. कर्णाचें दुर्योधनावर त्याच्या या विशिष्ट कारस्थानी-पणानें कमालीचें वजन बसलें. दुर्योधनाच्या एकछत्री साम्राज्यांत आपलें हित व कुरुपांडवांच्या ऐक्यांत आपला विनाश आहे हें ओळखून पांडवांना मारण्यासाठीं आपल्या शौर्याला न शोभणारीं कृत्यें करावयास कर्णानें मागेंपुढें पाहिलें नाहीं.

एकाकी विजनवासांत पांडव गेले असतां तेरा वर्षानंतर तरी पांडव परत येऊन राज्याची मागणी पुढें करतीलच व त्यांची ती मागणी अत्यंत न्याय्य असल्यामुळें त्यांना साहाय्यही भरपूर मिळ-ण्याचा संभव आहे, अशा स्थितींत त्यांच्याशीं कौरवांनीं युद्ध सुरू केलें तर जयही संशयास्पद राहील व आपल्या पराक्रमाला न्यायाचें अधिष्ठानही उरणार नाहीं; त्याऐवजीं वनांत साहाय्यहीन व

एकाकी असलेल्या पांडवांना गांठून मोठ्या सैन्यानिशीं त्यांच्यावर हल्ला करून त्यांचा वध करावा म्हणजे दुर्योधनाच्या मार्गांतील व आपल्याही मार्गांतील धोंड सदाची मिटेल असें त्याच्या मनानें घेतलें. चारित्र्याला कलंक लावणारा व शौर्याला काळिमा फांसणारा हा विचार त्यानें कार्यवाहींत आणण्याचा निश्चय केला. त्याच्या उत्तेजनानें या कुकृत्यासाठीं कौरवांचें सैन्य बाहेरही पडूं लागलें होतें. पण केवळ योगायोगानेंच ती आपत्ति टळली. महाभारतकार म्हणतात :—

उपलभ्य ततः कर्णो विवृत्य नयने शुभे ।
रोषाद्दुःशासनं चैव सौबलं च तमेव च ॥ १५
उवाच परमक्रुद्ध उद्यम्यात्मानमात्मना ।
अथो मम मतं यत्तु तन्निबोधत भूमिपाः ॥ १६
प्रियं सर्वे करिष्यामो राज्ञः किंकरपाणयः ।
न चास्य शक्नुमः स्थातुं प्रिये सर्वे ह्यतन्द्रिताः ॥ १७
वयं तु शस्त्राण्यादाय रथानास्थाय दंशिताः ।
गच्छामः सहिता हन्तुं पाण्डवान्वनगोचरान् ॥ १८
तेषु सर्वेषु शान्तेषु गतेष्वविदितां गतिम् ।
निर्विवादा भविष्यन्ति धार्तराष्ट्रास्तथा वयम् ॥ १९
यावदेव परिद्यूना यावच्छोकपरायणाः ।
यावन्मित्रविहीनाश्च तावच्छक्या मतं मम ॥ २०
तस्य तद्वचनं श्रुत्वा पूजयन्तः पुनः पुनः ।
बाढमित्येव ते सर्वे प्रत्यूचुः सूतजं तदा ॥ २१
एवमुक्त्वा सुसंरब्धा रथैः सर्वैः पृथक्पृथक् ।
निर्ययुः पाण्डवान्हन्तुं सहिताः कृतनिश्चयाः ॥ २२
तान्प्रस्थितान्परिज्ञाय कृष्णद्वैपायनः प्रभुः ।
आजगाम विशुद्धात्मा दृष्ट्वा दिव्येन चक्षुषा ॥ २३
प्रतिषिध्याथ तान्सर्वान्भगवांल्लोकपूजितः ॥ २४

—महाभारत, वनपर्व अ. ७

आपण आपलें सैन्य व शस्त्रें घेऊन वनांत जावें व पांडवावर हल्ला करून त्यांना ठार मारावें असें मला वाटतें. कोणत्याही उपायानें

एकदां पांडव मेले म्हणजे आपल्या मार्गांतील त्यांचा अडथळा दूर होऊन आपण सुखी होऊं. जोंवर पांडव हीन अवस्थेंत आहेत, जोंवर ते शोकमग्न स्थितींत किंकर्तव्यतामूढ बनले आहेत, जोंवर कोणीही साहाय्य करणारे मित्र त्यांच्याजवळ नाहींत तोंवरच त्यांचा वध करतां येणें शक्य आहे."

सेनापति कर्णाच्या या दुष्ट व भ्याड सल्ल्यानुरूप कौरवसैन्य हस्तिनापुराबाहेर देखील पडलें असतें. पण केवळ महर्षि व्यासांच्या मध्यस्थीनें हा प्रसंग टळला.

त्यानंतर पुनश्च घोषयात्रेची प्रेरणा दुर्योधनाला देऊन कर्णानें आपल्या मनाचें हलकेंपण सिद्ध केलेंच. पण त्याच्या अंतःकरणाची खरी हीनता, घोषयात्रा प्रकरणीं फटफजिती झाल्यामुळें लाजलेल्या दुर्योधनाला उत्तेजित करण्यासाठीं युक्तिवाद करावयास तो पुढें सरसावला तेव्हां व्यक्त झाली आहे. कर्ण म्हणतो :—

**राजन्नाद्यावगच्छामि तवेह लघुसत्त्वता ।**
**किमत्र चित्रं यद्वीर मोक्षितः पाण्डवैरसि ॥ १**
**सद्यो वशं समापन्नः शत्रूणां शत्रुकर्शन ।**
**सेनाजीवैश्च कौरव्य तथा विषयवासिभिः ॥ २**
**अज्ञातैर्यदि वा ज्ञातैः कर्तव्यं नृपतेः प्रियम् ।**
**प्रायः प्रधानाः पुरुषाः क्षोभयन्त्यरिवाहिनीम् ॥ ३**
**निगृह्यन्ते च युद्धेषु मोक्ष्यन्ते चैव सैनिकैः ।**
**सेनाजीवाश्च ये राज्ञां विषये सन्ति मानवाः ॥ ४**
**तैः सङगम्य नृपार्थाय यतितव्यं यथातथम् ।**
**यद्येवं पाण्डवै राजन् भवद्विषयवासिभिः ॥ ५**
**यदृच्छया मोक्षितोऽसि तत्र का परिदेवना ।**
**न चैतत् साधु यद्राजन् पाण्डवास्त्वां नृपोत्तमम् ॥ ६**
**स्वसेनया सम्प्रयान्तं नानुयान्ति स्म पृष्ठतः ।**
**शूराश्च बलवन्तश्च संयुगेष्वपलायिनः ॥ ७**

**—महाभारत, वनपर्व अ. २५०**

"पांडव तुझ्या राज्यांतल्याच एका वनांत रहात असल्यामुळें व तूं सर्व पृथ्वीचा सम्राट् असल्यामुळें एका अर्थानें ते तुझे प्रजाजनच आहेत. संकटांत सांपडलेल्या राजाचें रक्षण करणें हें प्रजेचें धार्मिक कर्तव्य आहे. नाहीं तरी राजा युद्ध करतो याचा अर्थ त्याचे सैनिक युद्ध करतात असाच आहे. पूर्वी द्यूतांत तुझे दास झालेले पांडव हे शूर व बलवान् असूनही तुझ्या राज्यांत राहून तुझी सेवा करीत नाहींत हाच तर त्यांचा मोठा अपराध आहे. विनाकारण तूं इथेंच दुःखी व कष्टी होऊन बसलास तर जगांतले राजधर्मविशारद लोक तुझा उपहास करतील. तेव्हां यत्किंचित्ही खंत वाटूं न देतां तूं माझ्याबरोबर राज्यांत चल."

कर्णाचा हा युक्तिवाद किती हीनपणाचा होता हें कांहीं सांगावयास नको. कर्णासारख्या एरवीं अत्यंत गुणसंपन्न असलेल्या व्यक्तीचा महत्त्वाकांक्षेनें केवढा अधःपात झाला होता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. कुरुपांडवांचें वैर त्यानेंच एकसारखें अधिकाधिक तीव्र करण्याचा प्रयत्न केलेला आहे. दुर्योधनाचें लांगूलचालन करण्यासाठीं दुर्वासांच्या क्रोधवह्नींत पांडवांची आहुति देण्याच्या एक प्रकारच्या भ्याडपणाच्या कृत्यांत त्यानें भाग घेतला. इतकेंच नव्हे तर आपल्याला राजसूय करतां येत नाहीं म्हणून ज्या वेळीं दुर्योधन चिंतामग्न झाला, त्यावेळीं अर्जुनानें कर्णाचा कांहीं एक अपराध केला नसतांही तो त्याच्या वधाची पुढीलप्रमाणें प्रतिज्ञा करून बसला.

**तमब्रवीत् तदा कर्णः श्रृणु मे राजकुंजर ।**
**पादौ न धावये तावद्यावन्न निहतोऽर्जुनः ॥ १६**
**कीलालजं न खादेयं करिष्ये चासुरव्रतम् ।**
**नास्तीति नैव वक्ष्यामि याचितो येन केनचित् ॥ १७**
**अथोत्कृष्टं महेष्वासैर्धार्तराष्ट्रैर्महारथैः ॥ १८**

—महाभारत, वनपर्व अ. २५७

"मी रणांत अर्जुनाला ठार मारल्यावांचून राहणार नाहीं. मी अशी प्रतिज्ञा करतों कीं, जोंवर मी अर्जुनाला ठार मारणार नाहीं तोंवर मी माझ्या सेवकांकडून अथवा दुसऱ्या कोणाकडूनही माझ्या

पायावर पाणी घालून घेणार नाहीं. इतकेंच नव्हे तर क्षत्रियोचित अशा मद्यमांसादिकांचें सेवन कधींही करणार नाहीं. अत्यंत व्रतस्थ अशा रीतीनेंच मी माझें जीवन घालवीन. माझें दानाचें सुप्रसिद्ध व्रत त्रिभुवनांत विख्यात आहे. आजपर्यंत मी कुठल्याही याचकाला नकार देऊन विन्मुख पाठविलें नाहीं. त्यामुळें जें कांहीं पुण्य माझ्या पदरीं पडलें असेल त्याची शपथ घेऊन मी अर्जुनाच्या वधाची प्रतिज्ञा करतों." कर्णाच्या या घोर प्रतिज्ञेचें कांहींही कारण नव्हतें, पण ती करून त्यानें सम्राट दुर्योधनाचें प्रेम मात्र संपादन केलें.

महाभारताचा इतिहास जर सूक्ष्मतेनें पाहिला तर नुसतें कुरु-पांडवांचें वैर कर्णानें धगधगत ठेवलें होतें, इतकेंच नव्हें तर, राजा दुर्योधन आपल्या पूर्णपणें लगामीं लागलेला आहे ही खात्री असल्या-मुळें त्यानें अनधिकृतपणें महायुद्धाची घोषणाही करून टाकल्याचें दृष्टोत्पत्तीस येईल. उत्तरगोग्रहणानंतर पांडव प्रकट झाले. त्यांनीं ठरलेल्या अटींप्रमाणें आपल्या न्याय्य अधिकाराची मागणी केली. पांडवांकडून विचारपूर्वक राजा द्रुपदाचा वृद्ध पुरोहित कुरुवृद्धां-समोर त्यांचें म्हणणें मांडण्यासाठीं म्हणून पाठविण्यांत आला. पण त्यानें पांडवांची न्याय्य मागणी व ती न दिल्यास होणाऱ्या भीषण प्रसंगाचें चित्र कौरवांच्या दरबारांत रेखाटतांच सिंहासनाधीश्वर राजा धृतराष्ट्र, राज्याचा महामंत्री विदुर, राज्याचे नियंत्रक भीष्म या सगळयांचाच एकप्रकारें अपमान करून कोणीही सांगितलें नस-तांना अनधिकारी स्थितींत एकदम कर्णानें त्या पुरोहिताला असें सांगितलें कीं पुन्हां पुन्हां तेंच तें बडबडण्यांत काय अर्थ आहे? आम्हांला माहीत नाहीं अशी कांहींही गोष्ट नाहीं. दुर्योधनासाठीं पूर्वीं शकुनीनें युधिष्ठिराला द्यूतांत जिंकलें व विशिष्ट अटींवर पांडवांनीं वनवास पत्करला. त्या वनवासाच्या पाळावयाच्या अटींवर त्यांना राज्याची मागणी करण्याचा अधिकारच काय आहे ? मत्स्य आणि पांचाल यांच्या भरंवशावर आम्हांला भय दाखविण्याचा व हें पितामहांचें राज्य पदरांत पाडून घेण्याचा जर युधिष्ठिराचा विचार असेल तर तो निव्वळ मूर्खपणाचा आहे. भिऊन दुर्योधन अल्पसुद्धां भूमीचा विभाग कोणालाही देणार नाहीं. मग अर्धें राज्य तर दूरच

राहिलें. त्याला जर हें राज्य अधिकार म्हणून पाहिजे असेल तर त्यानें पुन्हां वनवास पत्करावा व नंतर परत येथें यावें म्हणजे पहातां येईल. अधार्मिक बुद्धीनें पांडवांना कांहींही मिळणार नाहीं. जर आमच्यावर चालून येण्याचा ते प्रयत्न करीत असतील तर दीपज्योतीवर झडप घालणाऱ्या शलभाप्रमाणें माझ्या पराक्रमाच्या ज्योतींत ते भस्म होऊन जातील.

दुर्योधनं समालोक्य कर्णो वचनमब्रवीत् ॥ ८
न तन्नाविदितं ब्रह्मन् लोके भूतेन केनचित् ।
पुनरुक्तेन किं तेन भाषितेन पुनः पुनः ॥ ९
दुर्योधनार्थे शकुनिर्द्यूते निर्जितवान् पुरा ।
समयेन गतोऽरण्यं पाण्डुपुत्रो युधिष्ठिरः ॥ १०
स तं समयमाश्रित्य राज्यं नेच्छति पैतृकम् ।
बलमाश्रित्य मत्स्यानां पाञ्चालानां च मूर्खवत् ॥ ११
दुर्योधनो भयाद्विद्वन्न दद्यात् पादमन्ततः ।
धर्मतस्तु महीं कृत्स्नां प्रदद्याच्छत्रवेऽपि च ॥ १२
यदि काङ्क्षन्ति ते राज्यं पितृपैतामहं पुनः ।
यथाप्रतिज्ञं कालं तं चरन्तु वनमाश्रिताः ॥ १३
ततो दुर्योधनस्याङ्के वर्तन्तामकुतोभयाः ।
अधार्मिकीं तु मा बुद्धिं मौर्ख्यात् कुर्वन्तु केवलात् ॥ १४
अथ ते धर्ममुत्सृज्य युद्धमिच्छन्ति पाण्डवाः ।
आसाद्येमान् कुरुश्रेष्ठान् स्मरिष्यन्ति वचो मम ॥ १५

——महाभारत, उदयोगपर्व अध्याय २१

कर्णाचे हे अनधिकृत व दुर्योधनाला चेतविणारे उद्गार हीच पुढील भीषण महायुद्धाची अंकुरोत्पत्ति होय. कर्णानेंच महायुद्धाच्या डंक्यावर या उद्गारांनीं पहिलें टिपरूं वाजविलें. जर उत्तर-गोग्रहणांतील प्रसंग लक्षांत घेऊन आपल्या मत्सरयुक्त द्वेषभावनेची धार कर्णानें यावेळीं किंचित् बोथट केली असती, तर पुढील भयंकर अनर्थपात टळण्याचा संभव होता. पण महायुद्धाचा अनर्थ टाळणें

कर्णाला शक्य असलें तरी तें त्याला इष्ट मुळींच नव्हतें. कुरु व पांडव यांचें युद्ध न होतां जर पांडवांचें अर्धें राज्य त्यांना परत मिळालें असतें तर पूर्वींच्या अनुभवानुरूप त्यांनीं आपल्या पराक्रमानें पुनश्च साम्राज्य निर्माण केलें असतें. राजसूयाच्या वेळीं होतें तसेंच पांडवांच्या या साम्राज्यासमोर हस्तिनापूरचें राज्य निर्माल्य होऊन राहिलें असतें. मग एका क्षुद्र युवराजापलीकडे दुर्योधनाला किंमत उरतीना. दुर्योधनाच्या अशा अवस्थेंत कर्णाचें काय स्थान राहिलें असतें ! दुर्योधनाच्या साम्राज्यांत ज्यानें त्या साम्राज्याच्या नियंत्र-काची अवस्था अनुभविली त्यानें ही जीवन्मृतावस्था कशी मान्य करावी ? त्याच्यापुढें दोनच मार्ग होते. एक तर सदाचे निष्प्रभ होऊन राहणें किंवा महायुद्ध उत्पन्न करून त्यांत पांडवांना मारून स्वतःचें मिळालेलें स्थान टिकविणें अथवा त्यांच्या पराक्रमांत दग्ध होऊन जाणें. कोणत्याच महत्कार्याचें ध्येयकंकण त्यानें बांधलेलें नसल्यामुळें त्याच्यासारख्या मानी व आत्मकेंद्रित पुरुषानें स्वाभा-विकपणेंच कुलनाशाच्या दिव्याचा दुसरा मार्ग पत्करला. कर्णाच्या जातीच्या आत्मनिष्ठांना आत्मगौरवासाठीं कसलेंही भयंकर दिव्य करावयास कधींच दिक्कत वाटत नसते. दुर्योधनाचें पांडवविषयक वैर केवळ त्याच्या भरंवशावर होतें हें तो स्वतःही म्हणतो व राजा धृतराष्ट्रच त्याच्याविषयीं साक्ष देतांना असें म्हणतो कीं :—

**यमाश्रित्य महाबाहुं विद्विषां जयकांक्षया ।**
**दुर्योधनोऽकरोद्वैरं पाण्डुपुत्रैर्महारथैः ॥ १३**

—महाभारत, कर्णपर्व अध्याय ८

तात्पर्य कुरुपांडवांच्या भीषण महायुद्धाचें कारण केवळ कर्णाची महत्त्वाकांक्षा, आत्मकेंद्रितता, व खोटया अभिमानाच्या भरीस पडून अर्जुनाच्या विनाशाची त्यानें धरलेली दुष्ट वासना हेंच मुख्यतः आहे. कर्णाच्या अंगीं मनोरथांत दंग होऊन राहणें, कमालीचा गर्विष्ठपणा व मर्यादातीत आत्मश्लाघा हे आणखी तीन दोष आत्म-केंद्रिततेमुळेंच शिरलेले आहेत. त्याची आत्मश्लाघा तर इतकी विलक्षण असे कीं साधें अर्जुनाच्या पराक्रमाचें कोणी वर्णन केलें तरीही तो एकदम क्षुब्ध होऊन जात असे. व त्यांत मान्यामान्यतेचा

काडीइतकाही विचार न करतां एकदम वर्दळीवर येणें हा त्याचा स्वभाव असे. प्रत्येक वेळीं त्याच्या या आत्मश्लाघेमुळें कलहाचे प्रसंग महाभारतांत उद्भवले आहेत. एकदां कृपाचार्यांनीं तर त्याचें असें वर्णनच केलें आहे कीं :—

**बाहुभिः क्षत्रियाः शूरा वाग्भिः शूरा द्विजातयः ।**
**धनुषा फाल्गुनः शूरः कर्णः शूरो मनोरथैः ॥ २३**

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय १५८

"क्षत्रिय बाहुबळानें शूर असतात, ब्राह्मण वाणीनें शूर असतात, अर्जुन धनुष्यानें शूर आहे व कर्ण केवळ मनोरथ करण्यांत शूर आहे." कर्णाच्या आत्मश्लाघेचें प्रत्यक्ष चित्र ज्यांना पहावयाचें असेल त्यांच्यासाठीं मी उत्तरगोग्रहणांतील व द्रोणपर्वांतील दोन संवादच येथें उद्धृत करतों.

**कर्ण उवाच ।**

**पश्य त्वं गर्जितस्यास्य फलं मे विप्र सानुगान् ।**
**हत्वा पाण्डुसुतानाजौ सहकृष्णान् ससात्वतान् ॥ ३२**

**कृप उवाच ।**

**महानपनयस्त्वेष नित्यं हि तव सूतज ॥ ४७**
**यस्त्वमुत्सहसे योद्धुं समरे शौरिणा सह ॥ ४८**

**कर्ण उवाच ।**

**यद्येवं वक्ष्यसे भूयो ममाप्रियमिह द्विज ।**
**ततस्ते खड्गमुद्यम्य जिह्वां छेत्स्यामि दुर्मते ॥ ५७**

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय १५८

**अश्वत्थामोवाच ।**

**यदर्जुनगुणांस्तथ्यान्कीर्तमानं नराधम ।**
**शूरं द्वेषात्सुदुर्बुद्धे त्वं भर्त्सयसि मातुलम् ॥ ३**
**विकत्थमानः शौर्येण सर्वलोकधनुर्धरम् ।**
**दर्पोत्सेधगृहीतोऽद्य न कञ्चिद्गणयन्मृधे ॥ ४**
**क्व ते वीर्यं क्व चास्त्राणि यं त्वां निर्जित्य संयुगे ।**
**गाण्डीवधन्वा हतवान्प्रेक्षतस्ते जयद्रथम् ॥ ५**

येन साक्षान्महादेवो योधितः समरे पुरा ।
तमिच्छसि वृथा जेतुं सूताधम मनोरथैः ।। ६
यं हि कृष्णेन सहितं सर्वशस्त्रभृतां वरम् ।
जेतुं न शक्ताः सहिताः सेन्द्रा अपि सुरासुराः ।। ७
लोकैकवीरमजितमर्जुनं सूत संयुगे ।
किं पुनस्त्वं सुदुर्बुद्धे सहैभिर्वसुधाधिपैः ।।८
कर्ण पश्य सुदुर्बुद्धे तिष्ठेदानीं नराधम ।
एष तेऽद्य शिरः कायादुद्धरामि सुदुर्मते ।। ९

—महाभारत द्रोणपर्व अ. १५९

हे उतारे ज्या प्रसंगांतील आहेत, तो प्रसंग अशा विशिष्ट अवस्थेंतील आहे कीं, ज्यावेळीं अर्जुनानें कर्णाचा पराभव करून व कौरवांच्या अधिकांश सैन्याचा फडशा पाडून नुकताच जयद्रथाचा वध केलेला आहे व त्यानें चालविलेल्या घनघोर कंदनामुळें सर्व कौरव-सैन्य सैरांवैरां पळत आहे. अशा स्थितींत नुकताच युद्धांत अर्जुनाकडून पराजय पावलेला कर्ण दुर्योधनाला आश्वासन देऊन कृपाचार्यांना उद्देशून म्हणतो आहे, " मी जी गर्जना करतों तिचें प्रात्यक्षिक आतांच दाखवतों. कृष्ण व यादवांसहित पांडवांना ठार मारून दुर्योधनाला राज्य देईन." अशा अवस्थेंत हे दर्पाचे उद्गार कोणत्याही योद्ध्याच्या उपहासाचाच विषय होणार नाहींत काय? स्वाभाविकपणेंच त्याचा उपहास करून कृपाचार्य म्हणाले, " तूं युद्धांत श्रीकृष्णाला आव्हान देऊं इच्छितोस हें केवढें औद्धत्य व साहस आहे ! " हें ऐकतांच आपल्या आत्मश्लाघेच्या वैयर्थ्याची जणूं कीं काय जाणीव पटूनच कर्ण इतका संतापला आहे कीं तो म्हणतो, " हे ब्राह्मणा! जर तूं मला अधिक कांहीं बोलशील तर मी माझ्या खड्गानें तुझी जीभच छाटून टाकीन." आपल्या मामाचा हा अपमान पहातांच मूळचाच संतापी असलेला अश्वत्थामा कर्णाच्या अंगावर धांवून गेला व त्याला म्हणूं लागला, " हे नराधमा ! माझ्या शूर मातुलानें अर्जुनाच्या योग्य गुणांचें स्तवन केल्यावर त्यांत तुला इतकें संतापण्यासारखें काय झालें? शौर्यानें आपल्यापेक्षां श्रेष्ठ असलेल्या व्यक्तीचा केवळ अहंकारानें अपमान करावयास तुला कांहीं वाटत नाहीं काय ? तूं स्वतःला काय

समजतोस ? नुकतेंच तुला जिंकून तुझ्यासमोर अर्जुनानें जयद्रथाला जेव्हां ठार मारलें, तेव्हां तुझा पराक्रम व तुझीं अस्त्रें कोठें गेलीं होतीं ? ज्यानें प्रत्यक्ष महादेवाशीं युद्ध केलें त्याला तूं नुसत्या मनोरथांनीं जिंकूं इच्छितोस हा केवढा मूर्खपणा ! ज्याला इंद्रासहित देव व दैत्य कोणीही जिंकूं शकत नाहींत त्याला तूं श्रीकृष्णासहित जिंकूं इच्छितोस व तेंही नुकताच ताजा पराभव अनुभवीत असतांना हें मोठें नवल आहे ! हे दुर्बुद्धे ! अर्जुन कशाला, मीच तुझें मस्तक उडवितों थांब. ''

हें भांडण कर्णानें ओढवून घेतलें आहे व तेंही अशा वेळीं कीं जेव्हां कौरवसैन्यांत एकीची अत्यंत आवश्यकता आहे.

दुसरा प्रसंग उत्तरगोग्रहणांतील आहे. उत्तरगोग्रहणाच्या वेळीं अर्जुनाला रणांगणावर पहातांच त्याच्यावर पुत्रापेक्षांही अधिक प्रेम करणाऱ्या द्रोणाचार्यांचें शिष्यवात्सल्य उचंबळून येऊन त्यांनीं पार्थाची प्रशंसा केली. ती नुसती प्रशंसा ऐकतांच कर्णानें जें भाषण केलें त्यांतून त्याच्या मनाची ही विकृति चांगलीच स्पष्ट होते. तो म्हणतो :—

**सर्वानायुष्मतो भीतान् संत्रस्तानिव लक्षये ।**
**अयुद्धमनसश्चैव सर्वांश्चैवानवस्थितान् ।। १**
**यद्येष राजा मत्स्यानां यदि बीभत्सुरागतः ।**
**अहमावारयिष्यामि वेलेव मकरालयम् ।। २**
**मम चापप्रयुक्तानां शराणां नतपर्वणाम् ।**
**नावृत्तिर्गच्छतां तेषां सर्पाणामिव सर्पताम् ।। ३**
**रुक्मपुङ्खाः सुतीक्ष्णाग्रा मुक्ता हस्तवता मया ।**
**छादयन्तु शराः पार्थं शलभा इव पादपम् ।। ४**
**शराणां पुंखसक्तानां मौर्व्याभिहतया दृढम् ।**
**श्रूयतां तलयोः शब्दो भेर्यो राहतयोरिव ।। ५**
**समाहितो हि बीभत्सुर्वर्षाण्यष्टौ च पञ्च च ।**
**जातस्नेहश्च युद्धेऽस्मिन् मयि संप्रहरिष्यति ।। ६**
**पात्रीभूतश्च कौन्तेयो ब्राह्मणो गुणवानिव ।**
**शरौघान् प्रतिगृह्णातु मया मुक्तान् सहस्रशः ।। ७**

एष चैव महेष्वासस्त्रिषु लोकेषु विश्रुतः ।
अहं चापि नरश्रेष्ठादर्जुनान्नावरः क्वचित् ।। ८
इतश्चेतश्च निर्मुक्तैः काञ्चनैर्गार्ध्रवाजितैः ।
दृश्यतामद्य वै व्योम खद्योतैरिव संवृतम् ।। ९
अद्याहमृणमक्षय्यं पुरा वाचा प्रतिश्रुतम् ।
धार्तराष्ट्राय दास्यामि निहत्य समरेऽर्जुनम् ।। १०
अन्तराच्छिद्यमानानां पुङ्खानां व्यतिशीर्यताम् ।
शलभानामिवाकाशे प्रचारः संप्रदृश्यताम् ।। ११
इन्द्राशनिसमस्पर्शं महेन्द्रसमतेजसम् ।
अर्दयिष्याम्यहं पार्थमुल्काभिरिव कुञ्जरम् ।। १२
रथादतिरथं शूरं सर्वशस्त्रभृतां वरम् ।
विवशं पार्थमादास्ये गरुत्मानिव पन्नगम् ।। १३
तमग्निमिव दुर्धर्षमसिशक्तिशरेन्धनम् ।
पाण्डवाग्निमहं दीप्तं प्रदहन्तमिवाहितम् ।। १४
अश्ववेगपुरोवातो रथौघस्तनयित्नुमान् ।
शरधारो महामेघः शमयिष्यामि पाण्डवम् ।। १५
मत्कार्मुकविनिर्मुक्ताः पार्थमाशीविषोपमाः ।
शराः समभिसर्पन्तु वल्मीकमिव पन्नगाः ।। १६
सुतेजनै रुक्मपुङ्खैः सुधौतैर्नतपर्वभिः ।
आचितं पश्य कौन्तेयं कर्णिकारैरिवाचलम् ।। १७
जामदग्न्यान्मया ह्यस्त्रं यत्प्राप्तमृषिसत्तमात् ।
तदुपाश्रित्य वीर्यं च युध्येयमपि वासवम् ।। १८
ध्वजाग्रे वानरस्तिष्ठन् भल्लेन निहतो मया ।
अद्यैव पततां भूमौ विनदन् भैरवान् रवान् ।। १९
शत्रोर्मया विपन्नानां भूतानां ध्वजवासिनाम् ।
दिशः प्रतिष्ठमानानामस्तु शब्दो दिवंगमः ।। २०
अद्य दुर्योधनस्याहं शल्यं हृदि चिरस्थितम् ।
समूलमुद्धरिष्यामि बीभत्सुं पातयन् रथात् ।। २१
हताश्वं विरथं पार्थं पौरुषे पर्यवस्थितम् ।
निःश्वसन्तं यथा नागमद्य पश्यन्तु कौरवाः ।। २२

**कामं गच्छन्तु कुरवो धनमादाय केवलम् ।**
**रथेषु वाऽपि तिष्ठन्तो युद्धं पश्यन्तु मामकम् ॥ २३**

—महाभारत, विराटपर्व अध्याय ४८

" अर्जुनाच्या खऱ्या व खोटया गुणांचें एखाद्या भाटाप्रमाणें स्तवन करणें ही तुमची नित्याचीच संवय होऊन बसलेली दिसते. वस्तुतः माझ्या अथवा राजा दुर्योधनाच्या पराक्रमाच्या सोळाव्या अंशानें देखील अर्जुनाचा पराक्रम नाहीं. राजन् दुर्योधना, द्रोणाचार्यांचें कांहींएक न ऐकतां मी सांगतों त्याप्रमाणें तूं वागावें हेंच चांगलें. अर्जुन हा आचार्यांचा अत्यंत प्रिय शिष्य असून पाण्डवांचें कल्याण व्हावें या हेतूनें द्रोणाचार्य आम्हांला विनाकारण भिववीत आहेत. किंबहुना अर्जुनाच्या पराक्रमाचें अवास्तव वर्णन करून आमच्या सैनिकांचा थरकांप उडवावा व आमचा पराभव घडवून आणावा अशी दुष्ट इच्छा आचार्यांच्या अंतःकरणांत आहे. तुझ्याविषयीं यांच्या अंतःकरणांत तीव्र द्वेष नांदत असून भय व भेदनीतीचा उपयोग करून घेऊन हे तुझ्या पराभवाचें कारस्थान शिजवीत आहेत. पांडवांवरचें त्यांचें अतिरिक्त प्रेम प्रसिद्ध असून स्वतःच्या राज्याच्या काळांत पांडवांनीं आचार्यांवर देणग्यांचा जो पाऊस पाडला त्यामुळें एखाद्या भाटाप्रमाणें त्यांची स्तुति करीत रहाणें हें त्यांनीं आपलें कर्तव्य मानलेलें आहे. त्याचें एकेक वाक्य ऐकतांच मला विस्मयाचा मोठा धक्का बसतो. काय म्हणे घोडे खिकाळतात; वारे वाहतात; विजांचा कडकडाट होतो आणि आकाशांत मेघ दिसत आहेत हे सगळे अपशकुन असून आपल्यावर मोठें संकट आल्याचें हें निदर्शक आहे ! एखाद्या अजागळ वेडपटावांचून दुसरे कोणीही असे उद्गार काढील असें मला वाटत नाहीं. खिकाळणें हा घोड्यांचा स्वभाव आहे. त्याचप्रमाणें वारे वाहणें, मेघ येणें व विजांचा कडकडाट होणें या निसर्गांत नेहमींच दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या गोष्टी आहेत. त्यांचा येवढा बाऊ कशासाठीं ? व त्याचें कारण म्हणून अर्जुनाची प्रशंसा तरी कशासाठीं ? आमच्याविषयींचा अकारण द्वेष व राग व पांडवांचें कल्याण व्हावें ही इच्छा हेंच या प्रशंसेचें खरें कारण आहे. आचार्यांसारखे जे तपस्वी ब्राह्मण असतात ते बिचारे

दयाळू तपस्वी, भित्रे व कर्मठ असतात. क्षत्रियांच्या जीवनांत नेहमींच उत्पन्न होणारे जीव देण्याघेण्याच्या भयाचे जे प्रसंग असतात त्यांत असल्या लोकांचा सल्ला कधींही घ्यावयाचा नसतो. ह्यांच्यासारख्या पंडितांचा उपयोग म्हटला म्हणजे रिकामपणच्या वेळीं महालांत चांगली बैठक घालावी अथवा उद्यानांत उत्तम बसण्याच्या जागा तयार कराव्या व तेथें मनाची करमणूक व्हावी म्हणून यांना अनेक प्रकारच्या गप्पा मारावयास लावावें. यज्ञ करवून घेणें, शास्त्रांचें शिक्षण देणें व तत्त्वज्ञानाच्या गप्पांनीं लोकांचें मनोरंजन करणें हें यांचें खरें काम आहे. खाण्यापिण्याच्या बाबतींतील निर्णयांत यांचें खरें महत्त्व. संग्राम हा यांचा विषय नव्हे. ही सगळीच मंडळी फार घाबरलेली दिसत आहेत. येणारा जर खरोखरीच अर्जुन असेल तर या घाबरटांच्या नादीं न लागतां माझ्याकडे लक्ष दे. खवळलेल्या समुद्राला ज्याप्रमाणें निसर्ग मर्यादा घालीत असतो त्याचप्रमाणें मी संतापून आपल्यावर चाल करून येणाऱ्या अर्जुनाला परास्त करीन. माझ्या धनुष्यापासून सुटणारे किंचित् वांकड्या टोंकांचे तीक्ष्ण बाण नेहमींच विषारी सर्पाप्रमाणें भयप्रद असतात. माझें अद्भूत हस्तलाघव मी आज प्रकट करीत असतांना प्राणघातक सर्पांनीं चंदनवृक्षाला लपेटावें त्याप्रमाणें माझे बाण अर्जुनाला वेढून टाकतील. वारंवार मी धनुष्याचा टणत्कार करून दशदिशा दुमदुमवून टाकीन. अर्जुनाला पाहतांबरोबर मला अतिशय आनंद झाला आहे. एखाद्या सत्पात्र गुणवान् ब्राह्मणाप्रमाणें मी ह्या अर्जुनरूप अतिथीचा हजारो बाणांनीं सत्कार करणार आहे. अर्जुन हा जसा त्रिभुवनविख्यात धनुर्धर तसाच मीही पण त्रिभुवनविख्यात धनुर्धर आहे. आम्हां दोघां महारथ्यांच्या बाणांनीं सारें आकाशमंडळ व्याप्त झालेलें वीरांच्या दृष्टीस पडेल. किती तरी दिवसांपूर्वी केलेली अर्जुनाच्या वधाची प्रतिज्ञा मी आज पुरी करीन व राजा दुर्योधनाची इच्छा पुरविल्याचें मला त्यामुळें समाधान लाभेल. महेंद्राच्या वज्राप्रमाणें ज्याचा प्रहार भयानक आहे व महेंद्राप्रमाणेंच ज्याचें तेज आहे अशा या तृतीय पांडवाला, कोलताडांनीं हत्तीला मारावें त्याप्रमाणें आज मी माझ्या शस्त्रप्रहारांनीं ठार करीन. सर्व

शस्त्रधाऱ्यांमध्यें श्रेष्ठ व सर्व अतिरथ्यांमध्यें वरिष्ठ अशा ह्या पार्थाला, गरुड ज्याप्रमाणें सर्पाला मारतो तसाच मी मारीन. हा अग्नीप्रमाणें दुर्धर्ष व सगळ्या शत्रूंना जाळणारा असून खड्ग, बाण व शक्ति हेंच ह्या महाभयंकर पार्थरूपी अग्नीचें इंधन होय. परंतु वेगानें जाणाऱ्या अश्वरूप वाऱ्यानें प्रेरणा दिलेला व रथघोषाच्या गडगडाटानें विनाश सुचवीत असलेला हा कर्णरूप महामेघ आपल्या घोर शरवृष्टीनें या अग्नीला शांत केल्यावांचून राहणार नाहीं. साप ज्याप्रमाणें वेगानें बिळांत शिरतात त्याप्रमाणें माझे बाण आज अर्जुनाच्या शरीरांत शिरतील. वाऱ्यानें पर्वत कंप पावतो तसा मी अर्जुनाला आघातांनीं थरकांपवीन. भगवान् परशुरामांजवळून जें सामर्थ्य माझ्या ठिकाणीं संक्रमित झालें आहे त्याच्या भरंवशावर मी देवेंद्राला सुद्धां द्वंद्वयुद्धांत ठार मारीन. मग अर्जुनाची कथाच काय? कुणी एक वानर घोर स्वरूपाची गर्जना करीत पार्थाच्या ध्वजावर असतो व त्याच्या त्या गर्जनांनीं मोठमोठे शत्रूही थरकांपतात. पण या वानराच्या गर्जना आज अखेरच्या ठरणार आहेत. कारण बाणांनीं मी ह्या वानराला मरणकाळच्या शेवटच्या किंकाळ्या फोडीत मृत्यूच्या दरबारांत पाठवून देणार आहें. जीं अद्भुत पिशाच्चें ह्या अर्जुनाच्या रथावर कोलाहल करीत असतात त्यांचे ते कोलाहल आज शेवटचे ठरतील. दुर्योधनाच्या अंतःकरणांतील शल्य मेलेल्या अर्जुनाला रथांतून जमिनीवर फेंकून देतांना मी नित्याचें उपटून टाकणार आहें. ज्याचे घोडे मेलेले आहेत, रथ भग्न झाला आहे व पराक्रम व्यर्थ ठरला आहे असा हा अर्जुन एखाद्या हत्तीप्रमाणें अंतकाळीं तडफडत असलेला तुम्ही पहाल. तुम्ही ह्या मत्स्यराज विराटाचें गोधन घेऊन जा. किंवा कौतुकानें माझ्या युद्धाचा चमत्कार पहा. पण मी या ठिकाणीं उपस्थित असतांना दुसऱ्या कुणीही युद्ध करण्याची कांहींही आवश्यकता नाहीं."

कर्णाच्या आत्मश्लाघेचें महाभारतांत पुष्कळ ठिकाणीं वर्णन आहे. मी फक्त वानगीदाखल येथें दोन उदाहरणें घेतलीं. या आत्मश्लाघेच्या त्याच्या वलयानेंच पुष्कळांचा तो अर्जुनापेक्षां अधिक पराक्रमी होता असा अपसमज होतो, पण वस्तुस्थिति तशी नाहीं.

## कर्ण अर्जुनापेक्षां अधिक पराक्रमी होता काय ?

संपूर्ण महाभारतांत कर्णानें अर्जुनाचा पराभव केल्याचें एकही उदाहरण नाहीं. उलट अर्जुनानें कर्णाचा पराभव केल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. किंबहुना असें एकही युद्ध नाहीं कीं ज्या युद्धांत अर्जुन व कर्ण यांची गांठ पडली असतां अर्जुनानें कर्णाचा पराभव केला नाहीं. श्रीकृष्णाच्या साहाय्यानें अर्जुनानें कर्णाचा पराभव केला असें समजलें जातें. एकटया अर्जुनानें कोणाचेंही साहाय्य न घेतां एकटया कर्णाचा पराभव केल्याचीं महाभारतांत कितीतरी उदाहरणें आहेत. द्रौपदी स्वयंवराचे वेळीं ब्राह्मणवेषधारी अर्जुनावर कर्ण तुटून पडला असतां अर्जुनानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्याच्या शरीराची चाळणी केली. घाबरलेला कर्ण समोरचा योद्धा अर्जुन आहे हें माहीत नसतांदेखील थरकांपून उठला. पण कसें पळून जावें हेंच त्याला समजेना. शेवटीं त्यानें पळण्यासाठीं जें मासलेवाईक कारण शोधून काढलें आहे तें त्याच्या आत्मश्लाघी पण पराजित वृत्तीवर चांगलाच प्रकाश पाडणारें आहे. तो म्हणतो :

तुष्यामि ते विप्रमुख्य भुजवीर्यस्य संयुगे ।
अविषादस्य. चैवास्य शस्त्रास्त्रविजयस्य च ।। १६
किं त्वं साक्षाद्धनुर्वेदो रामो वा विप्रसत्तम ।
अथ साक्षाद्धरिहयः साक्षाद्वा विष्णुरच्युतः ।। १७
आत्मप्रच्छादनार्थं वै बाहुवीर्यमुपाश्रितः ।
विप्ररूपं विधायेदं मन्ये मां प्रतियुध्यसे ।। १८
न हि मामाहवे क्रुद्धमन्यः साक्षाच्छचीपतेः ।
पुमान्योधयितुं शक्तः पाण्डवाद्वा किरीटिनः ।। १९
तमेवं वादिनं तत्र फाल्गुनः प्रत्यभाषत ।
नास्मि कर्ण धनुर्वेदो नास्मि रामः प्रतापवान् ।। २०
ब्राह्मणोऽस्मि युधां श्रेष्ठः सर्वशस्त्रभृतां वरः ।
ब्राह्मे पौरंदरे चास्त्रे निष्ठितो गुरुशासनात् ।। २१
स्थितोऽस्म्यद्य रणे जेतुं त्वां वै वीर स्थिरो भव ।

वैशंपायन उवाच ।

एवमुक्तस्तु राधेयो युद्धात्कर्णो न्यवर्तत ।। २२

—महाभारत, आदिपर्व अध्याय १९०

"तुझ्या भुजबळावर व धनुर्विद्येच्या कौशल्यावर मी अत्यंत प्रसन्न झालों आहें. हे ब्राह्मणश्रेष्ठा, तूं साक्षात् धनुर्वेद, देवेंद्र अथवा विष्ण असून माझ्याशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें तर या ठिकाणीं उपस्थित झाला नाहींस ना? किंवा आपल्या शिष्याची अस्त्रज्ञानांतील परीक्षा पहाण्यासाठीं म्हणून प्रत्यक्ष माझे गुरु भार्गवराम तर या ठिकाणीं तुझ्या रूपानें उपस्थित झाले नाहींत ना? कारण अशा महान् शक्ति सोडून माझ्याशीं द्वंद्वयुद्ध करण्याची अखिल विश्वांत कोणाची शक्ति आहे? नाहीं म्हणायला तृतीय पांडव अर्जुन मात्र माझ्याशीं द्वंद्व करावयास प्रवृत्त होऊं शकत होता. पण तो लाक्षागृहांत दग्ध झाल्यापासून मला प्रतिपक्षी असा कोणीही उरला नाहीं."

पराजयांतही प्रौढी मिरविणाऱ्या कर्णाच्या गर्वोद्धतपणाची अर्जुनाला स्वाभाविकपणेंच गंमत वाटली. तो त्याला म्हणाला: गड्या मी धनुर्वेदही नाहीं, व परशुरामही नाहीं. इंद्र व विष्णु तर नाहींच नाहीं. गुरूच्या प्रसादानें ब्रह्मास्त्र प्रसन्न झालेला व धनुर्वेदांत निष्णात असलेला मी एक ब्राह्मण आहें. पण मी कोण आहे या गोष्टीशीं तुला काय करावयाचें आहे? सध्यां मी तुझा प्रतिपक्षी म्हणून उभा आहे. माझ्याशीं लढून मला ठार मारणें किंवा लढतां लढतां देह धारातीर्थीं ठेवणें हेंच तुझें कर्तव्य आहे. तरी स्थिर रहा व युद्ध कर.

पण तो ब्राह्मण आहे व त्याचा सन्मान राखला पाहिजे असें निमित्त सांगून कर्णानें युद्धांतून माघार घेतली. कर्णानें हा जो युक्तिवाद केला तो किती फुसका आहे हें कोणाच्याही सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. अजिंक्य ब्राह्मतेजाचा त्याला सन्मानच राखावयाचा होता तर त्यानें आधीं इतका वेळ युद्ध केलेंच कां? तो प्रतिपक्षाच्या ब्राह्मतेजाला नव्हे तर क्षात्रतेजालाच भिऊन पळून गेला. किंबहुना अंगावर बाजू आली असतांना पळून जाणें कर्णाच्या बाबतींत अनेकदां घडलेलें आहे. अर्जुनच कशाला? घोषयात्रेच्या प्रसंगीं चित्रसेन गंधर्वाबरोबरच्या युद्धांत देखील तो असाच पळून गेल्याचा स्पष्ट उल्लेख आहे.

ततो रथादवप्लुत्य सूतपुत्रोऽसिचर्मभृत् ।
विकर्णरथमास्थाय मोक्षायाश्वानचोदयत् ।। ३२

—महाभारत, वनपर्व अध्याय २४१

उत्तरगोग्रहणांत तर एकट्या अर्जुनानें केवळ उत्तराच्या साहाय्यावर कर्णाचा अनेकदां पराभव करून त्याला दातीं तृण धरून पळावयास लाविलें आहे. इतकेंच नव्हे तर, भारतीय युद्धांतही अर्जुनानें कर्णाचा अनेक वेळां पराभव केला असून आव्हानपुरस्सर कर्णाच्या मुलाला अर्जुनानें ठार मारलें. तात्पर्य कर्ण पराक्रमी असला तरी तो अर्जुनापेक्षां अधिक पराक्रमी होता हा निव्वळ अपसमज आहे.

## श्रीकृष्णांची यशस्वी भेदनीति

कर्णाचें दुर्योधनाकडे असलेलें अपरंपार महत्त्व श्रीकृष्णांना पूर्णपणें माहीत होतें. इतकेंच नव्हे तर कुरुपांडव युद्धाचा घोर प्रसंग टाळणें सर्वस्वीं जिच्या हातांत आहे अशी व्यक्ति फक्त कर्ण होय याची जाणीव सर्व ज्ञात्यांना होती. त्यामुळें कर्ण जर दुर्योधनाच्या पक्षांतून फोडतां आला तरच हा अनर्थ टळूं शकेल हेंही सर्वांना कळत होतें. पण दुर्योधनापासून कर्णाला फोडण्याचा उपाय मात्र कोणालाही माहीत नव्हता. तो उपाय इतर कोणाला माहीत नसला तरी भगवान् श्रीकृष्णांना माहीत होताच. त्याचा प्रयोग करून कर्णाला वळवावें व विनाश टाळावा अशी एक कल्पना शिष्टाईहून परत येतांना श्रीकृष्णांना सुचली. निरोप द्यावयास हस्तिनापूरच्या वेशीपर्यंत आलेल्या इतर दरबारीं लोकांना बाजूला ठेवून तो उपाय करण्याच्या दृष्टीनें कर्णाला आपल्या रथांत घेऊन श्रीकृष्णांनीं मार्ग आक्रमिला. तो उपाय सरळ होता व तो म्हणजे कर्णाला माहीत नसलेलें पांडवांचें व त्याचें नातें त्याला कळवून त्याचें मन विचलित करणें. श्रीकृष्णांनीं हा उपाय करून पाहिला. पण कर्ण अशा परिस्थितींत होता व वैरही अशा मर्यादेपर्यंत येऊन पोंचलें होतें कीं त्या अवस्थेंत कौरवपक्ष सोडून पांडवांच्या पक्षाला कर्ण येऊन मिळणें केवळ दुरापास्त होतें.

श्रीकृष्णांनीं हा उपाय करून पाहिला पण तो विफल ठरला असें पुष्कळांचें मत आहे. पण या घटनेचा व तिच्या परिणामांचा अधिक सूक्ष्म विचार केला तर कर्ण कौरवांच्या पक्षाकडून शेवट-पर्यंत राहणार हें माहीत असूनही श्रीकृष्णांनीं हा प्रयोग केला व त्यांत ते यशस्वी ठरले असें आढळून येईल. त्यांचें काय उद्दिष्ट असेल? पांडवांच्या विद्वेषाची कर्णाच्या अंतःकरणांतील धार बोथट करणें, त्यांच्यासंबंधीं व विशेषतः द्रौपदीसंबंधीं त्यानें एका-हून एक घोरतम केलेल्या अन्यायांची जाणीव व तिची टोंचणी त्याच्या अन्तःकरणांत उत्पन्न करणें व विजयाऐवजीं झालेल्या अन्यायांचें परिमार्जन म्हणून युद्धांत मरण्याची न्यूनगंडात्मक भावना त्याच्या अंतःकरणांत उत्पन्न करणें हा तो उद्देश होय. यांत श्री-कृष्ण पूर्णपणें सफल झाले आहेत. मी पांडवांना ठार मारीन असें म्हणणारा कर्ण शेवटीं पांडवांचा आपण अकारण अपराध केला याचें दुःख वाटून अर्जुनानें आपल्याला मारावें हीच त्या पापाची निष्कृति होय असें स्पष्ट म्हणूं लागला आहे. तो म्हणतो :—

**यदब्रुवमहं कृष्ण कटुकानि स्म पाण्डवान् ।**
**प्रियार्थं धार्तराष्ट्रस्य तेन तप्ये ह्यकर्मणा ॥ ४५**
**यदा द्रक्ष्यसि मां कृष्ण निहतं सव्यसाचिना ।**
**पुनश्चितिस्तदा चास्य यज्ञस्याथ भविष्यति ॥ ४६**
**दुःशासनस्य रुधिरं यदा पास्यति पाण्डवः ।**
**आनर्दं नर्दतः सम्यक् तदा सूत्यं भविष्यति ॥ ४७**
**यदा द्रोणं च भीष्मं च पाञ्चाल्यौ पातयिष्यतः ।**
**तदा यज्ञावसानं तद्भविष्यति जनार्दन ॥ ४८**
**दुर्योधनं यदा हन्ता भीमसेनो महाबलः ।**
**तदा समाप्स्यते यज्ञो धार्तराष्ट्रस्य माधव ॥ ४९**
**स्नुषाश्च प्रस्नुषाश्चैव धृतराष्ट्रस्य सङ्गताः ।**
**हतेश्वरा नष्टपुत्रा हतनाथाश्च केशव ॥ ५०**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १४१

'श्रीकृष्णा', माझे बंधु जे पांडव त्यांचा कांहीं एक अपराध नसतां व त्यांनीं माझा कांहींही अपराध केला नसतां मी विनाकारण दुर्यो-

धनाला केवळ बरें वाटावें म्हणून त्यांच्या हीनदीन परिस्थितींत त्यांच्या हृदयाला घरें पाडण्यासारखे जे अनेक कठोर अपशब्द बोललों त्यांचें माझ्या हृदयाला अत्यंत दुःख होत आहे. मी हें मोठें पाप केलें असें मला वाटतें. अर्जुनानें युद्धांत मला ठार मारणें हें एकच त्या पापाचें प्रायश्चित्त आहे. आपलें जर माझ्यावर कांहीं प्रेम असेल तर हा प्रायश्चित्ताचा मार्ग मला चोखाळूं द्या. प्रतिज्ञेप्रमाणें भीमसेन दुःशासनाचें रक्त पिऊन रणयज्ञांतलें सोमपान करील यांत मला संशय नाहीं. मी आपणांस भविष्य सांगतों कीं भीष्म, द्रोण, मी स्वतः व दुर्योधन यांच्या मरणानें हा यज्ञ समाप्त होईल व त्यानंतर अनाथ झालेल्या आमच्या विधवा विलाप व अश्रुपात करीत कोल्हीं, कुत्रीं व गिधाडें यांनीं अर्धवट तोडून टाकलेल्या आमच्या प्रेतांजवळ गांधारी-सह ज्यावेळीं येतील त्यावेळीं या यज्ञांतील अवभृथस्नान होईल. हा यज्ञ समाप्त होईल." श्रीकृष्णांनीं केलेल्या या प्रयोगानें कर्णाच्या मनावर इतका विलक्षण परिणाम झाला होता कीं अन्यायाच्या जाणिवेच्या टोंचणीनें त्यानें पुढें कुन्तीला कोणत्याही परिस्थितींत आपल्या चार बंधूंना न मारण्याचें व पूर्णपणें वांचविण्याचें वचन दिलें. तें त्यानें पाळलेंही. त्याचें सहजकवच व कुंडलें इंद्राकडून पूर्वींच काढून घेतलीं गेलीं होतीं. घटोत्कचाच्या वधाच्या निमित्तानें इंद्रानें कर्णाजवळ दिलेलें शक्तीसारखें अमोघ साधनही नाहींसें करून त्यांनीं कर्णावर दुसरा विजय संपादन केला. ऐनवेळीं त्यांनीं शल्याकडून कर्णाचा तेजोवध करून कर्णावर तिसरा विजय संपादन केला. शल्यासारख्या मान्य राजपुरुषाकडून असें अवसानघाताचें कृत्य होणें असंभवनीय वाटल्यानें महाराष्ट्रांतील महाभारताचे पहिले संशोधक श्री. चिंतामण विनायक वैद्य यांनीं हें सारें प्रकरणच आपल्या भार-ताच्या उपसंहारांत प्रक्षिप्त म्हणून निकालांत काढलें आहे. पण न उलगडलें कीं प्रक्षेपाचा आश्रय करावयाचा ही रीत भारतीय वाङ्-मयासाठीं पाश्चात्यांनीं हेतुतः बनविलेल्या संशोधनशास्त्रांत नवीन नाहीं. चिंतामणराव वैद्यांसारखे भारताचार्यही तिला बळी पडले इतकेंच. नीतिशास्त्राचे सामान्य नियम राजनीतिशास्त्रासारख्या सम-ष्टीच्या नीतिशास्त्राला लागूं पडत नसतात. दुर्योधनानें शल्याची जी

करुण फसवणूक केली होती तिचें त्यानें जशास तसें या नात्यानें या प्रसंगीं उट्टें काढलें. वैद्य म्हणतात त्यापेक्षां प्रक्षेप म्हणून एकादी गोष्ट निकालांत काढावयास अधिक सबळ पुरावे लागत असतात. माझ्या मतें हें प्रकरण प्रक्षिप्त तर नाहींच, उलट महाभारतांतील राजकारणाच्या उठावाच्या दृष्टीनें तें अत्यवश्य आहे. भारताच्या कर्त्याच्या महान् प्रतिभेची सुपूर्तता या प्रकरणांत व्यक्त झाली आहे. माझें मत असें आहे कीं, शल्याची भेदनीति हा भगवान् श्रीकृष्णांनीं कर्णावर मिळविलेला राजनीतीच्या क्षेत्रांतील मुत्सद्दीपणाचा (Strategical) तिसरा महान् विजय होय.

## शल्यप्रकरणाचें खरें स्वरूप

मद्रपति शल्य हा माद्रीचा भाऊ व पांडवांपैकीं नकुल व सहदेव यांचा प्रत्यक्ष मामा होता. त्यामुळें युद्धांत त्याचा दुर्योधनाच्या पक्षाकडे ओढा असण्याचें कांहीं कारण नव्हतें. उलट आपल्या भाच्यांना रानोमाळ भटकायला लावून त्यांची इभ्रत घेणाऱ्या व त्यांच्या कुलस्त्रीची हवी तशी विटंबना करण्यास धजलेल्या दुर्योधनाविषयीं शल्याला असला तर अपरिमित तिरस्कारच असणें संभवनीय होतें. युद्ध सुरू होण्याचा संभव दिसूं लागला तेव्हां झालेल्या अन्यायाचा कौरवांवर सूड घेतां येईल या कल्पनेनें मद्रराज शल्याला अतिशय आनंद झाला. रीतसर युद्धाचें निमंत्रण गेल्यानंतर पांडवांना साहाय्य करण्याच्या हेतूनें शल्य आपल्याबरोबर एक अक्षौहिणी सैन्य घेऊन पांडवांकडे यावयास निघाला. पण रस्त्यांत दुर्योधनानें त्याची मोठी फसवणूक केली. दुर्योधनानें मार्गांत ठिकठिकाणीं शल्याची इतकी उत्तम व्यवस्था ठेवली कीं, शल्य प्रसन्न झाले व ती सारी व्यवस्था युधिष्ठिरानेंच केली आहे अशा समजुतीनें शल्यानें असे उद्गार काढले कीं, "ज्या कुणी माझी इतकी उत्तम व्यवस्था ठेवली त्याला तो मागेल तें द्यावयास मी सिद्ध आहें." हें शल्याचें वाक्य ऐकतांच दुर्योधन पुढें आला व त्यानें शल्यांना प्रार्थनापूर्वक संग्रामांत आपल्याकडून लढण्याचें वरदान मागितलें. तत्कालीन क्षत्रियांच्या कांहीं रूढ नीतिकल्पनांच्या

अनुसार शल्यांना दुर्योधनाची विनंति मान्य करतांना केवढें भयंकर प्राणसंकट वाटलें असेल याची मागच्या पार्श्वभूमीवरून कल्पना येतेच. अखेरीस "युधिष्ठिराला भेटून नंतर मी तुझ्याकडे येतों" असें दुर्योधनाला सांगून शल्य पांडवांच्या शिबिरांत आले. अर्थातच तेथें शल्यांच्या परिस्थितीवर गंभीर विचार होऊन शल्याचा दुर्योधनाला विशेष उपयोग काय होईल याची योग्य ती कल्पना करण्यांत आली व नीलकंठ महादेवानें विषानेंच आपली शोभा वाढवावी त्याप्रमाणें शल्याच्या बाबतींत उत्पन्न करण्यांत आलेल्या विशिष्ट परिस्थितीचा फायदा करून घेण्याचें श्रीकृष्णांनीं ठरविलें. दुर्योधनानें शल्याला फसविलें होतें, त्याचा सूड म्हणून शल्यानें कर्णाच्या तेजोवधानें दुर्योधनाची हानि करावी असें ठरलें. शल्यानें ती कामगिरी इतकी यथायोग्य बजावली कीं त्याच्या केलेल्या फसवणुकीचा दुर्योधनाला जन्मभर पश्चात्ताप व्हावा. जर दुर्योधनानें शल्याची फसवणूक करण्यांत पाप नसून राजनीतिकुशलता आहे, तर शल्यानें उलट दुर्योधनाची हानि करण्यांत व त्याच्यावर डाव उलटविण्यांत अन्याय आहे असें कसें म्हणतां येईल ? उत्साहाच्या भरांत महारथी कर्ण अर्जुनाच्या वधाच्या व पांडवांच्या सर्वस्वनाशाच्या वल्गना करणें जितकें शक्य व स्वाभाविक आहे, तितकेंच त्या वल्गनांतील प्रत्येक शब्द तापलेल्या शिशाचा रस ओतावा त्याप्रमाणें शल्याला वेदना देणेंही स्वाभाविकच आहे. कर्णाकडे पाहिल्यानंतर आपल्या परमप्रिय भाच्यांच्या सर्वस्वनाशाला हाच गृहस्थ कारणीभूत झाला असें वाटून शल्याला त्याच्याविषयीं तीव्र संताप चढणें अत्यंत नैसर्गिक आहे. त्यामुळें श्रीकृष्ण नि अर्जुन यांचें जें अंतःकरणाचें नातें होतें तें शल्य व कर्ण या जोडींत, बाह्य देखावा कितीही योग्य असला तरी उत्पन्न होणें अशक्यच होतें. शल्यानें आपली कामगिरी चोख बजावली. कर्णाचें धैर्य मात्र खरेंच अलौकिक ! शल्याच्या एकेका वाक्यानें त्याच्या हृदयाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडत असतांही त्यानें अणुमात्रही न ढळतां त्या अखेरच्या युद्धांत अपूर्व पराक्रम प्रकट केला यांत शंका नाहीं. त्यांत कर्णाच्या अनेक गुणांची पुन्हां एकवार कसोटी लागली आहे.

## करुणामय अंत

शेवटीं अंतर्गत दोषांमुळें वंचित झालेला कर्ण आपण स्वतः होऊनच उत्पन्न केलेल्या प्रचंड वणव्यांत जळून दग्ध झाला. त्याच्यासमोर अर्जुनानें त्याचा पुत्र ठार मारल्यामुळें तो विकल झाला होता. शापाच्या प्रभावानें त्याचें रथचक्र पृथ्वीनें गिळलें. हातावर हात चोळून रथाचें चाक भूमींतून काढण्यासाठीं तो खालीं उतरला व आपले दोन्ही हात त्यानें रथचक्रांत अडकविले तोंच भगवान् श्रीकृष्णांनीं पार्थाला जोरानें ओरडून सांगितलें, 'मार याला ठार. हीच वेळ आहे!' तें ऐकतांच कर्ण मनांत चरकला. भग्नसंकल्प कर्णाच्या डोळ्यांत अश्रुबिंदु तरळले. आपल्या कंठनालाच्या रोखानें शरसंधान करीत असलेल्या अर्जुनाला उद्देशून त्यानें मोठ्यानें हांक मारली व तो त्याला म्हणूं लागला :—

**भो भो पार्थ महेष्वास मुहूर्तं परिपालय ।**
**यावच्चक्रमिदं ग्रस्तमुद्धरामि महीतलात् ॥ १०८**
**सव्यं चक्रं महीग्रस्तं दृष्ट्वा दैवादिदं मम ॥**
**पार्थ कापुरुषाचीर्णमभिसन्धिं विसर्जय ॥ १०९**
**न त्वं कापुरुषाचीर्णं मार्गमास्थातुमर्हसि ।**
**ख्यातस्त्वमसि कौन्तेय विशिष्टो रणकर्मसु ॥ ११०**
**विशिष्टतरमेव त्वं कर्तुमर्हसि पाण्डव ।**
**प्रकीर्णकेशे विमुखे ब्राह्मणेऽथ कृताञ्जलौ ॥ १११**
**शरणागते न्यस्तशस्त्रे याचमाने तथाऽर्जुन ।**
**अबाणे भ्रष्टकवचे भ्रष्टभग्नायुधे तथा ॥ ११२**
**न विमुञ्चन्ति शस्त्राणि शूराः साधुव्रते स्थिताः ।**
**त्वं च शूरतमो लोके साधुवृत्तश्च पाण्डव ॥ ११३**
**अभिज्ञो युद्धधर्माणां वेदान्तावभृथाप्लुतः ।**
**दिव्यास्त्रविदमेयात्मा कार्तवीर्यसमो युधि ॥ ११४**
**यावच्चक्रमिदं ग्रस्तमुद्धरामि महाभुज ।**
**न मां रथस्थो भूमिष्ठं विकलं हन्तुमर्हसि ॥ ११५**
**न वासुदेवात्त्वत्तो वा पाण्डवेय बिभेम्यहम् ।**

**त्वं हि क्षत्रियदायादो महाकुलविवर्धनः ।**
**अतस्त्वां प्रब्रवीम्येष मुहूर्तं क्षम पाण्डव ।। ११६**

—महाभारत, कर्णपर्व अध्याय ९०

"हे महारथी पार्था! केवळ मुहूर्तभर थांब. मी आपत्तींत सांपडलों आहें. माझ्या रथाचें चाक पृथ्वीनें गिळलें आहे. मी तें बाहेर काढण्याच्या प्रयत्नांत गुंतलों आहें. केवळ दैवानेंच माझ्यावर ही आपत्ति आलेली आहे. आपत्तींत सांपडलेल्या प्रतिपक्ष्यावर प्रहार करणें हें भ्याडाचें काम आहे, वीराचें नव्हे. हे कौंतेया! तुझ्या शौर्याच्या कीर्तीनें त्रैलोक्याचे दिक्कोन गर्जून उठले आहेत. रणांगणांत अद्भुत पराक्रम करणारा खंदा वीर म्हणून तुझें वैशिष्ट्य नेहमींच वाखाणलें जातें. तुझ्यासारख्या व्यक्तीकडून विशेष प्रकारच्या धीरोदात्त आचरणाचीच नेहमीं अपेक्षा केली जाते. अस्ताव्यस्त केस होऊन दीन झालेला, रणांगणांतून पराङ्मुख झालेला, हात जोडून प्राणयाचना करणारा, ब्राह्मण, शरण आलेला, शस्त्रत्याग केलेला, याचना करणारा, ज्याचे बाण संपून गेले आहेत असा, भग्नकवच व भग्नायुध अशा प्रतिपक्ष्यावर चारित्र्यसंपन्न शूर लोक कधींही प्रहार करीत नसतात. हे धनंजया! तूं तर सर्वश्रेष्ठ शूराग्रणी आहेस व तुझें चारित्र्य अत्यंत देदीप्यमान आहे. युद्धाचे धर्म तूं जाणतोस. माझ्यासारख्यानें तुला धर्माधर्माचे पाठ देण्याचें कांहींच कारण नाहीं. ज्ञानाच्या महान् यज्ञांत अध्यात्माचें अवभृथ स्नान करून तूं पावन झाला आहेस. तूं दिव्यास्त्रवेत्ता आहेस. तुझें अंतःकरण अत्यंत गंभीर व अति थोर आहे. तुला पाहिलें कीं मला महापराक्रमी कार्तवीर्य सहस्रार्जुनाचीच आठवण होते. तो आपल्या सहस्रबाहूंनीं जीं दुष्कर कर्मं करूं शकला नसता तीं तूं आपल्या दोन बाहूंनीं सहज लीलेनें करूं शकतोस. तेव्हां हे महाधनुर्धरा! माझें हें पृथ्वीनें गिळलेलें चाक मी केवळ बाहेर काढीपर्यंत थांब. हे महानुजा! तूं रथावर उभा आहेस, तर मी भूमीवर उभा आहे. तुझ्या हातांत शस्त्र आहे तर माझे हात गुंतलेले आहेत. अशा स्थितींत माझ्यावर बाणांचा प्रहार करून मला विकल करणें तुला

शोभणार नाहीं. हे पांडवश्रेष्ठा! याचा अर्थ मी तुला भ्यालों असा मात्र मुळींच करूं नकोस. तुलाच काय पण तुझ्या रथावर असलेल्या या चक्रधर यादवश्रेष्ठ श्रीकृष्णालाही मी भीत नाहीं. पण हे क्षत्रियश्रेष्ठ पार्था! तूं एका महान् कुलांत जन्म घेतला आहेस व आपल्या सर्वश्रेष्ठ कर्तृत्वानें आजवर तूं त्या कुलाच्या कीर्तींत भरच टाकली आहेस. तुझ्या आतांच्या कृत्यानें त्या कुलाच्या कीर्तीला तूं कलंक लावूं नयेस व आजपर्यंतच्या तुझ्या निरपवाद कर्तृत्वाला एक अपवाद उत्पन्न होऊं नये इतकीच माझी इच्छा आहे. हे पांडवा! मला भीति वाटते म्हणून नव्हे, तर केवळ तुझी कीर्ति कलंकित होऊं नये म्हणून मी तुला विनंति करतों कीं तूं केवळ एक मुहूर्तभर थांब. हात आंवर. माझ्यावर बाणांचा प्रहार करूं नकोस.

सेनापति कर्णाचें तें कारुण्यपूर्व भाषण ऐकतांच धर्मभीरु पार्थाचें दयाशील अंतःकरण द्रवलें. त्या स्थितींत त्याच्यावर प्रहार करण्यास त्याचा हात धजेना. तो आपला बाण धनुष्याला न लावतां स्वस्थ बसला. पण कर्णाच्या तोंडचें तें अंतकाळचें धर्मप्रवचन अर्जुनाच्या रथावर असलेल्या भगवान् श्रीकृष्णांना सहन झालें नाहीं. सैतानानें धर्मशास्त्राचा आधार घ्यावा त्याप्रमाणें धर्माच्या खुनाच्या रक्तांत ज्याचे हात कोपरापर्यंत बुडून बरबटले आहेत त्या अधार्मिकांनीं व अनीतिमंतांनीं आपल्या मृत्युसमयीं जीव वांचविण्यासाठीं धर्मवादाचा आश्रय करावा ही गोष्ट श्रीकृष्णांसारख्या पूर्णावतारी युगपुरुषाला कशी सहन व्हावी? केवळ व्यक्तिगत मत्सरानें प्रेरित होऊन व आपलें सारें लक्ष व्यक्तिगत लाभावरच केंद्रित करून ज्यानें जन्मभर सज्जनांचा छळ व दुर्जनांचा पाठपुरावा केला, आपले सर्व सद्गुण व सर्व महान् वैशिष्टचें केवळ ज्यानें मत्सराच्या स्थंडिलावर बळीं दिलीं, व्यक्तिगत महत्त्वाकांक्षेसाठीं भारताच्या महान् कुलाचा विध्वंस करण्याची ज्यानें पाळी आणली व केवळ ज्याच्या लहरीसाठीं भारतवर्षांतील तेजस्वी क्षत्रियांची एक सबंध पिढी कृतांताच्या कराल दंष्ट्रेखालीं रगडली जाण्याचा प्रसंग उद्भवला त्याचे अंतकाळचे धर्माचे आलाप कोण

ऐकून घेईल? ज्याचा मत्सर कुलस्त्रीच्या अब्रूची राखरांगोळी करण्याइतक्या खालच्या पायरीवर येऊं शकतो, ज्याच्या लहरीसाठीं पुण्यश्लोक राजर्षि विपत्तीच्या नरकांत कुजत पडतो व अल्पवयी बालकांचा कपटानें वध करण्यांत ज्याचें चारित्र्य धन्यता मानतें त्याच्या तोंडून निघणारे नीति, धर्म व चारित्र्य यांचे पोवाडे म्हणजे त्यांचें विडंबनच होय.

श्रीकृष्णानें त्याच्या पापांची त्याला आठवण करून दिली व आतां न्याय तुला वांचवावयास असमर्थ आहे, तुझ्यासाठीं एकच गोष्ट नियतीनें ठरविलेली आहे व ती म्हणजे मृत्यु! भयानक, क्रूर, वेदनामय मृत्यु!! असें त्याला स्पष्ट शब्दांत सांगून अर्जुनाला बजावलें कीं पार्था, या नीचाविषयीं तुझ्या अंतःकरणांत अणुमात्रही दया उत्पन्न होऊं देऊं नकोस. अधमांना धर्माचें संरक्षण देणें म्हणजे सर्पाला दूध पाजून मोकाट सोडणें होय. पाहतोस काय? सावर गांडीव धनुष्य, उचल तो अग्निमय बाण आणि तोड याचा कंठनाल. दे फेंकून याचें मस्तक धुळींत व याच्या ह्या पापी शरीराचे तिळा-तिळाएवढे तुकडे करून घाल ते कोल्ह्यांना, कुत्र्यांना नि गिधाडांना खायला! हें ऐकून कर्णानें लाजेनें खालीं मान घातली व अर्जुनानें एका तीक्ष्ण अर्धचंद्राकार बाणानें कर्णाचें मस्तक अपराण्हकालीं चण्डभास्कराच्या साक्षीनें अंतराळांत भिरकावून दिलें. राजा दुर्योधन व लक्षावधि सैनिक यांच्या अश्रुबिंदूंसहित तें मस्तक भूमीवर धुळींत पडलें.

दीर्घदर्शी व द्रष्टे प्रतिभावान् व्यक्तींच्या चित्रणांत शाश्वत तत्त्वांचें दर्शन घडवीत असतात. कर्णाच्या महान् पण विफलच नव्हे तर विनाशकही असणाऱ्या जीवनाच्या द्वारें महर्षि व्यास एक शाश्वत संदेश देत आहेत. हिमाचलासारखें उत्तुंग व्यक्तिमत्त्वही अहंकार व आत्मकेंद्रितता या पिशाचांनीं पछाडलें असलें तर तें मानवतेचें विध्वंसकच ठरतें हा तो महान् संदेश होय.

---

# १६. राजर्षि भीष्म

राजा धृतराष्ट्र व दुर्योधन यांच्या रूपानें आपण ज्याप्रमाणें धर्म, तपस्वी सत्ता, व पौरजानपद यांच्या नियंत्रक सत्तेचें नियंत्रण झुगारून देणारी अधःपतित राज्यसंस्था पाहिली, त्याचप्रमाणें दुःशासन, शकुनि व कर्ण यांच्या रूपानें समर्थ पण विकारवश, क्षुद्र, नृशंस व स्वतःच्या महत्त्वाकांक्षेसाठीं जगांतील वाटेल त्या गोष्टीचें बलिदान द्यावयास सिद्ध असलेल्या सचिवसत्तेचेंही स्वरूप आपण पाहिलें. "असत्पापिष्ठसचिवो वध्यो लोकस्य धर्मः।" या शाश्वत न्यायानुसार ही राज्यसंस्था वध्य झाली होती. कारण तिला सुधारण्यास दुसरी कोणतीही शक्ति समर्थ नव्हती. त्या वेळीं विशुद्ध सचिवसंस्था नव्हतीच काय असा प्रश्न उपस्थित होईल. होती असें त्याचें उत्तर आहे. राजर्षि भीष्म, विदुर, नि गांधारी यांच्या रूपानें या विशुद्ध सचिवसंस्थेचें महाभारतकारांनीं चित्रण केलें आहे. पण ती सचिवसंस्था विशुद्ध असली तरी राज्यसंस्थेवरचें तिचें नियंत्रण अजिबात संपलेलें होतें. त्यामुळें एरवीं रामायणासारख्या सामाजिक विकसनांत तिचा जो उपयोग होऊं शकला असता तो मुळींच होऊं शकला नाहीं. ती अस्तित्वांत असतांनाही राज्यसंस्थेच्या उपहासाचा विषय बनली व राज्यसंस्थेला नष्ट करून टाकण्याचें आत्यंतिक साधन तिनें न वापरल्यामुळें शेवटीं ती त्या संस्थेबरोबरच नियतीच्या विकराल दाढेखालीं पार रगडली गेली. या सचिवसंस्थेचें स्वरूप काय आहे तें महाभारताचे प्रणेते महर्षि व्यास यांच्या दिव्य प्रतिभेचा मागोवा घेत आपण पाहूं.

## राजर्षि भीष्म

राजर्षि भीष्मासंबंधानें अनेक प्रकारचे अपसमज पसरले आहेत. कोणी म्हणतात कीं म्हाताऱ्या शांतनूसाठीं ब्रह्मचर्याची भलतीच

---

व्याख्यान १६ वें, १७ वें व १८ वें दि. १२, १३ व १५ एप्रिल १९५१

प्रतिज्ञा करून त्यांनींच एकंदर कौरवकुलाचा नाश केला. जर भीष्मांनीं विवाह केला असता तर त्यांच्या विशुद्धतेमुळें त्यांना अत्यंत उत्कृष्ट संतति लाभून पुढें दुर्योधनासारख्या कुसंततीनें कौरव कुलाचें व त्याच्याबरोबर साऱ्या भारतवर्षाचें जें निसंतान झालें तें खात्रीनें झालें नसतें. या मुद्द्यावर 'भीष्मांची भयंकर भूल' या शीर्ष-काखालीं मागें एकदां एका सुप्रजाजननशास्त्राच्या आंधळ्या भक्तानें एक लेखही लिहिला होता. दुसऱ्या कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, द्रौपदीवस्त्रहरणाच्या वेळीं भीष्मांनीं मौन स्वीकारून सारा घात केला. त्यांच्या अंगांत अपार सामर्थ्य होतें. त्यांनीं उठून आपल्या बाहुबलानें राजा दुर्योधनाचा बंदोबस्त करून एका सतीची अब्रू कां वांचविली नाहीं ? जर त्यांनीं तसें केलें असतें तर पांड-वांचा वनवास टळून पुढें महाभारतीय युद्धापर्यंत जें प्रकरण शिजलें व त्यांत जो भयानक मानवसंहार झाला तो खात्रीनें झाला नसता. आणखी कित्येकांचें असें मत आहे कीं, भीष्मासारख्या पुरुषांनीं आपल्या जीवनांत उपजीविकेला अत्यंत महत्त्वाचें स्थान देऊन पैशासाठीं लाचारी स्वीकारावी ही गोष्ट अत्यंत अनुचित होय. वास्तविक सत्पक्ष जर पांडवांचाच होता व तशी भीष्मांचीही खात्री होती, तर त्यांनीं पांडवांच्याच पक्षाकडून लढणें व कौरवांसारख्या दुराचारी, कुलीन स्त्रियांची अब्रू घ्यावयास उठलेल्या नि लोकांचें राज्य गिळंकृत करूं पहाणाऱ्या लोकांना युद्धांत ठार मारावयास हवें होतें. त्याऐवजीं 'अर्थस्य पुरुषो दासः' 'मी पैशांचा दास आहे' असे लाचारीचे उद्गार काढून त्यांनीं पैशासाठीं दुर्योधनाचा पक्ष स्वीकारावा याच्याइतकी वाईट गोष्ट दुसरी कोणची असूं शकेल ? बरें, कौरवांचा पक्ष स्वीकारला तरी त्या पक्षाशीं तरी ते एकनिष्ठ राहिले काय ? तेथेंही त्यांच्या वागण्यांत किती तरी जरतरीपणाचा ( Ifs and buts ) प्रकार आहेच. ते लढतात पण पांडवांना मारणार नाहीं म्हणतच लढतात. मुख्य युद्धच जर कौरवपांडवांचें आहे तर त्यांना मात्र हात न लावतां इतरांसाठीं आपल्या महास्त्रांचा खाटिक-खाना उघडण्याचें त्यांना काय कारण ? दुसरें, शरीरानें दुर्योधना-कडून लढतों म्हणतात पण हिताचा सल्ला मात्र पांडवांच्या पक्षाला

देण्याचें पत्करतात. या दुटप्पी व दुहेरी वर्तनाचें समर्थन कसें होणार? शेवटीं ते इच्छामरणी असूनही आपल्या मरणाचा उपाय ते पांडवांना सांगून मोकळे होतात ही दुर्योधनाची वंचनाच नव्हे काय व भीष्मासारख्या महापुरुषांनीं ही वंचना काय म्हणून करावी ?

राजर्षि भीष्मांवर असलेल्या आरोपांचें स्वरूप सामान्यतः हें असें आहे. या आक्षेपांपैकीं बहुतेक आक्षेप केवळ महाभारत संहिता न वाचल्यामुळेंच उद्‌भवलेले आहेत, तर कांहीं वाचूनही विचार न केल्यामुळें उद्‌भवलेले आहेत. उदाहरणार्थ शांतनु हा वृद्ध होता व सत्यवती ही बाला होती असा महाभारतांत उल्लेख नाहीं. दुसरें लग्न करावयाच्या वेळीं मनुष्य वृद्धच असला पाहिजे हा एक अजब शोध आहे. त्यामुळें शांतनु–सत्यवती विवाह हें बाला–जरठ विवाहाचें उदाहरण समजण्याचें कांहीं एक कारण नाहीं. तसेंच " अर्थस्य पुरुषो दासः " यांतील अर्थ शब्दाचा अर्थ 'पैसा' असा करणें चुकीचें आहे ही साधी गोष्टही कां लक्षांत येऊं नये हें समजत नाहीं. प्रतिज्ञेसाठीं ज्यानें राज्य सोडलें त्याला पैशाचें महत्त्व कितीसें असेल हें स्पष्ट आहे. या सर्व आरोपांचा धुक्याचा पडदा नष्ट व्हावयास भीष्मांच्या चरित्राच्या सूर्यप्रकाशाकडेच वळणें अवश्य आहे.

## भीष्मांचें महत्त्व

स्वतः महाभारतकारांचें व भीष्मांच्या समकालीन सर्वश्रेष्ठ व्यक्तींचें भीष्मासंबंधीं काय मत आहे हें पहाणें अवश्य ठरेल. भगवान् श्रीकृष्ण हे भीष्मांच्या विरुद्ध बाजूला असलेले नेते असून त्यांच्या सेनापतित्वाच्या कालांत तिसऱ्या व नवव्या दिवशीं ते भीष्मांच्या अंगावर त्यांना ठार मारण्यासाठीं धांवून गेल्याचें महाभारतांत वर्णन आहे. 'मी भीष्मांना ठार मारतों' असें तर त्यांनीं वारंवार म्हटलें आहे. अशा व्यक्तीनें युधिष्ठिराला धर्मज्ञानाचा उपदेश करण्यासाठीं भीष्मांची निवड करावी यावरूनच त्यांची योग्यता केवढी थोर असली पाहिजे हें स्पष्ट होतें. शांतिपर्व हें महाभारतांतील सर्व पर्वांत अत्यंत श्रेष्ठ असून महाभारतकारांना जगाला जें विशिष्ट तत्त्वज्ञान द्यावयाचें आहे तें त्यांनीं शांतिपर्वाच्या

द्वारें दिलेलें आहे. या तत्त्वज्ञानाचे प्रवक्ते भीष्म आहेत हें ध्यानांत घेतलें म्हणजे महाभारतकारांच्या मतें ते किती श्रेष्ठ असले पाहिजेत हें आपोआपच स्पष्ट होतें. भीष्म निर्याण पावणार या कल्पनेनें अत्यंत दुःखी होऊन श्रीकृष्ण युधिष्ठिराजवळ त्यांच्या श्रेष्ठतेचें जें वर्णन करतात तें या दृष्टीनें पहाण्यासारखें आहे. ते म्हणतात :—

यस्य ज्यातलनिर्घोषं विस्फूर्जितमिवाशनेः ।
न सेहे देवराजोऽपि तमस्मि मनसा गतः ॥ १२
येनाभिजित्य तरसा समस्तं राजमण्डलम् ।
ऊढास्तिस्रस्तु ताः कन्यास्तमस्मि मनसा गतः ॥ १३
त्रयोविंशतिरात्रं यो योधायमास भार्गवम् ।
न च रामेण निस्तीर्णस्तमस्मि मनसा गतः ॥ १४
एकीकृत्येन्द्रियग्रामं मनः संयम्य मेधया ।
शरणं मामुपागच्छत्ततो मे तद्गतं मनः ॥ १५
यं गङ्गा गर्भविधिना धारयामास पार्थिव ।
वसिष्ठशिक्षितं तात तमस्मि मनसा गतः ॥ १६
दिव्यास्त्राणि महातेजा यो धारयति बुद्धिमान् ।
साङ्गांश्च चतुरो वेदांस्तमस्मि मनसा गतः ॥ १७
रामस्य दयितं शिष्यं जामदग्न्यस्य पाण्डव ।
आधारं सर्वविद्यानां तमस्मि मनसा गतः ॥ १८
स हि भूतं भविष्यच्च भवच्च भरतर्षभ ।
वेत्ति धर्मविदां श्रेष्ठं तमस्मि मनसा गतः १९
तस्मिन्हि पुरुषव्याघ्रे कर्मभिः स्वैर्दिवं गते ।
भविष्यति मही पार्थ नष्टचंद्रेव शर्वरी ॥ २०
तद्युधिष्ठिर गाङ्गेयं भीष्मं भीमपराक्रमम् ।
अभिगम्योपसंगृह्य पृच्छ यत्ते मनोगतम् ॥ २१
चातुर्विद्यं चातुर्होत्रं चातुराश्रम्यमेव च ।
राजधर्मांश्च निखिलान् पृच्छैनं पृथिवीपते ॥ २२
तस्मिन्नस्तमिते भीष्मे कौरवाणां धुरंधरे ।
ज्ञानान्यस्तं गमिष्यन्ति तस्मात्त्वां चोदयाम्यहम् ॥ २३

—महभारत, शांतिपर्व अध्याय ४६

"वज्राप्रमाणें अति भयंकर असलेला, ज्याच्या धनुष्याचा टणत्कार देवराज इंद्रालादेखील सहन होऊं शकला नाहीं, त्या भीष्मांचा मी विचार करीत होतों. ज्यानें आपल्या पराक्रमानें सर्व राजमंडलाचा पराभव करून काशी नगरींत तीन कन्यांचें हरण केलें, त्या भीष्मांचा मी विचार करीत होतों. तेवीस दिवस अहोरात्र ज्यानें परशुरामासारख्या विख्यात योद्धयाशीं युद्ध केलें व त्याला भग्नसंकल्प करून परत पाठविलें त्याचा मी विचार करीत होतों. सर्व इंद्रियांचें एकीकरण करून व बुद्धीनें मनाचा निरोध करून भीष्म मला शरण आले म्हणून माझेंही मन त्यांच्याकडे गेलें. गंगेनें गर्भांत ज्यांचें धारण केलें, साक्षात् वसिष्ठांजवळून ज्यांनीं विद्या ग्रहण केली, सांग चतुर्वेद व दिव्य अस्त्रें जे धारण करतात, जे सर्व विद्यांचे आधार व जामदग्न्य परशुरामांचे अत्यंत आवडते शिष्य आहेत, ज्यांना भूत, भविष्य व वर्तमानाचें संपूर्ण ज्ञान आहे व सर्व धर्मवेत्त्यांत जे अत्यंत श्रेष्ठ आहेत त्या भीष्मांचा मी विचार करीत होतों. पुरुषव्याघ्र भीष्म आपल्या महत्तम कर्मानें स्वर्गांत गेल्यावर ही संपूर्ण पृथ्वी चंद्रावांचूनच्या रात्रीप्रमाणें अंधकारमय होऊन जाईल. हे युधिष्ठिरा ! तूं भीमपराक्रम भीष्मांच्याकडे जा व जें कांहीं तुझ्या मनांत असेल तें त्यांना विचार. धर्मार्थकाममोक्ष, सर्व विद्या, त्रैवर्णिकांचीं सर्व कर्में, चारही आश्रमांचे धर्म व राजधर्म यांपैकीं तुला जें जें कांहीं त्यांना विचारावयाचें असेल तें तें तूं मोकळेपणानें विचार. कौरवधुरंधर भीष्म एकदां अस्तंगत झाले म्हणजे त्यांच्याबरोबर सर्व ज्ञानेंही अस्तंगत होणार आहेत. म्हणून मी तुला तेथें जाण्याची प्रेरणा देत आहें."

प्रत्यक्ष भीष्मांच्या दर्शनास गेल्यावर पुनश्च श्रीकृष्ण अधिकच शोकाकुल झाले. त्यांनीं त्या ठिकाणींही त्यांचें जें वर्णन केलें आहे तेंही असेंच त्यांच्या माहात्म्याचें सूचक आहे. श्रीकृष्ण म्हणतातः—

**ततो निशाम्य गाङ्गेयं शाम्यमानमिवानलम् ।**
**किंचिद्दीनमना भीष्ममिति होवाच केशवः ॥ १२**
**कच्चिज्ज्ञानानि सर्वाणि प्रसन्नानि यथा पुरा ।**
**कच्चिन्न व्याकुला चैव बुद्धिस्ते वदतां वर ॥ १३**

शराभिघातदुःखात्ते कच्चिद्गात्रं न दूयते ।
मानसादपि दुःखाद्धि शारीरं बलवत्तरम् ।। १४
वरदानात्पितुः कामं छन्दमृत्युरसिप्रभो ।
शान्तनोर्धर्मनित्यस्य न त्वेतन्मम कारणम् ।। १५
सुसूक्ष्मोऽपि तु देहे वै शल्यो जनयते रुजम् ।
किं पुनः शरसंघातैश्चित्तस्य तव पार्थिव ।। १६
कामं नैतत्तवाख्येयं प्राणिनां प्रभवाप्ययौ ।
उपदेष्टुं भवान् शक्तो देवानामपि भारत ।। १७
यच्च भूतं भविष्यं च भवच्च पुरुषर्षभ ।
सर्वं तज्ज्ञानवृद्धस्य तव भीष्म प्रतिष्ठितम् ।। १८
संहारश्चैव भूतानां धर्मस्य च फलोदयः ।
विदितस्ते महाप्राज्ञ त्वं हि धर्ममयो निधिः ।। १९
ऋते शान्तनवाद्भीष्मात्त्रिषु लोकेषु पार्थिव ।
सत्यधर्मान्महावीर्याच्छूराद्धर्मैकतत्परात् ।। २१
मृत्युमावार्य तपसा शरसंस्तरशायिनः ।
निसर्गप्रभवं किंचिन्न च तातानुशुश्रुम ।। २२
सत्ये तपसि दाने च यज्ञाधिकरणे तथा ।
धनुर्वेदे च वेदे च नीत्यां चैवानुरक्षणे ।। २३
अनृशंसं शुचिं दान्तं सर्वभूतहिते रतम् ।
महारथं त्वत्सदृशं न कञ्चिदनुशुश्रुम ।। २४
त्वं हि देवान्सगन्धर्वानसुरान् यक्षराक्षसान् ।
शक्तस्त्वेकरथेनैव विजेतुं नात्र संशयः ।। २५
स त्वं भीष्म महाबाहो वसूनां वासवोपमः ।
नित्यं विप्रैः समाख्यातो नवमोऽनवमो गुणैः ।। २६
अहं च त्वाऽभिजानामि यस्त्वं पुरुषसत्तम ।
त्रिदशेष्वपि विख्यातस्त्वं शक्त्या पुरुषोत्तमः ।। २७
मनुष्येषु मनुष्येन्द्र न दृष्टो न च मे श्रुतः ।
भवतो वा गुणैर्युक्तः पृथिव्यां पुरुषः क्वचित् ।। २८
त्वं हि सर्वगुणै राजन्देवानप्यतिरिच्यसे ।
तपसा हि भवाञ्शक्तः स्रष्टुं लोकाश्चराचरान् ।। २९

किं पुनश्चात्मनो लोकानुत्तमानुत्तमैर्गुणः ।
तदस्य तप्यमानस्य ज्ञातीनां संक्षयेन वै ।। ३०
ज्येष्ठस्य पाण्डुपुत्रस्य शोकं भीष्म व्यपानुद ।
ये हि धर्माः समाख्याताश्चातुर्वर्ण्यस्य भारत ।। ३१
चातुराश्रम्यसंयुक्तः सर्वे ते विदितास्तव ।
चातुर्विद्ये च ये प्रोक्ताश्चातुर्होत्रे च भारत ।। ३२
योगे सांख्ये च नियता ये च धर्माः सनातनाः ।
चातुर्वर्ण्यस्य यश्चोक्तो धर्मो न स्म विरुध्यते ।। ३३
सेव्यमानः सवैयाख्यो गाङ्गेय विदितस्तव ।
प्रतिलोमप्रसूतानां वर्णानां चैव यः स्मृतः ।। ३४
देशजातिकुलानां च जानीषे धर्मलक्षणम् ।
वेदोक्तो यश्च शिष्टोक्तः सदैव विदितस्तव ।। ३५
इतिहासपुराणार्थाः कार्त्स्न्येन विदितास्तव ।
धर्मशास्त्रं च सकलं नित्यं मनसि ते स्थितम् ।। ३६
ये च केचन लोकेऽस्मिन्नर्थाः संशयकारकाः ।
तेषां छेत्ता नास्ति लोके त्वदन्यः पुरुषर्षभ ।। ३७
स पाण्डवेयस्य मनःसमुत्थितं नरेंद्र शोकं व्यपकर्ष मेधया ।
भवद्विधा ह्युत्तमबुद्धिविस्तरा विमुह्यमानस्य नरस्य शान्तये ।। ३८

—महाभारत, शांतिपर्व अध्याय ५०

भीष्म विझत आलेल्या अग्नीप्रमाणें लवकरच इहलोक सोडून जाणार हें पाहून अस्वस्थ झालेले श्रीकृष्ण त्यांना म्हणाले, "आपली सर्व ज्ञान ग्रहण करणारीं इंद्रियें व निरनिराळ्या विषयांचें आपलें ज्ञान पूर्वीप्रमाणेंच प्रसन्न आहे काय? आपली बुद्धि व्याकूळ झालेली नाहीं ना? बाणांच्या आघातांच्या दुःखानें आपल्या अवयवांना आजही वेदना होत आहेत काय? हे प्रभो, धर्मनिष्ठ शांतनूच्या वरदानामुळें जरी आपण इच्छामरणी असलांत तरीही शरीराला सूक्ष्म जरी शल्य असलें तरी तें रोग उत्पन्न करतें व मनाला विकल करतें. मग आपल्या अंगांत तर बाणांचे समूहचे समूह रुतून बसले आहेत. अशा स्थितींत आपल्या अंतःकरणाला विकलता प्राप्त झाली असल्यास त्यांत नवल काय आहे? जन्म व मृत्यु हे प्राण्यांना सदैव

लागलेले आहेत व त्यांपासून कोणीही सुटूं शकत नाहीं, हें आपणांस कोणीही सांगावयाचें कारण नाहीं. देवांनादेखील उपदेश करण्याचें आपल्यांत सामर्थ्य आहे. हे ज्ञानवृद्ध भीष्मा! भूत, भविष्य व वर्तमानाचें सर्व ज्ञान आपल्या ठिकाणीं प्रतिष्ठित झालें आहे. जगताचा संहार व त्याची उत्पत्ति, धर्माचें स्वरूप, त्याचें उद्दिष्ट व परिणाम, या सर्वांचें आपणांस यथावत् ज्ञान असून आपण धर्माचे केवळ महानिधि आहांत. या सर्व त्रैलोक्यांत सत्यधर्म, महापराक्रमी शूर व धर्मैकतत्पर अशा शांतनव भीष्मावांचून मृत्यूला जिंकून बाणांच्या शय्येवर शयन करणारा आम्ही दुसरा कोणीही महापुरुष पाहिला नाहीं किंवा ऐकिला नाहीं. सत्य,तपश्चर्या,दान,यज्ञ,धनुर्वेद, वेद, नीति,आत्मसंरक्षणाचे उपाय, अभिजातता, पावित्र्य, जितेंद्रियता व सर्व लोकांचें कल्याण व्हावें यासाठीं सतत प्रयत्नशील असणें या सर्व बाबतींत आपल्या योग्यतेचा महापुरुष दुसरा कोणीहि आम्ही ऐकला नाहीं. आपण स्वतःच्या एकटयाच्या भरंवशावर देव, गंधर्व, दैत्य, यक्ष व राक्षस या सर्वांना जिंकावयास समर्थ आहांत. वसूंच्या मध्यें देवेंद्राप्रमाणें आपलें तेजस्वी स्थान आहे. आपल्या गुणांनीं आपण स्वर्गीय देवांहूनही अधिक श्रेष्ठ आहांत. आपल्या तपस्येच्या प्रभावानें नवी सृष्टि आपण उत्पन्न करूं शकाल. मग स्वतःसाठीं उत्तम गति मिळवाल यांत काय आश्चर्य आहे? मी बुद्धयाच आपणांकडे आलों आहें. ज्ञातीच्या संहारामुळें पाण्डुपुत्र युधिष्ठिराच्या अंतःकरणांत उद्‌भवलेला शोक आपण नष्ट करावा. सर्व धर्म व तत्त्वज्ञान, इतिहास व राजनीतिशास्त्र, किंबहुना ज्ञान या शब्दांत येणारें सर्व कांहीं आपणांस ज्ञात असून त्यासंबंधींचे सर्व संशय दूर करूं शकणारा आपल्यासारखा प्रभावी पुरुष दुसरा नाहीं. आपणासारखे पुरुष स्वतःच्या तेजस्वी बुद्धिमत्तेनें लोकांचे मोह दूर करावयासाठींच असतात.

भीष्मांवर श्रीकृष्णांचें इतकें प्रेम आहे कीं "तुम्हीं स्वतःच युधिष्ठिराचा संशय दूर कां करीत नाहीं" असें भीष्मांनीं श्रीकृष्णांना विचारल्यावर त्याचें श्रीकृष्णांनीं दिलेलें उत्तर अत्यंत मननीय आहे. तीं प्रश्नोत्तरेंच मी येथें देतों.

स्वयं किमर्थं तु भवान् श्रेयो न प्राह पाण्डवम् ।
किं ते विवक्षितं चात्र तदाशु वद माधव ।। २४

वासुदेव उवाच ।

यशसः श्रेयसश्चैव मूलं मां विद्धि कौरव ।
मत्तः सर्वेऽभिनिर्वृत्ता भावाः सदसदात्मकाः ।। २५
शीतांशुश्चंद्र इत्युक्ते लोके को विस्मयिष्यति ।
तथैव यशसा पूर्णे मयि को विस्मयिष्यति ।। २६
आधेयं तु मया भूयो यशस्तव महाद्युते ।
ततो मे विपुला बुद्धिस्त्वयि भीष्म समर्पिता ।। २७
यावद्धि पृथिवीपाल पृथ्वीयं स्थास्यति ध्रुवा ।
तावत्तवाक्षया कीर्तिर्लोकाननुचरिष्यति ।। २८
यच्च त्वं वक्ष्यसे भीष्म पाण्डवायानुपृच्छते ।
वेदप्रवाद इव ते स्थास्यते वसुधातले ।। २९
यश्चैतेन प्रमाणेन योक्ष्यत्यात्मानमात्मना ।
स फलं सर्वपुण्यानां प्रेत्य चानुभविष्यति ।। ३०
एतस्मात् कारणाद्भीष्म मतिर्दिव्या मया हि ते ।
दत्ता यशो विप्रथयेत् कथं भूयस्तवेति ह ।। ३१
यावद्धि प्रथते लोके पुरुषस्य यशो भुवि ।
तावत्तस्याक्षया कीर्तिर्भवतीति विनिश्चिता ।। ३२
राजानो हतशिष्टास्त्वां राजन्नभित आसते ।
धर्माननुयुयुक्षन्तस्तेभ्यः प्रब्रूहि भारत ।। ३३
भवान् हि वयसा वृद्धः श्रुताचारसमन्वितः ।
कुशलो राजधर्माणां सर्वेषामपराश्च ये ।। ३४
जन्मप्रभृति ते कश्चिद्वृजिनं न ददर्श ह ।
ज्ञातारं सर्वधर्माणां त्वां विदुः सर्वपार्थिवाः ।। ३५
तेभ्यः पितेव पुत्रेभ्यो राजन्ब्रूहि परं नयम् ।
ऋषयश्चैव देवाश्च त्वया नित्यमुपासिताः ।। ३६
तस्माद्वक्तव्यमेवेदं त्वयाऽवश्यमशेषतः ।
धर्मं शुश्रूषमाणेभ्यः पृष्टेन च सता पुनः ।। ३७

वक्तव्यं विदुषा चेति धर्ममाहुर्मनीषिणः ।
अप्रतिब्रुवतः कष्टो दोषो हि भविता प्रभो ॥ ३८
तस्मात्पुत्रैश्चपौत्रैश्च धर्मान्पृष्टान्सनातनान् ।
विद्वान् जिज्ञासमानैस्त्वं प्रब्रूहि भरतर्षभ ॥ ३९

—महाभारत, शांतिपर्व अध्याय ५४

" हे माधवा, तूं स्वतःच पांडवांना त्यांच्या कल्याणाचा उपदेश कां करीत नाहींस ? मी उपदेश करावा असें तुला कां वाटतें ? यावर भगवान् श्रीकृष्णांनीं असें उत्तर दिलें कीं, यश व श्रेय यांचें मूळ मी असून माझ्यापासूनच सर्व सदसदात्मक भाव उत्पन्न झाले आहेत. चंद्र शीतल आहे असें म्हणण्यांत ज्याप्रमाणें कोणालाही विस्मय वाटावयाचा नाहीं, त्याचप्रमाणें मी यशस्वी व कीर्तिमान् आहे असें म्हणण्यांतही माझ्या कीर्तीत कांहीं भर पडून कोणाला विस्मय वाटावा असें नाहीं. तुमचें यश वाढविणें हेंच माझें कर्तव्य आहे. म्हणून मी माझें लक्ष आपणावर केंद्रित केलें. जोंवर ही पृथ्वी आहे, तोंवर आपलें यश जगामध्यें अक्षय्य राहील. युधिष्ठिर आपणांस विचारीत असतां आपण त्याचें उत्तर म्हणून जें कांहीं बोलाल, तें वेदवाक्याप्रमाणें जगांत मान्यता पावेल व आपलें वचन प्रमाण मानून जो कोणी तदनुसार वर्तन करील त्याचें इह-परलोकीं कल्याण होईल. हे भीष्मा, या कारणास्तव मी दिव्य बुद्धिमत्ता आपल्याला दिली आहे. आपलें यश अधिक वाढावें अशी माझी इच्छा आहे. भारताच्या संहारकांडांतून जे राजे वांचले आहेत, त्यांना धर्मज्ञानाची अत्यंत आवश्यकता असून त्या हेतूनेंच ते आपणाकडे आले आहेत. आपण त्यांना अवश्य ज्ञान सांगितलें पाहिजे. आपण वयानें वृद्ध आहांत. प्रत्यक्ष क्रियावान् असून सर्व आचारधर्मांचें आपण यथावत् प्रतिपालन केलें आहे. राजधर्म व इतर सर्व धर्मशास्त्र यांच्यांत आपण पारंगत आहांत. आपण सर्व धर्मांचे ज्ञाते आहांत असा सर्व राजांचाही विश्वास आहे. साऱ्या जन्मांत कोणीसी आपला दोष काढूं शकणार नाहीं इतकें आपलें वर्तन पवित्र आहे. ऋषि व देव यांची आपण उपासना केली आहे. म्हणून पित्यानें पुत्राला करावा असा आपण या सर्वांना उपदेश करा.

विद्वानानें लोकांना उपदेश करावा असें बुद्धिमंतांचें म्हणणें आहे. हें आपलें कर्तव्य विद्वानानें जर न पार पाडलें तर तो त्याचा दोष समजला जातो. हे आपले पुत्रपौत्र धर्म जाणण्याच्या इच्छेनें आपल्या सभोंवार बसले आहेत. आपण त्यांना उपदेश करा."

भगवान् श्रीकृष्णांनीं भीष्मांच्या बाबतींत काढलेले हे उद्गार त्यांच्या योग्यतेवर पूर्णपणें प्रकाश टाकतात. भगवान् श्रीकृष्णां-सारखा पूर्णावतारी युगपुरुष ज्याच्यासंबंधीं "जन्मप्रभृति ते कश्चिद् वृजिनं न ददर्श ह।" साऱ्या जीवनांत ज्याचा दोष म्हणून नाहींच असे उद्गार काढतो त्या व्यक्तीची विशुद्धता व योग्यता केवढी श्रेष्ठ असली पाहिजे!

## भीष्मांची दिव्य जन्मकथा

भीष्म हे महाभारतकालीं शेवटचे शुद्ध क्षत्रिय असून देवी गंगा व राजे शांतनु यांचे ते पुत्र होत. ब्रह्मलोकांत गंगादेवी एके दिवशीं ब्रह्मदेवांच्या दर्शनासाठीं गेली असतां वाऱ्यानें तिचा पदर उडूं लागला. सर्व सभासदांनीं खालीं माना घातल्या पण भान न राहून तेथें असलेल्या महाभिष नांवाच्या राजानें मात्र तिच्याकडे निःशं-कपणें पाहिलें. गंगाही क्षणभर त्याच्याकडे पाहूं लागली. ब्रह्म-लोकासारख्या कामगंधहीन नि मोहातीत अशा स्थानीं क्षणभर कां होईना हा प्रकार होणें अनिष्ट वाटल्यामुळें भगवान् ब्रह्मदेवानें त्याला शाप दिला कीं, तूं पुनश्च मर्त्य लोकीं जा. तेथें पत्नी या नात्यानें गंगा तुला मिळेल. ती तुझें अप्रिय करील व त्याचा तुला राग आल्यावर तूं पुनश्च येथें येशील. हा महाभिष पृथ्वीवर शांतनु या नांवानें उत्पन्न झाला. देवी गंगा शापानुरूप भूतलावर येत असतां रस्त्यांत तिची व अष्ट वसूंची भेट झाली. वसिष्ठांचा कांहीं अपराध केल्यामुळें ह्या अष्ट वसूंना त्यांनीं पृथ्वीवर येण्याचा शाप दिला होता. त्यांनीं गंगेला असें सांगितलें कीं, आम्हांला पृथ्वीवर यावेंच लागणार आहे. मात्र मानुषी स्त्रीच्या गर्भांत राहण्याची आमची इच्छा नसल्यामुळें तूं आम्हांला जन्म द्यावास अशी आमची इच्छा आहे. मात्र आम्ही जन्मतांच तूं आम्हांला

पाण्यांत बुडवून टाक. कारण तेथें रहाण्याची आमची इच्छा नाहीं. गंगेनें त्यांना त्यांच्या इच्छेनुसार करण्याचें वचन दिलें. मात्र तिनें त्यांना असें सांगितलें कीं, माझ्यासारखी देवी पत्नी या नात्यानें मिळून राजा शांतनु निपुत्रिक राहावा ही गोष्ट मला सर्वथा इष्ट नाहीं. तरी तुम्हां सर्वांच्या अंशापासून उत्पन्न झालेला एक दीर्घायु पुत्र मी त्या राजाला द्यावा, असें तुम्ही मान्य केलें पाहिजे. त्या सर्वांनीं ती गोष्ट मान्य केली. पुढें शांतनूची पत्नी म्हणून गंगा राहूं लागल्यावर तिनें वसूंना दिलेलें वचन पाळण्यासाठीं राजाला अशी अट घातली कीं, तूं माझ्या कोणत्याही कामांत अडथळा करूं नयेस. पुढें सर्व प्रकारें गंगा राजाचें प्रिय करी; पण पुत्र झाला कीं ती त्याला पाण्यांत बुडवून नष्ट करी. राजाला या गोष्टीचें अत्यंत वाईट वाटे. पण दिलेलें वचन पाळण्यासाठीं तो तिला कांहींही बोलत नसे. आठवा पुत्र होतांच राजानें तिला तो तरी बुडवूं नकोस म्हणून प्रार्थना केली. गंगेनें त्याला सांगितलें कीं, हा पुत्र तुला चिरकाल लाभेल. मात्र तूं आपलें वचन मोडलें असल्यामुळें मी जातें! शांतनु अतिशय शोकाकुल होतांच, गंगेनें त्याला आपला सर्व वृत्तान्त सांगितला व वसूंचें वरदान सांगून त्याचा शोक दूर केला. तात्पर्य भीष्म हे गंगा व शांतनू यांचे महान् दैवी अंश असलेले पुत्र आहेत. त्यांच्या पित्याचें वर्णन महाभारतांत पुढीलप्रमाणें आहे:—

**स राजा शान्तनुर्धीमान्देवराजर्षिसत्कृतः ।**
**धर्मात्मा सर्वलोकेषु सत्यवागिति विश्रुतः ।। १**
**दमो दानं क्षमा बुद्धिर्ह्रीर्धृतिस्तेज उत्तमम् ।**
**नित्यान्यासन्महासत्त्वे शान्तनौ पुरुषर्षभे ।। २**
**एवं स गुणसंपन्नो धर्मार्थकुशलो नृपः ।**
**आसीद्भरतवंशस्य गोप्ता सर्वजनस्य च ।।३**
**तस्य कीर्तिमतो वृत्तमवेक्ष्य सततं नराः ।**
**धर्म एव परः कामादर्थाच्चेति व्यवस्थिताः ।। ५**
**न चास्य सदृशः कश्चिद्धर्मतः पार्थिवोऽभवत् ।। ६**
**वर्तमानं हि धर्मेषु सर्वधर्मभृतां वरम् ।**
**तं महीपा महीपालं राजराज्येऽभ्यषेचयन् ।। ७**

**वीतशोकभयाबाधा सुखस्वप्ननिबोधनाः ।**
**पतिं भारतगोप्तारं समपद्यन्त भूमिपाः ।। ८**
**स देवराजसदृशो धर्मज्ञः सत्यवागृजुः।**
**दानधर्मतपोयोगाच्छ्रिया परमया युतः ।। १३**
**अरागद्वेषसंयुक्तः सोमवत्प्रियदर्शनः ।**
**तेजसा सूर्यकल्पोऽभूद्वायुवेगसमो जवे ।।**
**अन्तकप्रतिमः कोपे क्षमया पृथिवीसमः ।। १४**
**वधः पशुवराहाणां तथैव मृगपक्षिणाम् ।**
**शान्तनौ पृथिवीपाले नावर्तत तथा नृप ।। १५**
**ब्रह्मधर्मोत्तरे राज्ये शान्तनुर्विनयात्मवान् ।**
**समं शशास भूतानि कामरागविवर्जितः ।। १६**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १००

शांतनू राजा अत्यन्त बुद्धिमान् असून देव व राजर्षि यांचा त्याच्याविषयीं अत्यन्त आदर असे. धर्मात्मा व सत्यसंध अशी त्याची कीर्ति असे. जितेंद्रियता, दान, क्षमा, बुद्धि, अभिजातता, धैर्य, तेज व सामर्थ्य हे त्याचे नैसर्गिक गुण होते. त्याच्या वेळीं त्याच्या एवढा श्रेष्ठ धर्मनिष्ठ राजा कोणीही नसल्यामुळें भारतवर्षांतील सर्व राज्यसत्तांनीं त्याचें चारित्र्य व सद्गुण पाहून स्वतः होऊनच त्याला सम्राटपदावर अभिषेक करून नियुक्त केलें होतें. त्याच्या अंतःकरणांत रागद्वेषादि विकारांना मुळींच थारा नसे. चंद्राप्रमाणें त्याचें दर्शन सर्वांना आल्हादकर असून तो तेजानें सूर्यासारखा, वेगांत वायूसारखा, क्रोधांत यमाप्रमाणें भयानक, व क्षमेनें पृथ्वीसारखा होता. माणसें तर लांबच राहिलीं, पण शांतनूच्या राज्यांत मृगपक्ष्यांचा देखील व्यर्थ वध कधींही झाला नाहीं. आपण होऊन लोकांनीं ज्याला सम्राट केलें व तेही बळाच्या धाकानें नसून चारित्र्य व कर्तव्यनिष्ठा या दोन सद्गुणांवर लुब्ध होऊन केलें, त्या महनीय व्यक्तीच्या योग्यतेविषयीं काय वर्णन करावें? म्हणून भीष्मांना आपल्या पित्याचा अत्यन्त अभिमान असे. तो महाभारतांत त्यांनीं ठिकठिकाणीं व्यक्त केला असून स्वतःला शांतनव म्हणविण्यांत

त्यांना किती गौरव वाटत असे याची त्यावरून कल्पना येते. अशा या महनीय व्यक्तीचा पुत्र म्हणवून घेण्याचें भाग्य लाभलेले भीष्म पित्याप्रमाणेंच सत्यसंध व धर्मनिष्ठ राहिले असल्यास ते 'प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्' अशाच स्वरूपाचे आहेत. आणि त्यांच्या मातेविषयीं काय लिहावें ? गंगा हा शब्द भारतीय वाङमयांत पावित्र्याचा वाचक झालेला आहे. अपार क्षमा, व असीम शुद्धता यांनीं देवी गंगा भारतीय वाङमयाचा सदाचा अलंकार झालेली असून हें नांव म्हणजे निष्कलंकतेचा पर्याय शब्द आहे. आपल्या या दिव्य मातेकडून भीष्मांना प्रखर पावित्र्य व अलौकिक शील यांची देणगी मिळालेली होती. गंगा अंतर्धान पावतांना शांतनूला आश्वासन देऊन आपल्या पुत्राला विद्या व धनुर्वेद यांत निष्णात करावें म्हणून ती स्वतःबरोबर देवलोकीं घेऊन गेली होती. पुढें एके दिवशीं राजा शांतनु नदीतीरावरून फिरत असतां त्याला गंगेच्या पाण्याचा सर्व प्रवाह अवरुद्ध झाल्याचें दिसून आलें. तो प्रवाह कशामुळें अवरुद्ध झाला म्हणून तो शोधूं लागल्यावर त्याला असें आढळून आलें कीं एक दिव्य रूपसंपन्न कुमार आपल्या महास्त्रांच्या सामर्थ्यानें प्रवाहाचा अवरोध करीत आहे. त्याचा तो प्रभाव पाहून शांतनु विस्मित झाला. तोंच देवी गंगा तेथें प्रकट झाली व हा तुझाच कुमार असून त्याचें विद्याध्ययन पूर्ण झालें असल्यामुळें मी तो तुझ्या स्वाधीन करतें असें म्हणून गंगेनें त्या कुमाराला राजाच्या स्वाधीन केलें. चिर विरहानंतर मुलगा लाभल्याचा राजाला केवढा अपूर्व आनंद झाला असेल ?

## भीष्मांची दिव्य गुरुपरंपरा

राजर्षि भीष्म आपल्या अलौकिक आईच्या खास निरीक्षणाखालीं ज्यांच्याजवळ विद्यांचा अभ्यास करीत होते त्यांची परंपरा महाभारतांत उल्लेखिलेली आहे. या कुमाराचें शिक्षण कोणाजवळ नि कसें पूर्ण केलें हें शांतनूला सांगत असतां गंगा म्हणते :—

**यं पुत्रमष्टमं राजंस्त्वं पुरा मय्यविन्दथाः**
**स चायं पुरुषव्याघ्र सर्वास्त्रविदनुत्तमः ।। ३३**

गृहाणेमं महाराज मया संवर्धितं सुतम् ।
आदाय पुरुषव्याघ्र नयस्वैनं गृहं विभो ।। ३४
वेदानधिजगे साङ्गान्वसिष्ठादेष वीर्यवान् ।
कृतास्त्रः परमेष्वासो देवराजसमो युधि ।। ३५
सुराणां संमतो नित्यमसुराणां च भारत ।
उशना वेदयच्छास्त्रमयं तद्वेद सर्वशः ।। ३६
तथैवाङ्गिरसः पुत्रः सुरासुरनमस्कृतः ।
यद्वेद शास्त्रं तच्चापि कृत्स्नमस्मिन्प्रतिष्ठितम् ।। ३७
तव पुत्रे महाबाहौ साङ्गोपाङ्गं महात्मनि ।
ऋषिः परैरनाधृष्यो जामदग्न्यः प्रतापवान् ।। ३८
यदस्त्रं वेद रामश्च तदेतस्मिन्प्रतिष्ठितम् ।
महेष्वासमिमं राजन्राजधर्मार्थकोविदम् ।। ३९
मया दत्तं निजं पुत्रं वीरं वीर गृहं नय ।

—महाभारत, आदिपर्व अध्याय १००

हे राजन् ! जो माझा आठवा पुत्र पूर्वी तू पहिला होतास, तोच हा आहे. हा सर्व अस्त्रांचा ज्ञाता आहे. वसिष्ठापासून यानें साङ्गवेदांचें अध्ययन केलेलें असून हा देवराजाप्रमाणें पराक्रमी आहे. योद्धा या नात्यानें देव व दैत्य यांच्यांत हा सारखीच मान्यता पावलेला आहे. देवगुरु बृहस्पति व दैत्यगुरु शुक्राचार्य यांना जें ज्ञान आहे तें सर्व याच्या ठिकाणीं प्रतिष्ठित झालें आहे. कोणीही ज्यांचें धर्षण करूं शकत नाहीं असे परमप्रतापी जामदग्न्य परशुराम यांना जें महास्त्रांचें ज्ञान आहे तें याच्या ठिकाणीं सर्व प्रकारें सुप्रतिष्ठित झालें आहे. मी हा मुलगा तुला देतें. याला तूं घेऊन जा." तात्पर्य भीष्म हे वसिष्ठ, बृहस्पति, शुक्राचार्य व परशुराम अशा अलौकिक गुरूंचे शिष्य होते.

## राजा या नात्यानें भीष्मांची योग्यता

त्या पुत्राला घरीं घेऊन जाऊन शांतनूनें यौवराज्याचा अभिषेक केला. पुढें राज्य सोडलेल्या भीष्मांची राजा या नात्यानें किती अलौकिक योग्यता होती व त्यांनीं जर सिंहासनावरील आपला

अधिकार सोडला नसता तर ते केवढे थोर राजे झाले असते याचें वर्णन महाभारतांत एका ठिकाणीं आलें आहे. विचित्रवीर्याच्या मृत्यूनंतर धृतराष्ट्र, पाण्डु व विदुर हे लहान असतां भीष्मावर त्यांच्या संगोपनाची व अधिकारसूत्रें हातीं वागवून प्रत्यक्ष राज्य चालविण्याची कित्येक वर्षें जबाबदारी येऊन पडली होती. ती त्यांनीं किती उत्कृष्टपणें संभाळली यांचें महाभारतांत पुढीलप्रमाणें वर्णन आलें आहे. :—

**ऊर्ध्वसस्याऽभवद्भूमिः सस्यानि रसवन्ति च ।**
**यथर्तुवर्षी पर्जन्यो बहुपुष्पफला द्रुमाः ॥ २**
**वाहनानि प्रहृष्टानि मुदिता मृगपक्षिणः ।**
**गन्धवन्ति च माल्यानि रसवन्ति फलानि च ॥ ३**
**वणिग्भिश्चान्वकीर्यन्त नगराण्यथ शिल्पिभिः ।**
**शूराश्च कृतविद्याश्च सन्तश्च सुखिनोऽभवन् ॥ ४**
**नाभवन्दस्यवः केचिन्नाधर्मरुचयो जनाः ।**
**प्रदेशेष्वपि राष्ट्राणां कृतं युगमवर्तत ॥ ५**
**धर्मक्रिया यज्ञशीलाः सत्यव्रतपरायणाः ।**
**अन्योन्यप्रीतिसंयुक्ता व्यवर्धन्त प्रजास्तदा ॥ ६**
**मानक्रोधविहीनाश्च नरा लोभविवर्जिताः ।**
**अन्योऽन्यमभ्यनन्दन्त धर्मोत्तरमवर्तत ॥ ७**
**तन्महोदधिवत्पूर्णं नगरं वै व्यरोचत ।**
**द्वारतोरणनिर्यूहैर्युक्तमभ्रचयोपमैः ॥ ८**
**प्रासादशतसंबाधं महेन्द्रपुरसंनिभम् ।**
**नदीषु वनखण्डेषु वापीपल्वलसानुषु ।**
**काननेषु च रम्येषु विजह्रुर्मुदिता जनाः ॥ ९**
**उत्तरैः कुरुभिः सार्धं दक्षिणाः कुरवस्तथा ।**
**विस्पर्धमाना व्यचरंस्तथा देवर्षिचारणैः ॥ १०**
**नाभवत्कृपणः कश्चिन्नाभवन्विधवाः स्त्रियः ।**
**तस्मिञ्जनपदे रम्ये कुरुभिर्बहुलीकृते ॥ ११**
**कूपारामसमावाप्यो ब्राह्मणावसथास्तथा ।**
**बभूवुः सर्वधियुतास्तस्मिन् राष्ट्रे सदोत्सवाः ॥ १२**

**भीष्मेण धर्मतो राजन्सर्वतः परिरक्षिते ।**
**बभूव रमणीयश्च चैत्ययूपशताङ्कितः ।। १३**
**स देशः परराष्ट्राणि विमृज्याभिप्रवर्धितः ।**
**भीष्मेण विहितं राष्ट्रे धर्मचक्रमवर्तत ।। १४**

—महाभारत, आदिपर्व अ. १०९

"जमीन जणूं कीं काय आपलीं पिकें वर आणून देत होती. धान्य सुस्वादु असे. पाऊस ज्या दिवसांत यावयाचा त्याच दिवसांत येई. झाडें फळांनीं व पुष्पांनीं नेहमीं बहरलेलीं दिसत. मृग व पक्षी आनंदित दिसत. वाहतुकीचीं जनावरें उत्साहित दिसत. फुलें सुगंधी व फळें रसयुक्त रहात. व्यापारी नि शिल्पकार यांनीं नगरें गजबजलेलीं दिसत. शूर, व विद्वान असे सज्जन अत्यंत सुखांत दिसत. प्रजेंतील कोणालाही कर्तव्यपराङमुखता आवडत नसे. दुसऱ्याच्या वस्तूंचा अपहार करणारे कोणीही लोक नव्हते. सर्व राष्ट्रामध्यें जणूं काय कृतयुग उत्पन्न झालें आहे असें वाटावें इतकी प्रजांची मानसिक व आर्थिक सुबत्तेची परिस्थिति झालेली होती. कर्तव्य ओळखून तदनुसार आचरण करणारे, यज्ञशील, सत्यव्रतपरायण, व एकमेकांवर प्रेम करणारे असेच प्रजेंतील सर्व लोक दिसून येत. ह्यामुळें आपोआपच सर्व बाजूंनीं त्यांची भरभराट होत चालली होती. मान, क्रोध, लोभ, यांना अंतःकरणांत मुळींच थारा न देणारे व एकमेकांच्या उत्कर्षाचीच चिंता वाहणारे असे लोक असल्यामुळें जणूं प्रत्यक्ष धर्मयुगच उत्पन्न झालेलें होतें. नगर नाना प्रकारच्या गोपुरांनीं व प्रासादांनीं सुशोभित असून स्वर्गाप्रमाणें तें वैभवपूर्व व अलंकृत केलेलें भासत असे. सुरक्षिततेची भावना व तिच्यापोटीं येणारा निर्धास्तपणा इतका होता कीं नदी, अरण्यें, पाणपोया, पर्वतशिखरें इत्यादि सर्व ठिकाणीं लोक निर्भयपणें, आनंदानें विहार करीत असत. सर्व जणूं कीं काय आपल्या वर्तनानें उत्तर कुरूंच्या देवभूमीशींच स्पर्धा करणारे आहेत असें वाटत असे. त्यांच्या राष्ट्रांत कोणीही वृत्तीनें क्षुद्र वा परिस्थितीनें गांजलेला असा दृष्टोत्पत्तीस येत नव्हता. त्याचप्रमाणें विधवा स्त्रीही त्या राज्यांत कोठें दृष्टीस पडत नव्हती. सर्व प्रकारच्या समृद्धीनें राष्ट्र सदैव भरलेलें असल्या-

मुळें तेथें नित्य उत्सव व नित्य मंगल चालत असे. भीष्मानें त्या राष्ट्राच्या सूत्रधाराची भूमिका पत्करून ज्यावेळीं संरक्षण चालविलें होतें त्यावेळीं सर्व बाजूंनीं या प्रकारें समृद्धि होऊन शासनसंस्थेच्या द्वारें व प्रजांच्या वर्तनांतून नेहमींच असें वाटावें कीं प्रत्यक्ष धर्माचेंच येथें राज्य सुरूं आहे."

भारतीय संस्कृतीच्या दृष्टीनें सर्वांत आदर्श असें जें रामराज्य त्याचें महर्षि वाल्मीकीय रामायणांत जें वर्णन आढळतें त्यांत आणि भीष्मांच्या राज्याच्या वर्णनांत काय भेद आहे ? परिस्थिति नेतृत्व उत्पन्न करते कीं नेतृत्व परिस्थिति उत्पन्न करते या प्रश्नचिन्हांसंबंधीं समाजशास्त्रज्ञांमध्यें निरनिराळे वादविवाद आजही प्रचलित असून त्यांनीं वाङ्मयाची पुष्कळच जागा नेहमींच अडते. भारतीयांचा या संबंधांत असा सिद्धान्त आहे कीं, परिस्थिति नेतृत्व उत्पन्न करीत नसून नेतृत्वच परिस्थिति उत्पन्न करीत असतें. नव्या इतिहास-प्रक्रियेचे पुरस्कर्ते जे मार्क्सवादी ते जरी परिस्थितीच नेतृत्व उत्पन्न करते असें कितीही हट्टाग्रहानें सांगत असले तरी त्यांच्या स्वतः-च्याच इतिहासाची साक्ष त्या गोष्टीच्याविरुद्ध आहे. " कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम्। इति ते संशयो माऽभूत् राजा कालस्य कारणम् ॥" हीच गोष्ट खरी आहे. कृतयुग ही सामाजिक विकसनाची अवस्था उत्पन्न करण्यासाठीं राजानें झटावें व जो हें ध्येय प्राप्त करून घेईल त्यानें राज्यसंस्थेचा सूत्रधार या नात्यानें आपलें कर्तव्य परिपूर्णपणें पार पाडलें असें शांतिपर्वांतील राज-धर्माच्या प्रकरणांत भीष्माचार्यांनीं जें प्रतिपादन केलें आहे तें या प्रकारें प्रत्यक्ष त्यांनीं स्वतः आचरून दाखविलें होतें असें दिसतें. भीष्म जर सिंहासनाधीश्वर राजे झाले असते तर ते किती थोर राजे झाले असते हें यावरून स्पष्ट होतें. भीष्मांची ज्ञानी पुरुष या दृष्टीनें केवढी योग्यता होती, तपस्या नि धार्मिकता यांचा ते मूर्त आविष्कारच कसा होते हें भगवान श्रीकृष्णांचे त्यांच्याविषयींचे शांतिपर्वांतील जे उद्‌गार मी उद्‌धृत केले आहेत त्यांवरूनच प्रत्ययास येतें. म्हणून त्यासंबंधीं वेगळ्या स्पष्टीकरणाची आवश्यकता नाहीं. या सर्व गोष्टी असल्या म्हणजे मनुष्य उत्तम राजा होईल असें मात्र नाहीं. या

सर्व गोष्टी असून शिवाय सिंहासारखा पराक्रम, व अपार सामर्थ्य असेल तरच ती राजसत्ता खरी टिकाऊ होते. भीष्मांच्या ठिकाणीं असा अपार पराक्रम असून ते महान् सामर्थ्यसंपन्न होते. कठोर कर्तव्यनिष्ठा, कोणचीही शक्ति आड आली तरी तिला भीक न घालण्याची निर्भय नि मृत्युंजय प्रवृत्ति, प्रभावपूर्ण कुलाभिमान व जाज्वल्य धर्मनिष्ठा हे त्यांचे विशेष होत. तळपत्या क्षात्रतेजामुळें भीष्म कोणासमोरही कधींच वाकले नाहींत. त्यांच्या या सर्व वैशिष्ट्याचें व्यक्तीकरण जामदग्न्य परशुरामाशीं त्यांचें जें भीषण युद्ध झालें त्यांतून दृष्टोत्पत्तीस येतें. याच त्यांच्या प्रखर पराक्रमानें जगाचे दिक्कोन गर्जून उठले व पराक्रमी लोकांत त्यांचें नांव अग्रगण्य म्हणून विख्यात झालें.

## एक विचित्र प्रसंग

भीष्मांचे वडील राजे शांतनु यांना त्यांच्या द्वितीय विवाहापासून चित्रांगद नि विचित्रवीर्य अशीं दोन मुलें झालीं. त्यांपैकीं चित्रांगद हा त्याच नांवाच्या एका गंधर्वाकडून मारला गेला व अल्पवयी विचित्रवीर्याला भीष्मांनीं गादीवर बसविलें. विचित्रवीर्याच्या विवाहासाठीं भीष्म मुली शोधूं लागले असतां त्यांना असें कळलें कीं, काशी नगरीच्या राजाला तीन मुली असून त्या तिन्ही मुली अत्यंत सुंदर, सुलक्षणसंपन्न व कौरवांच्या राजघराण्यांत वधू म्हणून शोभण्यासारख्या आहेत. काशिराजानें आपल्या मुलींचें स्वयंवर मांडलें होतें. त्या स्वयंवरासाठीं अधिकांत अधिक पराक्रमी जो असेल त्यानेंच त्या मुलींना वरावें असा संकेत होता. भीष्म त्या ठिकाणीं जाऊन पोंचले व जमलेल्या सर्व राजांसमक्ष त्यांनीं त्या मुलींना आपल्या रथांत घातलें. सर्व राजमंडळ संतप्त होऊन 'मारा, मारा भीष्माला ठार करा' असा एकच आक्रोश करीत त्यांच्या अंगावर तुटून पडलें. पण एकट्या भीष्मांनीं त्यांच्या त्या आक्रमणाचा सारा दर्प उतरवून व रक्ताचे पूर वाहवून त्यांचा पूर्णपणें पराभव केला. त्यानंतर शाल्व नांवाचा एक राजा त्यांच्याशीं निकराचे द्वंद्वयुद्ध करण्यास्तव आला. भीष्मांनीं लवकरच त्याला विरथ व विशस्त्र करून

बंदिवान केलें. वास्तविक त्यांनीं त्याला ठारच मारलें असतें. पण मेलेल्याला अधिक मारण्यांत अर्थ काय ? म्हणून त्यांनीं त्याला जीवदान दिलें. त्या तिन्ही मुली घेऊन भीष्म आपल्या राजधानींत परत आले व सत्यवतीच्या स्वाधीन त्या मुली करून विचित्र-वीर्याच्या विवाहाची त्यांनीं सिद्धता चालविली. पण ऐन विवाहाच्या प्रसंगीं त्या तीन मुलींपैकीं सर्वांत वडील मुलगी जी अम्बा ती भीष्मांना असें म्हणूं लागली कीं :—

सत्यवत्यास्त्वनुमते विवाहे समुपस्थिते ।
उवाच वाक्यं सव्रीडा ज्येष्ठा काशिपतेः सुता ॥ ४
भीष्म त्वमसि धर्मज्ञः सर्वशास्त्रविशारदः ।
श्रुत्वा च वचनं धर्म्यं मह्यं कर्तुमिहार्हसि ॥ ५
मया शाल्वपतिः पूर्वं मनसाऽभिवृतो वरः ।
तेन चास्मि वृता पूर्वं रहस्यविदिते पितुः ॥ ६
कथं मामन्यकामां त्वं राजधर्ममतीत्य वै ।
वासयेथा गृहे भीष्म कौरवः सन् विशेषतः ॥ ७
एतद् बुद्ध्या विनिश्चित्य मनसा भरतर्षभ ।
यत् क्षमं ते महाबाहो तदिहारब्धुमर्हसि ॥ ८
स मां प्रतीक्षते व्यक्तं शाल्वराजो विशांपते ।
तस्मान्मां त्वं कुरुश्रेष्ठ समनुज्ञातुमर्हसि ॥ ९
कृपां कुरु महाबाहो मयि धर्मभृतां वर ।
त्वं हि सत्यव्रतो वीर पृथिव्यामिति नः श्रुतम् ॥ १०

—महाभारत, उदद्योगपर्व अध्याय १७४

" नंतर सत्यवतीच्या अनुमतीनें विवाह ठरल्यावर त्या मुलींपैकीं ज्येष्ठ जी अंबा ती भीष्मांना असें म्हणूं लागली कीं, हे भीष्मा, तूं धर्मज्ञ असून सर्वशास्त्रविशारद आहेस. मी तुला जें सांगतें तें करणें हें तुझें कर्तव्य आहे. मी मनानें पूर्वींच शाल्व राजाला वरलें असून त्यानेंही मनानें पूर्वींच मला वरलें आहे. माझ्या पित्याला माहीत नसतांनाच एकांतांत आम्ही परस्परांस वचनें दिलीं. अशा स्थितींत मनानें दुसऱ्यावर प्रेम करणाऱ्या मुलीला तूं कुलवंत कौरव असतांना राजधर्माचें उल्लंघन करून आपल्या घरीं कसें ठेवूं इच्छि-

तोस ? माझ्या या म्हणण्याचा योग्य विचार करून तुला जें हवें तें तूं करूं शकतोस. राजा शाल्व माझी निश्चित प्रतीक्षा करीत असेल. अशा स्थितींत मला तिकडे गेलेंच पाहिजे. धार्मिक लोकांत तूं अत्यंत श्रेष्ठ आहेस. सत्यसंध म्हणून सर्व जगांत तुझी कीर्ति पसरलेली आहे. तूं माझ्यावर कृपा कर."

भीष्मानें तिचें म्हणणें ऐकून तिची शाल्वाकडे रवानगी केली. पुढें जो प्रसंग उद्भवला त्यांत भीष्म वस्तुतः पूर्णपणें कसे निर्दोषी होते हें स्पष्ट व्हावें म्हणून व कांहीं लोक भीष्मांवर या प्रकरणांत जो दोषारोप करतात तो कसा पूर्णपणें चुकीचा आहे हें ध्यानांत यावें म्हणून महाभारतांत या प्रकरणासंबंधीं पुढें काय घडलें तें सांगणारा जो परिच्छेद आहे तोच मी येथें उद्धृत करतों. भीष्म उद्योगपर्वांत स्वतःच हा वृत्तान्त दुर्योधनाला सांगतांना म्हणतात :—

ततोऽहं समनुज्ञाप्य कालीं गन्धवतीं तदा ।
मन्त्रिणश्चर्त्विजश्चैव तथैव च पुरोहितान् ।। १
समनुज्ञासिषं कन्यामम्बां ज्येष्ठां नराधिप ।
अनुज्ञाता ययौ सा तु कन्या शाल्वपतेः पुरम ।। २
वृद्धैर्द्विजातिभिर्गुप्ता धात्र्या चानुगता तदा ।
अतीत्य च तमध्वानमासाद्य नृपतिं तथा ।। ३
सा तमासाद्य राजानं शाल्वं वचनमब्रवीत् ।
आगताऽहं महाबाहो त्वामुद्दिश्य महामते ।। ४
तामब्रवीच्छाल्वपतिः स्मयन्निव विशांपते ।
त्वयाऽन्यपूर्वया नाहं भार्यार्थी वरवर्णिनि ।। ५
गच्छ भद्रे पुनस्तत्र सकाशं भीष्मकस्य वै ।
नाहमिच्छामि भीष्मेण गृहीतां त्वां प्रसह्य वै ।। ६
त्वं हि भीष्मेण निर्जित्य नीता प्रीतिमतो तदा ।
परामृश्य महायुद्धे निर्जित्य पृथिवीपतीन् ।। ७
नाहं त्वय्यन्यपूर्वायां भार्यार्थी वरवर्णिनि ।
कथमस्मद्विधो राजा परपूर्वां प्रवेशयेत् ।। ८
नारीं विदितविज्ञानः परेषां धर्ममादिशन् ।
यथेष्टं गम्यतां भद्रे मा त्वां कालोऽत्यगादयम् ।। ९

अम्बा तमब्रवीद्राजन्ननङ्गशरपीडिता ।
नैवं वद महीपाल नैतदेवं कथञ्चन ॥ १०
नास्मि प्रीतिमती नीता भीष्मेणामित्रकर्शन ।
बलान्नीताऽस्मि रुदती विद्राव्य पृथिवीपतीन् ॥ ११
भजस्व मां शाल्वपते भक्तां बालामनागसम् ।
भक्तानां हि परित्यागो न धर्मेषु प्रशस्यते ॥ १२
साऽहमामन्त्र्य गाङ्गेयं समरेष्वनिवर्तिनम् ।
अनुज्ञाता च तेनैव ततोऽहं भृशमागता ॥ १३
न स भीष्मो महाबाहुर्मामिच्छति विशांपते ।
भ्रातृहेतोः समारंभो भीष्मस्येति श्रुतं मया ॥ १४
भगिन्यौ मम ये नीते अम्बिकाम्बालिके नृप ।
प्रादाद्विचित्रवीर्याय गाङ्गेयो हि यवीयसे ॥ १५
यथा शाल्वपते नान्यं वरं ध्यामि कथञ्चन ।
त्वामृते पुरुषव्याघ्र तथा मूर्धानमालभे ॥ १६
न चान्यपूर्वा राजेन्द्र त्वामहं समुपस्थिता ।
सत्यं ब्रवीमि शाल्वैतत् सत्येनात्मानमालभे ॥ १७
भजस्व मां विशालाक्ष स्वयं कन्यामुपस्थिताम् ।
अनन्यपूर्वां राजेन्द्र त्वत्प्रसादाभिकाङ्क्षिणीम् ॥ १८
तामेवं भाषमाणां तु शाल्वः काशिपतेः सुताम् ।
अत्यजद्भरतश्रेष्ठ जीर्णां त्वचमिवोरगः ॥ १९
एवं बहुविधैर्वाक्यैर्याच्यमानस्तया नृपः ।
नाश्रद्दधच्छाल्वपतिः कन्यायां भरतर्षभ ॥ २०
ततः सा मन्युनाऽऽविष्टा ज्येष्ठा काशिपतेः सुता ।
अब्रवीत् साश्रुनयना बाष्पविप्लुतया गिरा ॥ २१
त्वया त्यक्ता गमिष्यामि यत्र तत्र विशाम्पते ।
तत्र मे गतयः सन्तु सन्तः सत्यं यथा ध्रुवम् ॥ २२
एवं तां भाषमाणां तु कन्यां शाल्वपतिस्तदा ।
परितत्याज कौरव्य करुणं परिदेवतीम् ॥ २३
गच्छ गच्छेति तां शाल्वः पुनः पुनरभाषत ।
बिभेमि भीष्मात् सुश्रोणि त्वं च भीष्मपरिग्रहः ॥ २४

**एवमुक्ता तु सा तेन शाल्वेनादीर्घदर्शिना ।**
**निश्चक्राम पुराद्दीना रुदती कुररी यथा ।। २५**

**—महाभारत, उदयोगपर्व अध्याय १७५**

नंतर मी माझी माता जी सत्यवती तिची आज्ञा घेऊन व अम्बेच्या बाबतींत आपण काय करावें यासंबंधीं मंत्री, ऋत्विज व पुरोहित यांचा विचार घेऊन त्यांच्या अनुमतीनें त्या मुलीला शाल्वाकडे जावयास अनुज्ञा दिली. वृद्ध ब्राह्मण व दासी तिच्याबरोबर दिल्या. ती शाल्वाकडे जाऊन त्याला म्हणाली, हे महाबाहो, मी तुझ्याकडे आलें आहे. त्याबरोबर शाल्व चेहऱ्यावर आश्चर्य दाखवून तिला असें म्हणाला कीं, तुझ्यासारख्या एकवार दुसऱ्याकडे गेलेल्या मुलीची मला इच्छा नाहीं. भीष्मानें आपल्या पराक्रमानें सर्व पृथ्वीवरील राजांना जिंकून तुला ज्या वेळीं नेलें त्या वेळीं तुला आनंद झाला असें मला दिसून आलें. जिंकून भीष्मानें तुला एकदां नेल्यावर व तेंही पत्नीच्या नात्यानें नेल्यावर आमच्यासारखा धर्मज्ञ राजा पुनश्च तुझा स्वीकार कसा करील ? तेव्हां तुला वाटेल तिकडे जा. आमचें तुला असें सांगणें आहे कीं, तूं आपला येथें व्यर्थ वेळ गमाविण्यांत कांहीं एक अर्थ नाहीं. त्याबरोबर ती कामपीडित अम्बा त्या राजाला असें म्हणूं लागली कीं, हे महीपाला, असें मुळींच घडलेलें नाहीं. तूं असें बोलूं नकोस. भीष्माबरोबर मी माझ्या इच्छेनें गेलेलें नाहीं. मी रथांत रोदनच करीत होतें. त्यानें आपल्या पराक्रमानें सर्व राजांना पळवून लावून मला नेलें. माझ्यासारख्या अनुरक्त, निरपराध अशा मुलीचा परित्याग धर्मदृष्टया प्रशंसनीय नाहीं. युद्धांत कधींही निवृत्त न होणाऱ्या गंगापुत्र भीष्माला सर्व गोष्टींची नीट कल्पना देऊन त्यानें मला अनुज्ञा दिल्यावर मी त्याच्या अनुज्ञेनेंच येथें आलें आहे. महाबाहू भीष्माला, माझी मुळींच इच्छा नाहीं. आपल्या भावाच्या विवाहासाठीं त्यानें हें सारें केलें. अम्बिका व अम्बालिका या माझ्या दोन बहिणींचा विवाह त्यानें आपला धाकटा बंधु जो विचित्रवीर्य त्याच्याशींच केला आहे. हे शाल्वपते, मी माझ्या मस्तकाची शपथ घेऊन सांगतें कीं तुझ्या वांचून दुसऱ्या कोणत्याही पुरुषाची 'वर' म्हणून मी कधींच मनांत

देखील कल्पना केली नाहीं. हे राजेन्द्रा, मी अन्यपूर्व स्थितींत तुझ्याकडे मुळींच आलेलें नाहीं. मी सत्य तेंच सांगतें. मी सत्याची शपथ घेतें. अनन्यपूर्वा, तुझ्या प्रसादाची इच्छा करणारी अशी ही कन्या आहे. तिचा तू कृपापूर्वक स्वीकार कर.

याप्रमाणें ती वारंवार विनंती करीत असतांदेखील सर्पानें कात टाकावी त्याप्रमाणें शाल्वानें तिचा परित्याग केला. अनेक प्रकारांनीं तिनें त्याची विनवणी केली तरी त्याचा तिच्यावर मुळींच विश्वास बसला नाहीं. त्याबरोबर तिला अत्यंत क्रोध आला. डोळ्यांत पाणी आणून भरल्या कंठानें ती शाल्वाला असें म्हणाली कीं, तूं माझा परित्याग केला आहेस. पाय नेतील तिकडे मी आतां जाईन. असुरक्षित स्थितींत देखील संत सज्जन माझें संरक्षण करतीलच. याप्रमाणें करुण भाषण करणाऱ्या त्या कन्येचा शाल्वानें परित्यागच केला. तो तिला पुनःपुन्हां म्हणूं लागला कीं, हे सुंदरी, तुला येथून जितक्या लवकर जाणें शक्य असेल, तितक्या लवकर जा. तूं भीष्मांचा परिग्रह आहेस. मला भीष्मांचें भय वाटतें. याप्रमाणें त्या मूर्ख शाल्वानें तिचा परित्याग केल्यामुळें तेथून ती हरणीप्रमाणें करुण आक्रंदन करीत निघाली.''

या सर्व प्रकरणाचा सूक्ष्म विचार केला तर त्यांत भीष्मांचा अणुमात्रही दोष नाहीं असेंच दिसून येतें. क्षत्रियांच्या स्वयंवरांत जो आपला पराक्रम प्रकट करील त्याला स्वयंवरांतील मुलगी नेण्याचा अधिकार असे. त्या रूढ अशा तत्कालीन पद्धतीप्रमाणें भीष्मांनीं या मुली नेल्या, त्यामुळें त्यांत त्यांना दोष देण्यासारखें कांहींही नाहीं. पुढें भीष्मांनीं अम्बेची जी पाठवणी केली त्यावरून त्याचवेळीं जर अम्बेनें भीष्मांना वस्तुस्थितीची नीट कल्पना दिली असती तर भीष्मांनीं कधींही तिला बळानें नेलें नसतें हें स्पष्टपणें सिद्ध होतें. अम्बेनें आपली बाजू त्याच वेळीं त्यांच्यासमोर मांडणें अवश्य होतें. भीष्मांच्या सर्वमान्य व्यक्तिमत्त्वामुळें व त्यांनीं रणांगणांत दाखविलेल्या अपूर्व पराक्रमामुळें मोठमोठे क्षत्रिय वीर घाबरून दातीं तृण धरून पळून गेले. त्या स्थितींत ती मुलगी घाबरणें व तिला त्यांना तसें सांगण्याचें अवधान न रहाणें अत्यंत स्वाभाविक

होतें. हें जरी गृहीत धरलें तरी त्याबरोबरच दुसरें हेंही लक्षांत ठेवणें अवश्यच आहे कीं, भीष्मांना असें कुणी सांगितल्यावांचून त्यांना तरी ती गोष्ट कळण्यास दुसरा काय मार्ग होता? शाल्व युद्धांत त्यांच्या अंगावर चालून आला व व्यर्थ पराक्रमानें भीष्मांना जिंकण्याच्या भरीस पडून फजीत पावला. त्याऐवजीं त्याला भीष्मांच्या पुढें आपल्या व अम्बेच्या झालेल्या आणाभाका सांगून आपली बाजू मांडतां आली असती व तसें झालें असतें तर सगळेंच प्रकरण सामोपचारानें संपलें असतें. तसें त्यानें मुळींच केलें नाहीं. अम्बेनें आल्याबरोबरही भीष्मांना ही बाजू मुळींच सांगितली नाहीं. तरीही ऐन विवाहाच्या वेळीं अम्बेनें भीष्मांना आपलें म्हणणें सांगतांच भीष्मांनीं तिला तिच्या इच्छेनुरूप शाल्वाकडे पाठवून दिलें. व तेंही एकटें न पाठवितां वृद्ध दासी, वृद्ध घरंदाज सेवक व राजधानींतील दायित्व अंगावर घेणारे ब्राह्मण यांच्यासह त्यांनीं तिला शाल्वाकडे परत पाठविलें. शाल्वानें जे संशय व्यक्त करून तिला काढून लावलें तसें करण्याचें त्याला कोणतेंही कारण नव्हतें. अम्बेबरोबर भीष्मांची मंडळी आहेत हें पाहून तरी त्याला हें निश्चित समजू शकत होतें कीं तिला भीष्मांनींच आपणांकडे पाठविलें आहे. ती सांगत होती तो वृत्तान्त खरा कीं खोटा याचा पडताळा तो या लोकांना विचारून घेऊं शकत होता. पण खोटया अभिमानाला बळी पडून भीष्मांनीं केलेल्या आपल्या पराभवाचा सूड त्यानें मूर्खाप्रमाणें तिच्यावर काढला. म्हणून या संबंधांत दोषी जर कोणी असला तर तो शाल्व ठरतो. भीष्म नाहीं. म्हणूनच त्याला अदीर्घदर्शी असें विशेषण महाभारतांत लावलेलें आहे. येवढें स्पष्टीकरण ध्यानांत ठेवलें म्हणजे यापुढील प्रकरणांत भीष्मांची बाजू कशी न्यायावर आधारलेली होती हें स्पष्ट होतें.

पुढें ती अम्बा शोक करीत तेथून निघाली. ती अरण्यांत गेली. ती आपल्या दैवाला, शाल्वाच्या मूर्खपणाला, स्वयंवर रचणाऱ्या आपल्या पित्याला व भीष्मांनाही दोष देत रडत रडत मार्ग आक्रमण करीत होती. वनांत अनेक तपस्वी तिला भेटले. त्यांनीं तिची नाना प्रकारें विचारपूस चालविली. तिनें त्यांना सर्व वृत्तान्त सांगि-

तला. त्यांतील कोणी आपआपल्या लहरीनुरूप जो दोषी वाटेल त्याला दूषणें देत होते. त्या सर्वांनीं तिला असें सांगितलें कीं, येथें राहाणें सर्वथा उचित नाही. तुझा विचार जरी तपस्येंत काळ कंठण्याचा असला तरी तुझ्यासारख्या सुंदर व तरुण स्त्रीला एकाकी अवस्थेंत विजनवासांत पाहून मृगयेच्या निमित्तानें येथें येणारे सबल राजे व राजपुत्र तुला त्रास दिल्यावांचून राहणार नाहींत व त्यायोगें झालें आहे याहूनही तुझ्या जीवनाचें अधिक मातेरें मात्र होईल. त्यापेक्षां तूं आपल्या पित्याच्या घरीं जा. तरुण स्त्रीला संरक्षण अवश्य हवें. पित्याच्या घरीं मान नि सन्मान कसला आला आहे? पण ती इतकी हटवादी होती कीं तिनें स्वच्छ शब्दांत ऋषींना पुढीलप्रमाणें उत्तर दिलें:—

**न शक्यं काशिनगरं पुनर्गन्तुं पितुर्गृहान् ।**
**अवज्ञाता भविष्यामि बान्धवानां न संशयः ।। १२**
**उषिताऽस्मि तथा बाल्ये पितुर्वेश्मनि तापसाः ।**
**नाहं गमिष्ये भद्रं वस्तत्र यत्र पिता मम ।**
**तपस्तप्तुमभीप्सामि तापसैः परिरक्षिता ।। १३**
**यथा परेऽपि मे लोके न स्यादेवं महात्ययः ।**
**दौर्भाग्यं तापसश्रेष्ठास्तस्मात्तप्स्याम्यहं तपः ।। १४**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १७६

"काशिनगरीला आपल्या पित्याच्या घरीं जाणें मला शक्य नाहीं. माझ्या नातलगांच्या घरीं मी अपमानित होईन. हे तापसांनो, माझ्या लहानपणीं जेथें मी सन्मानानें नांदलें तेथें आतां अपमानित स्थितींत मी मुळींच जाणार नाहीं. आपणांबरोबर मी येथें तपश्चर्या करूं इच्छितें. माझा इहलोक तर बुडालाच आहे. पण परलोकही बुडावा अशी माझी इच्छा नाहीं." याप्रमाणें ती कन्या बोलत असतांनाच तेथें होत्रवाहन नांवाचा एक राजर्षि आला. त्यानें तिला ओळखलें व तिच्या दुःखानें अत्यंत दुःखी होऊन तो त्या तापस्यांना सांगूं लागला कीं, ही माझी नात आहे. तो परशुरामांचा मित्र होता. त्यानें तिचें तें सर्व वृत्त ऐकून परशुरामांच्याकडे तिनें जावें म्हणजे तिचें दुःख दूर होईल असें सांगितलें.

हा संवाद चालू असतांनाच परशुरामांचा शिष्य अकृतव्रण तेथें उपस्थित झाला. त्याला सर्व वृत्तांत सांगून होत्रवाहनानें असें सांगितलें कीं, जरी भीष्मानें हिच्या विनंतीवरून शाल्वाकडे हिला पाठविलें असलें तरी, तोच आपल्या दुःखाचें मूळ आहे अशी हिची समजूत आहे. अकृतव्रणानें भार्गवराम उद्यां सकाळीं येथें येणार आहेत असें सांगून त्या मुलीला त्यांच्याजवळ दुःख सांगण्याविषयीं सूचना दिली. पण अकृतव्रण तिला विचारूं लागला कीं, 'तूं स्वतः रामांच्याकडून कोणतें काम व्हावें याची इच्छा करतेस तें सांग.' अम्बेनें वास्तविक भीष्मांचा कांहीं अपराध तिलाही दाखवितां येत नसल्यानें आपली बाजू पुनश्च अकृतव्रणाजवळ मांडून त्यानेंच त्याला जें योग्य दिसेल तें करावें असें सुचविलें. पण केवळ भीष्मांच्या पराक्रमामुळें अकारण मत्सरप्रेरित होऊन अकृत-व्रणानेंच तिच्या मनांत भीष्मांच्या विनाशाची कल्पना भरविली. थोर लोकांचे अकारण वैरी असतात ते हे असे ! तो सारा संवादच मी येथें उद्धृत करतोंः—

**अकृतव्रण उवाच ।**

**दुःखद्वयमिदं भद्रे कतरस्य चिकीर्षसि ।**
**प्रतिकर्तव्यमबले तत्त्वं वत्से वदस्व मे ।। १**
**यदि सौभपतिर्भद्रे नियोक्तव्यो मतस्तव ।**
**नियोक्ष्यति महात्मा स रामस्त्वद्धितकाम्यया ।। २**
**अथापगेयं भीष्मं त्वं रामेणेच्छसि धीमता ।**
**रणे विनिर्जितं द्रष्टुं कुर्यात्तदपि भार्गवः ।। ३**
**सृञ्जयस्य वचः श्रुत्वा तव चैव शुचिस्मिते ।**
**यदत्र ते भृशं कार्यं तदद्यैव विचिन्त्यताम् ।। ४**

**अम्बोवाच ।**

**अपनीतास्मि भीष्मेण भगवन्न विजानता ।**
**नाभिजानाति मे भीष्मो ब्रह्मन् शाल्वगतं मनः ।। ५**
**एतद्विचार्य मनसा भवानेतद्विनिश्चयम् ।**
**विचिनोतु यथान्यायं विधानं क्रियतां तथा ।। ६**

भीष्मे वा कुरुशार्दूले शाल्वराजेऽथवा पुनः ।
उभयोरेव वा ब्रह्मन् युक्तं यत्तत् समाचर ।। ७
निवेदितं मया ह्येतद्दुःखमूलं यथातथम् ।
विधानं तत्र भगवन् कर्तुमर्हसि युक्तितः ।। ८

अकृतव्रण उवाच ।

उपपन्नमिदं भद्रे यदेवं वरवर्णिनि ।
धर्मं प्रति वचो ब्रूयाः शृणु चेदं वचो मम ।। ९
यदि त्वामापगेयो वै न नयेद्गजसाह्वयम् ।
शाल्वस्त्वां शिरसा भीरु गृह्णीयाद्रामचोदितः ।। १०
तेन त्वं निर्जिता भद्रे यस्मान्नीतासि भाविनि ।
संशयः शाल्वराजस्य तेन त्वयि सुमध्यमे ।। ११
भीष्मः पुरुषमानी च जितकाशी तथैव च ।
तस्मात् प्रतिक्रिया युक्ता भीष्मे कारयितुं तव ।। १२

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १७७

अकृतव्रण म्हणाला : हे वत्से, तुझें दुःख दोन प्रकारचें आहे. त्यांपैकीं कोणत्या दुःखाचा तुला प्रतिकार करावयाचा आहे तें सांग. शाल्वाचें नियंत्रण करावयाचें असेल तर तसें सांग. शाल्व तुला पत्करील असें राम करतील. किंवा रणामध्यें रामांनीं भीष्मांना जिंकावें अशी तुझी इच्छा असल्यास राम तेंही करतील. तूं व तुझे आजोबा यांनीं मिळून दोनपैकीं कांहींही ठरवावें. हें ऐकतांच अंबा म्हणूं लागली : शाल्वाकडे माझें मन गुंतलें आहे, हें मला नेतांना भीष्मांना मुळींच माहीत नव्हतें. तेव्हां अशा स्थितींत ज्या कोणाचा प्रतिकार करणें आपणांस योग्य वाटत असेल त्याचा आपण प्रतिकार करावा. त्यावर अकृतव्रण तिला असें म्हणूं लागला कीं, " जर भीष्मानें तुला नेलें नसतें तर शाल्वानें खात्रीनें रामांच्या म्हणण्यावरून तुझा स्वीकार केला असता. पण भीष्मानें तुला जिंकलें म्हणूनच शाल्वाच्या अंतःकरणांत तुझ्याविषयीं संशय उत्पन्न झालेला आहे. आपल्या पौरुषाचा भीष्माला अहंकार आहे. स्वतःला तो मोठा अजिंक्य समजतो. त्यामुळें त्याचाच प्रतिकार करणें माझ्या मतें योग्य आहे."

अकृतव्रणाचा हा हट्ट तामसी आहे. भीष्मानें अंबेला नेलेंच नसतें तर शाल्वानें तिचा स्वीकार करावयास परशुरामांच्या साहाय्याची कांहीं एक आवश्यकता नव्हती. पण केवळ भीष्म पराक्रमी आहेत एवढ्याचसाठीं त्यांच्यावर शस्त्र परजणें हें आपलें कर्तव्य आहे अशा ब्राह्मण्याला न शोभणाऱ्या मत्सराच्या व द्वेषाच्या भावनेनें अकृत-व्रण पछाडला गेला. त्या मुलीला काय, ती त्याच्या म्हणण्याला तत्काल वश झाली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं राम तेथें आले. त्यांना सर्व वृत्तांत सांगण्यांत आला. भीष्म म्हणतात :—

**तस्याश्च दृष्ट्वा रूपं च वपुश्चाभिनवं पुनः ।**
**सौकुमार्यं परं चैव रामश्चिन्तापरोऽभवत् ॥ २८**
**किमियं वक्ष्यतीत्येवं विममर्श भृगूद्वहः ।**
**इति दध्यौ चिरं रामः कृपयाऽभिपरिप्लुतः ॥ २९**
**कथ्यतामिति सा भूयो रामेणोक्ता शुचिस्मिता ।**
**सर्वमेव यथातत्त्वं कथयामास भार्गवे ॥ ३०**
**तच्छ्रुत्वा जामदग्न्यस्तु राजपुत्र्या वचस्तदा ।**
**उवाच तां वरारोहां निश्चित्यार्थविनिश्चयम् ॥ ३१**

**राम उवाच ।**

**प्रेषयिष्यामि भीष्माय कुरुश्रेष्ठाय भाविनि ।**
**करिष्यति वचो मह्यं श्रुत्वा च स नराधिपः ॥ ३२**
**न चेत्करिष्यति वचो मयोक्तं जाह्नवीसुतः ।**
**धक्ष्याम्यहं रणे भद्रे सामात्यं शस्त्रतेजसा ॥ ३३**
**अथवा ते मतिस्तत्र राजपुत्रि न वर्तते ।**
**यावच्छाल्वपतिं वीरं योजयाम्यत्र कर्मणि ॥ ३४**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १७७

**वाचा भीष्मश्च शाल्वश्च मम राज्ञि वशानुगौ ।**
**भविष्यतोऽनवद्याङ्गि तत् करिष्यामि मा शुचः ॥ ३**
**न तु शस्त्रं ग्रहीष्यामि कथञ्चिदपि भाविनि ।**
**ऋते नियोगाद्विप्राणामेष मे समयः कृतः ॥ ४**

राम उवाच ।

काशिकन्ये पुनर्ब्रूहि भीष्मस्ते चरणावुभौ ।
शिरसा वन्दनार्होऽपि ग्रहीष्य ति गिरा मम ।। ६

अम्बोवाच ।

जहि भीष्मं रणे राम गर्जन्तमसुरं यथा ।
समाहूतो रणे राम मम चेदिच्छसि प्रियम् ।।
प्रतिश्रुतं च यदपि तत् सत्यं कर्तुमर्हसि ।। ७

भीष्म उवाच ।

ततः संवदतोरेवं राजन् रामाम्बयोस्तदा ।
ऋषिः परमधर्मात्मा इदं वचनमब्रवीत् ।। ८
शरणागतां महाबाहो कन्यां न त्यक्तुमर्हसि ।
यदि भीष्मो रणे राम समाहूतस्त्वया मृधे ।। ९
निर्जितोऽस्मीति वा ब्रूयात् कुर्याद्वा वचनं तव ।
कृतमस्या भवेत् कार्यं कन्याया भृगुनन्दन ।। १०
वाक्यं सत्यं च ते वीर भविष्यति कृतं विभो ।
इयं चापि प्रतिज्ञा ते तदा राम महामुन ।। ११
जित्वा वै क्षत्रियान् सर्वान् ब्राह्मणेषु प्रतिश्रुता ।
ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रश्चैव रणे यदि ।। १२
ब्रह्मद्विड्भविता तं वै हनिष्यामीति भार्गव ।
शरणार्थे प्रपन्नानां भीतानां शरणार्थिनाम् ।। १३
न शक्ष्यामि परित्यागं कर्तुं जीवन् कथञ्चन ।
यश्च कृत्स्नं रणे क्षत्रं विजेष्यति समागतम् ।। १४
दीप्तात्मानमहं तं च हनिष्यामीति भार्गव ।
स एवं विजयी राम भीष्मः कुरुकुलोद्वहः ।
तेन युध्यस्व सङ्ग्रामे समेत्य भृगुनन्दन ।। १५

राम उवाच ।

यदि भीष्मो रणश्लाघो न करिष्यति मे वचः ।
हनिष्याम्येनमुद्रिक्तमिति मे निश्चिता मतिः ।। १८
न हि बाणा मयोत्सृष्टाः सज्जन्तीह शरीरिणाम् ।
कायेषु विदितं तुभ्यं पुरा क्षत्रियसङ्गरे ।। १९

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १७८

"त्या मुलीचें रूप, सौकुमार्य, व शोकमग्नता पाहून रामांच्या अंतःकरणांत अपार दया उत्पन्न झाली. विकारांनीं विचारांचा ताबा घेतल्यावर राम तिला म्हणूं लागले, मी कुरुश्रेष्ठ भीष्माकडे निरोप पाठवितों. जर तो माझें म्हणणें ऐकणार नाहीं, तर अमात्यासहित मी त्याला माझ्या शस्त्रांच्या तेजानें दग्ध करीन. अथवा ह्या भानगडींत पडण्याची तुझी इच्छा नसेल तर शाल्वानें तुझा स्वीकार करावा असेंही मी करीन. भीष्म आणि शाल्व दोघेंही माझ्या स्वाधीन आहेत. मी त्यांना स्वाधीन करूं शकतों. पण हे काशिकन्ये, मला हातांत शस्त्र घ्यावयास लावूं नकोस. केवळ ब्राह्मणावर संकट आलें तरच मी हातांत शस्त्र घेईन अशी माझी प्रतिज्ञा आहे. तुझी इच्छा असेल तर भीष्म तुझ्या पायावर आपलें मस्तक नमवील. वास्तविक सर्वांनीं त्याच्याच पायावर डोकें ठेवावें अशी वस्तुस्थिति आहे." त्यावर अम्बा म्हणूं लागली कीं, 'गर्जना करणाऱ्या असुरांप्रमाणें भीष्म हा अत्यन्त उन्मत्त आहे. आपण त्यालाच ठार मारा. त्यावांचून माझें दुसऱ्या कशानेंही प्रिय होणार नाहीं.' त्यावर अकृतव्रण रामांना असा आग्रह करूं लागला कीं, शरण आलेल्या या मुलीचें संरक्षण करणें व तिची इच्छा पुरविणें हें आतां आपल्या हातीं आहे. आपण रणांत भीष्माला आव्हान केल्यावर त्यानें आपलें म्हणणें ऐकलें किंवा निदान 'मी हरलों' येवढें जरी त्यानें म्हटलें तरीही हिच्या मनाचें समाधान होईल. आपणच पूर्वीं असें म्हटलें आहे कीं, ब्राह्मण, क्षत्रिय अथवा वैश्य–शूद्र यांपैकीं कोणीही जर ब्रह्मद्वेष्टा निघेल तर मी त्याला ठार मारीन. भ्यालेल्या नि शरण आलेल्या लोकांना मी टाकूं शकत नाहीं. तसेंच जो कोणी सर्व क्षत्रियांचा पराभव करून आपल्या तेजानें तळपून उठेल त्याला मी ठार मारीन. भीष्म असाच सर्वांचा विजेता आहे. म्हणून आपण त्याच्याशीं युद्ध कराच. भोळे परशुराम अहंकारवश होऊन असें म्हणूं लागले कीं, "युद्धाची आवड असलेला भीष्म जर माझें म्हणणें ऐकणार नाहीं तर मी त्याला ठार मारीन. मी सोडलेले बाण देहधारी लोक कधींही सहन करूं शकत नाहींत." तात्पर्य परशुरामांनीं स्वतः होऊन अन्याय्य भूमिका पत्करली व ते हस्तिना-

पुराच्या वेशीवर येऊन थडकले. त्यांनीं भीष्मांना निरोप पाठविला. त्यांना असें वाटलें कीं, भीष्म त्यांच्या सामर्थ्यासमोर वाकतील. ते भीष्मांना म्हणूं लागले कीं, तुला इच्छा नसतां तूं या मुलीला काय म्हणून आणलेंस? त्यामुळें आतां माझी आज्ञा म्हणून तुला हिचा स्वीकार केलाच पाहिजे.

**भीष्म कां बुद्धिमास्थाय काशिराजसुता तदा ।**
**अकामेन त्वयाऽऽनीता पुनश्चैव विसर्जिता ।। २८**
**प्रत्याख्याता हि शाल्वेन त्वयाऽऽनीतेति भारत ।**
**तस्मादिमां मन्नियोगात् प्रतिगृह्णीष्व भारत ।। ३०**

—महाभारत, उद्योगपर्व **अध्याय १७८**

पण भीष्मांनीं त्यांना असें सांगितलें कीं, मी माझ्या भावाला ही मुलगी कधींही देणार नाहीं. तो सगळा संवादच महाभारतांतील वाङ्मयाचा अमर अलंकार असून त्यांतून भीष्मांच्या व्यक्तिमत्त्वाचे सारे तेजस्वी विशेष व्यक्त होतात. तो संवाद पुढीलप्रमाणें :—

**नाहमेनां पुनर्दद्यां ब्रह्मन् भ्रात्रे कथञ्चन ।। ३२**
**शाल्वस्याहमिति प्राह पुरा मामेव भार्गव ।**
**मया चैवाभ्यनुज्ञाता गतेयं नगरं प्रति ।। ३३**
**न भयान्नाप्यनुक्रोशान्नार्थलोभान्न काम्यया ।**
**क्षात्रं धर्ममहं जह्यामिति मे व्रतमाहितम् ।। ३४**
**अथ मामब्रवीद्रामः क्रोधपर्याकुलेक्षणः ।**
**न करिष्यसि चेदेतद्वाक्यं मे नरपुङ्गव ।। ३५**
**हनिष्यामि सहामात्यं त्वामद्येति पुनः पुनः ।**
**संरंभादब्रवीद्रामः क्रोधपर्याकुलेक्षणः ।। ३६**
**तमहं गीर्भिरिष्टाभिः पुनः पुनररिन्दम ।**
**अयाचं भृगुशार्दूलं न चैव प्रशशाम सः ।। ३७**
**प्रणम्य तमहं मूर्ध्ना भूयो ब्राह्मणसत्तमम् ।**
**अब्रुवं कारणं किं तद्यत्त्वं युद्धं मयेच्छसि ।। ३८**
**इष्वस्त्रं मम बालस्य भवतैव चतुर्विधम् ।**
**उपदिष्टं महाबाहो शिष्योऽस्मि तव भार्गव ।। ३९**

ततो मामब्रवीद्रामः क्रोधसंरक्तलोचनः ।
जानीषे मां गुरुं भीष्म गृह्णासीमां न चैव ह ॥ ४०
सुतां काश्यस्य कौरव्य मत्प्रियार्थं महामते ।
न हि ते विद्यते शान्तिरन्यथा कुरुनन्दन ॥ ४१
गृहाणेमां महाबाहो रक्षस्व कुलमात्मनः ।
त्वया विभ्रंशिता हीयं भर्तारं नाधिगच्छति ॥ ४२
तथा ब्रुवन्तं तमहं रामं परपुरञ्जयम् ।
नैतदेवं पुनर्भावि ब्रह्मर्षे किं श्रमेण ते । ४३
गुरुत्वं त्वयि संप्रेक्ष्य जामदग्न्य पुरातनम् ।
प्रसादये त्वां भगवंस्त्यक्तैषा तु पुरा मया ॥ ४४
को जातु परभावां हि नारीं व्यालीमवस्थिताम् ।
वासयेत गृहे जानत् स्त्रीणां दोषो महात्ययः ॥ ४५
न भयाद्वासवस्यापि धर्मं जह्यां महाव्रत ।
प्रसीद मा वा यद्वा ते कार्यं तत्कुरु मा चिरम् ॥ ४६
अयं चापि विशुद्धात्मन् पुराणे श्रूयते विभो ।
मरुत्तेन महाबुद्धे गीतः श्लोको महात्मना ॥ ४७
" गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।
उत्पथप्रतिपन्नस्य परित्यागो विधीयते ॥ ४८
स त्वं गुरुरिति प्रेम्णा मया संमानितो भृशम् ।
गुरुवृत्तिं न जानीषे तस्माद्योत्स्यामि वै त्वया ॥ ४९
गुरुं न हन्यां समरे ब्राह्मणं च विशेषतः ।
विशेषतस्तपोवृद्धमेवं क्षान्तं मया तव ॥ ५०
उद्यतेषुमथो दृष्ट्वा ब्राह्मणं क्षत्रबन्धुवत् ।
यो हन्यात् समरे क्रुद्धं युध्यन्तमपलायिनम् ॥ ५१
ब्रह्महत्या न तस्य स्यादिति धर्मेषु निश्चयः ।
क्षत्रियाणां स्थितो धर्मे क्षत्रियोऽस्मि तपोधन ॥ ५२
यो यथा वर्तते यस्मिंस्तस्मिन्नेव प्रवर्तयन् ।
नाधर्मं समवाप्नोति न चाश्रेयश्च विन्दति ॥ ५३
अर्थे वा यदि वा धर्मे समर्थो देशकालवित् ।
अर्थसंशयमापन्नः श्रेयान्निःसंशयो नरः ॥ ५४

यस्मात् संशयितेऽप्यर्थेऽयथान्यायं प्रवर्तसे ।
तस्माद्योत्स्यामि सहितस्त्वया राम महाहवे ।। ५५
पश्य मे बाहुवीर्यं च विक्रमं चातिमानुषम् ।
एवं गतेऽपि तु मया यच्छक्यं भृगुनन्दन ।। ५६
तत्करिष्ये कुरुक्षेत्रे योत्स्ये विप्र त्वया सह ।
द्वन्द्वे राम यथेष्टं मे सज्जीभव महाद्युते ।। ५७
तत्र त्वं निहतो राम मया शरशतार्दितः ।
प्राप्स्यसे निर्जितांल्लोकान् शस्त्रपूतो महारणे ।। ५८
स गच्छ विनिवर्तस्व कुरुक्षेत्रं रणप्रिय ।
तत्रैष्यामि महाबाहो युद्धाय त्वां तपोधन ।। ५९
अपि यत्र त्वया राम कृतं शौचं पुरा पितुः ।
तत्राहमपि हत्वा त्वां शौचं कर्तास्मि भार्गव ।। ६०
तत्र राम समागच्छ त्वरितं युद्धदुर्मद ।
व्यपनेष्यामि ते दर्पं पौराणं ब्राह्मणब्रुवः ।। ६१
यच्चापि कत्थसे राम बहुशः परिवत्सरे ।
निर्जिताः क्षत्रिया लोके मयैकेनेति तच्छृणु ।। ६२
न तदा जातवान् भीष्मः क्षत्रियो वाऽपि मद्विधः ।
पश्चाज्जातानि तेजांसि तृणेषु ज्वलितं त्वया ।। ६३
यस्ते युद्धमयं दर्पं कामं च व्यपनाशयेत् ।
सोऽहं जातो महाबाहो भीष्मः परपुरञ्जयः ।
व्यपनेष्यामि ते दर्पं युद्धे राम न संशयः ।। ६४

भीष्म उवाच ।

ततो मामब्रवीद्रामः प्रहसन्निव भारत ।
दिष्ट्या भीष्म मया सार्धं योद्धुमिच्छसि सङ्गरे ।। ६५
अयं गच्छामि कौरव्य कुरुक्षेत्रं त्वया सह ।
भाषितं ते करिष्यामि तत्रागच्छ परंतप ।। १६
तत्र त्वां निहतं माता मया शरशताचितम् ।
जान्हवी पश्यतां भीष्म गृधकङ्कबलाशनम् ।। ६७
कृपणं त्वामभिप्रेक्ष्य सिद्धचारणसेविता ।
मया विनिहतं देवी रोदतामद्य पार्थिव ।। ६८

अंतर्दर्ही महाभागा भागीरथसुताऽनघा ।
या त्वामजीजनन्मन्दं युद्धकामुकमातुरम् ।। ६९
एहि गच्छ मया भीष्म युद्धकामुक दुर्मद ।
गृहाण सर्वं कौरव्य रथादि भरतर्षभ ।। ७०
इति ब्रुवाणं तमहं रामं परपुरञ्जयम् ।
प्रणम्य शिरसा राममेवमस्त्वित्यथाब्रुवम् ।। ७१
—महाभारत, उदयोगपर्व अध्याय १७८

भीष्म म्हणालेः काय वाटेल तें झालें तरी या मुलीचा विवाह आतां मी माझ्या भावाशीं करूं शकणार नाहीं. हिनेंच मला आपलें शाल्वावर प्रेम असल्याचें सांगितलें व हिच्या इच्छेनुसारच मी हिची शाल्वाकडे रवानगी केली. आतां मी पुन्हां हिचा स्वीकार कसा करणार? भय, दया, अर्थ, लोभ, लहर यांपैकीं कोणत्याही गोष्टींनीं मी माझा क्षात्रधर्म कधींही कलंकित करणार नाहीं. हें माझें ठरलेलें व्रत आहे. त्याबरोबर राम खदिरांगाराप्रमाणें नेत्र लाल करून पुनःपुन्हां असें म्हणूं लागले कीं, जर तूं माझी आज्ञा ऐकणार नाहींस तर अमात्यासहित मी तुला ठार मारल्यावांचून राहणार नाहीं. मी पुनः पुन्हां त्यांची विनवणी केली पण, ते शांत होईचनात. शेवटीं मी त्यांना म्हटलें, अगदीं पायावर डोकें ठेवून नमस्कार करून म्हटलें कीं माझ्याशीं ही युद्ध करण्याची वासना आपण काय म्हणून बाळगतां? माझ्या लहानपणीं आपणच मला साङ्गधनुर्वेदाचें व अस्त्रांचें शिक्षण देऊन कृतार्थ केलें आहे. भार्गवा, मी आपलाच शिष्य आहे. माझ्याशीं आपण युद्ध करण्याची कां इच्छा करावी ? पण रामांनीं रागानें मला धमकावून असें सांगितलें कीं, मला तूं एकदां गुरु म्हणतोस व शिवाय माझी अवज्ञा करतोस ? जर तुला माझें कांहीं प्रिय करावयाचें असेल तर या काशिराजकन्येचा तूं स्वीकार कर. हिचा स्वीकार कर व माझ्या क्रोधापासून आपल्या कुळाचें संरक्षण कर. तुझ्याचमुळें हिच्यावर ही आपत्ति आलेली आहे. मी रामांना पुनश्च हात जोडून सांगितलें, जी गोष्ट व्हावयाची नाहीं तिचा व्यर्थ आग्रह धरण्यांत काय अर्थ आहे ? केवळ तुम्ही माझे पूर्वीचे गुरु आहांत म्हणून मी तुमची एवढी विनवणी

करीत आहे. पण या मुलीचा स्वीकार माझा कांहीं एक अपराध नसतांना केवळ तुमच्या अधार्मिक हट्टासाठीं मी कालत्रयींही करणार नाहीं. दुसऱ्याकडे जिची आणभाक झाली आहे व परक्यावर जिचें मन बसलें आहे त्या मुलीला एखाद्या सर्पिणीप्रमाणें कोणता कुलवान् आपल्या घरीं आश्रय देईल? कुळाची इभ्रत मी घालवावयाला सिद्ध नाहीं. भयाच्या गोष्टी मला सांगणें व्यर्थ आहे. इंद्राच्यादेखील भयानें मी माझा धर्म सोडणार नाहीं. आपल्याला वाटलें तर माझ्यावर प्रसन्न व्हा, वाटलें तर खुशाल रागवा. आपल्याला जें काय करावयाचें असेल तें खुशाल करा. मरुत्तानें पूर्वीं असें म्हटलें आहे कीं, मदांध, कार्याकार्याचा विवेक नसणाऱ्या व उन्मार्गवर्ती अशा गुरूचा परित्यागच केला पाहिजे. मी गुरु म्हणून प्रेमानें नि सन्मानानें आपला पुष्कळ आदर राखला, पण गुरूची भूमिका कशी संभाळावी याचें आपणांस मुळींच ज्ञान नाहीं. मी आपणांशीं अवश्य युद्ध करीन. ब्राह्मण, गुरु व तपोवृद्ध म्हणून मी आपली आतांपर्यंत गय केली. पण धर्मशास्त्राचा असा निश्चय आहे कीं क्षत्रियाप्रमाणें निवृत्त न होण्याचें व्रत पत्करून हत्यार उगारून क्रोधानें जो ब्राह्मण हिंसा करावयास प्रवृत्त होईल त्याला ठार मारण्यांत ब्रह्महत्या लागत नाहीं. तुम्ही आपला वर्णधर्म सोडला आहे. तुमचें ब्राह्मण्य भंग पावलें. मी क्षत्रिय आहें. क्षात्रधर्मानुसारच वागत आहें. जो ज्याप्रमाणें वागतो त्याच्याशीं त्याच पद्धतीनें वागण्यांत अधर्मही नाहीं व अकल्याणही नाहीं. या प्रकरणाची तुम्हांला माहिती नाहीं. त्याचा तुम्ही नीट विचार केलेला नाहीं. अशा स्थितींत जेथें पुष्कळ विचार करावयास हवा, अशा प्रकरणीं तुम्ही मन मानेल तसें वागावयास खुशाल प्रवृत्त झालां आहांत. तुमचें कोण ऐकून घेईल? तुमच्या इच्छेनुसार तुमच्याशीं मी भयानक युद्ध करावयास सिद्ध आहें. माझें बाहुबल व अतिमानुष पराक्रम याचा प्रत्यय मी तुम्हांला देतोंच. जें माझ्याच्यानें होईल तें मी कुरुक्षेत्राच्या रणमैदानावर आपणांस प्रत्यक्ष करूनच दाखवीन. व्हा सज्ज! या द्वंद्वयुद्धास!! युद्धांत माझ्या बाणप्रहारांनीं अंगाची चाळणी होऊन रणक्षेत्रावरील धारातीर्थांत

पवित्र होऊन मृत्यूच्या सोपानमार्गावरून तुम्हीं स्वर्गलोकांत जा. आपल्या पूर्वजांच्या वधाचा सूड घेऊन तुम्हीं पूर्वी कृतकृत्य झालांत. माझ्या पूर्वजांच्या वधाचा सूड तुम्हांस ठार मारून घेऊन मी कृतकृत्य होईन. हे युद्धदुर्मदा ब्राह्मणाधमा! मी तुझा सर्व गर्व आज हरण करीन. मी एकटचानें सर्व क्षत्रियांना जिंकलें नि ठार मारलें, असें वारंवार तुम्ही मला सांगतां. मी किंवा माझ्यासारखा क्षत्रिय त्या वेळीं नव्हता हें त्याचें खरें कारण आहे. तुम्ही गवत जाळलें. तेज मागाहून उत्पन्न झालें. तुमचा युद्धाचा दर्प हरण करावयासाठींच माझा जन्म झाला आहे. त्यावर हंसून राम मला म्हणाले: तूं युद्धास सज्ज झालास हें फार चांगलें झालें. येच तूं कुरुक्षेत्रांत माझी गांठ घ्यावयास. माझ्या बाणांनीं तूं मेल्यावर गिधाडांनीं फाडलेलें तुझें प्रेत तुझ्या गंगामातेला अवश्य पाहूं दे. सिद्धचारणांनीं जिची सेवा करावी त्या देवीला जर पुत्रनिधनाचें दुःख व्हावयाचेंच असलें तर खुशाल रडूं दे. ती महाभागा खरोखरी दुर्दैवी आहे. तुझ्यासारख्या मदांध, युद्धदुर्मदाला, तिनें जन्मच कां द्यावा? ये, आपलें युद्धसाहित्य घेऊन कुरुक्षेत्रावर उपस्थित हो. मी रामांना प्रणाम करून परतलों. ( हा वृत्तान्त भीष्मांनीं दुर्योधनाला सांगितलेला असल्यामुळें तेथें मी हें विशेषण सर्वत्र आलें आहे.)

भीष्म व परशुराम यांचें अत्यंत घनघोर असें तेवीस दिवस अहोरात्र युद्ध झालें. शेवटीं त्यांत परशुराम हरले, पण भीष्मांनीं त्यांच्या समोर नमतें घेतलें नाहीं. त्यांची ही मृत्युंजय निर्भय वृत्ति अनेकवार प्रकट झाली आहे. महाभारतांतील सभापर्वांत सर्व क्षत्रिय त्यांच्यावर खवळून उठले असतां, गणयामि 'तृणेनैतान्' तृणाहून यांची अधिक किंमत मी करीत नाहीं असें म्हणून वार्धक्यांतही त्यांनीं त्यांची बोळवण केली होती. इतके थोर योद्धे, तपस्वी, महापराक्रमी, तेजस्वी, ज्ञानसंपन्न, व निर्विवादपणें राज्ययंत्राला सर्वस्वीं योग्य असे असलेले भीष्म द्रौपदीच्या वस्त्रहरणाच्या वेळीं स्वस्थ कां बसले असतील ? कुरुराज्यावरील आपला अधिकार सोडून देऊन आपल्या डोळ्यांसमोर त्याचा अधःपात त्यांनीं कां पाहिला

असेल ? व क्षत्रियांतक जामदग्न्यासारख्या प्रचंड शक्तीला न्याया-साठीं लोळविणारे भीष्म युधिष्ठिराच्या न्यायाच्या पक्षाऐवजीं दुर्योधनाच्या अन्याय्य पक्षाच्या संरक्षणाची ढाल कां बनले असतील? विचारी मनाला आज कांहीं सहस्रकांनंतर देखील गोंधळांत टाक-णाऱ्या या प्रश्नांचें उत्तर महाभारतांत भीष्मांच्या घोर प्रतिज्ञेंत सांपडेल. तें प्रकरण असें :–

## भीष्मप्रतिज्ञा

राजा शांतनु भीष्मांना युवराज करून निश्चिंत असतां पहिलीं चार वर्षें व्यवस्थितपणें गेलीं. चार वर्षांनंतर एके दिवशीं तो यमुना नदीवर गेला असतां त्याला एक अतिशय सुन्दर व जिच्या शरीराचा सुगंध आसमंतांत पसरलेला आहे अशी दाशकन्या आढ-ळली. तिचें रूप नि माधुर्य व सुगंध यांनीं शांतनूच्या मनाला मोह पडून त्यानें तिच्या पित्याजवळ तिची मागणी घातली. त्या दाश-राजांनीं शांतनूला असें सांगितलें कीं, आपण सत्यसंध आहांत, जर ही मुलगी मी आपणांस द्यावी अशी आपली खरोखरच इच्छा असेल तर आपण माझी एक अट मान्य करा. शांतनूनें त्याला असें सांगि-तलें कीं, 'तुझें काय म्हणणें आहे तें तूं मला सांग. तें जर योग्य असलें तर तें मी तुला देईन व अयोग्य असलें तर मुळींच देणार नाहीं.' त्या दाशराजानें असें सांगितलें कीं, 'हिला जो मुलगा होईल तो जर आपल्यानंतर कौरवांच्या राज्यसिंहासनाचा उत्तराधिकारी होऊं शकत असेल, तर ही कन्या मी आपणांस द्यावयास सिद्ध आहें.' अत्यंत उत्कट इच्छा असूनही शांतनूला ही अट भलतीच साहसाची आहे असें वाटून त्यानें ती अयोग्य अट मान्य केली नाहीं. व तो तसाच परत फिरला. महाभारतांत म्हटलें आहे :—

शांतनुरुवाच ।

श्रुत्वा तव वरं दाश व्यवस्येयमहं तव ।
दातव्यं चेत्प्रदास्यामि न त्वदेयं कथंचन ।। ५५

दाश उवाच ।

अस्यां जायेत यः पुत्रः स राजा पृथिवीपते ।
त्वदूर्ध्वमभिषेक्तव्यो नान्यः कश्चन पार्थिव ।। ५६

वैशंपायन उवाच ।

नाकामयत तं दातुं वरं दाशाय शान्तनुः ।
शरीरजेन तीव्रेण दह्यमानोऽपि भारत ।। ५७

—महाभारत, आदिपर्व अध्याय १००

चिंतामग्न शांतनु हस्तिनापुरास परत आल्यावर खिन्नमनस्क अवस्थेंत त्याला पाहून देवव्रत भीष्मांनीं त्यांना असें विचारलें कीं, 'आपण असे चिंतामग्न कां दिसतां ?' त्यावर शांतनूनें त्यांना इतकेंच सांगितलें कीं, 'तुझ्यासारखा योग्य पुत्र असतां मला वस्तुतः चिंतामग्न होण्याचें कांहींच कारण नाहीं. पण परमेश्वरानें मला तुझ्यारूपानें एकच मुलगा दिला आहे. तूं नित्य शस्त्र हातांत घेऊन क्षत्रियोचित पुरुषार्थाच्या कामांत गढून गेलेला असतोस. शतावधि पुत्रांपेक्षां तुझ्यासारखा सर्वश्रेष्ठ असा एकच पुत्र कोणालाही समाधान व हर्षच प्राप्त करून देईल. पण क्षात्रधर्माचें अनुकरण करतांना जर तुझें कांहीं अनिष्ट झालें तर मात्र हा वंश संपलाच, यांत कांहीं संशय नाहीं. तुला एखादा भाऊ असता तर अधिक बरें झालें असतें.' पित्याचें तें बोलणें ऐकून महाबुद्धिवान् देवव्रत यांनीं मंत्र्यांच्या जवळ सर्व प्रकरणाचा शोध घेतला. मंत्र्यांकडून वृत्त कळतांच ते स्वतः उठून त्या दाशराजाकडे गेले व त्यांनीं त्या कन्येची आपल्या पित्यासाठीं मागणी केली. दाशानें त्यांना असें सांगितलें कीं, 'आपली मागणी मी अमान्य करावी अशा योग्यतेचा मी नाहीं. पण प्रत्येक पित्याला आपल्या कन्येची चिंता स्वाभाविकपणेंच असते. आपल्या येथें मुलगी देण्यांत अत्यंत प्रबल अशा शक्तीचें शत्रुत्व पत्करण्याचा प्रसंग येणें हा एकच दोष मला दिसतो. आपण सर्व दृष्टींनीं सुयोग्य असून कुरुराज्याचे उत्तराधिकारी आहांत. आपण प्रसन्न असलांत तर प्रश्नच नाहीं. पण जर आपण क्रुद्ध झालांत तर ज्याच्यावर आपण क्रुद्ध व्हाल तो देव, गंधर्व इत्यादिकांपैकीं कोणीही असला तरी आपल्या पराक्रमासमोर तो टिकूं वा जगूं शकणार नाहीं हें निश्चित आहे. अशा स्थितींत माझ्या मुलीला आपल्या घरीं देऊन क्वचित् तिच्यावर येणाऱ्या दुःखपरंपरेचेंही मी कारण होण्याचा संभव आहे.' हें ऐकतांच गांगेय भीष्मांना

असें वाटलें कीं, साध्या राज्यावरील अधिकारासाठीं पित्याला दु:खांत टाकण्याचें कारण काय ? त्यांच्या सारख्या महामनस्क व्यक्तीला आपण राज्यावर बसणें व आपला भाऊ राज्यावर बसणें दोन्ही गोष्टी समान आहेत असेंच वाटलें. महाभारतकार म्हणतात:—

एवमुक्तस्तु गाङ्गेयस्तद्युक्तं प्रत्यभाषत ।
शृण्वतां भूमिपालानां पितुरर्थाय भारत ।। ८५
इदं मे व्रतमादत्स्व सत्यं सत्यवतां वर ।
नैव जातो न वा जात ईदृशं वक्तुमुत्सहेत् ।। ८६
एवमेतत्करिष्यामि यथात्वमनुभाषसे ।
योऽस्यां जनिष्यते पुत्रः स नो राजा भविष्यति ।। ८७
इत्युक्तः पुनरेवाथ तं दाशः प्रत्यभाषत ।
चिकीर्षुर्दुष्करं कर्म राज्यार्थे भरतर्षभ ।। ८८
त्वमेव नाथः संप्राप्तः शान्तनोरमितद्युते ।
कन्यायाश्चैव धर्मात्मन्प्रभुर्दानाय चेश्वरः ।। ८९
इदं तु वचनं सौम्य कार्यं चैव निबोध मे ।
कौमारिकाणां शीलेन वक्ष्याम्यहमरिंदम ।। ९०
यत्त्वया सत्यवत्यर्थे सत्यधर्मपरायण ।
राजमध्ये प्रतिज्ञातमनुरूपं तवैव तत् ।। ९१
नान्यथा तन्महाबाहो संशयोऽत्र न कश्चन ।
तवापत्यं भवेद्यत्तु तत्र नः संशयो महान् । ९२

वैशंपायन उवाच ।

तस्यैतन्मतमाज्ञाय सत्यधर्मपरायणः ।
प्रत्यजानात्तदा राजन्पितुः प्रियचिकीर्षया ।। ९३

गाङ्गेय उवाच

दाशराज निबोधेदं वचनं मे नृपोत्तम ।
शृण्वतां भूमिपालानां यद्ब्रवीमि पितुः कृते ।। ९४
राज्यं तावत्पूर्वमेव मया त्यक्तं नराधिपाः ।
अपत्यहेतोरपि च करिष्येऽद्य विनिश्चयम् ।।९५
अद्य प्रभृति मे दाश ब्रह्मचर्यं भविष्यति ।
अपुत्रस्यापि मे लोका भविष्यन्त्यक्षया दिवि ।। ९६

वैशंपायन उवाच ।

तस्य तद्वचनं श्रुत्वा संप्रहृष्टतनूरुहः ।
ददानीत्येव तं दाशो धर्मात्मा प्रत्यभाषत ॥ ९७
ततोऽन्तरिक्षेऽप्सरसो देवाः सर्षिगणास्तदा ।
अभ्यवर्षन्त कुसुमैर्भीष्मोऽयमिति चाब्रुवन् ॥ ९८
ततः स पितुरर्थाय तामुवाच यशस्विनीम् ।
अधिरोह रथं मातर्गच्छावः स्वगृहानिति ॥ ९९
एवमुक्त्वा तु भीष्मस्तां रथमारोप्य भाविनीम् ।
आगम्य हस्तिनपुरं शान्तनोः संन्यवेदयत् ॥ १००
तस्य तद्दुष्करं कर्म प्रशशंसुर्नराधिपाः ।
समेताश्च पृथक्चैव भीष्मोऽयमिति चाब्रुवन् ॥ १०१
तच्छ्रुत्वा दुष्करं कर्म कृतं भीष्मेण शान्तनुः ।
स्वच्छन्दमरणं तुष्टो ददौ तस्मै महात्मने ॥ १०२
न ते मृत्युः प्रभविता यावज्जीवितुमिच्छसि ।
त्वत्तो ह्यनुज्ञां संप्राप्य मृत्युः प्रभवितानघ ॥ १०३

—महाभारत, आदिपर्व अध्याय १००

याप्रमाणें तो दाशराज बोलत असतां बरोबरीच्या सामंतांसमोर भीष्मांनीं अशी प्रतिज्ञा केली कीं, हे दाशराज, मी कधींही खोटें बोलत नाहीं. मी तुझ्यासमोर अशी प्रतिज्ञा करतों कीं, " या तुझ्या मुलीला जो पुत्र होईल, तोच आमचा राजा होईल. सहसा कोणीही जें बोलूं शकणार नाहीं तें मी बोलत आहें. मी माझा राज्यावरील अधिकार सोडला."

याप्रमाणें भीष्मांची वाणी ऐकतांच कन्येच्या राज्यलाभासाठीं वाटेल तें करावयास सिद्ध असलेल्या त्या लोभी दाशानें असें सांगितलें कीं, ' महाराज शांतनु व ही कन्या आपल्या स्वाधीन आहेत. आपण ही कन्या त्यांना देऊं शकतां. पण कन्यापिता म्हणून आणखी एक गोष्ट मला बोलाविशी वाटते. आपण सत्यधर्मपरायण आहांत, जी प्रतिज्ञा आपण केलीत तशी दुष्कर प्रतिज्ञा आपल्यावांचून दुसरें कोणीही करूं शकणार नाहीं. आपल्यापासून माझ्या मुलीला व तिच्या संतानाला कांहीं एक भय नाहीं हें खरें. पण

आपल्या संतानापासून असें भय उत्पन्न होण्याचा संभव नाहीं काय? पित्याचें प्रिय करणें ही गोष्ट भीष्मांच्या दृष्टीनें इतकी महत्त्वाची होती कीं, त्यांनीं त्याच्यासमोर दुसरी प्रतिज्ञा उच्चारली. ते म्हणाले, "हे दाशराज, मी पुन्हां दुसरी प्रतिज्ञा करतों. मी राज्याचा तर पूर्वींच त्याग केला आहे. पण आजपासून मी ब्रह्मचर्य पाळीन. मी अपुत्र राहिलों तरीही माझ्या सामर्थ्यानें मी अक्षय लोकांची प्राप्ति करून घेईन." त्यांचें तें वाक्य ऐकतांच आश्चर्याचे रोमांच अंगावर उभे राहिलेल्या दाशानें ती मुलगी भीष्मांच्या स्वाधीन केली. अंतरिक्षांतून देव, ऋषि नि अप्सरा यांनीं देवव्रतावर पुष्पवर्षाव केला. व त्यांना 'भीष्म' म्हणून संबोधन दिलें. भीष्म त्या सत्यवतीला म्हणाले, 'माते, तूं रथांत बैस. आपण आपल्या घरीं जाऊं.' त्या कन्येसह भीष्म हस्तिनापुरांत परत आले व त्यांनीं ती कन्या आपल्या पित्याला समर्पण केली. त्यांचें तें दुष्कर कर्म पाहून मोठमोठे राजे व लोक त्यांची एकांतांत व लोकांत अत्यंत प्रशंसा करूं लागले. पित्यानें त्यांना असें वरदान दिलें कीं, "तूं स्वच्छंदमरणी होशील." मृत्यु तुझ्यावर सत्ता गाजवूं शकणार नाहीं. तूं मात्र मृत्यूवर सत्ता गाजविशील."

राजर्षि भीष्मांनीं ही जी प्रतिज्ञा केली ती ज्या धर्मशास्त्राच्या व जीवनमूल्यांच्या महानिधीचे ते प्रतिनिधि होते त्यांच्या दृष्टीनें अत्यंत श्रेष्ठ होती. भारतीय संस्कृतींत पितृगौरव ही अत्यंत श्रेष्ठ गोष्ट असून तिच्यासाठीं हवा तो त्याग केलेलीं अनेक महापुरुषांचीं उदाहरणें येथें आढळून येतील. भगवान् श्रीरामचंद्रांनीं पित्यासाठीं राज्यलक्ष्मीचा त्याग केला व देवव्रत भीष्मांनीं राज्य व गृहस्थाश्रम पित्यासाठींच त्यागिला. भीष्मांचे वडील शांतनु यांनीं ही दुष्कर प्रतिज्ञा करावयास भीष्मांना मुळींच सांगितलें नव्हतें. त्यांनीं तशी प्रतिज्ञा करणें, त्यांना संमतही असण्याचें कारण नव्हतें. जर त्यांना ही गोष्ट प्रथम कळती, तर त्यांनीं असें कांहीं होऊं दिलेंही नसतें. पण त्यांच्या नकळतच भीष्मांनीं ही प्रतिज्ञा केली. विवाहासाठीं एवढें मोठें मूल्य द्यावें लागेल हें शांतनूला मुळींच माहीत नव्हतें. राज्याधिकाराची गोष्ट सत्यवतीच्या पित्यानें काढतांच शांतनूनें

त्याला स्पष्ट शब्दांत नकार दिला होता. त्यानें विवाहाची इच्छाच कां केली हा वाद अगदींच व्यर्थ आहे. प्रेमिकांच्या वेड्या जगांत या गोष्टीचें मोल केवढेंही असलें तरी जगतांतील सर्व समाजशास्त्रांत प्रत्यक्ष आजदेखील द्वितीय पत्नी करणें ही गोष्ट असंमत, चुकीची अथवा सामाजिक प्रतिष्ठेला कमीपणा आणणारी आहे असें कोणीही समजत नाहीं. एक पत्नी गेल्यावर वा ती सदाची संपल्यावर दुसरा विवाह करणें ही गोष्ट असंमत असलेला कोणताही समाज दाखवून देतां येणार नाहीं. ती एक सोय आहे व ती धर्मशास्त्रानें मान्यता पावलेली, समाजशास्त्रानें मान्य केलेली, नीतिशास्त्रानें मुळींच गर्ह्य न मानलेली अशा प्रकारची सोय आहे. सामाजिक सुस्थितीच्या दृष्टीनें ती अत्यंत अवश्यही आहे. महाराज शांतनूनें गंगा अंतर्धान पावल्यावर व पत्नी या नात्यानें ती मिळण्याचा संभव पूर्णपणें नष्ट झाल्यावर द्वितीय विवाह करण्यांत काय बिघडलें ? जी गोष्ट आजचे मी मी म्हणविणारे तथाकथित पुरोगामीसुद्धां करावयाचें सोडीत नाहींत ती शांतनूनें केल्याबरोबर व तीही पांच हजार वर्षांपूर्वींच्या समाजरचनेंतील नीतिकल्पनांना पूर्णपणें अनुसरून असलेली अशीच गोष्ट केल्यावर त्यासंबंधांत त्याला दूषण देण्यासारखें कांहीं नाहीं. व्यक्ति एकपत्नीव्रतधारी राहिली तर त्या विशिष्ट बाबीपुरतें तिचें श्रेष्ठ स्थान कोणीही मान्य करील. पण दुसरी व्यक्ति तशी न राहूं शकली व तिनें योग्य कारणास्तव द्वितीय विवाह केला तर त्याबद्दल तिला दोष मुळींच देतां येत नाहीं. एकपत्नीव्रतधारी व्यक्तीचें जें श्रेष्ठ स्थान त्याची जोंवर त्या बाबतींत शांतनु अपेक्षा करीत नाहीं तोंवर त्याला तरी दोष देतां येत नाहीं. शिवाय तो वलीपलित नि गलितगात्र नि वृद्ध जसा नाहीं, त्याचप्रमाणें सत्यवतीदेखील बाला नाहीं. अशा स्थितींत या विवाहाला दूषण देण्यासारखें कांहीं नाहीं. त्यानें जर आपल्या विवाहासाठीं भीष्मांच्या अधिकारांवर स्वतः कांहीं आक्रमण केलें असतें अथवा भीष्मांनीं त्याच्यासमोर ही प्रतिज्ञा करीत असतां त्यानें त्यांना थांबविण्याचा प्रयत्न केला नसता वा तसें करण्यासाठीं कांहीं उत्तेजना दिली असती तर मात्र त्याला निश्चित दोष देतां आला

असता. पण तसें कांहीं घडलेलें नाहीं. त्यानें भीष्माच्या जवळ उघड नाहीं तरी व्यंगार्थानें आपली विवाहाची व अधिक पुत्रांची इच्छा ध्वनित केली आहे हें खरें आहे. पण अमक्या एका विशिष्ट मुलीशीं आपल्याला विवाह करावयाचा आहे, त्याच्या अशा अशा अटी आहेत व त्या पुरविणें अवश्य आहे असें त्यानें कोठेंही सुचविलेलें नाहीं. मोकळेपणानें त्यानें नुसती इच्छा व्यक्त करणें हा कांहीं सामाजिक अगर व्यक्तिगत अपराध होऊं शकत नाहीं.

## भीष्मांची भूमिका

भीष्म हे एक अलौकिक महापुरुष आहेत. स्वतःला त्यांना स्वार्थाचा लवलेशही स्पर्श करीत नाहीं. त्यामुळें राज्यलोभ ही जी सर्वसामान्य व्यक्तीच्या बाबतींत अत्यंत नैसर्गिक अशी बाब, तिच्यावर त्यांनीं केव्हांच विजय मिळविलेला असल्यामुळें हक्काच्या वा उपभोगाच्या परिभाषेचा उदय पुरुषोत्तम श्रीरामचंद्रांप्रमाणें त्यांच्याही अंतःकरणांत होऊं शकत नाहीं. त्यामुळें प्रतिज्ञा करण्याचे वेळीं आपल्या पित्याला सुखी करणें व त्यासाठीं लोकांच्या दृष्टीनें अलौकिक पण त्यांच्या महान् अंतःकरणाच्या दिव्य धारणेच्या दृष्टीनें एका सामान्य गोष्टीचा त्याग करणें हें त्यांना सहजच योग्य वाटलें. राज्य आपण केलें काय अथवा भावानें केलें काय, कौरवांच्या कुळांत तें नांदणें एवढी एकच गोष्ट त्यांच्या दृष्टीनें महत्त्वाची होती. अशा स्थितींत रामानें ज्याप्रमाणें राज्य भरताला गेलें काय अथवा स्वतःला राहिलें काय ही भूमिका पत्करिली तीच राजर्षि भीष्मांनींही पत्करिली आहे. भाऊ अल्पायुषी निघणार आहेत याची त्यांना काय कल्पना ? व भावाच्या नातवांच्या तारुण्याच्या अवस्थेंत उत्पन्न झालेले झगडे त्यांना कसे कळणार! व असे झगडे व्हावयाचेच असतील तर ते स्वतः भीष्मांनीं लग्न करून त्यांच्या नातवांत झाले नसते कशावरून ? भीष्म ज्याप्रमाणें शांतनूला एकटेच चिरंजीव होते, त्याप्रमाणें त्यांना अथवा त्यांच्या मुलाला एकेकच मुलगा राहिला असता असेंच कोणाला म्हणावयाचें असलें तर 'तुष्यतु दुर्जनः' म्हणून त्यांना वंदन करणें हा एकच मार्ग

आहे. तात्पर्य, पित्याच्या आनंदाप्रीत्यर्थ महानुभाव भीष्मांनीं राज्याचा परित्याग करण्यांत व संसाराचाही परित्याग करण्यांत भारतीय आर्यांची त्यागाची महनीय परंपराच चालविलेली आहे. संपत्ति हें जीवनाचें सारसर्वस्व समजणाऱ्या व सांसारिक मोह-पाशांच्या सुवर्णशृंखला मानेभोंवतीं अधिकाधिक आवळत बसणाऱ्या सामान्य हृदयांना या महनीय त्यागांतील महत्तेची कल्पना करवणार नाहीं हें उघडच आहे. त्यांच्या प्रतिज्ञेंतील एकाच पाशानें मात्र ते बांधले गेले. त्या बाबतींतलें आपलें स्वातंत्र्य जर त्यांनीं राखलें असतें तर पुढील भीषण प्रसंगांत आपल्या वचनाच्या मर्यादेंत सांपडून स्वतः मानसिक यातना अनुभवण्याचा घोर प्रसंग त्यांच्यावर कधींच आला नसता. पण त्यांनीं राज्यावरचा अधिकार सोडून पूर्ण स्वातंत्र्य न पत्करतां "स नो राजा भविष्यति" "तो आमचा राजा होईल" असें म्हणण्यांत स्वतःला सिंहासनाच्या अधिकाराच्या मर्या-देंत गोवून घेतलें. अर्थात् क्षत्रियोचित राजनिष्ठ प्रजाजनांप्रमाणें ते कौरवांच्या राजसभेचे सामंत व मंत्री राहिले. राज्ययंत्रावर त्यांनीं अधिकार गाजविणें नैतिकदृष्ट्या कितीही योग्य असलें तरी घटना-त्मक दृष्टीनें ते राज्ययंत्राचे वचनानें बांधलेले सेवक राहिले. नियं-त्रक राहिले नाहींत ही गोष्ट मुख्यतः, त्यांच्या चरित्रांतील सर्व घटनांचें निरीक्षण करीत असतां, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें मूल्यमापन करीत असतां व त्यांच्यावर नानाविध दोषारोप करीत असतां नेह-मींच ध्यानांत ठेविली पाहिजे.

## भीष्मांचें सत्यसंधत्व व त्यांची दैवाशीं झुंज

एकदां भीष्मांनीं माता म्हणून सत्यवतीला घरीं आणल्या-वर तिच्याशीं मातेप्रमाणेंच विनम्र व आज्ञांकित वर्तन ठेवून राज्ययंत्रांतली अथवा कौटुंबिक अशी कोणतीही महत्त्वाची बाब तिला विचारल्यावांचून अथवा तिची प्रथम संमति घेतल्यावांचून त्यांनीं जशी केली नाहीं, तशीच कोणतीही गोष्ट घडल्यावर तिला ती सांगितल्याशिवाय ते राहिले नाहींत. नेहमीं त्यांच्या बाबतींत

महाभारतांत 'सत्यवत्या मते स्थितः' असे शब्द येतात. इतकेंच नव्हे तर परशुरामांशीं घोर संग्राम करावयास भीष्म ज्या वेळीं गेले त्या वेळीं सुद्धां सत्यवतीला प्रथम निवेदन करून नंतरच ते गेलेले आहेत.

**प्रविश्य नगरं चाहं सत्यवत्यै न्यवेदयम् ।। ७२**

**ततः कृतस्वस्त्ययनो मात्रा च प्रतिनन्दितः । ७३**

**--महाभारत, उदयोगपर्व अध्याय १७८**

मातृभक्त भीष्म कुरुराज्याचे संरक्षक व सेवक या नात्यानें याप्रमाणें आपलें जीवन घालवीत असतां दैवानें जणूं कीं काय त्यांच्याशीं झुंजच घेतली होती. सत्यवतीला चित्रांगद व विचित्रवीर्य अशीं दोन मुलें झालीं. चित्रांगद हा अत्यंत पराक्रमी असून अत्यंत युद्धप्रिय असे. शांतनूच्या निधनानंतर भीष्मांनीं चित्रांगदाला सत्यवतीच्या अनुमतीनें राज्याभिषेक केला. पण चित्रांगद या नांवाच्या एका बलवान् गंधर्वाशीं सरस्वतीनदीच्या तीरावर त्याचें मोठें भीषण युद्ध होऊन त्या युद्धांत त्या गंधर्वाकडून चित्रांगद मारला गेला. भीष्मांना या बंधुनिधनाचें अत्यंत दुःख झालें. धाकटा भाऊ विचित्रवीर्य त्यावेळीं तारुण्याच्या सीमेवर येऊन न पोंचलेला बाल होता. तरी पण भीष्मांनीं त्यालाच राज्यावर बसविलें व कारभारी म्हणून स्वतः गादी चालविली.

**विचित्रवीर्यं च तदा बालमप्राप्तयौवनम् ।**

**कुरुराज्ये महाबाहुरभ्यषिञ्चदनन्तरम् ।। १२**

**विचित्रवीर्यः स तदा भीष्मस्य वचने स्थितः ।**

**अन्वशासन्महाराज पितृपैतामहं पदम् ।। १३**

**स धर्मशास्त्रकुशलं भीष्मं शान्तनवं नृपः ।**

**पूजयामास धर्मेण स चैनं प्रत्यपालयत् ।। १४**

**—महाभारत आदिपर्व अध्याय १०१**

विचित्रवीर्य भीष्मांच्या आज्ञेंत राहून पितृपितामहापासून परंपरेनें चालत आलेलें राज्यपद चालवूं लागला. धर्मशास्त्रकुशल भीष्मांचा मान तो दक्षतेनें राखीत असे व भीष्मही त्याचें प्रतिपालन करीत. भीष्मांनींच मोठ्या समारंभानें त्याचा विवाह केला. त्यांनीं सर्व राजसत्तांचा पराभव करून काशिराजाच्या अम्बिका व

अम्बालिका या आणलेल्या दोन मुलींशीं त्याचा विवाह केला. भीष्मांना राज्ययंत्र आतां सुरळीत चालू लागेल व आपली चिंता दूर होईल असें वाटलें. पण स्वतःचा संसार सोडलेल्या भीष्मांनीं एकाहून एक दुःखाचे प्रसंग पाहून राज्ययंत्राचा सारा संसार करीत राहणें हाच त्यांच्यासाठीं ठरलेला विधिसंकेत होता. त्यामुळें त्यांच्या त्या कल्पना हवेंतच विरल्या. महाभारतकार म्हणतात :—

**अम्बिकाम्बालिके भार्ये प्रादाद् भ्रात्रे यवीयसे ।**
**भीष्मो विचित्रवीर्याय विधिदृष्टेन कर्मणा ।। ६५**
**तयोः पाणी गृहीत्वा तु रूपयौवनदर्पितः ।**
**विचित्रवीर्यो धर्मात्मा कामात्मा समपद्यत ।। ६६**
**ते चापि बृहती श्यामे नीलकुञ्चितमूर्धजे ।**
**रक्ततुङ्गनखोपेते पीनश्रोणिपयोधरे ।। ६७**
**आत्मनः प्रतिरूपोऽसौ लब्धः पतिरिति स्थिते ।**
**विचित्रवीर्यं कल्याण्यौ पूजयामासतुः शुभे ।। ६८**
**स चाश्विरूपसदृशो देवतुल्यपराक्रमः ।**
**सर्वासामेव नारीणां चित्तप्रमथनो रहः ।। ६९**
**ताभ्यां सह समाः सप्त विहरन्पृथिवीपतिः ।**
**विचित्रवीर्यस्तरुणो यक्ष्मणा समगृह्यत ।। ७०**
**सुहृदां यतमानानामाप्तैः सह चिकित्सकैः ।**
**जगामास्तमिवादित्यः कौरव्यो यमसादनम् ।। ७१**
**धर्मात्मा स तु गाङ्गेयश्चिन्ताशोकपरायणः ।**
**प्रेतकार्याणि सर्वाणि तस्य सम्यगकारयत् ।। ७२**
**राज्ञो विचित्रवीर्यस्य सत्यवत्या मते स्थितः ।**
**ऋत्विग्भिः सहितो भीष्मः सर्वैश्च कुरुपुङ्गवैः ।। ७३**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १०२

नंतर भीष्मांनीं अम्बिका व अम्बालिका या काशिराजाच्या दोन मुलींशीं विचित्रवीर्याचा विधिपूर्वक विवाह करून दिला. त्या लावण्यवती धर्मपत्नींच्या सहवासांत तरुण विचित्रवीर्य मर्यादातीत कामी बनला व शेवटीं त्याला क्षय झाला. सुहृदांनीं व चिकित्सकांनीं अनेकवार प्रयत्न करूनही त्याचा कांहींएक उपयोग न होऊन शेवटीं

तो मृत्युमुखीं पडला. धर्ममूर्ति भीष्म पुनश्च चिंतामग्न झाले. त्यांनीं राजाचें उत्तरकार्य यथाविधि केलें. यानंतर मात्र कौरव राजकुलाचा पूर्णपणें निर्वंश होण्याची वेळ आली. वंशाला भीष्मा-शिवाय दुसरा तंतु नव्हता व सिंहासनाला कोणीही राज्याधिकारी नव्हता.

## भीष्माची सत्यसंधता

अशा स्थितींत जिच्यासाठीं भीष्मांनीं राज्याधिकार सोडला व ब्रह्मचर्य स्वीकारलें ती देवी सत्यवती भीष्माकडे येऊन प्राप्त परि-स्थितींत वंश व राज्य चालविण्यासाठीं गृहस्थाश्रम स्वीकारण्याची व राजा या नात्यानें सिंहासन अंगीकारण्याची त्यांना दीनपणें प्रार्थना करूं लागली. प्रजांनींही भीष्मांच्या दाराशीं आक्रोश करून त्यांना राज्य स्वीकारण्याविषयीं आग्रह चालविला. एका बाजूला सत्य-संधता व दुसऱ्या बाजूला परिस्थितिप्राप्त कर्तव्य यांच्या कैचींत भीष्म पुन्हां अडकले. त्यांनीं काय केलें असेल? महाभारतांत यासंबंधीं पुढीलप्रमाणें वर्णन आहे :—

वैशंपायन उवाच ।

ततः सत्यवती दीना कृपणा पुत्रगृद्धिनी ।
पुत्रस्य कृत्वा कार्याणि स्नुषाभ्यां सह भारत ॥ १
समाश्वास्य स्नुषे ते च भीष्मं शस्त्रभृतां वरम् ।
धर्मं च पितृवंशं च मातृवंशं च भाविनी ।
प्रसमीक्ष्य महाभागा गाङ्गेयं वाक्यमब्रवीत् ॥ २
शान्तनोर्धर्मनित्यस्य कौरव्यस्य यशस्विनः ।
त्वयि पिण्डश्च कीर्तिश्च संतानं च प्रतिष्ठितम् ॥ ३
यथा कर्म शुभं कृत्वा स्वर्गोपगमनं ध्रुवम् ।
यथा चायुर्ध्रुवं सत्ये त्वयि धर्मस्तथा ध्रुवः ॥ ४
वेत्थ धर्मांश्च धर्मज्ञ समासेनेतरेण च ।
विविधास्त्वं श्रुतीर्वेत्थ वेदाङ्गानि च सर्वशः ॥ ५
व्यवस्थानं च ते धर्मे कुलाचारं च लक्षये ।
प्रतिपत्तिं च कृच्छ्रेषु शुक्राङ्गिरसयोरिव ॥ ३

तस्मात्सुभृशमाश्वस्य त्वयि धर्मभृतां वर ।
कार्ये त्वां विनियोक्ष्यामि तच्छ्रुत्वा कर्तुमर्हसि ॥ ७
मम पुत्रस्तव भ्राता वीर्यवान्सुप्रियश्च ते ।
बाल एव गतः स्वर्गमपुत्रः पुरुषर्षभ ॥ ८
इमे महिष्यौ भ्रातुस्ते काशिराजसुते शुभे ।
रूपयौवनसंपन्ने पुत्रकामे च भारत ॥ ९
तयोरुत्पादयापत्यं संतानाय कुलस्य नः ।
मन्नियोगान्महाबाहो धर्मं कर्तुमिहार्हसि ॥ १०
राज्ये चवाभिषिच्यस्व भारताननुशाधि च ।
दारांश्च कुरु धर्मेण मा निमज्जीः पितामहान् ॥ ११
तथोच्यमानो मात्रा स सुहृद्भिश्च परंतपः ।
इत्युवाचाथ धर्मात्मा धर्म्यमेवोत्तरं वचः ॥ १२
असंशयं परो धर्मस्त्वया मातरुदाहृतः ।
त्वमपत्यं प्रति च ते प्रतिज्ञां वेत्थ वै पराम् ॥ १३
जानासि च यथा वृत्तं शुल्कहेतोस्त्वदन्तरे ।
स सत्यवति सत्यं ते प्रतिजानाम्यहं पुनः ॥ १४
परित्यजेयं त्रैलोक्यं राज्यं देवेषु वा पुनः ।
यद्वाऽप्यधिकमेताभ्यां न तु सत्यं कथंचन ॥ १५
त्यजेच्च पृथिवी गन्धमापश्च रसमात्मनः ।
ज्योतिस्तथा त्यजेद्रूपं वायुः स्पर्शगुणं त्यजेत् ॥ १६
प्रभां समुत्सृजेदर्को धूमकेतुस्तथोष्णताम् ।
त्यजेच्छब्दं तथाकाशं सोमः शीतांशुतां त्यजेत् ॥ १७
विक्रमं वृत्रहा जह्याद्धर्मं जह्याच्च धर्मराट् ।
न त्वहं सत्यमुत्स्रष्टुं व्यवसेयं कथंचन ॥ १८
एवमुक्ता तु पुत्रेण भूरिद्रविणतेजसा ।
माता सत्यवती भीष्ममुवाच तदनन्तरम् ॥ १९
जानामि ते स्थितिं सत्ये परां सत्यपराक्रम ।
इच्छन्सृजेथास्त्रींल्लोकानन्यांस्त्वं स्वेन तेजसा ॥ २०
जानामि चैवं सत्यं तन्मदर्थे यच्च भाषितम् ।
आपद्धर्मं त्वमावेक्ष्य वह पैतामहीं धुरम् ॥ २१

यथा ते कुलतन्तुश्च धर्मश्च न पराभवेत् ।
सुहृदश्च प्रहृष्येरंस्तथा कुरु परंतप ।। २२
लालप्यमानां तामेवं कृपणां पुत्रगृद्धिनीम् ।
धर्मादपेतं ब्रुवतीं भीष्मो भूयोऽब्रवीदिदम् ।। २३
राज्ञि धर्मानवेक्षस्व मा नः सर्वान्व्यनीनशः ।
सत्याच्च्युतिः क्षत्रियस्य न धर्मेषु प्रशस्यते ।। २४
शान्तनोरपि सन्तानं यथा स्यादक्षयं भुवि ।
तत्ते धर्मं प्रवक्ष्यामि क्षात्रं राज्ञि सनातनम् ।। २५
श्रुत्वा तं प्रतिपद्यस्व प्राज्ञैः सह पुरोहितैः ।
आपद्धर्मार्थकुशलैर्लोकतन्त्रमवेक्ष्य च ।। २६

—महाभारत, आदिपर्व अ. १०३

"नंतर पुत्रवत्सल सत्यवती आपल्या सुनांसह पुत्रांचें और्ध्वदेहिक करून व सुनांचें सांत्वन करून शस्त्रधारी लोकांमध्यें सर्वश्रेष्ठ अशा भीष्माकडे आली. मातृवंश आणि धर्म यांचा पूर्णपणें विचार करून ती दीन होऊन भीष्मांना म्हणाली कीं, महाराज शांतनूचा पिंड, कीर्ति व संतान आतां तुझ्या एकट्यामध्येंच प्रतिष्ठा पावलें आहे. सर्व धर्मांचें, वेदांचें व वेदांगांचें तुला संपूर्ण ज्ञान असून अडचणींतून मार्ग कसा काढावा यासंबंधीं तुझी विचक्षणता बृहस्पति व शुक्राचार्य यांच्या योग्यतेची आहे. म्हणून तुझ्याविषयीं मला विश्वास वाटून परिस्थितीमुळेंच चालून आलेलें विशिष्ट जबाबदारीचें काम तुझ्यावर सोंपविण्याची मी इच्छा करतें. मी काय म्हणतें तें नीट ऐकून तदनुसार तूं वर्तन करावें हेंच तुला योग्य आहे. माझा पुत्र व तुझा भ्राता सामर्थ्यवान् असून तुझें त्याच्यावर अत्यंत प्रेम होतें. तो निपुत्रिक अवस्थेंत प्रौढ होण्याआधींच स्वर्गास गेला. त्याच्या या राण्या पुत्रकाम व रूपयौवनसंपन्न असून नियोगविधीनें तूं त्यांना पुत्र दिले पाहिजेस. माझी ही तुला आज्ञा आहे व त्या आज्ञेप्रमाणें धर्माच्या कक्षेंत बसणारी ही गोष्ट तूं केली पाहिजेस. स्वतःला तूं राज्यावर अभिषेक करून घे. भारतीय प्रजेचें प्रतिपालन कर. धर्मानुसार विवाह कर. वंश नष्ट झाला म्हणून तुझे पूर्वज दुर्गतींत न पाडणें हेंच तुझें कर्तव्य आहे. याप्रमाणें माता नि सुहृद वारंवार

सांगत असतां धर्मनिष्ठ भीष्म आपल्या प्रतिज्ञेस अनुसरून वागण्याचा मनांत निश्चय करून मातेला म्हणूं लागले कीं, हे माते, तूं जी गोष्ट मला सांगतेस ती धर्मदृष्टचा अत्यंत योग्य आहे यांत शंका नाहीं. पण अपत्याच्या बाबतींत मी केलेली प्रतिज्ञा तुला माहीत नाहीं काय ? तुझ्याचसाठीं म्हणून ती प्रतिज्ञा झाली होती. प्रतिज्ञेच्या सत्याशीं माझ्यासारख्याला प्रतारणा कशी करतां येईल ? त्रैलोक्याचें व देवादिकांचेंही राज्य अथवा त्याहूनही अधिक मोठें ऐश्वर्य माझ्या पायाशीं चालत आलें तरी मी त्यांचाही परित्याग करीन. पण सत्याचा परित्याग कधींच करणार नाहीं. पृथ्वी आपला गंध सोडील, आप रसाचा परित्याग करील, ज्योति तत्त्वरूपाचा परित्याग करील, वायु स्पर्शगुणाचा परित्याग करील, सूर्य प्रभेचा परित्याग करील, धूमकेतु ऊष्म्याचा परित्याग करील. आकाश शब्दगुण सोडील, चंद्र शीतल राहणार नाहीं, इंद्र पराक्रम सोडून देईल, कदाचित् धर्मराज धर्माचा परित्याग करील, पण भीष्म सत्याचा परित्याग कधींही करणार नाहीं. मग परिस्थिति कोणतीही असो. याप्रमाणें अत्यंत तेजस्वी भीष्म स्पष्ट बोलल्यावर माता सत्यवती त्यांना म्हणाली कीं, हे सत्यपराक्रमा, सत्यावरील तुझी अढळ निष्ठा मी जाणतें. तुझें तेज इतकें सामर्थ्यवान् आहे कीं तूं मनांत आणशील तर नवें त्रैलोक्य उत्पन्न करूं शकशील. सत्यधर्मावरील तुझी निष्ठा व माझ्यासाठीं तूं केलेली प्रतिज्ञा या दोन्ही गोष्टींचें मला पूर्ण ज्ञान आहे. पण आपद्धर्म कांहीं आहेच कीं नाहीं ? त्या आपद्धर्माकडे पाहून या वंशपरंपरागत चालत आलेल्या राज्याचा भार तुझ्याशिवाय दुसरें कोण यानंतर संभाळू शकणार आहे ? आपला वंश नष्ट होणार नाहीं, धर्माचा नाश होणार नाहीं, सुहृदांना आनंद होईल असें करणें तुझें कर्तव्य आहे. याप्रमाणें सत्यवती दीनपणें विलाप करीत वारंवार बोलत होती. पण तिचें तें सर्व बोलणें क्षात्रधर्माची प्रतिष्ठा ज्यावर अवलंबून आहे त्या सत्यधर्म्याच विरुद्ध असल्यामुळें भीष्मांनीं तें मान्य केलें नाहीं. ते म्हणाले, ‘महाराणी, आम्हां सर्वांचा ज्याच्यांत विनाश ओढवेल असें सत्यधर्माचा नाश करणारें कृत्य करावयास मला तूं आग्रह करूं नकोस.

धर्माकडे पहा. सत्यधर्मापासून भ्रष्ट होणें क्षात्रधर्माला मान्य नाहीं. महाराज शांतनूचा वंश चालावा अशी व्यवस्था करण्यासाठीं धर्मशास्त्रानेंच क्षत्रियांना घालून दिलेले दुसरे अनेक मार्ग आहेत. प्राज्ञपुरोहित, आपद्धर्माचें मर्म ओळखणारे इतर कुशल धर्मशास्त्रज्ञ व हल्लीं लोकांत चालू असलेला रूढ निर्बंध या सर्वांना अनुसरून शांतनूचा वंश पुढें कसा चालेल याचा मार्ग मी तुला सांगतों."

पुढील उतारा उद्योगपर्वांतील आहे. तेथें भीष्म स्वतःच कौरवांच्या राजसभेंत हें वृत्त सांगत आहेत. ते म्हणतात :--

**स्वर्यातेऽहं पितरि तं स्वराज्ये सन् न्यवेशयम् ।**
**विचित्रवीर्यं राजानं भृत्यो भूत्वा ह्यधश्चरः ॥ २२**
**तस्याहं सदृशान् दारान् राजेन्द्र समुपाहरम् ॥**
**जित्वा पार्थिवसङ्घातमपि ते बहुशः श्रुतम् ॥ २३**
**ततो रामेण समरे द्वन्द्वयुद्धमुपागमम् ।**
**स हि रामभयादेभिर्नागरैर्विप्रवासितः ॥ २४**
**दारेष्वप्यतिसक्तश्च यक्ष्माणं समपद्यत ।**
**यदा त्वराजके राष्ट्रे न ववर्ष सुरेश्वरः ।**
**तदाऽभ्यधावन्मामेव प्रजाः क्षुद्भयपीडिताः ॥ २५**

प्रजा ऊचुः ।

**उपक्षीणाः प्रजाः सर्वा राजा भव भवाय नः ।**
**ईतीः प्रणुद भद्रं ते शान्तनोः कुलवर्धन ॥ २६**
**पीड्यन्ते ते प्रजाः सर्वा व्याधिभिर्भृशदारुणैः ।**
**अल्पावशिष्टा गाङ्गेय ताः परित्रातुमर्हसि ॥ २७**
**व्याधीन् प्रणुद वीर त्वं प्रजा धर्मेण पालय ।**
**त्वयि जीवति मा राष्ट्रं विनाशमुपगच्छतु ॥ २८**

भीष्म उवाच ।

**प्रजानां क्रोशतीनां वै नैवाक्षुभ्यत मे मनः ।**
**प्रतिज्ञां रक्षमाणस्य सद्वृत्तं स्मरतस्तथा ॥ २९**
**ततः पौरा महाराज माता काली च मे शुभा ।**
**भृत्याः पुरोहिताचार्या ब्राह्मणाश्च बहुश्रुताः ॥**
**मामूचुर्भृशसंतप्ता भव राजेति सन्ततम् ॥ ३०**

प्रतीपरक्षितं राष्ट्रं त्वां प्राप्य विनशिष्यति ।
स त्वमस्मद्धितार्थं वै राजा भव महामते ।। ३१
इत्युक्तः प्राञ्जलिर्भूत्वा दुःखितो भृशमातुरः ।
तेभ्यो न्यवेदयं तत्र प्रतिज्ञां पितृगौरवात् ।। ३२
ऊर्ध्वरेता ह्यराजा च कुलस्यार्थे पुनः पुनः ।
विशेषतस्त्वदर्थं च धुरि मा मां नियोजय ।। ३३
ततोऽहं प्राञ्जलिर्भूत्वा मातरं संप्रसादयम् ।
नाम्ब शान्तनुना जातः कौरवं वंशमुद्वहन् ।। ३४
प्रतिज्ञां वितथां कुर्यामिति राजन् पुनः पुनः ।
विशेषतस्त्वदर्थं च प्रतिज्ञां कृतवानहम् ।। ३५
अहं प्रेष्यश्च दासश्च तवाद्य सुतवत्सले ।
एवं तामनुनीयाहं मातरं जनमेव च ।। ३६

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १४७

"वडील स्वर्गलोकाला गेल्यावर मी विचित्रवीर्याला राज्यावर बसवून त्याचा भृत्य बनून राज्यकारभार पाहूं लागलों. त्याचा मी विवाह करून दिला. नंतर जामदग्न्य रामाशीं माझें द्वंद्वयुद्ध झालें. त्या युद्धांत मी गुंतलों असतां प्रजा हस्तिनापूर सोडून पळून गेल्या. नंतर विचित्रवीर्य कामात्मा बनून क्षय रोगानें मृत्युवश झाला. राज्यांत अराजक उत्पन्न होऊन त्यांतच दुष्काळही आला. अशा स्थितींत क्षुधेच्या भयानें पीडिलेल्या सर्व प्रजा मलाच आपला आधार समजून माझ्याकडे आल्या व मला विनंति करूं लागल्या कीं सर्व प्रजा क्षीण होत आहेत. आपला कुळधर्म म्हणून तूं आमचा राजा हो. आमचें दुःख दूर कर. हे शांतनूच्या कुलवर्धना, अत्यंत दारुण व्याधींनीं सर्व प्रजा पीडा पावत आहेत. कित्येक लोक संपले. त्यांचें संरक्षण करणें हें तुझें कर्तव्य आहे. सर्व दुःखांचा नायनाट करून तूंच धर्मशास्त्रानुसार आपल्या प्रजेचें पालन केलें पाहिजेस. तूं जिवंत असतांना या राष्ट्राचा विनाश न झाला पाहिजे. पण हा आक्रोश ऐकून माझें मन माझ्या प्रतिज्ञेपासून मुळींच विचलित झालें नाहीं. शीलवान् क्षत्रियाच्या चारित्र्याप्रमाणें मी वागत होतों व तसें वागण्याचा माझा दृढ निश्चय झाला होता. भृत्य, पुरोहित, आचार्य,

बहुश्रुत ब्राह्मण, प्रजाजन व माझी माता सत्यवती शोकसंतप्त होऊन वारंवार प्रतीपानें संरक्षण केलेलें हें राज्य तुझ्यामुळें विनाश न पावलें पाहिजे, आमच्या हितासाठीं तूं राजा हो, अशी वारंवार विनंती करूं लागले. तेव्हां मी हात जोडून नि साष्टांग नमस्कार घालून त्यांना व मातेला असें सांगितलें कीं, पित्यासाठीं मी सिंहासनावर न बसण्याची व ऊर्ध्वरेता ब्रह्मचर्य पाळण्याची जी घोर प्रतिज्ञा केली आहे ती मी कोणत्याही परिस्थितींत मोडूं शकत नाहीं. कौरवांच्या कुळांत उत्पन्न झालेला व शांतनूसारख्या धर्मनिष्ठ राजाचें नांव पिता म्हणून उच्चारण्यांत गौरव मानणारा माझ्यासारखा पुरुष आपली प्रतिज्ञा कधींही खोटी करूं शकत नाहीं. अशा अत्यंत कठीण परिस्थितींत क्षत्रियासाठीं म्हणून जे मार्ग सांगितलेले आहेत, ते रूढ निर्बंधानुसार आचरण करतां येईल. पण काय वाटेल तें झालें तरी मी माझी प्रतिज्ञा मोडून सत्यसंधतेचें महाव्रत भंगूं इच्छीत नाहीं. "

तात्पर्य भीष्मांचें सत्यसंधतेचें महाव्रत याप्रमाणें अग्निपरीक्षेंतून तावून सुलाखून निघालेलें आहे. या सत्यसंधतेनें ते स्पष्टपणेंच राजाचे--हस्तिनापुरच्या सिंहासनावर बसणाऱ्या कौरववंशीय राजाचे--घटनात्मक दृष्टचा भृत्य राहिले. त्यामुळें खाजगी नात्यानें ते सर्वांचे आजोबा असले तरी घटनात्मक दृष्टचा राजाच्या नियंत्रणाचा त्यांना अधिकार नव्हता. खाजगी नातीं खाजगी राहतात, राजकीय व्यवहारांत घटनेनें ठरविलेल्या अधिकाराचीं नातीं हीच व्यवहारांतील खरीं नातीं असतात. हें पूर्णपणें ध्यानांत घेऊन भीष्मांच्या एकंदर चरित्राचा व विशेषतः त्यांतील वादग्रस्त वाटणाऱ्या प्रश्नांचा विचार केला पाहिजे.

## भीष्म व पांडव

याप्रमाणें सत्यसंध भीष्मांनीं आपली प्रतिज्ञा मोडण्याचें नाकारल्यावर त्यांनीं स्वतःच तत्कालीन रूढ पद्धतीच्या अनुसार नियोगाचा आश्रय करून व्यासांकरवीं कुरुवंश पुढें चालण्याची व्यवस्था केली. ते स्वतःच उद्योगपर्वांत म्हणतात :—

अयाचं भ्रातृदारेषु तदा व्यासं महामुनिम् ।
सह मात्रा महाराज प्रसाद्य तमृषिं तदा ।। ३७
अपत्यार्थं महाराज प्रसादं कृतवांश्च स. ।
त्रीन् स पुत्रानजनयत्तदा भरतसत्तम ।। ३८

—महाभारत, उदयोगपर्व अध्याय १४७

कुळाचा वंशक्षय होण्याच्या परिस्थितींत ब्राह्मणाकडून पुत्रोत्पादन करवून घेण्याचा जो रूढ मार्ग होता त्या मार्गानुसार भीष्म वागले. यांत त्यांना दोष देण्यासारखें कांहींही नाहीं. किंबहुना असे राजवंश त्या काळीं कितीतरी रूढ होते. दुसरा मार्गच नसता तर गोष्ट वेगळी होती. पण धर्मशास्त्राच्या संमतीनें रूढ असलेला मार्ग त्यांनीं मुद्दाम सोडून आपल्या व्रताचा भंग करण्याचें कांहींच कारण नव्हतें. ज्या सत्यनिष्ठेसाठीं भारतीय राजांनीं आपलें सर्वस्व लावल्याची परंपरा आहे त्या परंपरेंतील मेरुमणि असलेले भीष्म आपलें सत्यसंधतेचें व्रत दुसरा मार्ग उपलब्ध असतांना काय म्हणून सोडतील ? पुढें धृतराष्ट्र, पाण्डु व विदुर अशीं तीन मुलें झाल्यावर तत्कालीन रूढ निर्बंधानुसार वडील मुलगा असला तरी अंध असल्यामुळें धृतराष्ट्र राज्यावर बसूं शकला नाहीं. दासीपुत्र असल्यामुळें विदुर राज्यावर येणें सर्वथा असंभवनीय होतें. त्यामुळें सर्व दृष्टींनीं योग्य असलेला पाण्डूच कौरवांच्या राज्यसिंहासनावर बसला. पुनश्च भीष्मांनीं या तिन्ही मुलांचा प्रतिपाळ केला व त्यांच्या विद्याध्ययनाची सर्व प्रकारची व्यवस्था केली. पाण्यांत राहून कमलाच्या पानाप्रमाणें अलिप्त रहावें, त्याप्रमाणें भीष्मांनीं जन्मभर संसारांत राहून कोणाच्या ध्यानांतही येणार नाहीं अशा पद्धतीनें कुरुकुलाचा संसार चालविला होता. महाभारतकार म्हणतात :—

धृतराष्ट्रश्च पाण्डुश्च विदुरश्च महामतिः ।
जन्मप्रभृति भीष्मेण पुत्रवत्परिपालिताः ।। १७
संस्कारैः संस्कृतास्ते तु व्रताध्ययनसंयुताः ।
श्रमव्यायामकुशलाः समपद्यन्त यौवनम् ।। १८
धनुर्वेदे च वेदे च गदायुद्धेऽसिचर्मणि ।
तथैव गजशिक्षायां नीतिशास्त्रेषु पारगाः ।। १९

इतिहासपुराणेषु नानाशिक्षासु बोधिताः ।
वेदवेदाङ्गतत्त्वज्ञाः सर्वत्र कृतनिश्चयाः ॥ २०
—महाभारत, आदिपर्व अध्याय १०९

धृतराष्ट्र, पाण्डु व विदुर यांचें भीष्मांनीं जन्मापासून मुलाप्रमाणें पालन केलें. त्यांच्यावर संस्कार केले. व्रत आणि अध्ययन त्यांच्याकडून यथाशास्त्र घडविलें व त्यांना व्यायामाची संवय लावली. धनुर्वेद, वेद, गदायुद्ध, सर्वप्रकारच्या युद्धकला, वेदांगें, तत्त्वज्ञान, नाना प्रकारच्या विद्या, इतिहास, पुराण नि नीतिशास्त्र यांच्यांत त्यांना पारंगत केलें व त्यांचे विवाहही करून दिले. या तीन मुलांपैकीं राजा पाण्डु हा अत्यंत पराक्रमी निघाला. त्यानें दिग्विजय केला व साम्राज्याचा विस्तार केला. भीष्मांचें त्याच्यावर अतिशय प्रेम असे. पुढें पाण्डूनें राज्य धृतराष्ट्राच्या स्वाधीन केलें व तो मृगयासक्त होऊन अरण्यांत राहूं लागला. अर्थात् पाण्डूच्या अरण्यवासाच्या कालापासून धृतराष्ट्र हाच राज्यप्रमुख होता. पाण्डु अरण्यांत असतां राज्यव्यवस्था कशा प्रकारची होती याचें महाभारतांत पुढीलप्रमाणें वर्णन आहे :—

ततः सर्वाः प्रजास्तात धृतराष्ट्रं जनेश्वरम् ।
अन्वपद्यन्त विधिवद्यथा पाण्डुं जनाधिपम् ॥ ७
विसृज्य धृतराष्ट्राय राज्यं सविदुराय च ।
चचार पृथिवीं पाण्डुः सर्वां परपुरञ्जयः ॥ ८
कोशसंवनने दाने भृत्यानां चान्ववेक्षणे ।
भरणे चैव सर्वस्य विदुरः सत्यसङ्गरः ॥ ९
सन्धिविग्रहसंयुक्तो राज्ञां संवाहनक्रियाः ।
अवैक्षत महातेजा भीष्मः परपुरञ्जयः ॥ १०
सिंहासनस्थो नृपतिर्धृतराष्ट्रो महाबलः ।
अन्वास्यमानः सततं विदुरेण महात्मना ॥ ११
—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १४८

याप्रमाणें पाण्डूनें राज्य स्वाधीन केल्यावर पाण्डूप्रमाणेंच प्रजा धृतराष्ट्राला मानूं लागल्या. विदुरासहित धृतराष्ट्राच्या स्वाधीन

राज्य करून पाण्डू पृथ्वीवर संचार करूं लागला. त्या वेळीं कोश वाढविणें, व्यय करणें, सर्व खात्यांवर व त्यांतील कामकऱ्यांवर देखरेख ठेवणें व सर्वांचें उपजीवन नीट चालतें कीं नाहीं हें पहाणें हें सर्व काम विदुराकडे होतें. संधि, विग्रह व परकीय राजांशीं करावयाचे इतर व्यवहार ज्यांत समाविष्ट आहेत असे ( आजच्या राजकीय परिभाषेंत परराष्ट्रीय खातें ) विभाग भीष्मांकडे होते. तात्पर्य सिंहासनाधीश्वर राजे पाण्डु यांनीं राज्य धृतराष्ट्राकडे सोंपवून विदुराला मंत्री केलें होतें व भीष्म केवळ एक विभाग संभाळीत होते. भीष्मांची कुरुराज्यांतील घटनात्मक वस्तुस्थिति समजावून घेणें ही गोष्ट त्यांच्या चरित्राचा विचार करतांना आवश्यक आहे. मागें सांगितल्याप्रमाणें प्रत्येक नव्या राजाचें पालनपोषण जरी भीष्मांनीं केलें असलें व त्या त्या व्यक्तीला सिंहासनावर बसवावयास जरी तेच कारणीभूत झाले असले तरी राजा सिंहासनावर बसतांच आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें भीष्म हे आपोआपच राजभृत्य अथवा गादीचे सेवक होत. विचित्रवीर्याच्या काळीं ते जबाबदारीनें सर्व प्रकारचीं कामें करीत; पण पाण्डूच्या काळीं त्यांच्याच नेतृत्वाखालीं विदुर हा सर्व दृष्टींनीं योग्य झालेला असल्यामुळें स्वतःच्या मंत्रिपदाचा भार अर्थातच त्यांनीं विदुराकडे द्यावयास सांगितला असला पाहिजे व सहजरीतीनें होण्यासारखें काम त्यांनीं स्वतःकडे घेतलें असलें पाहिजे किंवा त्यांच्या वार्धक्याकडे पाहूनच पाण्डूनें त्यांच्याच संमतीनें मुख्य कारभाराचा भार विदुराकडे देऊन एखादें खातें त्यांच्याकडे सोपविण्याची व्यवस्था केली असली पाहिजे. म्हणूनच वर उद्धृत केलेल्या उताऱ्यांत फक्त परराष्ट्रीय खात्याचा त्यांच्याशीं प्रत्यक्ष संबंध असल्याचें उल्लेखिलें आहे. पुढें मृगयासक्त पाण्डु अरण्यांतच मृत्यु पावला. त्याची धाकटी पत्नी माद्री त्याजबरोबर सती जाऊन ज्येष्ठ पत्नी कुंती व तिचीं तीन मुलें नि माद्रीचीं दोन मुलें हस्तिनापुरांत ऋषींकडून आणून पोहोंचविलीं गेलीं. भीष्मांना, धृतराष्ट्राला व सर्वांनाच या घटनेचें मोठें दुःख झालें. पाण्डूच्या और्ध्वदेहिकानंतर त्यानेंच केलेल्या व्यवस्थेनुरूप राज्ययंत्राची स्थिति व त्यांतील व्यक्तींचीं स्थानें जशींचीं तशींच राहिलीं. युधिष्ठिर मोठा

होऊन आपल्या पित्याचें राज्य युवराज या नात्यानें स्वीकारीपर्यंत या व्यवस्थेंत कोणताच बदल होण्याचें कांहींच कारण नव्हतें. धृतराष्ट्राची शंभर व पाण्डूचीं पांच मुलें यांच्या शिक्षणाची व्यवस्था कृपाचार्यांकडून करण्यांत आली होती. पण आपल्या या नातवांना शस्त्रास्त्रविद्येंत अधिक पारंगत होतां यावें म्हणून भीष्मांनीं पुनश्च त्यांच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष पुरविलें. महाभारतांत या गोष्टीचा पुढीलप्रमाणें उल्लेख आहे :--

**वैशंपायन उवाच ।**

**विशेषार्थी ततो भीष्मः पौत्राणां विनयेप्सया ।। २४**
**इष्वस्त्रज्ञान्पर्यपृच्छदाचार्यान्वीर्यसंमतान् ।**
**नाल्पधीर्ना महाभागस्तथा नानास्त्रकोविदः ।। २५**
**नादेवसत्त्वो विनयेत्कुरूनस्त्रे महाबलात् ।**
**इति संचिन्त्य गाङ्गेयः सदा भरतसत्तमः ।। २६**
**द्रोणाय वेदविदुषे भारद्वाजाय धीमते ।**
**पाण्डवान्कौरवांश्चैव ददौ शिष्यान्नरर्षभ ।। २७**
**शास्त्रतः पूजितश्चैव सम्यक्तेन महात्मना ।**
**स भीष्मेण महाभागस्तुष्टोऽस्त्रविदुषां वरः ।। २८**
**प्रतिजग्राह तान्सर्वान् शिष्यत्वेन महायशाः ।**
**शिक्षयामास च द्रोणो धनुर्वेदमशेषतः ।।२९**
**तेऽचिरेणैव कालेन सर्वशस्त्रविशारदाः ।**
**बभूवुः कौरवा राजन्पाण्डवाश्चामितौजसः ।।३०**

—महाभारत, आदिपर्व अ. १३०

नंतर मुलांना विशेष विद्या यावी म्हणून मोठमोठ्या धनुर्वेदसंपन्न पराक्रमी व अस्त्रज्ञ आचार्यांना भीष्म शोधूं लागले. सामान्य बुद्धीचे, अस्त्रज्ञान नसलेले, सामान्य कर्तृत्वाचे व युद्धशास्त्राची बेतावाताचीच माहिती असलेले लोक कौरव राजकुमारांना शिकवूं शकणार नाहींत म्हणून त्यांच्यासाठीं तशाच कोण्या विचक्षण व असामान्य सामर्थ्यसंपन्न व्यक्तीची योजना केली पाहिजे असें त्यांना वाटत होतें. शेवटीं वेदवेत्त्यांच्या मध्यें अत्यंत श्रेष्ठ असे प्रतिभासंपन्न आचार्य भारद्वाज द्रोण यांच्या स्वाधीन पांडव व कौरव यांना

शिष्य या नात्यानें भीष्मांनीं केलें. भीष्मांनीं यथाशास्त्र व योग्य रीतीनें आचार्य द्रोणांची संभावना केल्यावर अस्त्रवेत्त्यांत सर्वश्रेष्ठ असलेले आचार्य त्यांच्यावर अत्यंत प्रसन्न झाले व त्यांनीं आपल्या त्या सर्व शिष्यांना संपूर्ण शस्त्रास्त्रविद्येचें व धनुर्वेदाचें शिक्षण दिलें. लवकरच कौरव व पांडव सर्व प्रकारच्या शस्त्रास्त्रविद्येंत अत्यंत प्रवीण झाले.

त्यानंतर युधिष्ठिराला यौवराज्याभिषेक करण्यांत आला. अर्थात् या क्षणापर्यंत सर्व गोष्टी अत्यंत सुरळीतपणें चालू होत्या. भीमावर लहानपणीं झालेला विषप्रयोग, विदुराच्याच सल्ल्यावरून कुन्तीनें इतका गुप्त ठेवला होता कीं भीष्मांना त्याची कल्पनाही येणें शक्य नव्हतें. युधिष्ठिर युवराज असतांना वर उल्लेखिल्याप्रमाणें दैनंदिन राज्यकारभारांतून विदुर सर्व दृष्टींनीं जबाबदारी संभाळीत असल्यामुळें अंग काढून घेतलेल्या भीष्मांना धृतराष्ट्राच्या अंतः-करणांत पाण्डवांच्याविषयीं पाप उत्पन्न झालें असून तो त्यांच्या विनाशाच्या खटपटींत आहे याची काडीइतकीही कल्पना नव्हती. विदुरानेंही तें त्यांच्या कानावर घातलें नाहीं. किंबहुना विदुरानें धृतराष्ट्राच्या चेहऱ्यावरूनच त्याच्या अंतःकरणांतील भाव ओळखून पांडवांना त्यांच्या संरक्षणाच्या दृष्टीनें इतक्या गुप्तपणें सूचना दिलेल्या आहेत कीं, त्या युधिष्ठिराखेरीज कोणालाही कधीच कळल्या नाहीत. युधिष्ठिर युवराज असतांना त्याला गादीवरून काढण्यासाठीं व स्वतःसाठीं नि दुर्योधनासाठीं राज्य बळकवावें म्हणून भीष्म, विदुर व राज्यांतील इतर मंत्री यांच्यापैकीं कोणा-च्याच लक्षांत न येईल अशा बेतानें धृतराष्ट्र किती गुप्तपणें आपल्या कारस्थानांची उभारणी करीत होता हें आपण धृतराष्ट्राच्या स्वभावचित्रांत पाहिलें आहे. त्यानें पांडवांना वारणावतास पाठ-विण्याचें कारस्थान अत्यंत गुप्तपणें केलें. दुर्योधनानें पुरोचनाच्या मदतीनें त्यांना जाळण्यासाठीं जें नवें लाक्षागृहाचें कारस्थान उभारलें तें तर सर्वस्वीं धृतराष्ट्रालादेखील अज्ञात राहावें अशा बेतानेंच उभारलें होतें. लाक्षागृह प्रकरणानंतर धृतराष्ट्र व दुर्योधन यांच्या अंतःकरणांतील दुष्ट हेतूंची भीष्मांना कल्पना आली व

म्हणून त्यांनीं उघडपणें पांडवांना बोलवावें कीं नाहीं याचा विचार करण्यासाठीं राजसभा भरली असतां तेथें पांडव जिवंत राहिल्या-बद्दल देवाचे आभार मानले व त्यांच्याशीं विरोध करण्याच्या दुर्योधनादिकांच्या अभिप्रायासंबंधीं तीव्र नापसंती व्यक्त करून त्यांना बोलवावें असा त्यांनीं आपला सल्ला दिला. पण जिवंत जाळण्याच्या कार्यक्रमापर्यंत राज्यसूत्रधार असलेल्या व्यक्तींची मर्यादा गेलेली पाहून भेदाचें बीज वाढून कुळांत पुढें भांडणें होऊं नयेत, वैराची धार अधिक तीव्र होऊं नये व सर्व कांहीं सामोप-चारानें निभावें म्हणून राज्याची फाळणी अथवा दोन विभाग करून एक विभाग पांडवांनीं संभाळावा व दुसरा धृतराष्ट्र व दुर्योधनानें संभाळावा अशी त्यांनीं आपली योजना मांडली व अर्धें राज्य पांड-वांना तोडून देऊन तें त्यांना स्वतंत्रपणें संभाळण्यासाठीं पूर्णपणें त्यांच्या स्वाधीन करावें असें प्रतिपादिलें. भीष्म म्हणतात :—

**दिष्टया ध्रियन्ते पार्था हि दिष्टया जीवन्ति सा पृथा ।**
**दिष्टया पुरोचनः पापो न सकामोऽत्ययं गतः ।। १३**
**यदा प्रभृति दग्धास्ते कुन्तीभोजसुतासुताः ।**
**तदा प्रभृति गान्धारे न शक्नोम्यभिवीक्षितुम् ।। १४**
**लोके प्राणभृतां कंचिच्छ्रुत्वा कुन्तीं तथागताम् ।**
**न चापि दोषेण तथा लोको मन्येत्पुरोचनम् ।**
**यथा त्वां पुरुषव्याघ्र लोको दोषेण गच्छति ।। १५**
**तदिदं जीवितं तेषां तव किल्बिषनाशनम् ।**
**संमन्तव्यं महाराज पाण्डवानां च दर्शनम् ।। १६**
**न चापि तेषां वीराणां जीवतां कुरुनन्दन ।**
**पित्र्योंशः शक्य आदातुमपि वज्रभृता स्वयम् ।। १७**
**ते सर्वेऽवस्थिता धर्मे सर्वे चैवैकचेतसः ।**
**अधर्मेण निरस्ताश्च तुल्ये राज्ये विशेषतः ।। १८**
**यदि धर्मस्त्वया कार्यो यदि कार्यं प्रियं च मे ।**
**क्षेमं च यदि कर्तव्यं तेषामर्धं प्रदीयताम् ।।**

—महाभारत, आदिपर्व अध्याय २०३

"ही मोठी भाग्याची गोष्ट आहे कीं, कुन्ती आणि पांडव हे जिवंत आहेत व पापी पुरोचनाचा मनोरथ परिपूर्ण झाला नाहीं. हे गांधारीपुत्रा, कुन्ती व तिचे पुत्र दग्ध झाल्याचें मी ज्या क्षणीं ऐकलें तेव्हांपासून लोकांना तोंड दाखविण्याची देखील सोय उरली नाहीं. लोक पुरोचनाला जितका देत नाहींत तितका दोष ते तुला देतात. हा दोष जावयाचा एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे पांडवांना येथें आणावयास संमति देणें हाच होय. ते वीर आहेत आणि त्यांच्या पित्याचा अंश त्याच्यापासून हिरावून घेण्याची देवेंद्राची देखील छाती नाहीं. त्या सर्वांची एकी अभेद्य आहे. ते सर्व अत्यंत धार्मिक आहेत. त्यांचा अधिकार अमान्य करून तुम्ही त्यांना काढून लावलें आहे. जर धर्मानुसार वागावयाचें असेल, माझें कांहीं प्रिय करावें असें वाटत असेल व कुळाचें नि सर्वांचें कल्याण व्हावें असें वाटत असेल तर मुकाटयानें त्यांचें राज्य, निदान अर्धे राज्य तरी त्यांना परत द्यावें." भीष्मांची ही अभ्यर्थना मान्य झाली व तदनुसार पांडवांना बोलावून भीष्म व धृतराष्ट्र यांनीं कुलनाश टळावा म्हणून अर्धे राज्य पांडवांच्या स्वाधीन केलें. महाभारतकार म्हणतात :—

**प्रतिगृह्य तु तद्वाक्यं नृपं सर्वे प्रणम्य च ।२६**
**प्रतस्थिरे ततो घोरं वनं तन्मनुजर्षभाः ।**
**अर्धं राजस्य संप्राप्य खाण्डवप्रस्थमाविशन् ॥ २७**
**ततस्ते पाण्डवास्तत्र गत्वा कृष्णपुरोगमाः ।**
**मण्डयांचक्रिरे तद्वै परं स्वर्गवदच्युताः ॥ २८**
**ततः पुण्ये शिवे देशे शान्तिं कृत्वा महारथाः ।**
**नगरं मापयामासुर्द्वैपायनपुरोगमाः ॥ २९**

**—महाभारत, आदिपर्व अ. २०७**

नंतर धृतराष्ट्र व भीष्म यांनीं पांडवांना बोलावलें व धृतराष्ट्रानें त्यांना सांगितलें कीं, हे कौन्तेया, आपल्या परस्परांत कसल्याही प्रकारचें भांडण उपस्थित होऊं नये म्हणून राज्याचा अर्धा वांटा घेऊन तूं खांडवप्रस्थांत जा. त्या ठिकाणीं देवेंद्र ज्याप्रमाणें देवांचें रक्षण करतो त्याप्रमाणें अर्जुन तुमचें संरक्षण करीत असतां

तुम्हांला कोणाचेंही भय नाहीं. याप्रमाणें पांडवांच्या नि कौरवांच्या राज्याधिकाराच्या क्षत्राची वांटणी होऊन दोन स्वतंत्र राज्यें अस्तित्वांत आलीं. राज्य तोडून दिल्यावर भीष्म हस्तिनापुरांतच राहिले. ते धृतराष्ट्राच्या राजसत्तेचे सामंत होते. पांडवांच्या राज्याचे ते कोणीच नव्हते. म्हणून स्वतंत्र पांडवराज्यांत त्यांचा महत्त्वाच्या प्रसंगीं देखील कांहींही संबंध आलेला नाहीं. कारण सर्वसमर्थ पांडवांनीं आपली स्वतःची मंत्रिसत्ता स्वतंत्रपणेंच उभारून भगवान् श्रीकृष्णांना अग्रस्थान देऊन त्यांच्या इच्छाशक्तीच्या स्वाधीन आपलें राज्ययंत्र करून दिलें. महत्त्वाच्या प्रसंगीं देखील त्यांनीं भीष्मांचा सल्ला घेतलेला नाहीं. राज्यच वेगळें झाल्यावर व आपलें राज्य पूर्णपणें सांभाळावयास ते सर्व दृष्टींनीं समर्थ असल्यावर त्यांना जाणून बुजून सल्लामसलतीची आवश्यकताच कसली होती ? म्हणून सुभद्राहरणाच्या वेळीं अर्जुनानें युधिष्ठिराचा सल्ला घेतलेला आहे, भीष्मांचा नाहीं. तसेंच राजसूय यज्ञ करण्याच्या संबंधांतही धृतराष्ट्र अथवा भीष्म यांना विचारण्याचें पांडवांना कांहीं कारण पडलें नाहीं. इतकेंच नव्हे तर दुर्योधनाच्या बाबतींत राजसूय यज्ञ करण्याच्या वेळीं धृतराष्ट्राची अडचण पुढें आली होती तीही स्वतंत्र राज्यामुळेंच पांडवांच्या बाबतींत येऊं शकलेली नाहीं. राजसूयाच्या संबंधांत त्यांनीं कृष्णांचाच सल्ला घेतला. त्यांनीं इतर चार लोकांना बोलावलें त्याचप्रमाणें भीष्मांनाही बोलावलें व इतर अनेकांना कामें वांटून दिलीं तशीच तात्पुरती कृताकृतपरिज्ञानाच्या बाबतींत भीष्मांची नेमणूक युधिष्ठिरानें केली होती. तात्पर्य, राज्याच्या वांटणीनंतर अथवा फाळणीनंतर पांडवांनीं इच्छा प्रदर्शित न केल्यामुळें वा त्यांना आवश्यकता न वाटल्यामुळें भीष्म त्याच जागीं राहिले म्हणजे ते हस्तिनापूरच्या गादीचे भृत्य अथवा सामंत राहिले. ही घटना ध्यानांत ठेवूनच त्यांच्या द्रौपदीवस्त्रहरणाच्या प्रसंगींच्या वर्तनाचा विचार केला पाहिजे.

## द्रौपदीचें वस्त्रहरण व भीष्म

आतांपर्यंत वर्णन केलेली कौरवांच्या राज्यांतील भीष्मांच्या राजकीय घटनात्मक स्थानाची कल्पना नीट ध्यानांत ठेवूनच त्यांची

द्रौपदीच्या वस्त्रहरणप्रसंगांतील वागणूक पाहिली पाहिजे. ज्या द्यूतामुळें वस्त्रहरण झालें तें द्यूत कौरव व पांडव फाळणीमुळें विभक्त होऊन पूर्णपणें स्वतंत्र असलेल्या दोन राज्यांतील अधिपतींमध्यें झालेलें आहे. अशा स्थितींत राजा धृतराष्ट्रानें द्यूतार्थ पांडवांना निमंत्रण केल्यावर अट्टाग्रहास पेटलेल्या राजाला भीष्म ही गोष्ट वाईट आहे हें सांगण्यापलीकडे दुसरें काय करूं शकणार होते? तेवढें त्यांनीं केलें आहे. द्यूताचें निमंत्रण मान्य करणें अथवा न करणें हा युधिष्ठिराचा प्रश्न होता व स्वतः युधिष्ठिरानें तें निमंत्रण मान्य केल्यावर व शकुनि कपटी आहे हें माहीत असतांना त्याच्याशीं द्यूत खेळून त्या द्यूतांत आपण स्वतः हरून 'दास झालों' हें युधिष्ठिर स्वतःच मान्य करीत असतांना सामंत भीष्म तेथें दुसरें काय करूं शकणार होते? द्यूताच्या कैफांत युधिष्ठिरानें द्रौपदी पणाला लावली व शकुनीनें तो जिंकल्याचें घोषित केलें त्या वेळीं घाबरून भीष्मही थरकांपले व त्यांच्या शरीराला घाम सुटला असें महाभारतांत वर्णन आहे.

**एवमुक्ते तु वचने धर्मराजेन धीमता ।**
**धिग्धिगित्येव वृद्धानां सभ्यानां निःसृता गिरः ॥ ४०**
**चुक्षुभे सा सभा राजन्राज्ञां संजज्ञिरे शुचः ।**
**भीष्मद्रोणकृपादीनां स्वेदश्च समजायत ॥ ४१**

—महाभारत, सभापर्व अध्याय ६५

## द्रौपदीस भीष्मांचें उत्तर

द्रौपदीला द्यूतांत पणाला लावण्याचा व ती जिंकली जाण्याचा परिणाम किती भीषण व्हावयाचा आहे याची भीष्मांना पूर्णपणें कल्पना होती. त्यामुळेंच पुढील परिणामाच्या भयानें त्यांची ही अवस्था झाली. उच्छृंखल दुर्योधनानें द्रौपदीला दुःशासनाकडून अप्रतिष्ठेनें सभेंत आणविलें. त्यावेळीं, मी जित आहे कीं अजित आहे असा प्रश्न द्रौपदी विचारीत असतां भीष्मांनीं तिला जें उत्तर दिलें त्याचें स्वरूप नीट ध्यानांत न घेतांच त्यांच्यावर टीकेची झोड उठविली जाते. भीष्मांचें तें उत्तर त्यांच्या परिस्थितीचा

विचार केला असतां योग्यच असून एक प्रकारच्या कडवट पण अनुकंपनीय अशा त्यांच्या अंतःकरणवृत्तीची साक्ष देणारें आहे. ते व्यथित झाले होते पण ते सामंत असल्यामुळें युवराजाच्या उच्छृंखल वर्तनाचा बंदोबस्त करणें ही गोष्ट त्यांच्या अधिकार-क्षेत्राबाहेरची होती. ती गोष्ट करणें फक्त धृतराष्ट्राच्या स्वाधीन होतें. जर दुर्योधन धृतराष्ट्राचें न ऐकता, व त्याच्या बंदोबस्ताची आज्ञा धृतराष्ट्र करते, तर राजद्रोही म्हणून दुर्योधनाचें नियंत्रण भीष्मांना करतां आलें असतें. शेवटीं राजा धृतराष्ट्रानें आज्ञा केल्यावरच द्रौपदीचा छळवाद थांबलेला आहे. जर युधिष्ठिरानें द्यूत हें अधार्मिक असून कपटानें शकुनीनें मला जिंकलें असल्यामुळें मी त्याचा मुळींच दास होत नाहीं असें म्हटलें असतें किंवा युधिष्ठिरानें द्रौपदीवरील आपलें स्वामित्व सोडलें असतें अथवा द्रौपदीनें युधिष्ठिराचा आपल्यावरील अधिकार अमान्य केला असता, निदान उर्वरित चार पांडवांनीं तो अधिकार अमान्य करून द्रौपदी स्वतंत्र असल्याचें घोषित केलें असतें तर भीष्मांना वेगळें कांहीं बोलतां आलें असतें. पण जिंकणारा जिंकल्याची घोषणा करीत असतांना व हरणारा आपण हरलों व दास झालों हें मान्य करीत असतांना व जिच्यावर हा कटु प्रसंग ती व्यक्ति त्यांचें स्वामित्व मान्य करीत असतांना भीष्मांनीं करावें तरी काय ? युधिष्ठिरानें मी कौरवांचा दास आहे ही गोष्ट मान्य केल्यावर मी तुला कौरवांचा दास होऊं देणार नाहीं हें कुरुराज्याचें एक सामंत असलेल्या भीष्मांनीं कोणत्या आधारावर म्हणावयाचें ? द्रौपदी युधिष्ठिराचें स्वामित्व मान्य करीत असल्यावर "तूं आपल्या पतीची आपल्यावरील सत्ता अमान्य कर" असें भीष्म तिला कोणत्या तोंडानें म्हणणार ? द्यूतांत जिंकल्यामुळें तूं दासी होऊं शकत नाहींस पण युधिष्ठिर तुझा पति असल्यामुळें व तो स्वतः कौरवाचा दास असल्याचें मान्य करीत असल्यामुळें त्या नात्यानें तूं कौरवांची दासी झाली आहेस, एवढेंच भीष्मांनीं म्हटलें आहे. या बाबतींतील सर्व जबाबदारी केवळ युधिष्ठिराची आहे हेंही भीष्मांनीं स्पष्टपणें दाखविलेलें आहे. इतकेंच नव्हे तर युधिष्ठिराचें हें वर्तन आपल्याला दुःखदायक

वाटतें हेंही त्यांनीं ध्वनित केलेलें आहे. शेवटीं तर बलवान म्हणतील तो धर्म अशी येथील अनुकंपनीय परिस्थिति असून कौरव लोभमोहपरायण झाल्यामुळें नष्ट होतील अशी भविष्यवाणी उच्चारून निषेधदर्शक असें या स्थितींत सभेंतून निघून जाण्याचें शास्त्रसंमत असें स्वतःचें कर्तव्यही त्यांनीं पार पाडलें आहे. सत्यसंधतेमुळें एकदां राजभृत्यत्व पत्करल्यानंतर रेसभरही तिच्यापासून न ढळण्याचें महाव्रत पत्करलेला भीष्मासारखा पुरुष यावांचून दुसरें कांहींही करूं शकणार नाहीं. भीष्मांनीं द्रौपदीला खरोखरीच काय उत्तर दिलें हें कधींच ध्यानांत घेतलें जात नाहीं. त्या उत्तराची नीट तपासणी न करतांच त्यांच्यावर आक्षेप घेतले जातात व तें उत्तर मुळमुळीत असल्याची अकारण समजूत केली जाते. तें उत्तर काय आहे तेंच आपण पाहूं.

न धर्मसौक्ष्म्यात्सुभगे विवेक्तुं शक्नोमि ते प्रश्नमिमं यथावत् ।
अस्वाम्यशक्तः पणितुं परस्वं स्त्रियाश्च भर्तुर्वशतां समीक्ष्य ।। ४७
त्यजेत सर्वां पृथिवीं समृद्धां युधिष्ठिरो धर्ममथो न जह्यात् ।
उक्तं जितोऽस्मीति च पाण्डवेन तस्मान्न शक्नोमि विवेक्तुमेतत् ।।४८
द्यूतेऽद्वितीयः शकुनिर्नरेषु कुन्तीसुतस्तेन निसृष्टकामः ।
न मन्यते तां निकृतिं युधिष्ठिरस्तस्मान्न ते प्रश्नमिमं ब्रवीमि ।।४९

—महाभारत, सभापर्व अध्याय ६७

उक्तवानस्मि कल्याणि धर्मस्य परमा गतिः ।
लोके न शक्यते ज्ञातुमपि विज्ञैर्महात्मभिः ।। १४
बलवांश्च यथा धर्मं लोके पश्यति पूरुषः ।
स धर्मो धर्मवेलायां भवत्यभिहतः परः ।। १५
न विवेक्तुं च ते प्रश्नमिमं शक्नोमि निश्चयात् ।
सूक्ष्मत्वाद्गहनत्वाच्च कार्यस्यास्य च गौरवात् ।। १६
नूनमन्तः कुलस्यायं भविता न चिरादिव ।
तथा हि कुरवः सर्वे लोभमोहपरायणाः ।। १७
कुलेषु जाताः कल्याणि व्यसनैराहता भृशम् ।
धर्म्यान्मार्गान्न च्यवन्ते येषां नस्त्वं वधूः स्थिता ।। १८

**उपपन्नं च पाञ्चालि तवेदं वृत्तमीदृशम् ।**
**यत्कृच्छ्रमपि संप्राप्ता धर्ममेवान्ववेक्षसे ॥ १९**
**एते द्रोणादयश्चैव वृद्धा धर्मविदो जनाः ।**
**शून्यैः शरीरैस्तिष्ठन्ति गतासव इवानताः ॥ २०**
**युधिष्ठिरस्तु प्रश्नेऽस्मिन्प्रमाणमिति मे मतिः ।**
**अजितां वा जितां वेति स्वयं व्याहर्तुमर्हति ॥ २१**

**—महाभारत, सभापर्व अध्याय ६९**

"हे सुभगे ! धर्म अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें तुझ्या प्रश्नाचें स्पष्ट उत्तर देतां येणें मला शक्य दिसत नाहीं. युधिष्ठिरानें स्वतः पणाला लावून नंतर तुला पणाला लावलेलें असल्यामुळें जो स्वतःचाच धनी उरलेला नाहीं त्याला दुसऱ्याचेंही धनी होतां येणार नाहीं. या न्यायानें तूं दासी नाहींस. पण तूं युधिष्ठिराची पत्नी आहेस व पत्नी पतीच्या नेहमींच अधीन असल्यामुळें युधिष्ठिर ज्यां अर्थीं दास झालेला आहे, त्या अर्थीं तूं आपोआपच दासी झालीस. युधिष्ठिर दास आहे किंवा नाहीं हा प्रश्न आमच्या विचाराच्या कक्षेंत राहिला नाहीं. युधिष्ठिर इतका धर्मनिष्ठ आहे कीं, प्रसंगीं तो समृद्ध अशा सर्व पृथ्वीचें साम्राज्यही सोडून देईल पण धर्म सोडणार नाहीं. अशा युधिष्ठिरानें स्वतःच आपल्या तोंडानें "मी जित आहें" असें म्हटलें आहे. अर्थात् पति या नात्यानें त्याला जी अवस्था प्राप्त झाली आहे, ती अवस्था तुलाही प्राप्त होत असल्यामुळें या प्रश्नाचें उत्तर देणें माझ्या शक्तीच्या बाहेरचें आहे. शकुनि द्यूतामध्यें अद्वितीय आहे हें युधिष्ठिराला माहीत असूनही त्याच्याशीं द्यूत खेळण्यांत युधिष्ठिरानें कृतार्थता मानली. इतकेंच नव्हे तर शकुनीनें आपणांस कपटानें फसविलें असून वस्तुतः आपण दास नाहीं असेंही युधिष्ठिर मानावयास सिद्ध नाहीं. शकुनीनें त्याला जिकलें हें त्याला पूर्णपणें मान्य असून तो स्वतःला 'जित' असेंच समजतो. अशा स्थितींत त्याच्या धर्मपत्नीच्या बाबतींत मी काय बोलणार ? हे कल्याणी, धर्माची गति अत्यंत सूक्ष्म असून ज्ञाते लोकही त्यांत मोह पावतात. ( वास्तविक भीष्मांनीं स्वतःची असहायता प्रकट केलेली नसून युधिष्ठिराच्या स्वतःला जित समजण्यावर ही त्यांची टीका

आहे. कपटद्यूतांतील निर्णयाला मान्यता देऊन फसवणुकींत स्वतः-पुरतें तरी दासत्वाचें बंधन युधिष्ठिरानें उघडपणें स्वतःवर लादून घेतलें, हें पाहून विवेकी लोकांचा देखील कसा मानसिक गोंधळ उडतो हें ते दाखवीत आहेत. ) जगतामध्यें बलवान् लोक ज्याला धर्म म्हणतील तो धर्म अशी दुर्दैवी परिस्थिति उत्पन्न झालेली आहे. (येथें पुनश्च भीष्म वाटेल तें करून आपला स्वार्थ साधूं पहाणाऱ्या कौरवांच्या कपटाला 'कपट' न समजतां आपण जिंकलें गेलों हेंच सत्य आहे असें युधिष्ठिर समजतो याला अनुलक्षूनच बोलत आहेत) धर्म सूक्ष्म आहे म्हणून येथें उत्पन्न झालेल्या प्रश्नांच्या निरगांठी विचित्र आहेत म्हणून एकंदर वातावरण अत्यंत गुंतागुंतीचें दिसत असल्यामुळें निर्णय करणें अत्यंत कठिण झालें आहे. एक गोष्ट मात्र निश्चित आहे व ती ही कीं, सर्व कौरव पूर्णपणें लोभ व मोह यांच्या आहारीं गेलेले असल्यामुळें या कुळाचा नाश लवकरच होणार. तूं ज्यांची वधू आहेस ते कुलीन आहेत. भयानक संकटांचा आघात त्यांच्यावर झालेला आहे, तरीही धर्ममार्गापासून ते विचलित होऊं इच्छीत नाहींत. हे पांचाली, तूंही त्यांच्याचप्रमाणें अशा विलक्षण परिस्थितींत सांपडल्यावर 'मी जित आहें कीं अजित हें धर्मानुसारच मला सांगा, असें म्हणत आहेस. यावरून तुझी धर्मनिष्ठाच व्यक्त होत आहे. हे द्रोणादिक वृद्ध धर्मवेत्ते खालीं माना घालून बसले आहेत. जणूं काय प्राणहीन शरीराप्रमाणेंच हे अचेतन दिसत आहेत. मला जर विचारशील तर तुझ्या या प्रश्नाचें उत्तर युधिष्ठिर जें देईल तेंच खरें. तूं जित आहेस कीं अजित आहेस हें युधिष्ठिरानेंच सांगावें. ''

स्वतःच्या अधिकारांत न्यायानें जें सांगणें योग्य तें भीष्मांनीं सांगितलें. धर्मदृष्टचा मी दासी आहे कीं नाहीं ? असें द्रौपदी विचारीत असल्यावर धर्मदृष्टचा त्यांनीं द्यावयाचें तें उत्तर दिलें. द्रौपदीला भीष्मांच्या संरक्षणाची आवश्यकता नाहीं. तिचे पति तिचें रक्षण करावयास पूर्ण समर्थ आहेत. पाण्डव शकुनीच्या कपटाला कपट न म्हणतां आपण दास आहोंत हें मान्य करीत असल्यावर व पति या नात्यानें त्यांची स्वतःवर असलेली सत्ता द्रौपदी मान्य करीत अस-

त्यावर त्याचे जे परिणाम असतील त्या बाबतींत दुसरें कोण काय बोलूं शकणार? दास 'दास' व्हावयाला सिद्ध असल्यावर व धनी धनीपणाचे प्रयोग करावयास पुढें सरसावल्यावर तिसऱ्या कोणी तिथें करावयाचें काय? अशा स्थितींत दुर्योधनाच्यापेक्षां वरिष्ठ अधिकारी असा धृतराष्ट्रच अनिष्ट प्रकार थांबवूं शकतो. भीष्मांच्या अधिकाराला दुर्योधन किती कस्पटासमान लेखीत असे हें आपण द्रौपदी-स्वयंवरानंतर पाण्डवांना परत बोलावण्याच्या वेळीं कर्णानें राजाचे नोकर म्हणून भीष्मांचा जो अवमान केला व जो दुर्योधनानें करूं दिला त्या वेळींच कर्णावरील व्याख्यानांत आपण पाहिलें आहेच. त्यांचें नियंत्रकत्व संपलें असून फक्त प्रतिज्ञेच्या पाशानें ते बांधले गेले असल्यामुळें देह राबविणें येवढेंच आपलें कर्तव्य उरलें आहे व तें करणें सत्याच्या पाशामुळें आपणांस भाग आहे हें भीष्मांनीं द्रौपदी स्वयंवराच्या प्रकरणानंतर ओळखलें होतें. त्यामुळें ते अधिक कांहींच करूं शकत नव्हते. समाजकल्याणाचा व नीतिमूल्यांच्या संरक्षणाचा विचार करून त्यांनीं राजसत्तेचाच कां अंत घडविला नाहीं असा एक प्रश्न उत्पन्न होईल. त्याचें उत्तर इतकेंच आहे कीं, भीष्मांच्या जीवनाचें ध्येय सत्यसंधता हें होतें. समाजकल्याण हें नव्हतें. त्यामुळें त्यांच्या बाबतींत हा प्रश्न उत्पन्न होत नाहीं. अशा स्थितींत 'स नो राजा भविष्यति' या वचनाच्या परिपालनासाठीं त्यांना दुसरें कांहींही करणें शक्य नव्हतें. सत्यसंधता हीच भीष्मांची जीवननिष्ठा आहे. त्यांना एकच मार्ग शिल्लक होता व तो म्हणजे सभात्याग करून निघून जाणें हा होय. तो जर त्यांनीं केला नसता तर भीष्म दोषी ठरले असते. पण त्यांनीं सभेंतील अनिष्ट प्रकार वाढत चालला आहे असें पाहून व तो थांबविणें आपल्या अधिकाराबाहेरचें आहे हें ओळखून आपला निषेध दर्शविण्यासाठीं सभात्याग केला. स्वतः धृतराष्ट्रच या बाबतींत पुढीलप्रमाणें साक्ष देत आहे :—

**प्रातिष्ठत ततो भीष्मो द्रोणेन सह संजय ।**
**कृपश्च सोमदत्तश्च बाल्हीकश्च महामनाः ॥ २६**

**—महाभारत, सभापर्व अध्याय ८१**

नंतर भीष्म, द्रोण, कृपाचार्य, सोमदत्त व बाल्हीक हे सभेंतून निघून गेले. त्यानंतर दुसरें द्यूत करावयाच्या वेळींही, ज्या सर्व लोकांनीं विरोध केला त्यांत भीष्म होतेच. राजसत्तेनें त्यांचें ऐकलें नाहीं यांत ते कांहीं दोषी ठरत नाहींत. महाभारतकार म्हणतातः—

**ततो द्रोणः सोमदत्तो बाल्हीकश्चैव गौतमः ।**
**विदुरो द्रोणपुत्रश्च वैश्यापुत्रश्च वीर्यवान् ।। २५**
**भूरिश्रवाः शान्तनवो विकर्णश्च महारथः ।**
**मा द्यूतमित्यभाषन्त शमोऽस्त्विति च सर्वशः ।। २६**
**अकामानां च सर्वेषां सुहृदामर्थदर्शिनाम् ।**
**अकरोत्पाण्डवाह्वानं धृतराष्ट्रः सुतप्रियः ।। २७**

—महाभारत, सभापर्व अ. ७४

नंतर द्रोण, सोमदत्त, बाल्हीक, कृपाचार्य, विदुर, अश्वत्थामा, युयुत्सु, भूरिश्रवा, भीष्म व विकर्ण या सर्वांनीं द्यूत नको म्हणून सांगितलें. पण कल्याणाची इच्छा करणारे सर्व सुहृद अमान्यता दर्शवीत असतांनासुद्धां धृतराष्ट्रानें सर्वांच्या इच्छेविरुद्ध पुनश्च पांडवांना द्यूतांत आव्हान केलें. तात्पर्य भीष्मांनीं आपलें शरीर एका वचनानें हस्तिनापूरच्या राज्ययंत्राला दिलें होतें. म्हणून त्या शरीराच्या उपयोगाची मर्यादा सोडून प्रत्येक वेळीं त्यांनीं आपल्या मर्यादेंत स्वतःच्या कर्तव्याचें पूर्णपणें पालन केलें आहे. धर्माविरुद्ध त्यांनीं कधींही निर्णय दिला नाहीं. राज्ययंत्राचें त्यांनीं कधींही लांगूलचालन केलें नाहीं. हितोपदेशाचें स्वतःचें जें कर्तव्य तें केल्यावांचून ते कधींही राहिले नाहींत. वनवास संपवून पांडव परत आल्यावर दुर्योधनाची सचिवसंस्था ते आपल्या दिलेल्या कालाआधींच प्रकट झाले असें म्हणत असतां भीष्मांनीं त्याविरुद्ध आपला निर्णय देऊन असें स्वच्छ शब्दांत सांगितलें कीं, कालगणनेप्रमाणें पांडव बरोबर प्रकट झाले आहेत. इतकेंच नव्हे तर ते कधींही अधर्म करणार नाहींत हें सांगून राज्य त्यांना देणें उचित आहे असें त्यांनीं सुचविलें आहे. तथापि मी मंत्री असल्यामुळें या बाबतींत कांहीं निर्णय घेऊं शकत नाहीं, परंतु तूं राजा असल्यामुळें धर्मानें वागावयाचें कीं युद्ध करावयाचें हें तुझें तूं ठरव. तूं सांगशील त्याप्रमाणें आम्ही वागूं

असें त्यांनीं सांगितलें. दुर्योधनानें ज्या वेळीं राज्य काय वाटेल तें झालें तरी मी देणार नाहीं, केवळ युद्धासंबंधीं काय तें बोला असें आज्ञापिल्यावर भीष्म सेनारचनेच्या उद्योगास लागले. तरीही तुझें हित सांगणें माझें कर्तव्य आहे असें ते निराशेनें बोलल्यावांचून राहिले नाहींत. महाभारतांत म्हटलें आहे :—

सर्वं यथावच्चरितं यद्यदेभिः प्रतिश्रुतम् ।
एवमेतद् ध्रुवं ज्ञात्वा ततो बीभत्सुरागतः ॥ ५
सर्वे चैव महात्मानः सर्वे धर्मार्थकोविदाः ।
येषां युधिष्ठिरो राजा कस्माद्धर्मेऽपराध्नुयुः ॥ ६
अलुब्धाश्चैव कौन्तेयाः कृतवन्तश्च दुष्करम् ।
न चापि केवलं राज्यमिच्छेयुस्तेऽनुपायतः ॥ ७
तदैव ते हि विक्रान्तुमीषुः कौरवनन्दनाः ।
धर्मपाशनिबद्धास्तु न चेलुः क्षत्रियव्रतात् ॥ ८
यच्चानृत इति ख्यायाद्यः स गच्छेत् पराभवम् ।
वृणुयुर्मरणं पार्था नानृतत्वं कथंचन ॥ ९
प्राप्तकाले तु प्राप्तव्यं नोत्सृजेयुर्नरर्षभाः ।
अपि वज्रभृता गुप्तं तथावीर्या हि पाण्डवाः ॥ १०
प्रतियुध्येम समरे सर्वशस्त्रभृतां वरम् ।
तस्माद्यदत्र कल्याणं लोके सद्भिरनुष्ठितम् ॥
तत् संविधीयतां शीघ्रं मा वो ह्यर्थोऽभ्यगात् परम् ॥ ११
न हि पश्यामि सङ्ग्रामे कदाचिदपि कौरव ।
एकान्तसिद्धिं राजेन्द्र संप्राप्तश्च धनंजयः ॥ १२
संप्रवृत्ते तु सङ्ग्रामे भावाभावौ जयाजयौ ।
अवश्यमेकं स्पृशतो दृष्टमेतदसंशयम् ॥ १३
तस्माद्युद्धोचितं कर्म कर्म वा धर्मसंहितम् ।
क्रियतामाशु राजेन्द्र संप्राप्तश्च धनंजयः ॥ १४

दुर्योधन उवाच ।

नाहं राज्यं प्रदास्यामि पाण्डवानां पितामह ।
युद्धोपचारिकं यत्तु तच्छीघ्रं प्रविधीयताम् ॥ १५

भीष्म उवाच ।

**अत्र या मामिका बुद्धि: श्रूयतां यदि रोचते ।**
**सर्वथा हि मया श्रेयो वक्तव्यं कुरुनन्दन ।। १६**

—महाभारत, विराटपर्व अध्याय ५२

" पांडवांनीं जशी प्रतिज्ञा केली होती तदनुरूप ते व्यवस्थित वागले आहेत व म्हणूनच अर्जुन प्रकट झाला आहे. ते सर्व थोर लोक धर्म व व्यवहार यांत अत्यंत कुशल आहेत. युधिष्ठिर ज्यांचा राजा आहे ते लोक धर्माच्या संबंधांत प्रमाद कसा करतील ? पांडव लोभी मुळींच नाहींत. ते अत्यंत दुष्कर कर्म करणारे आहेत व तसें त्यांनीं केलेंही आहे. अधर्मानें ते राज्य कधींही स्वीकारणार नाहींत. जर निव्वळ पराक्रमानेंच त्यांना राज्य घ्यावयाचें असतें तर त्यांनीं तें पूर्वींच घेतलें असतें. केवळ धर्मपाशानें बांधलेले असल्यामुळेंच क्षत्रियांच्या सत्यसंधतेच्या व्रतापासून ते त्या वेळीं ढळले नाहींत. पांडव हे इतके तीव्र सत्यनिष्ठ आहेत कीं ते मरण पत्करतील, पण असत्य कधींही पत्करणार नाहींत व ज्या वेळीं जें घ्यावयाचें तें काय वाटेल तें झालें तरी तें घेतल्यावांचून कधींही राहणार नाहींत. इंद्रानें जरी त्यांचा भाग गिळंकृत करण्याचा प्रयत्न केला तरी देखील ते त्याच्याशींही युद्ध करून आपला भाग परत मिळविल्याशिवाय राहणार नाहींत व तितकें प्रखर सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं निश्चित आहे. म्हणून सर्व शस्त्रधारी लोकांमध्यें अत्यंत श्रेष्ठ असा जो अर्जुन त्याच्याशीं सर्वांनीं मिळून संघटितपणेंच युद्ध केलें पाहिजे. कार्यनाश होऊं नये म्हणून या स्थितींत विचक्षणांनीं आचरलेला मार्ग शक्य तितक्या त्वरेनें अवलंबिणें योग्य आहे. अर्जुनासारखा प्रबल योद्धा प्राप्त झाला आहे. संग्रामांत नेहमीं जय कोणाला मिळाल्याचें मीं पाहिलें नाहीं. एकदां संग्राम सुरू झाल्यावर कधीं जय होतो तर कधीं पराजय होतो, मरण कधीं टळतें, तर कधीं येतेंही, गमवावयास वेळ नाहीं म्हणून युद्धच करावयाचें असलें तर त्या तयारीला लागा व धर्मानुसार त्यांचें त्यांना देऊन संधि करावयाचा असला तर त्या सिद्धतेला लागा. त्यावर दुर्योधन म्हणाला, हे पितामह, मी पांडवांना

राज्य कधींच देणार नाहीं. युद्धाच्या दृष्टीनें जें काय बोलावयाचें असेल तें सांगा. भीष्म त्यावर इतकेंच म्हणाले, जें तुझ्या कल्याणाचें मला वाटेल तें सांगणें येवढेंच माझें कर्तव्य आहे. ऐकणें वा न ऐकणें ही तुझ्या स्वाधीनची गोष्ट आहे. जें तुला वाटेल तसें तूं करूं शकतोस." तात्पर्य, भीष्मांनीं देह कौरवांना दिला होता, पण हिताचें सांगणें, राज्ययंत्राच्या सूत्रचालकांनीं जर अधर्म करावयाचें ठरविलें असलें तर तो अधर्म आहे असें त्यांना स्वच्छ सांगणें--मग ते प्रसन्न होवोत वा न होवोत—त्यांनीं कधींही सोडलें नाहीं. संपूर्ण उद्योगपर्वांत त्यांनीं दुर्योधनाला आणि धृतराष्ट्राला संधीचाच सल्ला दिलेला आहे. तो त्यांनीं ऐकला नाहीं याचा दोष भीष्मांकडे येत नाहीं. सत्तेचे ते भृत्य असल्यामुळें त्यांना त्यांच्या कडून लढावें लागलें ही गोष्ट स्वतंत्र आहे. सेनापतिपद स्वीकारतांना देखील स्वतःच्या शरीराचें पारतंत्र्य व मनाचें स्वातंत्र्य त्यांनीं कांहीं गोष्टी राजा दुर्योधनाला स्पष्टपणें सांगूनच सिद्ध केल्या आहेत. पांडव हे कौरवकुळांतील असल्यामुळें भीष्म त्यांना ठार मारूं इच्छीत नव्हते. युद्ध थांबविण्यासाठीं त्यांनीं जे प्रयत्न केले त्यांत कर्णाचा तेजोवध ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट त्यांनीं केली. कारण कर्ण हेंच कुलनाशाचें मूळ आहे हें ओळखून त्यांनीं त्याच्यावर प्रहार चालविले होते. पण त्यांच्या त्या प्रयत्नांना यश आलें नाहीं. कर्ण हा केवळ व्यक्तिगत महत्त्वाकांक्षेसाठीं या भयानक विनाशास्तव सिद्ध झाला याचा त्यांना इतका उद्वेग वाटत होता कीं, रथातिरथगणनेच्या वेळीं त्यांचा हा संताप खळाळून बाहेर पडला आहे. ते म्हणतात :—

**सखा ते दयितो नित्यं य एष रणकर्कशः ।**
**उत्साहयति राजंस्त्वां विग्रहे पांडवैः सह ।। ३**
**परुषः कत्थनो नीचः कर्णो वैकर्तनस्तव ।**
**मन्त्री नेता च बंधुश्च मानी चात्यंतमुच्छ्रितः ।। ४**
**एष नैव रथः कर्णः न चाप्यतिरथो रणे ।**
**वियुक्तः कवचेनैष सहजेन विचेतनः ।। ५**

**कुण्डलाभ्यां च दिव्याभ्यां वियुक्तः सततं घृणी ।**
**अभिशापाच्च रामस्य ब्राह्मणस्य च भाषणात् ।। ६**
**करणानां वियोगाच्च तेन मेऽर्धरथो मतः ।**
**नैष फाल्गुनमासाद्य पुनर्जीवन् विमोक्ष्यसे ।। ७**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १६८

"हे राजा, हा तुझा रणकर्कश सखा जो तुला अत्यंत प्रिय वाटतो व जो वारंवार पांडवांशीं करावयाच्या संघर्षासंबंधीं तुला प्रेरित नि उत्साहित करतो तो तुझा मंत्री नि नेता किंबहुना बंधूहूनही तुला अधिक प्रिय वाटणारा तुझा मंत्री कर्ण अत्यंत कठोर, बडबड्या, नीच, अहंकारी व मर्यादातीत उद्धट असून हा रथीही नाहीं व अतिरथी तर नाहींच नाहीं. याचें सहज कवचकुंडल गेलें आहे. मत्सरामुळें याचे गुण दूषित झालेले असून परशुरामांच्या शापामुळें, याला ब्राह्मणाचाही शाप असल्यामुळें व याच्याजवळचीं सर्व साधनें संपलेलीं असल्यामुळें माझ्या दृष्टीनें हा केवळ अर्धरथी आहे. अर्जुनाशीं याची रणांत गांठ पडल्यावर हा पुन्हां जिवंत म्हणून रहाणार नाहीं." पण त्यांच्या साऱ्याच खटपटींना पूर्णपणें अपयश आलें. चाणाक्ष दुर्योधन भीष्मांचें रणपांडित्य माहीत असल्यामुळें कर्णालाही बाजूस सारून त्यांनाच सेनापति करावयास उद्युक्त झाला; पण भीष्मांनीं युद्धाचें सेनापतित्व स्वीकारीत असतांनाच त्याला कांहीं अटी घातल्या. त्या पुढीलप्रमाणें :—

**एवमेतन्महाबाहो यथा वदसि भारत ।**
**यथैव हि भवन्तो मे तथैव मम पाण्डवाः ।। १६**
**अपि चैव मया श्रेयो वाच्यं तेषां नराधिप ।**
**संयोद्धव्यं तवार्थाय यथा मे समयः कृतः ।। १७**
**न तु पश्यामि योद्धारमात्मनः सदृशं भुवि ।**
**ऋते तस्मान्नरव्याघ्रात् कुन्तीपुत्राद्धनञ्जयात् ।। १८**
**स हि वेद महाबुद्धिर्दिव्यान्यस्त्राण्यनेकशः ।**
**न तु मां विवृतो युद्धे जातु युध्येत पाण्डवः ।। १९**
**अहं चैव क्षणेनैव निर्मनुष्यमिदं जगत् ।**
**कुर्यां शस्त्रबलेनैव ससुरासुरराक्षसम् ।। २०**

न त्वेवोत्सादनीया मे पाण्डोः पुत्रा जनाधिप ।
तस्माद्योधान् हनिष्यामि प्रयोगेणायुतं सदा ।। २१
एवमेषां करिष्यामि निधनं कुरुनन्दन ।
न चेत्ते मां हनिष्यन्ति पूर्वमेव समागमे ।। २२
सेनापतिस्त्वहं राजन् समये नापरेण ते ।
भविष्यामि यथाकामं तन्मे श्रोतुमिहार्हसि ।। २३
—महाभारत, उदयोगपर्व अध्याय १५६

एवमेष महाराज स्त्रीपुमान् द्रुपदात्मजः ।
स संभूतः कुरुश्रेष्ठ शिखण्डी रथसत्तमः ।। ६३
ज्येष्ठा काशिपतेः कन्या अम्बा नामेति विश्रुता ।
द्रुपदस्य कुले जाता शिखण्डी भरतर्षभ ।। ६४
नाहमेनं धनुष्पाणिं युयुत्सुं समुपस्थितम् ।
मुहूर्तमपि पश्येयं प्रहरेयं न चाप्युत ।। ६५
व्रतमेतन्मम सदा पृथिव्यामपि विश्रुतम् ।
स्त्रियां स्त्रीपूर्वके चैव स्त्रीनाम्नि स्त्रीसरूपिणि ।। ६६
न मुञ्चेयमहं बाणमिति कौरवनन्दन ।
न हन्यामहमेतेन कारणेन शिखण्डिनम् ।। ६७
एतत्तत्त्वमहं वेद जन्म तात शिखण्डिनः ।
ततो नैनं हनिष्यामि समरेष्वाततायिनम् ।। ६८
यदि भीष्मः स्त्रियं हन्यात् सन्तः कुर्युर्विगर्हणम् ।
नैनं तस्माद्धनिष्यामि दृष्ट्वाऽपि समरे स्थितम् ।। ६९

वैशम्पायन उवाच ।

एतच्छ्रुत्वा तु कौरव्यो राजा दुर्योधनस्तदा ।
मुहूर्तमिव स ध्यात्वा भीष्मे युक्तममन्यत ।। ७०
—महाभारत, उदयोगपर्व अध्याय १९२

"राजा, तूं म्हणतोस त्याप्रमाणें मी तुझें सेनापतित्व स्वीकारावयास तयार आहे. पण नात्यानें जसे तुम्ही माझे आहांत तसेच पाण्डवही माझे आहेत. त्यामुळें तुमचें कल्याण कशांत आहे हें सांगणें जसें माझें कर्तव्य आहे, त्याचप्रमाणें त्यांचें कल्याण कशांत

आहे हें सांगणेंही माझें कर्तव्यच आहे. मी राजयंत्राशीं वचनानें बांधलों असल्याकारणानें तुझ्या पक्षाकडून लढणें मला भागच आहे व माझ्या शब्दाप्रमाणें मी लढेन. पण पाण्डवांनीं मला त्यांचें कल्याण कशांत आहे हें विचारल्यास मी तें तुम्हांला जसें सांगतों तसेंच त्यांसही सांगेन. नरव्याघ्र कुन्तीपुत्र धनंजयावांचून माझ्या योग्यतेचा दुसरा प्रतियोद्धा मला कोणीही दिसत नाहीं. तो महाबुद्धि धनंजय अनेक प्रकारचीं दिव्य अस्त्रें जाणतो; पण तो माझ्याशीं जसें लढावयास पाहिजे असें (पूज्यभावनेमुळें) लढेल असें वाटत नाहीं. केवळ शस्त्रबळानेंच मी देव, दैत्य, राक्षस यांसह सर्व जगत् क्षणांत निर्मनुष्य करूं शकेन. पण पाण्डुपुत्रांना ( ते कुरु कुळांतील व तुमच्याचसारखे माझे नातू असल्यामुळें) मी माझ्या हातानें ठार मारणार नाहीं. त्यांच्या बाजूचे प्रतिदिनीं दहा हजार योद्धे मी कलात्मक युद्ध करून ठार मारीन. त्यांनीं पूर्वींच जर मला ठार न मारलें तर मी या पद्धतीनें त्यांच्या सहायकांचा विध्वंस करीन. सेनापतित्व स्वीकारतांना माझी दुसरीही अट आहे. हा जो द्रुपदाचा मुलगा शिखंडी त्याच्याशीं मी युद्ध करणार नाहीं. मी तुला सांगितल्याप्रमाणें तो स्त्रीचा पुरुष झालेला गृहस्थ आहे. काशिराजाची ज्येष्ठ कन्या अम्बा त्याच्या रूपानें अवतीर्ण झाली आहे. त्या स्त्रीपुरुषाला धनुष्य हातांत घेऊन रणांत उभा ठाकलेल्या स्थितींत पहाण्याची देखील माझी इच्छा नाहीं. मग त्याच्यावर प्रहार करणें तर दूरच राहील. स्त्री, स्त्रीपुरुष, स्त्रीचें नांव असलेला, व स्त्रियांसारखें रूप असलेला अशा गृहस्थाच्या अंगावर मी बाण कधींही टाकणार नाहीं असें माझें व्रत आहे. या कारणास्तव मी शिखंडीला मारणार नाहीं. मला शिखंडीचा सर्व इतिहास माहीत आहे. भीष्म जर स्त्रीवर हत्यार धरील तर संत त्याची निंदा केल्यावांचून रहाणार नाहींत. शिखंडी रणांत माझ्यासमोर येऊन ठाकला तरी देखील मी त्याला मारणार नाहीं." सर्व क्षत्रियांत अत्यंत श्रेष्ठ व शेवटचे शुद्ध क्षत्रिय सत्यसंध भीष्म हे याप्रमाणें क्षत्रियधर्मास अनुसरून आपल्या प्रतिज्ञेच्या अग्निकुंडांत मनाला पीळ पडत असतांना देखील पांडवांविरुद्ध खड्ग धरून युद्धार्थ उभे

राहिले. धर्मनिष्ठ युधिष्ठिराला कुरुकुलाच्या सत्यसंधतेची महान् पताका असलेले ते आपले पितामह यापुढें आपल्या शस्त्राघाताचें लक्ष्य होणार यामुळें अत्यंत दुःख झालें. धर्मकार्यार्थ उगारलेल्या दंडाला त्यांचा महनीय आशीर्वाद मिळावा म्हणून युद्धाच्या प्रारंभीं युधिष्ठिर आपले पांच बंधु व श्रीकृष्ण यांच्यासहित भीष्मांकडे गेले व त्यांना वंदन करून त्यांच्या आशीर्वादाची अभ्यर्थना करूं लागले. महाभारतकार म्हणतात :—

सोऽवगाह्य चमूं शत्रोः शरशक्तिसमाकुलाम् ।
भीष्ममेवाभ्ययात्तूर्णं भ्रातृभिः परिवारितः ।। ३५
तमुवाच ततः पादौ कराभ्यां पीड्य पाण्डवः ।
भीष्मं शान्तनवं राजा युद्धाय समुपस्थितम् ।। ३६

युधिष्ठिर उवाच ।

आमन्त्रये त्वां दुर्धर्ष त्वया योत्स्यामहे सह ।
अनुजानीहि मां तात आशिषश्च प्रयोजय ।। ३७

भीष्म उवाच ।

यद्येवं नाभिगच्छेथा युधि मां पृथिवीपते ।
शपेयं त्वां महाराज पराभावाय भारत ।। ३८
प्रीतोऽहं पुत्र युध्यस्व जयमाप्नुहि पाण्डव ।
यत्तेऽभिलषितं चान्यत्तदवाप्नुहि संयुगे ।। ३९
व्रियतां च वरः पार्थ किमस्मत्तोऽभिकांक्षसि ।
एवंगते महाराज न तवास्ति पराजयः ।। ४०
अर्थस्य पुरुषो दासो दासस्त्वर्थो न कस्यचित् ।
इति सत्यं महाराज बद्धोऽस्म्यर्थेन कौरवैः ।। ४१
अतस्त्वां क्लीबवद्वाक्यं ब्रवीमि कुरुनन्दन ।
भृतोऽस्म्यर्थेन कौरव्य युद्धादन्यत्किमिच्छसि ।। ४२

युधिष्ठिर उवाच ।

मन्त्रयस्व महाबाहो हितैषी मम नित्यशः ।
युध्यस्व कौरवस्यार्थे ममैष सततं वरः ।। ४३

भीष्म उवाच ।

राजन्किमत्र साह्यं ते करोमि कुरुनन्दन ।
कामं योत्स्ये परस्यार्थे ब्रूहि यत्ते विवक्षितम् ।। ४४

युधिष्ठिर उवाच ।

कथं जयेयं सङ्ग्रामे भवन्तमपराजितम् ।
एतन्मे मन्त्रय हितं यदि श्रेयः प्रपश्यसि ।। ४५

भीष्म उवाच ।

नैनं पश्यामि कौन्तेय यो मां युध्यन्तमाहवे ।
विजयेत पुमान् कश्चित्साक्षादपि शतक्रतुः ।। ४६

युधिष्ठिर उवाच ।

हन्त पृच्छामि तस्मात्त्वां पितामह नमोऽस्तु ते ।
वधोपायं ब्रवीहि त्वमात्मनः समरे परैः ।। ४७

भीष्म उवाच ।

न स्म तं तात पश्यामि समरे यो जयेत माम् ।
न तावन्मृत्युकालोऽपि पुनरागमनं कुरु ।। ४८

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय ४३

नंतर युधिष्ठिरानें सिद्ध अशा त्या कौरवपक्षीय सेनेला पार केलें व बंधूसहित शीघ्रगतीनें तो भीष्मांच्या जवळ येऊन पोहोंचला. त्यांच्या पायावर वंदना समर्पण करून युधिष्ठिर त्यांना म्हणाला, हे पितामह, आपल्याबरोबर युद्ध करण्यासाठीं मी आपली आज्ञा मागावयास आलों आहे. मला आपण आशीर्वाद द्या. हें ऐकतांच भीष्म त्याला म्हणाले : हे राजा, जर तूं माझ्याकडे आला नसतास व याप्रमाणें तुला योग्य तें कर्तव्य केलें नसतेस तर मी तुझा पराभव व्हावा म्हणून तुला खात्रीनें शाप दिला असता. हे पुत्रा, तुझ्या या कृत्यानें मी अत्यंत प्रसन्न झालों आहे. माझ्याशीं युद्ध कर व विजय संपादन कर. युद्धांत तुझी जी इच्छा असेल ती सफल करून घे. पण कुन्तीपुत्रा, तुझें काय अभिलषित आहे? कोणता वर तुला माझ्याकडून हवा आहे ? याप्रमाणें जो धर्मनिष्ठतेनें वागतो त्याचा कधींही पराभव होत नाहीं. हे राजा, अर्थ कधींही कोणाचा दास असत नाहीं. पुरुषच अर्थाचा दास असतो हें अगदीं सत्य आहे. मी कौरवांशीं अर्थानें बांधला गेलों आहे. ( या ठिकाणीं अर्थ म्हणजे पुरुषार्थ. लोक समजतात त्याप्रमाणें पैसा नव्हे. ज्याच्या धनुष्याच्या

टणत्कारानें जामदग्न्य परशुरामांच्याही हृदयाचा थरकांप उडविला व चालत आलेलें राज्य ज्यानें ध्येयनिष्ठतेसाठीं कसल्याही प्रलोभनाला नि आग्रहाला बळी न पडतां दोनदां झिडकारून दिलें, तो सत्यसंध महापुरुष पैशासाठीं कौरवांचा गुलाम बनेल असें मानणें निव्वळ महामूर्खपणाचें आहे. सत्यरूपी पुरुषार्थ हीच भीष्मांची जीवननिष्ठा आहे. व त्यामुळेंच ते या ठिकाणीं पुरुषार्थ या अर्थानें अर्थशब्दाचा वापर करून असें म्हणत आहेत कीं प्रत्येक मनुष्य आपआपल्या ध्येयवादाचा अंकित आहे. ध्येय कांहीं मनुष्याच्या अंकित नाहीं. मी सत्यरूपी पुरुषार्थानें कौरवांशीं बांधला गेलों आहे. त्यामुळें तुझा पक्ष न्यायाचा असून देखील मला कौरवांच्याच बाजूनें लढणें व हा देह खपविणें भाग आहे. या श्लोकावर बरीच टीका होत असल्यामुळें ती सर्वस्वीं विपर्यस्त व चुकीची कशी आहे हें दाखविण्यासाठींच मी हें स्पष्टीकरण करीत आहें ). म्हणून हे कुरुनन्दना, एकाद्या क्लीबाप्रमाणें मी तुला असें विचारीत आहे कीं, माझ्या प्रतिज्ञेनुसार मी बांधला गेलों असल्यामुळें तुझ्या बाजूनें युद्ध करणें सोडून दुसरें मी तुझ्यासाठीं काय करावें अशी तुझी इच्छा आहे तें तूं मला सांग. युधिष्ठिर म्हणाले, "माझ्या कल्याणाची इच्छा मनांत बाळगून माझ्या हिताचा सल्ला आपण मला द्या. एवढाच वर मी आपल्यापाशीं मागतों. आपण खुशाल कौरवांच्या बाजूनें लढावें." त्यावर भीष्म म्हणाले, "मी याच बाजूनें लढेन हें तर खरेंच आहे. पण तुला माझा कोणत्या बाबतींत सल्ला हवा आहे तें सांग." त्यावर युधिष्ठिर म्हणाले, "आपण अजिक्य आहांत. मी आपणांशीं संग्रामांत लढून आपणांस कोणत्या उपायानें जिकावें तें आपण मला सांगा. माझ्या हिताचा हाच सल्ला मला हवा आहे." त्यावर भीष्म म्हणाले, " राजा, मी युद्धांत लढत असतां साक्षात् देवेंद्र देखील मला जिकूं शकत नाहीं. मग इतरांची कथाच काय ? असा कोणीही पुरुष मला दिसत नाहीं कीं जो मी युद्ध करीत असतां मला जिकूं शकेल." त्यावर युधिष्ठिर म्हणाले, " हे पितामहा, मी आपल्याला वंदन करतों. मोठा दुःखदायक प्रश्न आपल्याला विचारण्याची पाळी माझ्यावर आली आहे. आपणांस युद्धांत कोणत्या

उपायानें ठार मारतां येईल तें आपण मला सांगा." त्यावर भीष्म म्हणाले, "राजा मला संग्रामांत कोणी जिंकूंही शकणार नाहीं व तूर्त माझा मृत्युकाळ आलेलाही मला दिसत नाहीं. पुन्हां तूं ये त्या वेळीं पाहूं." याप्रमाणें भीष्मांनीं दुर्योधनाच्या तोंडावर स्पष्टपणें सांगितल्याप्रमाणें युधिष्ठिराला त्याच्या हिताचा सल्ला दिला व आपला देह मात्र कौरवांसाठींच खपविला.

## भीष्मांचें अवंचक युद्ध

शस्त्र हातांत घेतल्यावर भीष्मांनीं जें युद्ध केलें त्यांत कसल्याही प्रकारें वंचना केली नाहीं. दहा दिवसांचें भीष्मपर्व हा महाभारतांतील अशबलित व विशुद्ध वीररसाचा आविष्कार होय. भीष्मांच्या मनांत केवळ क्षत्रियोचित असा युद्धोत्साह आहे. क्रोध मुळींच नाहीं. उलट उभयपक्षांतील प्रमुख नायक हे त्यांचींच मुलेंबाळें असल्यामुळें त्यांच्यासमोर कोणी विशेष पराक्रम व्यक्त केला तर वारंवार त्यांचें वात्सल्यच निर्मळपणें प्रकट झालें आहे. काव्यप्रकाशकार मम्मटाला अथवा इतर संस्कृत साहित्यकांना अशबलित व विशुद्ध वीररसाचें पर्वच्या पर्व ज्यानें निर्माण केलें त्या महर्षि व्यासांच्या तेजस्वी प्रतिभेचा हा भव्य आविष्कार कसा दिसला नाहीं कोण जाणें! एरवीं तथाकथित पंच महाकवींच्या, व्यासांच्या दिव्य प्रतिभेच्या तुलनेनें केवळ तिसऱ्या, चवथ्या श्रेणीच्या ठरणाऱ्या शबलित काव्यपक्तींकडे ते वळतेना. महर्षीनीं हा एक अद्भुत चमत्कार करून दाखविलेला आहे. विशुद्ध वीररसाचें हें युद्ध केवळ शुद्ध क्षत्रिय या नात्यानें भीष्मांनीं केलें व तेंही इतक्या अवंचकतेनें कीं तें पाहून कोणाचेंही मन आश्चर्यानें थक्क व्हावें. पहिल्याच दिवशीं त्यांनीं पांडवांचा सेनापति श्वेत रणांत ठार मारून अर्जुन व भीमांसारख्या खंद्या वीरांनीं संरक्षिलेल्या त्या सेनेची इतकी ससेहोलपट केली कीं, पहिल्याच दिवशीं युधिष्ठिराचा युद्धोत्साह पार मावळून त्याच्या मनांत कमालीचा न्यूनगंड उत्पन्न झाला. महाभारतकार भीष्मपर्वांत लिहितात :–

कृतेऽवहारे सैन्यानां प्रथमे भरतर्षभ ।
भीष्मे च युद्धसंरब्धे हृष्टे दुर्योधने तथा ॥ १
धर्मराजस्ततस्तूर्णमभिगम्य जनार्दनम् ।
भ्रातृभिः सहितः सर्वैः सर्वैश्चैव जनेश्वरैः ॥ २
शुचा परमया युक्तश्चिन्तमानः पराजयम् ।
वार्ष्णेयमब्रवीद्राजन् दृष्ट्वा भीष्मस्य विक्रमम् ॥ ३
कृष्ण पश्य महेष्वासं भीष्मं भीमपराक्रमम् ।
शरैर्दहन्तं सैन्यं मे ग्रीष्मे कक्षमिवानलम् ॥ ४
कथमेनं महात्मानं शक्ष्यामः प्रतिवीक्षितुम् ।
लेलिह्यमानं सैन्यं मे हविष्मन्तमिवानलम् ॥ ५
एतं हि पुरुषव्याघ्रं धनुष्मतं महाबलम् ।
दृष्ट्वा विप्रद्रुतं सैन्यं समरे मार्गणाहतम् ॥ ६
शक्यो जेतुं यमः क्रुद्धो वज्रपाणिश्च संयुगे ।
वरुणः पाशभृद्वापि कुबेरो वा गदाधरः ॥ ७
न तु भीष्मो महातेजाः शक्यो जेतुं महाबलः ।
सोऽहमेवंगते मग्नो भीष्मागाधजले प्लवे ॥ ८
आत्मनो बुद्धिदौर्बल्याद्भीष्ममासाद्य केशव ।
वनं यास्यामि वार्ष्णेय श्रेयो मे तत्र जीवितुम् ॥९
न त्वेतान् पृथिवीपालान् दातुं भीष्माय मृत्यवे ।
क्षपयिष्यति सेनां मे कृष्ण भीष्मो महास्त्रवित् ॥ १०
यथाऽनलं प्रज्वलितं पतङ्गाः समभिद्रुताः ।
विनाशायोपगच्छन्ति तथा मे सैनिको जनः ॥ ११
क्षयं नीतोऽस्मि वार्ष्णेय राज्यहेतोः पराक्रमी ।
भ्रातरश्चैव मे वीराः कर्शिताः शरपीडिताः ॥ १२
मत्कृते भ्रातृहार्देन राज्याद्भ्रष्टास्तथा सुखात् ।
जीवितं बहु मन्येऽहं जीवितं ह्यद्य दुर्लभम् ॥ १३
जीवितस्य च शेषेण तपस्तप्स्यामि दुश्चरम् ।
न घातयिष्यामि रणे मित्राणीमानि केशव ॥ १४
रथान् मे बहुसाहस्रान् दिव्यैरस्त्रैर्महाबलः ।
घातयत्यनिशं भीष्मः प्रवराणां प्रहारिणाम् ॥ १५

**किं नु कृत्वा हितं मे स्याद् ब्रूहि माधव मा चिरम्।**
**मध्यस्थमिव पश्यामि समरे सव्यसाचिनम् ।। १६**
**एको भीमः परं शक्त्या युध्यत्येव महाभुजः।**
**केवलं बाहुवीर्येण क्षत्रधर्ममनुस्मरन् ।। १७**

**—महाभारत, भीष्मपर्व अध्याय ५०**

"या दिवशीं सैन्याचा अवहार केल्यानंतर दुर्योधनाचा आनंद व भीष्मांचा अपूर्व युद्धोत्साह पाहून सर्व सहायक राजे व बंधु यांच्यासह युधिष्ठिर भगवान् श्रीकृष्णांकडे गेला. त्याला अत्यंत दुःख झालें होतें व पराजयाचीं स्वप्नें त्याच्या नेत्रांसमोर तरळत होतीं. भीष्मांचा पराक्रम आठवून युधिष्ठिर श्रीकृष्णांना म्हणाला, 'हे कृष्णा, भव्य धनुष्य हातांत घेऊन भीषण पराक्रम प्रकट करणाऱ्या भीष्मांना तूं पाहिलेंस काय? ग्रीष्म ऋतूंत वाळलेलें गवत जाळणाऱ्या अग्नीप्रमाणें भीष्म आपल्या बाणांनीं माझें सैन्य दग्ध करीत आहेत. एखाद्या अग्नीप्रमाणेंच जणूं ज्वालांनीं ते माझें सैन्य जाळीत आहेत. त्यांच्याकडे पाहण्याचें तरी सामर्थ्य आमच्यांत आहे काय? या धनुष्पाणि व महाबलवान् पुरुषव्याघ्राला नुसतें पाहूनच माझें सैन्य थरकांपून उठतें व पळून जातें. क्रुद्ध झालेल्या यमाला, वज्र हातांत घेऊन आलेल्या इंद्राला, पाशहस्त वरुणाला, अथवा गदा धारण करणाऱ्या कुबेरालाही जिंकणें शक्य आहे, पण तेजस्वी व सामर्थ्यसंपन्न भीष्मांना जिंकतां येणें केवळ अशक्य आहे. आज मी भीष्मरूपी मोठ्या जलसागरांत पार बुडून गेलों आहें. केवळ मूर्खपणानेंच मी भीष्मांची गांठ घेतली. या भीष्मरूपी मृत्यूच्या अधीन सर्व राजांना करण्याऐवजीं मी वनांत जावयाचें ठरविलें आहे. या लोकांना व्यर्थ मारण्यापेक्षां तेथें जाणें बरें. महास्त्रवेत्ते भीष्म माझ्या सर्व सेनेचा नाश करतील. प्रज्वलित अग्नींत धांवत जाऊन पडणारे पतंग ज्याप्रमाणें स्वतःचा नाश करून घेतात तशीच माझ्या सैन्याची अवस्था झाली आहे. मी मनांत राज्याचा हेतु धरला खरा; पण माझाच सर्वनाश ओढवला आहे. माझे सर्व बंधूही बाणांच्या आघातांनीं अत्यंत पीडित झाले आहेत. केवळ बंधुप्रेमामुळें ते माझ्यासाठीं राज्य व सुख यांपासून पूर्णपणें भ्रष्ट

झाले. त्यांनीं जीविताालाही आंचवावें अशी माझी इच्छा नाहीं. जीवित ही अत्यंत दुर्लभ गोष्ट असल्यामुळें त्याची प्रतिष्ठा मला सर्वांत अधिक वाटते. उरलेलें जीवन मी दुष्कर तपश्चर्येंत घालवीन. पण या माझ्या मित्रांना ठार मारण्याची माझी इच्छा नाहीं. सहस्त्रावधि मोठमोठ्या योद्ध्यांना आपल्या दिव्य अस्त्रांनीं भीष्म ठार मारीत आहेत. मी काय केलें असतां माझें हित होईल तें मला सत्वर सांगा. अर्जुन केवळ मध्यस्थ आहे व मनापासून लढत नाहीं असें मला वाटतें. केवळ एकटा भीम मात्र क्षात्रधर्मानुसार आपल्या बाहूंचें बळ खर्चीं घालून युद्ध करीत आहे."

## प्रतियोद्धा केवळ श्रीकृष्ण

युधिष्ठिरांनीं अर्जुनाच्या पराक्रमावर भिस्त ठेवून असे उद्गार काढले खरे; पण केवळ श्रीकृष्णांवांचून भीष्मांना दुसरा प्रतियोद्धाच नव्हता हें अवघ्या तिसऱ्याच दिवशीं स्पष्ट झालें. तिसऱ्या दिवशींच्या युद्धांत भीष्मांनीं अर्जुनाचा मोड केला. सर्व सैन्य घाबरून पळूं लागलें. सात्यकीनें वीररसयुक्त आवाहन करून सर्व सैनिकांना थोपवून धरण्याचा प्रयत्न केला. पण प्राणभयानें थरकांपणाऱ्या लोकांनीं त्याचें न ऐकतांच पळून जाण्याचें ठरविलें. केवळ जगत् सूत्रचालक श्रीकृष्ण भीष्मांना पराजित करूं शकत होते. शेवटीं मानवी सामर्थ्याचा दिव्यास्त्रवेत्त्या भीष्मांसमोर कांहीं एक उपयोग होत नाहीं असें पाहून श्रीकृष्णांनीं स्वतःच्या हातीं शस्त्र न घेण्याची प्रतिज्ञा बाजूस ठेविली. महाभारतकार म्हणतात :

**उवाच शैनेयमभिप्रशंसन् दृष्ट्वा कुरूनापततः समग्रान् ।**
**ये यान्ति ये यान्तु शिनिप्रवीर येऽपि स्थिताः सात्वत तेऽपि यान्तु ॥ ८४**
**भीष्मं रथात् पश्य निपात्यमानं द्रोणं च संङ्ख्ये सगणं मयाऽद्य ।**
**न मे रथी सात्वत कौरवाणां क्रुद्धस्य मुच्येत रणेऽद्य कश्चित् ॥ ८५**
**तस्मादहं गृह्य रथाङ्गमुग्रं प्राणं हरिष्यामि महाव्रतस्य ।**
**निहत्य भीष्मं सगणं तथाऽऽजौ द्रोणं च शैनेय रथप्रवीरौ ॥ ८६**
**प्रीतिं करिष्यामि धनञ्जयस्य राज्ञश्च भीमस्य तथाऽश्विनोश्च ।**
**निहत्य सर्वान् धृतराष्ट्रपुत्रांस्तत्पक्षिणो ये च नरेंद्रमुख्याः ॥ ८७**

**राज्येन राजानमजातशत्रुं सम्पादयिष्याम्यहमद्य हृष्टः ।**
**ततः सुनाभं वसुदेवपुत्रः सूर्यप्रभं वज्रसमप्रभावम् ।। ८८**
**क्षुरान्तमुद्यम्य भुजेन चक्रं रथादवप्लुत्य विसृज्य वाहान् ।**
**संकम्पयन् गां चरणैर्महात्मा वेगेन कृष्णः प्रससार भीष्मम् ।। ८९**

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय ५९

"त्या प्रलयंकर युद्धांत तशाही भयानक अवस्थेंत टिकून राहणाऱ्या सात्यकीची प्रशंसा करीत व कौरव अंगावर तुटून पडत आहेत असें पहात श्रीकृष्ण म्हणाले, 'हे सात्यके, ज्यांना पळून जावयाचें आहे त्यांना खुशाल जाऊं दे. जे अजून रणांगणांत ठाण मांडून आहेत त्यांनाही जावयाचें असलें तरीही जाऊं दे. तूं पहाच. मी आज भीष्मांना नि द्रोणांना ठार मारून युद्धांत रथावरून खालीं पाडतों. आज संतापलेल्या माझ्यासमोर कौरवांकडचा कोणीही रथी जिवंत राहूं शकणार नाहीं. मी माझें चक्र उगारून त्याच्या प्रभावानें महाव्रत भीष्माचे प्राण घेतों. अनुयायांसहित भीष्म व द्रोण या महारथ्यांना ठार मारून त्यांच्या मागोमाग सर्व धृतराष्ट्रपुत्र व तत्पक्षीय राजे यांनाही ठार मारून युधिष्ठिराला राज्य देऊन सर्व पांडवांना मी आज आनंदित करीन." असें म्हणून वसुदेवपुत्र श्रीकृष्णांनीं, सूर्याप्रमाणें अत्यंत तेजस्वी, व वज्राप्रमाणें अत्यंत प्रभावी असलेलें आपलें सुदर्शन चक्र हातांत घेतलें व तें उगारून ते भीष्मांच्या अंगावर वेगानें जणूं पृथ्वी पायांनीं नमवीतच जाऊं लागले." शेवटीं अर्जुनानें श्रीकृष्णांना मोठ्या कष्टानें क्रोध आवरावयास सांगितलें. सत्यसंध भीष्मांनीं श्रीकृष्णांसारख्या अतुल पराक्रमी व्यक्तीला आपल्या अवंचक युद्धानें एकदांच नव्हें तर दोनदां देहभान विसरून भ्रष्टप्रतिज्ञ व्हावयास लावलें आहे. उदाहरणार्थ नवव्या दिवशींच्या युद्धाचें पुढील वर्णन पहा :—

**प्रतपन्तमिवादित्यं मध्यमासाद्य सेनयोः ।**
**वरान्वरान् विनिघ्नन्तं पाण्डुपुत्रस्य सैनिकान् ।। ५४**
**युगान्तमिव कुर्वाणं भीष्मं यौधिष्ठिरे बले ।**
**नामृष्यत महाबाहुर्माधवः परवीरहा ।। ५५**

उत्सृज्य रजतप्रख्यान् हयान्पार्थस्य मारिष ।
वासुदेवस्ततो योगी प्रचस्कन्द महारथात् ।। ५६
अभिदुद्राव भीष्मं स भुजप्रहरणो बली ।
प्रतोदपाणिस्तेजस्वी सिंहवद्विनदन्मुहुः ।। ५७
दारयन्निव पद्भ्यां स जगतीं जगदीश्वरः ।
क्रोधताम्रेक्षणः कृष्णो जिघांसुरमितद्युतिः ।। ५८
ग्रसन्त इव चेतांसि तावकानां महाहवे ।
दृष्ट्वा माधवमाक्रन्दे भीष्मायोद्यतमन्तिके ।। ५९
हतो भीष्मो हतो भीष्मस्तत्र तत्र वचो महत् ।
अश्रूयत महाराज वासुदेवभयात्तदा ।। ६०
पीतकौशेयसंवीतो मणिश्यामो जनार्दनः ।
शुशुभे विद्रवन् भीष्मं विद्युन्माली यथाऽम्बुदः ।। ६१

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय १०६

"माध्यान्हीच्या सूर्याप्रमाणें उभय सैन्यांच्या मध्यभागीं भीष्म तळपत होते. मोठमोठ्या श्रेष्ठ अशा पांडवपक्षीय वीरांना ठार मारून ते जणूं प्रलयकाल ओढवून आणीत होते. भगवान् श्रीकृष्णांना तें सहन झालें नाहीं. पार्थाचे चांदीसारखे शुभ्र घोडे तसेच टाकून योगीश्वर श्रीकृष्णांनीं रथाखालीं उडी घेतली व भीष्माकडे वेगानें धांव घेतली. भुज हेच त्यांचें प्रहरण होते. चाबूक उगारला होता व ते सिंहाप्रमाणें मधून मधून गर्जना करीत होते. जणूं पायांनीं ते भूकंप घडवीत आहेत असें वाटलें. जगदीश्वर श्रीकृष्णांचे नेत्र क्रोधानें तांबडे लाल झाले होते व भीष्मांना ठार मारावें ही एकच वासना त्यांच्या अंतःकरणांत घोळत होती. आतांपर्यंतचा भीष्मांचा पराक्रम पाहून ज्या वेळीं श्रीकृष्ण भीष्मांच्या अंगावर धावून जाऊं लागले तेव्हां त्यांच्या सामर्थ्यानें घाबरलेले कौरवपक्षीय वीर मेले, भीष्म ठार मेले असें ओरडूं लागले. मेघावर वीज चमकावी त्याप्रमाणें, इंद्रनीळ मण्याप्रमाणें श्यामवर्ण श्रीकृष्णांच्या अंगावरील पिवळें वस्त्र सावळ्या मेघावरील विजेप्रमाणें चमकत होतें व तें अपूर्व होतें." आपल्यावांचून भीष्मांना कोणीही मारूं शकणार नाहीं, याविषयीं श्रीकृष्णांची इतकी खात्री होऊन गेलेली होती कीं नवव्या

दिवशींच्या रात्रीं पांडवांच्या शिबिरांत जेव्हां योद्धयांची समिति भरली त्यावेळीं श्रीकृष्ण म्हणाले :—

**मां वा नियुङ्क्ष्व सौहार्दाद्योत्स्ये भीष्मेण पांडव ।**
**त्वत्प्रयुक्तो महाराज किं न कुर्यां महाहवे ।। २८**

**हनिष्यामि रणे भीष्ममाहूय पुरुषर्षभम् ।**
**पश्यतां धार्तराष्ट्राणां यदि नेच्छति फाल्गुनः ।। २९**

**यदि भीष्मे हते वीरे जयं पश्यसि पाण्डव ।**
**हन्ताऽस्म्येकरथेनाद्य कुरुवृद्धं पितामहम् ।। ३०**

**पश्य मे विक्रमं राजन् महेन्द्रस्येव संयुगे ।**
**विमुञ्चन्तं महास्त्राणि पातयिष्यामि तं रथात् ।। ३१**

**—महाभारत, भीष्मपर्व अध्याय १०७**

"हे महाराज, आपण मला सेनापति कां नेमीत नाहीं? मी भीष्मांशीं युद्ध करतों. आपण सांगितल्यावर मी काय करणार नाहीं? अर्जुनाची इच्छा नसल्यावर सर्व कौरव पहात असतांना मी आव्हानपुरस्सर पुरुषश्रेष्ठ भीष्माला युद्धांत ठार मारतों. भीष्माच्या मृत्यूंत आपणांस विजय वाटत असल्यास मी भीष्मांना ठार मारीन. महेंद्राप्रमाणें माझा दिव्य पराक्रम आपण पहाच. महास्त्रांचा वारंवार प्रयोग करीत असलेल्या भीष्मांना मी ठार मारतों." श्रीकृष्णालाच भ्रष्टप्रतिज्ञ होऊन वारंवार हातांत शस्त्र घ्यावयाची स्फूर्ति उत्पन्न करणारी पराक्रमाची ही ज्योत केवढी दीप्तिमान् आहे ! केवढी अतुलनीय आहे! युधिष्ठिरानें स्वत:साठीं श्रीकृष्णांना भ्रष्टप्रतिज्ञ करण्याचें नाकारलें व शेवटीं दुसरा उपाय नाहीं म्हणून भीष्मांनीं युद्धारंभीं सांगितल्याप्रमाणें श्रीकृष्णांसह पांडव त्यांनाच त्यांच्या मृत्यूचा उपाय विचारण्यासाठीं त्यांच्या शिबिरांत गेले.

## मृत्युंजय महामनस्कता

भीष्मांनीं त्यांचें प्रेमपूर्वक स्वागत केलें. त्यांच्या त्या औदार्यानें ओशाळून गेलेल्या युधिष्ठिरानें त्यांना जिंकण्याच्या बाबतींतील आपैली असमर्थता त्यांच्या चरणीं निवेदन केली व त्यांना जिंक-

ण्याचा उपाय विनम्रपणें विचारला. धर्मपक्षाचा विजय होण्यासाठींच जें शौर्य खर्ची पडावयाचें तें शौर्य प्रतिज्ञेनें बद्ध झाल्यामुळें दुष्टांच्या राज्ययंत्रांत स्थैर्य उत्पन्न करण्यासाठीं खर्ची पडत आहे याचा त्यांना अत्यंत विषाद वाटत होता. पण प्रतिज्ञा व त्यांच्या देहाचें जीवन इतकें एकरूप होऊन गेलें होतें कीं, अखेरीस त्या देहसमिधेच्या हवनावांचून प्रतिज्ञेचा अग्नि शांत करण्याचें दुसरें कोणतेंही साधन त्या सत्यसंध महापुरुषाजवळ उरलेलें नव्हतें. शवटीं निग्रहानें ती देहसमिधच हव्य म्हणून त्या अग्नींत टाकावयाचें त्यांनीं निश्चित केलें व युधिष्ठिराला उद्देशून ते म्हणाले :—

सत्यमेतन्महाबाहो यथा वदसि पाण्डव ॥ ७५
नाहं जेतुं रणे शक्यः सेन्द्रैरपि सुरासुरैः ।
आत्तशस्त्रो रणे यत्तो गृहीतवरकार्मुकः ॥ ७६
ततो मां न्यस्तशस्त्रं तु एते हन्युर्महारथाः ।
निक्षिप्तशस्त्रे पतिते विमुक्तकवचध्वजे ॥ ७७
द्रवमाणे च भीते च तवास्मीति च वादिनि ।
स्त्रियां स्त्रीनामधेये च विकले चैव पुत्रिणि ॥ ७८
अप्रशस्ते नरे चैव न युधं रोचते मम ।
इमं मे शृणु राजेन्द्र संकल्पं पूर्वचिन्तितम् ॥७९
अमङ्गल्यध्वजं दृष्ट्वा न युध्येयं कदाचन ।
य एष द्रौपदो राजंस्तव सैन्ये महारथः ॥ ८०
शिखण्डी समरामर्षी शूरश्च समितिञ्जयः ।
यथाऽभवच्च स्त्रीपूर्वं पश्चात्पुंस्त्वं समागतः ॥ ८१
जानन्ति च भवन्तोऽपि सर्वमेतद्यथातथम् ।
अर्जुनः समरे शूरः पुरस्कृत्य शिखण्डिनम् ॥ ८२
मामेव विशिखैस्तीक्ष्णैरभिद्रवतु दंशितः ।
अमङ्गल्यध्वजे तस्मिन् स्त्रीपूर्वे च विशेषतः ॥ ८३
न प्रहर्तुमभीप्सामि गृहीतेषुः कथञ्चन ।
तदन्तरं समासाद्य पाण्डवो मां धनञ्जयः ॥ ८४
शरैर्घातयतु क्षिप्रं समंताद् भरतर्षभ ।
न तं पश्यामि लोकेषु मां हन्याद्यः समुद्यतम् ॥ ८५

**ऋते कृष्णान्महाभागात्पाण्डवाद्वा धनञ्जयात् ।**
**एष तस्मात् पुरोधाय कञ्चिदन्यं ममाग्रतः ।। ८६**
**आत्तशस्त्रो रणे यत्तो गृहीतवरकार्मुकः ।**
**मां पातयतु बीभत्सुरेवं तव जयो ध्रुवम् ।। ८७**
**एतत्कुरुष्व कौन्तेय यथोक्तं मम सुव्रत ।**
**संग्रामे धार्तराष्ट्रांश्च हन्याः सर्वान्समागतान् ।। ८८**

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय १०७

"हे पांडवा, तूं जें म्हणतोस तें अगदीं खरें आहे. हातांत शस्त्र व धनुष्य घेऊन मी युद्धांत उभा असतां देव व दैत्य यांच्या गणांनीं परिवेष्टित असलेल्या देवेन्द्राची देखील मला जिंकण्याची छाती नाहीं. केवळ मी शस्त्रसंन्यास केला तरच हे महारथ मला मारूं शकतील. शस्त्र टाकून दिलेला, पडलेला, कवच व ध्वज भग्न झालेला, पळून जाणारा, भ्यालेला, मी आपल्याला शरण असून आपल्या स्वाधीन आहे असें म्हणणारा, स्त्रीचें नांव घेतलेला, विकल, एकपुत्र व अप्रशस्त मनुष्य यांच्याशीं युद्ध करणें मला आवडत नाहीं. तसेंच अमंगल ध्वज धारण करणारा अथवा अमंगलाला पुढें करून युद्ध करणारा मनुष्य समोर पाहिल्यावर मी कधींही लढणार नाहीं. तुमच्या सैन्यांत असलेला द्रुपदाचा पुत्र शिखंडी हा अशा प्रकारचा अमंगलध्वज आहे. तो स्त्रीपूर्व असल्यामुळें तो शूर, रणांगणांत ईर्ष्येनें लढणारा असा असला तरी मी त्याच्याशीं युद्ध करणार नाहीं. अर्जुन शूर आहे. त्यानें शिखंडीला पुढें करून माझ्याशीं युद्ध करावें. शिखंडी पुढें असतांना मी मुळींच प्रहार करणार नाहीं. अशा स्थितींत निःशंक मनानें अर्जुनानें माझ्यावर तीक्ष्णांतल्या तीक्ष्ण बाणांचा प्रहार करावा. अशा रीतीनें जर तुम्ही मला ठार माराल तर रणांगणांत धृतराष्ट्रपुत्रांना तुम्ही मारूं शकाल." क्षात्रधर्माच्या त्या धीरोदात्त अवताराचें हें वाक्य ऐकतांच अर्जुनही मनांतून खिन्न झाला. न्यस्तशस्त्र स्थितींत आपल्या या पूजास्थानावर प्रहार करण्याची कल्पना त्याच्या मनाला थरकांपवूं लागली. पण भगवान श्रीकृष्णांच्या व स्वतः पितामहांच्याच आग्रहावरून अर्जुनानें ती गोष्ट अखेरीस मान्य केली. दुसऱ्या

दिवशीं जेव्हां युद्धाला सुरुवात झाली तेव्हां खांडववनाचा दाह करणाऱ्या महास्त्रवेत्त्या अर्जुनासारख्या महारथ्यालाही शेवटीं शिखंडीलाच पुढें करून भीष्मांच्या समोर जातां आलें. भीष्मांनीं शिखंडीला पुढें आलेला पाहतांच लज्जेनें मान फिरविली व शस्त्र-संन्यास केला. अर्जुन शिखंडीच्या आडून आपल्या बाणांनीं त्यांच्या-वर कठोर प्रहार करूं लागला. शिखंडीच्या बाणवर्षावानें त्यांना कसल्याही वेदना होत नव्हत्या. पण अर्जुनाच्या मर्मघातक प्रहा-रांनीं मात्र त्यांना वेदना होत. तें पाहून जवळच उभ्या असलेल्या दुःशासनानें शिखंडीच्या बाणांनीं आजोबांना वेदना होत आहेत असें समजूं नये म्हणून एकीकडे आघात सहन करीत भीष्म त्याला सांगूं लागले :—

**एवं तयोः संवदतोः फाल्गुनो निशितैः शरैः ।। ५८**
**शिखंडिनं पुरस्कृत्य भीष्मं विव्याध संयुगे ।**
**ततो दुःशासनं भूयः स्मयमान इवाब्रवीत् ।। ५९**
**अतिविद्धः शितैर्बाणैर्भृशं गाण्डीवधन्वना ।**
**वज्राशनिसमस्पर्शा अर्जुनेन शरा युधि ।। ६०**
**मुक्ताः सर्वेऽव्यवच्छिन्ना नेमे बाणाः शिखण्डिनः ।**
**निकृन्तमाना मर्माणि दृढावरणभेदिनः ।। ६१**
**मुसला इव मे घ्नंति नेमे बाणाः शिखण्डिनः ।**
**वज्रदण्डसमस्पर्शा वज्रवेगदुरासदाः ।। ६२**
**मम प्राणानारुजन्ति नेमे बाणाः शिखण्डिनः ।**
**नाशयन्तीव मे प्राणान् यमदूता इवाहिताः ।। ६३**
**गदापरिघसंस्पर्शा नेमे बाणाः शिखण्डिनः ।**
**भुजगा इव संक्रुद्धा लेलिहाना विषोल्बणाः ।। ६४**
**समाविशन्ति मर्माणि नेमे बाणाः शिखण्डिनः ।**
**अर्जुनस्य इमे बाणा नेमे बाणाः शिखण्डिनः ।। ६५**
**कृन्तन्ति मम गात्राणि माघमासे गवा इव ।**
**सर्वे ह्यपि न मे दुःखं कुर्युरन्ये नराधिपाः ।। ६६**
**वीरं गाण्डीवधन्वानमृते जिष्णुं कपिध्वजम् । ६७**

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय ११९

अर्जुनाच्या तीक्ष्ण बाणांनीं शरीरावर आघात होत असतां भीष्म दुःशासनाला म्हणाले : वज्राप्रमाणें कठोर स्पर्श असलेले, एकामागून एक सतत अंगावर येणारे हे बाण शिखंडीचे नसून अर्जुनाचे आहेत. दृढ अशा कवचाचेही तुकडे करणारे, मर्माचें निकृन्तनकरणारे व मुसलाप्रमाणें जोराचा आघात करणारे, हे बाण वज्राच्या वेगाप्रमाणें भयानक आहेत. ते माझ्या प्राणांना व्याकूळ करतात. जणू ते यमदूतच आहेत. गदा व परिघ यांच्याप्रमाणें त्यांचा स्पर्श भयानक आहे. जणू क्रुद्ध झालेले ते भयंकर विषारी सापच होत. गाण्डीवधारी अर्जुनावांचून मला इतकें दुःख दुसरें कोण देऊं शकेल? याप्रमाणें बोलत असतांच बाणांच्या आघातांनीं शरीराची चाळणी झालेले भीष्म रथांतून खालीं कोसळले. ते जमिनीवर पडले खरे, पण त्यांच्या अंगांत बाण इतके रुतून बसले होते कीं जमिनीचा त्यांच्या शरीराला स्पर्शही झाला नाहीं. ते खालीं पडतांच अर्जुनाच्या बाणांच्या अग्रावरच त्यांचें शरीर वरच्या वर तोलून धरलें गेलें. कांहीं वेळ महानुभाव भीष्मांना मूर्च्छा आली. पण थोडयाच वेळांत स्वतःला सावरून त्या अलौकिक पुरुषानें आपले नेत्र उघडले. त्यांनीं आकाशाकडे दृष्टि वळविली तोंच त्यांना दक्षिणायन आहे हें समजून आलें. त्याबरोबर त्यांनीं आपल्या इच्छामरणी सामर्थ्याचा उपयोग करून उत्तरायण येईपर्यंत शरशय्येवर तसेंच पडून रहावें, कीं स्वतःची जीवन ज्योत शाश्वत प्रकाशांत ताबडतोब विलीन करावी याचा विचार चालविला. धर्मशास्त्राप्रमाणें ज्याला शक्य आहे त्यानें उत्तरायणांत देह ठेवणें चांगलें. पण भीष्मांच्या समोर वेगळाच प्रश्न होता. बाणाघाताच्या वेदना त्यांना होत होत्या. त्या सहन करीत त्यांना उत्तरायण येईपर्यंत थांबणें क्रमप्राप्त होतें. तसें करावें कीं नाहीं म्हणजे वेदनामय मृत्यु स्वीकारावा कीं त्वरित दिव्य गतीला निघून जावें हा प्रश्न त्यांच्या समोर होता व तो केवळ त्यांच्या इच्छेनेंच सुटणारा होता. पण त्यांनीं तो प्रश्न कसा सोडवावा यासंबंधीं कांहीं दिव्य संदेश त्यांना ऐकूं आले. महाभारतांत म्हटलें आहे कीं :–

पतन् स ददृशे चापि दक्षिणेन दिवाकरम् ॥ ९३
संज्ञां चोपालभद्वीरः कालं सञ्चिन्त्य भारत ।
अन्तरिक्षे च शुश्राव दिव्या वाचः समन्ततः ॥ ९४
कथं महात्मा गाङ्गेयः सर्वशस्त्रभृतां वरः ।
कालकर्ता नरव्याघ्रः संप्राप्ते दक्षिणायने ॥ ९५
स्थितोऽस्मीति च गाङ्गेयस्तच्छ्रुत्वा वाक्यमब्रवीत् ।
धारयामास च प्राणान् पतितोऽपि महीतले ॥ ९६
उत्तरायणमन्विच्छन् भीष्मः कुरुपितामहः ॥ ९७
महोपनिषदं चैव योगमास्थाय वीर्यवान् ॥ १२१
जपन् शान्तनवो धीमान् कालाकाङ्क्षी स्थितोऽभवत् ॥ १२२
—महाभारत, भीष्मपर्व अध्याय ११९

दक्षिणायन आहे असें पाहून भीष्म काळाचा जों विचार करूं लागले तोंच अंतरिक्षांतून त्यांना दिव्य वाणीनें असें ऐकूं आलें कीं, काळ स्वाधीन असलेले भीष्म सर्व शस्त्रधाऱ्यांत श्रेष्ठ असे महानुभाव आहेत. हे नरव्याघ्र दक्षिणायनांत देह कसा ठेवीत आहेत? हें ऐकतांच भीष्मांनीं त्यांना उत्तर दिलें कीं, दक्षिणायन संपेपर्यंत मी असाच राहणार आहें. उत्तरायणाची वाट पहात भीष्म तेथें तसेंच आपले प्राण धारण करून राहिले. योगसामर्थ्यानें श्रेष्ठ उपनिषदांचा पाठ करीत भीष्म काळाची वाट पहात होते. भीष्मांच्या निधनाची दुःखद वार्ता ऐकतांच द्रोणाचार्यांना जागच्या जागींच मूर्च्छा आली. कृपाचार्यादि महारथ्यांनीं भीष्मांचा देहपात म्हणजेच स्वतःचा व दुर्योधनाच्या यशाकांक्षेचाही अंतकाळ समजून धीर सोडला. शरदंष्ट्रांनीं युक्त धनुष्य हेंच ज्याचें मुख आहे, खड्ग हीच ज्याची जिव्हा, असा सर्वस्वीं दुरासद असलेला तो नरसिंह कोणाचें आशास्थान नव्हता ? भीष्म संपतांच कौरव व पांडव या दोन्ही पक्षांचे महारथी गहिवरले. सर्वांनीं आपआपलीं शस्त्रें सांवरलीं व त्या महापुरुषाच्या शरशय्येभोंवतीं गोळा होण्यासाठीं सर्वजण खिन्न मनानें जाऊं लागले.

### दिव्य शरशयन

आपआपलीं कवचें काढून घेऊन व नतमस्तक होऊन भीष्मांच्या पायाशीं उभयपक्षीय वीर उभे राहिले. त्यांच्या त्या समूहांत महा-

नुभाव भीष्मांनीं जे अनेक दिव्य भाव प्रकट केले त्यांचें महाभारतांत अत्यंत हृदयस्पर्शी वर्णन आहे. हें वर्णन म्हणजे भीष्मांची महानुभावता व विनीत अर्जुनाचें सर्वश्रेष्ठ सामर्थ्य या दोहोंचें अत्यंत हृदयस्पर्शी असें एकीकरणच होय. महाभारतकार म्हणतात :--

निवृत्तेषु च सैन्येषु पारंपर्येण सर्वशः ।
निर्मुक्तकवचाः सर्वे भीष्ममीयुर्नराधिपाः ।। २९
व्युपरम्य ततो युद्धाद्योधाः शतसहस्रशः ।
उपतस्थुर्महात्मानं प्रजापतिमिवामराः ।। ३०
ते तु भीष्मं समासाद्य शयानं भरतर्षभम् ।
अभिवाद्यावतिष्ठन्त पाण्डवाः कुरुभिः सह ।। ३१
अथ पाण्डून् कुरूंश्चैव प्रणिपत्याग्रतः स्थितान् ।
अभ्यभाषत धर्मात्मा भीष्मः शान्तनवस्तदा ।। ३२
स्वागतं वो महाभागाः स्वागतं वो महारथाः ।
तुष्यामि दर्शनाच्चाहं युष्माकममरोपमाः ।। ३३
अभिमन्त्र्याथ तानेवं शिरसा लम्बताऽब्रवीत् ।
शिरो मे लम्बतेऽत्यर्थमुपधानं प्रदीयताम् ।। ३४
ततो नृपाः समाजह्रुस्तनूनि च मृदूनि च ।
उपधानानि मुख्यानि नैच्छत्तानि पितामहः ।। ३५
अथाब्रवीन्नरव्याघ्रः प्रहसन्निव तान्नृपान् ।
नैतानि वीरशय्यासु युक्तरूपाणि पार्थिवाः ।। ३६
ततो वीक्ष्य नरश्रेष्ठमभ्यभाषत पाण्डवम् ।
धनञ्जयं दीर्घबाहुं सर्वलोकमहारथम् ।। ३७
धनञ्जय महाबाहो शिरो मे तात लम्बते ।
दीयतामुपधानं वै यद्युक्तमिह मन्यसे ।। ३८

संजय उवाच ।

समारोप्य महच्चापमभिवाद्य पितामहम् ।
नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यामिदं वचनमब्रवीत् ।। ३९
आज्ञापय कुरुश्रेष्ठ सर्वशस्त्रभृतां वर ।
प्रेष्योऽहं तव दुर्धर्ष क्रियतां किं पितामह ।। ४०
तमब्रवीच्छान्तनवः शिरो मे तात लम्बते ।
उपधानं कुरुश्रेष्ठ फाल्गुनोपदधत्स्व मे ।। ४१

शयनस्यानुरूपं वै शीघ्रं वीर प्रयच्छ मे ।
त्वं हि पार्थ समर्थो वै श्रेष्ठः सर्वधनुष्मताम् ।। ४२
क्षत्रधर्मस्य वेत्ता च बुद्धिसत्त्वगुणान्वितः ।
फाल्गुनोऽपि तथेत्युक्त्वा व्यवसायमरोचयत् ।। ४३
गृह्यानुमन्त्र्य गाण्डीवं शरान् सन्नतपर्वणः ।
अनुमान्य महात्मानं भरतानां महारथम् ।। ४४
त्रिभिस्तीक्ष्णैर्महावेगैरन्वगृह्णाच्छिरः शरैः ।
अभिप्राये तु विदिते धर्मात्मा सव्यसाचिना ।। ४५
अतुष्यद्भरतश्रेष्ठो भीष्मो धर्मार्थतत्त्ववित् ।
उपधानेन दत्तेन प्रत्यनन्दद्धनञ्जयम् ।। ४६
प्राह सर्वान् समुद्वीक्ष्य भरतान् भारतं प्रति ।
कुन्तीपुत्रं युधां श्रेष्ठं सुहृदां प्रीतिवर्धनम् ।। ४७
शयनस्यानुरूपं मे पाण्डवोपहितं त्वया ।
यद्यन्यथा प्रपद्येथाः शपेयं त्वामहं रुषा ।। ४८
एवमेव महाबाहो धर्मेषु परितिष्ठता ।
स्वप्तव्यं क्षत्रियेणाजौ शरतल्पगतेन वै ।। ४९
एवमुक्त्वा तु बीभत्सुं सर्वांस्तानब्रवीद्वचः ।
राज्ञश्च राजपुत्रांश्च पाण्डवानभिसंस्थितान् ।। ५०
पश्यध्वमुपधानं मे पाण्डवेनाभिसंधितम् ।
शिश्येऽहमस्यां शय्यायां यावदावर्तनं रवेः ।। ५१
उपातिष्ठन्नथो वैद्याः शल्योद्धरणकोविदाः ।। ५५
सर्वोपकरणैर्युक्ताः कुशलैः साधुशिक्षिताः ।
तान् दृष्ट्वा जाह्नवीपुत्रः प्रोवाच तनयं तव ।। ५६
धनं दत्वा विसृज्यन्तां पूजयित्वा चिकित्सकाः ।
एवं गते मयेदानीं वैद्यैः कार्यमिहास्ति किम् ।। ५७
क्षत्रधर्मे प्रशस्तां हि प्राप्तोऽस्मि परमां गतिम् ।
नैष धर्मो महीपालाः शरतल्पगतस्य मे ।। ५८
एभिरेव शरैश्चाहं दग्धव्योऽस्मि नराधिपाः ।
तच्छ्रुत्वा वचनं तस्य पुत्रो दुर्योधनस्तव ।। ५९
वैद्यान् विसर्जयामास पूजयित्वा यथार्हतः ।
ततस्ते विस्मयं जग्मुर्नानाजनपदेश्वराः ।। ६०

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय १२०

देवांनीं प्रजापतीसमोर उभें रहावें, त्याप्रमाणें सर्व मंडळी भीष्मांसमोर उभी राहिली असतां, त्यांच्या वंदना घेऊन भीष्म त्यांना म्हणाले, हे महाभागांनो तुमचें स्वागत असो. तुम्ही देव-तुल्य पराक्रमी आहांत. तुमच्या दर्शनानें मला अत्यंत आनंद झाला. याप्रमाणें त्यांना बोलून पुनश्च भीष्म त्यांना म्हणाले, मला शय्या मिळाली आहे. पण माझें मस्तक खालीं लोंबतें आहे. कोणी मला उपधान ( उशी ) देईल काय ? हें ऐकतांच सर्व राजांनीं उत्कृष्ट प्रकारच्या उशा त्यांना आणून दिल्या. त्यांचें तें कृत्य पाहून हसून नरव्याघ्र भीष्म त्यांना म्हणाले, हे राजांनो, या वीरशय्येवर हें उपधान योग्य आहे असें तुम्हांस वाटतें काय ? माझ्या या वेळच्या अवस्थेला हें उपधान सर्वस्वीं अयोग्य आहे. नंतर दीर्घ-बाहू व सर्व लोकांत श्रेष्ठ महारथी म्हणून विख्यात असलेल्या अर्जु-नाला उद्देशून ते म्हणाले, हे महाबाहो धनंजया, माझें मस्तक खालीं लोंबतें आहे. तुला या शय्येला योग्य असें जें उपधान वाटेल तें मला दे. हें ऐकतांच आपले भयंकर धनुष्य सज्ज करून व पिता-महांना वंदन करून अश्रूंनीं भरून आलेल्या डोळ्यांनीं त्यांच्याकडे पहात अर्जुन त्यांना म्हणाला; ‘ हे पितामहा, मी आपला दास आहे. काय आज्ञा आहे? भीष्मांनीं पुनः त्याला सांगितलें कीं, माझें मस्तक खालीं लोंबतें आहे, मला उपधानाची आवश्यकता आहे. तूं सर्व धनुर्धारी लोकांत श्रेष्ठ आहेस. बुद्धि व सामर्थ्य याचा तूं निधीच आहेस. क्षात्रधर्म तुला समजतो. या शय्येला योग्य असें उपधान तूं मला दे.’ हें ऐकतांच अर्जुनानें तीन तीक्ष्ण बाणांनीं त्यांचें मस्तक सांवरून धरलें. अर्जुनानें आपला अभिप्राय ओळखला हें पाहून भीष्म अत्यंत प्रसन्न झाले व सर्वांचें लक्ष वेधून अर्जुनाला उद्देशून म्हणाले, ‘माझ्या शय्येला अनुरूप असें हें उपधान देऊन तूं मला प्रसन्न करून घेतलें आहेस. हे पांडवा, तूं दुसरें कांहीं केलें असतेंस तर मी क्रोधानें तुला शाप दिला असता. शरशय्येवर शयन करणाऱ्या धर्मवेत्या क्षत्रियानें असेंच व्रत अंगीकारून राहिलें पाहिजे. नंतर सर्व राजांना उद्देशून ते म्हणाले, पहा, या पांडवानें माझी इच्छा कशी पूर्ण केली.

उत्तरायण येईपर्यंत मी असाच या शय्येवर पडून राहीन. थोड्याच वेळानें दुर्योधनानें पाठविलेले, जखम बरी करण्याच्या कामांत अत्यंत कुशल, चिकित्साशास्त्र उत्तम रीतीनें अवगत करून घेतलेले असे सर्वसाधनयुक्त वैद्य त्या ठिकाणीं आले. त्यांना पाहून भीष्म म्हणाले, 'धन देऊन या चिकित्सकांना परत पाठवून द्या. माझ्या या अशा अवस्थेंत वैद्यांचें काय काम आहे? क्षत्रियांना अत्यंत योग्य अशा सर्वश्रेष्ठ गतीला मी जात आहें. शरशय्येवरील योद्धयाला हें कर्तव्य नाहीं. मी संपल्यावर या बाणांसहितच मला दग्ध करा.' हें ऐकतांच दुर्योधनानें त्या सर्वांना धन देऊन परत पाठवून दिलें. त्यांचे ते धीरोदात्त उद्गार ऐकतांच सर्व लोक आश्चर्यानें थक्क झाले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं पुनश्च मंडळी भीष्मांच्या शय्येभोंवतीं गोळा झाली. त्यांनीं आपल्या अद्वितीय वीरभावाचा पुनश्च नवा आविष्कार त्यांना दाखविला. महाभारतकार म्हणतात :—

भीष्मस्तु वेदनां धैर्यान्निगृह्य भरतर्षभ ।
अभितप्तः शरैश्चैव निःश्वसन्नुरगो यथा ॥ १०
शराभितप्तकायोऽपि शस्त्रसंपातमूर्छितः ।
पानीयमिति संप्रेक्ष्य राज्ञस्तान् प्रत्यभाषत ॥ ११
ततस्ते क्षत्रिया राजन्नुपाजह्रुः समन्ततः ।
भक्ष्यानुच्चावचान्राजन्वारिकुम्भांश्च शीतलान् ॥ १२
उपानीतं तु पानीयं दृष्ट्वा शान्तनवोऽब्रवीत् ।
नाद्यातीता मया शक्या भोगाः केचन मानुषाः ॥ १३
अपक्रान्तो मनुष्येभ्यः शरशय्यां गतो ह्यहम् ।
प्रतीक्षमाणस्तिष्ठामि निवृत्तिं शशिसूर्ययोः ॥ १४
एवमुक्त्वा शान्तनवो निन्दन् वाक्येन पार्थिवान् ।
अर्जुनं द्रष्टुमिच्छामीत्यभ्यभाषत भारत ॥ १५
अथोपेत्य महाबाहुरभिवाद्य पितामहम् ।
अतिष्ठत्प्राञ्जलिः प्रह्वः किं करोमीति चाब्रवीत् ॥ १६
तं दृष्ट्वा पाण्डवं राजन्नभिवाद्याग्रतः स्थितम् ।
अभ्यभाषत धर्मात्मा भीष्मः प्रीतो धनञ्जयम् ॥ १७

दह्यतीव शरीरं मे संवृतस्य तवेषुभिः ।
मर्माणि परिदूयन्ते मुखं च परिशुष्यति ।। १८
वेदनार्तशरीरस्य प्रयच्छापो ममार्जुन ।
त्वं हि शक्तो महेष्वासः दातुमापो यथाविधि ।। १९
अर्जुनस्तु तथेत्युक्त्वा रथमारुह्य वीर्यवान् ।
अधिज्यं बलवत्कृत्वा गाण्डीवं व्याक्षिपद्धनुः ।। २०
तस्य ज्यातलनिर्घोषं विस्फूर्जितमिवाशनेः ।
वित्रेसुः सर्वभूतानि सर्वे श्रुत्वा च पार्थिवाः ।। २१
ततः प्रदक्षिणं कृत्वा रथेन रथिनां वरः ।
शयानं भरतश्रेष्ठ सर्वशस्त्रभृतां वरम् ।। २२
सन्धाय च शरं दीप्तमभिमन्त्र्य स पाण्डवः ।
पर्जन्यास्त्रेण संयोज्य सर्वलोकस्य पश्यतः ।। २३
अविध्यत्पृथिवीं पार्थः पार्श्वे भीष्मस्य दक्षिणे ।
उत्पपात ततो धारा वारिणो विमला शुभा ।। २४
शीतस्यामृतकल्पस्य दिव्यगन्धरसस्य च ।
अतर्पयत् ततः पार्थः शीतया जलधारया ।। २५
भीष्मं कुरूणामृषभं दिव्यकर्मपराक्रमम् ।
कर्मणा तेन पार्थस्य शक्रस्येव विकुर्वतः ।। २६
विस्मयं परमं जग्मुस्ततस्ते वसुधाधिपाः ।
तत् कर्म प्रेक्ष्य बीभत्सोरतिमानुषविक्रमम् ।। २७
संप्रावेपन्त कुरवो गावः शीतार्दिता इव ।
विस्मयाच्चोत्तरीयाणि व्याविध्यन् सर्वतो नृपाः ।। २८
शङ्खदुन्दुभिनिर्घोषस्तुमुलः सर्वतोऽभवत् ।
तृप्तः शान्तनवश्चापि राजन् बीभत्सुमब्रवीत् ।। २९
सर्वपार्थिववीराणां सन्निधौ पूजयन्निव ।
नैतच्चित्रं महाबाहो त्वयि कौरवनन्दन ।। ३०
कथितो नारदेनासि पूर्वर्षिरमितद्युते ।
वासुदेवसहायस्त्वं महत् कर्म करिष्यसि ।। ३१

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय १२१

"अंगांत रुतून राहिलेल्या बाणांच्या तीव्र वेदनांनीं भीष्मांना अतिशय त्रास होत होता. श्वास टाकीत असलेल्या सर्पाप्रमाणें ते दिसत होते. त्यांनीं धैर्यानें सर्व वेदनांचें दुःख गिळून टाकलें व त्या राजांना पाहून "पाणी पाहिजे" असें ते म्हणाले. तें ऐकतांच योद्धयांनीं धांवत जाऊन नानाप्रकारचे खाद्यपदार्थ व थंड पाण्यानें भरलेले कुंभ त्यांच्यासाठीं आणले. ते पदार्थ व पाणी पाहून भीष्म म्हणाले, "मी मानुष भोग स्वीकारण्याच्या अवस्थेंत नाहीं. या शर-शय्येवर आल्यापासून मी मनुष्य लोकांतून केव्हांच पार गेलों आहें. केवळ उत्तरायणाची मी वाट पहात आहें. याप्रमाणें बोलून त्यांनीं सर्व राजांचा उपहास केला व "मी अर्जुनाला पाहूं इच्छितों" असें ते म्हणाले. हें ऐकतांच अर्जुनानें पुढें येऊन त्यांना वंदन केलें व नम्रपणें हात जोडून "काय आज्ञा आहे" म्हणून विचारलें. त्याची नम्रता पाहून प्रसन्न अंतःकरणानें भीष्म त्याला म्हणाले, "तुझे बाण सर्व बाजूंनीं माझ्या शरीरांत खोलवर रुतून बसलेले असल्यामुळें माझ्या शरीराचा अत्यंत दाह होत आहे. सारीं मर्मस्थानें ठणकत आहेत व तोंडाला कोरड पडली आहे. हे अर्जुना, वेदनेनें आर्त झालेल्या मला पाणी दे. हे महेष्वासा, मला विधिपूर्वक पाणी देण्याचें सामर्थ्य तुझ्याच ठिकाणीं आहे." 'तथास्तु' असें म्हणून अर्जुनानें रथावर आरोहण केलें व आपलें गांडीव प्रत्यंचा चढवून सिद्ध करून त्याचा टणत्कार केला. वज्राघाताप्रमाणें भयानक असा त्याचा आवाज ऐकून सर्व प्राणिमात्र व जमलेले राजे कंपित झाले. नंतर शरशय्येवर पडलेल्या त्या वीरवराला त्यानें प्रदक्षिणा घातली व सर्व लोक त्याच्याकडे पहात असतांनाच त्यानें एक तेजस्वी बाण काढून त्यावर पर्जन्यास्त्रानें अभिमंत्रण केलें व भीष्मांच्या उजव्या बाजूच्या भूमीवर बाण सोडला, तोंच जमिनींतून दिव्यगंधानें युक्त व अमृताप्रमाणें मधुर अशी जलधारा बाहेर पडली. त्या जलधारेनें पार्थानें भीष्मांना तृप्त केलें. अर्जुनाचें तें अतिमानवी कृत्य पाहून सर्व राजे विस्मयचकित झाले. ते आश्चर्यातिरेकानें आपलीं उत्त-रीयें वर उडवूं लागले व गारठलेल्या गाई जशा थरथरा कांपतात त्याप्रमाणें सर्व कौरव कंपित झाले. जिकडे तिकडे शंख व दुंदुभीचा

एकच नाद भरून गेला. तृप्त झालेले भीष्म सर्वांसमक्ष अर्जुनाला म्हणाले, " हे महाबाहो, तूं हें कर्म केलेस याचें मला आश्चर्य वाटत नाहीं. नारदानें तूं नरऋषि असल्याचें मला पूर्वींच सांगितलें आहे. ह्या वासुदेवाच्या साहाय्यानें तूं महत्कार्यें करशील."

नुसतें काव्यदृष्टया जरी पाहिलें तरी अद्भुताच्या अंगांगीभावानें विशुद्ध वीररसाला महर्षींनीं येथें केवढा भरघोस फुलोरा आणला आहे! हें प्रकरण म्हणजे भीष्माच्या उदात्त भव्यतेवर महर्षींनीं चढविलेला देदीप्यमान राजमुकुटच होय.

## अंतकाळची कठोर कर्तव्यनिष्ठा

वस्तुतः शरशय्येवरील भीष्म हे मानुषभावाच्या इतके सीमापार गेले होते कीं उपधान व पाणी या मानवी व्यवहारांतल्या सामान्य गोष्टींचा देखील त्यांनीं स्वतःला स्पर्श होऊं दिला नाहीं. तरी पण अंतिमश्वासापर्यंत त्यांनीं आपली कठोर कर्तव्यनिष्ठा ढळूं दिली नाहीं. त्यांच्या जीवनाच्या या सायंकाळीं देखील त्यांनीं आपली निष्काम कर्मयोग्याची महान् भूमिका पार पाडल्याचीं तीन तरी ज्वलंत उदाहरणें आहेत. कौरवकुळांतील सर्वश्रेष्ठ वृद्ध व्यक्ति म्हणून कुळाचें संरक्षण करण्याचा व हस्तिनापूरच्या राजसभेचे मंत्री म्हणून राजसत्तेचें संरक्षण करण्याचा प्रयत्न त्यांनीं या अंतिम क्षणीं देखील केला. अर्जुनाच्या दिव्य कृत्यांचें स्मरण राजा दुर्योधनाला देत ते म्हणाले:-

> दृष्टं दुर्योधनैतत् ते यथा पार्थेन धीमता ।
> जलस्य धारा जनिता शीतस्यामृतगन्धिनः ।। ३९
> यावत् कृष्णो महाबाहुः स्वाधीनः कुरुसत्तम ।
> तावत्पार्थेन शूरेण सन्धिस्ते तात युज्यताम् ।। ४५
> ममावसानाच्छान्तिरस्तु प्रजानां संगच्छन्तां पार्थिवाः प्रीतिमन्तः ।।
> पितापुत्रं मातुलं भागिनेयो भ्राता चैव भ्रातरं प्रैतु राजन् ।। ५४
>
> —महाभारत, भीष्मपर्व अध्याय १२१

" दुर्योधना! पार्थानें शीतल, सुगंधी व अमृतासारखी मधुर जलधारा कशी निर्माण केली हा चमत्कार तूं पाहिलास काय? जोंपर्यंत

महाबाहू कृष्ण आपण केलेली विनंती ऐकण्याच्या मनःस्थितींत आहे तोंवर शूर पार्थाशीं तूं संधि करून टाक. माझ्या अंताबरोबरच संघर्षाचाही अंत होऊन प्रेमानें या राजे लोकांना परस्परांना भेटूं द्या. पिता व पुत्र, मामा व भाचे, बंधूबंधू एकत्र सुखानें नांदोत." पण अंतिम क्षणीं भीष्मांनीं केलेली ही अभ्यर्थना देखील व्यर्थ गेली. महाभारतकार म्हणतात :–

**" धर्मार्थसहितं वाक्यं श्रुत्वा हितमनामयम् ।**
**नारोचयत पुत्रस्ते मुमूर्षुरिव भेषजम् ।। ५७**

**—महाभारत भीष्मपर्व अध्याय १२१**

"कर्तव्यमार्ग व कल्याण यांचें स्पष्ट मार्गदर्शन असलेलें तें वाक्य दुर्योधनाला रुचलें नाहीं. मरणपंथास लागलेल्या कोणाला औषध रुचलें आहे !" दुर्योधन ऐकत नाहीं असें पाहून कदाचित् कर्णाला वळवितां आलें तर पहावें ! त्या योगानें तरी भयानक विनाश टळेल अशा कल्पनेनें, एकांतांत कर्ण भेटीला आला असतां त्यांनीं तोही प्रयत्न करून पाहिला. ते कर्णाला म्हणाले :—

**सोदर्याः पाण्डवा वीरा भ्रातरस्तेऽरिसूदन ।**
**संगच्छ तैर्महाबाहो मम चेदिच्छसि प्रियम् ।। २१**
**मया भवतु निर्वृत्तं वैरमादित्यनंदन ।**
**पृथिव्यां सर्वराजानो भवन्त्वद्य निरामयाः ।। २२**

**—महाभारत, भीष्मपर्व अध्याय १२२**

हे शत्रुनाशना कर्णा ! पांडव तुझे सहोदर बंधू आहेत. माझें कांहीं प्रिय करावें असें जर तुला खरोखरीच वाटत असेल तर त्यांच्याशीं एकरूप हो. हे सूर्यपुत्रा ! माझ्या अंताबरोबरच हें वैर संपो व पृथ्वीवरील सर्व राजे आनंदांत व सुखानें नांदोत.

पण कर्णानें स्वतःच्या मृत्यूवांचून यांतून सुटका नाहीं असें सांगून त्यांचा युद्धासाठींच आशीर्वाद मागितला. शेवटीं प्रयत्नांच्या सीमामर्यादेपार गोष्ट गेलेली पाहून ते कर्णाला इतकेंच म्हणाले कीं :—

**न चेच्छक्यमवस्रष्टुं वैरमेतत् सुदारुणम् ।**
**अनुजानामि कर्ण त्वां युध्यस्व स्वर्गकाम्यया ।। ३४**

निर्मन्युर्गतसंरम्भः कृतकर्मा रणे स्म ह।
यथाशक्ति यथोत्साहं सतां वृत्तेषु वृत्तवान् ।। ३५
अहं त्वामनुजानामि यदिच्छसि तदाप्नुहि ।
क्षत्रधर्मजिताँल्लोकानवाप्स्यसि धनञ्जयात् ।। ३६
युध्यस्व निरहङ्कारो बलवीर्यव्यपाश्रयः ।
धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत् क्षत्रियस्य न विद्यते ।। ३७
प्रशमे हि कृतो यत्नः सुमहान् सुचिरं मया ।
न चैव शकितः कर्तुं कर्ण सत्यं ब्रवीमि ते ।। ३८

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय १२२

"हे कर्णा! हें दारुण वैर जर तुला सोडणें शक्य नसेल तर मी तुला युद्धाची अनुज्ञा देतों. मात्र स्वर्ग मिळविण्याच्याच इच्छेनें तूं लढ. क्रोधानें अंतःकरणाचा गोंधळ होऊं देऊं नकोस. स्वतःच्या कर्मानेंच रणांगणांत तूं तळपून ऊठ. यथाशक्ति व उत्साह असेल त्याप्रमाणें महापुरुषांचें चारित्र्य तूं प्रकट कर. तुला युद्धच हवें आहे तर मी अनुज्ञा देतों. अर्जुनाच्या हातून तुला क्षात्रधर्मानें संपादन करावयाचे दिव्य लोक मिळतील. निरहंकार मनानें सामर्थ्य व पराक्रम यांचा आश्रय करून तूं युद्ध कर. धर्म्य युद्धावांचून क्षत्रियांना दुसरें कल्याणकारक कांहीं नाहीं. हे कर्णा, मी तुला सत्य सांगतों कीं, शांतता नांदावी म्हणून मी दीर्घकाळ अत्यंत मोठा प्रयत्न केला पण मला यश आलें नाहीं."

युद्धानंतर गोत्रज हत्येच्या भयानें थरकांपणाऱ्या युधिष्ठिराचा शोक ज्ञाननिष्ठ भूमिकेवरून पूर्णपणें नष्ट करून जगांतील शोकमोहपीडित लोकांना कर्तव्यमार्गाची दीक्षा देण्याचें ज्ञाननिष्ठ तपस्व्याचें महाव्रत शरशय्येवरून देखील त्यांनीं धीरोदात्तपणें पार पाडलें. युधिष्ठिराच्याच हातून स्वतःला दारुण मृत्यु येत असतांना देखील शोकमोहातीत झालेले धर्ममूर्ति भीष्म त्याचेंच समाधान करूं लागले. नुसत्या युधिष्ठिरालाच काय, पण भावी भारतसंतानांना व्यक्तिगत, सामाजिक व राज्यतंत्रविषयक भारतीय साध्यांचा सदाचा उपयोगी पडेल असा उपदेश त्यांनीं केला. हिंदुधर्म व भारतीय संस्कृति अथवा

जीवनाचें वैदिक तत्त्वज्ञान काय आहे असें जर कोणी विचारलें तर भीष्मांच्या या उपदेशाकडे बोट दाखवितां येईल. महाभारत ग्रंथाला कार्ष्ण्य वेद ही संज्ञा केवळ शांतिपर्व व अनुशासनपर्व या दोन पर्वांतील भीष्मांच्या उपदेशामुळेंच प्राप्त झाली आहे. स्वतःच्या महान् वाणीला वेदांचें महत्त्व प्राप्त करून द्यावयास ज्या महापुरुषाच्या वाणीचा कृष्णद्वैपायनांनीं आश्रय केला, त्याचें मीं पामरानें काय वर्णन करावें! भीष्म संपले कीं ज्ञानसूर्य अस्तंगत झाला हें भगवान् श्रीकृष्णांनीं जें म्हटलें तेंच खरें.

शेवटीं युधिष्ठिराला अनमोल उपदेश करून त्याच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या नव्या धर्मसत्तेचें एखाद्या दीपस्तंभाप्रमाणें भीष्मांनीं मार्गदर्शन करून आपल्या कर्तव्याची परिसमाप्ति केली. ते युधिष्ठिराला म्हणतात :—

**उवाच चैनं मधुरं नृपं शांतनवो नृपः ।**
**प्रविशस्व पुरीं राजन्व्येतु ते मानसो ज्वरः ॥ ९**
**यजस्व विविधैर्यज्ञैर्बह्वन्नैः स्वाप्तदक्षिणैः ।**
**ययातिरिव राजेन्द्र श्रद्धादमपुरःसरः ॥ १०**
**क्षत्रधर्मरतः पार्थ पितॄन्देवांश्च तर्पय ।**
**श्रेयसा योक्ष्यसे चैव व्येतु ते मानसो ज्वरः ॥ ११**
**रञ्जयस्व प्रजाः सर्वाः प्रकृतीः परिसांत्वय ।**
**सुहृदः फलसत्कारैरर्चयस्व यथार्हतः ॥ १२**
**अनु त्वां तात जीवंतु मित्राणि सुहृदस्तथा ।**
**चैत्यस्थाने स्थितं वृक्षं फलवन्तमिव द्विजाः ॥ १३**
**आगन्तव्यं च भवता समये मम पार्थिव ।**
**विनिवृत्ते दिनकरे प्रवृत्ते चोत्तरायणे ॥ १४**

—महाभारत, अनुशासनपर्व अध्याय १६६

"नंतर युधिष्ठिराला अत्यंत मधुर शब्दांनीं भीष्म म्हणाले : हे राजन्, तूं आपल्या राजधानीस परत जा. तुझा मानसिक संताप नष्ट होवो. राजा ययातीप्रमाणें नानाविध यज्ञयाग करून तूं कीर्ति मिळव. क्षात्रधर्मांत तूं एकनिष्ठ रहा. देव व पितर यांना तृप्त कर.

तुझें कल्याण होईल व हृद्रोग नष्ट होईल. आपल्या प्रजांचें सांत्वन कर व त्यांचें अनुरंजन कर. सुहृदांचा त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें आदरसत्कार कर. मित्र व सुहृद तुझ्या आश्रयानें आनंदानें जगोत. फळांनीं बहरलेल्या वृक्षाकडे सर्व लोक ज्या उत्कंठेनें जातात तीच उत्कंठा तुझ्यावर अवलंबून असलेल्या लोकांना तुझ्याविषयीं वाटली पाहिजे. उत्तरायण लागलें कीं पुन्हां माझ्याकडे ये."

भीष्मांच्या आज्ञेप्रमाणें राजा युधिष्ठिर वागूं लागला हें सांगणें नकोच. त्यांच्या देहनिर्याणाच्या समयीं उत्तरायण लागलें आहे असें पाहून, राजा धृतराष्ट्राला पुढें घालून श्रीकृष्ण बांधव व परिवार यांच्यासह भीष्मांच्या शरशय्येजवळ युधिष्ठिर आले. पुत्रशोकानें संतप्त झालेल्या व परिस्थितीचा परिणाम म्हणून पांडवांशीं अजूनहि दुजाभाव बाळगणाऱ्या धृतराष्ट्राला भीष्मांनीं उपदेश केला. ते म्हणाले :—

**राजन्विदितधर्मोऽसि सुनिर्णीतार्थसंशयः ।**
**बहुश्रुता हि ते विप्रा बहवः पर्युपासिताः ।। ३०**
**वेदशास्त्राणि सर्वाणि धर्मांश्च मनुजेश्वर ।**
**वेदांश्च चतुरः सर्वान्निखिलेमानुबुद्धयसे ।। ३१**
**न शोचितव्यं कौरव्य भवितव्यं हि तत्तथा ।**
**श्रुतं देवरहस्यं ते कृष्णद्वैपायनादपि ।। ३२**
**यथा पाण्डोः सुता राजंस्तथैव तव धर्मतः ।**
**तान्पालय स्थितो धर्मे गुरुशुश्रूषणे रतान् ।। ३३**
**धर्मराजो हि शुद्धात्मा निदेशे स्थास्यते तव**
**आनृशंस्यपरं ह्येनं जानामि गुरुवत्सलम् ।। ३४**
**तव पुत्रा दुरात्मानः क्रोधलोभपरायणाः ।**
**ईर्ष्याभिभूता दुर्वृत्तास्तान्न शोचितुमर्हसि ।। ३५**

—महाभारत, अनुशासनपर्व अध्याय १६७

" हे राजन्, तुला धर्म काय आहे हें चांगलें माहीत आहे. बहुश्रुत ब्राह्मणांची पुष्कळ दिवस सेवा केल्यानंतर तुझ्या अंतःकरणांतील सर्व संशय पूर्णपणें दूर झालेले आहेत. वेदशास्त्रादिकांचें तुला यथा-

वत् ज्ञान असल्यामुळें कांहीं विशेष सांगावें असें नाहीं. जें घडलें आहे तें देवाच्या घरीं ठरलेलेंच असल्यामुळें त्याविषयीं शोक करण्यांत अर्थ नाहीं. स्वतःचे व पाण्डूचे पुत्र या दोघांहीकडे पहाण्याची तुझी दृष्टि समान असली पाहिजे. पांडव आपल्यापेक्षां वडील व मान्य अशा लोकांची सेवा करण्यांत स्वभावतःच निरत असतात. तूं आपल्या धर्मानुसार प्रेमानेंच त्यांच्याकडे पाहिलें पाहिजेस. धर्मराज शुद्ध अंतःकरणाचा असून त्याचें अंतःकरण दयापूर्ण व त्याचें गुरुवात्सल्य अप्रतिम आहे. तुझे पुत्र दुरात्मे व दुर्वृत्त होते. मत्सरानें प्रेरित होऊन ते क्रोध व लोभ यांच्या पूर्णपणें स्वाधीन झाले होते. अशा दुर्वृत्तांचा शोक कधींही करूं नये.

## श्रीकृष्णही गहिंवरले

शेवटीं जगाचा अखेरचा निरोप घेतांना भीष्मांनीं सर्वांना धीरोदात्त उपदेश केला व संहाराची कारणमीमांसा करून आपलें आराध्य दैवत जे भगवान् श्रीकृष्ण त्यांना हात जोडून भीष्मांनीं अंतिम क्षणीं आपली भूमिका स्पष्ट केली. ते म्हणाले :—

> एवमुक्तस्तु गाङ्गेयः पाण्डवानिदमब्रवीत् ।
> धृतराष्ट्रमुखांश्चापि सर्वांश्च सुहृदस्तथा ।। ४८
> प्राणानुत्स्रष्टुमिच्छामि तत्रानुज्ञातुमर्हथ ।
> सत्येषु यतितव्यं वः सत्यं हि परमं बलम् ।। ४९
> आनृशंस्यपरैर्भाव्यं सदैव नियतात्मभिः ।
> ब्रह्मण्यैर्धर्मशीलैश्च तपोनित्यैश्च भारताः ।। ५०
> इत्युक्त्वा सुहृदः सर्वान्संपरिष्वज्य चैव ह ।
> पुनरेवाब्रवीद्धीमान्युधिष्ठिरमिदं वचः ।। ५१
> ब्राह्मणाश्चैव ते नित्यं प्राज्ञाश्चैव विशेषतः ।
> आचार्या ऋत्विजश्चैव पूजनीया जनाधिप ।। ५२
> अनुजानीहि मां कृष्ण वैकुण्ठ पुरुषोत्तम ।। ३९
> रक्ष्याश्च ते पाण्डवेया भवान्येषां परायणम् ।
> उक्तवानस्मि दुर्बुद्धिं मन्दं दुर्योधनं तदा ।। ४०
> 'यतः कृष्णस्ततो धर्मो' यतो धर्मस्ततो जयः ।
> वासुदेवेन तीर्थेन पुत्र संशाम्य पाण्डवः ।। ४१

सन्धानस्य परः कालस्तवेति च पुनः पुनः ।
न च मे तद्वचो मूढः कृतवान्स सुमन्दधीः ।
घातयित्वेह पृथिवीं ततः स निधनं गतः ।। ४२
त्वां तु जानाम्यहं देवं पुराणमृषिसत्तमम् ।
नरेण सहितं देव बदर्यां सुचिरोषितम् ।। ४३
तथा मे नारदः प्राह व्यासश्च सुमहातपाः ।
नरनारायणावेतौ संभूतौ मनुजेष्विति ।। ४४
स मां त्वमनुजानीहि कृष्ण मोक्ष्ये कलेवरम् ।
त्वयाऽहं समनुज्ञातो गच्छेयं परमां गतिम् ।। ४५

—महाभात, अनुशासनपर्व अध्याय १६७

" मी आतां माझे प्राण शाश्वतांत विलीन करीत आहें. तुम्ही सर्व मला अनुज्ञा द्या. नेहमीं सत्य धर्मानें वागा. सत्य हेंच परम बल होय. अंतःकरणांत कोमलता असू द्या. इंद्रियें सदैव स्वाधीन ठेवा. ब्रह्मण्य व धर्मशील राहून आपलें कर्तव्यकर्म करण्यांत सदैव जागृत असा. " असा सर्वांना उपदेश करून पुनश्च युधिष्ठिराला भीष्म म्हणाले, "तूं ब्राह्मण, आचार्य व ऋत्विज यांच्या पूजनांत तर सदैव निमग्न राहाच. पण विशेषतः विचक्षण व शहाण्या लोकांचा नेहमीं सन्मान कर." किती मोलाचा उपदेश आहे हा ! अखेरीस श्रीकृष्णांकडे वळून ते म्हणाले, "हे वैकुण्ठपुरुषोत्तमा, तूं पांडवांची गति आहेस. तूंच त्यांचें संरक्षण कर. त्या दुर्बुद्धि व मूर्ख दुर्योधनाला मी स्पष्ट शब्दांत असें सांगितलें होतें कीं, " जिकडे कृष्ण आहे तिकडेच धर्म आहे. जिकडे धर्म आहे तिकडेच जय आहे. श्रीकृष्ण सांगेल तें ऐकण्यांतच कल्याण आहे. त्याच्या आश्रयानें पांडवांशीं संधि कर." पण तो मूर्ख माझें न ऐकतां सर्व पृथ्वीचा नाश करून त्या होळींत स्वतःही दग्ध झाला. तूं पुराणऋषि नारायण आहेस हें मला माहीत आहे. तूं व अर्जुन नर-नारायण होत असें मला नारद व व्यास यांच्या तोंडून कळलें आहे. मी तुझी अनुज्ञा घेतों. तुझ्या अनुज्ञेनें मी परम गतीला जाईन. आतां मी देह सोडतों. त्या तपोनिधानाचे हे अंतिम उद्गार ऐकतांच भगवान् श्रीकृष्णही गहिवरले. त्यांनीं भीष्मांना सांगितलें:—

अनुजानामि भीष्म त्वां वसून्प्राप्नुहि पार्थिव ।
न तेऽस्मि वृजिनं किञ्चिदिहलोके महाद्युते ।। ४६
पितृभक्तोऽसि राजर्षे मार्कण्डेय इवापरः ।
तेन मृत्युस्तव वशे स्थितो भृत्य इवानतः ।। ४७
—महाभारत, अनुशासनपर्व अध्याय १६७

" हे तेजोभास्करा, तुझ्या संपूर्ण चारित्र्यांत व जीवनांत अणुमात्रही कलंक नाहीं. मार्कण्डेयाप्रमाणें तूं अत्यंत पितृभक्त आहेस. त्यामुळें एखाद्या दासाप्रमाणें मृत्यु तुझ्या अधीन आहे. हे राजर्षे, मी तुला अनुज्ञा देतों. तूं आपल्या वसु स्वरूपांत विलीन हो."

## महानिर्याण

यानंतर भीष्मांनीं आपली वाणी आवरली व योगधारणा करून सर्व चैतन्यशक्तींचा अवरोध करून ते आपले प्राण वरवर नेऊं लागले. सर्व लोकांना आश्चर्यकारक असें दृश्य त्या वेळीं दिसलें. भीष्मांची प्राणशक्ति ज्या ज्या इंद्रियांवरील व अवयवांवरील आपला ताबा सोडी तो तो अवयव विशल्य होत असे. श्रीकृष्णांसहित सर्वांनाच या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटलें. प्राणशक्ति ब्रह्मरंध्रांत एकत्र करून ब्रह्मरंध्राचा भेद करून भीष्मांचा आत्मा दिव्य गतीला निघून गेला. एक महान् ज्योत क्षणभर आकाशांत तळपली व सदाची अंतर्धान पावली. देवांनीं दुदुंभि वाजविल्या. दिव्य पुष्पांचा वर्षाव झाला. सिद्ध व ब्रह्मर्षि जयघोष करूं लागले. युधिष्ठिर व विदुरांनीं भीष्मांच्या शरीरावर रेशमी वस्त्र घातलें. पांडवांनीं चिता तयार केली. युयुत्सूनें त्यांच्या डोक्यावर श्वेत छत्र धरलें. नकुलसहदेवांनीं त्यांचीं शिरोभूषणें घेतलीं व भीमसेन व अर्जुन चौऱ्या व मोर्चेले ढाळूं लागले. राजस्त्रियांनीं पंख्यानें त्या पुण्यपुरुषाच्या शरीराला वारा घातला. भीष्मांचा तो तपकर्कश देह अग्नीच्या ज्योतीशीं एकरूप होऊन गेला. त्यांचें तर्पण करून लोक त्यांना तिलांजलि देत असतां देवी भागीरथी आपल्या जलप्रवाहांतून स्वतः दिव्य मूर्तीनें प्रकट झाली व लोकांचे शोकमोह दूर करणारी ती देवी त्या दिव्य पुत्रासाठीं इतका शोक करूं लागली कीं शेवटीं जगत्सूत्रचालक श्रीकृष्णांनीं व्यासांच्या साहाय्यानें तिचें सांत्वन केलें.

## मूल्यमापन

महर्षि व्यासांनीं क्षात्रधर्माचा मूर्त आविष्कार म्हणून भीष्मांचें व्यक्तिचित्र लोकांसमोर मांडलें आहे. व्यक्तीनें स्वत:समोर कोणतें ध्येय ठेवावें हा स्वतंत्र प्रश्न आहे. पण एकदां ध्येय ठरविल्यावर त्याच्याशीं किती अवंचकतेनें राहिलें पाहिजे हें भीष्मांनीं आपल्या चारित्र्यानें दाखविलें आहे. कर्तव्याच्या मार्गावर भावना त्यांना कधींही विचलित करूं शकत नसत. त्यांनीं स्वतःच अनुशासनपर्वांत त्यांच्या शास्त्रनिष्ठेविषयीं पुढीलप्रमाणें गोष्ट सांगितली आहे :—

पिता मम महातेजाः शान्तनुर्निधनं गतः ।
तस्य दित्सुरहं श्राद्धं गङ्गाद्वारमुपागमम् ।। ११
तत्राऽऽगम्य पितुः पुत्र श्राद्धकर्म समारभम् ।
माता मे जाह्नवी चात्र साहाय्यमकरोत्तदा ।। १२
ततोऽग्रतस्ततः सिद्धानुपवेश्य बहूनृषीन् ।
तोयप्रदानात्प्रभृति कार्याण्यहमथारभम् ।। १३
तत्समाप्य यथोद्दिष्टं पूर्वकर्म समाहितः ।
दातुं निर्वपणं सम्यग्यथावदहमारभम् ।। १४
ततस्तं दर्भविन्यासं भित्त्वा सुरुचिराङ्गदः ।
प्रलम्बाभरणो बाहुरुदतिष्ठद्विशाम्पते ।। १५
तमुत्थितमहं दृष्ट्वा परं विस्मयमागमम् ।
प्रतिग्रहीता साक्षान्मे पितेति भरतर्षभ ।। १६
ततो मे पुनरेवासीत्संज्ञा सञ्चिन्त्य शास्त्रतः ।
नायं वेदेषु विहितो विधिर्हस्त इति प्रभो ।। १७
पिण्डो देयो नरेणेह ततो मतिरभून्मम ।
साक्षान्नेह मनुष्यस्य पिण्डं हि पितरः क्वचित् ।। १८
गृह्णन्ति विहितं चेत्थं पिण्डो देयः कुशेष्विति ।
ततोऽहं तदनादृत्य पितुर्हस्तनिदर्शनम् ।। १९
शास्त्रप्रामाण्यसूक्ष्मं तु विधिं पिण्डस्य संस्मरन् ।
ततो दर्भेषु तत्सर्वमददं भरतर्षभ ।। २०
शास्त्रमार्गानुसारेण तद्विद्धि मनुजर्षभ ।
ततः सोन्तर्हितो बाहुः पितुर्मम जनाधिप ।। २१

ततो मां दर्शयामासुः स्वप्नान्ते पितरस्तथा ।
प्रीयमाणास्तु मामूचुः प्रीताः स्म भरतर्षभ ॥ २२
विज्ञानेन तवानेन यन्न मुह्यसि धर्मतः ॥ २३

—महाभारत, अनुशासनपर्व अध्याय ८४

"माझा पिता शांतनु निधन पावल्यावर त्याचें श्राद्ध करण्यासाठीं मी गंगाद्वाराला गेलों. माझी आई देवी गंगा तेथें मला साहाय्य करूं लागली. दर्भावर मी पिंड देत असतां मी अंथरलेले दर्भ बाजूस सारून व भूमि फोडून माझ्या पित्याचा हात वर आला. मला मोठें आश्चर्य वाटलें. व पिता स्वतःच पिंड घेत आहे असें पाहून धन्यता वाटली. पण मी पुन्हां मनाशीं विचार केला तेव्हां मला असें आढळून आलें कीं, हातावर पिंड द्यावा असा शास्त्रांत व वेदांत कोठेंही विधि नाहीं. दर्भावर पिंड द्यावा असाच विधि आहे. तेव्हां मी पित्याच्या हाताचा अनादर करून शास्त्रानुसार दर्भावरच पिंड दिला. रात्रीं स्वप्नांत पितरांनीं मला दर्शन दिलें व सांगितलें कीं तूं धर्माच्या प्रश्नांत कशानेंही मोह पावूं शकत नाहींस हें पाहून आम्ही अत्यंत संतुष्ट झालों आहोंत."

तात्पर्य, शास्त्रनिष्ठा व सत्यनिष्ठा हीच भीष्मांची जीवननिष्ठा होती. मानवी अपूर्णतेचें द्योतक असलेलें कोणतेंही सुखात्मक व दुःखात्मक मोहजाल त्यांना विचलित करूं शकत नव्हतें. या जीवननिष्ठेसाठींच चंदनाप्रमाणें सतत झिजत त्यांनीं आपलें बलिदान दिलें. असें महान् व्यक्तिमत्त्व लोककल्याणाच्या दृष्टीनें धर्ममूर्ति ईश्वराला प्रसंगीं वध्य ठरलें तरी त्यालाही तें वंदनीय खासच असतें. भीष्म हे स्थितप्रज्ञ कर्मयोग्याची प्रत्यक्ष मूर्ति आहेत. ज्या समाजस्थितींत ते उत्पन्न झाले ती अधःपतित होती. त्यामुळें तर त्यांचें भव्य, ऊर्जस्वल व महत्तम व्यक्तिमत्त्व अधिकच तळपून उठतें. भीष्मांच्या खालोखाल महाभारतांतील दुसरें असेंच व्यक्तिमत्त्व विदुराचें आहे. त्याकडे आपण पुढच्या व्याख्यानांत पाहूं.

---

# १९. विदुर

साधुत्वाविषयींच्या विकृत कल्पनांमुळें महाभारतांतील जीं कांहीं महत्त्वाचीं व्यक्तिचित्रें विकृत झालीं आहेत त्यांत धृतराष्ट्राचा महामंत्री विदुर याचें व्यक्तिचित्र अग्रगण्य आहे. विदुर हा भक्त होता या कल्पनेमुळें भक्ताच्या बाबतींत ठरून गेलेले सारे संकेत त्याच्यासंबंधीं गृहीत धरण्यांत आलेले आहेत. विदुर हा दरिद्री होता व कौरवांच्या राज्याबाहेर एक झोपडी बांधून तिच्यांत तो राहात असे अशीही एक हास्यास्पद कविकल्पना त्याच्या बाबतींत नेहमींच केलेली आढळते. विदुराविषयीचे अपसमज सामान्यत: पुढीलप्रमाणें सांगतां येतील :—

(१) विदुर हा दरिद्री असून तो वल्कलें नेसून एकाद्या वनवासी व तपस्वी ऋषीप्रमाणें राजधानीच्या सीमेपार अरण्यांत रहात असे. (२) पांडव वनवासांत गेल्यानंतर कुंती, सुभद्रा व अभिमन्यु असे तिघेजण विदुराच्या घरीं रहात व तेथूनच अभिमन्यूनें बळरामाची मुलगी वत्सला हिचें हरण केलें. (३) विदुर हा श्रीकृष्णाचा अत्यन्त भक्त असल्यामुळें भक्तवत्सल श्रीकृष्णाला आपल्या या भक्ताचें अतोनात प्रेम वाटत असे. श्रीकृष्ण शिष्टाईला गेले असतां त्यांनीं विदुराच्या घरीं कण्या खाऊन दुर्योधनाच्या घरचीं मिष्टान्नें नाकारलीं. दरिद्री विदुर कण्यांशिवाय श्रीकृष्णांना दुसरें काय देऊं शकणार? (४) श्रीकृष्ण ज्या वेळीं विदुराच्या घरीं गेले त्या वेळीं विदुर घरीं नसून त्याची पत्नी घरीं होती. ती त्यावेळीं स्नान करीत होती. कृष्ण आल्याचें कळतांच हर्षातिरेकानें देहभान विसरून ती नग्नावस्थेंतच त्यांच्या स्वागतासाठीं बाहेर आली व तिनें श्रीकृष्णांना केळीं खावयाला दिलीं. पण तीं देतांना देखील ती इतकी वेडी बनली होती कीं, केळीं सोलून त्यांची सालें ती कृष्णांना देऊं लागली व गर स्वत:च्या तोंडांत टाकूं लागली. कांहीं वेळानें विदुर घरीं आले

---

व्याख्यान १९ वें, दि. १६ एप्रिल १९५१

तेव्हां त्यांना भक्तवेडा देव व प्रेमवेडी भक्ति पाहून हंसूं लोटलें. हे व या प्रकारचे गैरसमज भक्तांविषयीं अकारण रूढ केले जातात.

## विदुरांचें कुरुराज्यांतील स्थान

भक्त दरिद्री असलेच पाहिजेत हा अत्यंत चुकीचा समज आहे. विदुर हा राजा धृतराष्ट्राचा प्रथमपासूनच महामंत्री असल्याचा महाभारतांत उल्लेख आहे. पांडूनें धृतराष्ट्राला जें राज्य दिलें, तें विदुराची मंत्रिपदावर स्थापना करूनच दिलें. इतकेंच नव्हे तर त्याच्याकडे अत्यंत महत्त्वाचीं अशीं खातीं होतीं. महाभारतकार म्हणतात.

**नीचैः स्थित्वा तु विदुर उपास्ते स्म विनीतवान् ।**
**प्रेष्यवत् पुरुषव्याघ्रो वालव्यजनमुत्क्षिपन् ॥ ६**
**विसृज्य धृतराष्ट्राय राज्यं सविदुराय च ।**
**चचार पृथिवीं पाण्डुः सर्वां परपुरञ्जयः ॥ ८**
**कोशसंवनने दाने भृत्यानां चान्ववेक्षणे ।**
**भरणे चैव सर्वस्य विदुरः सत्यसङ्गरः ॥ ९**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १४८

राजसेवक असल्यामुळें पुरुषव्याघ्र विदुर विनीतपणें हातांत मोर्चेलें घेऊन धृतराष्ट्राची सेवा करीत असे. विदुरासहित धृतराष्ट्राला राज्य देऊन पाण्डु पृथ्वीवर संचार करूं लागला. कोश वाढविणें, कोशाचा व्यय करणें, अधिकारी व नोकर यांच्यावर लक्ष ठेवणें व त्यांना वेतन वेळच्या वेळीं आणि व्यवस्थित मिळतें किंवा नाहीं हें पाहणें हीं कामें विदुराचीं असून तो सत्यसंध होता. तात्पर्य, पूर्वी भीष्मांच्याकडे मंत्री या नात्यानें जीं जीं कामें होतीं तीं तीं सर्व राजा धृतराष्ट्राच्या राज्यांत विदुराकडे आलेलीं होतीं. त्याच्या चारित्र्यामुळें नि स्पष्टवक्तेपणामुळें त्याच्याविषयीं एक प्रकारचा धाक व भीति धृतराष्ट्राला वाटत असे. म्हणून कोणतेंही अकार्य करतांना धृतराष्ट्राला त्याची नेहमींच भीति वाटत आलेली आहे. उन्मत्ततेची मर्यादा ओलांडीपर्यंत कर्ण व दुर्योधन यांना देखील एकादी अन्याय्य

गोष्ट विदुरासमोर उच्चारतांना एक प्रकारचा धाक वाटत असे. ज्या वेळीं पाण्डव द्रौपदीशीं विवाहबद्ध झाले व त्यांना राजधानींत परत आणावें किंवा नाहीं याचा खल सुरू झाला, त्या वेळीं स्वतः दुर्योधनच असें म्हणतो कीं, विदुरासमोर अन्याय्य धोरण स्वीकारणें व त्यासंबंधीं बोलणें करणें शक्य होत नाहीं.

ततो दुर्योधनश्चापि राधेयश्च विशांपते ।
धृतराष्ट्रमुपागम्य वचोऽब्रूतामिदं तदा ॥ २७
संनिधौ विदुरस्य त्वां दोषं वक्तुं न शक्नुवः ।
विविक्तमिति वक्ष्यावः किं तवेदं चिकीर्षितम् ॥ २८
सपत्नबुद्धिं यत्तात मन्यसे वृद्धिमात्मनः ।
अभिष्टौषि च यत्क्षत्तुः समीपे द्विषतां वर ॥ २९

—महाभारत, आदिपर्व अध्याय २००

नंतर दुर्योधन व कर्ण राजा धृतराष्ट्राकडे आले व त्याला म्हणूं लागले कीं, "विदुराच्या समोर आम्ही आपणांस दुष्ट गोष्ट सांगूं शकत नाहीं. आतां एकांत आहे म्हणूनच सांगतों. आपण हें काय मांडलें आहे? शत्रूंच्या उत्कर्षांत तुम्हांला स्वतःचा उत्कर्ष कां दिसतो? विदुरासमोर आपण आपल्या शत्रूंचीच प्रशंसा कां करीत असतां?" यावर धृतराष्ट्रानें जें उत्तर दिलें आहे, त्यावरून महामंत्री विदुराला तोही किती भीत असे याची पूर्णपणें कल्पना येते. तो म्हणतोः—

अहमप्येवमेवैतच्चिकीर्षामि यथा युवाम् ।
विवेक्तुं नाहमिच्छामि त्वाकारं विदुरं प्रति ॥ १
ततस्तेषां गुणानेव कीर्तयामि विशेषतः ।
नावबुध्येत विदुरो ममाभिप्रायमिङ्गितैः ॥ २

—महाभारत, आदिपर्व अध्याय २०१

"तुमच्या अंतःकरणांत जें आहे तेंच माझ्याही अंतःकरणांत आहे; पण विदुराच्या समोर मी माझ्या चेहऱ्यावरून देखील माझ्या अंतःकरणांतील भाव प्रकट करूं इच्छीत नाहीं. इतकेंच नव्हे तर विदुर कुशल असल्यामुळें माझ्या हावभावांनीं व एकाद्या सामान्य शब्दानें

देखील तो माझा अभिप्राय ओळखील म्हणून त्याच्यासमोर मी पाण्डवांचें सारखें गुणवर्णनच करीत असतों."

विदुराच्या प्रगाढ बुद्धिमत्तेचा धाक व विश्वास राजा धृतराष्ट्राला किती वाटत होता, याचीं उदाहरणें महाभारतभर विखुरलेलीं आहेत. प्रत्येक महत्त्वाच्या वेळीं विदुरानें इच्छेविरुद्ध मत दिलें असतांही त्याचें मत धृतराष्ट्रानें वारंवार विचारलें आहे. विदुर एक महान् शक्ति असून ती जर पाण्डवांच्या पक्षाला मिळाली तर त्यांचें सदाचें कल्याण व आपलें सदाचें अहित होईल नि त्यामुळें तो आपणांस प्रसंगीं केवढेंही कठोर बोलला तरी त्याला मुळींच न सोडतां आपल्याजवळच ठेवून घेतलें पाहिजे असें राजा धृतराष्ट्रानें स्वतःचें धोरणच ठरवून टाकलें होतें. त्याचें विदुरावर आत्यंतिक प्रेमही होतें व त्याची योग्यताही तो जाणून होता. पुत्रमोह व राज्यलोभ यांमुळें विदुरासारख्या दुर्लभ नररत्नाचा त्याला लाभ करून घेतां आला नाहीं, हें केवळ त्याचें दुर्दैव होय. विदुराविषयीं धृतराष्ट्राला काय वाटत होतें व कौरवांच्या राज्ययंत्रांत त्याचें केवढें महत्त्वाचें स्थान होतें हें एका प्रसंगानें स्वतः धृतराष्ट्राच्याच तोंडून स्पष्ट झालें आहे. पाण्डव वनांत गेल्यानंतर एकदां विदुरावर संतापून धृतराष्ट्रानें त्याचा परित्याग केला. परित्यक्त विदुर वनांत युधिष्ठिराकडे येऊन राहूं लागला. पण तो जातांच चिंतेनें राजा धृतराष्ट्राची शोचनीय अवस्था झाली. त्यानें वनांत संजयाला विदुराकडे पाठविलें व त्याला बोलावून आणून त्याची सपशेल क्षमा मागितली. विदुरानेंही त्याला बंधुप्रेमानें क्षमा केली. महाभारतकार या प्रसंगाचें वर्णन पुढीलप्रमाणें करतात :—

गते तु विदुरे राजन्नाश्रमं पाण्डवान्प्रति ।
धृतराष्ट्रो महाप्राज्ञः पर्यतप्यत भारत ॥ १
विदुरस्य प्रभावं च सन्धिविग्रहकारिताम् ।
विवृद्धिं च परां मत्वा पाण्डवानां भविष्यति ॥ २
स सभाद्वारमागम्य विदुरस्मारमोहितः ।
समक्षं पार्थिवेन्द्राणां पपाताविष्टचेतनः ॥ ३

स तु लब्ध्वा पुनः संज्ञां समुत्थाय महीतलात् ।
समीपोपस्थितं राजा संजयं वाक्यमब्रवीत् ।। ४
भ्राता मम सुहृच्चैव साक्षाद्धर्म इवापरः ।
तस्य स्मृत्याद्य सुभृशं हृदयं दीर्यतीव मे ।। ५
तमानयस्व धर्मज्ञं मम भ्रातरमाशु वै ।
इति ब्रुवन्स नृपतिः कृपणं पर्यदेवयत् ।। ६
पश्चात्तापाभिसंतप्तो विदुरस्मारमोहितः ।
भ्रातृस्नेहादिदं राजा संजयं वाक्यमब्रवीत् ।। ७
गच्छ संजय जानीहि भ्रातरं विदुरं मम ।
यदि जीवति रोषेण मया पापेन निर्धुतः ।। ८
न हि तेन मम भ्रात्रा सुसूक्ष्ममपि किंचन ।
व्यलीकं कृतपूर्वं वै प्राज्ञेनामितबुद्धिना ।। ९
स व्यलीकं परं प्राप्तो मत्तः परमबुद्धिमान् ।
त्यक्ष्यामि जीवितं प्राज्ञ तं गच्छानय संजय ।। १०
तस्य तद्वचनं श्रुत्वा राज्ञस्तमनुमान्य च ।
संजयो बाढमित्युक्त्वा प्राद्रवत्काम्यकं प्रति ।। ११
सोऽचिरेण समासाद्य तद्वनं यत्र पाण्डवाः ।
रौरवाजिनसंवीतं ददर्शाथ युधिष्ठिरम् ।। १२
विदुरेण सहासीनं ब्राह्मणैश्च सहस्रशः ।
भ्रातृभिश्चाभिसंगुप्तं देवैरिव पुरंदरम् ।। १३
युधिष्ठिरमुपागम्य पूजयामास संजयः ।
भीमार्जुनयमाश्चापि तद्युक्तं प्रतिपेदिरे ।। १४
राज्ञा पृष्टः स कुशलं सुखासीनश्च संजयः ।
शशंसागमने हेतुमिदं चैवाब्रवीद्वचः ।। १५

संजय उवाच ।

राजा स्मरति ते क्षत्तर्धृतराष्ट्रोम्बिकासुतः ।
तं पश्य गत्वा त्वं क्षिप्रं संजीवय च पार्थिवम् ।। १६
सोनुमान्य नरश्रेष्ठान्पाण्डवान्कुरुनन्दनान् ।
नियोगाद्राजसिंहस्य गन्तुमर्हसि सत्तम ।। १७

वैशंपायन उवाच ।

एवमुक्तस्तु विदुरो धीमान्स्वजनवल्लभः ।
युधिष्ठिरस्यानुमते पुनरायाद्गजाह्वयम् ।। १८
तमब्रवीन्महातेजा धृतराष्ट्रोम्बिकासुतः ।
दिष्टया प्राप्तोसि धर्मज्ञ दिष्टया स्मरसि मेनघ ।। १९
अद्य चाहं दिवा रात्रौ त्वत्कृते भरतर्षभ ।
प्रजागरे प्रपश्यामि विचित्रं देहमात्मनः ।। २०
सोऽङ्कमानीय विदुरं मूर्धन्याघ्राय चैव ह ।
क्षम्यतामिति चोवाच यदुक्तोसि मयानघ ।। २१

विदुर उवाच

क्षान्तमेव मया राजन्गुरुर्मे परमो भवान् ।
एषोहमागतः शीघ्रं त्वद्दर्शनपरायणः ।। २२

—महाभारत वनपर्व अध्याय ६

विदुर अरण्यांत पाण्डवांकडे गेल्यानंतर अत्यंत बुद्धिसंपन्न अशा धृतराष्ट्राला मोठी चिंता वाटूं लागली. विदुराचा प्रभाव व केव्हां संधि करावा नि केव्हां नि कसें युद्ध करावें या बाबतींतील राजनीतीचें त्याचें सुसूक्ष्म ज्ञान यांमुळें पाण्डवांचा अत्यंत मोठा उत्कर्ष होईल या कल्पनेनें त्याला पूर्णपणें ग्रासलें. विदुराच्या सामर्थ्यानें व त्यामुळें आपल्या होणाऱ्या हानीच्या कल्पनेनें तो चिंतामग्न झाला. सभेच्या दाराशीं येतांच सर्व सामंतांसमक्ष राजा धृतराष्ट्र मूर्छित होऊन खालीं पडला. कांहीं वेळानें सावध झाल्यानंतर जवळच उपस्थित असलेल्या संजयाला तो म्हणाला, "धर्माचाच जणूं कीं कांहीं अवतार असलेला असा माझा बंधु विदुर असून तो माझा सुहृद आहे. त्याच्या स्मृतीनें माझ्या हृदयांत खोलवर वेदना होत असून जणूं तें विदीर्ण होत आहे. तूं ताबडतोब जाऊन माझ्या त्या धर्मज्ञ बंधूला सत्वर घेऊन ये." इतकें बोलून राजा धृतराष्ट्र विलाप करूं लागला. पश्चात्तापानें त्याचें अंतःकरण पोळलें होतें व विदुराच्या स्मृतीनें तो मोहित झाला होता. पुनश्च राजा संजयाला असें म्हणूं लागला कीं, मी पाप्यानें काढून लावलेला माझा बंधु विदुर जर जिवंत असेल तर त्याचा शोध घे व त्याला ताबडतोब

इकडे घेऊन ये. तो अत्यंत बुद्धिमान आहे. त्यानें कधींही सूक्ष्म-देखील कपट केलेलें नाहीं. मी मात्र त्याच्याशीं द्वेषानें व कपटानें वागलों. जर त्याचा मला आणखी वियोग होईल तर त्याच्या-वांचून मी जिवंत राहूं शकणार नाहीं. राजाचें तें बोलणें ऐकून संजयानें काम्यक वनाकडे गमन केलें. तेथें मृगचर्म परिधान केलेल्या आणि विदुर व मंत्रवेत्ते ब्राह्मण यांनीं परिवेष्टिलेल्या, बंधूंनीं संर-क्षित अशा इंद्राप्रमाणें शोभणाऱ्या राजा युधिष्ठिराला त्यानें पाहिलें. त्याच्याशीं कुशल प्रश्न करून संजय विदुराला म्हणाला, " राजा धृतराष्ट्र आपली आठवण करीत असून आपल्यावांचून त्याची मोठी शोचनीय अवस्था झाली आहे. तेव्हां पाण्डवांचा निरोप घेऊन राजाच्या आज्ञेनुरूप आपण हस्तिनापुरास चलावें व राजा धृत-राष्ट्रांत चैतन्य आणावें." विदुरानें हें ऐकतांच पाण्डवांचा निरोप घेतला व तो धृतराष्ट्राकडे आला. त्याला पाहतांच धृतराष्ट्र म्हणाला, ' हे धर्मज्ञा, तूं आलास व माझें स्मरण ठेवलेंस हें माझें मोठें भाग्य आहे. केवळ तूं नसल्यामुळें तुझ्या आठवणीनें दिवस-रात्र मनांत भलभलत्या कल्पना येऊन चिंतेंत चूर होऊन मी जाग्रण करीत आहें. त्यानें विदुराला जवळ ओढून त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें व जें कांहीं मी बोललों असेन त्याविषयीं मला क्षमा कर असें म्हटलें. त्याबरोबर विदुर म्हणाला, वडील बंधूंच्या व राजाच्या नात्यानें तूं मला अत्यंत मान्य असल्यामुळें मी तुला क्षमा केलीच आहे. तुझ्या भेटीसाठींच मी त्वरेनें येथें आलों. विदुराच्या कर्तृत्वाची व बुद्धिमत्तेची राजा धृतराष्ट्राला केवढी भीति वाटत होती हें स्पष्ट करण्यासाठींच महाभारतकारांनीं 'विदुरस्मारमोहितः' असें विशेषण घातलें आहे. तेथील स्मार शब्दाचा नुसता स्मृति असा अर्थ करणें चुकीचें होईल. कित्येक पोथ्यांमधून स्मार या शब्दाच्या जागीं स्नेह या शब्दाचा वापर करण्यांत येतो व 'विदुरस्नेहमोहितः' असा पाठ आढळतो. पण तो अत्यंत चुकीचा आहे. नीलकंठ पंडित यासंबंधीं विवेचन करीत असतां आपल्या महाभारतावरील टीकेंत असें म्हणतो कीं, " विदुरस्मारमोहितः स्मरः कामः तस्मात् केन-चित्प्रतिबद्धात् उत्पन्नो द्वेषः स्मार इत्युच्यते। विदुरद्वेषेण मम नाशो

भविष्यतीति चिन्तया मोहं प्राप्तः इत्यर्थः । स्नेहेत्यपपाठः । द्वेषमेव स्नेहरूपेण नाटयितुं सभाद्वारे राज्ञां समक्षं पतित्वा उत्थाय आह भ्रातेत्यादि।" स्मर म्हणजे काम अथवा इच्छा. या कामाचा अथवा इच्छेचा अवरोध होण्याची परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळें उत्पन्न होणारा जो द्वेष त्यालाच स्मार म्हणजे स्मरजनित असें येथें म्हटलें आहे. विदुराशीं विद्वेष उत्पन्न केल्यामुळें माझा नाश होईल या चिंतेनें धृतराष्ट्राला मोह उत्पन्न झाला, असा याचा अर्थ आहे. स्मारच्या जागीं कोठेंकोठें आढळणारा स्नेह शब्द हा अपपाठ अथवा चुकीचा पाठ होय. आपला द्वेषच स्नेहाच्या नाटकानें झाकण्यासाठीं राजा धृतराष्ट्रानें सामंतांसमक्ष राजसभेंत मूर्छित पडण्याचें नाटक केलें व त्याचें सर्व भाषण त्याच्या त्या नाटकीपणाचेंच द्योतक आहे. तात्पर्य, विदुर ही एक महान् शक्ति असून त्याचें जरी आपणास मुळींच ऐकावयाचें नसलें तरी आपल्याविरुद्ध त्याचा कधींही उपयोग होऊं नये म्हणून सर्व प्रकारच्या धनमानादिकांनीं त्याला आपल्याशीं सतत बांधून ठेवावयाचें, त्याचे कठोर शब्दांचे आघात सतत सहन करावयाचे, पण त्याला कोठेंही फटकूं द्यावयाचें नाहीं, हें धृतराष्ट्राचें त्याच्या बाबतींतलें ठरलेलें धोरण होतें. अशा स्थितींत इतक्या महत्त्वाची व्यक्ति व तीही कोशसंरक्षण आणि भृत्यसंगोपन यांसारखी महत्त्वाचीं खातीं संभाळून मंत्रिपदावर अधिष्ठित असलेली व्यक्ति दरिद्री असण्याचें कारण काय? विदुराला वेतन होतें याचा तर स्पष्ट पुरावा महाभारतांतच आहे. महाभारताच्या आदिपर्वांत ( अ. १४२–२२ ) स्वतः दुर्योधनच विदुराविषयीं निर्देश करतांना 'क्षत्ताऽर्थबद्धस्त्वस्माकं'–'विदुर हा आपल्याशीं अर्थानें बांधलेला आहे' असें म्हणतो. तात्पर्य, विदुर हा कौरव राज्याचा महामंत्री होता असें समजूनच त्याचा विचार केला पाहिजे. त्याचें स्थान, वेतन व त्याच्याकडे असणारीं खातीं यांचा विचार केला असतां त्याच्या दारिद्र्याविषयींच्या कल्पनेची हिमराशि प्रत्यक्षाच्या उष्णतेनें आपोआप विरघळून गेल्याखेरीज रहात नाहीं. त्याच्या दारिद्र्यासंबंधानें ज्या कथा पसरल्या आहेत त्या वस्तुस्थितीस सर्वथा सोडून होत.

## विदुराची पत्नी

विदुराच्या पत्नीचा महाभारतांत केवळ एकदांच उल्लेख येतो. व तो म्हणजे तिच्या विदुराशीं झालेल्या विवाहप्रसंगींचा होय. त्यावरून विदुर ज्याप्रमाणें दासीपुत्र असले तरी राजपुत्र होते त्याचप्रमाणें त्यांची पत्नीही त्यांच्याचप्रमाणें जन्म पावली असली तरी ती राजकन्या होती हें स्पष्ट दिसतें. तिच्यासारख्या स्वतः भीष्मांनीं पसंत केलेल्या व विदुरासारख्या महाबुद्धिमान् व्यक्तीच्या सहवासांत सारा जन्म घालविलेल्या स्त्रीला कोणत्याही कां होईना पण भावनेच्या आहारीं जाऊन वस्त्राचीही शुद्ध नव्हती असें प्रतिपादन करणें कमालीच्या धाष्टर्याचें आहे. विदुरपत्नीच्या बाबतींत केवळ एकदांच महाभारतांत येणारा जो उल्लेख तो पुढीलप्रमाणें आहे:—

**अथ पारसवीं कन्यां देवकस्य महीपतेः ।**
**रूपयौवनसंपन्नां स शुश्रावापगासुतः ।। १२**
**ततस्तु वरयित्वा तामानीय भरतर्षभः ।**
**विवाहं कारयामास विदुरस्य महामतेः ।। १३**
**तस्यां चोत्पादयामास विदुरः कुरुनन्दनः ।**
**पुत्रान्विनयसंपन्नानात्मनः सदृशान्गुणैः ।। १४**

—महाभारत, आदिपर्व अध्याय ११४

नंतर भीष्मांनीं असें ऐकलें कीं, देवक राजाला विदुराच्या जन्मानुसारच जन्म पावलेली एक रूपयौवनसंपन्न कन्या आहे. लगेच भीष्मांनीं जाऊन विदुरासाठीं त्या मुलीची मागणी केली व तिच्याशीं विदुराचा विवाह करून दिला. विदुरानें तिच्या ठिकाणीं आपल्याचसारखे गुणसंपन्न व विनयसंपन्न पुत्र उत्पन्न केले. विदुराच्या पत्नीचा प्रत्यक्ष महाभारतांतील हा पहिला व शेवटचाच उल्लेख होय. श्रीकृष्णांनीं विदुराच्या गृहाला ज्या वेळीं भेट दिली, त्या वेळीं तेथें ते फक्त एकाच स्त्रीला भेटले व ती म्हणजे त्यांची आत्या कुंती होय. गोष्ट रचतांनाही असंभाव्य रचून काय उपयोग? कृष्ण कौरवांच्या दरबारीं अचानक गेलेले नसून ते येणार हें कित्येक दिवस आधींपासूनच गाजत होतें. ते घरीं येण्याच्या प्रसंगीं विदुर घरीं न राहणें अत्यंत अस्वाभाविक होतें. केवळ शब्दाच्या उच्चारावरून व हावभावावरून कारस्थानें ओळखूं शकण्याइतका महाबुद्धिमान्

विदुर कृष्णांसारखा महान् पाहुणा घरीं यावयाच्या वेळींच नेमका अनुपस्थित राहील हें असंभवनीय आहे. महाभारतांत तसा उल्लेख अर्थात नाहींच. महाभारतानुसार भगवान् श्रीकृष्ण विदुराच्या घरीं एकंदर तीन वेळां गेलेले आहेत. त्यांपैकीं दोनदां ते विदुराच्या घरीं गेले ते प्रत्यक्ष विदुराला भेटावयाला होय. तिसऱ्यांदा ते जे गेले ते कुंतीला भेटण्यासाठीं म्हणून. अर्थात केळयांचा प्रसंग पहिल्याच भेटीच्या वेळीं होणें शक्य आहे. पण या पहिल्या भेटीच्या वेळीं विदुर श्रीकृष्णांबरोबरच होते. कारण श्रीकृष्ण राजसभेंत गेले व नंतरच विदुराच्या घरीं गेले. श्रीकृष्णाचें त्याच्या घरीं जें आदरातिथ्य झालें त्याचें महाभारतांत पुढीलप्रमाणें वर्णन आहे. तें वर्णन वाचल्यावर केळयांच्या सालींचा पत्ताही लागण्यासारखा नाहीं. तें असें:—

**सोऽर्चितो धृतराष्ट्रेण पूजितश्च महायशाः ।**
**राजानं समनुज्ञाप्य निरक्रामदरिन्दमः ॥ २१**
**तैः समेत्य यथान्यायं कुरुभिः कुरुसंसदि ।**
**विदुरावसथं रम्यमुपातिष्ठत माधवः ॥ २२**
**विदुरः सर्वकल्याणैरभिगम्य जनार्दनम् ।**
**अर्चयामास दाशार्हं सर्वकामैरुपस्थितम् ॥ २३**
**या मे प्रीतिः पुष्कराक्ष त्वद्दर्शनसमुद्भवा ।**
**सा किमाख्यायते तुभ्यमन्तरात्माऽसि देहिनाम् ॥ २४**
**कृतातिथ्यं तु गोविन्दं विदुरः सर्वधर्मवित् ।**
**कुशलं पाण्डुपुत्राणामपृच्छन्मधुसूदनम् ॥२५**
**प्रीयमाणस्य सुहृदो विदुरो बुद्धिसत्तमः ।**
**धर्मार्थनित्यस्य सतो गतरोषस्य धीमतः ॥ २६**
**तस्य सर्वं सविस्तारं पाण्डवानां विचेष्टितम् ।**
**क्षत्तुराचष्ट दाशार्हः सर्वं प्रत्यक्षदर्शिवान् ॥ २७**

—महाभारत उद्योगपर्व अध्याय ८९

"याप्रमाणें धृतराष्ट्रानें केलेला सन्मान घेऊन श्रीकृष्णांनीं त्याची अनुज्ञा घेतली व उपस्थित सामंतांचीही अनुज्ञा घेऊन ते राजसभेबाहेर पडले. त्यानंतर ते रम्य अशा विदुराच्या राहण्याच्या जागीं आले. विदुरानें त्यांचें थाटाचें स्वागत केलें. श्रीकृष्णांचें

स्वागत करून विदुर त्यांना म्हणाला, ‘हे कमलनेत्रा, तुझ्या दर्शनामुळें मला जो आनंद झाला आहे तो मी तुला सांगितलाच पाहिजे काय ? तूं सर्व लोकांचा अंतरात्मा असल्यामुळें तूं सर्व ओळखूं शकतोसच.’ विदुरानें कृष्णांचें उत्तम आतिथ्य केलें व पांडवांचें कुशल त्यांना विचारलें. श्रीकृष्णांनींही विदुरांना पांडवांचा सर्व वृत्तान्त सांगितला. येथें विदुरपत्नीचें नांवही नाहीं. कृष्ण आले त्या वेळीं विदुर घरीं नव्हते असें गृहीत धरलें तरी द्वारकाधीशाचें स्वागत करावयास स्नान करणाऱ्या पत्नीवांचून महामंत्री विदुराच्या घरीं दुसरें कुणी सामंत वगैरे असूं शकणार नाहींत काय ? भक्तांनीं विदुराचा पूर्ण तुकाराम बनविला आहे. तोही एक वेळ खपून गेला असता; पण त्याच्या पत्नीला नागव्या स्थितींत श्रीकृष्णांसमोर उभे करण्यांत तर असीम हिडिसपणाच व्यक्त होतो. कृष्ण आले ते एकटे येणें शक्य नाहीं. अकरावा अंबरावतार धारण करून द्रौपदीची लज्जा संरक्षण करणाऱ्या श्रीकृष्णांनीं आपल्याला मातृतुल्य असलेल्या या स्त्रीला अशा स्थितींत कधींतरी राहूं दिलें असतें काय? कल्पनाच करावयाची तर निदान ती चांगली तरी करावी. महाभारतांतील कोणतीही स्त्री केवढीही भक्त असली तरी बावळट नाहीं व भारतांतील भक्तीचे आविष्कार कितीही उत्कट असले तरी ते गर खाऊन देवाला केळ्यांच्या साली देण्याइतके स्वार्थी नाहींत. भारतीयांच्या रामायणमहाभारतासारख्या ग्रंथावर जे अत्याचार झाले आहेत ते परकीयांनींच केले आहेत असें नसून स्वकीय धर्मनिष्ठांनींही ते कसे केले आहेत याचें, विदुराविषयींची ही कुकल्पना म्हणजे प्रत्यक्ष निदर्शनच होय. द्वेषानेंच नव्हे तर प्रेमानेंही जीव गमावण्याची पाळी येते ती ही अशी. मानवतेच्या जीवनमार्गाचा महान् दीपस्तंभ म्हणून ज्याकडे बघावें त्या या ग्रंथरत्नावरील परकीयच नव्हे तर स्वकीयहि तेजहानिकर जवनिकांना दूर सारलें पाहिजे.

## विदुराच्या घरच्या कण्या

विदुर दरिद्री नव्हता हें आपण पाहिलेंच. एरवीं कण्या खाणारा मनुष्य देखील मोठा पाहुणा घरीं आला असतां चार घरीं भिक्षा

मागून कां होईना चांदीच्या उपकरणांमधून मिष्टान्नाचे चार घास पाहुण्याच्या तोंडीं घालतो. श्रीकृष्णासारखा लोकोत्तर पुरुष पाहुणा म्हणून घरीं आला असतां विदुरासारखा महामंत्री या सस्यशामला भूमीवर अन्नधान्याचें कोणतेंही संकट कोसळलें नसतां कण्यांची मेजवानी कशासाठीं देईल ? श्रीकृष्णांच्या येथील भोजनप्रसंगाचें महाभारतांत पुढीलप्रमाणें वर्णन आहे:—

यातेषु कुरुषु क्षत्ता दाशार्हमपराजितम् ।
अभ्यर्चयामास तदा सर्वकामैः प्रयत्नवान् ।। ३८
ततः क्षत्ताऽन्नपानानि शुचीनि गुणवन्ति च ।
उपाहरदनेकानि केशवाय महात्मने ।। ३९
तैस्तर्पयित्वा प्रथमं ब्राह्मणान् मधुसूदनः ।
वेदविद्भ्यो ददौ कृष्णः प्रथमं द्रविणान्यपि ।। ४०
ततोऽनुयायिभिः सार्धं मरुद्भिरिव वासवः ।
विदुरान्नानि बुभुजे शुचीनि गुणवन्ति च ।। ४१
—महाभारत, उदयोगपर्व अध्याय ९१

"कौरव निघून गेल्यावर विदुरानें श्रीकृष्णांची सर्व प्रकारें अभ्यर्चना केली. त्यानें पवित्र व उत्कृष्ट अशीं अनेक पक्वान्नें तयार करून श्रीकृष्णांना निवेदन केलीं. श्रीकृष्णांनीं तें अन्न व दक्षिणा प्रथम वेदवेत्त्या ब्राह्मणांना दिलीं व नंतर मरुद्गणासह इंद्रानें भोजन करावें त्याप्रमानें अनुयायांसहित श्रीकृष्णांनीं उत्कृष्ट भोजन केलें. महाराष्ट्र कविवर्य मोरोपंतांनीं तर विदुराच्या घरच्या त्या अन्नाच्या स्वादाचें इतकें मनोरम वर्णन केलें आहे कीं, श्रीकृष्णांचें भोजन उरकलें, पण पंत म्हणतात, 'ताट चाटणें नुरलें'.

## आणखी एक अपसमज

पांडवांच्या वनवासांत विदुराच्या घरीं केवळ कुंती होती. सुभद्रा व अभिमन्यु मुळींच नव्हते. कुंतीला देखील विदुरानें स्वतः होऊनच सन्मानानें आपल्या घरीं ठेवून घेतलें होतें व तेंही पांडवांच्या संमतीनेंच होय. महाभारतकार म्हणतात :—

विदुर उवाच ।

आर्या पृथा राजपुत्री नारण्यं गन्तुमर्हति ।
सुकुमारी च वृद्धा च नित्यं चैव सुखोचिता ।। ५
इह वत्स्यति कल्याणी सत्कृता मम वेश्मनि ।
इति पार्था विजानीध्वमगदं वोस्तु सर्वशः ।। ६
तथेत्युक्त्वा ब्रुवन्सर्वे यथा नो वदसेनघ ।
त्वं पितृव्यो पितृसमो वयं च त्वत्परायणाः ।। ७

—महाभारत, सभापर्व अध्याय ७८

एव विलपतीं कुंतीमभिवाद्य प्रणम्य च ।
पाण्डवा विगतानन्दा वनायैव प्रवव्रजुः ।। ३०
विदुरश्चापि तामार्तां कुंतीमाश्वास्य हेतुभिः ।
प्रावेशयत् गृहं क्षत्ता स्वयमार्ततरः शनैः ।। ३१

—महाभारत, सभापर्व अध्याय ७९

विदुर म्हणाला, आर्या कुंती ही राजपुत्री आहे. ती सुकुमारी असून नेहमीं सुखांत राहिलेली आहे. शिवाय ती वृद्ध झालेली आहे. म्हणून तिनें अरण्यांत जाणें योग्य नाहीं. सन्मानपूर्वक मी तिला माझ्या घरीं ठेवीन. हें ऐकल्यावर पांडव त्याला म्हणाले, आपण आमचे काका असून आम्हांला पित्याप्रमाणेंच मान्य आहां. आम्ही आपल्या आज्ञेंत आहोंत. आपण म्हणाल तसेंच होईल. नंतर विलाप करणाऱ्या कुंतीला वंदन करून पांडव वनांत गेले व स्वतः अत्यंत दुःखी झालेल्या विदुरानें कुंतीचें परोपरीनें समाधान करून तिला आपल्या घरीं नेलें. सुभद्रा व अभिमन्यु यांना सुभद्रेचे बंधु भगवान् श्रीकृष्ण विदुराच्या घरीं राहूं देणें केवळ अशक्य होते. वनवासी पांडवांची श्रीकृष्णांनीं ज्या वेळीं पहिली भेट घेतली त्या वेळींच परत द्वारकेला जातांना आपल्याबरोबर अभिमन्यु व सुभद्रा यांना घेऊन श्रीकृष्ण द्वारकेला गेल्याचें महाभारतांत वर्णन आहे. तें पुढीलप्रमाणें :—

सुभद्रामभिमन्युं च रथमारोप्य काञ्चनम् ।
आरुरोह रथं कृष्णः पाण्डवैरभिपूजितः ।। ४७
शैब्यसुग्रीवयुक्तेन रथेनादित्यवर्चसा ।
द्वारकां प्रययौ कृष्णः समाश्वास्य युधिष्ठिरम् ।। ४८

—महाभारत, वनपर्व अध्याय २२

" सुभद्रा व अभिमन्यु यांना आपल्या सुवर्णरथांत बसवून स्वतः श्रीकृष्णही त्या रथांत चढले व युधिष्ठिराला आश्वासन देऊन शैब्य, सुग्रीव इत्यादि विख्यात अश्वांनीं युक्त अशा त्या रथावरून ते द्वारकेला गेले." तात्पर्य, महाभारतानुसार अभिमन्यु व सुभद्रा श्रीकृष्णांकडेच होते व उत्तरेच्या विवाहाच्या वेळीं द्वारकेहून श्रीकृष्णांनीं अभिमन्यूला आपल्याबरोबरच आणलें होतें. अभिमन्यूचा विवाह केवळ उत्तरेशीं झालेला होता. बलरामाला वत्सला या नांवाची कोणीही मुलगी नव्हती. त्यामुळें अभिमन्यूनें तिच्याशीं लग्न करण्याचा, त्यासाठीं घटोत्कचानें आपला मायाबाजार उघडण्याचा व बलरामांची श्रीकृष्णांनीं वंचना करण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. वत्सलाहरण ही मूळच्या सुभद्राहरणाची काल्पनिक विकृति असून सत्याचा व या विकृतीचा कांहींही संबंध नाहीं. असो.

## विदुरांची महत्ता

महाभारतानुसार धर्माची शापित अधिदेवता म्हणजे विदुर होय. महाभारताच्या आदिपर्वाच्या १०७ व्या व १०८ व्या अध्यायांत विदुराच्या जन्माची कथा पुढीलप्रमाणें दिलेली आहे:– " कुणी एक माण्डव्य नांवाचे ऋषि होते. त्या ऋषींचें मौन व्रत असून ते अरण्यांत घोर तपश्चर्या करीत असतां कांहीं चोर त्या ऋषींच्या आश्रमांत गुपचूप शिरले. राजदूत त्या चोरांच्या मागावर होतेच. त्यांनीं आश्रमांत येऊन ऋषीला त्या चोरांचा पत्ता विचारला. पण माण्डव्याचें मौन व्रत असल्यामुळें त्यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. शोधाअंतीं राजदूतांना चोर व द्रव्य ऋषीच्या आश्रमांतच सांपडले. तेव्हां हा गृहस्थ तपस्वी नसून त्या चोरांचाच ढोंगी साह्यकर्ता असला पाहिजे असें त्या राजदूतांना स्वाभाविकपणेंच वाटलें. त्यांनीं चोरांबरोबरच माण्डव्यांनाही पकडून राजाच्या सभेंत आणलें. प्रत्यक्षाला पुराव्याची गरज न वाटल्यामुळें राजानेंही फारसा विचार न करतां चोरांबरोबर मांडव्यांनाही सुळावर चढविलें. ते चोर तेव्हांच गतप्राण झाले. पण दिवसचे दिवस लोटले तरी मांडव्य तसेच अविचल राहिले. तेव्हां आपल्या हातून केवढी भयंकर चूक

झाली याची राजाला कल्पना आली. त्यानें प्रार्थना करून मांडव्यांची क्षमा मागितली. त्यांना सुळावरून खालीं उतरविण्याचा प्रयत्न करण्यांत आला. पण कांहीं केल्या त्याचें अग्र कांहीं निघेना. शेवटीं सूळ तोडून व अग्र जसेंचें तसेंच त्यांच्या गुह्यभागीं राहूं देऊन त्यांना खालीं उतरविण्यांत आलें. मांडव्यांनीं राजाला क्षमा केली. पण कोणत्या तरी अधर्मावांचून सुळाची व त्याचें अग्र तसेंच अंगांत रुतून राहण्याची भयंकर वेदनामय शिक्षा आपल्याला होणें शक्य नाहीं अशा ठाम निश्चयानें आपलें पूर्वार्जित कर्म काय आहे तें समजावून घ्यावें म्हणून मांडव्य तडक धर्माच्या देवतेकडे गेले. 'माझें असें कोणतें वाईट कर्म आहे कीं ज्यामुळें मला ही भयानक शिक्षा मिळावी?' असें त्यांनीं धर्माला विचारलें. त्यावर धर्मानें त्यांना असें उत्तर दिलें कीं, "तुमच्या बाल्यावस्थेंत चिमण्यांच्या अंगांत तुम्ही दर्भ टोंचला होता, त्याचें तुम्हांस हें फळ मिळालें आहे." हें ऐकतांच संतापून ऋषींनीं सांगितलें कीं, "वयाला बारावें वर्ष लागण्यापूर्वींच्या अजाणत्या अवस्थेंत केलेलें कोणतेंही कर्म पाप व पुण्याच्या मर्यादेंत येऊं शकत नाहीं असा धर्मशास्त्राचा संकेत असतां त्या संकेताचें उल्लंघन करून अत्यंत लहान अपराधासाठीं तूं मला अत्यंत भयानक शिक्षा दिली आहेस. तूं धर्म असतांही अधर्म केलास. त्याचें फळ भोगण्यासाठीं तुलाच आपलें हें स्थान सोडून पृथ्वीवर मनुष्य होऊन रहावें लागेल." या शापाच्या अनुसार साक्षात् धर्मच मनुष्य होऊन विदुररूपानें पृथ्वीवर आला. या शापित धर्माच्या अथवा विदुराच्या महत्तेचें त्याच्या जन्मकाळीं त्याचे जन्मदाते व्यास महर्षि स्वतःच वर्णन करतांना म्हणतात :–

**अयं च ते शुभे गर्भः श्रेयानुदरमागतः ।**
**धर्मात्मा भविता लोके सर्वबुद्धिमतां वरः ।। २७**
**धर्मो विदुररूपेण शापात्तस्य महात्मनः ।**
**मांडव्यस्यार्थतत्त्वज्ञः कामक्रोधविवर्जितः ।। २९**

—महाभारत आदिपर्व अध्याय १०६

**धर्मे चार्थे च कुशलो लोभक्रोधविवर्जितः ।**
**दीर्घदर्शी शमपरः कुरूणां च हिते रतः ।। १९**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १०८

त्रिषु लोकेषु न त्वासीत् कश्चित् विदुरसंमितः ।
धर्मे नित्यस्तथा राजन् धर्मे च परमं गतः ।। २२
—महाभारत, आदिपर्व अध्याय १०९

व्यास त्या दासीला म्हणाले, "हे शुभे, तुझ्या गर्भांत जो महापुरुष आलेला आहे तो अत्यंत कल्याणकारक आहे. तो सर्व बुद्धिमंतांत अत्यंत श्रेष्ठ असून धर्मात्मा म्हणून प्रसिद्ध होईल. विदुराच्या रूपानें मांडव्याच्या शापानें साक्षात् धर्मच पृथ्वीवर आलेला असून तो राज्यशास्त्रज्ञ व कामक्रोध यांनीं पूर्णपणें विवर्जित आहे. धर्म व राज्यशास्त्र यांत कुशल, लोभ व क्रोध यांनीं विवर्जित, दीर्घदर्शी, विकारांवर पूर्णपणें विजय मिळविलेला व कौरवांचें कल्याण साधण्यांत सदैव गढलेला असा विदुर आहे. त्रैलोक्यांत विदुरासारखा नित्यधर्मानुसारच वागणारा व धर्माचें संपूर्ण रहस्य जाणणारा असा कोणीही नसेल." महाभारतांत चित्रित केलेला विदुराचा संपूर्ण जीवनपट पाहिला तर महर्षींच्या विदुरासंबंधींच्या या अभिप्रायाची यथार्थता मनाला पटते.

## विदुराच्या विवेकशक्तीचा प्रभाव

विदुराची विचक्षणता व कार्याकार्यविवेकाविषयींची त्याची पात्रता याची छाप कुरुकुलांतील वृद्ध व कर्त्या पुरुषांवरही त्याच्या बाल्यावस्थेपासूनच पडल्याचें दिसून येते. महत्त्वाच्या राजकीय बाबींपासून तर महत्त्वाच्या कौटुंबिक बाबींपर्यंत सर्व बाबतींत भीष्मासारख्या दीर्घदर्शी, कर्त्या व सर्वश्रेष्ठ पुरुषालाही विदुराचा सल्ला घेणें आवश्यक वाटत असे. धृतराष्ट्र व पांडु यांच्यापेक्षां वयानें विदुर वस्तुतः धाकटा होता. पण हे राजपुत्र विवाहाला योग्य होतांच त्यांचा विवाह करण्याच्या प्रश्नाच्या बाबतींत बरोबरीच्या नात्यानें विदुराचें मत विचारणें भीष्मासारख्या व्यक्तीलाही आवश्यक वाटलेलें आहे. भीष्म म्हणतात :—

गुणैः समुदितं सम्यगिदं नः प्रथितं कुलम् ।
अत्यन्यान्पृथिवीपालान् पृथिव्यामधिराज्यभाक् ।। १
रक्षितं राजभिः पूर्वं धर्मविद्भिर्महात्मभिः ।
नोत्सादमगमच्चेदं कदाचिदिह नः कुलम् ।। २

मया च सत्यवत्या च कृष्णेन च महात्मना ।
समवस्थापितं भूयो युष्मासु कुलतन्तुषु ।। ३
तच्चैतद्वर्धते भूयः कुलं सागरवद्यथा ।
तथा मया विधातव्यं त्वया चैव न संशयः ।। ४
श्रूयते यादवी कन्या स्वनुरूपा कुलस्य नः ।
सुबलस्यात्मजा चैव तथा मद्रेश्वरस्य च ।।
कुलीना रूपवत्यश्च ताः कन्याः पुत्र सर्वशः ।
उचिताश्चैव संबन्धे तेऽस्माकं क्षत्रियर्षभाः ।। ६
मन्ये वरयितव्यास्ता इत्यहं धीमतां वर ।
संतानार्थं कुलस्यास्य यद्वा विदुर मन्यसे ।। ७

—महाभारत, आदिपर्व अध्याय ११०

"आपलें हें कुळ अधिराज्य पदवीवर आरूढ झालेलें असून सर्व राजांपेक्षां अधिक प्रभावशाली ठरलें आहे. हें कुळ सर्व गुणांनीं युक्त असून प्रख्यात आहे. धर्मवेत्त्या व महानुभाव राजांनीं पूर्वी या कुळाचें संरक्षण केलें. या कुळाचा विध्वंस होऊं नये म्हणून मी, सत्यवतीनें व महानुभाव कृष्णद्वैपायनांनीं तुम्हां तीन कुलतन्तूंच्या रूपानें या कुलाची पुनश्च प्रतिष्ठापना केली आहे. सागराप्रमाणें हें कुल वाढावें असे प्रयत्न करणें हें जसें माझें तसेंच तुझेंही कर्तव्य आहे यांत कांहीं शंका नाहीं. यादवकन्या, गांधारदेशाचा राजा सुबल याची कन्या व मद्राधिपतीची कन्या या तीन मुली आपल्या कुलाला अनुरूप आहेत असें मीं ऐकलें आहे. या मुली कुलीन व रूपवान आहेत व त्यांचें घराणें हें क्षत्रिय श्रेष्ठांचें घराणें असल्या-मुळें आपण त्यांच्याशीं हा संबंध करावा या गोष्टीस ते सर्वथा पात्र आहेत. हे बुद्धिमंतांत् श्रेष्ठ असलेल्या विदुरा, कुलाच्या संतान-वृद्धीसाठीं ही गोष्ट करावी असें माझें मत आहे. जर तुला हें म्हणणें पटत नसलें तर तुझें काय मत आहे तें सांग." भीष्मासारख्या व्यक्तीलाही एवढ्या लहान वयांत विचार घेण्यास योग्य पुरुष विदुरच वाटला यावरून त्याचें महानुभावत्वच सिद्ध होतें. त्याच्या या योग्यतेची जाणीव राजा धृतराष्ट्रासारख्या खलपुरुषालाही कशी होती व कोणत्याही परिस्थितींत त्याला गमवावयास तो कसा सिद्ध नव्हता हें आपण मागें पाहिलेंच आहे.

**स्पष्टवक्तेपणा**

राजसभेंत मंत्रिपदावर असलेल्या व्यक्तीला राज्ययंत्राच्या हिता-साठीं पुष्कळदां राज्यकारभाराचीं अधिकारसूत्रें हातीं वागविणाऱ्या व्यक्तीला तोडून बोलणें भाग असतें. अनुरंजन हें भाट बंदीजनांचें कार्य आहे, मंत्री त्यासाठीं नसतात. अनुरंजन करणाऱ्या शंभर मूर्खां-पेक्षां जें हिताचें असेल तेंच स्पष्ट पण तोंडावर सांगणाऱ्या स्पष्ट-वक्त्या पण विचक्षण मंत्र्याचीच राज्ययंत्राला खरी आवश्यकता असते. जे राजसत्तेच्या हिताच्या दृष्टीनें आपलें मत निर्भीडपणानें राजाच्या तोंडावर सांगून त्याचें नियंत्रण करण्याचा प्रयत्न करीत नाहींत त्या मंत्र्यांची योग्यता अलंकारांनीं भूषविलेल्या स्त्रियांहून अधिक नाहीं असें शुक्रनीतींत स्पष्ट म्हटलें आहे. विदुर हा अशा मंत्र्यांपैकीं नसून महाभारतकारांनींच म्हटल्याप्रमाणें कौरव राज-कुलाचें कल्याण हें त्याचें पदसिद्ध ध्येय असल्यामुळें त्याच्या आड येणारी प्रत्येक गोष्ट हाणून पाडण्याचा व त्यासाठीं सत्तेच्या रागा-लोभाची यत्किंचितूही पर्वा न करतां कठोर निर्णय व कडवे शब्द ऐकविण्याचा त्यानें प्रथमपासूनच उपक्रम केलेला आहे. राजा दुर्योधन ज्या वेळीं जन्माला आला त्या वेळीं तो गर्दभस्वरानें ओरडूं लागला व कोल्हे, गिधाडें नि कावळे यांनीं त्याला प्रत्युत्तर दिलें असें महाभारतांत वर्णन आहे. ते अपशकुन पाहतांच धृतराष्ट्रानें भीष्म, विदुर व इतर मोठमोठ्या लोकांना एकत्रित करून काय करावें म्हणून विचारलें. त्यावेळीं विदुरानें स्पष्ट शब्दांत सांगितलें कीं —

**यथेमानि निमित्तानि घोराणि मनुजाधिप ।**
**उत्थितानि सुते जाते ज्येष्ठे ते पुरुषर्षभ ।। ३५**
**व्यक्तं कुलान्तकरणो भवितैष सुतस्तव ।**
**तस्य शान्तिः परित्यागे गुप्तावपनयो महान् ।। ३६**
**शतमेकोनमप्यस्तु पुत्राणां ते महीपते ।**
**त्यजैनमेकं शान्तिं चेत्कुलस्येच्छसि भारत ।। ३७**
**एकेन कुरु वै क्षेमं कुलस्य जगतस्तथा ।**
**त्यजेदेकं कुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् ।। ३८**
**ग्रामं जनपदस्यार्थे आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् । ३९**

—महाभारत, आदिपर्व अध्याय ११५

"तुझा ज्येष्ठ पुत्र जन्माला येतांच जे घोर अपशकुन झालेले आहेत त्यांचा विचार केला तर हा पुत्र सर्व कुळाचा अंत करणारा होईल हें स्पष्ट दिसतें. त्यामुळें या मुलाचा परित्याग करण्यांतच शांति व कल्याण असून त्याचें संरक्षण करण्यानें घोर अनर्थ निर्माण होईल. जर कुळांत स्वास्थ्य व समाधान नांदावें अशी तुझी इच्छा असेल तर या मुलाचा तूं त्वरित परित्याग कर. तुझीं उर्वरित मुलें जगावयाचा व कुलनाश टाळण्याचा हा एकच मार्ग आहे. विश्व व कुळ यांचें संरक्षण करण्यासाठीं एका व्यक्तीचा परित्याग करणें आवश्यक असलें तर तो अवश्य केला पाहिजे. कुळासाठीं एका व्यक्तीचा, गांवासाठीं कुळाचा, जनपदासाठीं गांवाचा व आत्मानंदासाठीं पृथ्वीचाही परित्याग करावा असें शास्त्र आहे." पुत्रलोभानें विवश असलेल्या धृतराष्ट्राला विदुराची ही कडू गोळी पचवितांना केवढे प्रयास पडले असतील! पण दुर्योधनाच्या जन्माच्या वेळींच विदुरानें दिलेला हा संकेत किती दीर्घदर्शीपणाचा होता हें दुसऱ्या द्यूताच्या वेळीं भावी महायुद्धाचें टिपरूं डंक्यावर पडलेलें पाहून स्वतः गांधारीनेंच स्मृतिपूर्वक मान्य केलेलें आहे. ती धृतराष्ट्राला म्हणते :

**जाते दुर्योधने क्षत्ता महामतिरभाषत ।**
**नीयतां परलोकाय साध्वयं कुलपांसनः ॥ २**
**त्वन्नेत्राः सन्तु ते पुत्राः मा त्वां दीर्णाः प्रहासिषुः ।**
**तस्मादयं मद्वचनात् त्यज्यतां कुलपांसनः ॥ ८**

**—महाभारत, सभापर्व अध्याय ७५**

"दुर्योधन जन्माला येतांच महाबुद्धिशाली विदुरानें असें स्पष्ट सांगितलें होतें कीं हा कुलांगार आहे. याला मारून टाका. पण तें त्या वेळीं मोहवश होऊन तुम्ही ऐकिलें नाहीं. तुमचे उर्वरित पुत्र तुमच्या मार्गदर्शनानें जिवंत रहावे व सारे तुमच्या कृतीनें नाश पावूं नयेत असें मनःपूर्वक वाटत असेल तर माझ्या म्हणण्यासाठीं तरी या कुलांगार दुर्योधनाचा परित्याग करा." विदुराच्या कठोर स्पष्टवक्तेपणाची यासारखीं अनेक प्रत्यंतरें महाभारतांत मिळतात. ऐन द्यूत चालूं असतां व शकुनि एकामागून एक विजय संपादन करून

पांडवांचें राज्य गिळंकृत करीत असतां ती वार्ता ऐकून आनंदित होणाऱ्या धृतराष्ट्राला विदुरानें पुढीलप्रमाणें उपदेश केला :—

महाराज विजानीहि यत्त्वां वक्ष्यामि भारत ।
मुमूर्षोरोषधमिव न रोचेतापि ते श्रुतम् ।। २
यद्वै पुरा जातमात्रो रुराव गोमायुवद्विस्वरं पापचेताः ।
दुर्योधनो भारतानां कुलघ्नः सोऽयं युक्तो भवतां कालहेतुः ।। ३
विदितं ते महाप्राज्ञ भोजेष्वेवासमंजसम् ।
पुत्रं संत्यक्तवान् पूर्वं पौराणां हितकाम्यया ।। ७
अन्धका यादवा भोजाः समेताः कंसमत्यजन् ।
नियोगात्तु हते तस्मिन् कृष्णेनामित्रघातिना ।। ८
एवं ते ज्ञातयः सर्वे मोदमानाः शतं समाः ।
त्वं नियुक्तः सव्यसाची निगृह्णातु सुयोधनम् ।। ९
निग्रहादस्य पापस्य मोदन्तां कुरवः सुखम् ।। १०

—महाभारत, सभापर्व अध्याय ६२

"हे महाराज, मी जें सांगतों तें नीट लक्ष देऊन ऐका. मरणाऱ्या माणसाला औषध ज्याप्रमाणें आवडत नाहीं त्याचप्रमाणें आपणांसही माझें बोलणें आवडणार नाहीं याची मला पूर्णपणें कल्पना आहे. तरीपण माझें कर्तव्य म्हणून आपणांस मी जें कल्याणकारक आहे तें सांगतों. जन्मतःच कोल्हयाप्रमाणें ओरडणारा हा दुर्योधन सर्व भरत-कुलाचा विध्वंस करणारा असून तो तुमचा सर्व नाश घडवून आणल्या-खेरीज राहणार नाहीं. पूर्वीं यादवांच्या मध्यें कुलांगार निपज-लेल्या कंस नांवाच्या राजपुत्राचा पौरांच्या हितासाठीं यादवांनीं परित्याग केला. पुढें श्रीकृष्णानें त्याला योगायोगानें ठार मारल्या-वर सर्व यादव मोठ्या आनंदानें राहूं लागले. तीच गोष्ट दुर्यो-धनाच्या बाबतींत करणें हाच कौरवकुलाच्या कल्याणाचा एकमात्र मार्ग आहे. तूं अर्जुनाला आज्ञा कर. अर्जुन दुर्योधनाला पकडून बंदि-वासांत टाकील व या पाप्याच्या बंधनानें विनाश टळून सारें कौरव-कुल आनंदांत राहील." विदुराचीं हीं वाक्यें ऐकतांच संतापलेल्या दुर्योधनानें "कठोर बोलणाऱ्या व आम्हांला पाण्यांत पाहणाऱ्या मंत्र्याची आम्हांला कांहीं एक आवश्यकता नसून तुला हवें तिकडे तूं

जा " असें सांगतांच विदुरानें त्याच्या तोंडावर त्याला ठणठणीतपणें बजावलें कीं :—

**यस्तु धर्मपरश्च स्याद्धित्वा भर्तुः प्रियाप्रिये ।**
**अप्रियाण्याह पथ्यानि तेन राजा सहायवान् ।। १७**

**—महाभारत, सभापर्व अध्याय ६४**

" जो धर्मपर राहून राजाला काय आवडेल अथवा काय आवडणार नाहीं याचा मुळींच विचार न करतां अप्रिय पण पथ्यकारक स्पष्टपणें बोलतो त्यानेंच राजा खरा साहाय्यवान् होतो. " विदुराच्या या वाक्बाणांनीं पीडलेला दुर्योधन हेतुतः त्याला अपमानित करण्यास्तव द्रौपदीला सभेंत आणण्याविषयीं सांगूं लागला असतां विदुरानें त्याला पुनश्च त्याच्या तोंडावर ठणकावून सांगितलें कीं:—

**आशीविषास्ते शिरसि पूर्णकोपा महाविषाः ।**
**मा कोपिष्ठाः सुमन्दात्मन्मा गमस्त्वं यमक्षयम् ।। ३**

**—महाभारत सभापर्व अध्याय ६६**

" तुझ्या डोक्यावर अत्यंत संतापी व भयानक विष धारण करणारे सर्प उभे आहेत. त्यांना क्रोध आणूं नकोस व आपला विनाश ओढवून घेऊं नकोस. "

## धूर्तता व प्रयोगपटुता

धर्मनिष्ठ विदुर स्वतः कपटनीतीचा पुरस्कार करणें घृणास्पद समजत असले तरी दुसऱ्यानें केलेला कपटाचा प्रयोग ओळखण्याइतके विचक्षण, तो ध्यानांत आला नाहीं असें दाखविण्याइतके धूर्त व तो पूर्णपणें उलटविण्याइतके प्रयोगपटु होते. ज्या वेळीं दुर्योधनानें भीमाला विषमिश्रित अन्न खाऊं घालून जिवें मारण्याच्या इच्छेनें नदींत ढकलून दिलें त्या वेळीं विदुरानें कुंतीला दिलेला सल्ला या दृष्टीनें लक्षांत ठेवण्यासारखा आहे. भीम दिसत नाहीं असें पाहून घाबरलेले युधिष्ठिर कुंतीकडे आले व भीम नाहींसा झाल्याचें तिला सांगूं लागले. तें ऐकतांच घाबरून कुंतीनें विदुरांना बोलावणें पाठविलें व ती त्यांना म्हणूं लागली.

क्व गतो भगवन् क्षत्तर्भीमसेनो न दृश्यते ॥ १३
उद्यानान्निर्गताः सर्वे भ्रातरो भ्रातृभिः सह ।
तत्रैकस्तु महाबाहुर्भीमो नाभ्येति मामिह ॥ १४
न च प्रीणयते चक्षुः सदा दुर्योधनस्य सः ।
क्रूरोऽसौ दुर्मतिः क्षुद्रो राज्यलुब्धोऽनपत्रपः ॥ १५
निहन्यादपि तं वीरं जातमन्युः सुयोधनः ।
तेन मे व्याकुलं चित्तं हृदयं दहतीव च ॥ १६

—महाभारत, आदिपर्व अध्याय १२९

" हे विदुरा, भीमसेन दिसत नाहीं. तो कुठें गेला असेल? उद्यानांत विहार करून सारे बंधु नुकतेच परत आले आहेत. पण भीम कांहीं त्यांच्यांत दिसत नाहीं. दुर्योधनाच्या डोळ्यांत भीम नेहमींच खुपत असतो. दुर्योधन अत्यंत क्रूर असून तो दुष्टबुद्धीचा, क्षुद्र, राज्यलोभी, व निर्लज्ज आहे. राग व दंश धरणारा दुर्योधन भीमाला ठारही मारण्याचा संभव आहे. म्हणून भीमाविषयींच्या शंकेनें माझें चित्त व्याकुळ झालें असून अंतःकरण जणूं कांहीं जळून गेलें आहे." कुंतीचे हे उद्गार ऐकतांच राजनीतिविशारद विदुरांना राज्यलोभासाठीं दुर्योधनाच्या व धृतराष्ट्राच्या मनोवृत्तीचे लोक काय काय करूं शकतात या गोष्टीची पूर्णपणें कल्पना आली. दुर्योधनाविरुद्ध कोणताही पुरावा नसल्यामुळें व धृतराष्ट्राच्याही पाताळयंत्रीपणाची त्यास पूर्णपणें कल्पना असल्यामुळें या गुप्त आघाताविरुद्ध नुसता आरडाओरडा करून कांहींच उपयोग नव्हता. जर भीमाचें कांहीं बरेंवाईट झालेंच असलें तर कानावर हात ठेवून शोकाचें ढोंग करावयास धृतराष्ट्र व दुर्योधन मोकळेच होते. त्यांच्यावर उघडपणें कोणताच आरोप घेण्यासारखा नव्हता. गुप्तपणेंच हें काम झालेलें होतें. व नुसता बभ्रा केल्यापासून स्वतःचा कांहीं एक फायदा नसून उलटा तोटाच होणार होता. कारण त्यामुळें शत्रुपक्ष सावध होऊन अधिक गुप्तपणें व दक्षतेनें उरलेल्या पांडवांनाही मारण्याचा संभव होता. त्यामुळें आपणांला कांहींच माहिती नाहीं असें दाखवून व शत्रुपक्षाला असावध ठेवून स्वतःचें संरक्षण करणें व गुप्तपणेंच त्यांचीं कारस्थानें हाणून पाडणें हा

एकच मार्ग होता. प्रौढांना ही गोष्ट सांगितली तर त्यांना ती खरी वाटणारी नव्हती. धृतराष्ट्र, दुर्योधन यांना ही गोष्ट सांगितल्यास सांगणाऱ्याच्याच पदरीं वरून उपहास व दोष बांधून अधिक गुप्त व हानिकारक कारस्थानेंच फक्त उपस्थित होणारीं होतीं. म्हणून विदुरानें कुंतीला पुढीलप्रमाणें हिताचा सल्ला दिला :--

**मैवं वदस्व कल्याणि शेषसंरक्षणं कुरु ।**
**प्रत्यादिष्टो हि दुष्टात्मा शेषेऽपि प्रहरेत्तव ।। १७**
**दीर्घायुषस्तव सुता यथोवाच महामुनिः ।**
**आगमिष्यति ते पुत्रः प्रीतिं चोत्पादयिष्यति ।। १८**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १२९

" हे कुंती, तूं जें माझ्याजवळ बोललीस तें इतरत्र कोठेंही बोलूं नकोस. उरलेल्या तुझ्या पुत्रांचें संरक्षण कर. जर दुर्योधनाला तूं भीमाला कां व कसें मारलेंस असें विचारलेंस तर तो उरलेल्या तुझ्या पुत्रांच्या विनाशाचींही कारस्थानें केल्यावांचून राहणार नाहीं. तुझे सर्व पुत्र दीर्घायुषी आहेत असें महर्षि व्यासांनींच म्हटलें आहे. तुझा पुत्र निश्चित येईल व तुला आनंद देईल." विदुराच्या या सल्ल्यानुसार कुंतीनें ती गोष्ट कधींही तोंडावाटें उच्चारली नाहीं. नुसत्या आकारावरून दुसऱ्याच्या मनांतले दुष्टभाव विदुर सहज ओळखूं शकत असत. वारणावतांत पांडवांना लाक्षागृहांत जाळून टाकण्याची कल्पना व कारस्थान विदुरांनीं धृतराष्ट्रदुर्योधनांच्या चेहऱ्यांवरील नुसत्या भावावरून ओळखलें. महाभारतांत म्हटलें आहे कीं :--

**तेषामिङ्गितभावज्ञो विदुरस्तत्त्वदर्शिवान् ।**
**आकारेण च तं मन्त्रं बुबुधे दुष्टचेतसाम् ।। ३**

—महाभारत आदिपर्व अध्याय १४१

इंगितावरून भाव ओळखण्यांत अत्यंत कुशल असलेल्या तत्त्वदर्शी विदुरानें त्या दुष्टबुद्धीच्या लोकांचें तें कारस्थान केवळ त्यांच्या चेहरेपट्टीवरून ओळखलें. पांडव ज्या वेळीं वारणावतास निघाले, त्या वेळीं त्यांना पोहोंचवावयास आलेले सर्व पौरजन निघून गेल्यानंतर विदु-

रांनीं म्लेंच्छ भाषेंत युधिष्ठिराला भावी संकटाची पूर्ण कल्पना दिली व मन ताब्यांत ठेवून त्याचा यत्किंचित्‌ही बभ्रा न करतां कांहींच लक्षांत आलें नाहीं असें दाखवून गुप्तपणें संकटांतून पार पडावें असें सांगितलें. साह्यार्थ माझीं माणसें येतील असेंही त्यांनीं सुचविलें. विदुरकाका काय म्हणाले हें कुंती विचारूं लागली तेव्हां युधिष्ठिरांनीं तिला असें उत्तर दिलें कीं :–

**गृहादग्निश्च बोद्धव्य इति मां विदुरोऽब्रवीत् ।**
**पन्थाश्च वो नाविदितः कश्चित्स्यादिति धर्मधीः ।। ३२**
**जितेन्द्रियश्च वसुधां प्राप्स्यतीति च मेऽब्रवीत् ।**
**विज्ञातमिति तत्सर्वं प्रत्युक्तो विदुरो मया ।। ३३**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १४५

"घरापासून अग्नीचें भय आहे असें विदुरानें मला सांगितलें. तेथून बाहेर कसें पडावयाचें हें तुम्हांला अज्ञात राहणार नाहीं, कोणीतरी तिथें राहील असेंही त्या धर्मनिष्ठ पुरुषानें मला सुचविलें. जितेन्द्रिय पुरुषाला शेवटीं राज्य प्राप्त होतें असेंही विदुर मला म्हणाले. सर्व कांहीं माझ्या लक्षांत आलें, असें मी त्यांना उत्तर दिलें." विदुरांच्या या इषाऱ्यानुरूप वारणावतास जातांच ज्या घरांत आपल्या राहण्याची व्यवस्था केली आहे, तें लाक्षागृह आहे हें युधिष्ठिराच्या ध्यानांत आलें. तेथून युक्तीनें बाहेर पडावयाचें म्हणजे आंतून भुयार करण्याची आवश्यकता होती. तें कसें करावें या चिंतेंत पांडव असतां विदुरानें एक कुशल खनिक तेथें पाठविला व त्याच्याकडून भुयार तयार करवून दिलें. महाभारतांत म्हटलें आहे कीं :—

**विदुरस्य सुहृत्कश्चित्खनकः कुशलो नरः ।**
**विविक्ते पाण्डवान्राजन्निदं वचनमब्रवीत् ।। १**
**प्रहितो विदुरेणास्मि खनकः कुशलो ह्यहम् ।**
**पाण्डवानां प्रियं कार्यमिति किं करवाणि वः ।। २**
**स तथेति प्रतिश्रुत्य खनको यत्नमास्थितः ।**
**परिखामुत्किरन्नाम चकार च महाबिलम् ।। १६**
**चक्रे च वेश्मनस्तस्य मध्येनातिमहद् बिलम् ।**
**कपाटयुक्तमज्ञातं समं भूम्याश्च भारत ।। १७**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १४७

" विदुराचा कोणी एक जमीन खणण्याच्या कामांत अत्यंत कुशल असलेला सुहृद् होता. तो एकांतांत पांडवांकडे येऊन त्यांना म्हणूं लागला कीं, मी अत्यंत कुशल खनक असून मला विदुरानें येथें पाठविलें आहे. पांडवांचें प्रिय करावें अशी मला त्यांची आज्ञा आहे. मी आपलें काय प्रिय करूं तें सांगा. नंतर युधिष्ठिराच्या आज्ञेनुरूप त्या खनकानें अत्यंत कुशलतेनें त्या घराच्या आंतून वना-पर्यंत जाणारें एक मोठें भुयार तयार केलें. तें चांगलेंच मोठें असून त्याच्यावरून कपाट असल्यामुळें व तें कपाट जमिनींत अगदीं सारखें बसविलें असल्यामुळें कोणाच्याही तें लक्षांत आलें नाहीं. त्यानंतर पांडव त्या भुयारांतून बाहेर गेल्यावर रस्त्यांत त्यांना एक मोठी नदी लागली व ती तरून कशी जावी असा मोठा प्रश्न पांडवांच्या समोर उत्पन्न झाला. पण तेथेंही विदुरानेंच त्यांना हात दिला. महाभारतकार म्हणतात :—

एतस्मिन्नेव काले तु यथासंप्रत्ययं कविः ।
विदुरः प्रेषयामास तद्वनं पुरुषं शुचिम् ॥ १
स गत्वा तु यथोद्देशं पाण्डवान्ददृशे वने ।
जनन्या सह कौरव्य मापयानान्नदीजलम् ॥ २
विदितं तन्महाबुद्धेर्विदुरस्य महात्मनः ।
ततस्तस्यापि चारेण चेष्टितं पापचेतसः ॥ ३
ततः प्रवासितो विद्वान्विदुरेण नरस्तदा ।
पार्थानां दर्शयामास मनो मारुतगामिनीम् ॥ ४
सर्ववातसहां नावं यंत्रयुक्तां पताकिनीम् ।
शिवे भागीरथीतीरे नरैर्विस्रम्भिभिः कृतान् ॥ ५
ततः पुनरथोवाच ज्ञापकं पूर्वचोदितम् ।
युधिष्ठिर निबोधेदं संज्ञार्थं वचनं कवेः ॥ ६
कक्षघ्नः शिशिरघ्नश्च महाकक्षे बिलौकसः ।
न हन्तीत्येवमात्मानं यो रक्षति स जीवति ॥ ७
तेन मां प्रेषितं विद्धि विश्वस्तं संज्ञयाऽनया ।
भूयश्चैवाह मां क्षत्ता विदुरः सर्वतोऽर्थवित् ॥ ८

कर्णं दुर्योधनं चैव भ्रातृभिः सहितं रणे ।
शकुनिं चैव कौन्तेय विजेताऽसि न संशयः ।। ९
इयं वारिपथे युक्ता नौरप्सु सुखगामिनी ।
मोचयिष्यति वः सर्वानस्माद्देशान्न संशयः ।। १०
अथ तान्व्यथितान्दृष्ट्वा सह मात्रा नरोत्तमान् ।
नावमारोप्य गङ्गायां प्रस्थितानब्रवीत्पुनः ।। ११
विदुरो मुर्ध्न्युपाघ्राय परिष्वज्य वचो मुहुः ।
अरिष्टं गच्छता व्यग्राः पन्थानमिति चाब्रवीत् ।। १२
इत्युक्त्वा स तु तान्वीरान्पुमान्विदुरचोदितः ।
तारयामास राजेन्द्र गङ्गां नावा नरर्षभान् ।। १३
तारयित्वा ततो गङ्गां पारं प्राप्तांश्च सर्वशः ।
जयाशिषः प्रयुज्याथ यथागतमगाद्धि सः ।। १४
पाण्डवाश्च महात्मानः प्रतिसंदिश्य वै कवेः ।
गङ्गामुत्तीर्य वेगेन जग्मुर्गूढमलक्षिताः ।। १५
--महाभारत, आदिपर्व अध्याय १४९

"त्याचवेळीं पूर्वींच ठरल्याप्रमाणें एका खात्रीच्या पुरुषाला विदुरानें त्या वनांत पाठविलें. तेथें त्याच्या असें दृष्टीस पडलें कीं, पांडव वनांत आपल्या मातेबरोबर असून ते पाण्याची खोली किती आहे याचें मोजमाप करीत आहेत. त्यानें पांडवांची भेट घेऊन त्यांना गंगा तरून जाण्यासाठीं पूर्वींच सिद्ध ठेवलेली नाव दाखविली. ती यंत्रयुक्त होती. तिच्यावरील माणसें विश्वासू होतीं. विदुराची ओळख त्या पुरुषानें सांगितली. विदुराचे आशीर्वाद पांडवांना कळविले. भावी विजयाच्या व वैभवाच्या आशेनें त्यानें पांडवांना प्रोत्साहित केलें व गंगेच्या पार करून दिलें. लगेच तो पुरुष आपल्या ठिकाणीं निघून गेला व पांडवही गुप्तपणें अरण्यांत निघून गेले." याप्रमाणें विदुराच्या सचिवसत्तेनें धृतराष्ट्राच्या कुटिल राजसत्तेचा पूर्णपणें पराभव करून पांडवांना वांचविलें. पुढें पांडव द्रौपदीस्वयंवरांत प्रकट झाल्यानंतर ते कांहीं अनाथ राहिले नव्हते. एका बाजूला द्रुपदाच्या राजसत्तेचें व दुसऱ्या बाजूला यादवांच्या बलवान् गणसत्तेचें साह्य त्यांना उपलब्ध झालेलें होतें. त्यांच्यावर स्वारी

करून त्यांना नष्ट करण्याचे बेत कर्णादि लोक करीत असतां त्यांत कुळाचा सर्वनाश होण्याचा संभव आहे हें ओळखून पांडवांच्या सामर्थ्याची यथार्थ कल्पना विदुरानें धृतराष्ट्राला दिली व त्याचें मन वळवून सामर्थ्यशील पांडवांना सन्मानानें हस्तिनापुरांत आणवून सर्वनाश टाळला. तो धृतराष्ट्राला म्हणतो :—

**तेषामनुग्रहश्चायं सर्वेषां चैव नः कुले ।**
**जीवितं च परं श्रेयः क्षत्रस्य च विवर्धनम् ॥ २४**
**द्रुपदोपि महान् राजा कृतवैरश्च नः पुरा ।**
**तस्य संग्रहणं राजन्स्वपक्षस्य विवर्धनम् ॥ २५**
**बलवन्तश्च दाशार्हा बहवश्च विशांपते ।**
**यतः कृष्णस्ततः सर्वे यतः कृष्णस्ततो जयः ॥ २६**
**यच्च साम्नैव शक्येत कार्यं साधयितुं नृप ।**
**को दैवशप्तस्तत्कार्यं विग्रहेण समाचरेत् ॥ २७**
**श्रुत्वा च जीवतः पार्थान्पौरजानपदा जनाः ।**
**बलवद्दर्शने हृष्टास्तेषां राजन्प्रियं कुरु ॥ २८**
**दुर्योधनश्च कर्णश्च शकुनिश्चापि सौबलः ।**
**अधर्मयुक्ता दुष्प्रज्ञा बाला मैषां वचः कृथाः ॥ २९**
**उक्तमेतत्पुरा राजन्मया गुणवतस्तव ।**
**दुर्योधनापराधेन प्रजेयं वै विनङ्क्ष्यति ॥ ३०**

**—महाभारत, आदिपर्व अ. २०५**

"जर पांडवांच्या विषयीं स्नेहभाव दर्शविला तर आपल्या कुळांतील सर्व लोकांच्या जीविताविषयींच स्नेहभाव दर्शविल्यासारखें होणार आहे. व आपल्याच पराक्रमाचें तेज त्यांच्या व आपल्या एकीनें अधिक वाढणार आहे. राजा द्रुपद हा अत्यंत श्रेष्ठ राजा असून त्याचें आपलें वैर पूर्वींपासूनचें आहे. जर या निमित्तानें पांडवांच्याकडून त्याच्याशीं स्नेहसंबंध जोडतां आला तर त्यांत आपल्याच पक्षाचें बळ वस्तुतः वाढणार आहे. शिवाय यादव अत्यंत बलवान् असून संख्येनेंही पुष्कळ आहेत. जिकडे श्रीकृष्ण राहील तिकडेच सर्व यादव राहणार व जिकडे श्रीकृष्ण त्या पक्षालाच, त्यांचें सामर्थ्य ध्यानांत घेतां जय मिळणार ही गोष्ट निर्विवाद आहे. जी गोष्ट सामानें सहज साध्य होण्यासारखी आहे तिच्यासाठीं उगाच हानिकारक व सर्वनाश करणाऱ्या युद्धाची कास दैवानेंच शापिलेल्या

व्यक्तीवांचून दुसरी कोण धरील ? पाण्डव जिवंत आहेत ही वार्ता ऐकतांच पौरजानपदांतील लोक अत्यंत उत्साहित झालेले असून त्यांना पांडवांना पाहण्याची अत्यंत उत्कंठा लागलेली आहे. राजा या नात्यानें त्यांची इच्छा पूर्ण करणें हें तुझें पहिलें कर्तव्य आहे. दुर्योधन, कर्ण व शकुनि हे अत्यंत अधार्मिक व दुष्ट बुद्धीचे लोक आहेत. या मूर्खांचें तूं कांहीं एक ऐकूं नकोस. हे राजा, दुर्योधनाच्या अपराधामुळें या सर्व प्रजेचा नाश होणार आहे हें तुला मी पूर्वींच सांगितलेलें आहे. त्याचींच हीं पदचिन्हें होत.'' विदुराच्या या सल्ल्यानुसार धृतराष्ट्रानें पांडवांना सन्मानानें राजधानींत आणलें व त्यानंतर फाळणी करण्यांत येऊन एक पांडवांचें व दुसरें कौरवांचें अशीं दोन स्वतंत्र राज्यें अस्तित्वांत आलीं. पांडवांना आपल्या राजसभेंत, श्रीकृष्णासारखा मित्र लाभल्यामुळें दुसऱ्या कोणा मंत्र्याची आवश्यकता नव्हती. त्यामुळें त्यांनीं भीष्मांना ज्या प्रमाणें बोलाविलें नाहीं तसेंच विदुरालाही त्यांनीं हस्तिनापूरच्या गादीचें मंत्रिपद सोडून आपणाकडे येण्यास्तव विनविलें नाहीं. राजसूयाच्या वेळीं ते पांडवांच्या निमंत्रणानुसार यज्ञांत आले होते, व तात्पुरतें काम म्हणून त्यांनीं दान इत्यादि व्ययाचें कामही पत्करलें होतें. महाभारतांत म्हटलें आहे:—

**क्षत्ता व्ययकरस्त्वासोद्विदुरः सर्वधर्मवित् । ९**

—महाभारत, सभापर्व अध्याय ३५

यानंतर दोन स्वतंत्र राज्यें अस्तित्वांत असल्यावर कुळाचें संरक्षण व्हावें व ज्या गादीचे आपण मंत्री आहोंत तिचा सर्वनाश होऊं नये म्हणून सामापासून बिभीषिकेपर्यंत सर्व उपायांचें अवलंबन करून विदुरांनीं विनाशाच्या प्रत्येक क्षणीं राजसत्तेला सावध करण्याचा आटोकाट प्रयत्न केलेला आहे.

## मंत्र्याचें कर्तव्य पार पाडलें

राजा धृतराष्ट्र ज्यावेळीं द्यूताचें कारस्थान करूं लागला त्यावेळीं विदुरानेंच मंत्री या नात्यानें त्याला भावी विनाशाचा स्पष्ट संकेत केला. तो राजाला म्हणतो:—

**नाभिनन्दे नृपते प्रैषमेतं मैवं कृथाः कुलनाशाद्‌बिभेमि ।**
**पुत्रैर्भिन्नैः कलहस्ते ध्रुवं स्यादेतच्छङ्के द्यूतकृते नरेन्द्र ।। ३**

**—महाभारत, सभापर्व अध्याय ५७**

"हे राजन् तुझ्या या कुकृत्याच्या बाबतींत मी तुझें मुळींच अभिनंदन करूं शकत नाहीं. तूं हें करूं नयेस. यामुळें संपूर्ण कुळाचा नाश होईल अशी मला भीति वाटते. यामुळें पांडव व तुझे पुत्र यांच्यांत विरोध उत्पन्न होईल व त्या संघर्षांत सर्वनाश होईल असें मला निश्चित वाटतें." पण विदुराचें न ऐकतां अधःपतित राजसत्तेनें द्यूताचाच निर्णय घेतला. विदुरालाच युधिष्ठिराकडे निमंत्रणासाठीं पाठविण्यांत आलें. यावेळीं युधिष्ठिर हे सर्व पृथ्वीचें साम्राज्य चालविणारे समर्थ सम्राट होते. विदुरानें भावी अनर्थ टाळण्यासाठीं त्यांना द्यूतांत कोण कोण प्रतिपक्षी आहेत, काय अनर्थ होण्याचा संभव आहे व आपण ते थांबविण्याचा शक्यतों प्रयत्न कसा केला याची पूर्णपणें कल्पना दिली. एका स्वतंत्र व जबाबदार राजाला ते यापेक्षां अधिक काय सांगूं शकणार होते ? त्यांचें कर्तव्य त्यांनीं पूर्णपणें पार पाडलें. ते युधिष्ठिराला म्हणतातः——

**जानाम्यहं द्यूतमनर्थमूलं कृतश्च यत्नोऽस्य मया निवारणे ।**
**राजा च मां प्राहिणोत्त्वत्सकाशं श्रुत्वा विद्वन् श्रेय इहाचरस्व ।।११**
**गान्धारराजः शकुनिर्विशाम्पते राजाऽतिदेवीकृतहस्तो मताक्षः ।**
**विविंशतिः चित्रसेनश्च राजा सत्यव्रतः पुरुमित्रो जयश्च ।। १३**

**—महाभारत, सभापर्व अध्याय ५८**

"द्यूत हें अनर्थाचें मूळ आहे हें मला पूर्णपणें माहीत आहे. म्हणून त्याच्या निवारणाचा जितका प्रयत्न करणें शक्य आहे इतका मीं केला. पण हट्टानें राजा धृतराष्ट्रानें मला तुझ्याकडे पाठविलें आहे. तुला सारें कांहीं समजतेंच. जें कल्याणाचें तुला वाटेल त्याचें तूं आचरण कर. तेथें गांधारराज शकुनि हा पट्टीचा द्यूतप्रवीण, सदैव द्यूत खेळणारा व फांसे ज्याला दान द्यावयास सदैव अनुकूल असतात असा आहे. तसेच विविंशति, राजा चित्रसेन, सत्यव्रत, पुरुमित्र व विजय असे पट्टीचे द्यूतकार तेथें आहेत." इतकें सांगूनही युधिष्ठिर द्यूतास सिद्ध झाले ! द्यूत प्रत्यक्ष चालू असतांही विदुरानें दुर्योधनाचा कोप

ओढवून घेऊन त्याचे अनर्थ धृतराष्ट्राला समजावून सांगून त्याला सावध करण्याचा व त्याच्याकडून तें द्यूत थांबविण्याचा शक्य तों प्रयत्न केला. शेवटीं तर शकुनीला त्याच्या देशांत ताबडतोब परत पाठविण्याचाही सल्ला त्यानें राजाला दिला. तो म्हणतोः–

**जानीमहे देवितं सौबलस्य वेद द्यूते निकृतिं पार्वतीयः ।**
**यतः प्राप्तः शकुनिस्तत्र यातु मा यूयुधो भारत पाण्डवेयान् ।। १२**

**––महाभारत, सभापर्व अ. ६३**

"शकुनीचें द्यूतकौशल आम्हांला पूर्णपणें परिचित आहे. द्यूतांतील कपट विद्या त्याला पूर्णपणें अवगत आहे. शकुनि जेथून येथें आला आहे तेथें त्याला परत जाऊं द्या. पांडवांशीं युद्ध ओढवून घेणें हितावह नाहीं." पण आपल्या श्रेष्ठ महामंत्र्याचें ऐकावयाच्या मनःस्थितींत ती उन्मत्त राजसत्ता नव्हती. पुढें द्रौपदीचें वस्त्रहरण होण्यापर्यंत पाळी येऊन ठेपल्यावर, केवळ धृतराष्ट्रानें मनांत आणलें तरच हा अधःपात टळेल व गांधारीवांचून धृतराष्ट्राला हें कोणीही करावयास लावूं शकणार नाहीं हें ओळखून त्यानें गांधारीला राजसभेंत आणवून तिच्याकडून धृतराष्ट्राला वळविलें. पुन्हां दुसऱ्या द्यूताच्या वेळींही विदुरानें राजसत्तेला सावध करण्याचा प्रयत्न केला. इतकेंच नव्हे तर पांडव वनांत गेल्यावर राजाला भावी अनर्थाची पूर्णपणें कल्पना देऊन बिभीषिकेच्या साह्यानेंही त्यानें राजाला वळविण्याचा व पांडवांना वनांतून परत बोलाविण्याचा प्रयत्न केला. महाभारतकार म्हणतात :––

**कथं गच्छति कौन्तेयो धर्मपुत्रो युधिष्ठिरः ।**
**भीमसेनः सव्यसाची माद्रीपुत्रौ च पाण्डवौ ।। २**
**धौम्यश्चैव कथं क्षत्तर्द्रौपदी च यशस्विनी ।**
**श्रोतुमिच्छाम्यहं सर्वं तेषां शंस विचेष्टितम् ।। ३**

**विदुर उवाच ।**

**वस्त्रेण संवृत्य मुखं कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।**
**बाहू विशालौ संपश्यन्भीमो गच्छति पाण्डवः ।। ४**
**सिकता वपन्सव्यसाची राजानमनुगच्छति ।**
**माद्रीपुत्रः सहदेवो मुखमालिप्य गच्छति ।। ५**

पांसूपलिप्तसर्वांगो नकुलश्चित्तविह्वलः ।
दर्शनीयतमो लोके राजानमनुगच्छति ॥ ६
कृष्णा तु केशैः प्रच्छाद्य मुखमायतलोचना ।
दर्शनीया प्ररुदती राजानमनुगच्छति ॥ ७
धौम्यो रौद्राणि सामानि याम्यानि च विशांपते ।
गायन्गच्छति मार्गेषु कुशानादाय पाणिना ॥ ८

धृतराष्ट्र उवाच ।

विविधानीह रूपाणि कृत्वा गच्छन्ति पाण्डवाः ।
तन्ममाचक्ष्व विदुर कस्मादेवं व्रजन्ति ते ॥ ९

विदुर उवाच ।

निकृतस्यापि ते पुत्रैर्ह्रते राज्ये धनेषु च ।
न धर्माच्चलते बुद्धिर्धर्मराजस्य धीमतः ॥ १०
योऽसौ राजा घृणी नित्यं धार्तराष्ट्रेषु भारत ।
निकृत्या भ्रंशितः क्रोधान्नोन्मीलयति लोचने ॥ ११
नाहं जनं निर्दहेयं दृष्ट्वा घोरेण चक्षुषा ।
स पिधाय मुखं राजा तस्माद् गच्छति पाण्डवः ॥ १२
यथा च भीमो व्रजति तन्मे निगदतः शृणु ।
बाह्वोर्बलेन नास्ति समो ममेति भरतर्षभ ॥ १३
बाहू विशालौ कृत्वासौ तेन भीमोऽपि गच्छति ।
बाहू विदर्शयन्राजन्बाहुद्रविणदर्पितः ॥ १४
चिकीर्षन्कर्म शत्रुभ्यो बाहुद्रव्यानुरूपतः ।
प्रादिशच्छरसंपातान्कुन्तीपुत्रोऽर्जुनस्तदा ॥ १५
सिकता वपन्सव्यसाची राजानमनुगच्छति ।
असक्ताः सिकतास्तस्य यथा संप्रति भारत ।
असक्तं शरवर्षाणि तथा मोक्ष्यति शत्रुषु ॥ १६
न मे कश्चिद्विजानीयान्मुखमद्येति भारत ।
मुखमालिप्यते नासौ सहदेवोपि गच्छति ॥ १७
नाहं मनांस्याददेयं मार्गे स्त्रीणामिति प्रभो ।
पांसूपलिप्तसर्वाङ्गो नकुलस्तेन गच्छति ॥ १८

एकवस्त्रा प्ररुदती मुक्तकेशी रजस्वला।
शोणितेनाक्तवसना द्रौपदी वाक्यमब्रवीत् ॥ १९
यत्कृतेऽहमिदं प्राप्ता तेषां वर्षे चतुर्दशे।
हतपत्यो हतसुता हतबन्धुजनप्रियाः ॥ २०
बहुशोणितदिग्धाङ्ग्यो मुक्तकेश्यो रजस्वलाः।
एवं कृतोदका भार्याः प्रवेक्ष्यन्ति गजाह्वयम् ॥ २१
कृत्वा तु नैर्ऋतान्दर्भान्धीरो धौम्यः पुरोहितः।
सामानि गायन्याम्यानि पुरतो याति भारत ॥ २२
हतेषु भारतेष्वाजौ कुरूणां गुरवस्तदा।
एवं सामानि गास्यन्तीत्युक्त्वा धौम्योऽपि गच्छति ॥ २३
हा हा गच्छन्ति नो नाथाः समवेक्ष्यध्वमीदृशम्।
अहो धिक्कुरुवृद्धानां बालानामिव चेष्टितम् ॥ २४
राष्ट्रेभ्यः पाण्डुदायादाँल्लोभान्निर्वासयन्ति ये।
अनाथाः स्म वयं सर्वे वियुक्ताः पाण्डुनन्दनैः ॥ २५
दुर्विनीतेषु लुब्धेषु का प्रीतिः कौरवेषु नः।
इति पौराः सुदुःखार्ताः क्रोशन्ति स्म पुनः पुनः ॥ २६
एवमाकारलिङ्गैस्ते व्यवसायं मनोगतम्।
कथयन्तश्च कौन्तेया वनं जग्मुर्मनस्विनः ॥ २७
एवं तेषु नराग्र्येषु निर्यत्सु गजसाह्वयात्।
अनभ्रे विद्युतश्चासन्भूमिश्च समकम्पत ॥ २८
राहुरग्रसदादित्यमपर्वणि विशांपते।
उल्का चाप्यपसव्येन पुरं कृत्वा व्यशीर्यत ॥ २९
प्रत्याहरन्ति क्रव्यादा गृध्रगोमायुवायसाः।
देवायतनचैत्येषु प्राकाराट्टालकेषु च ॥ ३०
एवमेते महोत्पाता प्रादुरासन्दुरासदाः।
भरतानामभावाय राजन्दुर्मन्त्रिते तव ॥ ३१

—महाभारत, सभापर्व अ. ८०

"धृतराष्ट्र विदुराला विचारूं लागला कीं, धर्मपुत्र युधिष्ठिर, भीमसेन, अर्जुन, नकुल, सहदेव, द्रौपदी वनांत जातांना कोणत्या

पद्धतीनें गेले तें मला सांग. त्यावर विदुरानें सांगितलें, महाराज, वस्त्रानें आपलें तोंड झाकून कुंतीपुत्र युधिष्ठिर राजधानींतून बाहेर पडला. जातांना भीमसेन आपल्या विशाल बाहूंकडे पहात गेला. अर्जुन जातांना हातांतील वाळू जमिनीवर टाकीत जात होता. सहदेव तोंडाला माती सारवून गेला. सौन्दर्यसंपन्न नकुल सर्वांगाला राख फासून गेला. विशाललोचना द्रौपदी केसांनीं आपलें तोंड आच्छादून रडत रडत राजाच्या मागोमाग जात होती. पुरोहित धौम्य हातांत दर्भ घेऊन यमदेवताविषयक रौद्रसामें गात सर्वांच्या मागोमाग जात होते. हें ऐकतांच धृतराष्ट्र विचारूं लागला, याप्रमाणें विलक्षण रूपें करून या सर्वांनीं जाण्याचें कारण काय? त्यावर विदुरानें सांगितलें, राजन् कपटानें फसवून तुझ्या पुत्रांनीं राज्य हिरावून घेतलें तरी युधिष्ठिराची बुद्धि धर्मापासून विचलित होत नाहीं. अजूनही तुझ्या पुत्रांवर दया करावी असें युधिष्ठिराला वाटतें म्हणून आलेल्या नेत्रावाटे क्रोध बाहेर पडून डोळ्यांच्या तेजानें कौरव जळूं नयेत म्हणून आपले डोळे झाकून युधिष्ठिर वनांत गेले. माझ्यासारखा बाहुबलशाली जगांत कोणीही नसून आपल्या शत्रूचें विमर्दन बाहुबलाला अनुसरून मी करणार आहें असें भीमसेन बाहूंकडे पहात सुचवीत होता. आज ज्याप्रमाणें मी माझ्या हातांतून वाळूंचा अखंड वर्षाव करीत आहे तितक्याच सहजतेनें मी रणांगणांत शत्रूवर अविरत बाणवर्षाव करणार आहे हें अर्जुन सुचवीत होता. कोणीही आपल्याला ओळखूं नये म्हणून सहदेवानें तोंड सारवून घेतलें होतें. जातांना स्त्रिया आपणांवर भाळूं नयेत म्हणून नकुलानें अंगाला राख फासली होती. रजस्वला मुक्तकेशा याज्ञसेनी ज्या शोणितानें भरलेल्या वस्त्रानें राजसभेंत आणण्यांत आली त्या वस्त्रानेंच वनांत गेली. जातांना ती म्हणाली आज ज्यांच्यामुळें मला ही अवस्था प्राप्त झाली त्यांच्या, पति व पुत्र यांनीं विरहित व सर्व बांधव ठार मेलेल्या स्त्रिया अशाच शोणितानें वस्त्रें भिजवून केस पाठीवर मोकळे सोडून रजस्वला अवस्थेंत आपल्या पतींना उदकदान करून हस्तिनापुरांत परततील. धौम्य पुरोहित असें सुचवीत होते कीं सर्व कौरव मेल्यावर कौरवांचे राजपुरोहित असेच यमदेवतासामें

गात राजधानींत परततील. लोभानें पांडवांची नागवणूक करणाऱ्या कौरवांना धिक्कार असो, त्यांच्यावर आमचा काडीचाही विश्वास नाहीं असें म्हणत व रडत प्रजाजन पांडवांच्या पाठोपाठ जात होते. ते जात असतां भूकंप झाला. मेघ नसतां आकाशांत विजा चमकूं लागल्या ग्रहण नसतां राहूनें सूर्याला गिळलें व उल्का हस्तिनापुराला उजवी घालून आकाशांतून पडूं लागल्या. गिधाडें, कावळे व कोल्हे मंदिरांतून आक्रोश करूं लागले. राजा, कौरवांचा नाश निश्चित होणार व तुझा मूर्खपणा हेंच त्याचें कारण ठरणार." विदुराच्या या बिभीषिकेचाही राजसत्तेच्या अंतःकरणावर कांहींही परिणाम झाला नाहीं. यानंतर पांडव वनांतून आल्यावर त्यानें सामोपचारानें पांडवांचें राज्य कौरवांनीं त्यांना परत द्यावें व कुलनाश टाळावा असा शक्य तितका प्रयत्न केला. पण त्याच्या कोणत्याही प्रयत्नाला यश यावें असा विधिसंकेत नव्हता. इतकेंच नव्हे तर युद्ध कोणीही टाळूं शकणार नाहीं व सारे प्रयत्न व्यर्थ आहेत हें विदुराच्या तेव्हांच ध्यानांत आलें होतें. श्रीकृष्ण ज्यावेळीं शिष्टाईसाठीं कौरवांच्या राजदरबारीं आले त्यावेळीं दीर्घदर्शी विदुरानें भगवान् श्रीकृष्णांना या गोष्टीची पूर्णपणें कल्पना देऊन "आपण येथें येण्याचे श्रम व साहस व्यर्थ केलें" असें स्पष्टपणें बजावलेंही. तो श्रीकृष्णांना म्हणतोः—

**अर्थधर्मातिगो मन्दः संरंभी च जनार्दन ।**
**मानघ्नो मानकामश्च वृद्धानां शासनातिगः ॥२**
**मूढश्चाकृतबुद्धिश्च इन्द्रियाणामनीश्वरः ।**
**कामानुसारी कृत्येषु सर्वेष्वकृतनिश्चयः ॥ ५**
**निश्चितं धार्तराष्ट्राणां सकर्णानां जनार्दन ।**
**भीष्मद्रोणमुखान् पार्था न शक्ताः प्रतिवीक्षितुम् ॥ ८**
**एकः कर्णः परान् जेतुं समर्थ इति निश्चितम् ।**
**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेः स शमं नोपयास्यति ॥ १०**
**यत्र सूक्तं दुरुक्तं च समं स्यान्मधुसूदन ।**
**न तत्र प्रलपेत् प्राज्ञो बधिरेष्विव गायनः ॥ १३**
**अविजानत्सु मूढेषु निर्मर्यादेषु माधव ।**
**न त्वं वाक्यं ब्रुवन् युक्तः चाण्डालेषु द्विजो यथा ॥ १४**

—महाभारत, उदयोगपर्व अध्याय ९२

"राजनीतिशास्त्र व धर्मशास्त्र यांचें अतिक्रमण करणारा, मूर्ख, एकदम क्षुब्ध होणारा, दुसऱ्यांचा अपमान करणारा, स्वतः मात्र सदैव सन्मानाची अपेक्षा करणारा, वृद्धांचें अनुशासन सदाच पायदळीं तुडविणारा, अकृतबुद्धि, इंद्रियें व विकार मुळींच ताब्यांत नसलेला, लहरीनुसार वागणारा व कोणाचाही विचार न घेतांच हवें तें ठरविणारा दुर्योधन कोणाचेंही ऐकणें शक्य नाहीं. कर्णासहित सर्व धृतराष्ट्रपुत्रांच्या मनानें असें नक्की घेतलें आहे कीं, भीष्मद्रोणादि योद्धयांच्या समोर देखील पांडव उभें राहूं शकणार नाहींत. मग युद्धाची तर भाषाच दूर राहिली. एकटा कर्ण सर्व पांडवांचा पराभव करण्यास समर्थ आहे अशी दुर्योधनाची खात्री झालेली आहे. तो कदापि संधि करावयाचा नाहीं. बहिऱ्यांसमोर गायन जसें व्यर्थ, तसेंच जेथें सूक्तासूक्तांचा विचार नाहीं तेथें उपदेशही व्यर्थच होय. शहाण्या माणसानें तेथें मुळींच बोलूं नये. अजाण, निर्मर्याद, मूर्ख अशा लोकांत तूं जाणें व बोलणें मला मुळींच योग्य वाटत नाहीं." अर्थातच श्रीकृष्ण हें सारें जाणूनच पण वेगळ्याच धोरणासाठीं तेथें गेले होते ही गोष्ट निराळी. इतकेंच नव्हे तर श्रीकृष्णांना दगा होण्याचा संभव आहे या गोष्टीचीही जाणीव विदुरानें त्यांना पूर्णपणें दिली होती. तो म्हणतो:-

**तेषां समुपविष्टानां बहूनां दुष्टचेतसाम् ।**
**कथं मध्यं प्रपद्येथाः शत्रूणां शत्रुकर्शन ।। २७**

**--महाभारत, उदयोगपर्व अध्याय ९२**

"अत्यंत दुष्टबुद्धीचे अनेक लोक भोंवतालीं बसले असतां त्याच्यामध्यें तूं जाणें योग्य आहे काय ? ते सारे शत्रू आहेत." यांतील ध्वनि स्पष्टच आहे. व त्याप्रमाणें सभेंत श्रीकृष्णांना बांधण्याचा प्रयत्न झालाही. कोणत्याही प्रयत्नाला कुलसंरक्षणाच्या दृष्टीनें यश येत नाहीं असें पाहून शेवटीं त्यानें सत्यसंध भीष्मांनाही स्वतःचा व्रतभंग करून दुर्योधनाचा निग्रह करण्याची अभ्यर्थना केली. तो भीष्मांना म्हणतो:-

"नोपेक्षस्व महाबाहो पश्यमान: कुलक्षयम् ।
अथ तेऽद्य मतिर्नष्टा विनाशे प्रत्युपस्थिते ।। २४
वनं गच्छ मया सार्धं धृतराष्ट्रेण चैव ह ।
बद्ध्वा वा निकृतिप्रज्ञं धार्तराष्ट्रं सुदुर्मतिम् ।। २५
शाधीदं राज्यमद्याशु पाण्डवैरभिरक्षितम् ।
प्रसीद राजशार्दूल विनाशो दृश्यते महान् ।। २६

—महाभारत, उदयोगपर्व अध्याय १४८

" हे महाभागा, नाश पावत असलेल्या या कुळाचा विनाश आपल्या डोळ्यांदेखत होऊं देऊं नका. विनाशकाळ आल्यामुळें आपली विवेकबुद्धि तर आपल्याला सोडून गेलेली नाहीं ना ! एक तर माझ्याबरोबर धृतराष्ट्राला घेऊन वनांत चला व आपल्या मागें या कुळाचें कांहींही होऊं द्या किंवा दुर्बुद्धि दुर्योधनाला आपल्या सामर्थ्यानें बांधून व बंदी करून पांडवांनीं संरक्षिलेलें हें राज्य तरी चालवा. पण हे राजश्रेष्ठा, प्रसन्न व्हा. महान् विनाश मला डोळ्यांसमोर स्पष्टपणें दिसत आहे. त्याची उपेक्षा करूं नका." शेवटीं विदुराच्या मंत्री या नात्यानें राजसत्तेच्या हितासाठीं केलेल्या कोणत्याही खटपटीचा कांहीं उपयोग न होतां महायुद्ध टळू शकलें नाहीं व नुसत्या कौरव राजकुलाचाच नव्हे तर संपूर्ण भारतीय राजसत्तांचाच अंत घडून आला.

## शेवटपर्यंत धृतराष्ट्राला सोडलें नाहीं

कौरवकुलाचा विध्वंस राजा धृतराष्ट्राच्या पाताळयंत्रीपणामुळेंच घडून आलेला आहे याची विदुराला पूर्णपणें जाणीव होती व तो टळावा म्हणून अनेकवार त्यानें धृतराष्ट्राची निर्भर्त्सना केली. पांडव अत्यंत धर्मनिष्ठ व न्यायप्रिय असल्यामुळें विदुराचें त्यांच्यावर अत्यंत प्रेम होतें. पण राजाचा मंत्री या नात्यानें धृतराष्ट्राच्या ऐश्वर्याच्या काळांत ज्याप्रमाणें विदुर त्याच्याबरोबर राहिला त्याचप्रमाणें नष्टपुत्र, हृतराज्य व शोकाकुल धृतराष्ट्राच्या वाईट दिवसांतही छायेप्रमाणें विदुर त्याचा मंत्री म्हणून त्याच्याबरोबरच राहिला. शेवटपर्यंत स्वत:चा राजा म्हणून त्यानें धृतराष्ट्राचीच

सेवा केली व धृतराष्ट्र अरण्यांत जातांच विदुरही पांडवांनीं दिलेल्या सन्मानाचा परित्याग करून अरण्यांत गेला. संपत्तीच्या मोहानें त्याचें मन जसें विचलित होऊं शकलें नाहीं तसेंच तें विपत्तींतही विचलित होऊन कार्यविन्मुख होऊं शकलेलें नाहीं. राजद्वारापासून अरण्यापर्यंत आपल्या राजाच्या सेवेंत व संरक्षणांत सदैव जागरूक असलेला राजा धृतराष्ट्राचा हा महामंत्री महाभारताचा अमर अलंकार आहे.

## निर्याण व मूल्यमापन

धृतराष्ट्राबरोबर अरण्यवासांत गेल्यानंतर विदुरानें घोर तपश्चर्या केली व शेवटीं आपलाच अंश असलेल्या युधिष्ठिराच्या तेजांत आपली जीवनज्योत मिळवून टाकून विदुरानें आपलें इहलौकिक जीवन संपविलें. त्याच्या निर्याणाचें वर्णन करतांना महाभारतकार लिहितात:—

इत्युक्तः प्रत्युवाचेदं धृतराष्ट्रो जनाधिपम् ।
कुशली विदुरः पुत्र तपो घोरं समाश्रितः ॥ १६
वायुभक्षो निराहारः कृशो धमनिसन्ततः ।
कदाचिद् दृश्यते विप्रैः शून्येऽस्मिन् कानने क्वचित् ॥ १७
इत्येवं ब्रुवतस्तस्य जटी वीटामुखः कृशः ।
दिग्वासा मलदिग्धाङ्गो वनरेणुसमुक्षितः ॥ १८
दूरादालक्षितः क्षत्ता तत्राख्यातो महीपतेः ।
निवर्तमानः सहसा राजन् दृष्ट्वाऽश्रमं प्रति ॥ १९
तमन्वधावन् नृपतिरेक एवं युधिष्ठिरः ।
प्रविशन्तं वनं घोरं लक्ष्यालक्ष्यं क्वचित्क्वचित् ॥ २०
भो भो विदुर राजाऽहं दयितस्ते युधिष्ठिरः ।
इति ब्रुवन्नरपतिस्तं यत्नादभ्यधावत ॥ २१
ततो विविक्त एकान्ते तस्थौ बुद्धिमतां वरः ।
विदुरो वृक्षमाश्रित्य कञ्चित्तत्र वनान्तरे ॥ २२
तं राजा क्षीणभूयिष्ठमाकृतोमात्रसूचितम् ।
अभिजज्ञे महाबुद्धिं महाबुद्धिर्युधिष्ठिरः ॥ २३

युधिष्ठिरोऽहमस्मीति वाक्यमुक्त्वाऽग्रतः स्थितः ।
विदुरस्य श्रवे राजा तं च प्रत्यभ्यपूजयत् ॥ २४
ततः सोऽनिमिषो भूत्वा राजानं तमुदैक्षत ।
संयोज्य विदुरस्तस्मिन् दृष्टिं दृष्टया समाहितः ॥ २५
विवेश विदुरो धीमान् गात्रैर्गात्राणिचैव ह ।
प्राणान्प्राणेषु च दधदिन्द्रियाणीन्द्रियेषु च ॥ २६
स योगबलमास्थाय विवेश नृपतेस्तनुम् ।
विदुरो धर्मराजस्य तेजसा प्रज्वलन्निव ॥ २७
विदुरस्य शरीरं तु तथव स्तब्धलोचनम् ।
वृक्षाश्रितं तदा राजा ददर्श गतचेतनम् ॥ २८
बलवन्तं तथाऽऽत्मानं मेने बहुगुणं तया ।
धर्मराजो महातेजाः तच्च सस्मार पाण्डवः ॥ २९

—महाभारत, आश्रमवासिक पर्व अ. २६

"वनांत भेटीला आलेल्या युधिष्ठिरानें विदुराविषयीं विचारतांच धृतराष्ट्र म्हणाला, "विदुर घोर तपश्चर्या करीत आहे. वायुभक्षण करून तो निराहार राहतो. कृश झालेला असून त्याच्या अंगावर खूप मळ सांचलेला आहे. तो क्वचितच वनांतील तापसांना दिसतो." याप्रमाणें बोलणें चालू असतांच जटा वाढलेला, कृश, तोंडांत दगड धारण केलेला, दिगंबर, अंगावर खूप मळ सांचलेला व वनांतली धूळ अंगावर बसलेला विदुर लांबून युधिष्ठिराच्या दृष्टीस पडला. तो आश्रमाकडे येतां येतांच एकदम परत फिरून गहन अरण्यांत निघून गेला. युधिष्ठिर त्याच्या पाठोपाठ धांवला. एकान्त गहन अरण्यांत राजा अखेरीस विदुराजवळ जाऊन पोहोंचला. विदुरानें त्याला पाहिलें. पण न बोलतां त्याच्याकडे नुसतें पहात तो एका वृक्षाला टेकून स्वस्थपणें उभा राहिला. युधिष्ठिरानें तशाही अवस्थेंत विदुराला ओळखलें. व "मी आपला आवडता युधिष्ठिर आहे" हें वाक्य पुन्हां पुन्हां त्याच्या कानाजवळ उच्चारलें. विदुरानें कांहींच न बोलतां त्याच्याकडे टक लावून पहात आपलीं इंद्रियें, प्राण व सर्व सामर्थ्य योगबळानें युधिष्ठिरांत विरवून टाकलें व देहत्याग केला. धर्म धर्मांत मिसळला व युधिष्ठिराला आपलें सामर्थ्य अनंत पटींनीं वाढल्याचा प्रत्यय आला."

धर्मनिष्ठा, न्यायनिष्ठा, कर्तव्यतत्परता, सत्यसंधता, विचक्षणता, विवेकीपणा, व खरें महानुभावत्व प्रकट करणारें सौहार्द या सर्व दृष्टींनीं महामंत्री विदुर केवळ अद्वितीय पुरुष होते. विषप्रयोगासारख्या भयानक प्रयोगांत हात रंगलेल्या कौरवांच्या राजसत्तेंत "क्षत्तुरेकस्य भोक्तव्यम्" मीं ज्याच्या घरीं जेवावें असा केवळ एक विदुरच आहे असे आत्मविश्वासाचे उद्गार भगवान् श्रीकृष्णांसारखा युगपुरुष ज्याच्यासंबंधीं काढूं शकला त्याच्या अकार्याविषयींच्या तिटकाऱ्याचें व धर्मबुद्धीच्या एकान्तिकतेचें दुसरें उदाहरण हवेंच कशास? प्रजागरपर्वांत धृतराष्ट्राला अध्यात्म सांगण्याची वेळ आल्यावर लीनतेनें विदुर म्हणाला :–

**शूद्रयोनावहं जातो नातोऽन्यद् वक्तुमुत्सहे।**
**कुमारस्य तु या बुद्धिर्वेद तां शाश्वतीमहम् ॥ ५**

**—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ४१**

"वस्तुतः मला सनत्कुमाराइतकें ज्ञान आहे. पण शूद्रयोनींत जन्म पावल्यामुळें मी शास्त्रमर्यादा उल्लंघूं इच्छीत नाहीं." केवढी ही विलक्षण लीनता! महाभारताच्या उद्योगपर्वांतील विदुरनीतीचें प्रकरण म्हणजे विदुराच्या ज्ञानवैभवाची साक्षच होय. एकाद्या स्वतंत्र ग्रंथांतून तिचा परामर्श घेतां येण्यासारखा आहे. तिच्यावरून शुक्र, बृहस्पति व भीष्म यांच्या तोडीचें विदुराचें ज्ञान होतें हें स्पष्ट होईल. भाग्यानेंच हा अलौकिक पुरुष मंत्री म्हणून धृतराष्ट्राला लाभला. पण त्याच्या कर्मानें त्यानें त्याचा उपयोग केला नाहीं.

गांधारीच्या व्यक्तिचित्राच्या परामर्शानें विशुद्ध सचिवसत्तेचें हें वर्णन पूर्ण होईल. पुढच्या व्याख्यानांत त्या अतितेजस्वी व शुचितम व्यक्तिचित्राकडे वळूं या.

---

*

# २०. महासती गांधारी

राजा दुर्योधनासारख्या कलिपुरुषाची माता व राजा धृतराष्ट्रासारख्या पाताळयंत्री खलपुरुषाची पत्नी होण्याचें दुर्दैवानें जिच्या वांट्याला आलें ती महासती गांधारी भारतांतील स्त्रीरत्नांच्या अग्रस्थानीं शोभण्याच्या योग्यतेची आहे. गांधारी व शकुनि यांना एकाच कुळांत जन्माला आणून जीवनाच्या सूत्रधारानें काय साधलें असावें? कदाचित् त्यानें निर्मितीच्या वैचित्र्याची स्वत:ची हौस फेडून घेतली असावी! महाभारतांतील वर्णनाप्रमाणें गांधारीनें कौरवांच्या राजकुलांत गृहिणी या नात्यानें जो पहिला पदन्यास केला तोच तिच्या पातिव्रत्याच्या महान् दीप्तीनें उजळून निघालेला आहे. गांधारी ही गांधार देशाच्या राजाची कन्या होय. तिच्या पित्याचें नांव सुबल. तिच्या विवाहाचें वृत्त महाभारताच्या आदिपर्वांत पुढीलप्रमाणें वर्णिलें आहे :--

**अथ शुश्राव विप्रेभ्यो गान्धारीं सुबलात्मजाम् ।**
**आराध्य वरदं देवं भगनेत्रहरं हरम् ।। ९**
**गान्धारी किल पुत्राणां शतं लेभे वरं शुभा ।**
**इति शुश्राव तत्त्वेन भीष्मः कुरुपितामहः ।। १०**
**ततो गांधारराजस्य प्रेषयामास भारत ।**
**अचक्षुरिति तत्रासीत् सुबलस्य विचारणा ।। ११**
**कुलं ख्यातिं च वृत्तं च बुद्धया तु प्रसमीक्ष्य सः ।**
**ददौ तां धृतराष्ट्राय गांधारीं धर्मचारिणीम् ।। १२**
**गांधारी त्वथ शुश्राव धृतराष्ट्रमचक्षुषम् ।**
**आत्मानं दित्सितं चास्मै पित्रा मात्रा च भारत ।। १३**
**ततः सा पटमादाय कृत्वा बहुगुणं तदा ।**
**बबन्ध नेत्रे स्वे राजन् पतिव्रतपरायणा ।। १४**
**नाभ्यसूयां पतिमहमित्येवं कृतनिश्चया ।**

---

व्याख्यान २० वें, दि. १७ एप्रिल १९५१

ततो गान्धारराजस्य पुत्रः शकुनिरभ्ययात् ।। १५
स्वसारं वयसा लक्ष्म्या युक्तामादाय कौरवान् ।
तां तदा धृतराष्ट्राय ददौ परमसत्कृताम् ।।
भीष्मस्यानुमते चैव विवाहं समकारयत् । १६
दत्वा स भगिनीं वीरो यथार्हं च परिच्छदम् ।
पुनरायात् स्वनगरं भीष्मेण प्रतिपूजितः ।। १७
गान्धार्यपि वरारोहा शीलाचारविचेष्टितैः ।
तुष्टिं कुरूणां सर्वेषां जनयामास भारत ।। १८
वृत्तेनाराध्य तान् सर्वान् गुरून् पतिपरायणा ।
वाचापि पुरुषानन्यान् सुव्रता नान्वकीर्तयत् ।। १९

—महाभारत, आदिपर्व अध्याय ११०

"कुरुपितामह भीष्मांना ब्राह्मणांच्या तोंडून असें कळलें कीं, गांधारराज सुबलाची कन्या गांधारी हिनें भगवान् शंकराची आराधना करून स्वतःला शंभर पुत्र व्हावे असा वर प्राप्त करून घेतला आहे. भीष्मांनीं धृतराष्ट्रासाठीं त्या मुलीला मागणी घातली. सुबलाला जेव्हां धृतराष्ट्र अंध असल्याचें कळलें तेव्हां त्याला मोठाच विचार पडला. पण शेवटीं कुल, कीर्ति, कुरुकुलांतील राजांचें शील, चारित्र्य यांचा विचार करून धृतराष्ट्र अंध असला तरी त्याला गांधारी द्यावयाची असा निर्णय सुबल राजानें घेतला. गांधारीलाही आपला भावी पति धृतराष्ट्र अंध असल्याचें व तरीही सर्व परिस्थितीचा विचार करून आपल्या मातापित्यांनीं त्याच्याशींच आपला विवाह निश्चित केला असल्याचें कळलें. ज्याअर्थीं आपला भावी पति धृतराष्ट्र अंध असून सृष्टीच्या दर्शनसुखाला पूर्णपणें आंचवलेला आहे व ज्याअर्थीं यापुढें आपलें व त्याचें जीवन विवाहबंधनानें पूर्णपणें एकरूप होऊन एकमेकांचीं सुखदुःखें ही एकरूपच व्हावयाचीं आहेत त्याअर्थीं सृष्टीच्या ज्या दर्शनसुखाला राजा धृतराष्ट्र आंचवला तें त्याच्यावांचून आपण तरी कसें भोगावें या उग्र निश्चयानें प्रेरित होऊन गांधारीनें एक कापड आणविलें व त्याच्या आंतून कांहींच दिसूं शकणार नाहीं इतक्या त्याच्या घड्या करून तिनें आपले नेत्र सदाचे झांकून घेतले. पतीच्यासंबंधीं

कसलीही असूया निर्माण होऊं द्यावयाची नाहीं असा तिचा निश्चय होता. नंतर गांधारराजाचा पुत्र शकुनि आपल्या भगिनीला घेऊन कौरवांच्या राजधानींत आला व भीष्मांच्या अनुमतीनें त्याच्या उपस्थितींतच धृतराष्ट्र व गांधारी यांचा विवाह झाला. शकुनीनें योग्य त्या देणग्या धृतराष्ट्राला दिल्या. भीष्मांनीं योग्य ते सत्कार केल्यानंतर त्यांचा निरोप घेऊन तो आपल्या राजधानीस निघून गेला. गांधारीनें लवकरच आपल्या शीलचारित्र्यानें, वागणुकीनें व धोरणानें सर्व कौरवकुल पुरुषांच्या मनांत आपल्याविषयींचें समाधानाचें श्रेष्ठ स्थान उत्पन्न केलें. पतिपरायण गांधारीनें आपल्या शीलानें सर्व वडीलधाऱ्या मंडळींना प्रसन्न करून घेतलें. तिची पतिनिष्ठा इतकी तीव्र होती कीं, वाणीनेंही कधीं परपुरुषासंबंधीं तिनें उच्चार केला नाहीं. अंधानें दर्शनसुखाचा उपभोग न घेणें वेगळें व दृष्टि असूनही एका विशिष्ट ध्येयाप्रीत्यर्थ सतत तिळतिळ जळण्याचें महनीय जीवन पत्करून स्वतःला संयमाचा सदाचा अडसर घालून घेणें ही गोष्ट वेगळी. ज्या अवंचकतेनें गांधारीनें स्वतःचें हें उग्र व्रत जीवनाचें विरामचिन्ह उमटेपर्यंत पाळलें त्याची नुसती कल्पना केली तरी अंतःकरण विलक्षण गौरवानें भरून आल्या-वांचून रहात नाहीं. विवाहाच्या पूर्वीं तिनें एकदां जी पट्टी आपल्या डोळ्यांना बांधली ती राजा धृतराष्ट्राबरोबर शेवटच्या अरण्यांतील सहप्रवासांत वणव्यांत आपलें शरीर दग्ध होईपर्यंत तिनें तशीच ठेवली. प्रखर निष्ठेच्या अग्नींत तिनें आपली दर्शनेच्छा सदाची जाळून घेतली. आपण होऊन पत्करलेल्या या तिच्या महा-व्रतानें तिच्या अंगीं अपार सामर्थ्य उत्पन्न झालें असल्याचें महर्षि व्यासांनीं वर्णिलें आहे. महायुद्धांतील भीषण नरमेधानंतर ज्या वेळीं युधिष्ठिर प्रथम पुत्रवियोगानें शोकाकुल झालेल्या गांधारीच्या दर्शनासाठीं येतो त्या वेळीं तिच्या या सामर्थ्याचें चित्र रेखाटतांना महाभारतकार म्हणतात :—

**एवमुक्त्वा तु गांधारी युधिष्ठिरमपृच्छत ।**
**क्व स राजेति सक्रोधा पुत्रपौत्रवधार्दिता ।। २४**

तामभ्यगच्छद्राजेन्द्रो वेपमानः कृताञ्जलिः ।
युधिष्ठिरस्त्विदं तत्र मधुरं वाक्यमब्रवीत् ।। २५
पुत्रहन्ता नृशंसोऽहं तव देवि युधिष्ठिरः ।
शापार्हः पृथिवीनाशे हेतुभूतः शपस्व माम् ।। २६
न हि मे जीवितेनार्थो न राज्येन धनेन वा ।
तादृशान् सुहृदो हत्वा मूढस्यास्य सुहृद्द्रुहः ।। २७
तमेवंवादिनं भीतं सन्निकर्षगतं तदा ।
नोवाच किंचित् गांधारी निःश्वासपरमा भृशम् ।। २८
तस्यावनतदेहस्य पादयोर्निपतिष्यतः ।
युधिष्ठिरस्य नृपतेर्धर्मज्ञा दीर्घदर्शिनी ।। २९
अंगुल्यग्राणि ददृशे देवी पट्टान्तरेण सा ।
ततः स कुनखीभूतो दर्शनीयनखो नृपः ।। ३०
तत् दृष्ट्वा चार्जुनोऽगच्छद्वासुदेवस्य पृष्ठतः ।। ३१

—महाभारत, स्त्रीपर्व अध्याय १५

“नंतर गांधारी पुत्रशोकानें विव्हल होऊन क्रोधानें ‘तो राजा कुठें आहे ?’ असें विचारूं लागली. तें ऐकतांच हात जोडून व अधिकच शोकमग्न होऊन युधिष्ठिर तिच्याजवळ गेला व अत्यंत मधुर वाणीनें म्हणाला, “हे देवी, मी तुझे पुत्र ठार करणारा नृशंस युधिष्ठिर आहें. साऱ्या पृथ्वीच्या नाशाचें मीच कारण आहे. मी शापाला सर्वस्वीं योग्य आहे. मला तूं अवश्य शाप दे. मी राज्य, धन अथवा जीवित यांपैकीं कशाच्याही योग्य नाहीं. मी सुहृदांचा द्रोह करणारा मूढ आहें. माझ्या सर्वोत्कृष्ट सुहृदांना ठार मारून मी त्यांचा द्रोह केला आहें.” याप्रमाणें भयभीत होऊन व जवळ येऊन राजा युधिष्ठिर विलाप करूं लागला असतां गांधारी त्याला शब्दही बोलली नाहीं. ती केवळ वारंवार उसासे टाकीत होती. युधिष्ठिर खालीं वाकून तिच्या चरणांवर मस्तक ठेवीत असतां, नेत्रांना बांधलेल्या जाड कपड्यांच्या आंतून गांधारीची जळजळीत दृष्टि युधिष्ठिराच्या नखांवर पडली मात्र, तों त्याचीं सुंदर नखें काळीं ठिक्कर पडलीं. तें पाहतांच भीतीनें अर्जुन श्रीकृष्णांच्या मागें जाऊन उभा राहिला.

## न्यायसंरक्षक देवता

कठोर पातिव्रत्यपरिपालनानें गांधारीनें ज्याप्रमाणें नेत्रांचा विषय जिंकून टाकला होता, त्याचप्रमाणें आपल्या दिव्यदर्शी न्यायप्रियतेनें तिनें वात्सल्याच्या अत्यंत स्वाभाविक मोहपाशावरही विजय संपादन केलेला होता. जगांतलीं कठोर बंधनें तोडतां येतात पण कोमल बंधनें तोडतां येणें अत्यंत कठिण आहे. कविसंकेताप्रमाणें लांकडें पोखरून टाकणारा भुंगा कमलिनीच्या कोमल मिठींतून मात्र स्वतःची सुटका करून घेऊं शकत नाहीं. राजा धृतराष्ट्र दुर्योधनाचा पिता असला तर गांधारी त्याची माता होती. मातेचें वात्सल्य व अपत्यप्रेम पित्यापेक्षां स्वभावतःच अधिक असतें. स्त्रीसुलभ अपत्यप्रेम व मातृत्वाची उत्कट ओढ गांधारीच्या ठिकाणीं उत्कटत्वानें होती याचीं महाभारतांत अनेक प्रत्यंतरें आढळतात. गांधारी दोन वर्षें गरोदर राहिली तरी तिला पुत्र होईना. अशा स्थितींत अरण्यांत कुंती प्रसूत होऊन तिला पुत्र झाल्याची वार्ता तिला कळतांच मातृत्वाच्या उत्कट ओढीनें तिनें स्वतःवर आघात करून घेतला. महाभारतकार लिहितात :—

**श्रुत्वा कुन्तीसुतं जातं बालार्कसमतेजसम् ।**
**उदरस्यात्मनः स्थैर्यमुपलभ्यान्वचिन्तयत् ॥ १०**
**अज्ञातं धृतराष्ट्रस्य यत्नेन महता ततः ।**
**सोदरं घातयामास गांधारी दुःखमूर्च्छिता ॥ ११**

**—महाभारत, आदिपर्व अध्याय ११५**

"कुंतीला बालसूर्यासारखा अत्यंत तेजस्वी मुलगा झाल्याचें ऐकून व आपलें उदर मात्र अत्यंत स्थिर आहे हें पाहून गांधारी चिंतेंत चूर झाली. शेवटीं दुःखातिरेकानें धृतराष्ट्राच्या न कळत तिनें मोठ्या प्रयत्नांनीं आपल्या उदरावर प्रहार करून घेतले." तिच्या वात्सल्याच्या पोटीं आलेल्या कारुण्याचें जें अमर शब्दचित्र महर्षि व्यासांनीं स्त्रीपर्वांत रेखाटलें आहे तें पाहून ज्याचे डोळे पाणावणार नाहींत अशा मनुष्याला 'नृपशुरथवाऽयं पशुपतिः' या कोटींतच ढकललें पाहिजे. युद्धांत सर्व मुलें ठार झालेल्या या वृद्ध मातेकडून

रणभूमीचें कारुण्यपूर्ण वर्णन करवून महर्षींनीं करुणाच्या उत्कटतेला जी सहजसिद्ध बैठक उत्पन्न केली आहे तिची मोहिनी डॉ. विंटरनिट्झसारख्या व्यक्तीला देखील विलक्षण पडून या घटनेचा स्वतंत्रपणें आपल्या ग्रंथांत उल्लेख करण्याची त्याला आवश्यकता वाटली आहे. दुर्योधनाविषयीं विलाप करतांना गांधारी म्हणते:—

योऽयं मूर्धाभिषिक्तानामग्रे याति परंतपः ।
सोऽयं पांसुषु शेतेऽद्य पश्य कालस्य पर्ययम् ।। ११
यं पुरा पर्युपासीना रमयन्ति परस्त्रियः ।
तं वीरशयने सुप्तं रमयन्त्यशिवाः शिवाः ।। १३
यं पुरा पर्युपासीना रमयंति मनीषिणः ।
महीतलस्थं निहतं गृध्रास्तं पर्युपासते ।। १४
यं पुरा व्यजनैरुग्रैरुपजीवंति योषितः ।
तमद्य पक्षव्यजनैरुपजीवंति पक्षिणः ।।१५
एष दुर्योधनः शेते महेष्वासो महारथः ।
शार्दूल इव सिंहेन भीमसेनेन पातितः ।। १६
निःसपत्ना मही यस्य त्रयोदशसमाः स्थिता ।
स शेते निहतो भूमौ सुतो मे पृथिवीपतिः ।। २१
अपश्यं कृष्ण पृथिवीं धार्तराष्ट्रानुशासिताम् ।
पूर्णां हस्तिगवाश्वैश्च वार्ष्णेय न तु तच्चिरम् ।। २२
तामेवाद्य महाबाहो पश्याम्यन्यानुशासिताम् ।
हीनां हस्तिगवाश्वेन किं नु जीवामि माधव ।। २३
प्रकीर्णकेशां सुश्रोणीं दुर्योधनशुभाङ्कगाम् ।
रुक्मवेदीनिभां पश्य कृष्ण लक्ष्मणमातरम् ।।२५
कथं तु शतधा नेदं हृदयं मम दीर्यते ।
पश्यन्त्या निहतं पुत्रं पुत्रेण सहितं रणे ।। २७
ततो दुर्योधनं दृष्ट्वा गान्धारी शोककर्शिता ।
सहसा न्यपतद्भूमौ छिन्नेव कदलीवने ।। १

—महाभारत, स्त्रीपर्व अध्याय १७

"जो पूर्वी मूर्धाभिषिक्त राजांच्या अग्रभागीं असावयाचा, तो आज धुळींत शयन करीत आहे. कृष्णा ! काळाची ही विपरीतता

पहा ! अत्यंत सुंदर व सुलक्षणी स्त्रिया पूर्वी दक्षतेनें ज्याला रमवीत त्या दुर्योधनाभोंवतीं आज अपशकुनी कोल्हया दिसत आहेत. मोठमोठे प्रज्ञावंत ज्याच्या भोंवतीं उपस्थित राहून अनुरंजन करावयाचे त्याच्या सभोंवार आज गिधाडें वावरतांना दिसत आहेत. पूर्वी राण्या ज्याला पंखांनीं वारा घालून रिझवीत असत त्याला आज उग्र पक्ष्यांच्या पंखांचा वारा घ्यावा लागत आहे. पहा पहा ! हा शस्त्र धारण करणाऱ्यांत श्रेष्ठ असलेला महारथ दुर्योधन धुळींत पडलेला आहे. याला चिरनिद्रा लागली. वाघाला सिंहानें ठार मारावें त्याप्रमाणें भीमसेनानें याला ठार मारलें आहे. तेरा वर्षेपर्यंत ज्यानें निष्कंटकपणें पृथ्वीचा उपभोग घेतला तो हा माझा पृथ्वीपति पुत्र आज ठार मारण्यांत येऊन धुळींत पडला आहे. श्रीकृष्णा ! गजान्तलक्ष्मीनें समृद्ध व वैभवानें मुसमुसलेली पृथ्वी दुर्योधन तिचें अधिराज्य चालवीत असतां मीं पाहिली. पण तें ऐश्वर्य फार दिवस टिकलें नाहीं. आज तीच पृथ्वी ऐश्वर्यभंग पावून दुसऱ्याच्या स्वाधीन झालेली पाहण्याचा प्रसंग माझ्यावर आलेला आहे. या स्थितींत मीं जगावें तरी कसें ? व कशाला ? श्रीकृष्णा ! केस मोकळे सोडलेली, दुर्योधनाच्या अंकावर दुःखानें लोळण घेणारी व सोन्याच्या वेदीप्रमाणें दिसणारी ही माझ्या दुर्योधनाची राणी व लक्ष्मणाची माता पाहिलीस काय ? आपल्या पुत्रांसहित ठार झालेल्या माझ्या पुत्राला पाहून माझ्या हृदयाचे तुकडे तुकडे कां बरे पडत नाहींत ?" (याप्रमाणें बोलून) दुर्योधनाकडे पाहून केळी ज्याप्रमाणें उन्मळून पडावी त्याप्रमाणें शोकविव्हल गांधारी एकाएकीं मूर्च्छित होऊन जमिनीवर पडली." मी केवळ उदाहरण म्हणून गांधारीच्या करुणविलापांतील थोडासा भाग येथें उद्धृत केला आहे. पण तेवढ्यावरूनही गांधारीच्या हृदयाची वत्सलता उत्कटतेनें प्रत्ययास येईल. मुळांतून भारतांतील स्त्रीपर्व वाचणाऱ्या सहृदय वाचकाला तर गांधारीच्या विलापाचें हें प्रकरण अनेकवार खालींच ठेवावें लागेल. पुत्रनिधनानें शोककर्शित झालेल्या तिच्या अंतःकरणानें शेवटीं श्रीकृष्णांना घोर शाप द्यावयासही कमी केलें नाहीं. ती म्हणते :—

शक्तेन बहुभृत्येन विपुले तिष्ठता बले ।
उभयत्र समर्थेन श्रुतवाक्येन चैव ह ।। ४०
इच्छतोपेक्षितो नाशो कुरूणां मधुसूदन ।
यस्मात्त्वया महाबाहो फलं तस्मादवाप्नुहि ।। ४१
पतिशुश्रूषया यन्मे तपः किञ्चिदुपार्जितम् ।
तेन त्वां दुरवापेन शप्स्ये चक्रगदाधरम ।। ४२
यस्मात्परस्परं घ्नन्तो ज्ञातयः कुरुपांडवाः ।
उपेक्षितास्ते गोविंद तस्माज्ज्ञातीन् वधिष्यसि ।। ४३
त्वमप्युपस्थिते वर्षे षट्त्रिंशे मधुसूदन ।
हतज्ञातिर्हतामात्यो हतपुत्रो वनेचरः ।।४४
अनाथवदविज्ञातो लोकेष्वनभिलक्षितः ।
कुत्सितेनाप्युपायेन निधनं समवाप्स्यसि ।। ४५
तवाप्येयं हतसुता निहतज्ञातिबांधवाः ।
स्त्रियः परिपतिष्यन्ति यथैता भरतस्त्रियः ।। ४६

—महाभारत, स्त्रीपर्व अध्याय २५

" अंगीं सामर्थ्य असतांना, अनेक लोक आधीन असतांना, अपार सैन्य आज्ञेंत असतांना, अद्वितीय सामर्थ्य असतांना, व कुरुपांण्डव युद्धांतील दोन्ही युध्यमान पक्ष आपल्या बळानें नियंत्रित करणें शक्य असतांनाही तूं त्यांची उपेक्षा केलीस. तुला सर्व कळत असतांना देखील तूं यांचा नाश व्हावा अशी इच्छा धारण करून यांची उपेक्षा केलेली आहेस. त्याचें फल तुलाही भोगलेंच पाहिजे. पतीची शुश्रूषा संपादन करून जें कांहीं पुण्य व सामर्थ्य माझ्या ठिकाणीं उत्पन्न झालेलें आहे त्याच्या भरंवशावर, हे चक्रगदाधरा, मी तुला अनिवार्य शाप देतें. तूं स्वतः आपल्या ज्ञातिबांधवांचाही असाच वध करशील. आजपासून ३६ व्या वर्षीं अमात्य, ज्ञातिबांधव, पुत्र या सर्वांचें निधन आपल्या डोळ्यांनीं पाहून तूं एकाकी विजनवनांत भटकत असतां गर्ह्यपणें मारला जाशील. आज ज्याप्रमाणें या भरतस्त्रिया आपलीं मुलें, ज्ञातिबांधव, पति वध पावलेल्या अवस्थेंत येथें विलाप करीत आहेत, त्याचप्रमाणें तुझ्या स्त्रियाही अशाच हतपुत्र व निहतबांधव अवस्थेंत विलाप करतील."

गांधारीचें हें उत्कट पुत्रवात्सल्य तिच्या स्त्रीत्वाच्या वैशिष्टयाचें द्योतक असलें तर त्याच्या अपूर्व संयमाचें तिचें वैशिष्टय तिच्या महत्तेचें द्योतक आहे. जी गोष्ट धृतराष्ट्रासारख्या पुरुषाला शक्य झाली नाहीं ती गांधारीनें मातृहृदयाच्या उत्कट व स्वाभाविक वात्सल्यालाही बाजूस सारून करून दाखविली. मानवी जीवनांत सतत चालू असलेल्या भावना व कर्तव्य यांच्या झगडयांत कर्तव्य बुद्धीवर भावना नेहमीं विजय संपादन करीत असल्याचा अनुभव येतो. जेथें भावनेवर कर्तव्यबुद्धीचाच विजय सतत दृष्टोत्पत्तीस येतो तेंच महत्तम जीवन होय. गांधारीचें जीवन अत्यंत कसोटीच्या प्रसंगीं देखील या कसोटीस पूर्णपणें उतरलें आहे. कौरवांच्या राजसभेंत संधीच्या वाटाघाटी चालू असतां व निदान अर्धें राज्य तरी पांडवांना द्यावें या निर्णयावर मोठमोठी मंडळी येत असतां गांधारीनें सामंतांच्या समक्ष भर राजसभेंत दुर्योधनाच्या तोंडावर या राज्यावर न्याय व धर्म यांच्या नियमनाप्रमाणें तुझा कांहीं एक हक्क नसून अर्ध्याचि नव्हे तर सर्वच राज्याचे पाण्डवच अधिपति असल्याचें स्पष्ट उद्घोषिलें आहे. वात्सल्यावर जागृत धर्मबुद्धीनें मिळविलेला हा केवढा विजय आहे! ती म्हणाली :—

**ये पार्थिवा राजसभां प्रविष्टा ब्रह्मर्षयो ये च सभासदोऽन्ये ।**
**शृण्वन्तु वक्ष्यामि तवापराधं पापस्य सामात्यपरिच्छदस्य ॥ २९**
**राज्यं तु पाण्डोरिदमप्रधृष्यं तस्याद्य पुत्राः प्रभवन्ति नान्य ।**
**राज्यं तदेतन्निखिलं पाण्डवानां पैतामहं पुत्रपौत्रानुगामी ॥ ३३**
**न्यायागतं राज्यमिदं कुरूणां युधिष्ठिरः शास्तु वै धर्मपुत्रः ।**
**प्रचोदितो धृतराष्ट्रेण राज्ञा पुरस्कृतः शान्तनवेन चैव ॥ ३६**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १४८

या राजसभेंत उपस्थित असलेले सर्व राजे, ब्रह्मर्षि व इतर सभासद यांच्या समक्ष, हे पापात्म्या दुर्योधना! तूं तुझ्या अमात्य व साहाय्यकर्त्यांच्यासह कोणत्या पापाचा पुरस्कार केलास तें मी उघड करून सांगतें. हें सर्वच राज्य राजा पांडूचें आहे. ज्या अर्थीं राज्य पांडुराजाचें आहे त्याअर्थीं त्याचे पुत्रच या राज्याचे उत्तराधिकारी आहेत; ते असतांना दुसरे कोणीहि राज्याधिकारी कधींही होऊंच

शकत नाहींत. पितृपितामहापासून चालत आलेलें राज्य त्यांच्या योग्य अधिकारी पुत्रपौत्रांनींच करावें असा न्याय आहे. राज्य जर राजा पाण्डूचें आहे तर तें अर्धेच नव्हे तर सर्वच्या सर्व एकटच्या पांडवांचेंच आहे हें स्पष्ट आहे. म्हणून न्यायानेंच युधिष्ठिराचें असलेलें हें राज्य शान्तनव भीष्मांच्या पुरस्कारानें व राजा धृतराष्ट्राच्या प्रेरणेनें युधिष्ठिरानेंच केलें पाहिजे." याहूनही आणखी एका भावनामय प्रसंगीं तिची तेजस्वी कर्तव्यबुद्धि प्रकट झालेली आहे. महायुद्ध सुरू झाल्यानंतर रोज युद्धाला जावयास निघण्यापूर्वी राजा दुर्योधन आपल्या पुण्यशील मातेकडून विजयाचें आशीर्वचन मिळावें म्हणून तिच्या चरणांना वंदन करण्यास्तव तिच्याकडे जाई. वंदन करून रोज त्यानें तिला विजयाचें आशीर्वचन मागावें पण गांधारीनें तें त्याला कधींही दिलें नाहीं. ती स्वतःच भगवान् श्रीकृष्णांना हें वृत्त सांगतांना म्हणते :—

**उपस्थितेऽस्मिन्सङ्ग्रामे ज्ञातीनां संक्षये विभो ॥ ५**
**मामयं प्राह वार्ष्णेय प्राञ्जलिर्नृपसत्तमः ।**
**अस्मिन् ज्ञातिसमुद्धर्षे जयमम्बा ब्रवीतु मे ॥ ६**
**इत्युक्ते जानती सर्वमहं स्वव्यसनागमम् ।**
**अब्रुवं पुरुषव्याघ्र यतो धर्मस्ततो जयः ॥ ७**

**—महाभारत, स्त्रीपर्व अध्याय १७**

"हे श्रीकृष्णा! हा ज्ञातींचा आपसांतील भयानक संग्राम उपस्थित झाला असतां राजा दुर्योधन हात जोडून मला म्हणूं लागला कीं, 'हे माते या आपसांतील युद्धांत माझा जय व्हावा असा आशीर्वाद मला तूं दे.' भावी संकटाची मला पूर्णपणें कल्पना होती. मी त्याला उत्तर म्हणून, 'जिकडे धर्म त्या पक्षाचाच जय होईल' असें सांगितलें."गांधारीच्या या उद्गारांवरून दुर्योधन व गांधारी यांच्यांत हा संवाद एकदांच झाला अशी कुणाची कल्पना होईल. पण तो अठरा दिवसांच्या युद्धांत प्रत्येक दिवशीं झालेला आहे. गांधारीचें सांत्वन करतांना महर्षि व्यासांनीं या गोष्टीचा स्पष्ट निर्देश केलेला आहे. ते म्हणतात :—

उक्तास्यष्टदशाहानि पुत्रेण जयमिच्छता ।
शिवमाशंस मे मातर्युध्यमानस्य शत्रुभिः ॥ ८
सा तथा वाच्यमाना त्वं काले काले जयैषिणा ।
उक्तवत्यसि गान्धारि यतो धर्मस्ततो जयः ॥ ९

—महाभारत, स्त्रीपर्व अध्याय १४

हे गांधारी ! अठरादिवसपर्यंत रोज जय मिळावा या इच्छेनें तुझा पुत्र तुला 'हे माते ! मी शत्रूंशीं संग्राम करीत असतां माझें कल्याण व्हावें असा आशीर्वाद दे' अशी तुझी प्रार्थना करीत होता. पण त्या त्या प्रत्येक वेळीं 'जिकडे धर्म असेल त्या पक्षाचाच जय होईल' असेंच तूं म्हणालीस. युद्धाच्या अगदीं प्रारंभीं गांधारीच्या तोंडून असे उद्गार बाहेर पडले असले तर त्यांत तितकेसें आश्चर्य नाहीं. पण रोजच्या रोज पुत्रमरणाच्या व आपल्या पुत्रांच्या पक्षाच्या विनाशाच्या वार्ता ऐकूनही तिच्या अंतःकरणाचें स्थैर्य विचलित होऊं शकलें नाहीं यांतच तिची महत्ता व्यक्त होते.

## तिचें महत्त्व व तिची राजनीतिज्ञता

गांधारीला महाभारतांत ठिकठिकाणीं महाप्राज्ञा व दीर्घदर्शिनी अशीं विशेषणें जोडलेलीं आढळतात. प्रत्येक वेळीं महत्त्वाचा प्रश्न उपस्थित झाला असता तिचा सल्ला घेणें आवश्यक ठरलेलें आहे. भगवान् श्रीकृष्ण ज्यावेळीं कौरवांच्या राजसभेंतून शिष्टाई करून परत आले त्यावेळीं युधिष्ठिरांनीं त्यांना कोण कोण काय काय बोललें हें विचारीत असतां गांधारी काय बोलली हें बुद्धचा विचारिलें आहे. युधिष्ठिर म्हणतो, 'गांधारी वा किमब्रवीत्' ( महाभारत उद्योगपर्व अध्याय १४७।८ ) ज्यावेळीं राजसभेंतून सभेच्या नियमांचा भंग करून भीष्मद्रोणादि सभासद राज्ययंत्राचा सूत्रचालक राजा धृतराष्ट्र व आलेले पाहुणे द्वारकाधीश भगवान् श्रीकृष्ण या सर्वांसमोर शिष्टाचाराचें उल्लंघन करून राजा दुर्योधन सभास्थान सोडून जाऊं लागला त्यावेळीं त्याला परत आणून उपदेश करावयाचें काम केवळ गांधारीच करूं शकेल हें ओळखून धृतराष्ट्रांनीं विदुराला तिला राजसभेंत आणावयास पाठविलें. धृतराष्ट्र विदुराला म्हणतो :—

गच्छ तात महाप्राज्ञां गान्धारीं दीर्घदर्शिनीम् ।
आनयेह तया सार्धमनुनेष्यामि दुर्मतिम् ।। २
यदि साऽपि दुरात्मानं शमयेद्दुष्टचेतसम् ।
अपि कृष्णस्य सुहृदस्तिष्ठेम वचने वयम् ।। ३
अपि लोभाभिभूतस्य पन्थानमनुदर्शयेत् ।
दुर्बुद्धेर्दुःसहायस्य शमार्थं ब्रुवती वचः ।। ४
अपि नो व्यसनं घोरं दुर्योधनकृतं महत् ।
शमयेच्चिररात्राय योगक्षेमवदव्ययम् ।। ५

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १२९

"हे विदुरा, अत्यंत बुद्धिमान् व दीर्घदर्शिनी गांधारीला तूं जाऊन येथें आण. मी तिच्यासहित या दुष्टाला समजावितों. जर ती याचें सांत्वन करूं शकेल तर आपण सर्व सुहृद् श्रीकृष्णांच्या म्हणण्याप्रमाणें वागूं. ती तरी दुर्बुद्धि व वाईट लोकांच्या संगतींत असलेल्या दुष्टाचें चित्त सांत्वनाचा उपदेश करून वळवूं शकेल काय? हा लोभानें पूर्णपणें ग्रासलेला आहे. ती तरी याचें मार्गदर्शन करूं शकेल काय? दुर्योधनामुळें आपल्यावर अत्यंत भीषण संकट येऊं पहात आहे. आपण सर्व सुखानें जगूं शकूं असें गांधारी करूं शकेल काय?"

ज्या ठिकाणीं कोणत्याही बुद्धिमंताचें कांहींही चालूं शकत नाहीं अशा ठिकाणीं केवळ गांधारीच कांहीं करूं शकेल अशी कुरुराज्याच्या सूत्रचालकाची आशा आहे. गांधारीनें सभेंत येऊन दुर्योधनाला जो उपदेश केला त्यांतून तिची राजनीतिज्ञता व तिचें दीर्घदर्शी सखोल ज्ञान व्यक्त झालें आहे. ती म्हणते :—

दुर्योधन निबोधेदं वचनं मम पुत्रक ।
हितं ते सानुबन्धस्य तथाऽऽयत्यां सुखोदयम् ।। १९
दुर्योधन यदाह त्वां पिता भरतसत्तम ।
भीष्मो द्रोणः कृपः क्षत्ता सुहृदां कुरु तद्वचः ।। २०
भीष्मस्य तु पितुश्चैव मम चापचितिः कृता ।
भवेद्द्रोणमुखानां च सुहृदां शाम्यता त्वया ।। २१

न हि राज्यं महाप्राज्ञ स्वेन कामेन शक्यते ।
अवाप्तुं रक्षितुं वाऽपि भोक्तुं भरतसत्तम ।। २२
न ह्यवश्येन्द्रियो राज्यमश्नीयाद्दीर्घमन्तरम् ।
विजितात्मा तु मेधावी स राज्यमभिपालयेत् ।। २३
कामक्रोधौ हि पुरुषमर्थेभ्यो व्यपकर्षतः ।
तौ तु शत्रू विनिर्जित्य राजा विजयते महीम् ।। २४
लोकेश्वर प्रभुत्वं हि महदेतद् दुरात्मभिः ।
राज्यं नामेप्सितं स्थानं न शक्यमभिरक्षितुम् ।। २५
इन्द्रियाणि महत्प्रेप्सुर्नियच्छेदर्थधर्मयोः ।
इन्द्रियैर्नियतैर्बुद्धिर्वर्धतेऽग्निरिवेन्धनैः ।। २६
अविधेयानि हीमानि व्यापादयितुमप्यलम् ।
अविधेया इवादान्ता हयाः पथि कुसारथिम् ।। २७
अविजित्य य आत्मानममात्यान् विजिगीषते ।
अमित्रान् वाऽजितामात्यः सोऽवशः परिहीयते ।। २८
आत्मानमेव प्रथमं द्वेष्यरूपेण योजयेत् ।
ततोऽमात्यानमित्रांश्च न मोघं विजिगीषते ।। २९
वश्येन्द्रियं जितामात्यं धृतदण्डं विकारिषु ।
परीक्ष्यकारिणं धीरमत्यर्थं श्रीर्निषेवते ।। ३०
क्षुद्राक्षेणेव जालेन झषावपिहितावुभौ ।
कामक्रोधौ शरीरस्थौ प्रज्ञानं तौ विलुम्पतः ।। ३१
याभ्यां हि देवाः स्वर्यातुः स्वर्गस्य पिदधुर्मुखम् ।
बिभ्यतोऽनुपरागस्य कामक्रोधौ स्म वर्धितौ ।। ३२
कामं क्रोधं च लोभं च दंभं दर्पं च भूमिपः ।
सम्यग्विजेतुं यो वेद स महीमभिजायते ।। ३३
सततं निग्रहे युक्त इन्द्रियाणां भवेन्नृपः ।
ईप्सन्नर्थं च धर्मं च द्विषतां च पराभवम् ।। ३४
कामाभिभूतः क्रोधाद्वा यो मिथ्या प्रतिपद्यते ।
स्वेषु चान्येषु वा तस्य न सहाया भवन्त्युत ।। ३५
एकीभूतैर्महाप्राज्ञैः शूरैररिनिबर्हणैः ।
पाण्डवैः पृथिवीं तात भोक्ष्यसे सहितः सुखी ।। ३६

यथा भीष्मः शान्तनवो द्रोणश्चापि महारथः ।
आहतुस्तात तत्सत्यमजेयौ कृष्णपाण्डवौ ।। ३७
प्रपद्यस्व महाबहुं कृष्णमक्लिष्टकारिणम् ।
प्रसन्नो हि सुखाय स्यादुभयोरेव केशवः ।। ३८
सुहृदामर्थकामानां यो न तिष्ठति शासने ।
प्राज्ञानां कृतविद्यानां स नरः शत्रुनन्दनः ।। ३९
न युद्धे तात कल्याणं न धर्मार्थौ कुतः सुखम् ।
न चापि विजयो नित्यं मा युद्धे चेत आधिथाः ।। ४०
भीष्मेण हि महाप्राज्ञ पित्रा ते बाह्लिकेन च ।
दत्तोंशः पाण्डुपुत्राणां भेदाद्भीतैररिन्दम ।। ४१
तस्य चैतत्प्रदानस्य फलमद्यानुपश्यसि ।
यद्भुङ्क्षे पृथिवीं कृत्स्नां शूरैर्निहतकण्टकाम् ।। ४२
प्रयच्छ पाण्डुपुत्राणां यथोचितमरिन्दम ।
यदीच्छसि सहामात्यो भोक्तुमर्धं प्रदीयताम् ।। ४३
अलमर्धं पृथिव्यास्ते सहामात्यस्य जीवितुम् ।
सुहृदां वचने तिष्ठन् यशः प्राप्स्यसि भारत ।। ४४
श्रीमद्भिरात्मवद्भिस्तैर्बुद्धिमद्भिर्जितेन्द्रियैः ।
पाण्डवैर्विग्रहस्तात भ्रंशयेन्महतः सुखात् ।। ४५
निगृह्य सुहृदां मन्युं शाधि राज्यं यथोचितम् ।
स्वमंशं पाण्डुपुत्रेभ्यः प्रदाय भरतर्षभ ।। ४६
अलमङ्ग निकारोऽयं त्रयोदश समाः कृतः ।
शमयैनं महाप्राज्ञ कामक्रोधसमेधितम् ।। ४७
न चैष शक्तः पार्थानां यस्त्वमर्थमभीप्ससि ।
सूतपुत्रो दृढक्रोधो भ्राता दुःशासनश्च ते ।। ४८
भीष्मे द्रोणे कृपे कर्णे भीमसेने धनञ्जये ।
धृष्टद्युम्ने च संक्रुद्धे न स्युः सर्वाः प्रजा ध्रुवम् ।। ४९
अमर्षवशमापन्नो मा कुरूंस्तात जीघनः ।
एषा हि पृथिवी कृत्स्ना मागमत्त्वत्कृते वधम् ।। ५०
यच्च त्वं मन्यसे मूढ भीष्मद्रोणकृपादयः ।
योत्स्यन्ते सर्वशक्त्येति नैतदद्योपपद्यते ।। ५१

समं हि राज्यं प्रीतिश्च स्थानं हि विदितात्मनाम् ।
पाण्डवेष्वथ युष्मासु धर्मस्त्वभ्यधिकस्ततः ।। ५२
राजपिण्डभयादेते यदि हास्यन्ति जीवितम् ।
न हि शक्ष्यन्ति राजानं युधिष्ठिरमुदीक्षितुम् ।। ५३
न लोभादर्थसम्पत्तिर्नराणामिह दृश्यते ।
तदलं तात लोभेन प्रशाम्य भरतर्षभ ।। ५४

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १२९

हे दुर्योधना, मी काय सांगतें तें ऐक. ज्यामुळें तुझें तुझ्या सर्व अनुचरासह कल्याण होईल व पुढें ज्यामुळें साऱ्यांनाच सुख लाभेल असेंच मी तुला सांगतें. तुझा पिता, भीष्म, द्रोणाचार्य, कृपाचार्य, व तुझे इतर सुहृद हे सर्व तुला जें सांगत आहेत तदनुसारच तूं वागणें तुझ्या हिताचें आहे. तूं शांतीचा मार्ग स्वीकारलास कीं तुझे वडील व भीष्मद्रोणादि लोक व मी या सर्वांचें पूजन केल्यासारखें होईल. तूं राज्य करूं इच्छीत आहेस, व तुझ्यासारख्या बुद्धिमान् व्यक्तीला ही गोष्ट समजली पाहिजे कीं राज्याची प्राप्ति, राज्याचें संरक्षण अथवा राज्याचा उपभोग कोणालाही आपल्या लहरीनें वाटेल तसें वागन घेतां येत नसतो. इंद्रियें ज्याच्या स्वाधीन नाहींत त्याला दीर्घकाल राज्य करणें कधींही शक्य नाहीं. जो बुद्धिमान्, दक्ष, व मन सदैव स्वाधीन ठेवणारा असतो तोच केवळ राज्याचें पालन करूं शकतो. काम व क्रोध हे नेहमींच पुरुषाला अर्थप्राप्तीपासून वंचित करीत असतात. मनाची लहर व मनाचा क्षोभ या दोन्ही गोष्टी राज्यासारखी महत्त्वाची गोष्ट स्वाधीन ठेवूं इच्छिणाऱ्या व्यक्तींनीं सदैव नियंत्रित केल्याच पाहिजेत. काम व क्रोध हे खरे शत्रू आहेत. त्यांना जो जिंकील तोच पृथ्वी जिंकील. सर्व लोकांचें ईश्वरत्व अथवा प्रभुत्व संपादन करणें ही एक अत्यंत महान् गोष्ट आहे. मन स्वाधीन नसलेल्या दुरात्म्यांना ती कधींही साधणार नाहीं. राज्य ही सर्वांच्याच हृदयांत मोह उत्पन्न करणारी गोष्ट आहे. पण ती मिळविण्यापेक्षांही त्याचें संरक्षण करणें ही अधिक दायित्वाची व अधिक कठिण गोष्ट आहे. ज्याला राज्यासारखी महान् गोष्ट प्राप्त करून घ्यावयाची असेल त्यानें अर्थ व धर्म या दोन

गोष्टींसाठीं नेहमीं आपलीं इंद्रियें नियंत्रित केलीं पाहिजेत. इंद्रियें नियंत्रित केलीं कीं बुद्धि वाढते. सर्पणानें ज्याप्रमाणें अग्नि प्रदीप्त होतो त्याचप्रमाणें संयमानें बुद्धि प्रदीप्त होत असते. इंद्रियें स्वाधीन नसलीं तर तीं व्यक्तीचा नुसता पराजयच तर काय पण त्याची प्राणहानि देखील करूं शकतात. ज्याप्रमाणें अश्वांचें नियंत्रण न करूं शकणाऱ्या मूर्ख सारथ्याला अनियंत्रित अश्व शेवटीं खड्डयांत घालून ठार मारतात, तशीच इंद्रियांचीही अवस्था आहे. स्वतःच्या मनावर विजय संपादन न करतां जो केवळ अमात्यांवर कुरघोडी करूं इच्छितो व शत्रूवर कुरघोडी करण्याची इच्छा करतो त्याला आपल्या अमात्यांवरही विजय संपादन करतां येत नाहीं व शेवटीं असा लहरीनुसार वागणारा राजा आपला सर्वनाश आपल्या हातानें ओढवून घेतो. आपलें मन हाच आपला खरा शत्रु आहे, हें ओळखून प्रथम तें स्वाधीन करून घेणारा व नंतर अमात्यांवर अधिसत्ता गाजवून शत्रूवर विजय संपादन करणारा मनुष्यच शेवटीं खऱ्या अर्थानें विजयी व यशस्वी ठरतो. इंद्रियें ज्याच्या स्वाधीन आहेत, अमात्य ज्याच्या स्वाधीन आहेत, विकृति उत्पन्न करणाऱ्या अपराधी लोकांना जो दंड करतो, प्रत्येक गोष्ट जो सर्व बाजूंनीं विचार व परीक्षा करून नंतरच आचरितो अशा गंभीर प्रकृतीच्या व्यक्तीजवळच संपत्ति सदैव निवास करते. ज्याला पुष्कळ छिद्रें पडलीं आहेत अशा जाळ्यानें कधींही बांधलें न जाणारें जलचर ज्याप्रमाणें जाळें छिन्नविच्छिन्न करून तें टाकणाऱ्याचाच नाश-करतात त्याचप्रमाणें शरीराच्या आश्रयानें राहणारे काम व क्रोध ज्ञानाचा व बुद्धीचा विनाश करतात. वाढलेल्या कामक्रोधानीं ज्याचें अंतःकरण व्यापलें आहे अशा पुरुषासाठीं स्वर्गाचीं द्वारें देवांनीं सदाचीं बंद केलीं आहेत. काम, क्रोध, लोभ, दंभ व दर्प यांच्यावर जो राजा विजय संपादन करील तोच खरा राजा होय. पृथ्वी त्याच्याच स्वाधीन राहूं शकेल. इंद्रियांचा निग्रह करण्याविषयीं राजानें सदैव दक्ष. राहिलें पाहिजे. राज्यविस्तार, धर्मसंरक्षण, व शत्रूंचा पराभव या गोष्टींची ज्याला इच्छा आहे अशा राजानें तर याबाबतींत डोळ्यांत तेल घालून सदैव जपलें पाहिजे.

कामाच्या स्वाधीन झाल्यानें असो किंवा क्रोधाच्या तावडींत सांपडून असो, पण जो आपल्या लोकांशीं अथवा परक्या लोकांशीं खोटेंपणाचें आचरण करतो अथवा खोटें बोलतो त्याला जगांत कोणाचेंही व कसल्याही प्रकारचें साहाय्य मिळूं शकत नाहीं. पांडव अत्यंत बुद्धिमान् आहेत, शूर आहेत, व शत्रूंचा त्यांनीं केलेला पराभव अत्यंत देदीप्यमान असून ते पांचही बंधु अगदीं एकजीव आहेत. त्यांच्याशीं सख्य करून त्यांच्याबरोबर पृथ्वीचा उपभोग घेण्याची तूं आपल्या मनाची सिद्धता करशील तरच सुखी होऊं शकशील. कृष्ण व पांडव अजिंक्य आहेत हें जें तुला शांतनुपुत्र भीष्म व महारथ द्रोण यांनीं सांगितलें तें अक्षरशः खरें आहे. उभयतांच्या कल्याणाच्या इच्छेनें येथें आलेल्या श्रीकृष्णाला तूं शरण जा. जर कृष्ण प्रसन्न झाला तर तो उभय पक्षांचें कल्याण केल्यावांचून रहाणार नाहीं. राज्याच्या संरक्षणाचा पूर्ण विचार केलेल्या बुद्धिमान् व कर्तृत्ववान् सुहृदांचें म्हणणें जो ऐकत नाहीं तो मनुष्य स्वतःचा सर्वनाश ओढवून घेऊन केवळ स्वतःच्या शत्रूंना आनंद देत असतो. युद्धाच्या कल्पनेपासून तूं आपलें चित्त काढून घे. कारण या होणाऱ्या युद्धांत धर्म नाहीं. किंवा कसल्याही प्रकारचें कल्याण नाहीं, सुखाची तर वार्ताच नको, व तुझा विजयही व्हावयाचा नाहीं हें निश्चित आहे. कुळामध्यें भेद उत्पन्न होऊन सर्वनाश ओढवूं नये म्हणूनच तुझा पिता, बाह्लिक व भीष्म यांनीं पांडवांना पूर्वीं राज्याचा अर्धा भाग दिला. आज निष्कंटक व अत्यंत विस्तृत अशा राज्याच्या उपभोग घेणें तुला जें शक्य झालेलें आहे तें केवळ त्यांच्या त्या कृतीचेंच फळ होय. पूर्वीं हें राज्य येवढें विस्तारलेलें होतें काय ? पांडवांनीं आपल्या पराक्रमानें व शौर्यानें सर्व शत्रूंचा निःपात करून राज्य वाढविलें म्हणून तुम्ही येवढ्या मोठ्या राज्याचा उपभोग घेण्याची शक्यता निर्माण झालेली आहे. जर यांपैकीं अर्ध्या राज्याचा जरी आपल्या अमात्यासह तुला यापुढें उपभोग घ्यावयाचा असेल तर जें योग्य आहे तें तूं पांडवांना दिलेंच पाहिजेस. तुला आपल्या अमात्यांसहित सुखानें जगावयास अर्धें राज्य पुरें आहे. जर आपल्या सुहृदांच्या म्हणण्याप्रमाणें तूं वागलास तर मोठ्या

यशाची तुला प्राप्ति होईल असें मला वाटतें. श्रीमान्, मन स्वाधीन असलेले, सर्व सद्गुणांनीं मंडित, अत्यंत बुद्धिमान् व जितेंद्रिय पांडवांशीं जर तूं संघर्ष केलास तर तुझे सुखाचे दिवस यापुढें संपले असें समज. जो पांडवांचाच विभाग आहे तो त्यांना देऊन टाकून सुहृदांच्या अंतःकरणांतील क्रोध शांत कर व तुला जें उचित तेवढें राज्य तूं कर. तेरा वर्षेपर्यंत कामक्रोधांच्या पोटीं वाढलेला जो भयानक व अपकारक अन्याय तूं केलास तो आतां पुरे झाला. यापुढें तो थांबलाच पाहिजे. पांडवांचा जो अंश तूं बळकावूं इच्छितोस तो मिळविण्याचें सामर्थ्य तुझ्यांत व दुःशासनांत तर नाहींच, पण अत्यंत क्रोधन कर्णांतही तें सामर्थ्य नाहीं हें तूं खात्रीनें ध्यानांत ठेव. युद्धाचें पर्यवसान शेवटीं कशांत व्हावयाचें आहे याचा तूं यत्किंचित् तरी विचार केला आहेस काय? कोणाचाही जय झाला तरी त्यापासून लोकांचा सर्वनाशच व्हावयाचा आहे. भीष्म, द्रोण, कृपाचार्य, कर्ण, भीमसेन, अर्जुन व धृष्टद्युम्न एकमेकांवर संतापून उठल्यावर प्रजा जिवंत राहूं शकणार नाहींत हें निश्चित आहे. अकारण मत्सराचे व क्रोधाचे स्वाधीन होऊन सर्व कौरवांचा विनाश तूं कां करूं इच्छितोस? तुझ्या एकटयाच्या लहरीसाठीं सर्व प्रजांचा व पृथ्वीचा विनाश करविण्याचें पातक तूं करूं नयेस. भीष्म, द्रोण, कृपाचार्य हे आपल्या सर्व सामर्थ्यानिशीं तुझ्याकडून लढतील ही जर तुझी अपेक्षा असेल तर ती निव्वळ मूर्खपणाची आहे. संबंधांच्या दृष्टीनें विचार केला तर तुम्हां दोघांचेंही राज्य, प्रेम, व स्थान या दृष्टीनें पांडव व तूं त्यांना समानच आहांत. त्यामुळें पांडव सोडून तुझ्यावर अधिक प्रेम करण्याचें त्यांना कोणतेंही कारण नाहीं. धर्म व कर्तव्य या दृष्टीनें विचार केला तर कोणाचेंही प्रेम पांडवांच्याच पक्षावर बसावें इतके ते धार्मिक व न्यायप्रेमी असून त्यांची मागणी अत्यंत न्याय्य आहे. त्यामुळें यांच्या मनाचें पारडें झुकावयाचेंच तर तें तुझ्याऐवजीं पांडवांच्याचकडे झुकेल. केवळ अन्न खाल्लें आहे म्हणून जर त्यांना तुझ्याकडूनच जीवित समर्पावयाचें असेल तर हे राजा, युद्धांत युधिष्ठिराच्या डोळ्याशीं डोळा तरी भिडवावयाचें सामर्थ्य यांच्या ठिकाणीं उरेल काय? आजपर्यंत लोभाच्या स्वाधीन

होऊन कोणीही राज्यविस्तार करूं शकला नाहीं. हित व्हावें अशी इच्छा असेल तर लोभ आवर व मन स्वाधीन ठेव, असें माझें तुला सांगणें आहे."

गांधारीनें या ठिकाणीं जें विवेचन केलें आहे तें राजधर्माचें विवेचन व कौटिल्यासारख्या श्रेष्ठ राज्यशास्त्रज्ञानें आपल्या राज्यशास्त्रावरील ग्रंथांतून केलेलें विवेचन यांत कांहींही भिन्नता आढळावयाची नाहीं. तिच्या या सखोल प्रतिपादनावरून तिची सूक्ष्म प्रज्ञा स्पष्ट होते. कर्तव्याकर्तव्याच्या प्रश्नांत नेहमींच तिनें आपलें मत निःसंकोच निर्भीडपणें मांडलें आहे. आदर्श सचिवसत्तेचा प्रतिनिधि विदुर जितक्या स्पष्टपणें आपलें मत मांडील इतक्याच स्पष्ट व निर्भीडपणें गांधारीनें राजा धृतराष्ट्राच्या तोंडावर भर राजसभेंत स्वतःचें मत मांडावयास अथवा प्रत्यक्ष राजा धृतराष्ट्राच्या तोंडावर त्याच्या सभासदांसमोर त्याची खरडपट्टी काढावयास मुळींच कमी केलेलें नाहीं. तूं दुर्योधनाला समजावून सांग असें धृतराष्ट्र गांधारीला म्हणत असतां त्याला उत्तर देतांना ती म्हणतेः—

**आनायय सुतं क्षिप्रं राज्यकामुकमातुरम् ।**
**न हि राज्यमशिष्टेन शक्यं धर्मार्थलोपिना ।। १०**
**आप्तुमाप्तं तथापीदमविनीतेन सर्वथा ।**
**त्वं ह्येवात्र भृशं गर्ह्यो धृतराष्ट्र सुतप्रियः ।। ११**
**यो जानन् पापतामस्य तत्प्रज्ञामनुवर्तसे ।**
**स एष काममन्युभ्यां प्रलब्धो लोभमास्थितः ।। १२**
**अशक्योऽद्य त्वया राजन्विनिवर्तयितुं बलात् ।**
**राष्ट्रप्रदाने मूढस्य बालिशस्य दुरात्मनः ।। १३**
**दुःसहायस्य लुब्धस्य धृतराष्ट्रोऽश्नुते फलम् ।**
**कथं हि स्वजने भेदमुपेक्षेत महीपतिः ।**
**भिन्नं हि स्वजनेन त्वां प्रहसिष्यन्ति शत्रवः ।। १४**
**या हि शक्या महाराज साम्ना भेदेन वा पुनः ।**
**निस्तर्तुमापदः स्वेषु दण्डं कस्तत्र पातयेत् ।। १५**

**—महाभारत, उदयोगपर्व अध्याय १२९**

“ हे राजा राज्यकामुक व मूर्ख अशा अस्थिरबुद्धि तुझ्या पुत्राला त्वरित सभेंत बोलावून घे. धर्म व राज्यशास्त्र यांच्या नियमांचा भंग करणाऱ्या व मुळींच सभ्यता नसलेल्या व्यक्तीला राज्य संभाळतां येणें कधींच शक्य नाहीं. उद्धट मनुष्य कधीं राज्यपालन करूं शकतो काय ? अविनयी मनुष्य राज्यसंपादन करूं शकत नाहीं. या बाबतींत खरोखरी कोणाला दोष देऊन त्याची गर्हणा करावयाची असेल तर, हे राजा धृतराष्ट्रा, ती तुझीच केली पाहिजे. दुर्योधन पापी व दुरात्मा आहे हें माहीत असतांना देखील केवळ पुत्रप्रेमानें प्रेरित होऊन तूं त्याच्या लहरीनुसार वागलास व वागतोस त्याचें हें फळ आहे. तो लहर व क्रोध यांनीं शहाणपणापासून वंचित केलेला असून अत्यंत लोभी आहे. मूर्ख, बालिश व दुरात्म्या दुर्योधनाला तूं सामर्थ्याच्या भरंशावर आतां वळवूं शकणार नाहींस. लोभ व दुष्टांचा भंरवसा याचें फल धृतराष्ट्र भोगतो आहे. आपल्याच लोकांत पडणाऱ्या फुटीची कोणता शहाणा मनुष्य उपेक्षा करील ? सारे स्वजन फुटून तुला सोडून गेल्यावर तूं शत्रूंच्या दृष्टीनें उपहासास्पद ठरल्यावांचून राहशील काय ? हे महाराज, आपल्याच लोकांकडून लोकांवर कोसळणारी जी आपत्ति सामानें व भेदानें टाळतां येण्यासारखी आहे तिच्या संबंधांत दंडाचा वापर कोणता शहाणा मनुष्य करील ? ”

धर्म व कर्तव्यनिष्ठा हा गांधारीचा स्थायीभाव होता. म्हणूनच पुत्रमोह बाजूस सारून तिनें पांडवांचें अभीष्ट चिंतन केलें. पण जे धर्माचे आधारस्तंभ त्या पांडवांनीं आपल्या पुत्रांना अधर्मानें मारलें ही गोष्ट कळतांच ती अेकाद्या वाघिणीप्रमाणें चवताळून उठली. ती व्यासांना म्हणते:--

दुर्योधनापराधेन शकुनेः सौबलस्य च ।
कर्णदुःशासनाभ्यां च कृतोऽयं कुरुसंक्षयः ॥ १८
किं तु कर्माकरोद् भीमो वासुदेवस्य पश्यतः ।
दुर्योधनं समाहूय गदायुद्धे महामनाः ॥ १९
शिक्षयाभ्यधिकं ज्ञात्वा चरन्तं बहुधा रणे ।
अधो नाभ्याः प्रहृतवांस्तन्मे कोपमवर्धयत ॥ २०

**कथं नु धर्मं धर्मज्ञैः समुद्दिष्टं महात्मभिः ।**
**त्यजेयुराहवे शूराः प्राणहेतोः कथञ्चन ।। २१**

—महाभारत, स्त्रीपर्व अध्याय १४

**न तस्यैष वधस्तात यत्प्रशंससि मे सुतम् ।**
**कृतवांश्चापि तत्सर्वं यदिदं भाषसे मयि ।। १२**
**हताश्वे नकुले यत्तु वृषसेनेन भारत ।**
**अपिबः शोणितं संख्ये दुःशासनशरीरजम् । १३**
**सद्भिर्विगर्हितं घोरमनार्यजनसेवितम् ।**
**क्रूरं कर्माकृथास्तस्मात्तदयुक्तं वृकोदर ।। १४**

—महाभारत, स्त्रीपर्व अध्याय १५

"दुर्योधनाच्या अपराधानें व शकुनि, कर्ण आणि दुःशासन यांच्याचमुळें कौरवांचा विनाश झाला आहे याची मला पूर्ण कल्पना आहे. पण महाराज, अधर्माची मला मनापासून चीड आहे. या भीमानें दुर्योधनाला गदायुद्धांत आव्हान देऊन तो रणांत आपल्यापेक्षां अधिक कुशल आहे हें पाहतांच त्याच्या नाभिमात्राच्याखालीं प्रहार करण्याचा जो अधर्म केला त्यामुळें माझा राग वाढला. श्रीकृष्ण पहात असतां भीमानें हा अधर्म केला. जे स्वतः धर्मज्ञ व महानुभाव लोक आहेत ते प्राणासाठीं धर्माचा परित्याग कधींही करीत नसतात". घाबरलेला भीमसेन गांधारीची ही दरडावणी ऐकून दुर्योधन आपल्यापेक्षां गदायुद्धांत अधिक कुशल योद्धा कसा होता हें सांगू लागतांच गांधारी त्याला म्हणाली, " तूं ज्या अर्थी माझ्या पुत्राची प्रशंसा करतोस त्या अर्थी त्याचा वध झालाच नाहीं असें मी समजतें. पण कायरे, वृषसेनानें नकुलाचा पराजय करून त्याचे घोडे मारून टाकल्यावर तूं दुःशासनाच्या शरीरांतील रक्त प्यालास काय? सज्जनांनीं निंदा केलेलें, घोर व केवळ अनार्यांनींच ज्याचें आचरण करावें असें कर्म करावयास तूं कसा धजलास? तूं अत्यंत अनुचित गोष्ट केलीस !" यावर भीमसेन 'मी दुःशासनाचें रक्त मुळींच प्यालों नाहीं' असें सांगून दुर्योधनाच्या बाबतींत मी जो काय धर्म वा अधर्म केला असेल त्यासंबंधीं तूं मला क्षमा कर असें म्हणूं लागला त्या वेळींच तिचा कोप कांहींसा शांत झाला.

सभापर्वांत द्रौपदीची विटंबनेपासून शेवटीं सुटका करावयास गांधारीच कारणीभूत झाली असें वर्णन आहे.

**ततो गान्धारी विदुरश्चापि विद्वांस्तमुत्पातं घोरमालक्ष्य राज्ञे ।**
**निवेदयामासतुरार्तवत्तदा । ततो राजा वाक्यमिदं बभाषे ।। २४**

—महाभारत, सभापर्व अध्याय ७१

नंतर विदुर व गांधारी घोर उत्पात पाहून राजा धृतराष्ट्राला आर्तपणानें त्याविषयीं सचेत करूं लागलीं. नंतर राजा द्यूत थांबविण्याच्या उद्देशानें बोलला. या ठिकाणीं विदुराचें नांव जरी आलें असलें तरी द्रौपद्रीची विटंबना खरी गांधारीमुळेंच थांबलेली आहे. विदुर तिच्याबरोबर वा तिचे प्रेरक होते इतकेंच. गांधारी सभेंत येईपर्यंत विदुरांनीं अनेकवार धृतराष्ट्रांना सचेत करून वळविण्यासाठीं प्रयत्न केले, पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. गांधारीचा मात्र उपयोग झाला. यामुळें गांधारीनेंच द्रौपदीची विटंबना थांबविली असें म्हटलें पाहिजे. आपल्या पुत्रांनीं द्रौपदीला भरसभेंत ओढीत आणून अखिल स्त्रीजातीचा जो अपमान केला व साऱ्या कुळाला जो कलंक लावला त्याचें गांधारीला इतकें दुःख झालें कीं कर्तव्याग्नींत वात्सल्य जाळून टाकून दुर्योधनाचा परित्याग वा विनाश करावा असें तिनें धृतराष्ट्राला स्पष्ट शब्दांत सुचविलें आहे. महाभारतकार म्हणतात :—

**अथाब्रवीन्महाराज धृतराष्ट्रं जनेश्वरम् ।**
**पुत्रहार्दाद्धर्मयुक्ता गान्धारी शोककर्षिता ।। १**
**जाते दुर्योधने क्षत्ता महामतिरभाषत ।**
**नीयतां परलोकाय साध्वयं कुलपांसनः ।। २**
**व्यनदज्जातमात्रो हि गोमायुरिव भारत ।**
**अन्तो नूनं कुलस्यास्य कुरवस्तन्निबोधत ।। ३**
**मा निमज्जीः स्वदोषेण महाप्सु त्वं हि भारत ।**
**मा बालानामशिष्टानामभिमंस्था मतिं प्रभो ।। ४**
**मा कुलस्य क्षये घोरे कारणं त्वं भविष्यसि ।**
**बद्धं सेतुं को नु भिन्द्याद्धमेच्छान्तं च पावकम् ।। ५**

**शमे स्थितान्को नु पार्थान्कोपयेद् भरतर्षभ ।**
**स्मरन्तं त्वामाजमीढं स्मारयिष्यम्यहं पुनः ।। ६**
**शास्त्रं च शास्ति दुर्बुद्धि श्रेयसे चेतराय च ।**
**न वै वृद्धो बालमतिर्भवेद्राजन् कथंचन ।। ७**
**त्वन्नेत्राः सन्तु ते पुत्रा मा त्वां दीर्णाः प्रहासिषुः ।**
**तस्मादयं मद्वचनात्त्यज्यतां कुलपांसनः ।। ८**
**तथा तेन कृतं राजन्पुत्रस्नेहान्नराधिप ।**
**तस्य प्राप्तं फलं विद्धि कुलान्तकरणाय यत् ।। ९**
**शमेन धमण नयेन युक्ता या ते बुद्धिः सास्तु मे मा प्रमादीः ।**
**प्रध्वंसिनी क्रूरसमाहिता श्रीर्मृदुप्रौढा गच्छति पुत्रपौत्रान् ।। १०**
**—महाभारत, सभापर्व अ. ७५**

नंतर जनेश्वर धृतराष्ट्राला शोककर्षित गांधारी म्हणाली, हा दुर्योधन ज्यावेळीं जन्माला आला त्याचवेळीं महाबुद्धिमान् विदुरानें असें सांगितलें होतें कीं, हा कुलांगार असून याला ताबडतोब ठार मारून टाकणेंच हिताचें ठरेल. जन्मल्याबरोबर हा कोल्ह्याप्रमाणें ओरडला त्यावरूनच हा या कुलाचा अंत करणार आहे हें स्पष्ट झालें. हे महाराज धृतराष्ट्रा, स्वतःच्या दोषामुळें मोठ्या आपत्तींत तूं बुडूं नकोस. मूर्ख व असभ्य मुलांच्या लहरीनुसार तूं वागूं नकोस. आपल्या कुलाच्या भयानक विनाशाला धृतराष्ट्र कारणीभूत झाला असें भावी पिढ्या म्हणतील असें कर्म तूं करूं नकोस. कोण असा वेडा आहे कीं, जो बांधलेल्या सेतूला फोडून टाकून पुरांत बुडण्याची अथवा शांत असलेल्या अग्नीला प्रज्वलित करून त्यांत स्वतःच दग्ध होणाची सिद्धता करील? शांततेनें वागावयाला सिद्ध असणाऱ्या पांडवांना कोण अकारण कोप आणण्याचा प्रयत्न करील ? दुर्बुद्ध मनुष्याला शास्त्र कांहीं करूं शकत नाहीं. तुझ्यासारख्या वृद्धानें मूर्खाच्या लहरीनुसार वागावें हें सर्वथा अनिष्ट आहे. जर तुझ्या सर्व मुलांनीं तुझ्या मार्गदर्शनानें जगावें व नाश पावून तुला दुःखांत लोटूं नये असें तुला वाटत असेल तर माझ्यासाठीं तरी या कुलांगार दुर्योधनाचा परित्याग कर. पुत्रस्नेहामुळें तूं जें कुकर्म केलेंस त्याचें

कुलाचा अंत हें फळ लौकरच प्राप्त होईल. शम, धर्म व नीति यांनीं युक्त अशीच तुझी बुद्धि असावी. तिनें प्रमादाच्या आधीन होऊं नये. लहान सहान गोष्टींपासून कोर्यानें संपत्ति हरण करण्याची विनाशकारक बुद्धि एकदां स्वीकारली कीं ती आपल्यापेक्षां खालच्या पिढींतही पसरून सर्वांचाच विनाश ओढवून आणल्यावांचून रहात नाहीं. महर्षि व्यासांनीं गांधारीचें वर्णन करतांना

**पतिव्रता महाभागा समानव्रतचारिणी ।**
**उग्रेण तपसा युक्ता सततं सत्यवादिनी ।। २**

**—महाभारत स्त्रीपर्व अ. १६**

पतिव्रता, महानुभाव, व्रताचरण करणारी अत्यंत उग्र तपानें युक्त, व सतत सत्यवादिनी असें म्हटलें आहे. अंतःकरणाचें तिचें औदार्य विलक्षण होतें. ज्यावेळीं रणांगणावर द्रौपदी पुत्रशोकानें विलाप करूं लागली त्या वेळीं तिचें सांत्वन करावयास स्वतः गांधारीनेंच पुढें होऊन आपल्या हृदयाचें औदार्य प्रकट केलें आहे. ती द्रौपदीला म्हणते,

**तामुवाचाथ गान्धारी सह वध्वा यशस्विनीम् ।। ४०**
**मैवं पुत्रीति शोकार्ता पश्य मामपि दुःखिताम् । ४१**

**—महाभारत, स्त्रीपर्व अ. १५**

गांधारी आपल्या सुनांसह द्रौपदीला म्हणूं लागली, 'हे मुली इतका शोक करूं नकोस, माझ्याकडे पहा. माझीं शंभर मुलें मेलीं आहेत. हें जगांत चालावयाचेंच.'

यानंतर गांधारीचें उर्वरित सारें आयुष्य आपल्या पुत्रशोकानें पीडित व अंध पतीच्या सेवाशुश्रूषेंत गेलें. महानुभाव युधिष्ठिर मातेप्रमाणें तिचीही काळजी घेत असे; व स्वतः कुंतीच तिची सेवा करीत असल्यामुळें आपोआपच सर्व पांडवस्त्रिया विनयानें तिच्या सेवाशुश्रूषेंत असत. धृतराष्ट्राच्या दुष्टाव्यामुळें त्याच्याविषयीं अंतःकरणांत अपार क्रोध साठलेला भीमसेन अप्रत्यक्ष रीत्या वाग्बाणांनीं त्याला दुःखी करीत असे. ते गांधारीच्याही कानावर आदळत. पण त्या महामनस्क स्त्रीनें कालाचा महिमा पूर्णपणें

ओळखून त्या गोष्टीकडे दुर्लक्ष केलें. छायेप्रमाणें ती धृतराष्ट्राबरोबर अरण्यांत गेली व कडकडीत तपाचरणांत आपला देह शुष्क करून धृतराष्ट्राबरोबर तिनें आपला देहही वनांतील वणव्याच्या अग्नींत समर्पण केला.

तात्पर्य भीष्म, विदुर व गांधारी यांच्या रूपानें विशुद्ध सचिवसत्तेचें महाभारतांत महर्षींनीं चित्र रेखाटलें आहे. पण ही सचिवसत्ता राजसत्तेवर नियंत्रण घालूं न शकण्याइतकी दुबळी आहे. राजसत्ता स्वतःच दुष्ट असून शिवाय दुष्ट सचिवसत्तेला तिनें जवळ केलें आहे. महाभारतकाळीं याप्रमाणें ब्रह्म व क्षत्र या दोहोंचाही पूर्णपणें अधःपात होण्याची वेळ आली होती. ब्रह्म हें समाजाचें नेतृत्व असलें तर क्षत्र हें सामर्थ्य होतें. समाजांत धर्म टिकावयास या दोहोंच्या विशुद्धतेची परम आवश्यकता होती. त्यासाठीं येथील अधार्मिक राजसत्ता पार मोडून व विखंडून टाकून त्या जागीं नवी धर्मसत्ता स्थापन करणें परम आवश्यक होतें. पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांनीं हें कार्य केलें. त्यांच्या विजयाचा व या कार्याचा इतिहास हाच महाभारताचा इतिहास होय. हें कार्य ज्या साधनांनीं भगवान् श्रीष्णांनीं केलें तें साधन म्हणजे पांडव होत. श्रीकृष्णांनीं आपण होऊनच हें साधन हातीं धरलेलें आहे. द्रौपदीच्या स्वयंवरांत पांडव प्रकट होईपर्यंत भगवान् श्रीकृष्णांचा व त्यांचा कांहींही संबंध आलेला नव्हता. त्यानंतर स्वतः होऊन पांडवांची भेट घेऊन त्यांच्या असहाय स्थितींत त्यांनीं पांडवांच्या पाठीशीं उभे राहून त्यांना साहाय्य केलें आहे. भ्रष्ट राजसत्तेचा विध्वंस करून जगतांत धर्माची प्रतिष्ठापना करण्यासाठीं पांडव हेच श्रीकृष्णांना महत्त्वाचें साधन कां वाटले असतील हें स्पष्ट होणें आवश्यक आहे.

## पाण्डवांचें वैशिष्टय

पांडव हें एक प्रकारचें संघटित नेतृत्व आहे. सर्व पांडव राजा युधिष्ठिराच्या नियंत्रणाखालीं असून त्यांच्यांत फूट पडणें केवळ अशक्य होतें हें महाभारत वरवर वाचणाऱ्याच्याही स्पष्टपणें

ध्यानांत येतें. भीम व अर्जुन यांच्यासारख्या सामर्थ्यशील व्यक्तीही अत्यंत आपत्तीच्या प्रसंगीं देखील युधिष्ठिराचें नेतृत्व निर्विवादपणें मान्य करतात. द्यूत चालू असतां या गोष्टीचा स्पष्टपणें प्रत्यय आलेला आहे. द्रौपदीची विटंबना होत असतांना व केवळ युधिष्ठिराच्या द्यूतप्रियतेनें, अंगीं सामर्थ्य असूनही, दुर्योधनाचा दास होण्याचा प्रसंग आला असतां, इतकेंच नव्हे तर क्षणोक्षणीं उठून दुर्योधनाच्या नरडीचा घोट घ्यावा अशी वृत्ति अत्यंत जोरानें मनांत उफाळत असतांना देखील, ज्यावेळीं युधिष्ठिर आमचा धनी नाहीं असें भीमार्जुनांनीं म्हटल्यास त्यांना मी आपल्या दास्यांतून मुक्त करावयास सिद्ध आहें असें दुर्योधनानें म्हटलें तेव्हां भीमासारखा महापराक्रमी क्रोधन देखील त्याला उत्तर देतांना असें म्हणतो कीं :–

यद्येष गुरुरस्माकं धर्मराजो महामनाः ।
न प्रभुः स्यात्कुलस्यास्य न वयं मर्षयेमहि ।। १२
ईशो नः पुण्यतपसां प्राणानामपि चेश्वरः ।
मन्यतेऽजितमात्मानं यद्येष विजिता वयम् ।। १३
न हि मुच्येत मे जीवन्पदा भूमिमुपस्पृशन् ।
मर्त्यधर्मा परामृश्य पाञ्चाल्या मूर्धजानिमान ।।१४
पश्यध्वं ह्यायतौ वृत्तौ भुजौ मे परिघाविव ।
नैतयोरन्तरं प्राप्य मुच्येतापि शतक्रतुः ।। १५
धर्मपाशसितस्त्वेवं नाधिगच्छामि संकटम् ।
गौरवेण विरुद्धश्च निग्रहादर्जुनस्य च ।। १६
धर्मराजनिसृष्टस्तु सिंहः क्षुद्रमृगानिव ।
धार्तराष्ट्रानिमान्पापान्निष्पिषेयं तलासिभिः ।। १७

—महाभारत, सभापर्व अध्याय ७०

"जर हा महानुभाव धर्मराज आमचा गुरू व आमच्या कुलाचा प्रभु नसता तर आम्ही हे चाललेले प्रकार कधींही सहन केले नसते. हा युधिष्ठिर आमच्या पुण्याचा, तपाचा व प्राणांचाही ईश्वर आहे. तो जर स्वतःला जित समजतो तर आम्हीही जिंकलों गेलों व दास झालों हें उघडच आहे. कोणताही जमिनीवर उभे राहूं शकणारा

मरणधर्मी मनुष्य मी जिवंत असतां द्रौपदीच्या केसाला हात लावून कधींही जिवंत राहूं शकला नसता. माझे हे परिघाप्रमाणें विस्तीर्ण व समर्थ भुज पहा. या बाहूंच्या एकदां तावडींत सांपडल्यावर देवेंद्राची देखील सुटका होण्यासारखी नाहीं. धर्मपाशांत सांपडल्यामुळें युधिष्ठिराच्या गौरवानें नियंत्रित झाल्यामुळें व अर्जुनाच्या निग्रहामुळें मला हें संकट सोसणें क्रमप्राप्त आहे. धर्मराजानें जर आज्ञा दिली तर सिंह क्षुद्र मृगांचा वध करतो त्याचप्रमाणें मी या धार्तराष्ट्रांना केव्हांच ठार मारलें असतें. या क्षुद्रांना मारावयास शस्त्रें तरी कशाला हवींत? नुसतें तळहाताच्या आघातानें देखील मी यांना ठार मारूं शकेन."

भीमासारख्याची जर ही अवस्था तर बाकीचे पांडव युधिष्ठिराच्या नियंत्रणांत होते हें वेगळें सांगावयास नकोच. या संघटित नेतृत्वाचा नेता जो युधिष्ठिर त्याच्या असामान्य धर्मसत्तेच्या प्रेमामुळेंच भगवान् श्रीकृष्णांचें लक्ष त्याच्याकडे वेधलें आहे. भगवान् श्रीकृष्ण हे यादवांच्या गणराज्याचे घटक होते. कंसानें आपल्या पराक्रमी उन्मादानें या गणराज्याचें स्वरूप पार विध्वंसित करून स्वतःची एकतंत्री सत्ता स्थापन केली व गणराज्य मोडून टाकलें. मगध साम्राज्याच्या प्रबल सामर्थ्याचा पाठिंबा मिळाल्याकारणानेंच कंसाला ही गोष्ट करतां आली. आपल्या पराक्रमानें सर्व भारतीय राजसत्तांना अंकित करून घेणारा महापराक्रमी व पशुपतीच्या यज्ञांत शंभर राजमस्तकांचेंच हवन करूं इच्छिणारा क्रूरकर्मा जरासंध हा कंसाचा सासरा होता. त्याच्या अस्ति व प्राप्ति या दोन्ही मुली कंसाला देण्यांत आल्या होत्या. मगध सम्राटाच्या सामर्थ्याच्या बळावर यादव गणराज्याचा पाया खणून काढून कंसानें तेथें आपली एकतंत्री सत्ता उत्पन्न केली. या सत्तेला विरोध करावयास जे जे लोक पुढें आले त्या त्या लोकांना त्यानें नाना प्रकारें छळावयास प्रारंभ केला. प्रत्यक्ष स्वतःचा पिता जो उग्रसेन त्यालाच त्यानें बंदीत टाकावयास कमी केलें नाहीं. स्वकीय यादवांचा छळ होऊं लागला व परकीय मगधांचें वर्चस्व तेथें वाढूं लागलें. आपलें निष्कलंक गणराज्य पुनश्च उद्धृत करून त्याचें

झालेलें विडंबन नष्ट करावें या इच्छेनें दुसरा कोणताच उपाय न उरल्यामुळें भगवान् श्रीकृष्णांनीं कंसाला ठार मारलें व यादवांच्या विशुद्ध गणसत्तेचें पुनरुज्जीवन केलें खरें; पण त्यामुळें मगधांच्या साम्राज्यसत्तेशीं श्रीकृष्णांचें वैर उत्पन्न झालें. भारतांतील सर्व राजसंघ जरासंधाच्या नेतृत्वाखालीं एकवटला होता. या जुन्या साम्राज्यसंस्थेला नष्ट करून नवें धर्मसाम्राज्य पांडवांना हाताशीं धरून प्रस्थापित करतां येईल म्हणून श्रीकृष्णांनीं धर्मसंस्थापनेचें साधनयंत्र या नात्यानें त्यांना हाताशीं धरलें. त्यांच्यांत कांहींच दोष नव्हते असें नाहीं. पण संघटित नेतृत्वामुळें त्यांचे वैयक्तिक गुणदोष तर लोपलेच होते, पण जें कांहीं उर्वरित होतें तें आपल्या सामर्थ्यामुळें नष्ट करतां येणें श्रीकृष्णांना शक्य होतें. तात्पर्य, भगवान् श्रीकृष्णांच्या धर्मसंस्थापनेच्या कार्यांतील पांडव एक अत्यंत महत्त्वाचें साधन—यंत्र आहेत. त्यांचें स्वरूप काय होतें तें ज्येष्ठ पांडव युधिष्ठिराच्या व्यक्तिचित्रापासूनच आपण पाहूं.

---

# २१. धर्मराज युधिष्ठिर

पांडवांचा विचार करावयाचा म्हणजे प्रथम युधिष्ठिराचाच विचार करावयास पाहिजे. युधिष्ठिराच्या विषयीं अनेक प्रकारचे अपसमज प्रचलित आहेत. युधिष्ठिर हे अहिंसक होते हा त्यांपैकींच एक अपसमज होय. ते नुसते अहिंसकच नव्हे तर पराक्रमशून्य होते असेंही समजलें जातें. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. महापराक्रमी शल्याला युधिष्ठिरांनीं द्वंद्वयुद्धांत ठार मारलें आहे ही गोष्ट ध्यानांत घेतली असतां ते पराक्रमशून्य होते असें म्हणतां येत नाहीं. त्यांचा वर्ण केतकीसारखा गौर असून नेत्र दीर्घ व नाक किंचित् मोठें असल्याचें महाभारतांत वर्णन आहे. त्यांचे डोळे आरक्त असून शरीर किंचित् कृश असे. महाभारतांत युधिष्ठिराचें स्वरूपवर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे:—

**य एष जाम्बूनदशुद्धगौरस्तनुर्महासिंह इव प्रवृद्धः ।**
**प्रचण्डघोणः पृथुदीर्घनेत्रस्ताम्रायताक्षः कुरुराज एषः ।। ५**

—महाभारत, आश्रमवासिकपर्व अध्याय २५

युधिष्ठिरांची योग्यता त्यांच्या शत्रूंना देखील मान्य असल्याचें महाभारतांतील शकुनि व कर्ण इत्यादि लोकांच्या प्रासंगिक उद्‌गारांवरून स्पष्ट होतें. भीष्मांनीं युधिष्ठिराचें शांतिपर्वांत जें वर्णन केलें आहे तें त्यांची महत्ता व्यक्त करावयास पुरेसें आहे. ज्या वेळीं युधिष्ठिर भगवान् श्रीकृष्णांच्या इच्छेनुसार शरपंजरीं पडलेल्या भीष्मांना धर्म व अधर्म यांचें स्वरूप विचारावयास गेले त्यावेळीं त्यांचें वर्णन करीत असतांना भीष्म श्रीकृष्णांजवळ म्हणतात :—

**यस्मिन् राजर्षभे जाते धर्मात्मनि महात्मनि ।**
**अहृष्यन् ऋषयः सर्वे स मां पृच्छतु पाण्डवः ।। ३**
**सर्वेषां दीप्तयशसां कुरूणां धर्मचारिणाम् ।**
**यस्य नास्ति समः कश्चित् स मां पृच्छतु पाण्डवः ।। ४**

---

व्याख्यान २१ वें, दि. १८ एप्रिल १९५१

धृतिर्दमो ब्रह्मचर्यं क्षमा धर्मश्च नित्यदा ।
यस्मिन्नोजश्च तेजश्च स मां पृच्छतु पाण्डवः ।। ५
सम्बन्धीनतिथीन्भृत्यान् संश्रितांश्चैव यो भृशम् ।
संमानयति सत्कृत्य स मां पृच्छतु पाण्डवः ।। ६
सत्यं दानं तपः शौर्यं शान्तिर्दाक्ष्यमसंभ्रमः ।
यस्मिन्नेतानि सर्वाणि स मां पृच्छतु पाण्डवः ।। ७
यो न कामान्न संरम्भान्न भयान्नार्थकारणात् ।
कुर्यादधर्मं धर्मात्मा स मां पृच्छतु पाण्डवः ।। ८
सत्यनित्यः क्षमानित्यो ज्ञाननित्योऽतिथिप्रियः ।
यो ददाति सतां नित्यं स मां पृच्छतु पाण्डवः ।। ९
इज्याध्ययननित्यश्च धर्मे च निरतः सदा ।
क्षान्तः श्रुतरहस्यश्च स मां पृच्छतु पाण्डवः ।। १०

—महाभारत, शांतिपर्व अध्याय ५५

"जो महाभाग धर्मात्मा व राजश्रेष्ठ जन्मल्याबरोबरच सर्व ऋषींना अत्यंत आनंद झाला, त्या पांडवानें मला विचारावें. तळपत्या यशाच्या व सर्व धर्माचरण करणाऱ्या कौरवांत ज्याच्या योग्यतेचा कोणीही नाहीं, धैर्य, इंद्रियदमन, ब्रह्मचर्य, क्षमा, धर्म, ओज व तेज हे ज्याचे नित्य गुण आहेत व आपले संबंधी, अतिथि, भृत्य व आश्रित यांचा जो सत्कारपूर्वक सन्मान करतो; सत्य, दान, तपश्चर्या, शौर्य, शांति, दक्षता, मनाचा मुळींच गोंधळ होऊं न देणें, या सर्वच गोष्टी ज्याच्यांत स्वभावतःच आहेत, काम, मनाचा गोंधळ, भय, वा लाभालाभाची कल्पना यांपैकीं कोणत्याही कारणास्तव जो कधींही अधर्म करणें शक्य नाहीं; सज्जनांना ज्याच्या जवळून कधींही विन्मुख जावें लागत नाहीं; यज्ञ, अध्ययन हा ज्याचा नित्य स्वभाव आहे; धर्मावर ज्याचें आत्यंतिक प्रेम आहे व वेदांचें रहस्य ज्याला पूर्णपणें माहीत आहे त्या पांडवानें मला विचारावें."

भीष्मांनीं केलेल्या या वर्णनावरून युधिष्ठिरांची योग्यता चांगलीच प्रकट होते.

## आदर्श राजा

राजा या नात्यानें युधिष्ठिर हे अत्यंत आदर्श होते. जी राज्यसंस्था भगवान् श्रीकृष्ण उत्पन्न करूं इच्छीत होते, ती प्रत्यक्ष अस्तित्वांत आणण्यांत व्यक्तीच्या अंगीं जे महान् गुण असणें आवश्यक होते ते सर्व गुण युधिष्ठिरांच्या ठिकाणीं स्वभावतःच होते. आपलें शिक्षण संपल्यानंतर लाक्षागृह प्रकरणाच्या पूर्वी थोडाच वेळ युधिष्ठिरांनीं कौरवांचें जें यौवराज्य केलें तेवढ्याच काळांत त्यांनीं हे आपले गुण प्रकट केले आहेत. महाभारतकार म्हणतात—

**ततः संवत्सरस्यान्ते यौवराज्याय पार्थिव ।**
**स्थापितो धृतराष्ट्रेण पाण्डुपुत्रो युधिष्ठिरः ॥ १**
**धृतिस्थैर्यसहिष्णुत्वादानृशंस्यात्तथार्जवात् ।**
**भृत्यानामनुकम्पार्थं तथैव स्थिरसौहृदात् ॥ २**
**ततोऽदीर्घेण कालेन कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।**
**पितुरन्तर्दधे कीर्तिं शीलवृत्तसमाधिभिः ॥ ३**

**—महाभारत, आदिपर्व अध्याय १३९**

नंतर वर्षाच्या शेवटीं धृतराष्ट्रानें पांडुपुत्र युधिष्ठिराची यौवराज्यावर स्थापना केली. धैर्य, स्थिरता, सहिष्णुता, दयामय अंतःकरण, विनय, हाताखालच्या सर्व लोकांवर प्रेम करणें, एकदां केलेलें सौहार्द सतत टिकविणें, शील, चारित्र्य, व अंतःकरणाची समता या सर्व उत्कृष्ट गुणांनीं युधिष्ठिरांनीं लवकरच आपल्या पित्याची कीर्ति झांकून टाकली. प्रजाजन युधिष्ठिरांच्या सद्गुणांवर, व उत्कृष्ट राज्यकारभारावर इतके प्रसन्न होते कीं लवकरच आंधळ्या धृतराष्ट्रांनीं नुसत्याच यौवराज्याऐवजीं सर्व राज्यभार युधिष्ठिरांवर सोंपवावा व युधिष्ठिरानें राज्याचीं सर्व सूत्रें हातीं घेऊन आपलें परिपालन करावें अशी इच्छा ते आपापसांतील चर्चेंत वारंवार व्यक्तवूं लागले. महाभारतकार म्हणतातः—

**गुणैः समुदितान्दृष्ट्वा पौराः पाण्डुसुतांस्तदा ।**
**कथयांचक्रिरे तेषां गुणान्संसत्सु भारत ॥ २३**

राज्यप्राप्तिं च संप्राप्तं ज्येष्ठं पाण्डुसुतं तदा ।
कथयन्ति स्म संभूय चत्वरेषु सभासु च ।। २४
प्रज्ञाचक्षुरचक्षुष्ट्वाद्धृतराष्ट्रो जनेश्वरः ।
राज्यं न प्राप्तवान्पूर्वं स कथं नृपतिर्भवेत् ।। २५
तथा शान्तनवो भीष्मः सत्यसंधो महाव्रतः ।
प्रत्याख्याय पुरा राज्यं न स जातु ग्रहीष्यति ।। २६
ते वयं पाण्डवज्येष्ठं तरुणं वृद्धशीलिनम् ।
अभ्यषिञ्चाम साध्वद्य सत्यकारुण्यवेदिनम् ।। २७
स हि भीष्मं शान्तनवं धृतराष्ट्रं च धर्मवित् ।
सपुत्रं विविधैर्भोगैर्योजयिष्यति पूजयन् ।। २८

—महाभारत आदिपर्व अध्याय १४१

"सर्व गुणांनीं युक्त अशा पांडवांना पाहून त्यांच्या गुणांचें संकीर्तन सर्व प्रजाजन आपापसांत व उघडपणें करीत असत. युधिष्ठिर युवराज झाल्यावर व संपूर्ण राज्यप्राप्तीची परिस्थिति त्यांच्या संबंधांत उत्पन्न झाल्यावर वेगवेगळ्या निमित्तांनीं भरणाऱ्या सभांतून, अथवा चव्हाटयाचव्हाटयावर सहज जमले असतांही लोक असें म्हणूं लागले कीं युधिष्ठिराला हें सर्व राज्य कां मिळूं नये? व युधिष्ठिरानें युवराज राहून धृतराष्ट्रानें राजा रहावें असें तरी कां? हा प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्र आंधळा असल्यामुळें पूर्वीं कधीं राजा नव्हताच; आतां तरी त्याला राजा कसें होतां येईल? तसेंच शांतनव भीष्म हे महाव्रत व सत्यसंध असल्यामुळें त्यांनीं आपला राज्यावरील अधिकार पूर्वींच सोडलेला आहे. तेव्हां ते तरी आतां राजे कसे होऊं शकतील? म्हणून एकाद्या प्रौढ आदर्श व्यक्तीप्रमाणें ज्याचें शील आहे, सत्य व कारुण्य यांची जो केवळ मूर्ति आहे, त्या तरुण ज्येष्ठ पांडव युधिष्ठिरालाच आपण राज्याभिषेक केला पाहिजे. युधिष्ठिर भीष्म व धृतराष्ट्र यांचा सन्मान राखून व त्यांच्या पुत्रांचें भलें केल्यावांचून रहाणार नाहीं." युधिष्ठिरावर थोडयाच वेळांत प्रजाजनांचें इतकें विलक्षण प्रेम बसलें होतें कीं, ज्यावेळीं वारणावतास युधिष्ठिराची पाठवणी चालली होती त्यावेळीं आपण होऊनच प्रजा धृतराष्ट्राला नानाप्रकारचीं दूषणें देऊन स्वतःही युधिष्ठिरा-

बरोबर वारणावतास जाण्याचा आपला निश्चय प्रकट करीत आहेत. प्रजाजन म्हणतात :—

तान्राज्यं पितृतः प्राप्तान्धृतराष्ट्रो न मृष्यते ।। ९
अधर्ममिदमत्यन्तं कथं भीष्मोऽनुमन्यते ।
विवास्यमाना न स्थाने नगरे योऽभिमन्यते ।। १०
पितेव हि नृपोस्माकमभूच्छान्तनवः पुरा ।
विचित्रवीर्यो राजर्षिः पाण्डुश्च कुरुनन्दनः ।। ११
स तस्मिन्पुरुषव्याघ्रे देवभावं गते सति ।
राजपुत्रानिमान्बालान्धृतराष्ट्रो न मृष्यते ।। १२
वयमेतदनिच्छन्तः सर्वं एव पुरोत्तमात् ।
गृहान्विहाय गच्छामो यत्र गन्ता युधिष्ठिरः ।। १३

—महाभारत, आदिपर्व अध्याय १४५

" पित्यापासून चालत आलेलें हें राज्य वस्तुतः पांडवांचेंच असतांना धृतराष्ट्र तें त्यांना सरळपणानें देऊं इच्छीत नाहीं ही केवढी वाईट गोष्ट आहे! या अधार्मिक गोष्टीला भीष्म तरी आपली संमति कशी देतात? पांडवांना नगराबाहेर काढून देण्याच्या या कारस्थानाला भीष्मांनीं संमति द्यावी ही केवढी आश्चर्याची गोष्ट आहे? पांडवांच्या पूर्वजांचे आपल्यावर मोठें उपकार आहेत. पित्याप्रमाणें शांतनुपुत्र विचित्रवीर्यानें आपलें परिपालन केलें. त्यानंतर पांडवांचे वडील महाराज पांडु यांनींही आपलें परिपालन तसेंच केलें. अशा स्थितींत पांडु देवाघरीं गेल्यानंतर त्यांच्या या असहाय मुलांचा धृतराष्ट्रांनीं असा हा छळवाद मांडावा ही गोष्ट अत्यंत अयोग्य आहे. आपल्याला जर ही गोष्ट मुळींच पटणारी नाहीं तर आपण तरी या अधार्मिक राज्यांत रहावयाचें कशाला? आपणही पांडवांबरोबर वारणावतांत कां जाऊं नये?"

द्रौपदीस्वयंवरानंतर पांडव प्रकट झाल्यानंतर पौरजनांनीं ते हस्तिनापुरांत आल्यानंतर त्यांचें असेंच मोठ्या उत्साहानें स्वागत केलें आहे. अगदीं धृतराष्ट्राच्या कानाला वेदना होतील अशा पद्धतीनें पौरजन उघड उघड म्हणूं लागले:—

अयं स पुरुषव्याघ्रः पुनरायाति धर्मवित् ।
यो नः स्वानिव दायादान्धर्मेण परिरक्षति ।। १७
अद्य पाण्डुर्महाराजो वनादिव जनप्रियः ।
आगतः प्रियमस्माकं चिकीर्षुर्नात्र संशयः ।। १८
किं नु नाद्य कृतं तात सर्वेषां नः परं प्रियम् ।
यन्नः कुन्तीसुता वीरा नगरं पुनरागताः ।। १९
यदि दत्तं यदि हुतं विद्यते यदि नस्तपः ।
तेन तिष्ठन्तु नगरे पाण्डवाः शरदां शतम् ।। २७

—महाभारत, आदिपर्व अध्याय २०७

"स्वतःच्या नातलगाप्रमाणेंच जो प्रजांचें परिपालन करीत असे, तो धर्मज्ञ पुरुषव्याघ्र युधिष्ठिर पुनश्च येत आहे. याला पाहून आम्हांला असें वाटतें कीं जणूं काय महाराज पांडूच पुनश्च वनांतून इथें येत आहेत. हा आमचें प्रिय करील यांत आम्हांला मुळींच संशय वाटत नाहीं. कुंतीपुत्र पुनश्च राजधानींत परत येत आहेत यापेक्षां आमचें दुसरें कांहीं प्रिय असूं शकेल काय ? आम्ही आजवर जें कांहीं दान केलें असेल, हवन केलें असेल अथवा तप केलें असेल तर त्याच्या पुण्यानें पांडव शंभर वर्षे या नगरींतच स्थिर होवोत."

भारतीय राज्ययंत्राचें स्वरूप विशद करीत असतां पूर्वींच असें सांगितलें आहे कीं, येथील राज्य ही भोगाची वस्तु नसून ती कर्तव्याची वस्तु होती. 'रंजनात् राजा' अशी गंमतीची उपपत्ति बसवून 'राजा प्रकृतिरंजनात्' अशी राजपदाची सर्वोत्कृष्ट व्याख्या भारतीय शास्त्रज्ञांनीं केली आहे. प्रजांचें पितामाता सर्व कांहीं राजा असतो. प्रजांच्या अंतःकरणांत आपल्याविषयीं विश्वास व प्रेम निर्माण होण्यासाठीं त्यांना हिताचें व त्यांच्या सुखाचें जें जें कांहीं असेल त्यासाठीं सतत झटत राहणें हें राजाचें परम कर्तव्य येथें मानलें गेलें आहे. त्यामुळें राजपद ही सुखाची गोष्ट नसून देवघरांतील नंदादीपाप्रमाणें प्रजानुरंजनाच्या उदात्त ध्येयासाठीं जीवन सतत तिळतिळ जाळणें हेंच राजा या व्यक्तीचें खरें कर्तव्य होय. पौरजानपदांचें नियंत्रण राजसत्ता मानी हें मी पूर्वींच दिग्दर्शित केलें आहे. येथील आदर्श राजपुरुषांनीं प्रजेसाठीं कोणत्या गोष्टींचा

परित्याग करावयाचा सोडला आहे ? श्रीरामचंद्रांनीं सीतामाईचा-देखील प्रजारंजनासाठीं त्याग केला. त्यामुळें ते प्रजाजनांच्या हृदयांतील प्रीतिरंजनाचें केंद्र असे महान् राजपुरुष झाले. युधिष्ठिर हे अशा महानुभावांपैकीं आहेत. म्हणूनच पुण्यश्लोकांत त्यांची गणना होते. मर्यादापुरुषोत्तम भगवान् श्रीरामचंद्र यांना जी अपूर्व प्रजाप्रियता लाभली ती राजा युधिष्ठिरांना लाभली होती. ज्याप्रमाणें भगवान् रामचंद्र अरण्यांत जात असतां सर्व प्रजा त्यांच्या पाठोपाठ अरण्यांत जावयास निघाल्या व रामावांचूनचें नगर त्यांना अरण्य व रामाबरोबरचें अरण्य म्हणजेच त्यांना नगर वाटूं लागलें, तीच गोष्ट युधिष्ठिराच्या वनगमनाचे वेळीं घडून आली आहे. तो करुण प्रसंग चित्रित करणारा महाभारतांतील उतारा थोडा लांबट असला तरी तो येथें मी उद्धृत करतों :—

गतानेतान्विदित्वा तु पौराः शोकाभिपीडिताः ।
गर्हयन्तोऽसकृद्भीष्मविदुरद्रोणगौतमान् ।। १२
ऊचुर्विगतसंत्रासाः समागम्य परस्परम् ।

पौरा ऊचुः ।

नेदमास्ति कुलं सर्वं न वयं न च नो गृहाः ।। १३
यत्र दुर्योधनः पापः सौबलेयेन पालितः ।
कर्णदुःशासनाभ्यां च राज्यमेतच्चिकीर्षति ।। १४
न तत्कुलं न चाचारो न धर्मोर्थः कुतः सुखम् ।
यत्र पापसहायोयं पापो राज्यं चिकीर्षति ।। १५
दुर्योधनो गुरुद्वेषी त्यक्ताचारसुहृज्जनः ।
अर्थलुब्धोभिमानी च नीचः प्रकृतिनिर्घृणः ।। १६
नयमस्ति मही कृत्स्ना यत्र दुर्योधनो नृपः ।
साधु गच्छामहे सर्वेयत्र गच्छन्ति पाण्डवाः ।। १७
सानुक्रोषा महात्मानो विजितेन्द्रियशत्रवः ।
ह्रीमन्तः कीर्तिमन्तश्च धर्माचारपरायणाः ।। १८

वैशंपायन उवाच ।

एवमुक्त्वानुजग्मुस्ते पांडवांस्तान्समेत्य च ।
ऊचुः प्राञ्जलयः सर्वे कौन्तेयान्माद्रिनन्दनान् ।। १९

क्व गमिष्यथ भद्रं वस्त्यक्त्वास्मान्दुःखभागिनः :
वयमप्यनुयास्यामो यत्र यूयं गमिष्यथ ।। २०
अधर्मेण जिताञ्छ्रुत्वा युष्मांस्त्यक्तघृणैः परैः ।
उद्विग्नाः स्मो भृशं सर्वे नास्मान्हातुमिहार्हथ ।। २१
भक्तानुरक्तान्सुहृदः सदा प्रियहितेरतान् ।
कुराजाधिष्ठिते राज्ये न विनश्येम सर्वशः ।। २२
श्रूयतां चाभिधास्यामो गुणदोषान्नरर्षभाः ।
शुभाशुभाधिवासेन संसर्गः कुरुते यथा ।। २३
वस्त्रमापस्तिलान्भूमिं गन्धो वासयते यथा ।
पुष्पाणामधिवासेन तथा संसर्गजा गुणाः ।। २४
मोहजालस्य योनिर्हि मूढैरेव समागमः ।
अहन्यहनि धर्मस्य योनिः साधुसमागमः ।। २५
तस्मात्प्राज्ञैश्च वृद्धैश्च सुस्वभावैस्तपस्विभिः ।
सद्भिश्च सह संसर्गः कार्यः शमपरायणैः ।। २६
येषां त्रीण्यवदातानि विद्या योनिश्च कर्म च ।
तान्सेवेत्तैः समास्याहि शास्त्रेभ्योपि गरीयसी ।। २७
निरारम्भा ह्यपि वयं पुण्यशीलेषु साधुषु ।
पुण्यमेवाप्नुयामेह पापं पापोपसेवनात् ।। २८
असतां दर्शनात्स्पर्शात्संजल्पाच्च सहासनात् ।
धर्माचाराः प्रहीयन्ते सिध्यन्ति च न मानवाः ।। २९
बुद्धिश्च हीयते पुंसां नीचैः सह समागमात् ।
मध्यमैर्मध्यतां याति श्रेष्ठतां याति चोत्तमैः ।। ३०
अनीचैर्नाप्यविषयैर्नाधर्मिष्टैर्विशेषताः ।
ये गुणाः कीर्तिता लोके धर्मकामार्थसंभवाः ।
लोकाचारेषु संभूता वेदोक्ताः शिष्टसंमताः ।। ३१
ते युष्मासु समस्ताश्च व्यस्ताश्चैवेह सद्गुणाः ।
इच्छामो गुणवन्मध्ये वस्तुं श्रेयोभिकांक्षिणः ।। ३२

युधिष्ठिर उवाच ।

धन्या वयं यदस्माकं स्नेहकारुण्ययन्त्रिताः ।
असतोपि गुणानाहुर्ब्राह्मणप्रमुखाः प्रजाः ।। ३३

तदहं भ्रातृसहितः सर्वान्विज्ञापयामि वः ।
नान्यथा तद्धि कर्तव्यमस्मत्स्नेहानुकम्पया ॥ ३४
भीष्मः पितामहो राजा विदुरो जननी च मे ।
सुहृज्जनश्च प्रायो मे नगरे नागसाह्वये ॥ ३५
ते त्वस्मद्धितकामार्थं पालनीयाः प्रयत्नतः ।
युष्माभिः सहिताः सर्वे शोकसंतापविह्वलाः ॥ ३६
निवर्तता गता दूरं समागमनशापिताः ।
स्वजने न्यासभूते मे कार्या स्नेहान्विता मतिः ॥ ३७
एतद्धि मम कार्याणां परमं हृदि संस्थितम् ।
कृता तेन तु तुष्टिर्मे सत्कारश्च भविष्यति ॥ ३८

—महाभारत, वनपर्व अध्याय १

"पांडव वनवासांत गेलेले पाहून पौरजनांना अत्यंत दुःख झालें. भीष्म, विदुर, द्रोणाचार्य व कृपाचार्य यांची वारंवार निंदा करीत परस्परांत ते बोलूं लागले कीं, ज्या ठिकाणीं पापात्मा दुर्योधन, कर्ण-शकुनींच्या नेतृत्वाखालीं व दुःशासनाच्या साहाय्यानें राज्य करणार आहे तें हें कुल तर शिल्लक राहूंच शकणार नाहीं; पण आम्ही व आमचीं घरेंदारेंही शिल्लक रहाणार नाहींत. जेथें आचारपरंपरा शिल्लक नाहीं, धर्म उरलेला नाहीं, राज्यशासनाचे नियम धाब्यावर बसविले गेले आहेत त्या ठिकाणीं कुठलें सुख व कुठलें कुल? पाप्यांच्या साहाय्यानें हा राज्य करणार! दुर्योधन हा गुरुजनांचा द्वेष करणारा, आचार टाकलेला, सुहृज्जनांचा परित्याग केलेला, अहंकारी, स्वभावतःच अत्यंत क्रूर व नीच आहे. तो जेथें राज्य करील तें राज्य आदर्श म्हणून राहणें अशक्य आहे. जेथें पांडव जातील तेथेंच आपण जाऊं या. त्यांचीं अंतःकरणें दयापूर्ण आहेत. इंद्रियें व शत्रु यांना त्यांनीं जिंकून टाकलें आहे. त्या महानुभावांना अकार्याची तरी घृणा आहे. ते महानुभाव धर्म व धार्मिक आचार यांच्यावर अत्यंत निष्ठा ठेवणारे आहेत; व ते अत्यंत कीर्तिमान् आहेत. याप्रमाणें परस्परांशीं बोलून अरण्यांत ज्या ठिकाणीं पांडव होते तेथें ही सर्व मंडळी येऊन पोहोंचली, व हात जोडून ते त्यांना म्हणूं लागले: आम्हां दुःखी लोकांना सोडून तुम्ही कोठें जात आहां? जेथें तुम्ही

जावयाचें ठरविलें असेल तेथें आम्हीही तुमच्या मागोमाग याव-याचें ठरविलें आहे. लाज सोडलेल्या दुष्टांनीं अधर्मानें तुम्हांला जिंकलें हें ऐकून आम्ही अत्यंत उद्विग्न झालों आहोंत. तुम्ही आमचा परित्याग करूं नये. आम्ही तुमचे भक्त असून तुमच्यावर अनुरक्त आहोंत. आम्ही तुमचे जवळचे सुहृद् आहोंत व नेहमीं तुमचें हित व प्रिय करण्याविषयीं दक्ष आहों. वाईट राजाच्या राज्यांत आम्ही विनाश पावल्यावांचून रहाणार नाहीं. हे नरश्रेष्ठांनो! चांगल्या व वाईट संसर्गांनीं सभोंवारच्या पदार्थांना विशिष्ट परिणाम नेहमींच भोगावा लागतो. वस्त्र, पाणी, तिल, भूमि यांना जर फुलांच्या संसर्गांत ठेवलें तर आपोआप सुवास चिकटल्यावांचून रहात नाहीं. मूर्खांची संगति हें मोहाच्या जाळ्याचें कारण बनल्यावांचून रहात नाहीं आणि साधूची संगति धर्म वाढवावयास कारणीभूत झाल्या-वांचून रहात नाहीं. म्हणून ज्यांना शांततेची इच्छा असेल व कल्याणाची इच्छा असेल त्यांनीं नेहमीं प्राज्ञ, वृद्ध, तपस्याशील व सुस्वभावी अशा सज्जनांशींच संगति करावी. विद्या, कुल व कर्म या तिन्ही दृष्टींनीं जे अत्यंत योग्य असतील त्यांची सेवा करणें शास्त्र-वचनापेक्षांही अधिक महत्त्वाचें आहे. आम्ही स्वतः जरी कोणतेंच कर्म केलें नाहीं तरी पुण्यशील साधूंच्या जर सहवासांत राहिलों तर आम्हांला पुण्य प्राप्त होईल व पाप्यांच्या सहवासांत राहिलों तर निश्चित पापच प्राप्त होईल. दुष्टांच्या दर्शनानें, स्पर्शानें, संवादांनीं इतकेंच नव्हे तर त्यांच्यांत नुसत्या बसण्यानें सर्व प्रकारचे धार्मिक आचार नष्ट होतात व मानवांना सिद्धि कधींही प्राप्त होऊं शकत नाहीं. नीचांच्या सहवासानें बुद्धीला सर्व प्रकारची अवकळा येऊन ती नीचतेच्याच मार्गाचें अनुकरण करूं लागते. मध्यम लोकांच्या सह-वासानें ती मध्यम प्रतीची बनते, तर श्रेष्ठ पुरुषांच्या सहवासानें ती अतिश्रेष्ठ बनते. जगतामध्यें धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांची प्राप्ति करून देणारे जे शिष्टसंमत व वेदांत सांगितलेले महान् सद्गुण म्हणून आहेत ते अधार्मिक लोकांच्या सहवासांत कधींच उत्पन्न होत नसतात.' ते सर्व शिष्टसंमत व शास्त्रसंमत सद्गुण आपल्या व्यक्तिमत्त्वांत खच्चून भरलेले आहेत. गुण-

वंतांच्या सहवासांतच आमचें समग्र जीवन जावें अशी आमची इच्छा आहे. कारण कीं, आमचें कल्याण व्हावें अशी आमची इच्छा आहे. म्हणून आम्ही आपण जेथें रहाल तेथेंच राहूं इच्छितों. प्रजाजनांचें हें म्हणणें ऐकून युधिष्ठिर त्यांना म्हणाले कीं, स्नेह व कारुण्य यांमुळें प्रेरित होऊन सर्व ब्राह्मणप्रमुख प्रजा आमच्या ठिकाणीं नसलेले गुण आमच्या ठिकाणीं आहेत असें ज्या अर्थीं म्हणत आहेत त्या अर्थीं आम्ही खरोखरीच धन्य आहोंत. माझ्या बंधूंसहित मी आतां आपणांस जी विनंती करणार आहें, ती आपण कृपापूर्वक ऐकावी व तसेंच वागावें अशी माझी इछा आहे. जर आमच्याविषयीं आपल्या अंतःकरणांत स्नेह असेल व अनुकंपा असेल तर आपण कृपापूर्वक माझें म्हणणें ऐकावें. पितामह भीष्म, राजा विदुर, व माझी माता आणि सुहृज्जन हस्तिनापुरांत आहेत. ते सर्व उत्कट शोक व संताप यांनीं अत्यंत विह्वल झालेले आहेत. आमच्या हितासाठीं व आम्हांला बरें वाटावें म्हणून त्यांचें परिपालन करणें हें आपलें कर्तव्य आहे. आम्ही दूर निघून आलों तेव्हां त्यांनीं आमच्याबरोबर येऊं नये म्हणून शपथ घालून त्यांना परत फिरविलें. माझी ठेव म्हणून आपण त्यांना सांभाळा, व त्यांच्याविषयींही आपल्या मनांत प्रेम बाळगा. खरोखर करण्यासारखें व माझ्या हृदयांत अगदीं घर करून राहिलेलें माझें कांहीं कार्य शिल्लक असेल तर तें येवढेंच आहे. येवढें आपण केलेंत कीं मला खरा आनंद होईल व माझा खरा सन्मान केल्यासारखें होईल."

युधिष्ठिराच्या या निर्बंधामुळें प्रजाजन परतले खरे; पण ते दुःखानें वेडे होऊन आक्रोश करीतच परतले असें महाभारतांत म्हटलें आहे. प्रजाजनांना राजा युधिष्ठिराच्या नेतृत्वाविषयीं व त्याच्यामुळेंच इतर पांडवांच्याविषयींही केवढी विलक्षण श्रद्धा वाटत होती हें महाभारतांतील संहारानंतर प्रजांनीं युधिष्ठिराबद्दल काढलेल्या उद्गारांतूनही स्पष्टपणें व्यक्त झालें आहे. युधिष्ठिराचें साम्राज्य सुरू झाल्यानंतर राजा धृतराष्ट्र अरण्यवास पत्करण्यासाठीं ज्यावेळीं जाऊं लागला त्यावेळीं प्रजाजनांचा निरोप घेत असतां त्यानें युधिष्ठिराविषयीं असें सांगितलें कीं, आपण युधिष्ठिराचा सांभाळ

करावा, तो आपलें कल्याण करण्याचा प्रयत्न करीलच. त्यावेळीं धृतराष्ट्राला उत्तर देतांना प्रजा म्हणतात :—

दृष्टिप्रदानमपि ते पाण्डवान्प्रति नो वृथा ।। ३९
समर्थास्त्रिदिवस्यापि पालने किं पुनः क्षितेः ।
अनुवर्त्स्यन्ति वा धीमन्समेषु विषमेषु च ।। ४०
प्रजाः कुरुकुलश्रेष्ठ पाण्डवान् शीलभूषणान् ।
ब्रह्मदेयाग्रहारांश्च परिबर्हांश्च पार्थिवः ।। ४१
पूर्वराजाभिपन्नांश्च पालयत्येव पाण्डवः ।
दीर्घदर्शी मृदुर्दान्तः सदा वैश्रवणो यथा ।। ४२
अक्षुद्रसचिवश्चायं कुन्तीपुत्रो महामनाः ।
अथ मित्रे दयावांश्च शुचिश्च भरतर्षभः ।। ४३
ऋजु पश्यति मेधावी पुत्रवत्पालितः सदा ।
विप्रियं च जनस्यास्य संसर्गाद्धर्मजस्य वै ।। ४४
न करिष्यन्ति राजर्षे तथा भीमार्जुनादयः ।
मंदा मृदुषु कौरव्य तीक्ष्णेष्वाशीविषोपमाः ।। ४५
वीर्यवन्तो महात्मानः पौराणां च हिते रताः ।
न कुन्ती न च पाञ्चाली न चोलूपी न सात्वती ।। ४६
अस्मिन् जने करिष्यन्ति प्रतिकूलानि कर्हिचित् ।
भवत्कृतमिमं स्नेहं युधिष्ठिरविवर्धितम् ।। ४७
न पृष्ठतः करिष्यन्ति पौरा जानपदा जनाः ।
अधर्मिष्ठानपि सतः कुन्तीपुत्रा महारथाः ।। ४८
मानवान्पालयिष्यन्ति भूत्वा धर्मपरायणाः ।
स राजन्मानसं दुःखमपनीय युधिष्ठिरात् ।। ४९
कुरु कार्याणि धर्म्याणि नमस्ते पुरुषर्षभ । ५०

—महाभारत, आश्रमवासिकपर्व अध्याय १०

" हे राजा, पांडवांच्या बाबतींत आम्ही कांहीं लक्ष द्यावें असें आम्हांला सांगणें व्यर्थ आहे. स्वर्गाचेंदेखील पालन करण्यास पांडव समर्थ आहेत, मग पृथ्वीची कथाच काय ? हे कुरुकुलश्रेष्ठा चारित्र्य हेंच भूषण समजणारे पांडव धर्माचें अनुकरण त्यांच्या संपत्तीच्याच

काय पण विपत्तीच्या काळांत देखील केल्यावांचून रहाणार नाहींत. पूर्वीच्या राजांनीं दिलेले आमचे अग्रहार व देणग्या पांडव यथावत् चालवीत आहेत. महाराज युधिष्ठिर कुबेराप्रमाणें उदार असून दीर्घदर्शी, मृदु, दान्त, मित्रांवर दया करणारा व अत्यंत पवित्र आहे. या महानुभावाचे सचिवही अतिशय थोर अंतःकरणाचे आहेत. धर्मराजाच्या संसर्गामुळें भीमार्जुनदेखील प्रजांचें अप्रिय कधींच करणार नाहींत. चांगल्या लोकांविषयीं पांडव जसे अत्यंत मृदु आहेत त्याचप्रमाणें अहित करणाऱ्यांविषयीं ते सर्पाप्रमाणें तीक्ष्णही आहेत. हे सर्व महानुभाव महापराक्रमी असून नेहमींच प्रजांचें हित करण्यांत रत असतात. पांडवच काय, पण त्यांच्या सहवासांतील कुंती, द्रौपदी, उलूपी व सुभद्रा या राजस्त्रियादेखील प्रजांचें स्वप्नांतही अहित करणार नाहींत. तूं केलेला स्नेह युधिष्ठिरानें वाढविला आहे. धर्मपरायण पांडव प्रजा कसल्याही असल्या तरी त्यांचें पालन अवश्यमेव करतील. तेव्हां युधिष्ठिर प्रजांना कसें वागवील ही आपल्या मनांतील काळजी पूर्णपणें काढून टाकून तूं निश्चित अंतःकरणानें आश्रमवासाचें आपलें कर्तव्य पार पाड. आमचा तुला नमस्कार असो."

## धर्माची केवळ मूर्ति

युधिष्ठिराच्या जीवनाचा स्थायीभाव धर्म हा होता. केवळ कर्तव्यासाठीच कर्तव्य या बुद्धीनें ऐहिक लाभालाभाची कल्पनाही मनांत न आणतां धर्माचें आचरण ते करीत. वनपर्वांत ज्या वेळीं द्रौपदी युधिष्ठिरांच्या धार्मिक भोळेपणानें सर्वांवर कोसळलेल्या संकटाबद्दल त्यांना दूषण देऊन ज्यापासून केवळ दुःखच उत्पन्न होतें असें धर्माचरण तुम्ही कशास्तव चालविलें आहे असें म्हणूं लागली, त्या वेळीं तिला उत्तर देतांना युधिष्ठिरांनीं आपली भूमिका स्पष्ट केली आहे. ते म्हणतात :—

**नाहं कर्म फलान्वेषी राजपुत्रि चराम्युत ।**
**ददामि देयमित्येव यजे यष्टव्यमित्युत ।। २**
**अस्तु वात्र फलं मा वा कर्तव्यं पुरुषेण यत् ।**
**गृहे वा वसता कृष्णे यथाशक्ति करोमि तत् ।। ३**

**धर्मं चरामि सुश्रोणि न धर्मफलकारणात् ।**
**आगमाननतिक्रम्य सतां वृत्तमवेक्ष्य च ।। ४**
**धर्म एव मनः कृष्णे स्वभावाच्चैव मे धृतम् ।**
**धर्मवाणिज्यको हीनो जघन्यो धर्मवादिनाम् ।। ५**

**—महाभारत वनपर्व अध्याय ३१**

"हे राजपुत्रि, मी जें धार्मिक कर्तव्य पार पाडतों त्या धर्माच्या कर्माचें फळ मला मिळावें अशा इच्छेनें मी धर्मकर्म कधींच करीत नाहीं. दान करणें हें आपलें धार्मिक कर्तव्य आहे; अशा निष्ठेनेंच मी दान करतों; व यज्ञ करणें हें आपलें धार्मिक कर्तव्य आहे अशा बुद्धीनेंच मी यज्ञही करतों. कर्तव्य करण्याचें फळ मिळो अगर न मिळो पण केवळ कर्तव्य म्हणूनच प्रत्येकानें तें केलें पाहिजे. अशा बुद्धीनेंच मी यथाशक्ति धार्मिक कर्तव्य पार पाडतों. वेदशास्त्रांचें उल्लंघन न करतां व सज्जनांची वागण्याची पद्धति अवलोकन करून मी धर्मानुसार वागत असतों. धर्माचें फळ मिळावें म्हणून मी धर्मानुसार वागत नाहीं.कांहीं मिळावें म्हणून वैश्य वृत्तीनें जो धर्माचें आचरण करीत असतो त्याला धर्मज्ञ पुरुष हीन व अधम समजतात. हे कृष्णे, निसर्गतःच माझी प्रवृत्ति धर्माकडे आहे म्हणून मी धर्मानुसार वागतों."

पुनश्च भीमसेनाशीं बोलत असतां राजा युधिष्ठिरांनीं आपल्या अंतःकरणांतील हेच भाव व्यक्त केले आहेत. तें म्हणतात :—

**मम प्रतिज्ञां च निबोध सत्यां वृणे धर्ममममृताज्जीविताच्च ।**
**राज्यं च पुत्राश्च यशो धनं च सर्वं न सत्यस्य कलामुपैति ।। २२**

**—महाभारत, वनपर्व अध्याय ३४**

"हे भीमसेना, माझी प्रतिज्ञा नीट अैक. जीवितापेक्षां व अमर होण्यापेक्षां धर्म मला सर्वांत प्रिय आहे. त्यासाठीं मी सर्वस्वाचा परित्याग करीन. एका सत्यधर्माच्या आचरणासमोर राज्य, पुत्र, यश, धन इत्यादि सर्व गोष्टींचें काडीइतकेंही महत्त्व नाहीं." युधिष्ठिराच्या या धर्मप्रवृत्तीची त्यांच्याशीं शत्रुत्व करणाऱ्या लोकांनादेखील पूर्णपणानें जाणीव आहे. त्यामुळें त्यांच्याविषयीं उद्गार

काढीत असतां जेव्हां कांहीं चांगले प्रसंग येतात, त्या त्या प्रत्येक वेळीं त्यांच्या या धर्मनिष्ठेचा उल्लेख त्यांचे शत्रूदेखील केल्यावांचून रहात नाहींत. उद्योगपर्वांत श्रीकृष्णांशीं बोलत असतां कर्ण म्हणतो:

**स एव राजा धर्मात्मा शाश्वतोस्तु युधिष्ठिरः ।**
**नेता यस्य हृषीकेशो योद्धा यस्य धनञ्जयः ।। २३**

**—महाभारत, उदयोगपर्व अध्याय १४१**

"ज्याचा नेता हृषीकेश आहे व योद्धा धनंजय आहे तो धर्मात्मा युधिष्ठिरच पृथ्वीचें शाश्वत राज्य करो." पांडव वनांत गेल्यानंतर कदाचित् विदुराच्या वजनानें राजा धृतराष्ट्र त्यांना परत बोलावील व त्यांचें राज्य हरण करण्यासाठीं आपण केलेले श्रम फुकट जातील म्हणून चिंतामग्न झालेल्या दुर्योधनाशीं बोलतांना, शकुनीसारख्या पांडवांच्या सदैव अहितावर टपलेल्या पाताळयंत्री व जातिवंत दुष्टानें देखील युधिष्ठिर व त्याचे बंधु यांच्या धर्मनिष्ठेविषयीं हाच विलक्षण विश्वास प्रकट केला आहे. तो म्हणतो:—

**किं बालिशमतिं राजन्नास्थितोसि विशांपते ।**
**गतास्ते समयं कृत्वा नैतदेवं भविष्यति ।। ७**
**सत्यवाक्ये स्थिताः सर्वे पाण्डवा भरतर्षभ ।**
**पितुस्ते वचनं तात न ग्रहीष्यन्ति कर्हिचित् ।। ८**

**–महाभारत, वनपर्व अध्याय ७**

"हे राजा, राज्यपदाचा भार संभाळण्याचें येवढें मोठें कार्य उचलेल्या तुझ्यासारख्यांच्या ठिकाणीं इतकी बालिश बुद्धि कां असावी? पांडव येथून जातांना वनवासाची प्रतिज्ञा करून गेले आहेत. कोणत्याही कारणास्तव आपली ती प्रतिज्ञा मोडून मध्यंतरींच ते कधींही इकडे येणार नाहींत. तुझ्या पित्यानें बोलाविलें तरी या बाबतींत ते त्याचें कधींही ऐकणार नाहींत. सर्व पांडव अत्यंत सत्यसंध आहेत." या सत्यसंधतेमुळेंच, पांडव वनवासांत असतां त्यांच्या अनेक मित्रांची व सुहृदांची कौरवांना युद्धांत ठार मारून त्यांचें राज्य त्यांना परत मिळवून देण्याची इच्छा असतांना देखील त्यांचा वनवासाचा काल संपेपर्यंत कोणालाही त्यांचे बाबतींत कांहींही करणें शक्य झालें नाहीं. वनांत ज्यावेळीं भगवान् श्रीकृष्ण, सात्यकि व बलरामासहित

युधिष्ठिराच्या भेटीला आले, त्यावेळीं सात्यकि श्रीकृष्णांना असें सुचवूं लागला कीं, आपणच कौरवांच्यावर स्वारी करून व त्यांना ठार मारून त्यांचें राज्य युधिष्ठिराच्या स्वाधीन करावयास पाहिजे. त्या वेळीं सात्यकीला श्रीकृष्णांनीं दिलेलें उत्तर व त्यावर युधिष्ठिरांनीं काढलेले उद्गार या गोष्टीवर चांगलाच प्रकाश टाकतात.

**असंशयं माधव सत्यमेतद्गृह्णीम ते वाक्यमदीनसत्त्व ।**
**स्वाभ्यां भुजाभ्यामजितां तु भूमिं नेच्छेत्कुरूणामृषभः कथंचित् ।।२३**
**न ह्येष कामान्न भयान्न लोभाद्युधिष्ठिरो जातु जह्यात्स्वधर्मम् ।**
**भीमार्जुनौ चातिरथौ यमौ च तथैव कृष्णा द्रुपदात्मजेयम् ।। २४**
**उभौ हि युद्धेऽप्रतिमौ पृथिव्यां वृकोदरश्चैव धनंजयश्च ।**
**कस्मान्न कृत्स्नां पृथिवीं प्रशासेन्माद्रीसुताभ्यां च पुरस्कृतोऽयम् ।।२५**
**यदा तु पञ्चालपतिर्महात्मा सकेकयश्चेदिपतिर्वयं च ।**
**युध्येम विक्रम्य रणे समेतास्तदैव सर्वे रिपवो हि न स्युः ।। २६**

युधिष्ठिर उवाच ।

**नेदं चित्रं माधव यद्ब्रवीषि सत्यं तु मे रक्ष्यतमं न राज्यम् ।**
**कृष्णस्तु मां वेद यथावदेकः कृष्णं च वेदाहमथो यथावत् ।। २७**
**यदैव कालं पुरुषप्रवीरो वेत्स्यत्ययं माधव विक्रमस्य ।**
**तदा रणे त्वं च शिनिप्रवीर सुयोधनं जेष्यसि केशवश्च ।। २८**
**प्रतिप्रयान्त्वद्य दशार्हवीरा दृष्टोऽस्मि नाथैर्नरलोकनाथैः ।**
**धर्मेऽप्रमादं कुरुताप्रमेया द्रष्टास्मि भूयः सुखिनः समेतान् २९**

—महाभारत, वनपर्व अध्याय १२०

"हे सात्यकि, तुझें म्हणणें सत्य आहे व तें आम्हांस मान्य आहे. पण स्वतःच्या बाहूंच्या भरंवशावर न मिळविलेली पृथ्वी घ्यावयास कुरुश्रेष्ठ युधिष्ठिर कधींही सिद्ध होणार नाहीं. काम, भय व लोभ यांपैकीं कोणत्याही कारणास्तव युधिष्ठिर धर्म टाकावयास कधींही सिद्ध होणार नाहीं. तीच गोष्ट भीम, अर्जुन, नकुल, सहदेव व द्रौपदी यांची आहे. युधिष्ठिराजवळ सामर्थ्य कमी पडलें म्हणून तो राज्य करीत नाहीं असें थोडेंच आहे? भीमसेन व अर्जुन हे त्याचे

बंधु युद्धांत केवळ अप्रतिम आहेत. हे चार बंधु, द्रुपद, केकय, चेदि-पति व आपण या सर्वांनीं मिळून शत्रूवर चढाईच केली असती तर कौरव जिवंतच राहाते ना! पण क्षत्रियांनीं बाहुबलावर पृथ्वी जिंकावी व सत्यधर्मानें वागावें या धर्मानुसार प्रतिज्ञेप्रमाणें आपला वनवास पूर्ण झाल्यावांचून युधिष्ठिर राज्य स्वीकारणार नाहीं. श्रीकृष्णांचें हें बोलणें ऐकतांच युधिष्ठिर म्हणाले: हे श्रीकृष्णा, आपण जें बोलतां तेंच बरोबर आहे; पण त्यांत आश्चर्य असें कांहींच नाहीं. सत्य हीच माझ्या दृष्टीनें खरी रक्षणीय गोष्ट होय, राज्य नव्हे. मला श्रीकृष्ण ओळखूं शकतो व श्रीकृष्णाला केवळ मी ओळखूं शकतों. ज्यावेळीं पुरुषश्रेष्ठ श्रीकृष्णाला हा पराक्रमाचा काल आहे असें वाटेल, त्यावेळीं हे सात्यके रणामध्यें तूं सुयो-धनाला जिंकशील. हे यादववीरांनो तुम्ही आतां आपापल्या स्थळीं जा. अप्रमत्त वृत्तीनें धर्माच्यासंबंधीं निष्ठा ठेवा. पुनः आपण योग्य वेळीं भेटूं."

युधिष्ठिरांच्या या अत्यंत धार्मिक प्रवृत्तीमुळें त्यांच्या हातून अत्यंत न्याय्य वर्तन घडत असे. कठिण प्रसंगींही त्यांचा न्याय त्यांना सोडून गेला नाहीं. वनपर्वांत यासंबंधीं एक मोठा चमत्का-रिक प्रसंग वर्णिलेला आहे. एकदां पांडव फिरत फिरत अशा एका स्थळीं आले कीं जेथें त्यांना पाणी म्हणून मिळेना. तृषाक्रांत झालेल्या युधिष्ठिरानें आपल्या बंधूंना पाण्याचा शोध करावयास सांगितलें. सहदेव शोध करावयास गेल्यानंतर त्याला एका ठिकाणीं पाण्याचें सरोवर आढळून आलें. पण सरोवराजवळ जाऊन पाण्याला हात लावणार तोंच एका यक्षानें त्याला असें सांगितलें कीं, 'हें सरोवर माझें आहे. माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दिल्यावांचून तूं या सरोवरां-तील पाणी पिऊं नकोस. प्यालास तर ताबडतोब मरून पडशील.' तें ऐकतांच तहानेलेल्या सहदेवानें त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून व हातांत पाणी घेऊन त्यानें तें ओठाजवळ नेलें. पण ओठाला पाण्याचा स्पर्श होतांच तो मरून पडला. क्रमाक्रमानें सर्वच पांडवांची ही अवस्था झाली व चारही पांडव तेथें मरून पडले. त्यावेळीं युधिष्ठिरांनीं तेथें येऊन यक्षाच्या प्रश्नांचीं उत्तरें

दिली. तेव्हां प्रसन्न होऊन यक्षानें असें सांगितलें कीं, तुझ्या मेलेल्या कोणत्याही एका बंधूला जीवदान माग त्याला मी जिवंत करीन. युधिष्ठिरांनीं कोणत्या बंधूचें जीवदान मागितलें असेल? आपण अर्जुन अगर भीमसेन हीं नांवें उच्चाराल. आपलीच काय, पण यक्षाची सुद्धां तीच कल्पना होती. पण आपल्याप्रमाणेंच युधिष्ठिरांनीं यक्षाचाही अपेक्षाभंग केलेला आहे. व युधिष्ठिरानें त्याचें जें कारण सांगितलें तें पाहून त्याचें दयामय अंतःकरण व अपूर्व न्यायनिष्ठा यांच्यामुळें यक्षाप्रमाणेंच आपलेंही अंतःकरण भरून आल्यावांचून रहात नाहीं. यक्षप्रश्नांतील तेवढा भागच येथें मी उद्धृत करतों :--

यक्ष उवाच।

तस्मात् त्वमेकं भ्रातॄणां यमिच्छसि स जीवतु ।। २२

युधिष्ठिर उवाच ।

श्यामो य एष रक्ताक्षो बृहच्छाल इवोत्थितः ।
व्यूढोरस्को महाबाहुर्नकुलो यक्ष जीवतु ।। २३

यक्ष उवाच।

प्रियस्ते भीमसेनोऽयमर्जुनो वः परायणम् ।
स कस्मान्नकुलो राजन् सापत्नं जीवमिच्छसि ।। २४
यस्य नागसहस्रेण दशसंख्येन वै बलम् ।
तुल्यं तं भीममुत्सृज्य नकुलं जीवमिच्छसि ।। २५
तथैनं मनुजाः प्राहुर्भीमसेनं प्रियं तव ।
अथ केनानुभावेन सापत्नं जीवमिच्छसि ।। २६
यस्य बाहुबलं सर्वे पाण्डवाः समुपासते ।
अर्जुनं तमपाहाय नकुलं जीवमिच्छसि ।। २७

युधिष्ठिर उवाच ।

धर्म एव हतो हन्ति धर्मो रक्षति रक्षितः ।
तस्माद्धर्मं न त्यजामि मानो धर्मो हतोऽवधीत् ।। २८
आनृशंस्यं परो धर्मः परमार्थाच्च मे मतम् ।
आनृशंस्यं चिकीर्षामि नकुलो यक्ष जीवतु ।। २९

**धर्मशीलः सदा राजा इति मां मानवा विदुः ।**
**स्वधर्मान्न चलिष्यामि नकुलो यक्ष जीवतु ।। ३०**
**कुन्ती चैव तु माद्री च द्वे भार्ये तु पितुर्मम ।**
**उभे सपुत्रे स्यातां वै इति मे धीयते मतिः ।। ३१**
**यथा कुन्ती तथा माद्री विशेषो नास्ति मे तयोः ।**
**मातृभ्यां सममिच्छामि नकुलो यक्ष जीवतु ।। ३२**

**यक्ष उवाच ।**
**तस्य तेऽर्थाच्च कामाच्च नानृशंस्यं परं मतम् ।**
**तस्मात्ते भ्रातरः सर्वे जीवन्तु भरतर्षभ ।। ३३**
**—महाभारत, वनपर्व अध्याय ३१३**

"यक्ष म्हणाला, हे युधिष्ठिरा, माझ्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें तूं दिलीं आहेस. तुझ्या भ्रात्यांपैकीं एकाला मी जीवदान देतों. कोणत्याही एकाचें जीवदान तूं माग. तेव्हां युधिष्ठिर म्हणाले, हा आरक्त नेत्रांचा, शाल वृक्षाप्रमाणें उंच, भरदार-छातीचा, श्यामवर्ण, महाबाहु नकुल जिवंत व्हावा अशी माझी इच्छा आहे. हें ऐकतांच आश्चर्यानें यक्ष म्हणाला, हे राजन् भीमावर तुझें सर्वांत अधिक प्रेम आहे व अर्जुन तर तुम्हां सर्वांचेंच आश्रयस्थान आहे त्या दोघांनाही सोडून तुझा सावत्र भाऊ असलेल्या नकुलाला जिवंत करण्याची तूं कां इच्छा करतोस ? दहा सहस्र हत्तींचें बळ ज्याच्या अंगांत आहे त्या भीमाला मागण्याऐवजीं तूं नकुलाला मागतोस हें आश्चर्य आहे. सर्व लोक तर तुझें भीमावर सर्वांत अधिक प्रेम आहे असें म्हणतात. सर्व पांडव ज्याच्या सामर्थ्यावर स्थिर आहेत तो अर्जुन सोडून तूं नकुलाला जिवंत करण्याची मागणी करतोस हें आश्चर्य आहे. त्यावर युधिष्ठिर म्हणाले, आपण धर्माची हत्या केली तर धर्मही आपली हत्या करतो व आपण धर्माचें संरक्षण केलें तर धर्मही आपलें संरक्षण करतो. धर्मत्याग करण्याची माझी इच्छा नाहीं. धर्माची हत्या करून धर्मानें आमची हत्या करावी अशी परिस्थिति मी निर्माण होऊं देणार नाहीं. सर्व परमार्थापेक्षां दया हाच परम श्रेष्ठ धर्म आहे. तो पाळण्याची माझी इच्छा आहे.

म्हणून हे यक्षा, नकुलच जिवंत राहिला पाहिज. लोक मला अत्यंत धर्मनिष्ठ राजा म्हणून ओळखतात. कोणत्याही परिस्थितींत धर्मापासून भ्रष्ट होण्याची माझी इच्छा नाहीं. म्हणून भीमावर माझें प्रेम असलें तरी व अर्जुन आमचा सर्वांचा आधार असला तरी माझ्या चार बंधूंपैकीं जर कोणी एकच जिवंत व्हावयाचा असेल तर नकुलच जिवंत व्हावा अशी माझी इच्छा आहे. कुंती व माद्री या माझ्या पित्याच्या दोन स्त्रिया, त्या दोन्ही स्त्रिया पुत्रवती असाव्या व दोघींनाही सारखेंच भाग्य लाभावें अशी माझी इछा आहे. कुंती व माद्री या दोन्ही माता मला समान योग्यतेच्या आहेत. मी त्यांच्यांत काडीइतकाही भेद करीत नाहीं. दोघींनाही पुत्रवती असल्याचा मान मिळाला पाहिजे. म्हणून हे यक्षा, नकुलच जिवंत व्हावा. त्यावर प्रसन्न होऊन यक्ष म्हणाला, "ज्याअर्थी अर्थ व कामापेक्षां आनृशंस्य हाच तूं श्रेष्ठ कर्तव्याचा भाग समजतोस त्याअर्थी मी तुझ्यावर प्रसन्न आहें. तुझे सर्वच बंधु जिवंत होवोत" युधिष्ठिरांच्या अंतःकरणाची केवढी ही स्थिरता व साम्य बुद्धि ! या ठिकाणीं धर्माची अधिष्ठात्री देवताच यक्षाच्या रूपानें युधिष्ठिराच्या धर्मबुद्धीची परीक्षा पहाण्यास्तव आली होती. युधिष्ठिर त्या परीक्षेंत पूर्णपणें उतरले. अशीच आणखी एकवार त्यांची परीक्षा पाहण्यांत आली आहे व तिच्यांतही बावनकशी सोन्याप्रमाणेंच उत्तीर्ण होऊन युधिष्ठिरांनीं आपल्या अंतःकरणाची उंची दाखविलेली आहे. तो प्रसंग महाभारताच्या महाप्रस्थानिक पर्वांत आलेला आहे. युधिष्ठिर व त्यांचे बंधु द्रौपदीसहित श्रीकृष्णनिर्याणानंतर महाप्रस्थान करून अरण्यांत हिमाचलाच्या रोखानें निघून गेले असतां एकामागून एक त्यांचे सर्व बंधु द्रौपदीसहित रस्त्यांत गतप्राण झाले. पण एक कुत्रा मात्र शेवटपर्यंत त्यांच्याबरोबर राहिला. शेवटीं देवेंद्र स्वतःचा रथ घेऊन युधिष्ठिराला सदेह स्वर्गास न्यावयास आले असतां राजा युधिष्ठिर त्या कुत्र्यावांचून एकटाच त्या रथांत बसावयास सिद्ध होईना. त्या वेळीं युधिष्ठिराचा व देवेंद्राचा जो मनोरम संवाद झालेला आहे, तो मी येथें उद्धृत करतों.

शक्र उवाच ।

निक्षिप्य मानुषं देहं गतास्ते भरतर्षभ ।
अनेन त्वं शरीरेण स्वर्गं गन्ता न संशयः ।। ६

युधिष्ठिर उवाच ।

अयं श्वा भूतभव्येश भक्तो मां नित्यमेव ह ।
स गच्छेत मया सार्धमानृशंस्या हि मे मतिः ।। ७

शक्र उवाच ।

अमर्त्यत्वं मत्समत्वं च राजन् श्रियं कृत्स्नां महतीं चैव सिद्धिम् ।
संप्राप्तोऽद्य स्वर्गसुखानि च त्वं त्यज श्वानं नात्र नृशंसमस्ति ।। ८

युधिष्ठिर उवाच ।

अनार्यमार्येण सहस्रनेत्र शक्यं कर्तुं दुष्करमेतदार्य ।
मा मे श्रिया सङ्गमनं तयाऽस्तु यस्याः कृते भक्तजनं त्यजेयम् ।। ९

इन्द्र उवाच ।

स्वर्गे लोके श्ववतां नास्ति धिष्ण्यमिष्टापूर्तं क्रोधवशा हरन्ति ।
ततो विचार्य क्रियतां धर्मराज त्यज श्वानं नात्र नृशंसमस्ति ।। १०

युधिष्ठिर उवाच ।

भक्तत्यागं प्राहुरत्यन्तपापं तुल्यं लोके ब्रह्मवध्याकृतेन ।
तस्मान्नाहं जातु कथं च नाद्य त्यक्षाम्येनं स्वसुखार्थी महेन्द्र ।। ११
भीतं भक्तं नान्यदस्तीति चार्तं प्राप्तं क्षीणं रक्षणे प्राणलिप्सुम् ।
प्राणत्यागादप्यहं नैव मोक्तुं यतेयं वै नित्यमेतद्व्रतं मे ।। १२

इन्द्र उवाच ।

शुना दृष्टं क्रोधवशा हरन्ति यद्दत्तमिष्टं विवृतमथो हुतं च ।
तस्माच्छुनस्त्यागमिमं कुरुष्व शुनस्त्यागात्प्राप्स्यसे देवलोकम् ।। १३
त्यक्त्वा भ्रातॄन् दयितां चापि कृष्णां प्राप्तो लोकः कर्मणा स्वेन वीर ।
श्वानं चैनं न त्यजसे कथं नु त्यागं कृत्स्नं चास्थितो मुह्यसेऽद्य ।। १४

युधिष्ठिर उवाच ।

न विद्यते सन्धिरथापि विग्रहो मृतैर्मर्त्यैरिति लोकेषु निष्ठा ।
न ते मया जीवयितुं हि शक्यास्ततस्त्यागस्तेषु कृतो न जीवताम् ।। १५
भीतिप्रदानं शरणागतस्य स्त्रिया वधो ब्राह्मणस्वापहारः ।
मित्रद्रोहस्तानि चत्वारि शक्र भक्तत्यागश्चैव समो मतो मे ।। १६

वैशम्पायन उवाच ।

तद्धर्मराजस्य वचो निशम्य धर्मस्वरूपी भगवानुवाच ।
युधिष्ठिरं प्रीतियुक्तो नरेन्द्रं श्लक्ष्णैर्वाक्यैः संस्तवसंप्रयुक्तैः ।। १७

धर्मराज उवाच ।

अभिजातोऽसि राजेन्द्र पितुर्वृत्तेन मेधया ।
अनुक्रोशेन चानेन सर्वभूतेषु भारत ।। १८
पुरा द्वैतवने चासि मया पुत्र परीक्षितः ।
पानीयार्थे पराक्रान्ता यत्र ते भ्रातरो हताः ।। १९
भीमार्जुनौ परित्यज्य यत्र त्वं भ्रातरावुभौ ।
मात्रोः साम्यमभीप्सन्वै नकुलं जीवमिच्छसि ।। २०
अयं श्वा भक्त इत्येवं त्यक्तो देवरथस्त्वया ।
तस्मात्स्वर्गे न ते तुल्यः कश्चिदस्ति नराधिपः ।। २१
अतस्तवाक्षया लोकाः स्वशरीरेण भारत ।
प्राप्तोऽसि भरतश्रेष्ठ दिव्यां गतिमनुत्तमाम् ।। २२

--महाभारत, महाप्रस्थानिक पर्व अध्याय ३

"इंद्र म्हणाला, 'तुझे बंधु मनुष्यदेह सोडून दिव्य गतीला निघून गेले आहेत. पण तूं मात्र याच शरीरानें स्वर्गाला जाणार यांत शंका नाहीं.' यावर युधिष्ठिर म्हणाले, 'हे देवाधिदेवा, हा कुत्रा माझ्यावर आतांपर्यंत्त अत्यंत प्रेम करीत येथवर आलेला आहे. माझ्याबरोबर हाही स्वर्गास आला पाहिजे; कारण कीं, माझें अंतःकरण सौहार्दानें परिपूर्ण आहे.' त्यावर इंद्रानें युधिष्ठिराला सांगितलें, 'हे राजन्, तूं आतां मर्त्य राहिलेला नाहींस. तुला महासिद्धि, संपूर्ण वैभव व स्वर्गांतील सर्व सुखें प्राप्त झालेलीं असून माझें जें स्थान तेंच तुझेंही झालेलें आहे. त्यामुळें मर्त्य लोकांतील गोष्टींशीं तुझा संबंध राहिलेला नाहीं. म्हणून या कुत्र्याचा परित्याग कर.' युधिष्ठिर त्यावर म्हणाला, 'हे सहस्रनेत्रा, आर्यांनीं अनार्यासारखें वागणें अशक्य आहे. ज्याच्यासाठीं भक्तजनांचा त्याग करावा लागतो तें वैभव मला नको.' इंद्र म्हणाला, 'हे धर्मराजा, क्रोधवश झालेले कुत्रे इष्टापूर्ताचा विनाश करतात हें तुला माहीत नाहीं काय? यांना स्वर्गांत मुळींच स्थान नाहीं.' युधिष्ठिर त्यावर उत्तरले, 'भक्ताचा त्याग हें ब्रह्महत्येसारखेंच मोठें पाप

आहे. त्यामुळ कोणत्याही परिस्थितींत स्वतःच्या सुखासाठीं मी या कुत्र्याचा परित्याग करावयास सिद्ध नाहीं. भ्यालेला, भक्त, आपला कोणीही नाहीं म्हणून आर्त असलेला, शरण आलेला, व प्राणरक्षणाची वारंवार भीक मागणारा अशा लोकांच्या बाबतींत प्राणत्यागाचा जरी प्रसंग आला तरीही मी त्यांचा परित्याग कधींही करणार नाहीं.' त्यावर इंद्र म्हणाला कीं, 'द्रौपदी व आपले बंधु यांचाही परित्याग करून तूं स्वर्गलोक स्वतःच्या कर्मानें मिळविलास. मग या क्षुद्र कुत्र्यासाठीं तुझा जीव घोटाळण्याचें कारण काय?' त्यावर युधिष्ठिर म्हणाले, 'माझे बंधु मेलेले आहेत. म्हणून त्यांच्या बाबतींत हा प्रश्न उत्पन्नच होत नाहीं. हा कुत्रा जिवंत आहे. त्यामुळें त्याच्या बाबतींत मात्र तो न्याय उपयोगी पडत नाहीं. शरणागताला भय उत्पन्न करणें, स्त्रियांचा वध, ब्राह्मणधनाचा अपहार व एकदां मित्र म्हटलेल्याचा द्रोह करणें, यांच्या इतकेंच भक्ताचा त्याग हें महान् पातक आहे. तें मी कधींही करणार नाहीं.' धर्मराजाचें हें भाषण ऐकतांच धर्माच्या त्या अधिदेवतेनें आपलें कुत्र्याचें रूप टाकून दिलें व मूळ स्वरूप प्रकट केलें व युधिष्ठिरांची प्रशंसा केली. त्यावेळीं ते म्हणाले कीं, 'हे राजेंद्रा, तुझें शील अत्यंत थोर असून सर्वथा माझ्यासारखेंच आहे. भूतमात्रांच्या बाबतींत तुझ्या अंतःकरणांत जी दया आहे ती केवळ अपूर्व होय. पूर्वीं द्वैत-वनांत यक्ष–प्रश्नाचे वेळीं मी तुझी परीक्षा घेतली होती. त्यावेळीं तूं भीमार्जुनांना सोडून नकुलाचें जीवदान मागण्यांत आपल्या बुद्धीचें औदार्य प्रकट केलेंस व आज या कुत्र्याच्या बाबतींतही तीच बुद्धि व्यक्त केलीस. स्वर्गांतदेखील तुझ्या योग्यतेचा पुरुष नाहीं. या तुझ्या वैशिष्ट्यामुळेंच तुला श्रेष्ठ लोक व अक्षय्य दिव्य गति प्राप्त झालेली आहे."

युधिष्ठिर बावळट होते अशी कित्येकांची समजूत आहे पण वस्तु-स्थिति तशी नाहीं. युधिष्ठिर कूट प्रश्न नुसते जाणत असत, येवढेंच नव्हे तर ते स्वतः करूंही शकत असत. यौवराज्यावर युधिष्ठिर असतांना त्यांना मारण्याचे अनेक प्रयोग दुर्योधनादिकांनीं केले. ते सारे प्रयोग असे होते कीं, ज्यांचा प्रतिकार प्रकटपणें कोणाच्याही

ध्यानांत न येतां व राजसत्तेच्याही ध्यानांत न येतां गुप्तपणें करणें आवश्यक होतें. पांडवांचा गुप्त सल्लागार जो विदुर त्याचेंही असेंच मत होतें.म्हणून पांडवांनीं गुप्तपणें व इतक्या कुशलतेनें त्यांचा प्रतिकार करून स्वतःला वांचवून घेतलें आहे, कीं कोणाच्याही ती गोष्ट लक्षांतही आलेली नाहीं. अर्थातच या गोष्टीचें सर्व श्रेय युधिष्ठिराकडेच जातें. महाभारतकार म्हणतात :—

**ततो वैकर्तनः कर्णः शकुनिश्चापि सौबलः ।**
**अनेकैरभ्युपायैस्ते जिघांसन्ति स्म पाण्डवान् ॥ २१**
**पाण्डवा अपि तत्सर्वं प्रतिचक्रुर्यथागतम् ।**
**उद्भावनमकुर्वन्तो विदुरस्य मते स्थिताः ॥ २२**

—महाभारत आदिपर्व अध्याय १४१

नंतर वैकर्तन कर्ण व सौबल शकुनि हे अनेक उपायांनीं पांडवांना ठार मारण्याचा प्रयत्न करूं लागले. पण पांडवांनीं त्यांचा गुप्तपणें प्रतिकार करून ती गोष्ट कधींच उघडकीस आणली नाहीं. कारण विदुरीचें त्यांना तसेंच मार्गदर्शन होतें. त्यानंतर लाक्षागृहाचे वेळीं सर्व प्रजासनांसमोर तुम्हांला लाक्षागृहाचें भय आहे हें सांकेतिक भाषेंत विदुरानें युधिष्ठिरांना सांगितलें व युधिष्ठिरानें तें मला कळलें येवढेंच त्यांना सांगितलें. इतर कोणाला कांहींच कळूं शकलें नाहीं.

**एवमुक्तः प्रत्युवाच धर्मराजो युधिष्ठिरः ।**
**विदुरं विदुषां श्रेष्ठं ज्ञातमित्येव पाण्डवः ॥ २७**

—महाभारत आदिपर्व अध्याय १४५

त्यानंतर कुंती युधिष्ठिरांना असें विचारूं लागली कीं विदुर काय बोलला तें आम्हांला मुळींच कळलें नाहीं. आणि तूं त्यांना काय उत्तर दिलेंस हेंही आमच्या ध्यानांत आलें नाहीं. तरी तें सर्व आम्हांला सांग. तेव्हां युधिष्ठिर म्हणाले :—

**गृहादग्निश्च बोद्धव्य इति मां विदुरोऽब्रवीत् ।**
**पंथाश्च वो नाविदितः कश्चित्स्यादिति धर्मधीः ॥ ३२**
**जितेन्द्रियश्च वसुधां प्राप्स्यतीति च मेऽब्रवीत् ।**
**विज्ञातमिति तत्सर्वं प्रत्युक्तो विदुरो मया ॥ ३३**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १४५

ज्या घरांत तुम्हांला जावयाचें आहे त्या घराला अग्नीपासून भय आहे. पण मार्ग तुम्हांला अज्ञात रहाणार आहे. कोणी तरी तेथें राहील. मात्र हें आपल्याला माहीत आहे हें कोणाला दाखवूं नका. मन व इंद्रियें ताब्यांत ठेवणाऱ्यालाच पृथ्वी प्राप्त होते असें विदुरानें मला सांगितलें. व हें मला समजलें असें मीं सांगितलें. प्रत्यक्ष लाक्षागृहांत रहावयास गेल्यावर व तें लाक्षागृह आहे हें ओळखल्यावर भीमसेन त्या गृहाचा परित्याग करण्याचा आग्रह करीत असतां युधिष्ठिरांनीं त्याला जें उत्तर दिलें आहे तें त्यांच्या चाणाक्षपणाचेंच द्योतक आहे.

भीमसेन उवाच ।

यदीदं गृहमाग्नेयं विहितं मन्यते भवान् ।
तथैव साधु गच्छामो यत्र पूर्वोषिता वयम् ॥ २०

युधिष्ठिर उवाच ।

इह यत्तैर्निराकारैर्वस्तव्यमिति रोचये ।
अप्रमत्तैर्विचिन्वद्भिर्गतिमिष्टां ध्रुवामितः ॥ २१
यदि विन्देत चाकारमस्माकं स पुरोचनः ।
क्षिप्रकारी ततो भूत्वा प्रसह्यापि दहेत नः ॥ २२
नायं बिभेत्युपक्रोशादधर्माद्वा पुरोचनः ।
तथा हि वर्तते मन्दः सुयोधनवशे स्थितः ॥ २३
अपि चायं प्रदग्धेषु भीष्मोऽस्मासु पितामहः ।
कोपं कुर्यात्किमर्थं वा कौरवान्कोपयीत सः ॥ २४
अथवापीह दग्धेषु भीष्मोऽस्माकं पितामहः ।
धर्म इत्येव कुप्येरन्ये चान्ये कुरुपुङ्गवाः ॥ २५
वयं तु यदि दाहस्य बिभ्यतः प्रद्रवेमहि ।
स्पशैर्नो घातयेत्सर्वान्राज्यलुब्धः सुयोधनः ॥ २६
अपदस्थान्पदे तिष्ठन्न पक्षान्पक्षसंस्थितः ।
हीनकोशान्महाकोशः प्रयोगैर्घातयेद्ध्रुवम् ॥ २७
तदस्माभिरिमं पापं तं च पापं सुयोधनम् ।
वञ्चयद्भिर्निवस्तव्यं छन्नावासं क्वचित्क्वचित् ॥ २८

ते वयं मृगयाशीलाश्चराम वसुधामिमाम् ।
तथा नो विदिता मार्गा भविष्यन्ति पलायताम् ॥ २९
भौमं च बिलमद्यैव करवाम सुसंवृतम् ।
गूढश्वासान्न नस्तत्र हुताशः संप्रधक्ष्यति ॥ ३०
वसतोऽत्र यथा चास्मान्न बुध्येत पुरोचनः ।
पौरो वापि जनः कश्चित्तथा कार्यमतन्द्रितैः ॥ ३१

—महाभारत, आदिपर्व अध्याय १४६

"भीम युधिष्ठिरांना म्हणाला, 'जर या घराला अग्नीपासून भय आहे असें वाटतें तर आपण पूर्वीच्याच ठिकाणीं कां जाऊं नये ?' त्यावर युधिष्ठिर म्हणाले, 'याच ठिकाणीं चेहऱ्यावर विकार न दाखवितां अत्यंत दक्षपणें व स्वतःच्या सुटकेचा मार्ग शोधीत आपण राहिलें पाहिजे असें मला वाटतें. जर त्या पुरोचनाचें कारस्थान आपल्याला कळल्याचें आपल्या चेहऱ्यावरूनही पुरोचनाला दिसून आलें तर त्याला करावयाचें तें लवकरच उरकून तो आम्हांला जाळून टाकील. ह्या पुरोचनाला कसल्याही प्रकारची लाज नाहीं. अधर्म वा माणुसकीची कल्पना याचें त्याला मुळींच भय नाहीं म्हणून तर हा मूर्ख दुर्योधनाचे स्वाधीन आहे. आपण येथेंच जळून नष्ट झाल्यावर पितामह भीष्म संतापतील. किंवा ते तरी काय म्हणून संतापतील ? अथवा धर्म म्हणून ते संतापतील असें गृहीत धरलें तरी आपण दग्ध झाल्यावरचा तो संताप आहे. पुढें आपण जळूं या भीतीनें आपण येथून पळून दुसरीकडे गेलों तर राज्यलुब्ध दुर्योधन स्वतःच्या हेरांकडून आपल्याला मारविल्याशिवाय रहाणार नाहीं. तो स्थानावर आहे, आपण खालीं आहोंत. त्याला साहाय्य आहे, आपल्याला नाहीं. तो धनसंपन्न आहे तर आपल्याजवळ कांहींही नाहीं. त्यामुळें तो कारस्थानांनीं सहज आपला घात करूं शकेल. म्हणून आपण या पुरोचनाला व या दुर्योधनाला दोघांनाही वंचित करून येथून गुप्तपणेंच निघून गेलें पाहिजे. आपण अरण्यांत राहूं व मृगया करून आपली उपजीविका करूं. प्रत्यक्ष पळून जात असतां आपणांस मार्ग सांपडतीलच. गुप्तपणें येथून बाहेर जाण्यासाठीं एक मोठें भुयार करूं या. श्वास निरोध करून त्या भुयारांतून

आपण पार जाऊं शकूं. हें सर्व होईपर्यंत मात्र पुरोचनाचें व दुर्योधनाचें कारस्थान आपल्या ध्यानांत आलें आहे असें त्याला वा प्रजाजनांना आपल्या क्रियेनें, हावभावानें व विकारानेंही मुळींच भासवूं नका." युधिष्ठिरांनीं हें आपलें कारस्थान पूर्णपणें पार पाडलें व स्वतःची एका कारस्थानांतून सुटका करून घेतली. पुढें उद्योगपर्वांत युधिष्ठिरांची बुद्धिमत्ता अशीच व्यक्त झाली आहे.

युधिष्ठिरांचा धर्मनिष्ठ व दयाशील स्वभाव ध्यानांत घेऊन संजय–शिष्टाईचा विलक्षण कूटप्रयोग धृतराष्ट्रानें त्यांच्यावर केला. त्याची अशी समजूत होती कीं तो प्रयोग युधिष्ठिरांच्या ध्यानांत येणार नाहीं. त्या प्रयोगाचें वर्णन धृतराष्ट्राच्या व्यक्तिचित्रावरून आपल्या ध्यानांत आलेंच आहे.

युधिष्ठिरांनीं तो प्रयोग पूर्णपणें ओळखला, इतकेंच नव्हे तर त्या प्रयोगामागील राजा धृतराष्ट्राची हीन मनोवृत्तीही पूर्णपणें ओळखली. ते श्रीकृष्णांना म्हणतात :—

श्रुतं ते धार्तराष्ट्रस्य सपुत्रस्य चिकीर्षितम् ।
एतद्धि सकलं कृष्ण सञ्जयो मां यदब्रवीत् ।। ६
तन्मतं धृतराष्ट्रस्य सोऽस्यात्मा विवृतान्तरः ।
यथोक्तं दूत आचष्टे वध्यः स्यादन्यथा ब्रुवन् ।। ७
अप्रदानेन राज्यस्य शान्तिमस्मासु मार्गति ।
लुब्धः पापेन मनसा चरन्नसममात्मनः ।। ८
यत्तद्द्वादश वर्षाणि वनेषु ह्युषिता वयम् ।
छद्मना शरदं चैकां धृतराष्ट्रस्य शासनात् ।। ९
स्थाता नः समये तस्मिन् धृतराष्ट्र इति प्रभो ।
नाहास्म समयं कृष्ण तद्धि नो ब्राह्मणा विदुः ।। १०
गृद्धो राजा धृतराष्ट्रः स्वधर्मं नानुपश्यति ।
वश्यत्वात् पुत्रगृद्धित्वान्मन्दस्यान्वेति शासनम् ।। ११
सुयोधनमते तिष्ठन् राजाऽस्मासु जनार्दन ।
मिथ्या चरति लुब्धः सन् चरन् हि प्रियमात्मनः ।। १२

—महाभारत, उदद्योगपर्व अध्याय ७२

" हे श्रीकृष्णा, सपुत्र धृतराष्ट्राचें मनोगत संजयाच्या तोंडून तुला कळलेंच आहे. जें संजय बोलला तेंच धृतराष्ट्राचें खरें अंतःकरण आहे. कारण धनी बोलला असेल तेंच दूताला बोलावें लागतें. दूत जर आपल्या मनचें असें कांहीं बोलला तर तो शेवटीं वध्य ठरतो. राजा धृतराष्ट्र लोभी व पापी अंतःकरणाचा असून अयोग्य अशा भूमिकेनें तो वागत आहे. राज्य मुळींच न देतां आमच्याकडून तो शांतीची अपेक्षा करीत आहे. केवळ धृतराष्ट्राच्या आज्ञेचा मान राखावा म्हणून आम्हीं बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास पाळला. केवळ धृतराष्ट्र होता म्हणूनच आम्हीं दिलेलें वचन पूर्णपणें पाळलेलें आहे. आम्ही किती काटेकोर रीतींनीं वचन पाळलें हें ब्राह्मणांना माहीत आहे. लोभी धृतराष्ट्र स्वधर्म पहात नाहीं. तो मनाच्या स्वाधीन असून पुत्रलोभामुळें आपल्या मूर्ख मुलाच्या लहरीनुसार वागतो. स्वार्थीपणानें व लोभानें दुर्योधनाच्या लहरीनुसार वागून तो आमच्याशीं कपट करीत आहे." तात्पर्य, युधिष्ठिर बावळे होते व कपटयांचें कपट ते ओळखूं शकत नसत ही समजूत पूर्णपणें निर्मूल असून हीं कारस्थानें ते सहज ओळखूं शकत असत; इतकेंच नव्हे तर तीं उलटविण्याचें चाणाक्षपणाचें त्यांचें कर्तृत्वही भरपूर होतें. आपण या संबंधींचे महाभारतांतील प्रत्यक्ष पुरावेच पाहिले आहेत.

## युधिष्ठिरांची दीर्घदर्शिता

युधिष्ठिर नुसते चाणाक्ष कर्तृत्वाचेच नसून ते अत्यंत दीर्घदर्शीही होते. शांतिपर्वांत भीष्मांनीं जे प्रश्न विचारले आहेत त्यांवरून व वनपर्वांत यक्षाच्या प्रश्नांना त्यांनीं जीं उत्तरें दिलीं आहेत त्यांवरून त्यांची बुद्धिमत्ता व्यक्त होतेच. बारा वर्षे वनांत काळ घालवीत असतां कौरवांइतकेंच सामर्थ्यसंपन्न होण्यासाठीं त्यांनीं त्या समयाचा पूणपणें उपयोग करून घेतलेला आहे. भीम जेव्हां त्यांच्या अतिरिक्त धर्मनिष्ठेबद्दल त्यांना दूषणें देऊं लागला व ताबडतोब कौरवांवर चढाई करण्यासाठीं त्यांची आज्ञा मागूं लागला त्यावेळीं युधिष्ठिरांनीं त्याला दिलेलें उत्तर त्यांची दीर्घदर्शिता उत्तमपणानें व्यक्त

करते. भीमाची अशी समजूत होती कीं कौरवांना मारणें याचा अर्थ शंभर बंधूंना ठार मारणें इतकाच असून तें काम आपण चुटकी-सरशीं उरकून टाकूं. कौरवांना मारून राज्य स्वाधीन करून घेणें म्हणजे काय याचा त्यानें मुळींच विचार केलेला नाहीं. युधिष्ठिरांनीं आपल्या अंतःकरणांतील गोष्ट त्याच्या जवळ आजवर कधींच व्यक्त केलेली नव्हती. निरनिराळ्या धार्मिक प्रतिपादनांनीं व युक्तिवादांनीं त्याचें समाधान करण्याचा ते प्रयत्न करीत होते. पण भीम जेव्हां हट्टासच पेटला तेव्हां युधिष्ठिरांनीं वस्तुस्थिति भीमासमोर विस्तारपूर्वक मांडली. ते म्हणाले :

एवमेतन्महाबाहो यथा वदसि भारत ।
इदमन्यत्समादत्स्व वाच्यं मे वाच्यकोविद ।। ५
महापापानि कर्माणि यानि केवलसाहसात् ।
आरभ्यन्ते भीमसेन व्यथन्ते तानि भारत ।। ६
सुमन्त्रिते सुविक्रान्ते सुकृते सुविचारिते ।
सिध्यन्त्यर्था महाबाहो दैवं चात्र प्रदक्षिणम् ।। ७
यत्तु केवलचापल्याद्बलदर्पोत्थितः स्वयम् ।
आरब्धव्यमिदं कार्यं मन्यसे शृणु तत्र मे ।। ८
भूरिश्रवाः शलश्चैव जलसंधश्च वीर्यवान् ।
भीष्मो द्रोणश्च कर्णश्च द्रोणपुत्रश्च वीर्यवान् ।। ९
धार्तराष्ट्रा दुराधर्षा दुर्योधनपुरोगमाः ।
सर्वं एव कृतास्त्राश्च सततं चाततायिनः ।। १०
राजानः पार्थिवाश्चैव येऽस्माभिरुपतापिताः ।
संश्रिताः कौरवं पक्षं जातस्नेहाश्च तं प्रति ।। ११
दुर्योधनहिते युक्ता न तथास्मासु भारत ।
पूर्णकोशा बलोपेताः प्रयतिष्यन्ति संगरे ।। १२
सव कौरवसैन्यस्य सपुत्रामात्यसैनिकाः ।
संविभक्ता हि मात्राभिर्भोगैरपि च सर्वशः ।। १३
दुर्योधनेन ते वीरा मानिताश्च विशेषतः ।
प्राणांस्त्यक्षन्ति संग्रामे इति मे निश्चिता मतिः ।। १४

समा यद्यपि भीष्मस्य वृत्तिरस्मासु तेषु च ।
द्रोणस्य च महाबाहो कृपस्य च महात्मनः ।। १५
अवश्यं राजपिण्डस्तैर्निर्वेश्य इति मे मतिः ।
तस्मात्त्यक्ष्यन्ति संग्रामे प्राणानपि सुदुस्त्यजान् ।। १६
सर्वे दिव्यास्त्रविद्वांसः सर्वे धर्मपरायणाः ।
अजेयाश्चेति मे बुद्धिरपि देवैः सवासवैः ।। १७
अमर्षी नित्यसंरब्धस्तत्र कर्णो महारथः ।
सर्वास्त्रविदनाधृष्यो ह्यभेद्यकवचावृतः ।। १८
अनिर्जित्य रणे सर्वानेतान्पुरुषसत्तमान् ।
अशक्यो ह्यसहायेन हन्तुं दुर्योधनस्त्वया ।। १९
न निद्रामधिगच्छामि चिन्तयानो वृकोदर ।
अतिसर्वान्धनुर्ग्राहान्सूतपुत्रस्य लाघवम् ।। २०

वैशंपायन उवाच ।

एतद्वचनमाज्ञाय भीमसेनोत्यमर्षणः ।
बभूव विमनास्त्रस्तो न चैवोवाच किंचन ।। २१

—महाभारत, वनपर्व अध्याय ३६

"हे महाबाहो भीमसेना, मी सांगतों या गोष्टीचा तूं विचार केला आहेस काय? जीं अत्यंत भयानक कर्मे तीं विचार न करतां अत्यंत साहसानें केलीं तर शेवटीं तीं फसतात. अत्यंत विचारपूर्वक विलक्षण पराक्रम प्रकट करून व्यवस्थितपणें व प्रत्येक पाऊल विचारपूर्वक टाकून जर कार्य केलें तर दैव अनुकूल असल्यास तें यशस्वी होतें. केवळ चापल्य, व बळाचा दर्प यांच्या भरंवशावर कौरवांशीं महायुद्ध करण्याचें घोर कर्म सुरू करावें असें तूं म्हणत आहेस. पण तूं या गोष्टीचा साकल्यानें विचार केलेला नाहींस.

"भूरिश्रवा, शल, वीर्यवान् जलसंध, भीष्म, द्रोण, कर्ण, अश्वत्थामा यांनीं परिवेष्टित उशा दुर्योधनाशीं आपणांस युद्ध करावयाचें आहे. हे सर्व लोक कृतास्त्र व वाटेल तें कर्म करण्यास न कचरणारे आहेत. दिग्विजयाच्या वेळीं आपण ज्यांना त्रास दिला ते सर्व राजे दुर्योधनाच्या पक्षाला केव्हांच मिळालेले आहेत. व दुर्योधनाच्या कुशल-

तेनें आणि इतक्या दिवसांच्या सहवासानें निश्चित त्यांच्या मनांत त्याचेविषयीं प्रेम उत्पन्न झालेलें आहे. हे सर्व राजे कोश व सैन्य यांनीं परिपूर्ण असून दुर्योधनाच्या हितसंरक्षणार्थ दक्ष आहेत व संग्रामांत आपला पाडाव करण्याचा ते निकराचा प्रयत्न करतील. दुर्योधनानें आपल्या सर्व सैनिकांना व सहायकांना आजवर भरपूर सन्मान, उपभोग व ऐश्वर्य दिलेलें असल्याकारणानें संग्रामांत ते त्याच्यासाठीं प्राणही टाकतील ही गोष्ट उघड आहे. भीष्म, द्रोण व कृपाचार्य यांची आपण व कौरव यांच्याविषयीं समान वृत्ति असली तरी राजपिंडाचा मोबदला पूर्णपणें दिल्यावांचून ते रहाणार नाहींत. ते दुर्योधनासाठीं संग्रामांत आपला प्राणदेखील टाकतील. हे सर्व लोक धर्मनिष्ठ असून शिवाय दिव्यास्त्रवेत्ते आहेत व इंद्रासहित देवांनाही ते अत्यंत अजिक्य आहेत हें स्पष्ट आहे. ते नेहमीं आपल्याविषयीं मनांत राग बाळगणार. एकदम खवळणारा, सर्वास्त्रवेत्ता, कोणीही धर्षण करण्यास अशक्य, अभेद्य कवचांनीं युक्त असा महारथी कर्ण त्यांच्या बाजूला आहे. तुला कोण सहाय आहे ? या सर्व योद्धयांना जिंकल्यावांचून तुला दुर्योधनाला मारतां येणार नाहीं. असहाय अवस्थेंत तूं हें करूं शकशील काय? भीष्मद्रोणांना तूं कसा जिंकूं शकणार? हे वृकोदरा, या सर्वांची व विशेषतः सूतपुत्र कर्णाच्या लाघवाची स्मृति झाली कीं मला झोंपदेखील लागत नाहीं. किंबहुना, केवळ याच चिंतेनें मी वनांत माझी निद्रा हरवून बसलों आहें. हें ऐकतांच शीघ्रकोपी भीमसेनही विमनस्क व त्रस्त होऊन स्वस्थ राहिला. तो कांहींही बोलला नाहीं."

युधिष्ठिरसुद्धां नुसती चिंताच बाळगून राहिले नाहींत तर महर्षि व्यासांच्याशीं विचारविनिमय करून त्यांनीं अर्जुनाकडून कित्येक वर्षें उपासना करविली व भगवान् महादेव व महेंद्र यांच्याकडून महास्त्रें संपादन करून भावी लढ्याची पूर्वतयारी पूर्ण केली. युधिष्ठिर दीर्घदर्शी व बुद्धिमान् नसते तर अर्जुन महायुद्ध जिंकूं शकला नसता व यक्षासारख्या दैवी आपत्तींमधूनही पांडव वाचूं शकले नसते. या सर्व गोष्टी ध्यानांत घेतल्या म्हणजे त्यांची दीर्घदर्शिता व बुद्धिमत्ता स्पष्ट झाल्यावांचून राहात नाहीं.

## युधिष्ठिर अहिंसक होते काय ?

युधिष्ठिर अहिंसक होते असा उगाचच एक गैरसमज बुद्धप्रणीत अहिंसेच्या अथवा बुद्धापेक्षांही खरें म्हणजे जैनसंप्रदायप्रवर्तक महावीरप्रणीत अहिंसेच्या पुरस्कर्त्यांकडून पसरविला जातो. पण तो अत्यंत चुकीचा आहे. युधिष्ठिर कधींही अहिंसक नव्हते. अथवा खरें म्हणजे युधिष्ठिर हे शुद्ध वैदिकधर्मीय अहिंसक होते. निरर्थक हिंसा करावी असें कोणीच म्हणणार नाहीं, पण समाजहितासाठीं आवश्यक ती हिंसा न करणें म्हणजे अनेकांच्या हिंसेला प्रोत्साहन देऊन महान् हिंसेचे अपराधी ठरणेंच होय. या अर्थानें युधिष्ठिर हे दुर्जनांच्या हिंसेचे प्रेरक, प्रवर्तक व प्रत्यक्ष कर्तेही आहेत. आपल्या बंधूंना साम्राज्यासाठीं युद्ध करण्याची त्यांनींच आज्ञा दिलेली आहे. सम्राट् जरासंधाला मारण्यासाठीं भगवान् श्रीकृष्ण, अर्जुन व भीमसेन यांना युधिष्ठिरांनींच पाठविलेलें आहे. भीष्मादि योद्ध्यांना जिंकण्यास्तव युधिष्ठिरांनीं अर्जुनाला महास्त्रविद्या शिकण्यास्तव कसें पाठविलें हें आपण नुकतेंच पाहिलें. महायुद्धाची आज्ञा त्यांनीं दिली, इतकेंच नव्हे तर त्या युद्धांतील रोजच्या हाणामारींत त्यांनीं प्रत्यक्ष भाग घेतलेला आहे. शत्रूंचीं शिरकमलें उडविणारें, रक्तांच्या नद्या निर्माण करणारें व मस्तकांचे पर्वत रचणारें तें भारतीय युद्ध अलीकडच्या तृणोत्पाटक आंदोलनाप्रमाणें नकली युद्ध नव्हतें. शत्रुपक्षाचा सेनापति होऊन आपल्या अंगावर चाल करून येणाऱ्या मद्रराज शल्याला युधिष्ठिरांनीं प्रत्यक्ष ठार मारल्याचा महाभारतांत उल्लेख आहे. महाभारतकार म्हणतातः—

**प्रसार्य बाहुं सुदृढं सुपाणिं क्रोधेन नृत्यन्निव धर्मराजः ।। ४८**
**तां सर्वशक्त्या प्रहितां सुशक्तिं युधिष्ठिरेणाप्रतिवार्यवीर्याम् ।**
**प्रतिग्रहायाभिननर्द शल्यः सम्यग्घुतामग्निरिवाज्यधाराम् ।। ४९**
**सा तस्य मर्माणि विदार्य शुभ्रमुरो विशालं च तथैव भित्त्वा ।**
**विवेश गां तोयमिवाप्रसक्ता यशो विशालं नृपतेर्दहन्ती ।। ५०**
**नासाक्षिकर्णास्यविनिःसृतेन प्रस्यन्दता च व्रणसंभवेन ।**
**संसिक्तगात्रो रुधिरेण सोऽभूत्क्रौञ्चो यथा स्कन्दहतो महाद्रिः ।। ५१**

प्रसार्य बाहू च रथाद्‌गतो गां संछिन्नवर्मा कुरुनन्दनेन ।
महेन्द्रवाहप्रतिमो महात्मा वज्राहतं शृङ्गमिवाचलस्य ।। ५२
बाहू प्रसार्याभिमुखो धर्मराजस्य मद्रराट् ।
ततो निपातितो भूमाविन्द्रध्वज इवोच्छ्रितः ।। ५३
—महाभारत, शल्यपर्व अध्याय १७

"आपला हात दृढपणें उंच उभारून क्रोधानें जणूं कीं काय नाचतच युधिष्ठिरांनीं प्राणपणानें शक्ति नांवाचें आयुध शल्यावर टाकलें. अग्नीनें ज्याप्रमाणें तुपाच्या धारेचें करावें त्याप्रमाणें शल्यानें त्या शक्तीचें स्वागत केलें. पण त्या शक्तीनें शल्याचीं मर्में व अवयव तोडून त्याच्या यशाचें दहन करीत त्याचें हृदय फोडून टाकलें. सर्वांग रक्तानें माखलें जाऊन स्कंदानें मारलेल्या क्रौंच नांवाच्या पक्षाप्रमाणें शल्य रथांतून हात पसरून खालीं पडला. ऐरावताप्रमाणें धिप्पाड दिसणारा तो शल्य वज्रानें तोडून पाडलेल्या पर्वतशिखराप्रमाणें अथवा देवेंद्राच्या ध्वजाप्रमाणें धर्मराजासमोर मरून पडला."

युधिष्ठिरावर तथाकथित अहिंसेचा आरोप करणाऱ्यांनीं हें वर्णन नीट वाचून पहावें. दुष्टांच्या बाबतींत युधिष्ठिरांची खरी मनोवृत्ति काय होती यासंबंधीं संशयविच्छेद करणारा आणखी एक प्रसंग मी सांगतों. राजा दुर्योधन शल्यवधानंतर पाण्याच्या डोहांत जाऊन लपल्यावर त्याला शोधण्यासाठीं पांडव त्या डोहाजवळ आले. तेथें युधिष्ठिर त्याला जलाशयाच्या बाहेर येऊन युद्ध करण्याविषयीं सांगत असतां दुर्योधनानें त्यांना असें सांगितलें कीं, मला आतां राज्य करण्याची इच्छा नाहीं, तें मी तुला देतों; तूंच राज्य कर. त्यावेळीं त्याला उत्तर देतांना युधिष्ठिर म्हणतात :—

आर्तप्रलापान्मा तात सलिलस्थः प्रभाषिथाः ।
नतन्मनसि मे राजन् वाशितं शकुनेरिव ।। ५५
यदि वापि समर्थः स्यास्त्वं दानाय सुयोधन ।
नाहमिच्छेयमवनिं त्वया दत्तां प्रशासितुम् ।। ५६
अधर्मेण न गृह्णीयां त्वया दत्तां महीमिमाम् ।
न हि धर्मः स्मृतो राजन् क्षत्रियस्य प्रतिग्रहः ।। ५७

त्वया दत्तां न चेच्छेयं पृथिवीमखिलामहम् ।
त्वां तु युद्धे विनिर्जित्य भोक्तास्मि वसुधामिमाम् ।। ५८
अनीश्वरश्च पृथिवीं कथं त्वं दातुमिच्छसि ।
त्वयेयं पृथिवी राजन् किन्न दत्ता तदैव हि ।। ५९
धर्मतो याचमानानां प्रशमार्थं कुलस्य नः ।
वार्ष्णेयं प्रथमं राजन् प्रत्याख्याय महाबलम् ।। ६०
किमिदानीं ददासि त्वं को हि ते चित्तविभ्रमः ।
अभियुक्तस्तु को राजा दातुमिच्छेद्धि मेदिनीं ।। ६१
न त्वमद्य महीं दातुमीशः कौरवनन्दन ।
आच्छेत्तुं वा बलाद्राजन् स कथं दातुमिच्छसि ।। ६२
मां तु निर्जित्य संग्रामे पालयेमां वसुन्धराम् ।
सूच्यग्रेणापि यद्भूमेरपि भिद्येत भारत ।। ६३
तन्मात्रमपि तन्मह्यं न ददाति पुरा भवान् ।
स कथं पृथिवीमेतां प्रददासि विशांपते ।। ६४
सूच्यग्रं नात्यजः पूर्वं स कथं त्यजसि क्षितिं ।
एवमैश्वर्यमासाद्य प्रशास्य पृथिवीमिमाम् ।। ६५
को हि मूढो व्यवस्येत शत्रोदातुं वसुंधराम् ।
त्वं तु केवलमौर्ख्येण विमूढो नावबुद्धयसे ।। ६६
पृथिवीं दातुकामोऽपि जीवितेन विमोक्ष्यसे ।
अस्मान्वा त्वं पराजित्य प्रशाधि पृथिवीमिमाम् ।। ६७
अथवा निहतोऽस्माभिर्व्रज लोकाननुत्तमान् ।
आवयोर्जीवतो राजन् मयि च त्वयि च ध्रुवम् ।। ६८
संशयः सर्वभूतानां विजये नौ भविष्यति ।
जीवितं तव दुष्प्रज्ञ मयि संप्रति वर्तते ।। ६९
जीवयेयमहं कामं न तु त्वं जीवितुं क्षमः ।
दहने हि कृतो यत्नस्त्वयाऽस्मासु विशेषतः ।। ७०
आशीविषैर्विषैश्चापि जले चापि प्रवेशनैः ।
त्वया विनिकृता राजन् राज्यस्य हरणेन च ।। ७१
अप्रियाणां च वचनैर्द्रौपद्याः कर्षणेन च ।
एतस्मात्कारणात्पाप जीवितं ते न विद्यते ।। ७२
उत्तिष्ठोत्तिष्ठ युध्यस्व युद्धे श्रेयो भविष्यति ।। ७३

—महाभारत, शल्यपर्व अध्याय ३१

"हे राजन्, पाण्यांत राहून उगाच आर्त प्रलाप करूं नकोस. खरोखरी तुझ्या मनांतील कांहींच तू बोलत नाहींस. तुझ्या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पक्ष्याचें पुटपुटणें जितकें निरर्थक तितकेंच तुझें बोलणेंही निरर्थक आहे. हे सुयोधना, तूं पृथ्वी द्यावयास समर्थ असतास तरी ती मी घेतली नसती. दान घेणें हा क्षत्रियांचा धर्म नाहीं व अधर्मानें मला पृथ्वी नको. तूं दिलेली पृथ्वी मला नको आहे. युद्धांत तुला जिंकून मी पृथ्वीचा उपभोग घेणार आहें. आतां तूं पृथ्वीचा धनी नाहींस. मग आपल्या स्वाधीन नसलेली पृथ्वी देण्याचा तुला अधिकार काय ? ज्या वेळीं कुळाच्या शांतीप्रीत्यर्थ आम्ही आमची अधिकाराची भूमि मागत होतों, त्या वेळीं ती तूं कां दिली नाहींस? त्या वेळीं महाबल श्रीकृष्णांना झिडकारून आतां तूं पृथ्वी द्यावयास सिद्ध झालास ! तुला भ्रम तर झाला नाहीं ? कोणता अभिजात राजा पृथ्वीचें दान घेऊं इच्छील ? आतां तूं पृथ्वी दानही देण्याच्या परिस्थितींत नाहींस. व स्वतःही उपभोगण्याच्या परिस्थितींत नाहींस. सुईच्या अग्रावर राहील इतकीदेखील भूमि द्यावयास सिद्ध नसणारा तूं आतां सारीच पृथ्वी दान द्यावयास सिद्ध आहेस ! याचा अर्थ इतकाच कीं, मृत्युभयानें सारासार विवेकहीन होऊन तू मूर्ख बनला आहेस. पृथ्वी देण्याची इच्छा करून देखील तूं जिवंत रहाणार नाहींस. एक तर आम्हांला जिंकून पृथ्वीचें राज्य संभाळ किंवा आम्ही तुला ठार मारल्यावर दिव्य गतीला जा. दुसरा कोणताही मार्ग तुझ्यासाठीं नाहीं. एक तर तू तरी मेलें पाहिजेस किंवा आम्ही तरी. आपण दोघेही खात्रीनें जिवंत राहूं शकणार नाहीं. दोघांच्याही जिवंत राहण्यांत विजय संशयित राहील. तसें मला नको आहे. हे दुर्बुद्धे ! हें तुझें जीवित माझ्या स्वाधीन आहे. मी तुला पुष्कळ जिवंत ठेवलें असतें पण तू जिवंत रहाण्याच्या योग्यतेचा नाहींस. कोणतीं महापातकें करावयाचीं तूं शिल्लक ठेवलीं आहेस ? आम्हांला जाळण्याचा प्रयत्न केलास. विष दिलेंस. सर्प चावविलेस. नदींत बुडविलेंस. राज्य कपटानें हरण करून घेतलेंस. हवें तें अप्रिय बोललास. द्रौपदीचें कर्षण केलेंस. ह्या सर्व कारणास्तव हे पापात्म्या, तुला

यापुढें जिवंत रहाण्याचा अधिकार नाहीं. ऊठ व युद्ध कर. युद्धांतच तुझें कल्याण आहे."

हा उतारा वाचल्यावर युधिष्ठिर हे वैदिकधर्मीय अहिंसक होते, महावीरपंथी अहिंसेशीं त्यांचा कांहीं संबंध नाहीं हें चांगलेंच स्पष्ट होईल.

## युधिष्ठिरांतील दोष

मानवतेच्या इतक्या देदीप्यमान गुणांनीं युक्त असणारे युधिष्ठिर कांहीं विलक्षण स्वरूपाच्या दोषांनीं युक्त होते. ते तसे नसते तर मर्यादापुरुषोत्तम श्रीरामचंद्रांशीं राज्यव्यवस्थेच्या बाबतींत त्यांची जशी तुलना होते, तशीच ती सर्व बाबतींत झाली असती. पण मानवी जीवनाची अपूर्णता युधिष्ठिराच्या दोषांकडे पाहून मनाला पटल्याविना रहात नाहीं. युधिष्ठिरांना शुद्ध धर्माची जाणीव होती. पण जगांतील वैषम्यांत आपद्धर्माचा आश्रय केल्यावांचून शुद्ध धर्म जगूं शकत नाहीं हें त्यांना कधींच उमगलें नाहीं. अति विचार व संशयात्मकता यांमुळें विलक्षण स्वरूपाची अकर्मण्यता त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होऊन दुष्टांविषयीं आवश्यक तो कणखरपणा त्यांच्या ठिकाणीं मुळींच उत्पन्न झाला नाहीं. त्यांचें हृदय भावनानिष्ठ होतें; पण त्या साऱ्या भावना कोमल व ऋजु होत्या. आर्यधर्माला आत्यंतिक धर्मश्रद्धेंतून त्याच्या हेतूकडे लक्ष न देतां केवळ अंगाकडेच लक्ष दिल्यानें जी विकृति आली त्यामुळें त्याचें जें तेज लोपलें त्याचें युधिष्ठिर हे उदाहरण होत. अंतर्गत मानसिक विकृतीमुळें भीम व अर्जुन यांसारखे समर्थ बंधु असूनही युधिष्ठिरांना त्यांचा उपयोग करून घेतां आला नाहीं. कारण त्यांचें दुबळेपण बाह्य नसून अंतर्गत होतें. धर्माच्या हेतूकडे न पाहतां केवळ त्याच्या अंगाकडेच भर दिल्यामुळें जें कार्पण्य अथवा दुबळेपण व धर्मसंमूढचेतत्व अथवा धर्माविषयींची सदाची संशयात्मकता निर्माण होते त्याचें शब्दचित्र महर्षि व्यासांनीं युधिष्ठिराच्या रूपानें निर्माण केलें आहे. तें कार्पण्याचें चित्र इतकें परिपूर्ण आहे कीं, त्याचें आश्चर्य वाटतें. पितामह भीष्म, भगवान् श्रीकृष्ण व महर्षि

व्यास यांच्या उपदेशांनींही युधिष्ठिरांचा शोक जाऊं शकला नाहीं. महर्षि व्यास यांच्या उपदेशानें त्यांचा शोक गेला नाहीं म्हणूनच भगवान् श्रीकृष्णांनीं त्यांना पितामह भीष्मांकडे नेलें. युधिष्ठिरांचें भीष्मापुढें वर्णन करीत असतां भगवान् श्रीकृष्ण म्हणतातः—

लज्जया परयोपेतो धर्मराजो युधिष्ठिरः ।
अभिशापभयाद्भीतो भवन्तं नोपसर्पति ।। ११
लोकस्य कदनं कृत्वा लोकनाथो विशांपते ।
अभिशापभयाद्भीतो भवन्तं नोपसर्पति ।। १२
पूज्यान्मान्यांश्च भक्तांश्च गुरून्सम्बन्धिबान्धवान् ।
अर्घार्हानिषुभिर्भित्त्वा भवन्तं नोपसर्पति ।। १३

—महाभारत, शान्तिपर्व अध्याय ५५

"धर्मराज युधिष्ठिर अत्यंत लज्जित झालेला असून अभिशापाच्या भीतीनें आपणांजवळ येत नाहीं. लोकनाथ असून लोकांचें कंदन केल्याची व ज्यांची पूजा करावी असे पूज्य, मान्य, गुरु व संबंधी बांधव यांचीं शरीरें बाणांनीं फाडल्याची याला खंत वाटत आहे."

पितामह भीष्मांनीं त्यावर युधिष्ठिराला सर्व राजधर्माचें प्रकाशन केलें व त्याला असें सांगितलें कीं :—

ब्राह्मणानां यथा धर्मो दानमध्ययनं तपः ।
क्षत्रियाणां तथा कृष्ण समरे देहपातनम् ।। १४
पितॄन्पितामहान्भ्रातॄन् गुरून्सम्बन्धिबान्धवान् ।
मिथ्याप्रवृत्तान् यः संख्ये निहन्याद्धर्म एव सः ।। १५
समयत्यागिनो लुब्धान्गुरूनपि च केशव ।
निहन्ति समरे पापान्क्षत्रियो यः स धर्मवित् ।।१६
यो लोभान्न समीक्षेत धर्मसेतुं सनातनम् ।
निहन्ति यस्तं समरे क्षत्रियो वै स धर्मवित् ।।१७
लोहितोदां केशतृणां गजशैलां ध्वजद्रुमाम् ।
महीं करोति युध्देषु क्षत्रियो यः स धर्मवित् ।।१८
आहूतेन रणे नित्यं योध्दव्यं क्षत्रबन्धुना ।
धर्म्यं स्वर्ग्यं च लोक्यं च युध्दं हिं मनुरब्रवीत् ।।१९

—महाभारत शान्तिपर्व अध्याय ५५

"ज्याप्रमाणें दान, अध्ययन, व तपश्चर्या हा ब्राह्मणांचा धर्म आहे, त्याचप्रमाणें युद्धांत वध करणें हा क्षत्रियांचा धर्म आहे. पूर्वज, पिता, पितामह, भ्राते, गुरु, संबंधी व बांधव हे कपटानें असत्याचरण करावयास सिद्ध झाले असतां क्षत्रियानें त्यांना ठार मारून टाकणें हाच त्याचा धर्म आहे. मर्यादा सोडणारे लोभी व पापी दुर्जन यांना जो युद्धांत ठार मारतो तोच खरा क्षत्रिय होय. लोभानें धर्माची मर्यादा न ओळखणाऱ्या क्षत्रियांना युद्धांत ठार मारलेंच पाहिजे. रक्त हेंच जेथील उदक आहे; केश हेंच शेवाळ आहे, हत्तींचीं धिप्पाड शरीरें हेच जेथील खडक व ध्वज हेच द्रुम होत, अशी पृथ्वी जो क्षत्रिय करतो तोच खरा धर्मवेत्ता होय. आव्हान दिल्यावर क्षत्रियानें युद्ध करणें हाच त्याला स्वर्गप्राप्ति करून देणारा खरा धर्ममार्ग होय. स्वतःच्या वधाचें देखील या पद्धतीनें समर्थन करणाऱ्या पितामह भीष्मांच्या तोंडून सर्व प्रकारचें ज्ञान ऐकून व स्वतः ज्ञानसंपन्न झाल्याचें त्यांना सांगूनदेखील युधिष्ठिराचा मोह व त्याचें रडणें कधींही थांबलें नाहीं." साऱ्या शांतिपर्वांत व अनुशासनपर्वांत इतकें सगळें ऐकल्यावरही युधिष्ठिर श्रीकृष्णांना काय म्हणतात तें पाहण्यासारखें आहे. युधिष्ठिर म्हणतातः—

**प्रियं तु मे स्यात्सुमहत्कृतं चक्रगदाधर ।**
**श्रीमन्प्रीतेन मनसा सर्वं यादवनन्दन ॥ ११**
**यदि मामनुजानीयाद्भवान्गन्तुं तपोवनम्**
**न हि शांतिं प्रपश्यामि पातयित्वा पितामहम् ॥ १२**
**कर्णं च पुरुषव्याघ्रं संग्रामेष्वपलायिनम् ।**
**कर्मणा येन मुच्येयमस्मात्क्रूरादरिन्दम ॥ १३**

**—महाभारत, आश्वमेधिकपर्व अध्याय २**

"हे चक्रगदाधरा, जर मला तूं तपोवनांत जाण्याची आज्ञा देशील तर मला फार आनंद होईल. पितामह भीष्म व संग्रामांत कधींही पळून न जाणारा पुरुषव्याघ्र कर्ण यांना ठार मारण्याच्या क्रूर कर्माच्या पापापासून माझी कशी सुटका होईल या भीतीनें मला मुळींच शांति नाहीं." युधिष्ठिरांचे हे उद्गार वाचले म्हणजे त्यांच्या मोहाकुलतेची खरी कल्पना आल्यावांचून राहात नाहीं. मोठ्या माणसाच्या प्रत्येक

गोष्टीचें समर्थनच करावयाचें अशा कोमल मनोवृत्तीच्या युधिष्ठिर-भक्तांना युधिष्ठिरांच्या धर्मकार्पण्याचा उल्लेख केला कीं वाईट वाटून ते त्याचें वेगवेगळ्या प्रकारें समर्थन करूं लागतात. पण महाभारत वाचलें कीं तें सारें समर्थन लंगडें पडावें अशी वस्तुस्थिति आहे. तसें तें करतां आलें असतें तर मला खरोखरच आनंद झाला असता; पण महाभारताच्या उपलब्ध संहितेनुसार तत्कालीन मोठमोठ्या व्यक्तींचे युधिष्ठिरासंबंधीचे अभिप्राय पाहिले तर ते माझ्याच सिद्धान्ताला पुष्टि आणतात असें आढळून येईल. या ठिकाणीं युधिष्ठिरासंबंधीचे तीन मोठ्या व्यक्तींचे अभिप्राय मी देतों. त्या तीन मोठ्या व्यक्ति म्हणजे एक प्रत्यक्ष युधिष्ठिरांची माता कुंती, दुसरे ज्यांच्या संपूर्ण जीवनांत असत्याचा डागही कधीं लागलेला नाहीं असे पितामह भीष्म व तिसरे पूर्णावतार भगवान् श्रीकृष्ण होत. कुंतीनें यधिष्ठिरासंबंधींचा आपला अभिप्राय उद्योगपर्वांत भगवान् श्रीकृष्ण शिष्टाईसाठीं कौरवांच्या राजनगरींत आले असतां त्यांच्याजवळ व्यक्त केला आहे. भगवान् कृष्ण विफलमनोरथ होऊन परत उपप्लव्यास निघाले असतां कुंतीची भेट घेण्यास गेले. त्यावेळीं तुझ्या पुत्रांसाठीं तुझा कांहीं निरोप आहे काय असें त्यांनीं तिला विचारलें असतां कुंती त्यांना म्हणते :—

**ब्रूयाः केशव राजानं धर्मात्मानं युधिष्ठिरम् ।**
**भूयांस्ते हीयते धर्मो मा पुत्रक वृथा कृथाः ॥ ५**
**श्रोत्रियस्येव ते राजन् मन्दकस्याविपश्चितः ।**
**अनुवाकहताबुद्धिर्धर्ममेवैकमीक्षते ॥ ६**
**अङ्गावेक्षस्व धर्मं त्वं यथा सृष्टः स्वयंभुवा ।**
**बाहुभ्यां क्षत्रियाः सृष्टा बाहुवीर्योपजीविनः ॥ ७**
**क्रूराय कर्मणे नित्यं प्रजानां परिपालने । ८**
**ब्राह्मणः प्रचरेद्भैक्ष्यं क्षत्रियः परिपालयेत् ।**
**वैश्यो धनार्जनं कुर्याच्छूद्रः परिचरेच्च तान् ॥ ३०**
**भैक्ष्यं विप्रतिषिद्धं ते कृषिर्नैवोपपद्यते ।**
**क्षत्रियोऽसि क्षतात्त्राता बाहुवीर्योपजीविता ॥ ३१**

पित्र्यमंशं महाबाहो निमग्नं पुनरुद्धर ।
साम्ना भेदेन दानेन दण्डेनाथ नयेन वा ॥ ३२
इतो दुःखतरं किं नु यदहं हीनबान्धवा ।
परपिण्डमुदीक्षे वै त्वां सूत्वा मित्रनन्दन ॥ ३३
युध्यस्व राजधर्मेण मा निमज्जीः पितामहान् ।
मा गमः क्षीणपुण्यस्त्वं सानुजः पापिकां गतिम् ॥ ३४

—महाभारत, उदयोगपर्व अध्याय १३२

"हे केशवा, धर्मात्मा युधिष्ठिराला तूं जाऊन असें सांग कीं, वास्तविक तुझ्या आचरणानें धर्माची अतिशय हानीच होत आहे. धर्माच्या नांवाखालीं उगाच भलतेंच आचरण करीत बसूं नकोस. मंदबुद्धीच्या विचक्षण नसलेल्या वेदपाठकाची बुद्धि, ज्याप्रमाणें केवळ वेदाच्या अक्षरावरच खिळून राहाते, तसेंच धर्म धर्म करीत असतां तुझेंही झालें आहे. परमेश्वरानें तुला जसें उत्पन्न केलें त्याच अनुरोधानें तुला धर्माचें आचरण करावयास पाहिजे. क्षत्रिय ईश्वराच्या बाहूंपासून उत्पन्न झाले आहेत. बाहूंच्या पराक्रमावरच त्यांचें उपजीवन अवलंबून आहे. प्रजांच्या परिपालनासाठीं व युद्धासारख्या क्रूर कर्मासाठींच क्षत्रियांची उत्पत्ति आहे. चातुर्वर्ण्यात्मक समाजरचनेंत ब्राह्मणानें भिक्षेनें आपलें उपजीवन चालवावें, क्षत्रियानें प्रजेचें परिपालन, म्हणजेच राज्य करावें, वैश्यानें धन मिळवावें व व्यापार करावा, व शूद्रानें त्रैवर्णिकांची परिचर्या करावी असें ठरलेलें आहे. तुला भिक्षा मागून पोट भरतां येणार नाहीं. कारण त्याचा तुला निषेध आहे. तूं वैश्य नसल्यामुळें तुला शेतीही करतां येणार नाहीं. बाहुवीर्यावर ज्यांचें उपजीवन आहे अशा लोकांना संकटांपासून वांचविणारा तूं क्षत्रिय आहेस. तुझ्या वर्णधर्माप्रमाणेंच तुला वागलें पाहिजे. तुझ्या पित्याचा अंश शत्रूंनीं गिळंकृत केलेला आहे. साम, दाम, भेद, दंड अथवा इतर कोणत्याही उपायानें तो तुला परत मिळविलाच पाहिजे. तो तूं परत मिळीव. तुझ्यासारख्या मुलाला जन्म देऊन माझ्यासारख्या आईनें दुसऱ्याच्या घरीं तुकडा मोडीत बसावें ही गोष्ट तुला शोभते काय ? राजधर्माप्रमाणें युद्ध कर. भलतेंच आचरण करून आपल्या पितामहांना नरकांत घालूं नकोस; व

स्वतःचा पुण्यक्षय करून आपल्या बंधूंसहित तूंही नरकांत जाऊं नकोस."

कुंतीचीं हीं वाक्यें वाचलीं म्हणजे युधिष्ठिरांच्या धर्मकार्पण्याविषयीं वस्तुतः संशय राहूं नये. पण ती दुःखांत होती व अप्रतिष्ठेनें पीडलेली होती म्हणून ती असें बोलली असें जर कोणाचें म्हणणें असेल तर प्रत्यक्ष भीष्मांनींच युधिष्ठिरांच्या बाबतींत त्यांच्या तोंडावर काय अभिप्राय प्रकट केलेला आहे तो पाहण्यासारखा आहे. ज्या वेळीं युधिष्ठिर मी राज्य सोडून वनांत जातों असें म्हणूं लागले तेव्हां शांतिपर्वांत पितामह भीष्म त्यांना म्हणतात :—

**वेदाहं तव या बुद्धिरानृशंस्याऽगुणैव सा ।**
**न च शुद्धा नृशंसेन शक्यं राज्यमुपासितुम् ।। १८**
**अपि तु त्वां मृदुप्रज्ञमत्यार्यमतिधार्मिकम् ।**
**क्लीबं धर्मघृणायुक्तं न लोको बहु मन्यते ।। १९**
**वृत्तं तु स्वमपेक्षस्व पितृपैतामहोचितम् ।**
**नैव राज्ञां तथावृत्तं यथा त्वं स्थातुमिच्छसि ।। २०**
**न हि वैक्लव्यसंसृष्टमानृशंस्यमिहास्थितः ।**
**प्रजापालनसंभूतमाप्ता धर्मफलं ह्यसि ।। २१**
**न ह्येतामाशिषं पाण्डुर्न च कुन्ती त्वयाचत ।**
**तथैतत्प्रज्ञया तात यथाऽऽचरसि मेधया ।। २२**
**शौर्यं बलं च सत्यं च पिता तव सदाऽब्रवीत् ।**
**माहात्म्यं च महोदार्यं भवतः कुन्त्ययाचत ।। २३**

**—महाभारत, शांतिपर्व अध्याय ७५**

"तुझें अंतःकरण केवळ दयामय आहे याची मला पूर्णपणें जाणीव आहे. पण शुद्ध दयापूर्ण अंतःकरणाच्या व्यक्तीला राज्य कधींही चालवितां येणार नाहीं. उलट तुझ्यासारख्या कोमल बुद्धीच्या, अतिधर्मभीरु, अत्यंत उच्च आचरणाच्या व प्रत्येक पाऊल, धर्म तर बिघडणार नाहीं ना, म्हणून फुंकून टाकणाऱ्या व म्हणूनच क्लीबत्व (षंढत्व) आलेल्या व्यक्तीला लोक मान्यता देत नाहींत. ज्या कुलांत तूं उत्पन्न झालेला आहेस तेथील आपल्या पितृपितामहांचें चारित्र्य पहा. तूं जसें वागूं इच्छितोस तसें राजे वागत नसतात. विकल-

तेनें युक्त असें दयापूर्ण व रडवें अंतःकरण बाळगून प्रजापालनानें मिळणारें धर्मफल तुला कधींही मिळावयाचें नाहीं. तूं जसें वागूं इच्छितो आहेस तसें तूं वागावें म्हणून कुंती व पांडू यांनीं कधींही अपेक्षिलें नव्हतें." भीष्म तर कुंतीप्रमाणें शोकांत नाहींत ना? त्यांचा युधिष्ठिराला दिलेल्या या प्रशस्तिपत्रकाचा काय अर्थ आहे?

आतां श्रीकृष्ण काय म्हणतात पहा. भीष्मनिर्याणानंतर युधिष्ठिर पुनश्च शोकाकुल होऊन तपस्येला जाण्याचें बोलूं लागले, त्या वेळीं श्रीकृष्ण म्हणतात:

**श्रुताश्च राजधर्मास्ते भीष्मात् भागीरथीसुतात् ।**
**कृष्णद्वैपायनाच्चैव नारदाद्विदुरात्तथा ।। ५**
**नेमामर्हसि मूढानां वृत्तिं त्वमनुवर्तितुम् ।**
**पितृपैतामहं वृत्तमास्थाय धुरमुद्वह ।। ६**

—महाभारत, आश्वमेधिकपर्व अध्याय २

"भागीरथीपुत्र भीष्म, व्यास, नारद व विदुर यांच्याजवळून तूं राजधर्म ऐकिलेले आहेस. तुझ्यासारख्यानें मूर्ख माणसाप्रमाणें वागणें योग्य नव्हे. आपल्या पूर्वजपरंपरेला अनुसरून वाग. राज्य कर." युधिष्ठिराचें हें धर्मकार्पण्य व धर्मसंमूढचेतत्व तत्कालीन सर्व श्रेष्ठांना चांगलेंच परिचित आहे यांत शंका नाहीं. त्याचे परिणामही ठिकठिकाणीं दिसलेले आहेत.

## दयेचा अनाठायीं वापर

दया हा धर्म खरा, पण त्याचा अनाठायीं वापर केला तर तो अधर्म झाल्याविना रहात नाहीं. धर्माच्या मूळ हेतूकडे दुर्लक्ष करून त्याच्या केवळ अंगावर जोर दिला तर जो धर्मनाश होतो तो अशाच ठिकाणीं होय. युधिष्ठिरांच्या दयामयतेनें असाच तोल सोडलेला आहे. त्याचें एक उदाहरणच येथें देतों. सिंधु देशाचा राजा जयद्रथ हा राजा धृतराष्ट्राचा जांवई होता. त्यानें पांडव वनवासांत असतां एकदां ते मृगयेला गेले आहेत असें पाहून आश्रमांत एकटीच असलेल्या द्रौपदीला पळविलें. पुढें भीमानें त्याच्या सहायकांना ठार मारून त्याला खूप मार दिला व फरफटत ओढीत राजा युधि-

ष्ठिराकडे आणलें. कुलस्त्रियांच्या अब्रूवर निखारे ठेवणाऱ्या नराधमांना देहान्त शासनच द्यावयास हवें. पण कोमल अंतःकरणाचे युधिष्ठिर भीमाला म्हणतात :—

**तमुवाच ततो ज्येष्ठो भ्राता सप्रणयं वचः ।**
**मुंचेममधमाचारं प्रमाणा यदि ते वयम् ॥ १७**

**—महाभारत, वनपर्व अध्याय २७२**

"जर आमची आज्ञा ऐकणें तुला स्वतःचें कर्तव्य वाटत असेल तर या अधर्म आचार करणाऱ्या जयद्रथाला तूं सोडून दे." जयद्रथानें या दयेचा इतकाच उपयोग केला कीं, पांडवांच्या पराजयाचें शंकर भगवानांकडून वरदान मागून, युद्धांत त्यांच्या विरुद्ध पक्षाला मिळून अभिमन्युवधाचें तो एक महत्त्वाचें कारण ठरला. जीवदया मंडळाच्या अध्यक्षांनीं विंचवावर दया दाखवून त्याला सोडलें तों त्यानें त्यांच्याच मनगटाचा पहिल्या प्रथम चावा घेतला.

## न्यायाचा अनाठायीं वापर

दयेप्रमाणेंच न्यायाचाही युधिष्ठिरांनीं असाच अनाठायीं वापर केलेला आहे. सर्व सैनिक व सेनापति महायुद्धांत ठार झाल्यावर एकटचा उरलेल्या राजा दुर्योधनाला युद्धार्थ आव्हान देत असतां मला एकटचाला गांठून तुम्ही सर्व मिळून माझ्यावर चढाई करण्याचा अधर्म कराल काय असें त्यानें विचारतांच एकटचा अभिमन्यूला गांठून तुम्ही कां ठार मारलेंत असें त्याला विचारतां विचारतांच जशास तसें वागण्याचें धोरण न राखून युधिष्ठिरांनीं दुर्योधनाला कोणालाही न विचारतां पुढीलप्रमाणें वचन देऊन टाकलें. ते म्हणाले:—

**सर्वो विमृशते जन्तुः कृच्छ्रस्थो धर्मदर्शनम् ।**
**पदस्थः पिहितं द्वारं परलोकस्य पश्यति ॥ ५९**
**आमुञ्च कवचं वीर मूर्धजान् यमयस्व च ।**
**यच्चान्यदपि ते नास्ति तदप्यादत्स्व भारत ॥ ६०**
**इममेकं च ते कामं वीर भूयो ददाम्यहम् ।**
**पञ्चानां पाण्डवेयानां येन त्वं योद्धुमिच्छसि ॥ ६१**

तं हत्वा वै भवान् राजा हतो वा स्वर्गमाप्नुहि ।
ऋते च जीविताद्वीर युद्धे किं कुर्म ते प्रियम् ।। ६२
—महाभारत, शल्यपर्व अध्याय ३२

"प्रत्येक प्राणी संकटांत सांपडला म्हणजे नेहमीं धर्माची आठवण करतो, पण वैभवाच्या दिवसांत मात्र त्याच्या दृष्टीनें परलोकचे दरवाजेच बंद असतात. चिलखत घाल, केस सावर आणखी जें तुला हवें असेल तें मागून घे. केवळ तुझें जीवित सोडून तुला जें हवें असेल तें द्यावयास मी सिद्ध आहें. आणखी एक वर मी तुला देतों. आम्हां पांच बंधूंपैकीं कोणालाही तूं युद्धाला आव्हान कर. कोणच्याही एका बंधूला तूं मारलेंस तरी सर्व राज्य तुझें होईल." युधिष्ठिर जें वाक्य बोलले तें पांडवपक्षाची इतकी हानि करणारें होतें कीं हातीं आलेलें राज्य आयत्या वेळीं गमाविलें जावें. समजा दुर्योधनानें युधिष्ठिरालाच युद्धाला आव्हान केलें असतें तर काय अवस्था झाली असती ? त्याचें हें भलतेंच औदार्य पाहून भगवान् श्रीकृष्णही अत्यंत संतापले व ते म्हणाले कीं :—

युधिष्ठिरस्य संक्रुद्धो वासुदेवोऽब्रवीदिदम् ।। १
यदि नाम ह्ययं युद्धे वरयेत्त्वां युधिष्ठिर ।
अर्जुनं नकुलं चैव सहदेवमथापि वा ।। २
किमिदं साहसं राजंस्त्वया व्याहृतमीदृशम् ।
अेकमेव निहत्याजौ भव राजा कुरुष्विति ।। ३
न समर्थानहं मन्ये गदाहस्तस्य संयुगे ।
एतेन हि कृता योग्या वर्षाणीह त्रयोदश ।। ४
आयसे पुरुषे राजन् भीमसेनजिघांसया ।
कथं नाम भवेत्कार्यमस्माभिर्भरतर्षभ ।। ५
साहसं कृतवांस्त्वं तु ह्यनुक्रोशान्नृपोत्तम ।
नान्यमस्यानुपश्यामि प्रतियोद्धारमाहवे ।। ६
ऋते वृकोदरात्पार्थात्स च नाति कृतश्रमः ।
तदिदं द्यूतमारब्धं पुनरेव यथा पुरा ।। ७
विषमं शकुनेश्चैव तव चैव विशांपते ।
बली भीमः समर्थश्च कृती राजा सुयोधनः ।। ८

बलवान्वा कृती वेति कृती राजन्विशिष्यते ।
सोऽयं राजंस्त्वया शत्रुः समे पथि निवेशितः ।। ९
न्यस्तश्चात्मा सुविषमे कृच्छ्रमापादिता वयम् ।
को नु सर्वान्विनिर्जित्य शत्रूनेकेन वैरिणा ।। १०
कृच्छ्रप्राप्तेन च तथा हारयेद्राज्यमागतम् ।
पणित्वा चैकपाणेन रोचयेदेवमाहवम् ।। ११
न हि पश्यामि तं लोके योऽद्य दुर्योधनं रणे ।
गदाहस्तं विजेतुं वै शक्तः स्यादमरोऽपि हि ।। १२
न त्वं भीमो न नकुलः सहदेवोऽथ फाल्गुनः ।
जेतुं न्यायेन शक्तो वै कृती राजा सुयोधनः ।। १३
स कथं वदसे शत्रुं युध्यस्व गदयेति हि ।
एकं च नो निहत्याजौ भव राजेति भारत ।। १४
वृकोदरं समासाद्य संशयो वै जये हि नः ।
न्यायतो युध्यमानानां कृती ह्येष महाबलः ।। १५
एकं वाऽस्मान्निहत्य त्वं भव राजेति वै पुनः ।
नूनं न राज्यभागेषा पाण्डोः कुन्त्याश्च संततिः ।। १६
अत्यन्तवनवासाय सृष्टा भैक्ष्याय वा पुनः ।। १७

—महाभारत, शल्यपर्व अध्याय ३३

"युधिष्ठिराचें हें वाक्य ऐकतांच संतापलेले श्रीकृष्ण म्हणाले, हे युधिष्ठिरा, जर दुर्योधनानें तुला, अर्जुनाला, नकुलाला किंवा सहदेवाला द्वंद्व युद्धासाठीं आव्हान दिले तर तुमची काय अवस्था होईल? कोणाही एकाला मारून तूं राजा हो असें दुर्योधनाला म्हणण्यांत तूं केवढें भयंकर साहस केलें आहेस याची तुला कांहीं कल्पना आहे का? गदा हातांत घेतलेल्या दुर्योधनाशीं लढावयास तुमच्यापैकीं कोणीही समर्थ नाहीं असें माझें मत आहे. यानें भीमाला ठार मारण्यासाठीं त्याची लोखंडी प्रतिमा तयार करून तेरा वर्षें तिच्याशीं धडक देऊन आपली सिद्धता केली आहे. तूं केवळ हृदयाच्या औदार्यामुळें हें व्यर्थ साहस केलेंस. एकट्या भीमावांचून याच्याशीं कोणीही लढूं शकणार नाहीं. पण भीमानें याच्याइतके परिश्रम केलेले नाहींत. पुनः हें नवें द्यूतच तूं आरंभ केलेलें आहेस अशी माझी समजूत आहे. भीम

बलवान् असला तर दुर्योधन कृती आहे, व सामर्थ्यापेक्षां अभ्यासच शेवटीं विजयी ठरतो. अनायासें संकटांत सांपडलेल्या शत्रूला तूं मोकळीस दिलीस; व स्वत:ला मात्र अकारण भयंकर संकटांत अडकवून घेतलेंस. आपल्याबरोबर तूं आम्हांलाही संकटांत टाकलें आहेस. सर्व शत्रूंवर विजय संपादन करून एकटा उरलेला मुख्य शत्रु संकटांत सांपडलेला असतां आपणच आपल्याभोंवतीं अकारण संकट ओढवून घेऊन राज्य गमवावयास सिध्द असलेला केवळ तूंच मीं पाहिला! देवदेखील गदायुद्धांत दुर्योधनाला जिंकू शकतील असें मला वाटत नाहीं. न्यायानें दुर्योधनाला कधींच जिंकतां येणार नाहीं. तूं मात्र खुशाल त्याला वचन देऊन बसलास! मला असें वाटतें कीं कुंती व पांडू यांच्या संततीच्या कपाळीं राज्य लिहिलेलेंच नाहीं. सदाचा वनवास व भिक्षा मागून पोट जाळणें यासाठींच त्यांचा जन्म झाला असावा.

## द्यूताचें व्यसन

युधिष्ठिरांच्या सर्व सद्गुणांची माती करणारें एक विलक्षण व्यसन त्यांना होतें व तें म्हणजे द्यूताचें व्यसन होय. युधिष्ठिरांच्या समर्थकांचें असें म्हणणें आहे कीं, द्यूत हा क्षत्रियांचा धर्मच आहे. पण ही साफ खोटी गोष्ट आहे. द्यूत हा धर्म असूंच शकत नाहीं. धर्म म्हटला कीं तो विधिनिषेधरूप असतो. द्यूताचा विधि कोठेंतरी सांगितला आहे काय? अहरहः संध्यामुपासीत। वसन्ते वन्सते ज्योतिषा यजेत। रोजच्या रोज संध्या करावी व प्रत्येक वसंतऋतूंत सोमयाग करावा. या धर्माच्या आज्ञेप्रमाणें अमक्या एका दिवसांत द्यूत खेळावें अशी आज्ञा कोठेंही नाहीं. मोठे लोक द्यूत खेळल्याचें जेथें जेथें वर्णन आहे तेथें तेथें तें व्यसन म्हणूनच वर्णन आहे. पुण्यश्लोक नलराजा द्यूत खेळला तो कलीनें त्याच्या अंगांत प्रवेश केला होता म्हणून असें स्वच्छ वर्णन आहे. कलीनें जर प्रवेश केला नसता तर पुण्यश्लोक नलराजा स्वत: होऊन द्यूत खेळला नसता ही गोष्ट उघड आहे.

खुद्द ऋग्वेदांत या द्यूतांच्या निषेधाचें एक सूक्तच्या सूक्तच आलें आहे. त्यावरून द्यूत किती निषेध्य मानलें जात असे हें दिसून

येतें. तथापि तेव्हांपासून लोकांत द्यूताची चटक असावी असें दिसतें. या द्यूताचे दुष्परिणाम सांगतांना ऋग्वेदांत पुढीलप्रमाणें म्हटलें आहे :–

प्रावेपा मा बृहतो मादयन्ति प्रवातेजा इरिणे वर्वृतानाः ।
सोमस्येव मौजवतस्य भक्षो विभीदको जागृविर्मह्यमच्छान् ।। १
न मा मिमेथ न जिहीळ एषा शिवा सखिभ्य उत मह्यमासीत् ।
अक्षस्याहमेकपरस्य हेतोरनुव्रतामप जायामरोधम् ।। २
द्वेष्टि श्वश्रूरप जाया रुणद्धि न नाथितो विन्दते मर्डितारं ।
अश्वस्येव जरतो वस्न्यस्य नाहं विन्दामि कितवस्य भोगम् ।। ३
अन्ये जायां परि मृशंत्यस्य यस्यागृधद्वेदने वाज्यक्षः ।
पिता माता भ्रातर एनमाहुर्न जानीमो नयता बद्धमेतम् ।। ४
यदादीध्ये न दविषाण्येभिः परायद्भ्योऽव हीये सखिभ्यः ।
न्युप्ताश्च बभ्रवो वाचमक्रतें एमीदेषां निष्कृतं जारिणीव ।। ५ ।। ३ ।
सभामेति कितवः पृच्छमानो जेष्यामीति तन्वा शूशुजानः ।
अक्षासो अस्य वि तरन्ति कामं प्रतिदीव्ने दधत आ कृतानि ।। ६
अक्षास इदंकुशिनो नितोदिनो निकृत्वानस्तपनास्तापयिष्णवः ।
कुमारदेष्णा जयतः पुनर्हणो मध्वा संपृक्ताः कितवस्य बर्हणा ।। ७
त्रिपञ्चाशः क्रीळति व्रात एषां देव इव सविता सत्यधर्मा ।
उग्रस्य चिन्मन्यवे ना नमंते राजा चिदेभ्यो नम इत्कृणोति ।। ८
नीचा वर्तन्त उपरि स्फुरन्त्यहस्तासो हस्तवंतं सहन्ते ।
दिव्या अङ्गारा इरिणे न्युप्ताः शीताः संतो हृदयं निर्दहन्ति ।। ९
जाया तप्यते कितवस्य हीना माता पुत्रस्य चरतः क्वस्वित् ।
ऋणावा बिभ्यद्धनमिच्छमानोऽन्येषामस्तमुप नक्तमेति ।। १० ।। ४ ।।
स्त्रियं दृष्ट्वाय कितवं तताापान्येषां जायां सुकृतं च योनिम् ।
पूर्वाह्णे अश्वान्युयुजे हि बभ्रून्त्सो अग्नेरन्ते वृषलः पपाद ।। ११
यो वः सेनानीर्महतो गणस्य राजा व्रातस्य प्रथमो बभूव ।
तस्मै कृणोमि न धना रुणध्मि दशाहं प्राचीस्तदृतं वदामि ।। १२
अक्षैर्मा दीव्यः कृषिमित्कृषस्व वित्ते रमस्व बहु मन्यमानः ।
तत्र गावः कितव तत्र जाया तन्मे वि चष्टे सवितायमर्यः ।। १३
मित्रं कृणुध्वं खलु मृळता नो मा नो घोरेण चरताभि धृष्णु ।
नि वो नु मन्युर्विशतामरातिरन्यो बभ्रूणां प्रसितौ न्वस्तु ।। १४

(१) मोठाले उतारभूमीवर उत्पन्न झालेले, टाकले कीं सरकत जाणारे आणि खुळखुळणारे फांसे मला बेभान करतात. मूजवत पर्वतावर उत्पन्न झालेल्या सोमपानाप्रमाणें जागृत ठेवणारा बिब्याचा फांसा मला अत्यंत आनंदित करतो.

(२) माझ्या पत्नीनें माझा कधीं धिक्कार केला नाहीं, ती कधींही माझ्यावर चरफडली नाहीं, उलट माझ्याबद्दल व माझ्या मित्रांबद्दल तिच्या मनांत आदर असे. अशी जरी ती गुणवती होती, तरी फांशांच्या नादानें मी तिला घालवून दिलें. कारण फांशांवांचून मला कांहींच प्रिय वाटत नाहीं.

(३) माझी सासू माझा द्वेष करते, माझी बायको मला विचारीत नाहीं. उघडच आहे, जुगाऱ्याच्या विनवणीला कोण भीक घालतो? जुगाऱ्याचा उपयोग काय होईल हें समजतच नाहीं. म्हातारा झालेल्या घोड्याप्रमाणें तो निरुपयोगीच ठरतो.

(४) फांशांनीं खेळण्याकरतां हा जेव्हां बाहेर निघतो, तेव्हां याच्या बायकोचा हात परके धरतात. याचे भाऊ, बाप, आई म्हणतात, 'याला आम्ही ओळखत नाहीं. याला बांधून घेऊन जा.'

(५) आणि जरी मी आपल्या मनाशीं निश्चय केला कीं इतःपर फांशांनीं खेळावयाचें नाहीं, कां कीं त्यामुळें माझे मित्र माझा धिक्कार करतात, तरीदेखील फांशांचा आवाज ऐकल्याबरोबर व्यभिचाराला चटावलेल्या बाईप्रमाणें मी त्यांच्याकडे धांव घेतों.

(६) 'तेजःपुंज फांसे खेळणारा मी कोणाला जिंकूं' असें म्हणत मी खेळाडूंच्या सभेंत शिरतों. प्रतिस्पर्ध्यांशीं डाव करणाऱ्याचे फांसे सारखे जोरानें पडत असतात.

(७) हे फांसे म्हणजे मांसापर्यंत रुतणारे गळ आहेत, हे कपटी आणि फसवे आहेत, ह्यांच्यायोगें शरीराचा दाह होतो, त्याचे तुकडे होतात. थोड्याशा लाभाचें आमिष दाखवून ते जुगारी माणसाला नादीं लावतात. इतकें असूनही जुगाऱ्यांना त्यांचाच मोह पडतो.

(८) सत्यधर्मा सूर्याप्रमाणें याच्या त्रेपन्न फांशांचा संघ सारखा फिरत असतो. उग्र माणसाच्या रागालाही ते नमत नाहींत. राजासुद्धां फाशांना खेळतांना नमस्कारच करतो.

(९) फांसे खालीं पडतात, ते वर हवेंत खेळतात, त्यांना स्वतःला हात नसले तरी दुसऱ्यांच्या हातांना ते आपणांकडे ओढून घेतात. फांसे जादूच्या कोळशाप्रमाणें होत. ते स्वतः मृत असले तरी दुसऱ्याचीं अंतःकरणें जाळतात.

(१०) जुगाऱ्याची विरही पत्नी बिचारी एकटीच झुरत असते. आपला मुलगा कुठें भटकतो तें समजत नाहीं म्हणून त्याची आईसुद्धां दुःख करीत असते. हा स्वतः कर्जबाजारी व भयभीत होऊन धनाची इच्छा करीत हिंडतो व रात्रीचा परक्यांच्या घरांत दडून राहतो.

(११) दुसऱ्याची बायको सुखानें नांदतांना पाहून व त्याची गृहव्यवस्था पाहून याला अतोनात दुःख होतें. सकाळीं उजाडतांच हा पश्चात्तापानें फांसे फेंकून देतो, पण पश्चात्तापाची लहर मावळली कीं, हा विचारा पुनः मोहवश होतो.

(१२) हे फांशांनो, तुमच्या गणाचा जो मुख्य सेनापति असेल तसेंच जो व्राताचा मुख्य असेल त्याला मी नमस्कार करतों. आतां माझ्याजवळ पैसा नाहीं. मी माझ्या दहा अंगुली उघड्या करतों. मी खोटें सांगत नाहीं.

(१३) मला सन्माननीय सवितृदेवानें आज्ञा दिली आहे कीं फांशांनीं जुगार खेळूं नको. शेती कर, संपत्तीचा उपभोग घे, त्यांत गाई व स्त्री यांची प्राप्ति होईल.

(१४) हे फांशांनो, तुम्ही आमच्याशीं मैत्री करा. आम्हांला सुखी करा. आम्हांवर भयंकर आघात करूं नका. तुमचा राग आमच्या शत्रूवर जावो. आमचा शत्रु पिंगट वर्णाच्या तुमच्या बंधनांत तत्काल पडो." —ऋग्वेद, मं १०–३४

सारांश, द्यूत हा कोणाचाही धर्म सांगितलेला नाहीं. तें एक व्यसन आहे व माणसानें या व्यसनाच्या किती अधीन व्हावयाचें हाच काय तो प्रश्न आहे.

शकुनीनें युधिष्ठिराच्या बाबतींत—

**द्यूतप्रियश्च कौन्तेयो न स जानाति देवितुम् ।**
**समाहूतश्च राजेन्द्रो न शक्ष्यति निर्वर्तितुम् ।। १९**

**—महाभारत, सभापर्व अध्याय ४८**

'युधिष्ठर द्यूतप्रिय असून त्याला खेळतां मात्र येत नाहीं' असें जें म्हटलें आहे 'व एकदां आव्हान दिल्यावर तो तें नाकारणार नाहीं' असें जें त्याच्या मोहाचें वर्णन केलें आहे तें अक्षरशः खरें आहे. द्यूताची युधिष्ठिरांना इतकी ओढ आहे कीं, विराटाच्या राजनगरींत अज्ञातवासांत तुम्ही काय कराल असें अर्जुनानें त्यांना विचारलें असतां ते उत्तर देतातः—

**सभास्तारो भविष्यामि तस्य राज्ञो महात्मनः ।**
**कङ्को नाम द्विजो भूत्वा मताक्षः प्रियदेवनः ।। २४**
**वैदूर्यान्काञ्चनान् दान्तान् फलैर्ज्योतीरसैः सह ।**
**कृष्णाक्षाँल्लोहिताक्षांश्च निर्वर्त्स्यामि मनोरमान् ।। २५**
**विराटराजं रमयन् सामात्यं सहबान्धवम् ।**
**न च मां वेत्स्यते कश्चित् तोषयिष्ये च तं नृपम् ।। २६**

**—महाभारत, विराटपर्व अध्याय १**

"मी राजा विराटाचा सभास्तार होईन. कङ्क हें माझें नांव सांगून व फांसे ज्याला प्रिय आहेत असा द्यूतकुशल ब्राह्मण म्हणून मी तेथें राहीन. सोन्याचें काम केलेल्या पोवळ्याच्या फांशांनीं मी राजाचें मनरंजन करीन. राजाही प्रसन्न होईल व मलाही कोणी ओळखणार नाहीं."

युधिष्ठिर द्यूत शिकण्यासाठीं विराटाच्या राजनगरींत गेले होते व तेवढ्यासाठीं त्यांनीं हें काम पत्करलें असें जर कोणाचें म्हणणें असेल तर तें चुकीचें आहे. राजा नलाची गोष्ट युधिष्ठिराच्या अंगाशीं चिकटविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. अयोध्येचा राजा ऋतुपर्ण हा द्यूतविद्येमध्यें अत्यंत निष्णात असल्यामुळें पुष्कराला द्यूतांत हरविण्यासाठीं नल त्याच्याजवळ' द्यूत शिकला असें त्याच्यासंबंधानें वर्णन आहे. युधिष्ठिराला कोणाशींही द्यूत खेळावयाचें नव्हतें. नला-

प्रमाणें युधिष्ठिराचे बाबतींत तो शिकावयास गेल्याचा स्पष्ट उल्लेख नाहीं व ज्याच्याजवळ शिकावयाचें तो विराट अथवा त्याचे सभासद ऋतुपर्णाप्रमाणें द्यूतविद्येंत निष्णात असल्याचें वर्णन महाभारतांत नाहीं त्याअर्थीं हा तर्क निराधार आहे. द्यूत हा धर्म नसून तें सर्वस्वीं पाप आहे याची स्वतः युधिष्ठिरांना पूर्णपणें जाणीव आहे. ते स्वतःच शकुनीला म्हणतातः--

**निकृतिर्देवनं पापं न क्षात्रोत्र पराक्रमः ।**
**न च नीतिर्ध्रुवा राजन्किं त्वं द्यूतं प्रशंससि ।। ५**
**न हि मानं प्रशंसन्ति निकृतौ कितवस्य हि ।**
**शकुन मैवं नो जैषीरमार्गेण नृशंसवत् ।। ६**

**—महाभारत, सभापर्व अ. ५९**

"हे शकुने, द्यूत हें पाप आहे. त्यांत कसल्याही प्रकारचा क्षत्रियोचित पराक्रम नाहीं. नीतीचा त्यांत पत्ताही नाहीं. तूं द्यूताची प्रशंसा कां करतोस ? अमार्गानें तू एकाद्या नृशंसाप्रमाणें आम्हांला जिंकण्याची कां इच्छा करतोस? द्यूतकाराला कोणीही मान देत नसतात." द्यूत हा अधर्म आहे हें माहीत असतांनासुद्धां युधिष्ठिर त्यांत कां सांपडले असतील? एक तर व्यसन व दुसरें पितृगौरवाचा आंधळा वापर. हीं त्याचीं दोन कारणें होत. राजा धृतराष्ट्राची आज्ञा कशी मोडावी म्हणून युधिष्ठिर द्यूतास गेले असणें शक्य आहे. त्यांच्या अंतःकरणाचा हा नाजूक भाग ओळखूनच दुर्योधनाऐवजीं धृतराष्ट्रानें स्वतःच त्याला द्यूतासाठीं बोलाविलें होतें. त्याचा उल्लेख मी धृतराष्ट्राच्या व्यक्तिचित्रांत केलाच आहे. ते स्वतःच विदुराला म्हणतात :--

**नाहं राज्ञो धृतराष्ट्रस्य शासनान्न गन्तुमिच्छामि कवे दुरोदरम् ।**
**इष्टो हि पुत्रस्य पिता सदैव तदस्मि कर्ता विदुरात्थ मां यथा ।। १५**

**-महाभारत, सभापर्व अध्याय ५८**

"हे विदुरा, राजा धृतराष्ट्राच्या आज्ञेचा मी भंग करूं शकत नाहीं. मी द्यूतासाठीं जाईन. पिता पुत्रांचें नेहमीं कल्याणच चिंतील. त्यामुळें त्याच्या आज्ञेचें मी अवश्य प्रतिपालन करीन." युधिष्ठिरानें

केलेल्या पितृगौरवाचा हा अगदीं आंधळा वापर आहे. अधर्माचा उपदेश करणाऱ्या गुरूवरही धनुष्य ताणणाऱ्या पितामह भीष्मांचें ज्वलन्त उदाहरण समोर असतांनादेखील पितृगौरवाच्या कल्पनेची विकृतीच युधिष्ठिरांनीं आचरणांत आणली. त्यांच्या धर्मकार्पण्याचा हा आणखी एक पुरावाच होय. पितृगौरवानें बद्ध होऊन एकदां फांसे हातात घेतल्यावर ते पूर्णपणें मोहांत सांपडले व भान न राहून द्रौपदीसारख्या महान् साध्वीलाही पणाला लावून तिची अप्रतिष्ठा करावयासही ते कारणीभूत झाले. मोहविवश झाल्यामुळें मी भान विसरलों व आपल्या हातून चुका घडत गेल्या, असें युधिष्ठिरानें स्वतःच भीमाजवळ वनपर्वांत मान्य केलें आहे. ते म्हणतात:—

**असंशयं भारत सत्यमेतद्यन्मां तुदन्वाक्यशल्यैः क्षिणोषि ।**
**न त्वां विगर्हे प्रतिकूलमेव ममानयाद्धि व्यसनं व आगात् ॥ २**
**अहं ह्यक्षानन्वपद्यं जिहीर्षन्राज्यं सराष्ट्रं धृतराष्ट्रस्य पुत्रात् ।**
**तन्मां शठः कितवः प्रत्यदेवीत् सुयोधनार्थं सुबलस्य पुत्रः ॥ ३**
**महामायः शकुनिः पार्वतीयः सभामध्ये प्रवपन्नक्षपूगान् ।**
**अमायिनं मायया प्रत्यजैषीत्ततोपश्यं वृजिनं भीमसेन ॥ ४**
**अक्षांश्च दृष्ट्वा शकुनेर्यथावत्कामानुकूलानयुजो युजश्च ।**
**शक्यं नियन्तुमभविष्यदात्मा मन्युस्तु हन्यात्पुरुषस्य धैर्यम् ॥ ५**
**यन्तुं नात्मा शक्यते पौरुषेण मानेन वीर्येण च तात नद्धः ।**
**न ते वाचो भीमसेनाभ्यसूये मन्ये तथा तद्भवितव्यमासीत् ॥ ६**

— महाभारत, वनपर्व अध्याय ३४

"हे भीमसेना तूं मला टोंचून बोलून जे क्लेश देतो आहेस, त्यासंबंधीं मी तुला दोष देत नाहीं. माझ्याच दोषामुळें तुमच्यावर संकटें कोसळलीं हें खरें आहे. मी फांशांना जो हात घातला तो आव्हान देणाऱ्या धृतराष्ट्रपुत्राजवळून राज्य हरण करून घेण्याच्या इच्छेनें, पण तेथें दुर्योधनाऐवजीं शकुनीच खेळावयास आला. त्या मायाव्यूह कपटी द्यूतकारांनीं कपटानें मला जिंकलें. त्यांचें कपट ओळखून वेळींच मी स्वतःला आवरून धरावयास हवें होतें. पण ईर्ष्या मनुष्याचें धैर्य नष्ट करून त्याचें मन त्याच्या स्वाधीन राहूंच देत नाहीं हेंच

खरें. पौरुष, वीर्य, इत्यादि कोणत्याही गोष्टींनीं मन जिंकतां येत नाहीं. माझें मन माझ्या स्वाधीन राहिलें नाहीं, त्यामुळें तुमच्यावर संकटें कोसळलीं याचा अर्थ आपलें दैवच तसें होतें असा आहे." यापेक्षां आणखी स्पष्ट शब्दांत कबुली ती कोणती हवी? तात्पर्य, युधिष्ठिर हें महर्षि व्यासांनीं धर्मकार्पण्याचें एक परिपूर्ण चित्र उपस्थित केलें आहे. अंतर्गत विकृतींच्या आहारीं जाऊन धर्माला दुबळेपणा कसा प्राप्त झालेला होता हें युधिष्ठिरांच्या रूपानें महर्षींनीं दाखविलें आहे. या धर्मविकृतीनें नृशंस दुराचाऱ्यांना संरक्षण मिळून त्यांतून धर्मनाश होतो. भगवान् श्रीकृष्णांनीं ही विकृति नष्ट करून गीतेच्या मिषानें विशुद्ध वैदिक धर्माची पुनश्च प्रतिष्ठापना केली. या विकृतीमुळेंच भीम व अर्जुनासारख्यांच्या सामर्थ्याचा युधिष्ठिरांना उपयोग करतां आलेला नाहीं, कारण त्यांचें कार्पण्य बाह्य नसून अंतर्गत होतें. राजमाता कुंती व तेजस्विनी द्रौपदी ह्या युधिष्ठिराच्या धर्मकार्पण्याचें सर्वांत मोठें करुणास्पद बलिदान होत.

म्हणूनच प्रभु श्रीरामचंद्रांची व युधिष्ठिराची तुलना होऊं शकत नाहीं. रामचंद्र स्वायत्तसिद्धि होते. युधिष्ठिर हे परायत्तसिद्धि होते. स्त्रीलंपट व दुरात्मा असलेल्या वालीवर रामचंद्रांनीं दया केलेली नाहीं. युधिष्ठिरांनीं जयद्रथाला सोडलें. रामचंद्रांनीं रणाला पाठ दाखविली नाहीं. युधिष्ठिरांना ती दाखविण्याचा अनेकवार प्रसंग आला. युधिष्ठिरांना द्यूताचें व्यसन होतें.रामांना कोणतेंच व्यसन नव्हतें. रामाजवळ अपराधाला क्षमा नव्हती. लक्ष्मणासारखा भाऊही त्यांनीं न्यायाच्या व दंडाच्या प्रतिष्ठापनेसाठीं बळी दिला व सर्वनाश सहन केला. युधिष्ठिर घोर अपराध्यांनाही क्षमा करीत असत. देवी सीतेचीं दुःखें श्रीरामचंद्राच्या दिव्य कर्तव्यनिष्ठेंतून उत्पन्न झालीं आहेत. तर द्रौपदीचीं दुःखें युधिष्ठिराच्या कार्पण्यांतून उत्पन्न झालीं आहेत. म्हणून परित्यागानंतरही सीता रामचंद्राची प्रशंसाच करीत त्यांच्या व्यक्तिमत्त्वाजवळ नमते, तर द्रौपदी युधिष्ठिरांना दूषणें देते. तात्पर्य रामचंद्रांत भगवंतांची परिपूर्णता आहे; तर युधिष्ठिराचें जीवन कितीही दिव्य असलें तरी शेवटीं तें मानवी

जीवनच असल्यामुळें अपूर्णतेच्या दोषांनीं व्याप्त आहे. युधिष्ठिरांचा व्यक्तिधर्म उत्कृष्ट आहे. पण समष्टिधर्म शून्य आहे. पीप्यांच्या जगांत युधिष्ठिर टिकूं शकणार नाहींत. ते देशाचा गौरव वाढवितील. पण समर्थ धर्मसत्ता उत्पन्न करून राष्ट्र वैभवशाली करणें व मानवांचें हित साधणें त्यांच्या आवाक्याबाहेरचें आहे. मग भगवान् श्रीकृष्णांनीं आपल्या धर्मसंस्थापनेच्या कार्यांत त्यांना कां धरलें असेल ?

## श्रीकृष्णांनीं युधिष्ठिरांना कां हातांशीं धरलें ?

युधिष्ठिर अंतःकरणापासूनच धर्मसत्तेचें नियंत्रण मानीत होते. त्यांना संरक्षण दिल्यास व मार्गदर्शन केल्यास ते धर्मनियंत्रित, सचिवनियंत्रित, पौरजानपदनियंत्रित व तपस्वीनियंत्रित साम्राज्यसत्ता निर्माण करूं शकतील हें स्पष्ट दिसून आलें होतें. त्यांनीं तशी पात्रता लाक्षादाहापूर्वीं यौवराज्यावर असतांनाच सिद्ध केली होती. ते राजर्षि असून न्याय व धर्म यांच्याकडे त्यांची स्वाभाविक प्रवृत्ति होती. त्यांच्याजवळ भीमार्जुनांची अपूर्व शक्ति होती व तिचा धर्मसंस्थापनेसाठीं अपूर्व उपयोग होण्यासारखा होता. कार्पण्य नष्ट केल्यास युधिष्ठिर धर्मसंस्थापनेच्या कार्यांत सर्वांत महत्त्वाचें साधन ठरणार होते म्हणून भगवान् श्रीकृष्णांनीं युधिष्ठिरांना हातांशीं धरलें आहे.

# २२. राजमाता कुंती

राजर्षि युधिष्ठिराच्या धर्मकार्पण्याचें बलिदान म्हणून कुंती व द्रौपदी यांचा मी निर्देश केलेला आहें. महाभारतकारांनीं या दोन अत्यंत श्रेष्ठ स्त्रियांच्या व्यक्तिचित्रांच्या रूपानें आर्य स्त्रीजीवनाचा महान् आदर्श निर्माण केलेला आहे. राजमाता कुंती ही यादव राजकन्या असून भगवान् श्रीकृष्णांची ती आत्या, व वसुदेवांची सख्खी बहीण होती. तिचे वडील शूर, यांनीं आपल्या कुंतीभोज नांवाच्या आतेभावाला लहानपणींच कुंती देऊन टाकली. त्यांनीं कुंतीभोजाला असें वचन दिलें होतें कीं, मला जें पहिलें अपत्य होईल तें मी तुला देऊन टाकीन. कुंती हेंच त्यांचें पहिलें अपत्य असल्यामुळें त्यांनीं तें कुंतीभोजाला दिलें. स्वतः कुंतीला ही गोष्ट संमत नव्हती असें दिसतें. कुंतीला समजूं लागल्यानंतरच ती कुंतीभोजाला दिली गेली असावी. जर अगदीं लहानपणीं न समजण्याच्या अवस्थेंत तिचें प्रदान झालें असतें तर तें कदाचित् तिला इतकें दुःखद वाटूं शकलें नसतें. पण समजूं लागण्याच्या अवस्थेंत आईबापांची ताटातूट झाल्यावर कुंतीभोजाच्या येथील त्या अपेक्षेनें परक्या असलेल्या वातावरणांत समरस होऊन जाणें तिला अतिशय जड गेलें. हें शल्य कुंतीच्या अंतःकरणांत कित्येक दिवस किंबहुना तिच्या वार्धक्यापर्यंतही सलत होतें. पुढें उद्योगपर्वामध्यें शिष्टाईच्या वेळीं कौरवांच्या राजसभेकडे आलेल्या भगवान् श्रीकृष्णांची व तिची जेव्हां भेट झाली त्यावेळीं तिनें त्यांच्याजवळ आपलें हृदय मोकळें करतांना अंतःकरणांतील हें शल्य उघडें करून दाखविलें आहे. ती म्हणते :—

> पितरं त्वेह गर्हेयं नात्मानं न सुयोधनम् ॥ ६२
> येनाहं कुन्तिभोजाय धनं वृत्तैरिवार्पिता ।
> बालां मामार्यकस्तुभ्यं क्रीडन्तीं कन्दुहस्तकाम् ॥ ६३
> अदात्तु कुन्तिभोजाय सखा सख्ये महात्मने । ६४
>
> —महाभारत; उद्योगपर्व अध्याय ९०

---

व्याख्यान २२ वें, दि. १९ एप्रिल १९५१

हे श्रीकृष्णा, माझ्या या सर्व दुर्दैवासाठीं मी स्वतःला अथवा दुर्योधनाला मुळींच दोष देऊं इच्छीत नाहीं. माझ्या पित्यालाच मी खरा दोष देतें. निर्जीव धनाप्रमाणें त्यानें कुंतीभोजावर प्रसन्न होऊन मला त्यास देऊन टाकलें. त्यावेळीं मी चेंडू हातांत घेऊन खेळूं शकत होतें. लहानपणीं पित्यानें व मोठेपणीं श्वशुरानें माझी वंचना केली. व तेव्हांपासूनच मला अत्यंत दुःख भोगावें लागत आहे. माझ्या जगण्याचें तरी काय फळ आहे हेंच मला समजत नाहीं."

## तिच्यावरील विलक्षण प्रसंग

कुंती लहानपणीं कुंतीभोजाच्या घरीं रहात असतां तेथें एका पावसाळ्यांत महर्षि दुर्वास हे राहावयास्तव आले. राजा कुंती-भोजानें कुंतीलाच त्यांच्या सेवेसाठीं नियुक्त केलें. प्रसन्न झालेल्या दुर्वासांनीं त्यांचें त्या नगरांतील वास्तव्य संपवितांना कुंतीला एक अभिचारयुक्त मंत्र दिला व असें सांगितलें कीं :—

**यं यं देवं त्वमेतेन मन्त्रेणावाहयिष्यसि।**
**तस्य तस्य प्रभावेण तव पुत्रो भविष्यति ।। ७**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १११

"तूं या मंत्रानें ज्या ज्या देवाला आवाहन करशील तो तो देव आपल्या प्रभावानें तुला पुत्र देईल." कुंतीला हें वरप्रदान ज्यावेळीं मिळालें त्यावेळीं त्याचा अर्थ समजण्याइतकें तिचें वय प्रौढ नव्हतें. दुर्वासांनीं भलत्याच वयांत आपण जी शक्ति देत आहोंत त्याचा काय परिणाम होईल याचा विचार न करतां कुंतीच्या स्वाधीन हें सामर्थ्य करतांच त्याचा जो व्हावयाचा तोच परिणाम झाला. महाभारतकार म्हणतात :—

**तथोक्ता सा तु विप्रेण कुन्ती कौतूहलान्विता ।**
**कन्या सती देवमर्कमाजुहाव यशस्विनी ।।८**
**सा ददर्श तमायान्तं भास्करं लोकभावनम् ।।**
**विस्मिता चानवद्याङ्गी दृष्ट्वा तन्महदद्भुतम् ।। ९**
**तां समासाद्य देवस्तु विवस्वानिदमब्रवीत् ।**
**अयमस्म्यसितापाङ्गि ब्रूहि किं करवाणि ते ।। १०**

कुन्त्युवाच ।

कश्चिन्मे ब्राह्मणः प्रादाद्वरं विद्यां च शत्रुहन् ।
तद्विजिज्ञासयाह्वानं कृतवत्यस्मि ते विभो ।। ११
एतस्मिन्नपराधे त्वां शिरसाऽहं प्रसादये ।
योषितो हि सदा रक्ष्याः स्वापराद्धाऽपि नित्यशः ।। १२

सूर्य उवाच

वेदाहं सर्वमेवैतद्यद् दुर्वासा वरं ददौ ।
संत्यज्य भयमेवेह क्रियतां संगमो मम ।। १३
अमोघं दर्शनं मह्यमाहूतश्चास्मि ते शुभे ।
वृथाह्वानेऽपि ते भीरु दोषः स्यान्नात्र संशयः ।। १४

वैशंपायन उवाच ।

एवमुक्ता बहुविधं सान्त्वपूर्वं विवस्वता ।
सा तु नैच्छद्वरारोहा कन्याहमिति भारत ।। १५
बन्धुपक्षभयाद्भीता लज्जया च यशस्विनी ।
तामर्कः पुनरेवेदमब्रवीद् भरतर्षभ ।। १६
मत्प्रसादान्न ते राज्ञि भविता दोष इत्युत ।
एवमुक्त्वा स भगवान्कुन्तिराजसुतां तदा ।। १७
प्रकाशकर्ता तपनः सम्बभूव तया सह ।
तत्र वीरः समभवत्सर्वशस्त्रभृतां वरः ।
आमुक्तकवचः श्रीमान्देवगर्भः श्रियान्वितः ।। १८
सहजं कवचं बिभ्रत्कुण्डलो द्योतिताननः ।
अजायत सुतः कर्णः सर्वलोकेषु विश्रुतः ।। १९
प्रादाच्च तस्यै कन्यात्वं पुनः स परमद्युतिः ।
दत्वा च तपतां श्रेष्ठो दिवमाचक्रमे ततः ।। २०
दृष्ट्वा कुमारं जातं सा वार्ष्णेयी दीनमानसा ।
एकाग्रं चिन्तयामास किं कृत्वा सुकृतं भवेत् ।। २१
गूहमानापचारं सा बन्धुपक्षभयात्तदा ।
उत्ससर्ज कुमारं तं जले कुन्ती महाबलम् ।। २२

—महाभारत, आदिपर्व अध्याय १११

" दुर्वास निघून गेल्यावर कुंतीच्या ठिकाणीं बाल्यसुलभ औत्सुक्य जागृत झालें, व कोणत्या देवाला आवाहन करावें याचा विचार करीत असतांना समोर दिसणाऱ्या सूर्यनारायणालाच तिनें त्या मंत्र-प्रभावानें बोलाविलें. मंत्राचा प्रभाव असा विलक्षण कीं भगवान सूर्य तिच्यासमोर येऊन उपस्थित झाले. त्यांनीं विचारलें हे सुंदरी, तूं मला कशासाठीं बोलाविलेंस ? मी तुझें काय प्रिय करूं तें सांग. अवचित प्रत्यक्ष सूर्याचें तेथें येणें व त्याचें हें बोलणें ऐकतांच कुंती गोंधळली. तिनें सूर्यनारायणाला असें सांगितलें कीं एका ब्राह्मणानें मला ही विद्या व वरदान दिलें. बाल्यसुलभ जिज्ञासेनें प्रेरित होऊन अजाणता मी त्याचा उपयोग करून आपणांस आवाहन केलें. हा माझा मोठा अपराध झालेला आहे. पण मी आपणाला साष्टांग नमस्कार घालतें. आपण मला क्षमा करा. स्त्रियांचें त्यांच्या अपराधापासून नेहमींच रक्षण करावें. सूर्यानें कुंतीला सांगितलें कीं दुर्वास ऋषींनीं तुला दिलेलें वरदान व त्याचें सामर्थ्य मला माहीत आहे. आतां सर्वप्रकारचें अंतःकरणांतील भय टाकून देऊन तूं माझ्याशीं संगम कर. माझें दर्शन अमोघ आहे. तूं मला होऊन बोलाविलें आहेस. देवाचें दर्शन व्यर्थ कधींही न गेलें पाहिजे. व्यर्थ तूं मला बोलाविलेंस तर तो तुझाच अपराध गणला जाईल व मी व्यर्थ दर्शन दिलें नि तसाच परत गेलों, तर तें मलाही योग्य नाहीं. याप्रमाणें सांत्वनपूर्वक सूर्यानें तिच्याशीं नानाप्रकारें बोलून तिला समजाविण्याचा प्रयत्न केला. पण मी कन्या असल्या-मुळें संगमाला प्रवृत्त होऊं शकत नाहीं असेंच तिनें सांगितलें. स्वतःच्या कुमारीपणामुळें, नातलगांच्या भीतीनें व स्त्रीस्वभाव-सुलभ लज्जेमुळें सूर्याचें म्हणणें ती मान्य करीना. शेवटीं सूर्यानें तिला असें सांगितलें कीं, माझी व तुझी भेट व्यर्थ जाणार नाहींच. पण माझ्या संगमामुळें तुझें कन्यात्व नष्ट होणार नाहीं असें मी तुला वरदान देतों. शेवटीं कुंती व सूर्य यांचा संगम झाला. आणि तत्काळ कुंतीला सर्व शस्त्रधारी लोकांमध्यें श्रेष्ठ, देवपुत्राप्रमाणें अत्यंत तेजस्वी, सहज कवचकुंडलांनीं मंडित अशा प्रकारचा कर्ण नांवाचा मुलगा झाला. सूर्यानें आपल्या सामर्थ्यानें कुंतीचें कन्यात्व

पुनश्च तिला दिलें व सूर्य नारायण निघून गेले." तो मुलगा होतांच यादवकन्या कुंती अत्यंत खिन्न झाली. ही गोष्ट आपल्या नातलगांना कळतांच आपलें काय होईल या भयानें तिच्या अंगाचा थरकांप उडाला. एकांतामध्यें ती विचार करूं लागली कीं काय केलें असतां आपलें कल्याण होईल? शेवटीं नातलगांच्या भयानें आपलें तें अपकृत्य कोणाच्या ध्यानांत येऊं नये म्हणून कुंतीनें त्या मुलाला पाण्यांत टाकून दिलें." याप्रमाणें कुंतीनें कर्णाचा परित्याग केला तरी जन्मभर तें शल्य तिच्या अंतःकरणांत घर करून होतेंच. अर्जुनाला कर्णानें ज्यावेळीं पहिल्या शस्त्रपरीक्षेंत आव्हान दिलें त्या वेळीं कुंतीनें कर्णाला पहिल्यानें ओळखलें. ते दोन बंधुबंधू एकमेकांचे प्राण हरण करण्याच्या इच्छेनें एकमेकांसमोर उभें राहिलेले पहातांच कुंतीच्या मनावर मोठा विपरीत परिणाम झाला. व ती एकाएकीं मूर्च्छित होऊन पडली. महाभारतकार म्हणतात :—

**द्विधा रङ्गः समभवत्स्त्रीणां द्वैधमजायत ।**
**कुन्तिभोजसुता मोहं विज्ञातार्था जगाम ह ।। २७**
**तां तथा मोहमापन्नां विदुरः सर्वधर्मवित् ।**
**कुन्तीमाश्वासयामास प्रेष्याभिश्चन्दनोदकैः ।। २८**
**ततः प्रत्यागतप्राणा तावुभौ परिदंशितौ ।**
**पुत्रौ दृष्ट्वा सुसंभ्रान्ता नान्वपद्यत किञ्चन ।। २९**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १३६

" त्या दोन पुरुषांना परस्परांना आव्हान देतांना पहातांच त्या उपस्थित समाजांत दोघांच्याही अभिमान्यांचे दोन वर्ग उपस्थित झाले व स्त्रियांचेही असेच दोन वर्ग झाले. कर्ण कोण आहे हें कुंतीला समजून येतांच मनाला एकाएकी धक्का बसून ती एकदम मूर्च्छित झाली. मूर्च्छित झाल्याचें कळतांच विदुरानें दासीकडून चंदनाचें पाणी वगैरे शिपडून तिला सावध केलें. सावध झाल्या-नंतर आपल्याच त्या दोन पुत्रांना रणांत उभे ठाकलेले पाहून तिला संभ्रम उत्पन्न झाला. पण ओळख देण्याची ती वेळ नसल्यामुळें ती त्या वेळीं कांहींच बोलली नाहीं." यानंतर उद्योगपर्वांत विदुराला

सर्व वृत्तांत सांगून त्याच्या परवानगीनें कुंतीनें कर्णाची भेट घेतली व आपल्या या पुत्रांत आणि उर्वरित पुत्रांत कलह माजवून पुत्र-शोक आपल्याला होऊं नये म्हणून तिनें कर्णाचा शक्य तितका अनुनय केला. ती कर्णाला म्हणाली,

कौन्तेयस्त्वं न राधेयो न तवाधिरथः पिता ।
नासि सूतकुले जातः कर्ण तद्‌विद्धि मे वचः । २
कानीनस्त्वं मया जातः पूर्वजः कुक्षिणा धृतः ।
कुन्तिराजस्य भवने पार्थस्त्वमसि पुत्रक ।। ३
प्रकाशकर्मा तपनो योऽयं देवो विरोचनः ।
अजीजनत्त्वां मय्येष कर्ण शस्त्रभृतां वरम् ।। ४
कुण्डली बद्धकवचो देवगर्भः श्रिया वृतः ।
जातस्त्वमसि दुर्धर्ष मया पुत्र पितुर्गृहे ।। ५
स त्वं भ्रातॄनसंबुध्य मोहाद्यदुपसेवसे ।
धार्तराष्ट्रान्न यद्युक्तं त्वयि पुत्र विशेषतः ।। ६
एतद् धर्मफलं पुत्र नराणां धर्मनिश्चये ।
यत्तुष्यन्त्यस्य पितरो माता चाप्येकदर्शिनी ।। ७
अर्जुनेनार्जितां पूर्वं हृतां लोभादसाधुभिः ।
आच्छिद्य धार्तराष्ट्रेभ्यो भुङ्क्ष्व यौधिष्ठिरीं श्रियम् ।। ८
अद्य पश्यन्ति कुरवः कर्णार्जुनसमागमम् ।
सौभ्रात्रेण समालक्ष्य संनमन्तामसाधवः ।। ९
कर्णार्जुनौ वै भवेतां यथा रामजनार्दनौ ।
असाध्यं किं नु लोके स्याद्युवयोः सहितात्मनो ।। १०
कर्ण शोभिष्यसे नूनं पञ्चभिर्भ्रातृभिर्वृतः ।
देवैः परिवृतो ब्रह्मा वेद्यामिव महाध्वरे ।। ११
उपपन्नो गुणैः सर्वैर्ज्येष्ठः श्रेष्ठेषु बन्धुषु ।
सूतपुत्रेति मा शब्दः पार्थस्त्वमसि वीर्यवान् ।। १२

——महाभारत, उद्योगपर्व अध्याय १४५

"हे कर्णा, तूं राधेय नाहींस किंवा अधिरथ तुझा पिता नाहीं. तूं सूतांच्या जातींतही झालेला नाहींस. पांडवाप्रमाणेंच तूंही कौन्तेय

आहेस. मी कुंतीभोजाच्या येथें असतां तूं माझ्या कौमार्यावस्थेंत मला झालेला पुत्र आहेस. या कुशीनें ज्याप्रमाणें पांडवांना जन्म दिला त्याच प्रमाणें तुलाही जन्म दिला आहे. तूं माझा सर्वांत ज्येष्ठ पुत्र आहेस. पांडव जसे देवपुत्र आहेत तसा तूंही देवपुत्र आहेस. संपूर्ण जगताला प्रकाश देणारा भगवान् श्री सूर्यनारायण हा तुझा पिता होय. जन्मतःच तूं सर्व शस्त्रधाऱ्यांत श्रेष्ठ,सहज कवचकुंडलें लाभलेला, देवपुत्राप्रमाणें अत्यंत तेजस्वी असा मला लाभलास. मोहामुळें आपल्या बंधूची उपेक्षा करून तुझ्यासारख्या पुत्रानें धृतराष्ट्रपुत्रांचा पक्ष धरावा ही गोष्ट तुझ्यासारख्याला योग्य नाहीं. माता व पित्याला संतुष्ट करणें हें पुत्राचें खरें कर्तव्य होय. पूर्वीं अर्जुनानें आपल्या पराक्रमानें मिळविलेली व दुष्ट धृतराष्ट्रपुत्रांनीं लोभामुळें हीन मार्गाचा अवलंब करून अपहरण केलेली युधिष्ठिराची राजसंपत्ति उपभोगण्याचा अधिकार माझा ज्येष्ठ पुत्र म्हणून वस्तुतः तुझाच आहे. पराक्रमानें धृतराष्ट्रपुत्रांकडून ती संपत्ति जिंकून घेऊन तूं तिचा उपभोग घे. कर्ण व अर्जुन 'या बंधुबंधूचा बंधुप्रेमानें होणारा संयोग आज धृतराष्ट्र पुत्र पाहोत व त्यांच्या सामर्थ्यासमोर सर्व दुष्ट लोक नम्र होवोत. बलराम व श्रीकृष्णांप्रमाणेंच कर्णार्जुनांची जोडीही बंधुप्रेमाचा आदर्श ठरावी अशी माझी इच्छा आहे. तुम्ही दोघे एक झाल्यावर जगांत अशक्य तें काय आहे? मोठ्या यज्ञांतील वेदीवर देवांनीं परिवेष्टित असे ब्रह्मदेव जसे शोभतात त्याचप्रमाणें आपल्या पांच बंधूंनीं परिवेष्टित असा तूंही शोभल्यावांचून राहणार नाहींस. यापुढें लोकांनीं तुझ्यामागें सूतपुत्र असा शब्द लावूं नये. तूं वीर्यवान् पार्थ आहेस. त्या अतिश्रेष्ठ बंधूंचा ज्येष्ठ बंधु म्हणून शोभण्यासारखे सर्व गुण तुझ्या ठिकाणीं आहेत. तरी तूं आपल्या बंधूंना संरक्षण दे."

कुंतीच्या या वचनावर कर्णाचा विश्वास बसावा म्हणून सूर्यानेंही आकाशवाणीच्या रूपानें कर्णाला असें सांगितलें कीः—

**सत्यमाह पृथा वाक्यं कर्ण मातृवचः कुरु ।**
**श्रेयस्ते स्यान्नरव्याघ्र सर्वमाचरतस्तथा ।।** उद्योगपर्व अ. १४६–२

"कुंतीनें जें सांगितलें तें खरें आहे. 'तूं आपल्या मातेची आज्ञा ऐक. त्यानेंच तुझें कल्याण होईल."

पण महामनस्क कर्णानें आपल्या मातापित्यांच्या या अनुनयाचा धिक्कार करून कृतघ्नतेच्या ऐश्वर्याऐवजीं कृतज्ञतेचें मरणच पत्करलें. कर्णाच्या मृत्यूची जखम कुंतीच्या मनाला शेवटपर्यंत वेदना देत होती. मरेपर्यंत सूतपुत्र म्हणून अप्रतिष्ठा सहन करीत हा आपला पुत्र राहिला, तरी त्याच्या वधानंतर तरी त्याला सद्‌गति मिळावी व त्याच्या जन्मानें त्याला मिळालेलें स्थान त्याला लाभावें म्हणून तिच्या जिवाची नेहमी तगमग होत असे. युधिष्ठिर गंगेवर युद्धांत मेलेल्या सर्व सुहृदांचें तर्पण करावयास बसले असतां कर्णाला आपल्या भ्रात्याच्या हातून पाणी मिळावें या भावनेनें मातृप्रेमानें कुंतीचें हृदय उचंबळून आलें. महाभारतकार म्हणतात :—

ततः कुन्ती महाराज सहसा शोककर्शिता ॥ ६
रुदती मन्दया वाचा पुत्रान्वचनमब्रवीत् ।
यः स पुत्रो महेष्वासो रथयूथपयूथपः ॥ ७
अर्जुनेन जितः सङ्ख्ये वीरलक्षणलक्षितः ।
यं सूतपुत्रं मन्यध्वं राधेयमिति पाण्डवाः ॥ ८
यो व्यराजच्चमूमध्ये दिवाकर इव प्रभुः ।
प्रत्ययुध्यत वः सर्वान्पुरा यः सपदानुगान् ॥ ९
दुर्योधनबलं सर्वं यः प्रकर्षन् व्यरोचत ।
यस्य नास्ति समो वीर्ये पृथिव्यामपि पार्थिवः ॥ १०
योऽवृणीत यशः शूरः प्राणैरपि सदा भुवि ।
कर्णस्य सत्यसन्धस्य सङ्ग्रामेष्वपलायिनः ॥ ११
कुरुध्वमुदकं तस्य भ्रातुरक्लिष्टकर्मणः ।
स हि वः पूर्वजो भ्राता भास्करान्मय्यजायत ॥ १२

—महाभारत, स्त्रीपर्व अध्याय २७

"नंतर एकदम शोकाकुल होऊन रडत रडत मंदवाणीनें कुंती आपल्या पुत्रांना म्हणाली कीं, तो जो महान् धनुष्य हातांत धारण करणारा सर्व वीरलक्षणांनीं युक्त व सेनापतींचाहि सेनापति असलेला वीर अर्जुनानें जिंकला व ज्याला तुम्ही 'राधेय' सूतपुत्र म्हणून ओळखतां, जो सूर्याप्रमाणेंच सैन्याच्या अग्रभागीं तळपत असे,

ज्यानें तुमच्याशीं व तुमच्या सैन्याशीं अनेकवार धडक दिली, जो दुर्योधनाच्या सर्व सैन्याचें नेतृत्व करीत असे, पृथ्वीवरील सर्व राजांत ज्याच्या योग्यतेचा पराक्रमी पुरुष कोणीहि नव्हता, ज्यानें प्राणापेक्षांही यशालाच मान दिला, त्या सत्यसंध व रणांत श्रेष्ठकर्में करणाऱ्या कर्णाचें तुम्ही तर्पण करा. तो तुमचा पूर्वज भ्राता आहे. तो सूर्याप्रमाणें तेजस्वी व सहज कवचकुंडलांनीं मंडित असा पुत्र मला सूर्यापासून झाला. "

कुंतीचें हें वचन ऐकतांच युधिष्ठिरांचा शोक अनावर झाला. ही गोष्ट अितके दिवस गुप्त ठेवल्याबद्दल त्यांनीं कुंतीलाच शाप दिला. कुंतीच्या अंतःकरणाची ही दोलायमान अवस्था शेवटपर्यंत तशीच होती. धृतराष्ट्राबरोबर अरण्यवास पत्करतांनाही कर्णाच्या बाबतींत घडून आलेल्या सर्व प्रकारांचें शल्य तिच्या अंतःकरणांत असल्यामुळें तिनें त्याच्या नांवानें पुष्कळ दानें दिल्याचा उल्लेख भारताच्या आश्रमवासिक पर्वांत आहे.

## कुंतीचा विवाह

कर्णाच्या जन्माच्या या दुर्दैवी प्रकरणानंतर त्याच्या गंगासमर्पणानें या प्रकरणावर शेवटचा पडदा पडल्यावर राजा कुंतीभोजानें कुंतीचा विवाहसमारंभ स्वयंवराच्या पद्धतीनें करावयाचें ठरविलें. महाभारतकार म्हणतात :

सत्त्वरूपगुणोपेता धर्मारामा महाव्रता ।
दुहिता कुन्तिभोजस्य पृथा पृथुललोचना ।। १
तां तु तेजस्विनीं कन्यां रूपयौवनशालिनीम् ।
व्यावृण्वन्पार्थिवाः केचिदतीव स्त्रीगुणैर्युताम् ।। २
ततः सा कुन्तिभोजेन राज्ञाहूय नराधिपान् ।
पित्रा स्वयंवरे दत्ता दुहिता राजसत्तम ।। ३
ततः सा रङ्गमध्यस्थं तेषां राज्ञां मनस्विनी ।
ददर्श राजशार्दूलं पाण्डुं भरतसत्तमम् ।। ४
सिंहदर्पं महोरस्कं वृषभाक्षं महाबलम् ।
आदित्यमिव सर्वेषां राज्ञां प्रच्छाद्य वै प्रभाः ।। ५

तिष्ठन्तं राजसमितौ पुरन्दरमिवापरम् ।
तं दृष्ट्वा सानवद्याङ्गी कुन्तिभोजसुता शुभा ।। ६
पाण्डुं नरवरं रङ्गे हृदयेनाकुलाभवत् ।
ततः कामपरीताङ्गी सकृत्प्रचलमानसा ।। ७
व्रीडमाना स्रजं कुन्ती राज्ञः स्कन्धे समासृजत् ।
तं निशम्य वृतं पाण्डुं कुन्त्या सर्वे नराधिपाः ।। ८
कृत्वोद्वाहं तदा तं तु नानावसुभिरर्चितम् ।
स्वपुरं प्रेषयामास स राजा कुरुसत्तम ।। ११
ततो बलेन महता नानाध्वजपताकिना ।
स्तूयमानः स चाशीर्भिर्ब्राह्मणैश्च महर्षिभिः ।। १२
संप्राप्य नगरं राजा पाण्डुः कौरवनन्दनः ।
न्यवेशयत तां भार्यां कुन्तीं स्वभवने प्रभुः ।। १३

—महाभारत, आदिपर्व अध्याय ११२

" सर्व सद्गुणांनीं युक्त, व्रतपरायण व धर्मामध्येंच अंतःकरण रमविणारी कुंतीभोजाची विशालनयना कन्या कुंती अत्यंत तेजस्वी, लावण्यवती व रूपयौवनानें युक्त असून तिच्यांत सर्व स्त्रीगुण उत्कटतेनें समाविष्ट झाले होते. अनेक राजांनीं तिला मागणी घातली. शेवटीं राजा कुंतीभोजानें तिचें स्वयंवर ठरविलें. त्या स्वयंवरांत आलेल्या राजमंडळांत कौरवेश्वर पाण्डूही उपस्थित होता. त्यानें आपल्या प्रभावानें सूर्यानें नक्षत्रें झांकून टाकावींत त्याप्रमाणें सर्व राजांचें तेज हरण केलें. महेंद्राप्रमाणें राजमंडळांत आपल्या तेजानें तळपत असलेल्या नरश्रेष्ठ पांडूच्या व्यक्तिमत्त्वामुळें कुंतीच्या मनावर विलक्षण परिणाम झाला व तिनें आपल्या हातांतील वरमाला सर्व राजांसमक्ष पांडूच्या कंठांत समर्पण केली. राजा पाण्डू व कुंती यांचा विवाह राजा कुंतीभोजानें मोठ्या थाटानें केला. राजा पांडूला त्यानें बरेंच आंदण दिलें. ब्राह्मणांचे आशीर्वाद घेत विवाहानंतर कौरवेश्वर पांडू हस्तिनापुरास परत आला. याप्रमाणें कुंती कौरवांची महाराणी झाली.

## कुंतीचें भाग्य

कुंतीच्या या विवाहानंतर तत्कालीन पद्धतीच्या अनुरूप मद्र देशाच्या राजकन्येबरोबर पाण्डूचा दुसरा विवाह झाला. पण कुंतीनें अंतःकरणांत किंचिन्मात्र सापत्नभाव न ठेवितां आपल्या या सवतीला इतकें चांगलें वागविलें कीं, माद्रीचा कुंतीवर स्वतःपेक्षांही अधिक विश्वास होता. याची साक्ष पुढें एका विलक्षण प्रसंगानें पटलेली आहे.

पुढें पांडूबरोबर सती जात असतां माद्रीनें स्वतःच सती जाण्याचीं जीं अनेकविध कारणें दिलीं आहेत त्यांत ती असें म्हणते कीं--

**न चाप्यहं वर्तयन्ती निर्विशेषं सुतेषु ते ।**
**वृतिमार्ये चरिष्यामि स्पृशेदेनस्तथा च माम् ॥ २७**

--महाभारत, आदिपर्व अध्याय १२५

" हे कुंती, मी जिवंत राहिल्यास सर्व मुलांचा सांभाळ मला करावा लागेल. तुझ्या व माझ्या मुलांत मी फरक करणारच नाहीं अशी माझ्या मनाची मी खात्री देऊं शकत नाहीं." तात्पर्य माद्रीला स्वतःच्या अंतःकरणाची जी खात्री नव्हती ती कुंतीच्या अंतःकरणाची मात्र वाटत होती. याच्यांतच तिच्या अंतःकरणाची थोरवी दिसून येते. राजा पांडूनें पुढें महान् दिग्विजय करून कौरवांचें मोठें साम्राज्य स्थापन केलें व केवळ कौरवांची राणी असलेल्या कुंतीला साम्राज्ञी होण्याचें महद्‌भाग्य लाभलें. यानंतर विहारप्रिय पाण्डूनें धृतराष्ट्र, विदुर व भीष्म यांच्या हातीं राज्यकारभार सोपवून वनविहाराचा अखंड क्रम स्वीकारला व त्याच्या समर्थ बाहूंच्या सहवासांत कुंतीचे दिवस मोठ्या आनंदांत गेले. जीवनांतील सर्व सुखें हात जोडून तिच्यासमोर उभीं होतीं. पण तिच्या दुर्दैवाला तिच्या सुखाचे ते दिवस पाहवले नाहींत.

## दुर्दैवाचा वज्राघात

वनविहारांत दंग असतां मृगयेचें पाण्डूला जणूं कांहीं व्यसनच लागलें होतें. त्या व्यसनासक्त स्थितींत त्याच्या हातून मृगरूपानें

विहारांत दंग असलेल्या एका ऋषीची हत्या घडली. मरतां मरतां त्या ऋषीनें पाण्डूला असा शाप दिला कीं, "तूं ज्या अर्थी मृगयेच्या नियमांचें उल्लंघन करून माझ्या ऐन विहरणांत मला ठार मारलेंस, त्या अर्थी यापुढें तुलाही स्त्रीबरोबर विहार करतां येणार नाहीं. विहाराच्या इच्छेनें तूं स्त्रीजवळ गेलास कीं तत्काळ तुझें मरण ओढवेल." या शापानें राजा पाण्डू अतिशय दुःखी व लज्जित झाला. शापित अवस्थेंत भीष्मांना व कुरुकुलांतील इतर लोकांना तोंड दाखविण्याची त्याला इच्छा होईना. त्यानें आपल्या स्त्रियांना असें सांगितलें कीं, माझी परत राज्यांत जाण्याची इच्छा नाहीं. मी वनांतच तपस्व्याचें जीवन कंठण्याचा निश्चय केला आहे. तुम्ही राज्यांत परत जा व माझा परित्याग करा. पण कुंतीनें व तिच्या सहवासांत सतीधर्माचें योग्य तें मार्गदर्शन झालेल्या माद्रीनेंही राजाला असें सांगितलें कीं :—

**अन्येऽपि ह्याश्रमाः सन्ति ये शक्या भरतर्षभ ।**
**आवाभ्यां धर्मपत्नीभ्यां सह तप्तुं तपो महत् ॥ २७**
**शरीरस्यापि मोक्षाय स्वर्ग्यं प्राप्य महाफलम् ।**
**त्वमेव भविता भर्ता स्वर्गस्यापि न संशयः ॥ २८**
**प्रणिधायेन्द्रियग्रामं भर्तृलोकपरायणे ।**
**त्यक्त्वा कामसुखे ह्यावां तप्स्यावो विपुलं तपः ॥ २९**
**यदि चावां महाप्राज्ञ त्यक्ष्यसि त्वं विशांपते ।**
**अद्यैवावां प्रहास्यावो जीवितं नात्र संशयः ॥ ३०**

——महाभारत, आदिपर्व अध्याय ११९

"हे नरश्रेष्ठा, असे अनेक आश्रम आहेत कीं, जेथें आमच्यासारख्या धर्मपत्नींबरोबर आपल्याला महान् तपस्यामय जीवन कंठून स्वर्गप्राप्ति करून घेतां येणें शक्य आहे. स्वर्गांत देखील आपणच पति म्हणून लाभावेत अशी आमची इच्छा आहे. इंद्रियांवर विजय संपादन करून व कामसुखाचा परित्याग करून पतिलोकप्राप्तीच्या इच्छेनें आम्हीही आपल्याबरोबर घोर तपस्या करूं. हे महाप्राज्ञा, जर आपण आमचा परित्याग कराल तर आम्ही राजधानींत परत

तर जाणार नाहींच, पण आपल्यासमोर आम्ही आमचा प्राणत्याग केल्यावांचून राहणार नाहीं."

पाण्डूनें आपल्या स्त्रियांची ती विनवणी पाहून त्यांना आपल्या तपस्यामय जीवनांत बरोबर राहण्याची अनुज्ञा दिली. पुढें त्याच्या अनुभवास असें आलें कीं, त्याच्या पोटीं संतान नसल्यामुळें मोठमोठ्या ब्रह्मर्षींबरोबर त्याला हवें तेथें जातां येत नाहीं. संतानावांचून सद्गति नाहीं या जाणिवेनें तत्कालीन पद्धतीस अनुसरून आपद्धर्माच्या शास्त्रानुसार त्यानें कुंतीला जुने इतिहास निवेदन करून एकाद्या तपस्व्याकडून पुत्रप्राप्ति करून घेऊन स्वत:ला निपुत्रिकपणाच्या दुर्गतींतून वांचविण्याची प्रार्थना केली. कुंतीनें त्या गोष्टीला पुष्कळ नकार दिला. तिनें राजाशीं वादविवादही करून पाहिला. पण राजा ज्या वेळीं ऐकेचना त्या वेळीं निरुपाय म्हणून कुंतीनें आपल्या वरदानाचें वृत्त पाण्डूला सांगून कोणत्याही मानवाऐवजीं देवतांकडूनच पुत्रोत्पत्ति करून घेण्याची सिद्धता दर्शविली. पाण्डूच्या अनुज्ञेनें धर्म, वायु व महेंद्र या तीन देवतांकडून कुंतीला युधिष्ठिर, भीमसेन व अर्जुन अशा अत्यंत तेजस्वी व लोकोत्तर गुणांनीं युक्त अशा तीन पुत्रांचा लाभ झाला. पाण्डूच्याच अनुज्ञेनें माद्रीलाही आपली मंत्रविद्या तिनें दिली व तिलाही अश्विनीकुमारांपासून नकुल व सहदेव या दोन पुत्रांचा लाभ झाला. पुढें दुर्दैवानें मनोवृत्ति स्वाधीन न राहून एकांतांत पाण्डूनें विहरणाच्या इच्छेनें माद्रीला स्पर्श करतांच तो गतप्राण होऊन पडला. कुंतीच्या जीवनाचा आधारच त्या दिवशीं तुटल्यासारखा झाला. राजा पाण्डूच्या शवाबरोबर माद्री सती गेली व पांच मुलांच्या संभाराचा भार अनाथ व विधवा कुंतीवर येऊन पडला. ब्राह्मणांनीं तिला आणून राजा धृतराष्ट्राच्या स्वाधीन केलें.

## कुंतीचें कर्तृत्व

विधवा कुंती आपल्या पांच मुलांसहित धृतराष्ट्राच्या आश्रयानें येऊन राहिल्यानंतर लवकरच धृतराष्ट्राच्या व त्याच्या पुत्रांच्या अंत:करणांत पाण्डुपुत्रांविषयीं मत्सर उत्पन्न होऊन राज्याच्या या

खऱ्या अधिकाऱ्यांना ठार मारून टाकण्याचे त्यांचे उपक्रम सुरू झाले. भीमावर पहिलाच विषप्रयोग झाल्यानंतर आपल्यावर होणाऱ्या या सर्व कूट राजनीतीच्या भयानक प्रयोगांची कुंतीला कल्पना आली व तिनें राज्ययंत्रांतील महत्त्वाच्या व्यक्तींचें आपणांस साहाय्य मिळावें म्हणून राज्याचा महामंत्री असलेल्या विदुराला सर्व परिस्थिति सांगून त्यांच्याकडून साहाय्याची अपेक्षा केली. ती विदुराला म्हणतेः—

**क्षत्तारमानाय्य तदा कुन्ती वचनमब्रवीत् ।**
**क्व गतो भगवन् क्षत्तर्भीमसेनो न दृश्यते ।। १३**
**उद्यानान्निर्गताः सर्वे भ्रातरो भ्रातृभिः सह ।**
**तत्रैकस्तु महाबाहुर्भीमो नाभ्येति मामिह ।। १४**
**न च प्रीणयते चक्षुः सदा दुर्योधनस्य सः ।**
**क्रूरोऽसौ दुर्मतिः क्षुद्रो राज्यलब्धोऽनपत्रपः ।। १५**
**निहन्यादपि तं वीरं जातमन्युः सुयोधनः ।**
**तेन मे व्याकुलं चित्तं हृदयं दह्यतीव च ।। १६**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १२९

"हे भगवन् विदुरा, विहार करून उद्यानांतून माझीं सर्व मुलें परत आलीं व इतरही सर्व बंधू परत आले पण दुर्दैवानें भीमसेन त्यांच्याबरोबर परत आलेला दिसत नाहीं. भीमाचें काय झालें असेल? अथवा तो कोठें गेला असेल ? दुर्योधनाचे नेत्र त्याच्यावर नेहमीं पडलेले असतात. दुर्योधन हा क्रूर, दुष्ट बुद्धीचा, क्षुद्र, राज्यलोभी व निर्लज्ज आहे. भीम त्याच्या डोळ्यांत नेहमींच खुपतो. मनांत दंश धरणारा दुर्योधन वेळीं भीमाला ठार मारल्यावांचूनही राहणार नाहीं. त्यामुळें माझें चित्त व्याकुळ झालें असून अंतःकरण जळतें आहे." पण विशिष्ट परिस्थितीमुळें तिला प्रत्यक्ष साहाय्य करतां येणें शक्य नसल्यामुळें विदुरानें तिला असें सांगितलें कीं, ही गोष्ट शक्य तितकी गुप्त ठेवून गुप्तपणेंच तूं आपल्या उर्वरित पुत्रांचें संरक्षण कर. तुझे शत्रु अत्यंत भयंकर आहेत. त्यांचीं कारस्थानें तुझ्या ध्यानांत आलीं असें जर त्यांना कळलें तर ते तुझ्या उरलेल्या पुत्रांवरही यापेक्षांही अधिक कूट व भयानक प्रहार केल्यावांचन

राहणार नाहींत. कुंतीनें विदुरांचा हा इषारा ध्यानांत ठेवून त्या तशाही विलक्षण परिस्थितींत आपल्या पुत्रांचें संरक्षण करण्यांत स्वतःचें अपूर्व कर्तृत्व प्रकट केलें आहे. दुष्ट राजसत्तेच्या कारस्थाना-पायीं कुंतीला आपल्या पुत्रांबरोबर लाक्षागृहांतून विजनवासांत राहावें लागलें, तेंही दुःख तिनें सहन केलें. पुढें द्रौपदीस्वयंवरानंतर पांडवांना पांचालांच्या सत्तेचें व यादवांच्या सत्तेचें साहाय्य मिळून त्यांचे दिवस पालटले. मिळालेल्या राज्याचे कुंतीच्या पुत्रांनीं आपल्या पराक्रमानें भव्य साम्राज्यांत रूपांतर केलें व सर्व राज-सत्ता पायीं विनम्र झालेल्या स्थितींत महान् राजसूय यज्ञांत आपल्या पुत्रांचें सर्वश्रेष्ठ वैभव पाहून राजमाता या नात्यानें तिच्या हृदयानें आनंद अनुभविला.

## कुंतीच्या हृदयाचें औदार्य

राजमाता कुंतीच्या हृदयाचें औदार्य, दुसऱ्याच्या दुःखानें दुःखित होण्याची तिची प्रवृत्ति, तिच्या अंतःकरणांतील अनुपम धैर्य यांचा प्रत्यय द्रौपदीस्वयंवरापूर्वीच्या विजनवासांत बकासुर वधाच्या प्रक-रणांत आलेला आहे. हिडिंबाचा वध करून पांडव आपला मार्ग आक्रमीत असतां एकचक्रा नांवाच्या नगरींत त्यांना एकदां रहा-ण्याचा प्रसंग आला. तेथें ज्या ब्राह्मणाच्या घरीं ते उतरले होते त्याच्यावर एक मोठा दुःखाचा प्रसंग ओढवला होता. पांडव घरीं नसतां व एकटी कुंतीच तेथें असतां तिनें एकाएकीं ब्राह्मणाच्या घरांतून रडण्याचा आवाज ऐकला. काय आहे तें समजून घेण्या-साठीं ती एका बाजूला उभी राहून ऐकूं लागली. तों तिला असें आढळून आलें कीं, ब्राह्मण, त्याची पत्नी, मुलगी व मुलगा सर्व मिळून विलाप करीत आहेत व एकमेकांना समजावीत आहेत. योग्य संधि पाहून कुंती त्यांच्या जवळ गेली व तिनें त्या ब्राह्मणाला त्याच्या दुःखाचें कारण विचारलें. ब्राह्मणानें तिला असें सांगितलें कीं या नगरीचा राजा अत्यंत वाईट असून नगरीला राक्षसांचा उपद्रव आहे. बकासुर नांवाचा एक राक्षस या नगरीच्या बाहेर राहात असून त्यानें नगरींतल्या लोकांशीं असा करार केला आहे कीं, प्रत्येक

नागरिकानें पाळीपाळीनें त्याला रोज एक गाडाभर अन्न, त्या गाड्याला जोडलेला रेडा, व एक मनुष्य इतकें खाण्यासाठीं पुरवावयाचें व त्याच्या मोबदल्यांत त्या राक्षसानें त्या नगरीचें संरक्षण करावयाचें. जर त्याचा हा करार न पाळला गेला तर सर्व नगरीचा तो नाश केल्यावांचून राहणार नाहीं. क्रमाक्रमानें ही पाळी आज माझ्यावर आली आहे. माझ्या घरीं पाठविण्यासारखा दुसरा मनुष्य नसल्यामुळें मी स्वतः जावयाचें ठरविलें आहे. माझी पत्नी स्वतः जाऊं इच्छिते तर, मुलगी मी जातें असें म्हणतें." कुंतीनें त्या ब्राह्मणाला आश्वासन देऊन असें सांगितलें कीं, आपण कोणीही जाण्याचें कारण नाहीं व शोकाचेंही कारण नाहीं. मी माझा मुलगा आपल्याऐवजीं पाठवितें. पण तो ब्राह्मण त्या गोष्टीस तयार होईना. शेवटीं कुंतीनें त्याला असें सांगितलें कीं, माझ्या मुलाला सिद्धि असून तो त्या राक्षसाला सहज ठार मारील. त्याला राक्षसांचें मुळींच भय नाहीं. शेवटीं ब्राह्मणानें मोठ्या कष्टानें ही गोष्ट मान्य केली. कुंतीनें भीमाला तेथें जाण्याची आज्ञा केली व भीमानेंही ती गोष्ट मान्य केली. मागाहून युधिष्ठिर तेथें परत आल्यावर कुंतीनें हें केलेलें साहस ऐकतांच त्याला अत्यंत वाईट वाटलें. कुंतीला ठपका देऊन तो म्हणूं लागला कीं, तूं हें किती भयानक साहस केलें आहेस! दुसऱ्याच्या मुलासाठीं आपल्या स्वतःच्या मुलाच्या गळ्यावरून कोणी सुरी फिरवीत असतो काय? केवळ ज्याच्या बाहुबलाच्या आश्रयावर आपण गेलेलें वैभव परत मिळवूं इच्छितों, ज्याच्या बळाच्या धाकानें आपल्या शत्रूंना झोपही येत नाहीं, व आजवरच्या संकटांतून ज्यानें आपणांस तारलें त्याचेंच बलिदान करावयास तूं निघालीस याला काय म्हणावें? माते, अतिशय दुःखामुळें तुझी बुद्धि भ्रष्ट तर नाहींना झाली? युधिष्ठिराच्या या रागाच्या बोलण्यावर उत्तर देत असतांना कुंतीनें जें भाषण केलें आहे तें तिच्या अंतःकरणाचें औदार्य व तिचें अलौलिक धैर्य स्पष्टपणें व्यक्त करते. ती युधिष्ठिरास म्हणाली :—

**युधिष्ठिर न संतापस्त्वया कार्यो वृकोदरे ।**
**न चायं बुद्धिदौर्बल्याद् व्यवसायः कृतो मया ।। १२**

इह विप्रस्य भवने वयं पुत्र सुखोषिताः ।
अज्ञाता धार्तराष्ट्राणां सत्कृता वीतमन्यवः ॥ १३
तस्य प्रतिक्रिया पार्थ मयेयं प्रसमीक्षिता ।
एतावानेव पुरुषः कृतं यस्मिन्न नश्यति ॥ १४
यावच्च कुर्यादन्योऽस्य कुर्याद् बहुगुणं ततः ।
दृष्ट्वा भीमस्य विक्रान्तं तदा जतुगृहे महत् ॥
हिडिंबस्य वधाच्चैवं विश्वासो मे वृकोदरे । १५
बाह्वोर्बलं हि भीमस्य नागायुतसमं महत् ।
येन यूयं गजप्रख्या निर्व्यूढा वारणावतात् ॥ १६
वृकोदरेण सदृशो बलेनान्यो न विद्यते ।
यो व्यतीयाद् युधि श्रेष्ठमपि चक्रधरं स्वयम् ॥ १७
जातमात्रः पुरा चैव ममाङ्कात्पतितो गिरौ ।
शरीरगौरवादस्य शिला गात्रैर्विचूर्णिता ॥ १८
तदहं प्रज्ञया ज्ञात्वा बलं भीमस्य पाण्डव ।
प्रतिकार्ये च विप्रस्य ततः कृतवती मतिम् ॥ १९
नेदं लोभान्न चाज्ञानान्न च मोहाद् विनिश्चितम् ।
बुद्धिपूर्वं तु धर्मस्य व्यवसायः कृतो मया ॥ २०
अर्थौ द्वावपि निष्पन्नौ युधिष्ठिर भविष्यतः ।
प्रतीकारश्च वासस्य धर्मश्च चरितो महान् ॥ २१
यो ब्राह्मणस्य साहाय्यं कुर्यादर्थेषु कर्हिचित् ।
क्षत्रियः स शुभाँल्लोकानाप्नुयादिति मे मतिः ॥२२
क्षत्रियस्यैव कुर्वाणः क्षत्रियो वधमोक्षणम् ।
विपुलां कीर्तिमाप्नोति लोकेऽस्मिश्च परत्र च ॥ २३
वैश्यस्यार्थे च साहाय्यं कुर्वाणः क्षत्रियो भुवि ।
स सर्वेष्वपि लोकेषु प्रजा रञ्जयते ध्रुवम् ॥ २४
शूद्रं च मोचयेद् राजा शरणार्थिनमागतम् ।
प्राप्नोतीह कुले जन्म सद्द्रव्ये राजपूजिते ॥ २५
एवं मां भगवान् व्यासः पुरा कौरवनन्दन ।
प्रोवाचासुकरप्रज्ञस्तस्मादेवं चिकीर्षितम् ॥ २६

—महाभारत, आदिपर्व अध्याय १६२

" हे युधिष्ठिरा, तुला स्वतःचा संताप करून घेण्याचें कांहीं कारण नाहीं. माझी बुद्धि दुर्बळ झाली असल्यामुळें मीं हें केलें असें मुळींच नाहीं. धृतराष्ट्रपुत्रांना, अज्ञात स्थितींत सर्व प्रकारचा मनाचा शांतपणा कायम राखून आपण इतके दिवस या ब्राह्मणाच्या घरीं सुखानें राहिलों. त्यानेंही आपल्यावरील आपत्तींत सन्मान-पूर्वक आपल्याला स्वतःचे घरीं आश्रय दिला. त्याच्या त्या उपकारांची मी ही फेड करीत आहें. उपकाराची फेड दुप्पट प्रत्युपकारानें करणें हेंच पुरुषाचें खरें कर्तव्य होय. लाक्षागृह प्रकरण व हिंडिबाचा वध या दोन प्रकरणांत भीमसेनाचा पराक्रम पाहून त्याच्या सामर्थ्या-वरील माझा विश्वास वाढलेला आहे. दहा सहस्र हत्तींचें बळ भीमाच्या अंगीं आहे. हत्तीप्रमाणें धिप्पाड असणाऱ्या त्यानें एक-ट्यानें तुम्हां सर्वांना वारणावतांतील लाक्षागृहांतून वनापर्यंत सुर-क्षित आणलें आहे. त्याच्यासारखा बलवान् कोणीहि नाहीं. चक्रधर महाविष्णूशीं देखील तो धडक देऊं शकेल. लहानपणीं माझ्या मांडी-वरून दगडावर खालीं पडतांच त्याच्या शरीराच्या भारानें त्या प्रचंड शिळेचें चूर्ण झालेलें मीं प्रत्यक्ष पाहिलेलें आहें. भीमाच्या अलौकिक सामर्थ्याच्या या गोष्टीचा विचार करून व या ब्राह्मणावरील प्राण-संकट ध्यानांत घेऊन मी बकासुराकडे भीमाला पाठविण्याचा निश्चय केला आहे. लोभ, अज्ञान व मोह यांपैकीं कोणत्याही कारणानें नव्हे तर केवळ बुद्धिपूर्वक पार पाडावयाचें धर्मकृत्य म्हणूनच मीं हें कार्य करावयाचें ठरविलें आहे. यामुळें दोन गोष्टी सधणार आहेत. ब्राह्म-णानें दिलेल्या आश्रयाचा प्रत्युपकार घडेल व दुसऱ्याला जीवदान दिल्याच्या महान् धर्माचें आचरणही घडेल. जो क्षत्रिय ब्राह्मणाच्या उपयोगी पडतो व त्याला साहाय्य करतो त्याला शुभ लोकांची प्राप्ति होते असें माझें मत आहे. जोक्षत्रिय क्षत्रियाला मृत्यूपासून वांचवितो, त्याला विपुल कीर्ति इहलोकीं व परलोकीं मिळते. जो क्षत्रिय वैश्याला साहाय्य करतो तो प्रजांचें अनुरंजन करणारा राजा होतो व शरण आलेल्या शूद्राला जो वांचवितो त्याला राजानेंही ज्याचा मान राखावा अशा धनसंपन्न कुळांत जन्म येतो असें वेद-व्यासांनीं मला पूर्वींच सांगितलें आहे. त्यामुळें मीं हा निर्णय घेतला."

## दुर्दैवाचे दशावतार

अशा या अत्यंत श्रेष्ठ व दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी होणाऱ्या स्त्रीवर राजसूयाच्या वैभवाच्या दिवसानंतर स्वतःच्या ज्येष्ठ पुत्राच्या द्यूतप्रियतेमुळें व त्याच्या कमालीच्या कोमल अंतःकरण-प्रवृत्तीमुळें दुर्दैवाचे दशावतार पहाण्याचा प्रसंग आला. युधिष्ठिराचें सर्व राज्य गेलेलें तिनें पाहिलें, द्यूतांतील फाशांच्या कपटी प्रयोगानें आपल्या सर्वश्रेष्ठ पुत्रांना कौरवांचे दास झालेले तिला पहावें लागलें, जगताची सम्राज्ञी म्हणून सर्व सत्तांनीं जिचें नुकतेंच चरण-वंदन केलें ती आपली सून फरफटत राजसभेंत नीचांनीं ओढत नेलेली तिनें पाहिली, द्रौपदीच्या करुण किंकाळ्यांनीं तिचें अंतः-करण बधिर झालें. तिच्यावर भरसभेंत नग्न होण्याचा आलेला प्रसंग पाहून देवी कुंतीचें अंतःकरण शतधा विदीर्ण होऊन गेलें. आपल्या तेजस्वी सुनेनें स्वतःच्या अनुपम धैर्यानें परत मिळविलेलें ऐश्वर्य युधिष्ठिरानें दुबळ्या पितृगौरवाच्या कल्पनेनें पुन्हां घालवि-लेलें तिला पहावें लागलें, वनांत जातांना ज्यावेळीं द्रौपदी वंदनार्थ आली त्यावेळीं तिला काय आशीर्वाद द्यावा हें त्या शोकविव्हल वृद्धेला समजेना. ती द्रौपदीला म्हणाली :—

> **वत्से शोको न ते कार्यः प्राप्येदं व्यसनं महत् ।**
> **स्त्रीधर्माणामभिज्ञासि शीलाचारवती तथा ।। ४**
> **न त्वां सन्देष्टुमर्हामि भर्तॄन्प्रति शुचिस्मिते ।**
> **साध्वी गुणसमापन्ना भूषितं ते कुलद्वयम् ।। ५**
> **सभाग्याः कुरवश्चेमे ये न दग्धास्त्वयानघे ।**
> **अरिष्टं व्रज पन्थानं मदनुध्यानबृंहिता ।। ६**
> **भाविन्यर्थे हि सत्स्त्रीणां वैकृतं नोपजायते ।**
> **गुरुधर्माभिगुप्ता च श्रेयः क्षिप्रमवाप्स्यसि ।। ७**
> **सहदेवश्च मे पुत्रः सदावेक्ष्यो वने वसन् ।**
> **यथेदं व्यसनं प्राप्य नायं सीदेन्महामतिः ।। ८**

**—महाभारत, सभापर्व अध्याय ७९**

"हे वत्से, तूं अत्यंत शीलाचारसंपन्न असून स्त्रियांचा धर्म काय असतो हें तुला पूर्णपणें कळतें. या घोर संकटांत सांपडूनही तूं शोक न करतां आपलें अंतःकरण खंबीर ठेव. पतीच्या बाबतींतलें तुझें कर्तव्य तुला सांगण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. हे सद्गुण-संपन्न साध्वी, तूं आपल्या बापाच्या कुळाला व पतीच्याही कुळाला भूषविलें आहेस. माझी आठवण ठेवून आनंदानें वनांत जा. तुझ्या-सारख्या महासतीच्या कटाक्षानें कौरव दग्ध झाले नाहींत हें त्यांचें भाग्यच म्हटलें पाहिजे. होणारी गोष्ट कोणालाही टळत नाहीं हें तत्त्व साध्वी स्त्रियांना माहीत असल्यामुळें दुःखाच्या प्रसंगीं देखील त्यांचें अंतःकरण गडबडून जात नाहीं. धर्मच तुझें संरक्षण करील व त्याच्यामुळेंच लौकरच तुला कल्याणकारक दिवस प्राप्त होतील. वनांत सहदेवाची सर्वांहून अधिक काळजी घे. तो सर्वांत धाकटा आहे. त्याला औदासीन्य न उत्पन्न व्हावें."

याप्रमाणें कुंतीनें द्रौपदीला मोठ्या धैर्यानें निरोप दिला खरा; पण ज्या वेळीं खरोखरीच पांडव वनांत जाऊं लागले त्या वेळीं मात्र तिच्या संयमाचा बांध भंगून जाऊन ती नाना प्रकारें विलाप करूं लागली. महाभारतकार म्हणतातः—

**तदवस्थान् सुतान् सर्वानुपसृत्यातिवत्सला ।**
**स्वजमानावदच्छोकात्तत्तद्विलपती बहु ॥ १२**

कुन्त्युवाच ।

**कथं सद्धर्मचारित्रान्वृत्तस्थितिविभूषितान् ।**
**अक्षुद्रान्दृढभक्तांश्च दैवतेज्यापरान्सदा ॥ १३**
**व्यसनं वः समभ्यागात्कोऽयं विधिविपर्ययः ।**
**कस्यापध्यानजं चेदमागः पश्यामि वो धिया ॥ १४**
**स्यात्तु मद्भाग्यदोषोऽयं याहं युष्मानजीजनम् ।**
**दुःखायासभुजोत्यर्थं युक्तानप्युत्तमैर्गुणैः ॥ १५**
**कथं वत्स्यथ दुर्गेषु वने ऋद्धिविनाकृताः ।**
**वीर्यसत्त्वबलोत्साहतेजोभिरकृशाः कृशाः ॥ १६**
**यद्येतदेवमज्ञास्यं वने वासो हि वो ध्रुवम् ।**
**शतशृङ्गान्मृते पाण्डौ नागमिष्यं गजाह्वयम् ॥ १७**

धन्यं वः पितरं मन्ये तपोमेधान्वितं तथा ।
यः पुत्राधिमसंप्राप्य स्वर्गेच्छामकरोत्प्रियाम् ॥ १८
धन्यां चातीन्द्रियज्ञानामिमां प्राप्तां परां गतिम् ।
मन्ये तु माद्रीं धर्मज्ञां कल्याणीं सर्वथैव तु ॥ १९
रत्या मत्या च गत्या च ययाहमभिसंधिता ।
जीवितप्रियतां मह्यं धिङ्मां संक्लेशभागिनीम् ॥ २०
पुत्रका न विहास्ये वः कृच्छ्रलब्धान्प्रियान्सतः ।
साहं यास्यामि हि वनं हा कृष्णे किं जहासि माम् ॥ २१
अन्तवन्त्यसुधर्मेऽस्मिन्धात्रा किं नु प्रमादितः ।
ममान्तो नैव विहितस्तेनायुर्न जहाति माम् ॥ २२
हा कृष्ण द्वारकावासिन् क्वासि सङ्कर्षणानुज ।
कस्मान्न त्रायसे दुःखान्मां चेमांश्च नरोत्तमान् ॥ २३
अनादिनिधनं ये त्वामनुध्यायन्ति वै नराः ।
तांस्त्वं पासीत्ययं वादः स गतो व्यर्थतां कथम् ॥ २४
इमे सद्धर्ममाहात्म्ययशोवीर्यानुवर्तिनः ।
नार्हन्ति व्यसनं भोक्तुं नन्वेषां क्रियतां दया ॥ २५
सेयं नीत्यर्थविज्ञेषु भीष्मद्रोणकृपादिषु ।
स्थितेषु कुलनाथेषु कथमापदुपागता ॥ २६
हा पाण्डो हा महाराज क्वासि किं समुपेक्षसे ।
पुत्रान्विवास्यतः साधूनरिभिर्द्यूतनिर्जितान् ॥ २७
सहदेव निवर्तस्व ननु त्वमसि मे प्रियः ।
शरीरादपि माद्रेय मां मा त्याक्षीः कुपुत्रवत् ॥ २८
व्रजन्तु भ्रातरस्तेमी यदि सत्याभिसन्धिनः ।
मत्परित्राणजं धर्ममिहैव त्वमवाप्नुहि ॥ २९

वैशंपायन उवाच ।

एवं विलपतीं कुन्तीमभिवाद्य प्रणम्य च ।
पाण्डवा विगतानन्दा वनायैव प्रवव्रजुः ॥ ३०
विदुरश्चापि तामार्तां कुन्तीमाश्वास्य हेतुभिः ।
प्रावेशयद्गृहं क्षत्ता स्वयमार्ततरः शनैः ॥ ३१

—महाभारत, सभापर्व अध्याय ७९

"आपल्या पुत्रांची ती अवस्था पाहून अत्यंत दुःखी झालेली कुंती अतिशय विलाप करूं लागली. ती म्हणूं लागली, तुमच्यासारख्या धर्मचारित्र्यसंपन्न, उदारहृदयी, सर्व देवतांना सतत प्रसन्न करून घेणाऱ्या, दृढनिश्चयी व ऐश्वर्यशाली पुरुषांवर हें भीषण संकट यावें ही केवढी दुःखाची गोष्ट आहे! कोणत्या देवतेचा तुम्ही काय अपराध केला असें मी समजूं? माझ्यासारख्या दुर्दैवी स्त्रीच्या उदरीं जन्म झाला-हाच तर तुमचा दोष नसेल? उत्तम गुणांनीं युक्त असलेल्या तुम्ही इतकीं घोर दुःखें भोगावीं हा माझ्याच भाग्याचा दोष आहे. वीर्य, सत्त्व, बल, उत्साह व तेज यांनीं नेहमीं संपन्न असलेले तुम्हीं कृश होऊन ऐश्वर्यहीन अवस्थेंत घोर वनांत कसे नांदाल? जर तुमच्या कपाळीं सदाचा वनवासच आहे असें मला पूर्वींच समजलें असतें तर शतशृंगावर राजा पांडूचें निधन झाल्यानंतर मी हस्तिनापुरांत कधींही आलें नसतें. तुमचे वडील खरोखरी धन्य होत. पुत्रांचें दुःख पहाण्याआधींच त्यांनीं स्वर्गवास पत्करला. तपश्चर्येमुळें आलेल्या दूरदर्शीपणानें त्यांनीं हें पूर्वींच ओळखून तसें केलें असेल! ती अतींद्रियज्ञानसंपन्न, धर्मज्ञ माद्रीही खरोखरीच धन्य आहे. तिनें देखील हा भावी प्रकार ओळखूनच आधींच आपल्या पतीबरोबर स्वर्गास गमन केलें. माद्रीनें खरोखरीच विलास, बुद्धि. मत्ता, व उत्तम गति मिळविणें या सर्व बाबतींत मला पूर्णपणें पराजित केलें आहे. माझ्या जीवितप्रियतेला धिक्कार असो, मी जिवंत राहून केवळ क्लेश भोगण्यापलीकडे दुसरें काय मिळविलें? हे मुलांनो, मोठ्या कष्टानें तुमचीं मला प्राप्ति झाली आहे. तुम्ही मला अत्यंत प्रिय आहांत. मी तुमचा कधींही परित्याग करणार नाहीं. मीं देखील तुमच्याबरोबर वनांत येते. द्रौपदी, तुझें आपल्या वृद्ध सासूवर प्रेम नाहीं काय? तूं मला येथेंच सोडून कां जातेस? ब्रह्मदेवाच्या सृष्टीला अंत आहे असें म्हणतात. मग मलाच तेवढा ब्रह्मदेव कां बरें विसरला? मला जिवंत ठेवून नियमाचा भंग करण्यांत निश्चित त्याच्या हातून प्रमाद घडलेला आहे, म्हणूनच आयुष्य माझी पाठ सोडीत नाहीं. हे द्वारकावासी, संकर्षणानुजा श्रीकृष्णा, तूं माझी व माझ्या मुलांची या दुःखापासून कां सुटका करीत नाहींस?

आदि व अंत नसलेल्या तुझें जे ध्यान करतात त्यांचें तूं संरक्षण करतोस असें लोक सांगतात. मग तें सारें आजच व्यर्थ कसें ठरलें? हीं माझीं मुलें धर्म, महानुभावता, यश व पराक्रम यांचें अनुवर्तन करणारीं असून अशा प्रकारचें घोर दुःख भोगावयास मुळींच योग्य नाहींत. त्यांच्यावर तूं दया कां करीत नाहींस ? भीष्म, द्रोण व कृपाचार्य हे नीतिशास्त्र व राज्यशास्त्र यांत मोठे प्रवीण असून या कौरवकुलाचे आधारस्तंभ आहेत असें म्हणतात. मग ते जिवंत असतांना ही आपत्ति कां बरें यावी ? हे महाराज पांडू, आपण कोठें आहांत? शत्रू तुमच्या पुत्रांना कपटानें द्यूतांत जिंकून देशोधडीला लावीत असतांदेखील तुम्ही त्यांची उपेक्षा करतां काय ? हे सहदेवा, माझ्या शरीरापेक्षांही तू मला अधिक प्रिय आहेस, तूं तरी वनांत न जातां येथेंच माझ्याजवळ राहा. एखाद्या कुपुत्राप्रमाणें माझा परित्याग करूं नकोस. हे तुझे भ्राते मोठे सत्यसंध आहेत तर त्यांना वनांत जाऊं दे. पण तूं तरी माझ्याजवळ रहा आणि माझें संरक्षण करण्याच्या धर्माचा वांटेकरी हो." याप्रमाणें कुंती विलाप करीत असतां तिला वंदन करून विमनस्क स्थितींत पांडव वनांत निघून गेले. विदुरानें आर्त कुंतीचें कसेंबसें सांत्वन करून तिला आपल्या घरीं नेलें. तो स्वतःच अत्यंत दुःखी झाला होता."

तेरा वर्षें कुंती विदुराच्या घरीं राहिली. तेरा वर्षे पुत्रवियोगाचें विलक्षण दुःख तिनें सहन केलें. तिची आशा अशी होती कीं, तेरा वर्षांनंतर तरी आपल्या अपमानाचा सूड घेऊन आपले पुत्र स्वतःचें राज्य परत मिळवितील. पण त्यानंतर केवळ पांच गांवें मागून आपले पुत्र संधि करावयास सिद्ध आहेत हें पाहून त्या तेजस्वी क्षत्राणीचा संताप खळाळून बाहेर पडला. भगवान् श्रीकृष्ण कौरवांच्या राजसभेंत शिष्टाई करण्यासाठीं आले असतां ती इतकी चिडलेली होती कीं, पांडवांचें कुशल विचारतां विचारतां तिला द्रौपदीच्या अपमानाची आठवण होऊन तिचे नेत्र क्रोधानें प्रदीप्त होऊन उठले व ती श्रीकृष्णांना म्हणाली :—

**न प्रियो मम कृष्णाया बीभत्सुर्न युधिष्ठिरः ।**
**भीमसेनो यमौ वापि यदपश्यं सभागताम् ॥ ४९**

न मे दुःखतरं किञ्चिद् भूतपूर्वं ततोऽधिकम् ।
स्त्रीधर्मिणीं द्रौपदीं यच्छ्वशुराणां समीपगाम् ।। ५०
आनायितामनार्येण क्रोधलोभानुवर्तिना ।
सर्वे प्रैक्षन्त कुरव एकवस्त्रां सभागताम् ।। ५१
—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ९०

"युधिष्ठिर, अर्जुन, भीमसेन व नकुल सहदेव हे माझे पराक्रमी पुत्र डोळे उघडे ठेवून पहात असतां भरसभेंत द्रौपदीला ओढीत आणण्यांत आलें ही गोष्ट आठवली कीं, मला या पुत्रांच्याविषयीं मुळींच प्रेम वाटत नाहीं. क्रोध व लोभ यांच्या स्वाधीन होऊन अनार्यांनीं रजस्वला स्थितींत द्रौपदीला सभेंत श्वशुरांसमक्ष आणून उभें करावें व एकवस्त्रा अवस्थेंतल्या तिच्याकडे सर्वांनीं टकमका बघत बसावें, याच्याइतकी दुःखाची दुसरी कोणती गोष्ट असेल?

## तेजस्विनी क्षत्राणी

यानंतर भगवान् श्रीकृष्ण आपल्या शिष्टाईच्या कामांत लोकदृष्टीनें अपयश घेऊन पांडवांकडे परत जात असतां त्यांनीं पुनश्च कुंतीची भेट घेतली व झालेलें एकंदर वृत्त तिला निवेदन करून पांडवांसाठीं तुझा काय निरोप आहे म्हणून विचारलें. त्यावर कुंतीनें श्रीकृष्णांना विदुलेची वीरगाथा सांगितली. कुंतीच्या तोंडीं असलेली महाभारतांतील विदुलेची वीरगाथा आजही जीवन्मृतांचें संजीवन करूं शकण्याइतकी तेजसंपन्न आहे. डॉ. विंटरनिट्झसारख्यांनाही विदुलेच्या या वीरगाथेचा विलक्षण मोह पडलेला आहे. महाभारताच्या उपाख्यानांतच तिचा समावेश होत असल्यामुळें मी तिचें विवरण करीत नाहीं. ही वीरगाथा सांगून भगवान् श्रीकृष्णांकरवीं कुंतीनें आपल्या पुत्रांना जो तेजस्वी संदेश धाडला आहे तो फक्त मी आपणांला सांगतों. त्या संदेशावरून कुंतीच्या रूपानें साक्षात् दाहक तेज अंगीं वागविणारी विद्युल्लताच महाभारतांत तळपत असलेली आढळून येईल. कुंतीसारखी तेजस्विनी स्त्री सुप्तसंतापाचा अग्नि फुंकर घालून ज्यावेळीं प्रज्वलित करते त्यावेळीं त्या अग्नींत सर्व प्रकारच्या अधःपतनाचा पत्कर घेतलेल्या लक्षावधि

नराधमांचें भस्म करण्याचें दिव्य सामर्थ्य उत्पन्न झाल्यावांचून रहात नाहीं. उगाच कांहीं भगवान् श्रीकृष्णांना कुंती ही वंदनीय देवता वाटली नाहीं. आर्य स्त्रीच्या तेजस्वितेचा कुंती हा देदीप्यमान व अत्यंत दाहक असा आविष्कार आहे. आपल्या पुत्रांना निरोप देत असतां कुंती श्रीकृष्णांना म्हणाली :--

ब्रूयाः केशव राजानं धर्मात्मानं युधिष्ठिरम् ।
भूयांस्ते हीयते धर्मो मा पुत्रक वृथा कृथाः ॥ ५
श्रोत्रियस्येव ते राजन्मन्दकस्याविपश्चितः ।
अनुवाकहताबुद्धिर्धर्ममेवैकमीक्षते ॥ ६
अङ्गावेक्षस्व धर्मं त्वं यथा सृष्टः स्वयंभुवा ।
बाहुभ्यां क्षत्रियाः सृष्टा बाहुवीर्योपजीविनः ॥ ७
क्रूराय कर्मणे नित्यं प्रजानां परिपालने ।
शृणु चात्रोपमामेकां या वृद्धेभ्यः श्रुता मया ॥ ८
मुचुकुन्दस्य राजर्षेरददत् पृथिवीमिमाम् ।
पुरा वैश्रवणः प्रीतो न चासौ तद्गृहीतवान् ॥ ९
बाहुवीर्यार्जितं राज्यमश्नीयामिति कामये ।
ततो वैश्रवणः प्रीतो विस्मितः समपद्यत ॥ १०
मुचुकुन्दस्ततो राजा सोऽन्वशासद् वसुन्धराम् ।
बाहुवीर्यार्जितां सम्यक् क्षत्रधर्ममनुव्रतः ॥ ११
यं हि धर्मं चरन्तीह प्रजा राज्ञा सुरक्षिताः ।
चतुर्थं तस्य धर्मस्य राजा विन्देत भारत ॥ १२
राजा चरति चेद्धर्मं देवत्वायैव कल्पते ।
स चेदधर्मं चरति नरकायैव गच्छति ॥ १३
दण्डनीतिश्च धर्मेभ्यश्चातुर्वर्ण्यं नियच्छति ।
प्रयुक्ता स्वामिना सम्यगधर्मेभ्यश्च यच्छति ॥ १४
दण्डनीत्यां यदा राजा सम्यक् कार्त्स्न्येन वर्तते ।
तदा कृतयुगं नाम कालः श्रेष्ठः प्रवर्तते ॥ १५
कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम् ।
इति ते संशयो मा भूद्राजा कालस्य कारणम् ॥ १६

राजा कृतयुगस्रष्टा त्रेताया द्वापरस्य च ।
युगस्य च चतुर्थस्य राजा भवति कारणम् ।। १७
कृतस्य करणाद्राजा स्वर्गमत्यन्तमश्नुते ।
त्रेतायाः करणाद्राजा स्वर्गं नात्यन्तमश्नुते ।। १८
प्रवर्तनाद्द्वापरस्य यथाभागमुपाश्नुते ।
कलेः प्रवर्तनाद्राजा पापमत्यन्तमश्नुते ।। १९
ततो वसति दुष्कर्मा नरके शाश्वतीः समाः ।
राजदोषेण हि जगत् स्पृश्यते जगतः स च ।। २०
राजधर्मानवेक्षस्व पितृपैतामहोचितान् ।
नैतद्राजर्षिवृत्तं हि यत्र त्वं स्थातुमिच्छसि ।। २१
न हि वैक्लव्यसंसृष्ट आनृशंस्यव्यवस्थितः ।
प्रजापालनसंभूतं फलं किञ्चन लब्धवान् ।। २२
न ह्येतामाशिषं पाण्डुर्न चाहं न पितामहः ।
प्रयुक्तवन्तः पूर्वं ते यया चरसि मेधया ।। २३
यज्ञो दानं तपः शौर्यं प्रज्ञा संतानमेव च ।
माहात्म्यं बलमोजश्च नित्यमाशंसितं मया ।। २४
नित्यं स्वाहा स्वधा नित्यं दद्युर्मानुषदेवताः ।
दीर्घमायुर्धनं पुत्रान् सम्यगाराधिताः शुभाः ।। २५
पुत्रेष्वाशासते नित्यं पितरो दैवतानि च ।
दानमध्ययनं यज्ञः प्रजानां परिपालनम् ।। २६
एतद्धर्ममधर्मं वा जन्मनैवाभ्यजायथाः ।
ते तु वैद्याः कुले जाता अवृत्या तात पीडिताः ।। २७
यत्र दानपतिं शूरं क्षुधिताः पृथिवीचराः ।
प्राप्य तुष्टा प्रतिष्ठन्ते धर्मः कोऽभ्यधिकस्ततः ।। २८
दानेनान्यं बलेनान्यं तथा सूनृतया परम् ।
सर्वतः प्रतिगृह्णीयाद्राज्यं प्राप्येह धार्मिकः ।। २९
ब्राह्मणः प्रचरेद् भैक्षं क्षत्रियः परिपालयेत् ।
वैश्यो धनार्जनं कुर्याच्छूद्रः परिचरेच्च तान् ।। ३०
भैक्षं विप्रतिषिद्धं ते कृषिर्नैवोपपद्यते ।
क्षत्रियोऽसि क्षतात् त्राता बाहुवीर्योपजीविता ।। ३१

पित्र्यमंशं महाबाहो निमग्नं पुनरुद्धर ।
साम्ना भेदेन दानेन दण्डेनाथ नयेन वा ॥ ३२
इतो दुःखतरं किं नु यदहं दीनबान्धवा ।
परपिण्डमुदीक्षे वै त्वां सूत्वाऽमित्रनन्दन ॥ ३३
युध्यस्व राजधर्मेण मा निमज्जीः पितामहान् ।
मा गमः क्षीणपुण्यस्त्वं सानुजः पापिकां गतिम् ॥ ३४

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १३२

विद्याशूरं तपःशूरं दानशूरं तपस्विनम् ।
ब्राह्म्या श्रिया दीप्यमानं साधुवादे च सम्मतम् ॥ २०
अर्चिष्मन्तं बलोपेतं महाभागं महारथम् ।
धृतिमन्तमनाधृष्यं जेतारमपराजितम् ॥ २१
नियन्तारमसाधूनां गोप्तारं धर्मचारिणाम् ।
ईदृशं क्षत्रिया सूते वीरं सत्यपराक्रमम् ॥ २२

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १३६

अर्जुनं केशव ब्रूयास्त्वयि जाते स्म सूतके ।
उपोपविष्टा नारीभिराश्रमे परिवारिता ॥ १
अथान्तरिक्षे वागासीद्दिव्यरूपा मनोरमा ।
सहस्राक्षसमः कुन्ति भविष्यत्येष ते सुतः ॥ २
एष जेष्यति सङ्ग्रामे कुरून्सर्वान्समागतान् ।
भीमसेनद्वितीयश्च लोकमुद्वर्तयिष्यति ॥ ३
पुत्रस्ते पृथिवीं जेता यशश्चास्य दिवं स्पृशेत् ।
हत्वा कुरूंश्च सङ्ग्रामे वासुदेवसहायवान् ॥ ४
पित्र्यमंशं प्रणष्टं च पुनरप्युद्धरिष्यति ।
भ्रातृभिः सहितः श्रीमांस्त्रीन्मेधानाहरिष्यति ॥ ५
स सत्यसन्धो बीभत्सुः सव्यसाची यथाऽच्युत ।
तथा त्वमेव जानासि बलवन्तं दुरासदम् ॥ ६
तथा तदस्तु दाशार्ह यथा वागभ्यभाषत ।
धर्मश्चेदस्ति वार्ष्णेय तथा सत्यं भविष्यति ॥ ७
त्वं चापि तत्तथा कृष्ण सर्वं संपादयिष्यसि ।
नाहं तदभ्यसूयामि यथा वागभ्यभाषत ॥ ८

नमो धर्माय महते धर्मो धारयति प्रजाः ।
एतद्धनंजयो वाच्यो नित्योद्युक्तो वृकोदरः ।। ९
यदर्थं क्षत्रिया सूते तस्य कालोऽयमागतः ।
न हि वैरं समासाद्य सीदन्ति पुरुषर्षभाः ।। १०
विदिता ते सदा बुद्धिर्भीमस्य न स शाम्यति ।
यावदन्तं न कुरुते शत्रूणां शत्रुकर्शन ।। ११
सर्वधर्मविशेषज्ञां स्नुषां पाण्डोर्महात्मनः ।
ब्रूया माधव कल्याणीं कृष्ण कृष्णां यशस्विनीम् ।। १२
युक्तमेतन्महाभागे कुले जाते यशस्विनि ।
यन्मे पुत्रेषु सर्वेषु यथावत्त्वमवर्तथाः ।।१३
माद्रीपुत्रौ च वक्तव्यौ क्षत्रधर्मरतावुभौ ।
विक्रमेणार्जितान् भोगान् वृणीतं जीवितादपि ।। १४
विक्रमाधिगता ह्यर्थाः क्षत्रधर्मेण जीवतः ।
मनो मनुष्यस्य सदा प्रीणन्ति पुरुषोत्तम ।। १५
यच्च वः प्रेक्षमाणानां सर्वधर्मोपचायिनाम् ।
पाञ्चाली परुषाण्युक्ता को नु तत्क्षन्तुमर्हति ।। १६
न राज्यहरणं दुःखं द्यूते चापि पराजयः ।
प्रव्राजनं सुतानां वा न मे तद्दुःखकारणम् ।। १७
यत्र सा बृहती श्यामा सभायां रुदती तदा ।
अश्रौषीत् परुषा वाचस्तन्मे दुःखतरं महत् ।। १८
स्त्रीधर्मिणी वरारोहा क्षत्रधर्मरता सदा ।
नाध्यगच्छत्तदा नाथं कृष्णा नाथवती सती ।। १९
तं वै ब्रूहि महाबाहो सर्वशस्त्रभृतां वरम् ।
अर्जुनं पुरुषव्याघ्रं द्रौपद्याः पदवीं चर ।। २०
विदितं हि तवात्यन्तं क्रुद्धाविव यमान्तकौ ।
भीमार्जुनौ नयेतां हि देवानपि परां गतिम् ।। २१
तयोश्चैतदवज्ञानं यत्सा कृष्णा सभागता ।
दुःशासनश्च यद्भीमं कटुकान्यभ्यभाषत ।। २२
पश्यतां कुरुवीराणां तच्च संस्मारयेः पुनः ।
पाण्डवान् कुशलं पृच्छेः सपुत्रान् कृष्णया सह ।। २३

**मां च कुशलिनीं ब्रूयास्तेषु भूयो जनार्दन ।**
**अरिष्टं गच्छ पन्थानं पुत्रान् मे प्रतिपालय ।। २४**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १३७

हे केशवा, धर्मात्मा राजा युधिष्ठिराची भेट घेऊन माझा निरोप म्हणून तूं त्याला असें सांग कीं, धर्म धर्म म्हणून तुझ्या हातून केवळ अधर्म घडत आहे. भलत्याच गोष्टीला धर्म म्हणून कवटाळून तूं चुकीचें आचरण करीत आहेस. विद्वान् नसलेल्या मंदबुद्धीच्या वेदपाठकाची बुद्धि जशी अर्थाकडे मुळींच न पहातां वेदांच्या शब्दांनांच मिठी मारून बसते तशीच तुझी ही बुद्धि धर्म धर्म म्हणतां म्हणतां धर्माचें रहस्य मुळींच न कळण्याइतकी जड झालेली आहे. ब्रह्मदेवानें तुला ज्या वर्णांत उत्पन्न केलें त्या वर्णाचा जो धर्म तोच तुझा स्वधर्म होय याचा तूं कधीं विचार तरी केला आहेस काय ? परमेश्वरानें आपल्या बाहूंपासून क्षत्रियांना उत्पन्न केलें. त्यामुळें बाहूंचें वीर्य हेंच त्यांचें उपजीवन होय. प्रजांचें परिपालन करण्यासाठीं व युद्धासारखें क्रूर कर्म पार पाडण्यासाठींच क्षत्रियांची उत्पत्ति झालेली आहे. मी वृद्धांच्या तोंडून ऐकलेली एक गोष्ट तुला सांगतें. पूर्वीं कुबेरानें अत्यंत प्रसन्न होऊन मुचुकुंद राजर्षीला ही संपूर्ण पृथ्वी दिली. पण त्यानें ती घ्यावयाचें नाकारलें. तो म्हणाला कीं, क्षत्रिय कोणाचें कृपादान घेत नसतात. मी माझ्या बाहुवीर्याच्या भरंवशावर ही संपूर्ण पृथ्वी जिंकीन व नंतरच तिचा उपभोग घेईन. त्याच्या या उत्तरानें कुबेर अत्यंत आश्चर्यचकित झाला व संतुष्टही झाला. नंतर मुचुकुंदानें स्वतःच्या बाहुबलाच्या भरंवशावर क्षात्रधर्मानुसार पृथ्वी जिंकून तिचें राज्य केलें. राजानें संरक्षिलेल्या प्रजा जें धर्माचरण करतात त्या आचरणाच्या पुण्याच्या चवथ्या भागाचा राजा आपोआपच धनी होतो. राजा जर धर्मानुसार वागला तर तो देवच होतो. व तो जर अधर्माप्रमाणें वागला तर नरकांत जातो. राजानें दंडनीतीचा योग्य प्रयोग केला तर ती चातुर्वर्ण्यात्मक प्रजेचें अधर्मापासून नियंत्रण करून त्यांना धर्मानुसारच वागावयास लावितें. जर राजा दंडनीतीचा उत्कृष्ट प्रयोग करीत असेल तर कृतयुग नांवाची समाजविकसनाची सर्वश्रेष्ठ अवस्था तो उत्पन्न करतो. काळ हा राजाचें

कारण आहे कीं राजा हाच कालाचें कारण आहे या बाबतींत तुला संशय उत्पन्न होण्याचें कारण नाहीं. राजा हेंच काळाचें खरें कारण आहे. राजाच कृतयुग उत्पन्न करणारा आहे. तोच आपल्या कर्तृत्वानें त्रेता, द्वापर व कलि हीं युगें उत्पन्न करतो. राजानें कृतयुग उत्पन्न केलें तर त्याला श्रेष्ठ स्वर्गसुखाची प्राप्ति होते. त्यानें जर त्यापेक्षां कमी श्रेणीचें त्रेतायुग उत्पन्न केलें तर त्याला तितक्या दिव्य गतीची प्राप्ति होत नाहीं. जर त्यानें द्वापर युग उत्पन्न केलें तर त्याला सामान्य फल प्राप्त होतें. व त्यानें जर कलियुग उत्पन्न केलें तर त्याला अतिशय मोठें पाप लागतें व तो दुरात्मा अनंत काळ नरकांत पिचत पडतो. राजाचे दोष जगाला भोगावे लागतात. तसेच जगाचे दोष राजालाही भोगावे लागतात. तुझ्या पितृपितामहांच्या परंपरेनें तुझ्यासाठीं सर्वस्वीं उचित असलेल्या राजधर्माकडे तूं लक्ष दे. तूं ज्या प्रकारचें आचरण करूं इच्छितोस तें राजर्षींना मुळींच शोभण्यासारखें नाहीं. नुसतें दयाशील अंतः-करण ठेवणाऱ्या व दुबळेपणाचें वर्तन करणाऱ्या कोणालाही प्रजापालनानें उत्पन्न होणारें श्रेष्ठ फल आजपर्यंत कधींही मिळालें नाहीं. तुझे पितामह, राजा पांडू व मी यांनीं तुझ्याविषयीं अशी कांहीं आशा धरली नव्हती. ज्या बुद्धीनें तूं आज वागत आहेस, ती तुझ्यांत उत्पन्न व्हावी म्हणून आम्हीं तुला आशीर्वाद निश्चित दिलेले नव्हते. यज्ञ, दान, तपश्चर्या, शौर्य, बुद्धिमत्ता, संतान, माहात्म्य, बल, ओज हीं तुझ्या ठिकाणीं नित्य असावीं अशीच मी सदैव इच्छा केली होती. नित्य यज्ञ करून पितर व देवता यांना तूं प्रसन्न करून घ्यावेंस. तुला दीर्घ आयुष्य, धन व पुत्र यांची प्राप्ति व्हावी अशीच मी इच्छा केली होती. नित्य आराधना करून प्रसन्न केलेले पितर व दैवतें पुत्राविषयीं हीच इच्छा करीत असतात. दान, अध्ययन, यज्ञ व प्रजांचें परिपालन हाच तुझा जन्मसिद्ध धर्म आहे. खरे कुलवंत पंडित तेच होत कीं जे आपलें उपजीवन आपल्या धर्मानुसार मिळवितात व अकारण कष्टी होत नाहींत. पृथ्वीवरील भुकेले लोक शूर दात्याच्या घरीं येऊन संतुष्ट होऊन गेले तर त्याच्या-इतका श्रेष्ठ धर्म जगांत दुसरा कोणता आहे ? धार्मिक मनुष्याच्या

स्वाधीन राज्य असलें तर कुणाला दानानें, तर कुणाला सामर्थ्यानें, तर कुणाला भलेपणानें याप्रमाणें तो नियंत्रित करून सर्वांना धर्मकार्यांत लावूं शकतो. भिक्षा मागून पोट भरणें हा ब्राह्मणांचा धर्म आहे. प्रजापालन करून उपजीवन करणें हा क्षत्रियांचा धर्म आहे. व्यापार करून धनार्जन करणें हा वैश्यांचा धर्म आहे व त्रैवर्णिकांची परिचर्या करून आपलें उपजीवन चालविणें हा शूद्राचा धर्म होय. भिक्षा तुला निषिद्ध आहे. कृषि तुला करतां येणार नाहीं. तूं बाहुवीर्यानें स्वतःचें उपजीवन चालविणारा क्षत्रिय आहेस. संकटांतून लोकांचें संरक्षण करणें हाच तुझा धर्म आहे. साम, भेद, दाम, दंड अथवा राजनीतीच्या इतर कोणत्याही उपायांचा अवलंब करून तुझ्या पित्यांचा दुसऱ्यानें गिळंकृत केलेला अंश आपल्या स्वाधीन करून घेणें हेंच तुझें खरें कर्तव्य होय. तुझ्यासारख्याला जन्म देऊन मी तुझ्या आईनें दुसऱ्याच्या घरच्या पिंडावर आपली उपजीविका करावी याच्याइतकें दुःखदायक वा लाजिरवाणें दुसरें कांहीं असूं शकेल काय? राजधर्माप्रमाणें युद्ध कर. आपल्या पितामहांना शोकसागरांत अथवा अधोगतींत बुडवूं नकोस व स्वतःही धर्माच्या नांवाखालीं अधर्माचें आचरण करून पुण्य नष्ट झालेल्या स्थितींत आपल्या भावांना घेऊन नरकांत जाऊं नकोस. विद्याशूर, तपःशूर, दानशूर, ब्राह्मतेजानें युक्त, सर्व लोक ज्याची प्रशंसा करतात असा, दुसऱ्यांना दाहक ठरणारा, अत्यंत तेजस्वी, अत्यंत बलसंपन्न महानुभाव, महारथ, धैर्यशील, दुसऱ्यांनीं धर्षण करावयास अशक्य, शत्रूंना जिंकणारा, ज्याचा पराजय कधींही होत नाहीं असा, दुष्टांचें नियंत्रण करणारा व धर्मानुसार वागणाऱ्यांचें संरक्षण करणारा, सत्य पराक्रमी वीरपुत्रच आपल्याला व्हावा अशी क्षत्रिय स्त्री इच्छा करते. मी क्षत्रिया आहे. तूं असा पुत्र आहेस काय? याचा स्वतःच्या मनाशीं नीट विचार कर.

"हे केशवा, अर्जुनाला तूं माझा असा निरोप सांग कीं तुझ्या जन्मानंतर जननाशौचामध्यें स्त्रियांच्या घोळक्यांत मी आश्रमांत बसलें असतां अवचित दिव्य आकाशवाणी झाली. त्या आकाशवाणीनें मला असें सांगितलें कीं, हे कुंती, हा तुझा पुत्र देवेंद्राप्रमाणें अत्यंत

प्रभावशाली होणार आहे. हा भीमसेनाबरोबर सर्व लोकांवर विजय संपादन करून सर्व कौरवांना रणांत जिंकील. हा सर्व पृथ्वी जिंकून आपली यशोपताका स्वर्गाला नेऊन भिडवील. भगवान् श्रीकृष्णांच्या साहाय्यानें संग्रामांत सर्व कौरवांना ठार मारून त्यांनीं अपहृत केलेला आपल्या पित्याचा राज्यभाग हा पुनश्च परत मिळवील. बंधूंसहित हा तीन अश्वमेध यज्ञ करील. हे केशवा, सव्यसाची व रणांत भीषण कर्में करणारा अर्जुन सत्यसंध आहे, बलवान् आहे व शत्रूंना धडक द्यावयास अत्यंत कठिण असा आहे. हें सर्व तुला माहीत आहेच. ती आकाशवाणी खरी झाली पाहिजे. जगांत जर धर्म कांहीं असेल तर आकाशवाणी खरी झालीच पाहिजे. तूं तें सर्व खरें करून दाखविशील यांत मला शंका नाहीं. सर्व प्रजांचें धारण करणारा धर्म अत्यंत श्रेष्ठ आहे. त्याला माझा नमस्कार असो. आजवर ती आकाशवाणी खरी ठरलेली नाहीं. याचें मला वैषम्य वाटत नाहीं. परंतु आतां तरी ती खरी ठरली पाहिजे असें तूं अर्जुनाला सांग. नेहमीं प्रतिकारासाठीं उद्युक्त असलेल्या भीमाला तूं माझा असा निरोप सांग कीं, शत्रूशीं वैर उत्पन्न झाल्यावर थोर पुरुष कधींही भग्नमनस्क व हतोत्साह होत नसतात. कौरवांचा अंत केल्यावांचून तुझ्या अंतःकरणालाही शांति कधींहि लाभणार नाहीं. तुझ्या स्वभावाची मला पूर्णपणें ओळख आहे. क्षत्रिय स्त्री ज्याच्यासाठीं पुत्राला जन्म देते त्याचा काळ आज आलेला आहे. तुझ्यापासून मी तीच अपेक्षा करते. सर्व धर्म जाणणारी राजा पांडूची सून कल्याणी द्रौपदी मला वारंवार आठवल्यावांचून राहात नाहीं. तिला माझे आशीर्वाद म्हणून एवढेंच सांग कीं, तूं आपत्तीच्या काळांत माझ्या पुत्रांशीं जें वर्तन केलेंस तें कुलवती स्त्रियांना सर्वस्वीं भूषणास्पद आहे. क्षत्रिय धर्मांत नेहमीं रत असणाऱ्या माद्रीपुत्रांना माझा निरोप असा सांग कीं, प्राणापेक्षांही पराक्रमानें मिळविलेले भोग भोगण्याचीच तुम्ही इच्छा करा. क्षत्रिय धर्मानुसार जगून पराक्रमानें संपत्तीचा उपभोग घेणारा मनुष्य धन्य होय. त्याचेंच वैभव त्याला खरा आनंद देऊं शकतें. सर्व धर्मांचा आधारस्तंभ होऊं शकणाऱ्या तुम्हां सगळ्यांच्या डोळ्यांदेखत त्या अधमांनीं

द्रौपदीला वाटेल ते हीन शब्द ऐकविले. तें कोण सहन करूं शकेल? श्रीकृष्णा, माझ्या पुत्रांना तूं असें सांग कीं, तुमच्या राज्याचा शत्रूंनीं अपहार केल्याचें अथवा द्यूतांत तुमचा पराजय झाल्याचें किंवा शत्रूंनीं तुम्हांला देशोधडीला लावून दुर्गतींत ढकलल्याचें मला तितकें दुःख होत नाहीं. पण माझी ती अलौकिक सून भरसभेंत ओढीत आणल्यानंतर रडत असतां अंतःकरणाला घरे पाडणारे जे कठोर व हलकटपणाचे शब्द दुष्टांनीं तिला ऐकविलें ही गोष्ट मात्र माझ्या अंतःकरणाला सारखी जाळीत आहे. क्षत्रिय धर्मावर अत्यंत निष्ठा असलेली व रजस्वला स्थितींत असलेली ती माझी सून तिचे पराक्रमी संरक्षक असतांनादेखील त्या भयानक दिवशीं निराधार व अनाथ ठरली. सर्व शस्त्रधारी लोकांत श्रेष्ठ असलेल्या पुरुषव्याघ्र अर्जुनाला तूं माझा निरोप म्हणून असें सांग कीं, द्रौपदीच्या विटंबनेचा सूड घेणें हेंच पुरुष म्हणून तुझें खरें कर्तव्य आहे. क्रुद्ध झालेले भीम व अर्जुन यमधर्मराज व मृत्यु यांच्या जोडीप्रमाणें भयंकर असून देवांना देखील नष्ट करण्याचें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं आहे. ते उघड्या डोळ्यांनीं पहात असतां शत्रूंनीं द्रौपदीला सभेंत आणावें व सर्व कौरवश्रेष्ठ ऐकत असतां भीमासारख्या महापराक्रमी व्यक्तीला दुःशासनानें हलकटपणानें वाटेल तें बोलावें याचा अर्थ काय ? वस्त्रहरणाच्या वेळचा दारुण प्रसंग व त्यावेळीं शत्रूंनीं केलेला पांडवांचा भयानक उपहास याची तूं त्यांना पुनश्च नीट जाणीव दे. त्यांचें कुशल मी विचारलें आहे म्हणून सांग. माझें कुशल त्यांना कळव. माझे पुत्र मी तुझ्या हातांत देतें."

अशा तेजस्विनी मातेच्या पुत्रांनीं आपल्या कुलस्त्रीच्या व वंशाच्या गौरवार्थ व श्रेष्ठ जीवनमूल्यांच्या संरक्षणासाठीं कुरुक्षेत्राच्या रणांगणावर अभूतपूर्व पराक्रम प्रकट करून दुर्जनांच्या रक्तनद्या वाहविल्या असल्या व अपमानित पण तेजस्वी राष्ट्राचें तें अखंड स्फूर्तिस्थान बनले असले तर त्यांत नवल तें काय आहे ! कुंतीच्या या तेजोगर्भ निरोपांत आजही पतित राष्ट्राचें उत्थापन घडवून आणण्याचें सामर्थ्य आहे.

## खरी आर्य स्त्री

पण कुंतीचें खरें वैशिष्टय जें मनावर परिणाम करतें तें तिच्या उत्तर आयुष्यांतील तिच्या उदात्त त्यागामुळेंच होय. भारतीय स्त्री-जीवनाचें खरें वैशिष्टय तिनें आपल्या उत्तर आयुष्यांतील केलेल्या अपूर्व त्यागांत सांठविलेलें आहे. तिच्या पुत्रांनीं शत्रूंना रणांगणांत ठार मारून साम्राज्य मिळविल्यानंतर राजमाता म्हणून ऐश्वर्यांत व अहंकाराच्या उद्वेगांत आपला काळ घालविण्याऐवजीं आपल्यापेक्षां वडील म्हणून दुःखी असलेल्या देवी गांधारीच्या सदैव शुश्रूषेंत ती निमग्न राहिली.

**युधिष्ठिरो महाराज धृतराष्ट्रेऽभ्युपाहरत् ।**
**तथैव कुन्ती गान्धार्यां गुरुवृत्तिमवर्तत ।। ११**

—महाभारत, आश्रमवासिकपर्व अध्याय १

यानंतर राजे धृतराष्ट्र गांधारी सहित अरण्यांत जाऊं लागले असतां राजवैभवाचा परित्याग करून कुंतीही त्यांच्याबरोबर अरण्यांत जाऊं लागली. महाभारतकार म्हणतातः—

**कुन्ती गान्धारीं बद्धनेत्रां व्रजन्तीं स्कन्धासक्तं हस्तमथोद्वहन्ती ।**
**राजा गान्धार्याः स्कन्धदेशेऽवसज्य पाणिं ययौ धृतराष्ट्रः प्रतीतः ।। ९**

—महाभारत, आश्रमवासिकपर्व अध्याय १५

"डोळ्यांना पट्टी बांधलेली गांधारी राजा धृतराष्ट्राबरोबर अरण्यांत जात असतां तिचा हात आपल्या खांद्यावर घेऊन राजमाता कुंती तिला आधार देऊन चालवीत होती व राजा धृतराष्ट्र गांधारीच्या स्कंधावर हात ठेवून हळुहळू मार्ग आक्रमीत होता." सर्व राजवैभवाचा परित्याग करून ज्या वेळीं कुंती धृतराष्ट्राबरोबर अरण्यांत जाऊं लागली त्यावेळीं कोमल मनाच्या युधिष्ठिरांना अत्यंत दुःख झालें. त्यांनीं आपल्या मातेला असें सांगितलें कीं, वनांत धृतराष्ट्र व गांधारी यांची सेवा करण्यास मी जातों पण आम्ही तुझे पुत्र जिवंत असतां तूं अरण्यवासांतील कष्ट सहन करावेस हें मला बरें वाटत नाहीं. युधिष्ठिरांचा निर्बंध पाहून कुंतीच्या निश्चयांत कांहींही फरक पडला नाहीं. फक्त तिच्या डोळ्यांत अश्रु

मात्र तरळले. तिनें आपल्या पुत्राला काय उत्तर दिलें असेल? ती म्हणाली:–

सहदेवे महाराज माऽप्रसादं कृथाः क्वचित् ।
एष मामनुरक्तो हि राजंस्त्वां चैव सर्वदा ।। १०
कर्णं स्मरेथाः सततं सङ्ग्रामेष्वपलायिनम् ।
अवकीर्णो हि समरे वीरो दुष्प्रज्ञया तदा ।। ११
आयसं हृदयं नूनं मन्दाया मम पुत्रक ।
यत्सूर्यजमपश्यन्त्याः शतधा न विदीर्यते ।। १२
एवंगते तु किं शक्यं मया कर्तुमरिन्दम ।
मम दोषोऽयमत्यर्थं ख्यापितो यन्न सूर्यजः ।। १३
तन्निमित्तं महाबाहो दानं दद्यास्त्वमुत्तमम् ।
सदैव भ्रातृभिः सार्धं सूर्यजस्यारिमर्दन ।। १४
द्रौपद्याश्च प्रिये नित्यं स्थातव्यमरिकर्शन ।
भीमसेनोऽर्जुनश्चैव नकुलश्च कुरूद्वह ।। १५
समाधेयास्त्वया राजंत्वय्यद्य कुलधूर्गता ।
श्वश्रूश्वशुरयोः पादान् शुश्रूषन्ती वने त्वहम् ।
गान्धारीसहिता वत्स्ये तापसी मलपङ्किनी ।। १६

––महाभारत, आश्रमवासिक पर्व अध्याय १६

"हे महाराज, तुझा सर्वांत धाकटा बंधु जो सहदेव त्याच्यावर कधींही अप्रसन्न होऊं नकोस. येवढेंच माझें तुला सांगणें आहे. त्याचें माझ्यावर व तुझ्यावर अतिशय प्रेम आहे. त्याचप्रमाणें संग्रामांतून कधींही पलायन न करणाऱ्या कर्णाचें सतत स्मरण ठेव. दुष्ट बुद्धीनें त्याचा समरांत नाश झाला. माझें हृदय जणूं कीं काय लोखंडाचें असावें असें मला वाटतें. एरवीं कर्णाच्या स्मृतीनें तें शतधा विदीर्ण झाल्यावांचून राहिलें असतें काय? पण आतां होऊन गेलेल्या गोष्टीला मीं काय करूं शकणार आहे? कर्ण माझा मुलगा आहे ही गोष्ट मी पूर्वींच प्रकट केली नाहीं हा माझ्याहातून मोठा दोषच घडला आहे. दान ही कर्णाची जीवननिष्ठा होती. तूं त्याच्या निमित्तानें पुष्कळसें दान दे. द्रौपदीचें नेहमीं प्रिय करणें हें तुझें कर्तव्य आहे. आतां कुळांत तूंच सर्वांत वडील असल्यामुळें तूंच सर्वांचा संभाळ केला पाहिजेस. भीमसेन, अर्जुन व नकुल यांना संभाळून घे. माझी

कसली काळजी करतोस? गांधारी व धृतराष्ट्र हे माझे सासू व सासरे आहेत. ( गांधारी-धृतराष्ट्रांना कुंतीनें सासू-सासरे म्हटल्याबद्दल आर्य संस्कृतीच्या कुळाचारांची माहिती नसलेल्या पुष्कळांना मोठें विलक्षण वाटतें. मी येथें मुळांतले शब्द वापरले आहेत. त्यांचें स्पष्टीकरण करतांना महाभारताचा विख्यात टीकाकार नीलकंठ असें म्हणतो कीं, "धृतराष्ट्रः पाण्डोः ज्येष्ठत्वात् पितृसमः तेन कुन्त्याः सः श्वशुरः" धृतराष्ट्र हा पांडूचा वडील भाऊ असल्यामुळें तो त्याला पित्यासारखाच आहे. म्हणन कुंतीनें त्याला श्वशुर असें म्हटलें. येवढ्यानें आक्षेपकांचें समाधान होऊं शकेल असें वाटतें. ) माझ्या या सासू–सासऱ्यांची चरणसेवा करीत अरण्यांत गांधारीसहित मी राहीन. या वयांत धूळ अंगावर बसलेल्या स्थितींत तपस्या करीत जीवन घालविणें हेंच माझें कर्तव्य होय. याप्रमाणें कुंतीनें उत्तर देतांच धर्मात्मा युधिष्ठिर अत्यंत खिन्न झाला. चिंता व शोक यांनीं त्याचें अंतःकरण व्यापून गेलें. तो कुंतीला म्हणूं लागला, तूं हें काय ठरविलें आहेस? माते, याप्रमाणें बोलून तूं आमच्या हृदयावर कां घरें पाडूं इच्छितेस? तूं माझ्यावर प्रसन्न हो व कृपा कर. तुला वनांत जावयास मी कधींच संमति देणार नाहीं. पूर्वी विदुलेची कथा ऐकवून तूंच आम्हांला अत्यंत तेजस्वी निरोप पाठवून संग्रामासाठीं उद्युक्त केलेंस व आज तूंच आमचा असा परित्याग करतेस काय? सर्व राजांना ठार मारून श्रीकृष्णाकरवीं तूं पाठविलेल्या निरोपाप्रमाणें हें राज्य मीं संपादन केलें आहे. आतां तूंच मला क्षात्र धर्मानुसार वागावयास भाग पाडून माझा परित्याग कां करतेस? ह्या विस्तीर्ण राज्याचा, आम्हां सर्वांचा, व जिच्यावर तुझें अत्यंत प्रेम आहे त्या तुझ्या सुनेचा परित्याग करून अरण्यांत तूं आपलें जीवन कसें घालविशील? माझ्यावर प्रसन्न हो व राजनगरींतच रहा.

हें बोलत असतां युधिष्ठिरांच्या नेत्रांतून अविरत अश्रुपात चालू होता. कुंतीच्याही नेत्रांत अश्रू आले पण तिनें आपला निश्चय बदलला नाहीं. तें पाहून भीमसेन पुढें झाला व त्यानें कुंतीला म्हटलें, हे माते, पुत्रांनीं मिळविलेलें हें राज्य प्राप्त झाल्यावर राजधर्मानुसार

मिळणारे मानसन्मान सोडून अरण्यांत जाण्याची बुद्धि तुला कां झाली? असेंच जर करावयाचें होतें तर पूर्वीं तूं आम्हांला संपूर्ण पृथ्वीचा विनाश करून राज्यसंपादन करावयास्तव कां प्रोत्साहित केलेंस? व आतां आम्हीं तुझ्या म्हणण्याप्रमाणें वागल्यानंतर तूं आमचा कां परित्याग करूं इच्छितेस? तुला वनांत जाण्याचें काय कारण आहे? आई, तुला आम्हांला असेंच सोडावयाचें होतें तर तूं लहानपणीं आम्हांला अरण्यांतून राजधानींत आणलेंस तरी कशाला?

पण कुंती कांहींच न बोलतां पुढें जात होती. त्यानंतर वारंवार पांडवांचा शोक पाहून तिनें त्यांना जें उत्तर दिलें तें भारतांतील आर्य स्त्रियांच्या शीलचारित्र्याचें निदर्शन म्हणून भारतवर्षाच्या सांस्कृतिक इतिहासांत अमर ठरण्याच्या योग्यतेचें आहे. ती म्हणाली :—

एवमेतन्महाबाहो यथा वदसि पाण्डव ।
कृतमुद्धर्षणं पूर्वं मया वः सीदतां नृपाः ।। १
द्यूतापहृतराज्यानां पतितानां सुखादपि ।
ज्ञातिभिः परिभूतानां कृतमुद्धर्षणं मया ।। २
कथं पाण्डोर्न नश्येत सन्ततिः पुरुषर्षभाः ।
यशश्च वो न नश्येत इति चोद्धरणं कृतम् ।। ३
यूयमिन्द्रसमाः सर्वे देवतुल्यपराक्रमाः ।
मा परेषां मुखप्रेक्षाः स्थेत्येवं तत्कृतं मया ।। ४
कथं धर्मभृतां श्रेष्ठो राजा त्वां वासवोपमः ।
पुनर्वने न दुःखी स्या इति चोद्धरणं कृतम् ।। ५
नागायुतसमप्राणः ख्यातविक्रमपौरुषः ।
नायं भीमोत्ययं गच्छेदिति चोद्धरणं कृतम् ।। ६
भीमसेनादवरजस्तथाऽयं वासवोपमः ।
विजयो नावसीदेत इति चोद्धरणं कृतम् ।। ७
नकुलः सहदेवश्च तथेमौ गुरुवर्तिनौ ।
क्षुधा कथं न सीदेतामिति चोद्धरणं कृतम् ।। ८
इयं च बृहती श्यामा तथाऽत्यायतलोचना ।
वृथा सभातले क्लिष्टा मा भूदिति च तत्कृतम् ।। ९
प्रेक्षतामेव वो भीम वेपन्तीं कदलीमिव ।
स्त्रीधर्मिणीमरिष्टाङ्गीं तथा द्यूतपराजिताम् ।। १०
दुःशासनो यदा मौर्ख्याद् दासीवत्पर्यकर्षत ।
तदैव विदितं मह्यं पराभूतमिदं कुलम् ।। ११

निषण्णाः कुरवश्चैव तदा मे श्वशुरादयः ।
सा दैवं नाथमिच्छन्ती व्यलपत्कुररी यथा ॥ १२
केशपक्षे परामृष्टा पापेन हतबुद्धिना ।
यदा दुःशासनेनैषा तदा मुह्याम्यहं नृपाः ॥ १३
युष्मत्तेजोविवृद्ध्यर्थं मया ह्युद्धरणं कृतम् ।
तदानीं विदुलावाक्यैरिति तद्वित्त पुत्रकाः ॥ १४
कथं न राजवंशोऽयं नश्येत्प्राप्य सुतान्मम ।
पाण्डोरिति मया पुत्रास्तस्मादुद्धरणं कृतम् ॥ १५
न तस्य पुत्राः पौत्रा वा क्षतवंशस्य पार्थिव ।
लभन्ते सुकृताँल्लोकान् यस्माद्वंशः प्रणश्यति ॥ १६
भुक्तं राज्यफलं पुत्रा भर्तुर्मे विपुलं पुरा ।
महादानानि दत्तानि पीतः सोमो यथाविधि ॥ १७
नाहमात्मफलार्थं वै वासुदेवमचूचुदम् ।
विदुलायाः प्रलापैस्तैः पालनार्थं च तत्कृतम् ॥ १८
नाहं राज्यफलं पुत्राः कामये पुत्रनिर्जितम् ।
पतिलोकानहं पुण्यान्कामये तपसा विभो ॥ १९
श्वश्रूश्वशुरयोः कृत्वा शुश्रूषां वनवासिनोः ।
तपसा शोषयिष्यामि युधिष्ठिर कलेवरम् ॥ २०
निवर्तस्व कुरुश्रेष्ठ भीमसेनादिभिः सह ।
धर्मे ते धीयतां बुद्धिर्मनस्तु महदस्तु च ॥ २१

—महाभारत, आश्रमवासिक पर्व अध्याय १७

"हे पांडवा, मी पूर्वी अवश्य कर्तव्य म्हणून तुमच्यांत रणोत्साह उत्पन्न केला ही गोष्ट खरी आहे. सुखांतून परिभ्रष्ट झालेल्या, ज्ञातिबांधवांनीं तिरस्कृत केलेल्या, द्यूतांत राज्याचा अपहार झालेल्या तुमचें तेज प्रदीप्त करणें माता म्हणून माझें कर्तव्यच होतें. राजा पांडूसारख्या सर्वश्रेष्ठ पुरुषाची संतति नष्ट होऊं नये व तुमच्या यशाचा नाश होऊं नये म्हणून मीं तुम्हांला प्रोत्साहित केलें. तुम्ही सर्व लोक महेंद्राप्रमाणें प्रभावशाली व देवाप्रमाणें पराक्रमी असून देखील दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहात बसण्याचा हीन मार्ग पत्करावा हें मला बरें वाटलें नाहीं. महेंद्राप्रमाणें प्रभावशाली असलेला व सर्व धर्मनिष्ठ राजांत अत्यंत श्रेष्ठ असा हा युधिष्ठिर जन्मभर दुःखी अवस्थेंत वनांत राहणें मला योग्य वाटलें नाहीं. दहा सहस्र हत्तींचें बळ अंगीं असलेला व आपल्या पराक्रमानें व पौरुषानें सर्व जगांत विख्यात अस-

लेला भीमसेन वाया जाऊन नष्ट होऊं नये अशी माझी इच्छा होती. भीमापेक्षां धाकटा पण महेंद्राप्रमाणें तेजस्वी असा हा अर्जुन जन्मभर दीन राहूं नये असें मला वाटत होतें. आपल्या ज्येष्ठ बंधूच्या आज्ञेंत राहणारे हे नकुलसहदेव अन्नासाठीं लाचारीचें जीवन पत्करून सदा खिन्न राहूं नयेत असें मला वाटत होतें. म्हणून मीं क्षत्रिय कुळांत उत्पन्न झालेल्या तुमचें जें अवश्य कर्तव्य होतें तें तुम्ही पार पाडावें या उत्कट इच्छेनें तुमचें तेज वाढविलें. तुमच्या हातून अधर्म घडत होता. मी धर्म घडविला. ही विशाललोचना द्रौपदी भरसभेंत फरफटत ओढत आणली गेली व तिला विटंबना सहन करावी लागली. हे भीमा, तुमच्या डोळ्यासमोर थरकांपणाऱ्या कदलीप्रमाणें कंप उत्पन्न झालेल्या द्रौपदीला द्यूतपराजित दासी म्हणून दुःशासनानें मूर्खपणानें ज्यावेळीं भर सभेंत खेचलें त्याचवेळीं या कुळाचा सर्वनाश झाला हें मीं निश्चित ठरविलें. माझ्या सर्व श्वशुरांच्या सभेंत दैवालाच आपले संरक्षक समजून घाबरलेल्या हरिणीप्रमाणें द्रौपदी आर्त विलाप करीत असतां बुद्धि नष्ट झालेल्या त्या पापी दुःशासनानें जेव्हां तिच्या केंसांना हात घातला त्यावेळीं माझें अंतःकरण जळून दग्ध झालें. शूर क्षत्रियांच्या स्त्रीची त्यांच्या जिवंतपणीं अशी विटंबना होणें मला अत्यंत गर्ह्य वाटलें म्हणून तुमचें तेज वाढवावें म्हणून व आवश्यक तो क्रोध तुमच्या ठिकाणीं उत्पन्न व्हावा म्हणून मी तुम्हांला रणोत्साहाचा संदेश दिला व विदुलेचा संदेश ऐकविला. तुमच्यासारखे पराक्रमी पुत्र असून महाराज पांडूचा वंश नष्ट होऊं नये म्हणून मी तुमच्या तेजाचें वर्धन केलें. जे पुत्र वा पौत्र आपल्या पित्याचा वंश नष्ट करावयास कारणीभूत होतात, त्यांना पुण्याच्या कर्मांनीं मिळणारे उत्कृष्ट लोक कधींही मिळूं शकत नाहींत. मला स्वतःला उपभोग हवा होता म्हणून मी तुम्हांला संग्रामासाठीं मुळींच उद्युक्त केलेलें नाहीं. हे पुत्रांनो, माझ्या पतीच्या पराक्रमानें मी साम्राज्याचा पुष्कळ उपभोग घेतला आहे. पतीच्या राज्यांत मी पुष्कळ मोठमोठीं दानें दिलीं व यज्ञांत सम्राटाची पत्नी या नात्यानें यथाविधि सोमपानहि पुष्कळ केलें. स्वतः राजैश्वर्य भोगण्याची मला कोणतीही इच्छा शिल्लक राहिलेली नाहीं व त्या इच्छेनें श्रीकृष्णाला मी माझा निरोप घेऊन

तुमच्याकडे पाठविलेंही नाहीं. राजवंशांत उत्पन्न झालेल्या तुमच्या हातून तुमचा कुळधर्म पाळला जावा येवढीच माझी इच्छा होती. पुत्रांनीं मिळविलेल्या राजैश्वर्याचा उपभोग घ्यावा अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. तपश्चर्येनें प्राप्त झालेल्या पुण्यानें, पतिलोक मिळवावा हीच माझी इच्छा आहे. हे युधिष्ठिरा, वीरांची माता म्हणून त्या वेळीं माझें जें आवश्यक कर्तव्य होतें तें मी यथावत् पार पाडलें आहे. आतां कुरु कुळांतील विधवा सून म्हणून सासू-सासऱ्यांची सेवा करणें हें जें माझें दुसरें आवश्यक कर्तव्य तें मला पार पाडलें पाहिजे. या वनवासी सासूसासऱ्यांची सेवा करून तपश्चर्येनें मी माझें शरीर शुष्क करून टाकीन. भीमादिकांना बरोबर घेऊन तूं राजधानीकडे परत जा. तुझी बुद्धि नेहमीं धर्मांत रत होवो व तुझें अंतःकरण नेहमीं विशाल राहो.''

यानंतर राजा धृतराष्ट्रानें व गांधारीनेंही अरण्यवासापासून कुंतीचें मन परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. पण कोणालाही त्यांत यश आलें नाहीं. धृतराष्ट्र व गांधारी यांची सेवा करण्यासाठीं कुंती, सोळा वर्षें त्यांच्याबरोबर अरण्यवासांत राहिली. मध्यंतरीं मातृ-भक्त पांडव तिला अरण्यांत जाऊन भेटूनही आले. आर्यशीला कुंतीनें आपलें शरीर तपस्येनें कृश करून धृतराष्ट्र व गांधारी यांच्याबरोबरच शेवटीं अरण्यांतील वणव्याच्या अग्नींत तें समर्पण करून टाकलें. भगवान् श्रीकृष्णांची ही वंदनीय आत्या व युधिष्ठिर, भीम व अर्जुन या श्रेष्ठ महानुभावांची ही माता महाभारताचा व भारतीय स्त्रीजीवनाचाही एक महान् व अमर अलंकारच होय. महर्षि व्यासांच्या दिव्य प्रतिभेलाही इतकें सुपूर्त व परिपूर्ण असें दुसरें स्त्री-जीवन वर्णितां आलेलें नाहीं. कुंतीच्या जीवनाचा हा महान् नंदादीप भारतीय आदर्श स्त्रीजीवन म्हणून कसें होतें हें दिग्दर्शित करावयास महाभारताच्या स्फूर्तिशाली इतिहासांत अखंडितपणें तेवत आहे. त्याच्या पवित्र प्रकाशांत कोणत्याही भारतीय स्त्रीला आजही खऱ्या आर्यजीवनाचा प्रत्यय घेतां येईल.

•

---

# २३. द्रौपदी

राजमाता कुंती ही युधिष्ठिरांच्या धर्मकार्पण्याचें जसें एक बलिदान आहे, तसेंच किंबहुना त्याहूनही अधिक करुणास्पद बलिदान पांडवांची महाराणी व महापतिव्रता द्रौपदीचें झालें आहे. संपूर्ण महाभारतावर ज्या महान् जीवनाची छाया पडलेली आहे त्यांत द्रौपदीचें जीवन अग्रगण्य आहे असें म्हटलें तरी चालेल. भगवान् श्रीकृष्ण स्वतःच्या सहोदर भगिनीपेक्षांही जिला अधिक प्रिय व श्रेष्ठ समजत व मान देत असत, तिच्या महत्तेचें वर्णन करावें तेवढें थोडेंच आहे. द्रौपदीच्या ठिकाणचे सर्व महनीय सद्गुण देवी सीतेइतकेच उज्ज्वल आहेत. पण दोघींच्या भाग्यरेषेंत सृष्टिनिर्मात्यानें विलक्षण स्वरूपाची भिन्नता उत्पन्न केली आहे. सीता व द्रौपदी या दोघींचेंही जीवन अत्यंत दुःखांत गेलें आहे. जणूं कारुण्याचा आविष्कार म्हणूनच महर्षि वाल्मीकि व व्यास या दोन दिव्य प्रतिभावंतांनीं हीं दोन चित्रणें निर्माण केलीं; पण सीतेचीं दुःखें भगवान् श्रीरामचंद्रांच्या दिव्य कर्तव्यनिष्ठेंतून उद्भवलेलीं असल्यामुळें दुःखाग्नींतील त्या भयंकर होरपळण्यांतही कर्तव्यपूर्तीसाठीं आपलें बलिदान घडत आहे असें समाधान सीतादेवीला लाभलें; पण द्रौपदीची अवस्था एका अर्थानें सीतादेवीपेक्षांही अधिकच अनुकंपनीय आहे. बलिदानाचें दुःख तर तिला सहन करावें लागतेंच; पण तें तिच्या पतीच्या दिव्य कर्तव्यनिष्ठेऐवजीं भ्रामक धमकार्पण्यांतून उद्भवलेल्या परिस्थितींतून निर्माण होत असल्यानें कसलेंही आत्मसमाधान त्या बलिदानांत तिला लाभूं शकत नाहीं. त्यामुळें द्रौपदीची मूर्ति कारुण्याच्या दृष्टीनें अधिकच सुपूर्त व सीतादेवीपेक्षांही अंतःकरणाला अस्वस्थतेची अधिकच टोचणी लावणारी आहे. सीतादेवीप्रमाणेंच द्रौपदी हीही देवी श्रीचाच मानवी स्वरूपांत झालेला आविष्कार असून तिचे गुण इतके सर्वश्रेष्ठ आहेत कीं, मानवी पद्धतीप्रमाणें तिचा जन्म झाला असल्याची कल्पना महाकवींच्या

---

व्याख्यान २३ वें, दि. २० एप्रिल १९५१

तरल प्रतिभेला मानवत नाहीं. म्हणून सीता ज्याप्रमाणें अयोनिजा आहे त्याचप्रमाणें महर्षि व्यासांची द्रौपदीदेखील अयोनिजाच आहे. स्वतः महर्षींनींच वापरलेला हा शब्द मी येथें उपयोगांत आणलेला आहे. युधिष्ठिर स्वर्गांत गेल्यानंतर आपआपल्या मूळ स्वरूपाशीं एकरूप होत असलेल्या त्याच्या बंधूंची व सुहृदांची त्याला ओळख पटवून देत असतां द्रौपदीसंबंधीं देवेंद्र युधिष्ठिराला असें सांगतों कीं:—

**तथा ददर्श पाञ्चालीं कमलोत्पलमालिनीम् ।**
**वपुषा स्वर्गमाक्रम्य तिष्ठन्तीमर्कवर्चसम् ।। १०**
**अखिलं सहसा राजा प्रष्टुमैच्छद्युधिष्ठिरः ।**
**ततोऽस्य भगवानिन्द्रः कथयामास देवराट् ।। ११**
**श्रीरेषा द्रौपदीरूपा त्वदर्थे मानुषं गता ।**
**अयोनिजा लोककान्ता पुण्यगन्धा युधिष्ठिर ।। १२**
**रत्यर्थं भवतां ह्येषा निर्मिता शूलपाणिना ।**
**द्रुपदस्य कुले जाता भवद्भिश्चोपजीविता ।। १३**

——महाभारत, स्वर्गारोहणपर्व अध्याय ४

"युधिष्ठिरानें स्वर्गांत सूर्याप्रमाणें अत्यंत तेजस्वी दिसणारी, गळ्यांत उत्फुल्ल कमळांची माळ घातलेली व स्वतःच्या लावण्याच्या आभेनें स्वर्गशोभेला झांकून टाकणारी द्रौपदी पाहिली. तो देवेंद्राला कांहीं विचारणार इतक्यांत इंद्रानें त्याला स्वतःच सांगावयाला सुरुवात केली. इंद्र म्हणाला : ही अयोनिजा सर्व लोकांचें चित्त हरण करणारी, जिच्या शरीराचा गंध अत्यंत उत्कृष्ट आहे अशी द्रौपदी म्हणजे द्रौपदीच्या रूपानें साक्षात् श्रीदेवीच मनुष्य लोकांत अवतीर्ण झाली होती. प्रत्यक्ष भगवान् शंकरांनीं तुमच्या विहारार्थ ही निर्माण केली. ही द्रुपदाच्या कुळांत उत्पन्न झालेली असून तुमची पत्नी या नात्यानें भूलोकांत राहिली."

द्रौपदीची जन्मकथा तिच्या सर्व व्यक्तिवैशिष्ट्यांचीं बीजें व्यक्त करणारी असून वैचित्र्यपूर्ण आहे. द्रौपदी व तिचा बंधु धृष्टद्युम्न हे दोघेही अग्नीपासून उत्पन्न झाल्याचें महाभारतांत वर्णन आहे. पंचाल देशाचा राजा द्रुपद यानें द्रोणाचार्यांचा अपमान केल्यानंतर संताप-

लेल्या आचार्य द्रोणांनीं आपला शिष्य जो अर्जुन त्याच्याकरवीं द्रुपदाचा पराजय करून त्याचें अर्धें राज्य हिरावून घेतलें. द्रुपद द्रोणांना प्रत्यक्षांत तर कांहींच करूं शकला नाहीं. पण त्यानें तेव्हांपासून आपल्या अंतःकरणांत आचार्यांविषयीं दंश धरून तपस्वी ब्राह्मणांच्या मदतीनें त्यांना ठार मारणारा मुलगा उत्पन्न व्हावा म्हणून एक मोठें यज्ञीय अनुष्ठान केलें. द्रुपदाच्या त्या यज्ञांतील याजकानें यज्ञांत हवन करून मंत्रपूत हविर्भाग भक्षण करण्यासाठीं द्रुपदाच्या महाराणीला बोलाविलें. पण ती त्यावेळीं अशुद्ध अवस्थेंत होती. तिनें त्या याजकाला असें सांगितलें कीं सध्यां मी अशुद्ध अवस्थेंत असून मी माझें तोंड धुवून स्वच्छ व शुद्ध होईपर्यंत तूं थांब. पण तो तेजस्वी याजक तिला म्हणाला कीं, मला तुझ्यासाठीं माझा वेळ घालवावयाचा नाहीं. वाटलें तर येथें उभी रहा अथवा कोठेंही जा. माझ्या मंत्राचें फळ तुझ्यावांचून मुळींच खोळंबून राहणार नाहीं. तूं न आलीस तर वेदींतून मुलगा उत्पन्न होईल. महाभारतकार म्हणतात :

एवमुक्त्वा तु याजेन हुते हविषि संस्कृते ।
उत्तस्थौ पावकात्तस्मात्कुमारो देवसन्निभः ।। ३९
ज्वालावर्णो घोररूपः किरीटी वर्म चोत्तमम् ।।
बिभ्रत्सखड्गः सशरो धनुष्मान्विनदन्मुहुः ।। ४०
सोऽध्यारोहद्रथवरं तेन च प्रययौ तदा ।
ततः प्रणेदुः पाञ्चालाः प्रहृष्टाः साधु साध्विति ।। ४१
हर्षाविष्टांस्ततश्चैतान्नेयं सेहे वसुन्धरा ।
भयापहो राजपुत्रः पञ्चालानां यशस्करः ।। ४२
राज्ञः शोकापहो जात एष द्रोणवधाय वै ।
इत्युवाच महद्भूतमदृश्यं खेचरं तदा ।। ४३
कुमारी चापि पाञ्चाली वेदीमध्यात्समुत्थिता ।
सुभगा दर्शनीयाङ्गी स्वसितायतलोचना ।। ४४
श्यामा पद्मपलाशाक्षी नीलकुञ्चितमूर्धजा ।
ताम्रतुङ्गनखी सुभ्रूश्चारुपीनपयोधरा ।। ४५
मानुषं विग्रहं कृत्वा साक्षादमरवर्णिनी ।
नीलोत्पलसमो गन्धो यस्याः क्रोशात्प्रधावति ।। ४६

या बिभर्ति परं रूपं यस्या नास्त्युपमा भुवि ।
देवदानवयक्षाणामीप्सितां देवरूपिणीम् ।। ४७
तां चापि जातां सुश्रोणीं वागुवाचाशरीरिणी ।
सर्वयोषिद्वरा कृष्णा निनीषुः क्षत्रियान्क्षयम् ।। ४८
सुरकार्यमियं काले करिष्यति सुमध्यमा ।।
अस्याः हेतोः कौरवाणां महदुत्पत्स्यते भयम् ।। ४९
तच्छ्रुत्वा सर्वपाञ्चालाः प्रणेदुः सिंहसङ्घवत् ।
न चैतान्हर्षसंपूर्णानियं सेहे वसुन्धरा ।। ५०
तौ दृष्ट्वा पार्षती याजं प्रपेदे वै सुतार्थिनी ।
न वै मदन्यां जननीं जानीयातामिमाविति ।। ५१

—महाभारत, आदिपर्व अध्याय १६७

"याप्रमाणें बोलून याजकानें तो संस्कृत हविर्भाग अग्नींत हवन करतांच त्या अग्नींतून देवासारखा तेजस्वी, ज्वालेच्या वर्णाचा, अंतः-करणांत थरकांप करणारें ज्याचें उग्र रूप आहे असा,डोक्यावर उत्कृष्ट किरीट व अंगांत उत्तम चिलखत धारण केलेला, एका हातांत खड्ग व दुसऱ्या हातांत बाणासहित धनुष्य धारण करणारा एक कुमार हळु-हळू गर्जना करीत बाहेर पडला. लगेच तो रथावर बसला व जाऊं लागला. त्याबरोबर सर्व पंचाल हर्षातिरेकानें जयघोष करूं लागले. पंचालांचें सर्व भय हरण करणारा असा तो यशस्वी राजकुमार होता. त्याच्या जन्माच्यावेळीं आकाशवाणीनें असें सांगितलें कीं हा द्रोणांच्या वधासाठीं उत्पन्न झालेला असून राजा द्रुपदाच्या अंतःकरणांतील सर्व दुःख हा हरण करील. त्या कुमाराबरोबरच त्या यज्ञवेदींतून एक कुमारीही उत्पन्न झाली. तिच्या अंगप्रत्यंगांतून सौंदर्याचा मूर्तिमंत आविष्कार होत असून ती अत्यंत लावण्यसंपन्न होती. निळ्या कमळा-प्रमाणें तिचे नेत्र विशाल असून तिचे काळेभोर केंस, उत्तुंग तांबडीं नखें, धनुष्याकृति भिवया व उत्कृष्ट हृदय यांमुळें मनुष्यरूपानें ती साक्षात् कोणी देवताच पृथ्वीवर आली आहे असें वाटत होतें. ती वर्णानें श्यामल होती. तिच्या शरीराचा गंध निळ्या कमलाप्रमाणें उत्कृष्ट असून आसमंतांत' एक कोसपर्यंत तो गंध दरवळत असे. तिच्या रूपलावण्याला पृथ्वीवर तरी उपमा नव्हती. मनुष्यच काय,

पण देव, दानव यक्ष यांचीही दृष्टि तिच्यावर खिळून राहावी असें तिचें सौंदर्य अलौकिक होतें. ती निर्माण होतांच आकाशवाणीनें असें सांगितलें कीं, सर्व क्षत्रियांचा नाश करण्याचें देवकार्य करण्यासाठीं ही सर्वश्रेष्ठ स्त्री उत्पन्न झालेली असून योग्य वेळीं ती तें कार्य पार पाडील. हिच्यामुळें कौरवकुळाला मोठें भय उत्पन्न होईल. हें ऐकतांच सर्व पांचाल सिंहाच्या संघाप्रमाणें सिंहनाद करूं लागले. त्यांचा आनंद पृथ्वीवर कोठें मावेना. त्यावेळीं द्रुपदाच्या पत्नीनें त्या याजकाला हात जोडून असें म्हटलें कीं, हा कुमार व ही कुमारी जरी अग्नीपासून उत्पन्न झालेली असली तरी त्या गोष्टीची त्यांना स्मृति राहूं नये व त्यांनीं मलाच आपली माता समजावें असें वरदान आपण मला द्या. याजकानें राणीची ती इच्छा पूर्ण केली. द्रौपदी ही वर्णानें कृष्ण असल्यामुळें तिचें नांवच कृष्णा ठेवण्यांत आलें.

**कृष्णेत्येवाब्रुवन्कृष्णां कृष्णा भूत्सा हि वर्णतः ।**
**तथा तन्मिथुनं जज्ञे द्रुपदस्य महामखे ।। ५४**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १६७

## द्रौपदीचें गाजलेलें स्वयंवर

द्रौपदीचे वडील राजे द्रुपद यांची खरी इच्छा द्रौपदी अर्जुनाला द्यावी अशी होती.

**यज्ञसेनस्य कामस्तु पाण्डवाय किरीटिने ।**
**कृष्णां दद्यामिति सदा न चैतद्विवृणोति सः ।। ८**
**सोऽन्वेषमाणः कौन्तेय पाञ्चाल्यो जनमेजय ।**
**दृढं धनुरनानम्यं कारयामास भारत ।। ९**
**यन्त्रं वैहायसं चापि कारयामास कृत्रिमम् ।**
**तेन तन्त्रेण समितं राजा लक्ष्यं चकार सः ।। १०**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १८५

पण आपल्या अंतःकरणांतील ही गोष्ट, द्रुपदानें कधींही कोठें उघड केली नाहीं. अर्जुनानें त्याचा पराभव केलेला असल्यामुळें तारुण्याच्या दारवंठ्यावर नुकत्याच प्रवेश केलेल्या त्या राजकुमाराचा विलक्षण पराक्रम त्याच्या चांगलाच डोळ्यांत भरला होता. पण लाक्षागृहांत पांडव जळल्याचें ऐकून स्वाभाविकपणेंच तो भग्न-

मनस्क झाला. इतर कित्येक विचक्षण पुरुषांप्रमाणेंच पांडवांसारखे प्रतापी पुरुष असे व्यर्थ जळून जावयाचे नाहींत असेंही त्याला वाटत होतें. गुप्तपणें त्यानें पांडवांचा शोधही चालविला होता. शेवटीं वीरोचित व अर्जुनांसारख्या श्रेष्ठ धनुर्धरालाच जो पूर्ण करतां येणें शक्य होईल असा पण द्रौपदीच्या स्वयंवरासाठीं लावावा असें त्यानें ठरविलें. त्यानें विशिष्ट प्रकाराचें दृढ धनुष्य सिद्ध करून त्याच्यावर योजण्यासाठीं म्हणून खास बाण निर्मिले, व अखंड फिरणारें एक यंत्र वर लावून त्या फिरणाऱ्या यंत्राच्या आंतील लक्ष्याचा वेध जो या बाणांनीं करील त्यालाच द्रौपदी द्यावयाची असा आपला निश्चय घोषित केला. त्याची घोषणा अशी होती कीं,

**इदं सज्यं धनुः कृत्वा सज्जैरेभिश्च सायकैः।**
**अतीत्य लक्ष्यं यो वेद्धा स लब्धा मत्सुतामिति ॥ ११**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १८५

"जो कोणी माझें हें धनुष्य सज्ज करून माझे हे बाण त्याच्यावर योजून या फिरत्या यंत्रांतील लक्ष्याचा वेध करील त्यालाच माझी मुलगी मिळेल. धनुर्धारी लोकांमध्यें आपल्या शस्त्रास्त्रशिक्षणाच्या भरंवशावर फिरत्या यंत्राचा वेध घेऊं शकणारा तरुण धनुर्धारी फक्त अर्जुनच होता. म्हणून त्यानें अर्जुनाच्या प्राप्तीसाठीं हा असा पण केला. द्रौपदीच्या स्वयंवराप्रीत्यर्थ अनेकविध राजे त्या ठिकाणीं आले. महाभारतांतील त्यांची यादी पाहिली तर सर्व भारतीय सत्ताधिप त्या ठिकाणीं एकत्रित झालेले होते असें दिसतें. भगवान् श्रीकृष्ण व बलरामही या स्वयंवरास उपस्थित होते. ब्राह्मणवेषानें पांडव या स्वयंवरार्थ उपस्थित झालेले होते. राजसभेंत अथवा स्वयंवरार्थ उभारलेल्या विस्तीर्ण व शोभिवंत मंडपांत सर्व समाज एकत्रित जमलेला पाहून वाद्यें वाजत असतां देवतेप्रमाणें लावण्यसंपन्न अशा आपल्या भगिनीला घेऊन राजकुमार धृष्टद्युम्न त्या मंडपांत आला. राजकन्या पांचाली उत्कृष्ट रत्नाभरणांनीं सुशोभित झालेली असून तिच्या हातांत रत्नें जडविलेली सुवर्णाची वरमाला होती. धृष्टद्युम्नानें सर्व राजे लोकांसमक्ष द्रौपदीला मंडपांत आणवून उच्च स्वरानें असें घोषित केलें कीं,

**इदं धनुर्लक्ष्यमिमे च बाणाः शृण्वन्तु मे भूपतयः समेताः ।**
**छिद्रेण यन्त्रस्य समर्पयध्वं शरैः शितैर्व्योमचरैर्दशार्धैः ।। ३५**
**एतन्महत्कर्म करोति यो वै कुलेन रूपेण बलेन युक्तः ।**
**तस्याद्य भार्या भगिनी ममेयं कृष्णा भवित्री न मृषा ब्रवीमि ।। ३६**

--महाभारत, आदिपर्व अध्याय २२१

"हें येथें धनुष्य ठेवलेलें असून त्यावर योजावयाचे बाणही येथेंच ठेवलेले आहेत. मी काय बोलतों तें येथें जमलेल्या सर्व राजांनीं स्थिर चित्तानें ऐकावें. या धनुष्यावर हे बाण लावून या फिरत्या यंत्राच्या छिद्रामधून लक्ष्यवेध करावयाचा आहे. बाण पांच आहेत व त्यांनींच हें नियुक्त कार्य साधलें पाहिजे. हें महान् कृत्य करणारा जो कोणी आमच्या कुळाला योग्य असा कुळवंत, रूपवान् व बल-संपन्न असेल त्याचीच भार्या माझी ही भगिनी कृष्णा होईल. अटी नीट पाळावयाच्या आहेत, व मी जें बोलतों त्यांतलें एक अक्षरही खोटें व्हावयाचें नाहीं." याप्रमाणें घोषित करून धृष्टद्युम्नानें उपस्थित सर्व राजे लोकांचा द्रौपद्रीला परिचय करून दिला. मोठ-मोठे क्षत्रिय राजे त्या ठिकाणीं लक्ष्यवेधाच्या प्रयत्नास लागले पण सर्व फजित पावले. त्यांत जरासंध, शिशुपाल, व मद्रराज शल्य अशी मोठमोठी मंडळी होती. शेवटीं कर्ण धनुष्याजवळ आला व पहातां पहातां त्यानें धनुष्य सज्ज करून त्यावर बाण लावून त्या फिरत्या यंत्राकडे आपली दृष्टि वळविली. लक्ष्यवेधाचें सामर्थ्य अर्जुनाइतकें कर्णातही निश्चित होतें त्यामुळें त्यानें धनुष्याला हात घालतांच लक्ष्यवेध झालाच असें सर्वच मानूं लागले होते. पण द्रौपदीच्या स्वयंवराच्या सर्व अटी स्पष्ट होत्या. त्यांतील कोण-तीही अट द्रुपदानें वा धृष्टद्युम्नानें झांकून ठेवलेली नव्हती. त्या स्वयंवरांत भाग घेणारी व्यक्ति नुसती लक्ष्यवेध करणारी असून चालणार नव्हतें. ती कुलीन असली पाहिजे असा राजा द्रुपदाचा आग्रह होता. व तो त्यांनीं आधींच धृष्टद्युम्नाच्या तोंडून सर्वांना स्पष्टपणानें सांगितलेलाही होता. कर्ण हा सूतपुत्र म्हणून विख्यात असल्यामुळें क्षत्रियांच्या समाजांत कुलवंत म्हणून त्याला स्थान

मिळणें केवळ अशक्य होतें. त्यामुळें त्यानें धनुष्याला हात घालतांच उच्च स्वरानें द्रौपदीनें असें सांगितलें कीं,

**दृष्ट्वा तु तं द्रौपदी वाक्यमुच्चैर्जगाद नाहं वरयामि सूतम् ।**
**सामर्षहासं प्रसमीक्ष्य सूर्यं तत्याज कर्णः स्फुरितं धनुस्तत् ।। २३**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १८७

"काय वाटेल तें झालें तरी मी सूताला वरणार नाहीं" हें ऐकतांच संतापानें कर्णानें आपली आराध्य देवता सूर्यनारायण याच्याकडे एकदां पाहिलें व तें तळपतें धनुष्य हातांतून टाकून दिलें. यानंतर ब्राह्मणवेषधारी अर्जुनानें तें अप्रतिम लक्ष्य तोडलें व द्रौपदीची वरमाला घेतली. चालून आलेल्या सर्व राजसंघाचा भीमसेन व अर्जुन यांनीं पराजय केला व द्रौपदी पांडवांची राणी झाली. पांडवांनीं पराक्रमानें साम्राज्य मिळविल्यानंतर ज्ञात जगाची साम्राज्ञी होण्याचाही बहुमान तिनें उपभोगिला. कुटुंब संस्थेचा आधार होण्याइतकी द्रौपदी सर्वसंग्राहक व समर्थ आहे. रुक्मिणीसारखें भाग्य जर तिला लाभतें तर तिनें अतिशय उत्कृष्ट असा गृहिणीधर्म आचरून दाखविला असता. तिची इच्छा व प्रवृत्ति तशीच होती.

## महासती द्रौपदी

द्रौपदीचें हृदय अत्यंत उदार असून आपल्या सवतीविषयींही तिनें केलेलें वर्णन तिच्या अंतःकरणाची थोरवी व्यक्त करण्यास पुरेसें आहे. अर्जुनानें सुभद्राहरण केल्यानंतर पहिल्या प्रथम सुभद्रेनें ज्या वेळीं पांडवांच्या अंतःपुरांत प्रवेश केला त्यावेळीं द्रौपदीच्या भेटीस्तव तिला कसें पाठवावें, या विचारानें महारथी पार्थ चांगलाच गोंधळला होता. त्यानें गोपीचा वेष देऊन सुभद्रेला अंतःपुरांत पाठविलें. कुंतीला वंदन करून किंचित् भीतभीतच सुभद्रा द्रौपदीकडे आली. द्रौपदीनें तिचें कोणत्या प्रकारें स्वागत केलें असेल ? महाभारतकार म्हणतात :—

**ववन्दे द्रौपदीं भद्रा प्रेष्याहमिति चाब्रवीत् ।**
**प्रत्युत्थाय तदा कृष्णा स्वसारं माधवस्य च ।। २३**

**परिष्वज्यावदत्प्रीत्या निःसपत्नोऽस्तु ते पतिः ।**
**तथैव मुदिता भद्रा तामुवाचैवमस्त्विति ।। २४**

——महाभारत, आदिपर्व अध्याय २२१

"सुभद्रेनें येऊन द्रौपदीला वंदन केलें व विनयानें असें सांगितलें कीं, माझें नांव भद्रा असून मी आपली दासी आहे. भगवान श्रीकृष्णांच्या भगिनीचे ते विनयनम्र उद्‌गार ऐकतांच द्रौपदीनें अत्यंत प्रेमानें तिला आलिंगन देऊन असें म्हटलें कीं, तुझ्या पतीला जगांत कोणीहि शत्रू न उरोत. त्याबरोबर सुभद्रा अत्यंत आनंदित झाली व असेंच होवो इतकेंच म्हणाली."

द्रौपदीसारख्या महासतीची तिच्या व्यक्तिजीवनांत घरगुती वागणूक कशी असेल? व गृहजीवनाच्या संबंधीं तिचे विचार काय असूं शकतील? अशी उत्कंठा स्वाभाविकपणेंच कोणाच्याही अंतःकरणांत नांदते. महाभारतांत एका ठिकाणीं द्रौपदीनेंच स्वतः या प्रकरणांत आपले विचार व्यक्त केलेले आहेत. पांडव वनवासांत असतां एकदां भगवान् श्रीकृष्ण व सत्यभामा त्यांच्याकडे भेटावयास येतात. त्यावेळीं एकांतांत सत्यभामेनें द्रौपदीला असें विचारलें कीं हे द्रौपदी, लोकपालासारख्या अत्यंत पराक्रमी व परस्परांवर अत्यंत प्रेम करणाऱ्या अशा पांडवांना तूं कोणत्या आचरणानें आपल्या स्वाधीन करून घेतलें आहेस तें मला सांग. पांडव तुझ्या स्वाधीन दिसतात. ते तुझ्यावर कधींही क्रुद्ध होत नाहींत व प्रत्येक महत्त्वाच्या गोष्टींत तुझ्याकडून महत्त्वाचें मार्गदर्शन होईल अशा अपेक्षेनें ते तुझ्याकडे पाहतात. इतकें त्यांच्यावर तूं स्वतःचें वर्चस्व कसें गाजवितेस? कोणतें व्रत, तपश्चर्या, स्नान, मंत्र, औषध, विद्या, वीर्य, अंजन, जप, होम इत्यादि तूं केलेंस कीं, ज्यामुळें भाग्यदेवता तुझ्यावर अतोनात प्रसन्न होऊन तूं आपल्या पतीवर निर्विवाद विजय संपादन केलास तें मलाही सांग. म्हणजे मी त्याचा प्रयोग श्रीकृष्णावर करून त्यांना सदाचें आपल्या स्वाधीन करून घेईन." याप्रमाणें सत्यभामेनें विचारतांच पतिव्रतांत अत्यंत श्रेष्ठ असलेल्या द्रौपदीनें तिला जें उत्तर दिलें त्यांतून तिचा स्वतःचा वर्तनक्रम व गृहिणीपदासंबंधींचे तिचे सर्व विचार उत्कृष्ट रीतीनें व्यक्त झालेले आहेत.

द्रौपदीचें उत्तर मोठें असलें तरी तिच्या जीवनांतील एका अत्यंत महत्त्वाच्या बाबीवर त्यांतून उत्कृष्ट प्रकाश पडत असल्यामुळें मी तें येथें समग्र उद्धृत करतो. द्रौपदी म्हणाली :—

असत्स्त्रीणां समाचारं सत्ये मामनुपृच्छसि।
असदाचरिते मार्गे कथं स्यादनुकीर्तनम् ॥ १०
अनुप्रश्नः संशयो वा नैतत्त्वय्युपपद्यते।
तथा ह्युपेता बुद्ध्या त्वं कृष्णस्य महिषी प्रिया ॥ ११
यदैव भर्ता जानीयान्मन्त्रमूलपरां स्त्रियम्।
उद्विजेत तदैवास्याः सर्पाद्वेश्मगतादिव ॥ १२
उद्विग्नस्य कुतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम्।
न जातु वशगो भर्ता स्त्रियाः स्यान्मन्त्रकर्मणा ॥ १३
अमित्रप्रहितांश्चापि गदान् परमदारुणान्
मूलप्रचारैर्हि विषं प्रयच्छन्ति जिघांसवः ॥ १४
जिह्वया यानि पुरुषस्त्वचा वाऽप्युपसेवते।
तत्र चूर्णानि दत्तानि हन्युः क्षिप्रमसंशयम् ॥ १५
जलोदरसमायुक्ताः श्वित्रिणः पलितास्तथा।
अपुमांसः कृताः स्त्रीभिर्जडान्धबधिरास्तथा ॥ १६
पापानुगास्तु पापास्ताः पतीनुपसृजन्त्युत।
न जातु विप्रियं भर्तुः स्त्रिया कार्यं कथंचन ॥ १७
वर्ताम्यहं तु यां वृत्तिं पाण्डवेषु महात्मसु।
तां सर्वां शृणु मे सत्यां सत्यभामे यशस्विनि ॥ १८
अहंकारं विहायाहं कामक्रोधौ च सर्वदा।
सदारान् पाण्डवान् नित्यं प्रयतोपचराम्यहम् ॥ १९
प्रणयं प्रतिसंहृत्य निधायात्मानमात्मनि।
शुश्रूषुर्निरभीमाना पतीनां चित्तरक्षिणी ॥ २०
दुर्व्याहृताच्छङ्कमाना दुःस्थिताद्दुरवेक्षितात्।
दुरासिताद् दुर्व्रजितादिङ्गिताध्यासितादपि ॥ २१
सूर्यवैश्वानरसमान् सोमकल्पान् महारथान्।
सेवे चक्षुर्हणः पार्थानुग्रवीर्यप्रतापिनः ॥ २२
देवो मनुष्यो गन्धर्वो युवा चापि स्वलङ्कृतः।
द्रव्यवानभिरूपो वा न मेऽन्यः पुरुषो मतः ॥ २३

नाभुक्तवति नास्नाते नासंविष्टे च भर्तरि ।
न संविशामि नाश्नामि सदा कर्मकरेष्वपि ॥ २४
क्षेत्राद्वनाद्वा ग्रामाद्वा भर्तारं गृहमागतम् ।
अभ्युत्थायाभिनन्दामि आसनेनोदकेन च ॥ २५
प्रमृष्टभाण्डा मृष्टान्ना काले भोजनदायिनी ।
संयता गुप्तधान्या च सुसंमृष्टनिवेशना ॥ २६
अतिरस्कृतसम्भाषा दुःस्त्रियो नानुसेवती ।
अनुकूलवती नित्यं भवाम्यनलसा सदा ॥ २७
अनर्म चापि हसितं द्वारि स्थानमभीक्ष्णशः ।
अवस्करे चिरस्थानं निष्कुटेषु च वर्जये ॥ २८
अतिहासातिरोषौच क्रोधस्थानं च वर्जये ।
निरताऽहं सदा सत्ये भर्तॄणामुपसेवने ॥ २९
सर्वथा भर्तृरहितं न ममेष्टं कथञ्चन ।
यदा प्रवसते भर्ता कुटुम्बार्थेन केनचित् ॥ ३०
सुमनोवर्णकापेता भवामि व्रतचारिणी ।
यच्च भर्ता न पिवति यच्च भर्ता न सेवते ॥ ३१
यच्च नाश्नाति मे भर्ता सर्वं तद्वर्जयाम्यहम् ।
यथोपदेशं नियता वर्तमाना वराङ्गने । ३२
स्वलङ्कृता सुप्रियता भर्तुः प्रियहिते रता ।
ये च धर्माः कुटुम्बेषु श्वश्र्वा मे कथिताः पुरा ॥ ३३
भिक्षा बलिश्राद्धमिति स्थालीपाकश्च पर्वसु ।
मान्यानां मानसत्कारा ये चान्ये विदिता मम ॥ ३४
तान्सर्वाननुवर्तामि दिवारात्रमतन्द्रिता ।
विनयान्नियमांश्चैव सदा सर्वात्मना श्रिता ॥ ३५
मृदून् सतः सत्यशीलान् सत्यधर्मानुपालिनः ।
आशीविषानिव क्रुद्धान् पतीन् परिचराम्यहम् ॥ ३६
पत्याश्रयो हि मे धर्मो मतः स्त्रीणां सनातनः ।
स देवः सा गतिर्नान्या तस्य का विप्रियं चरेत् ॥ ३७
अहं पतीन्नातिशये नात्यश्ने नातिभूषये ।
नापि परिवदे श्वश्रूं सर्वदा परियन्त्रिता ॥ ३८
अवधानेन सुभगे नित्योत्थिततयैव च ।
भर्तारो वशगा मह्यं गुरुशुश्रूषयैव च ॥ ३९
नित्यमार्यामहं कुन्तीं वीरसूं सत्यवादिनीम् ।
स्वयं परिचराम्येतां पानाच्छादनभोजनैः ॥ ४०

नैतामतिशये जातु वस्त्रभूषणभोजनैः ।
नापि परिवदे चाहं तां पृथां पृथिवीसमाम् ।। ४१
अष्टावग्रे ब्राह्मणानां सहस्राणि स्म नित्यदा ।
भुञ्जते रुक्मपात्रीषु युधिष्ठिरनिवेशने ।। ४२
अष्टाशीतिसहस्राणि स्नातका गृहमेधिनः ।
त्रिंशद्दासीक एकैको यान् बिभर्ति युधिष्ठिरः ।। ४३
दशान्यानि सहस्राणि येषामन्नं सुसंस्कृतम् ।
ह्रियते रुक्मपात्रीभिर्यतीनामूर्ध्वरेतसाम् ।। ४४
तान् सर्वानग्रहारेण ब्राह्मणान् वेदवादिनः ।
यथार्हं पूजयामि स्म पानाच्छादनभोजनैः ।। ४५
शतं दासीसहस्राणि कौन्तेयस्य महात्मनः ।
कम्बूकेयूरधारिण्यो निष्ककण्ठ्यः स्वलंकृताः ।। ४६
महार्हमाल्याभरणाः सुवर्णाश्चन्दनोक्षिताः ।।
मणीन् हेम च बिभ्रत्यो नृत्यगीतविशारदाः ।। ४७
तासां नाम च रूपं च भोजनाच्छादनानि च ।
सर्वासामेव वेदाहं कर्म चैव कृताकृतम् ।। ४८
शतं दासीसहस्राणि कुन्तीपुत्रस्य धीमतः ।
पात्रीहस्ता दिवारात्रमतिथीन् भोजयन्त्युत ।। ४९
शतमश्वसहस्राणि दशनागायुतानि च ।
युधिष्ठिरस्यानुयात्रमिन्द्रप्रस्थनिवासिनः ।। ५०
एतदासीत्तदा राज्ञो यन्महीं पर्यपालयत् ।
येषां सङ्ख्याविधिं चैव प्रदिशामि शृणोमि च ।। ५१
अन्तःपुराणां सर्वेषां भृत्यांना चैव सर्वशः ।
आगोपालाविपालेभ्यः सर्वं वेद कृताकृतम् ।। ५२
सर्वं राज्ञः समुदयमायं च व्ययमेव च ।
एकाहं वेक्ष्मि कल्याणि पाण्डवानां यशस्विनि ।। ५३
मयि सर्वं समासज्य कुटुम्बं भरतर्षभाः ।
उपासनरताः सर्वे घटयन्ति वरानने ।। ५४
तमहं भारमासक्तमनाधृष्यं दुरात्मभिः ।
सुखं सर्वं परित्यज्य रात्र्यहानि घटामि वै ।। ५५

अधृष्यं वरुणस्येव निधिपूर्णमिवोदधिम् ।
एकाऽहं वेद्मि कोशं वै पतीनां धर्मचारिणाम् ॥ ५६
अनिशायां निशायां च सहाया क्षुत्पिपासयोः ।
आराधयन्त्याः कौरव्यांस्तुल्या रात्रिरहश्च मे ॥ ५७
प्रथमं प्रतिबुध्यामि चरमं संविशामि च ।
नित्यकालमहं सत्ये एतत्संवननं मम ॥ ५८
एतज्जानाम्यहं कर्तुं भर्तृसंवननं महत् ।
असत्स्त्रीणां समाचारं नाहं कुर्यां न कामये ॥ ५९

वैशंपायन उवाच ।

तच्छ्रुत्वा धर्मसहितं व्याहृतं कृष्णया तदा ।
उवाच सत्या सत्कृत्य पाञ्चालीं धर्मचारिणीम् ॥ ६०
अभिपन्नाऽस्मि पाञ्चालि याज्ञसेनि क्षमस्व मे ।
कामकारः सखीनां हि सोपहासं प्रभाषितम् ॥ ६१

—महाभारत, वनपर्व अध्याय २३३

द्रौपदी उवाच ।

इदं तु ते मार्गमपेतमोहं वक्ष्यामि चित्तग्रहणाय भर्तुः ।
अस्मिन् यथावत् सखि वर्तमाना भर्तारमाच्छेत्स्यसि कामिनीभ्यः ॥ १
नैतादृशं दैवतमस्ति सत्ये सर्वेषु लोकेषु सदेवकेषु ।
यथा पतिस्तस्य तु सर्वकामा लभ्धाः प्रसादात्कुपितश्च हन्यात् ॥ २
तस्मादपत्यं विविधाश्च भोगाः शय्यासनान्युत्तमदर्शनानि ।
वस्त्राणि माल्यानि तथैव गन्धाः स्वर्गश्च लोको विपुला च कीर्तिः ॥३
सुखं सुखेनेह न जातु लभ्यं दुःखेन साध्वी लभते सुखानि ।
सा कृष्णमाराधय सौहृदेन प्रेम्णा च नित्यं प्रतिकर्मणा च ॥ ४
तथासनैश्चारुभिरग्र्यमाल्यैर्दाक्षिण्ययोगैर्विविधैश्च गन्धैः ।
अस्याः प्रियोऽस्मीति यथा विदित्वा त्वामेव संश्लिष्यति तद्विधत्स्व ॥ ५
श्रुत्वा स्वरं द्वारगतस्य भर्तुः प्रत्युत्थिता तिष्ठ गृहस्य मध्ये ।
दृष्ट्वा प्रविष्टं त्वरिताऽऽसनेन पाद्येन चैनं प्रतिपूजयस्व ॥ ६
संप्रेषितायामथ चैव दास्यामुत्थाय सर्वं स्वयमेव कार्यम् ।
जानातु कृष्णस्तव भावमेतं सर्वात्मना मां भजतीति सत्ये ॥ ७

त्वत्सन्निधौ यत्कथयेत्पतिस्ते यद्यप्यगुह्यं परिरक्षितव्यम् ।
काचित्सपत्नीं तव वासुदेवं प्रत्यादिशेत्तेन भवेद्विरागः ॥ ८
प्रियांश्च रक्तांश्च हितांश्च भर्तुस्तान् भोजयेथा विविधैरुपायैः ।
द्वेष्यैरुपेक्ष्यैरहितैश्च तस्य भिद्यस्व नित्यं कुहकोद्यतैश्च ॥ ९
मदं प्रमादं पुरुषेषु हित्वा संयच्छ भावं प्रतिगृह्य मौनम् ।
प्रद्युम्नसाम्बावपि ते कुमारौ नोपासितव्यौ रहिते कदाचित् ॥ १०
महाकुलीनाभिरपापिकाभिः स्त्रीभिः सखीभिस्तव सख्यमस्तु ।
चण्डाश्च शौण्डाश्च महाशनाश्च चौराश्च दुष्टाश्चपलाश्च वर्ज्याः॥ ११
एतद्यशस्यं भगदैवतं च स्वार्थं तथा शत्रुनिबर्हणं च ।
महार्हमाल्याभरणाङ्गरागा भर्तारमाराधय पुण्यगन्धा ॥ १२

—मदोभारत, वनपर्व अध्याय २३४

" हे सत्यभामे, दुर्वृत्त व भ्रष्ट स्त्रियांचा मार्ग तूं मला विचारलास. या मार्गाच्या बाबतींत मी तुला काय सांगूं शकणार ? भगवान् श्रीकृष्णाची प्रिय महाराणी होण्याचें भाग्य ज्या भाग्यशाली स्त्रीला लाभलें त्या तुझ्यासारख्या स्त्रीच्या तोंडीं हा अशा रीतीचा प्रश्न व या प्रकारचे संशय मुळींच शोभत नाहींत. आपली स्त्री मंत्र व औषधींच्या नादीं लागून आपल्याला स्वतःच्या अधीन ठेवूं पहाते असें जर कोणत्याही पतीला कळून आलें तर तिचें दर्शनही त्याला त्रासदायक वाटल्यावांचून राहणार नाहीं. जिवंत सर्प घरांत फिरतो आहे, या जाणिवेनें मनुष्य जसा उद्विग्न होतो तसाच अशी पत्नी लाभलेला मनुष्य सदैव उद्विग्न अवस्थेंत राहील. जो एकदां उद्विग्न झाला त्याला शांति कोठली ? व ज्याला शांति नाहीं त्याला सुख तरी कोठलें ? एकाद्या मंत्रानें स्त्रीला आपला पति वश करून घेतां येतो ही कल्पनाच मुळांत अत्यंत खोटी आहे. औषधींचा प्रयोग नवऱ्याच्या जिवावर आल्याखेरीज राहणार नाहीं. या मूर्खपणाच्या प्रयोगाच्या नादीं लागलेली स्त्री आपल्या पतीच्या शत्रूकडून शेवटीं आपल्या पतीचा मृत्यु ओढवावयास कारणीभूत होते. मूर्ख स्त्रियांनीं या मार्गाला लागून व पतीच्या अन्नपानांतून भलभलत्या गोष्टींचे त्याच्यावर प्रयोग करून जलोदर, कुक्षिव्याधी, श्वेतकुष्ठ जडत्व, अंधत्व, बधिरपणा व नपुंसकत्व यांसारखे भीषण रोग मात्र आपल्या

पतींना चिकटविलेले आहेत. हे प्रयोग करीत बसणाऱ्या स्त्रिया स्वतः पापी होऊन पापबुद्धीच्या लोकांच्या हातांतलें खेळणें बनतात व आपल्या पतींना व्यर्थ पीडा द्यावयास मात्र कारणीभूत होतात. पतीला स्वाधीन करून घ्यावयाचा खरा मार्ग आपल्या पतीला आवडणार नाहीं असें आचरण पत्नीनें कधींही न करणें हाच आहे. हे यशस्विनी सत्यभामे, महानुभाव पांडवांशीं मी ज्या पद्धतीनें वागतें त्याच्यांतच माझ्या पतींच्या माझ्यावरील प्रेमाचें रहस्य सांठविलेलें आहे. कोणत्या पद्धतीनें मी त्यांच्याशीं वागतें तें तूं ऐक.

अहंकार पूर्णपणें जिंकून व कामक्रोधावर विजय संपादन करून पांडव व माझ्या सपत्नी असलेल्या त्यांच्या इतर स्त्रिया यांची मी दक्षपणें शुश्रूषा करतें. मत्सर व ईर्ष्या यांचा पूर्णपणें परित्याग करून आपलें चित्त पूर्णपणें आवरून यत्किंचितही अभिमान अंतःकरणांत धारण न करतां क्षणोक्षणीं माझ्या पतींचें अंतःकरण संभाळीत मी त्यांची शुश्रूषा करतें. तोंडांतून एकही उणा शब्द बाहेर पडूं नये, बसण्यांत वा उभे रहाण्यांत कधींही अविनयाची शंका देखील येऊं नये, पहाण्यांत देखील औद्धत्याचें कधीं प्रदर्शन होऊं नये, बसणें, जाणें, हावभाव वा अंतःकरणाचे निश्चय यांपैकीं कोणत्याही बाबतींत यत्किंचित् देखील त्यांच्या मनाला लागण्यासारखें कांहींही घडूं नये यासाठीं मी सदैव जपत असतें. माझे पति पार्थ सूर्य व अग्नीप्रमाणें तेजस्वी, सहवासांतील लोकांना आनंद देणारे, चंद्राप्रमाणें शीतल, महारथी असून त्यांचें सामर्थ्य व त्यांचा प्रताप अत्यंत उग्र आहे. दृष्टीनेंच ते दुसऱ्याचें तेज सहज हरण करून घेतात. अशा लोकोत्तर पुरुषांची मला सेवा करावयाची आहे. ही जाणीव दृढपणानें सदैव अंतःकरणांत बाळगून मी त्यांची सेवा करीत असतें. देव, मनुष्य, गंधर्व, अलंकार धारण केलेला रूपयौवनसंपन्न मनुष्य, द्रव्यवान् सौंदर्यसंपन्न पुरुष यांपैकीं कोणीही माझ्या अंतःकरणांत कधीं येऊंच शकत नाहीं. माझ्या पतींचें भोजन झाल्याखेरीज, त्यांचें प्रसाधन व स्नान होऊन त्यांनीं विश्रांति घेतल्याविना मी कधींही भोजन व विश्रांतीची अपेक्षाही करीत नाहीं. अनेक नोकरचाकर सर्व कामें करावयास आमच्या राजमंदिरांत

असले तरी मी स्वतः जातीनेंच या गोष्टीकडे लक्ष देत आलें आहे. माझे पति कोठूनही आले तरी दासदासींऐवजीं स्वतःच उठून त्यांना आसन व उदक देऊन मी त्यांचें अंतःकरणपूर्वक स्वागत करतें. सर्व घर व उपकरणें सदैव स्वच्छ राहतील अशी काळजी घेऊन वेळेवर उत्कृष्ट अन्नाचें भोजन त्यांना मिळालेलें आहे कीं नाहीं याची मी स्वतः काळजी घेतें. धनधान्यादि गोष्टींचें रक्षण सुव्यवस्थितपणें चाललें आहे कीं नाहीं व घराला समृद्धि आणणाऱ्या वस्तू सुरक्षित आहेत कीं नाहींत याची मी स्वतः काळजी घेतें. माझ्या बोलण्यांतून अल्पस्वल्प देखील तिरस्कार अथवा अत्यंत सूक्ष्मदेखील अवहेलना कधीं व्यक्त होऊं शकत नाहीं. अवहेलना व्यक्त करणाऱ्या व सेवा न करणाऱ्या दुष्ट स्त्रियेविषयीं पति नेहमींच उदासीन राहतो. आळस संपूर्णपणें झाडून टाकून मी सदैव पांडवांना अनुकूल असेंच आचरण ठेवतें. थट्टेचा व विनोदाचा प्रसंग नसतां उगाच हंसत बसणें, वारंवार दारांत येऊन अखंड उभे राहणें व घरांतील उद्यानांतून सदा रेंगाळत असणें या गोष्टींचा मी मनांतूनच तिरस्कार करतें व त्या स्वतःच्या आचरणांत कधींही येणार नाहींत याविषयीं मी अत्यंत दक्ष राहतें. खूप हंसणें, खूप रागावणें हें मी चुकूनही कधीं करीत नाहीं. कोणालाही क्रोध उत्पन्न होईल अशा गोष्टींचा मी नेहमींच परित्याग करतें. आपल्या पतींच्या सेवेंत मी सदैव गढलेली असतें. पतीवांचून कोणत्याही गोष्टींचा उपभोग मला मुळींच इष्ट वाटत नाहीं. माझे पति ज्या वेळीं माझ्याजवळ नसतात त्या वेळीं अलंकारांचा व पुष्पांचा साजशृंगार मुळींच न करतां मी सदैव व्रतस्थ राहतें. माझे पति खानपानांत जी गोष्ट आणूं इच्छीत नाहींत व ज्या गोष्टींचा उपभोग ते घेत नाहींत त्या सर्व गोष्टी मीं पूर्णपणें वर्ज्य केलेल्या आहेत. सती स्त्रियांच्या आचरणाचा शास्त्रांत जो उपदेश केलेला आहे तदनुसारच माझें नेहमीं वर्तन असतें. पतीच्या सहवासांत सर्व प्रकारचा साजशृंगार करून मी दक्षपणें त्यांना आवडणारें व त्यांच्या हिताचें असेंच वर्तन करतें. माझ्या सासूनें स्त्रियाचें कौटुंबिक म्हणून भिक्षा, बलिश्राद्ध, पर्वकाळीं स्थालीपाक, मान्य लोकांचा मानसत्कार

इत्यादि धर्म मला शिकविले आहेत. स्वतः मला कित्येक व्रतनियमांचें ज्ञान आहे. त्यांच्या परिपालनाविषयीं सदैव जागरूक राहून मुळींच आळस न करतां लक्षपूर्वक व मोठ्या विनयपूर्वक मी या व्रतनियमांचें आचरण करीत असतें. मृदु, सज्जन, सत्यधर्माचें परिपालन करणारे व सत्यशील पण क्रुद्ध झाले म्हणजे सर्पाप्रमाणें अत्यंत भयंकर असणारे असे माझे पति आहेत. त्यांची मी अखंड परिचर्या करतें. स्त्रीचा शाश्वत धर्म पतीवरच अवलंबून आहे. तोच स्त्रीचा देव व एकमात्र आधार होय. कोणती शहाणी स्त्री त्याला अप्रिय होईल असें आचरण करील ? मी नेहमीं पतीपेक्षां अधिक झोपणें, अधिक खाणें वा आपलाच अधिक थाटमाट करणें या गोष्टी कधीं न करण्याची दक्षता घेतें. नेहमीं माझ्या सासूच्या नियंत्रणांत राहून तिची कधींही निंदा करीत नाहीं. नेहमीं दक्ष राहण्यामुळें, नेहमीं काम करण्याविषयीं तत्पर राहण्यामुळें व गुरुजनांच्या मी करीत असलेल्या शुश्रूषेमुळें पति माझ्या स्वाधीन असतात. वीरमाता, सत्यवादिनी आर्या कुंतीची मी नेहमीं सेवा करीत राहून स्वतः जातीनें तिच्या खाण्यापिण्याकडे लक्ष देतें. वस्त्र, भूषण व भोजन या बाबतींत कुंतीपेक्षां माझा मान अधिक आहे असें मी समजत नाहीं व पृथ्वीप्रमाणें उदार अंतःकरणाच्या कुंतीविषयीं कधींही वाईट बोलत नाहीं. आमच्या राज्यकाळांत युधिष्ठिराच्या राजमंडळांत सोन्याच्या ताटांत आठ सहस्र ब्राह्मण रोज भोजन करीत. ऐंशी सहस्र स्नातक युधिष्ठिराचे आश्रित होते व त्या प्रत्येकाला तीस तीस दासी व्यवस्थेला दिलेल्या होत्या. दहा सहस्र ब्रह्मचारी व यति लोकांना सोन्याच्या ताटांतून भोजन वाढलें जाई. मी या सर्व वेदवेत्त्या ब्राह्मणांच्या पान, आच्छादन व भोजनाकडे लक्ष देऊन अग्रहारांनीं त्यांची व्यवस्थित पूजा करीत असे. उत्तम अलंकार घातलेल्या युधिष्ठिरांच्या एक लक्ष दासी असत. त्या सर्व नृत्यगीतविशारद व अंगावर उत्कृष्ट अलंकार घालीत. त्यांची नांवें, रूपें, त्यांच्या आवडीचे खाण्याचे पदार्थ व वस्त्रें–प्रावरणें, त्यांचे स्वभाव व कामें या सर्वांची मला खडान्‌खडा माहिती असे. नित्य अतिथींना भोजन घालणाऱ्या युधिष्ठिरांच्या येथील सहस्रावधि

दासींची मला पूर्णपणें ओळख असे. इंद्रप्रस्थांत युधिष्ठिर राज्य करीत असतां ते बाहेर निघाले म्हणजे त्यांच्या पाठोपाठ दहा सहस्त्र हत्ती, व एक लक्ष घोडेस्वार जात. त्या सर्वांची संख्या, अंतःपुरांतील सर्व नोकरवर्गाची माहिती व गुराख्यापर्यंत सर्व लोकांच्या कृत्याकृत्याची माहिती मला खडान्खडा असे. पांडवांच्या आयव्ययाची मला पूर्णपणें माहिती होती. माझ्यावर कुटुंबाचा व राज्यांतील अंतःपुराचा सर्व भार टाकून देऊन पांडव आपआपल्या कामांत गढून राहात. ,तो मन ताब्यांत नसलेल्या लोकांनीं सहन करण्यास अत्यंत कठिण असा भार सर्व सुखाचा परित्याग करून व अहोरात्र खपून मी सहन केला आहे. वरुणाच्या रत्नसागराप्रमाणें कुणालाही धर्षण करण्यास अत्यंत कठिण अशा माझ्या धर्मनिष्ठ पतींचा धनकोश मला पूर्णपणें माहीत आहे. दिवसा व रात्रीं सतत पांडवांचें मन संभाळीत असतां मला रात्र व दिवस सारखेच झाले आहेत. मी पतीच्या आधीं उठते व नंतर झोंपते. मी तुला सांगितलें या प्रकारानें वागत आलें हाच माझ्या पतींना वश करून घेण्यांचा माझा उपाय होय. दुष्ट स्त्रियांच्या आचाराकडे मी कधीं वळलें नाहीं व वळणार नाहीं.' याप्रमाणें द्रौपदीनें सत्यभामेला उत्तर दिल्यावर ती ओशाळली व द्रौपदीला म्हणूं लागली कीं, हे पांचाली, मी सखीच्या नात्यानें सहज थट्टा म्हणून हें तुझ्याशीं बोललें. तूं मला क्षमा कर. त्यावर द्रौपदी तिला म्हणाली कीं, आपल्या डोळ्यावरील खुळेपणाचें मोहपटल पूर्णपणें बाजूला सारून मी सांगतें त्या पद्धतीनें पतीचें मन आपल्या स्वाधीन करून घेण्यासाठीं तूं वाग. तूं जर याप्रमाणें वागशील तर इतर सर्व स्त्रियांपेक्षां भगवान् तुझ्यावरच खरें प्रेम करतील. पतीसारखें सर्व जगांत दैवत नाहीं. त्याच्या प्रसन्नतेंत सर्व इच्छा पूर्ण होतात. व अप्रसन्नतेंत सर्व इच्छांचा विघात होतो. त्याच्यापासून अपत्यलाभ, विविध प्रकारच्या उपभोगांचा लाभ, शय्या, आसन, लावण्यमय पदार्थ, वस्त्र, माल्य, विविध सुगंधी द्रव्यें, इहलोकीं मोठी कीर्ति व परलोकीं स्वर्गाची प्राप्ति असा सर्व प्रकारचा लाभ आपोआप होतो. हे सत्यभामे,

सुखाच्या मार्गानें शाश्वत सुख कधीं मिळत नाहीं. कष्ट करावे तेव्हांच खऱ्या सुखाची प्राप्ति होत असते. तूं सौहार्दानें, प्रेमानें, व नित्य सर्व प्रकारची सेवा करून भगवान् श्रीकृष्णाची आराधना कर. उत्तम आसनें, उत्कृष्ट माल्य, विविध सुगंधी द्रव्यें त्यांना अर्पण करून त्या सर्वांतून आपल्या अंतःकरणाचा प्रेमळपणा अशा पद्धतीनें व्यक्त कर कीं ज्यामुळें तुझें श्रीकृष्णांवर सर्वांत अधिक प्रेम आहे हें पटून भगवान् श्रीकृष्ण तुझ्याचवर सर्वांत अधिक प्रेम करतील. दारांत कृष्णांचा शब्द ऐकला कीं अंतःपुरांत तूं उठून उभी राहा. दारांतून ते प्रवेश करूं लागले कीं आसन व पाद्यानें तूं त्यांचें स्वागत कर. दासी असो वा नसो, स्वतःच उठून श्रीकृष्णांचीं सर्व कामें तूं स्वतः कर. सर्व प्रकारें तूं श्रीकृष्णांची सेवा करतेस हें त्यांना पटले पाहिजे. जें जें श्रीकृष्ण तुझ्याजवळ बोलतील तें जरी त्यांनीं गुप्त ठेवावयास सांगितलें नाहीं, तरीदेखील केवळ आपल्याच अंतःकरणांत सांठवून ठेव. जर तूं असे एकांतांतले अभिप्राय कोठें बोललीस व ते तुझ्या सवतींनीं ऐकले व त्यांनीं ते श्रीकृष्णांना सांगितले तर तुला वेंधळी समजून कृष्ण तुझ्यासंबंधीं उदासीन झाल्यावांचून राहणार नाहीत. कृष्णांचे जे आवडते, त्यांच्यावर प्रेम करणारे, व त्यांचें हित व्हावें म्हणून जपणारे असे लोक असतील त्यांना विविध उपायांनीं भोजन घाल व त्यांची व्यवस्था ठेव. जे कृष्णाचे द्वेष्य, उपेक्ष्य, व त्यांना अहितकारक असे लोक असतील त्यांच्यापासून चार पावलें दूर रहा. पूर्णपणें मौन स्वीकारून व आपल्या अंतःकरणांतील भाव गुप्त ठेवून प्रमाद व दर्प कोणत्याही पुरुषांसमोर कधींही प्रकट करूं नकोस. प्रद्युम्न व सांब हीं तुझीं मुलें असलीं तरी एकांतांत त्यांच्याशीं देखील संबंध ठेवूं नको. अत्यंत कुलीन व घरंदाज, पापाचा कधींही विचार देखील अंतःकरणांत न येणाऱ्या अशा महापतिव्रता स्त्रियांशींच तुझें सख्य असावें. क्रोधी, गर्विष्ठ, खादाड, चोर, दुष्ट व स्वैरिणी स्त्रियांशीं तूं मुळींच संबंध ठेवूं नकोस. भाग्यदेवतेला प्रसन्न करून घेण्याचें, जीवनांत पूर्ण यशस्वी होण्याचें, व शत्रु परास्त करण्याचें हेंच खरें साधन होय. उत्कृष्ट वस्त्रालंकारांनीं आपला साजशृंगार करून व सुवासिक अंगराग

लावून आपल्या भर्त्याची सतत आराधना कर. तुझ्या कल्याणाचा हाच मार्ग आहे."

द्रौपदीचा हा उपदेश किती सुंदर आहे ! महासती द्रौपदी पांडवांच्या जीवनांतील सर्व छायाप्रकाशांत त्यांच्याबरोबर राहिली. ते अरण्यांत गेले त्यावेळीं ती ज्याप्रमाणें त्यांच्या बरोबर गेली त्याच प्रमाणें पुढें महाप्रस्थानिक पर्वांत पांडव इहलोकाचा निरोप घेऊन स्वर्गास जावयास निघाले असतांही द्रौपदी त्यांच्याबरोबर गेली आहे.

## वज्राघातांची परंपरा

पांडवांच्या जीवनांत द्रौपदी आल्यानंतर मनांत कोणत्या कल्पना बाळगून तिनें आपलें सांसारिक जीवन उभारलें होतें व त्यासाठीं तिनें किती उत्कृष्ट प्रकारचा वर्तनक्रम ठेविला होता हें स्पष्ट करण्यासाठींच सत्यभामेचा व तिचा संवाद मी वर उद्धृत केला आहे. दुर्दैवानें अथवा तिच्या पतीच्या धर्मकार्पण्यामुळें त्या मानिनी स्त्रीला सर्व दृष्टींनीं तिची योग्यता थोर असूनही तिचीं सारीं स्वप्नें भंगलेलीं पाहावीं लागून घोर विटंबना सहन करावी लागली. द्यूतांत एकाद्या निर्जीव वस्तूप्रमाणें युधिष्ठिरानें तिला पणाला लावलें व शकुनीनें तिला जिकल्यावर उन्मत्त दुर्योधनानें प्रातिकामी नांवाच्या सूताकडून भरसभेंत तिला येण्याविषयीं बोलाविणें पाठविलें. ज्या वेळीं प्रातिकामी अंतःपुरांत येऊन द्रौपदीला म्हणूं लागला कीं, "द्यूतमदानें मत्त झालेल्या युधिष्ठिरानें आपल्यालाच पणाला लावलें असून दुर्योधनानें आपल्याला जिंकलें आहे व कामें करण्यासाठीं मी आपल्याला घेऊन जावयास आलों आहें" त्या वेळीं त्या मानिनी स्त्रीला तें खरें देखील वाटेना. धर्मात्मे द्यूताच्या कैफानें स्वतःच्या महासाध्वी स्त्रियांना देखील पणाला लावण्याइतके उन्मत्त होतात व केवळ फाशांच्या खळखळण्यानें एका महान् साम्राज्याची साम्राज्ञी एका क्षणाच्या आंत दुष्टांची दासी होऊं शकते या गोष्टीवर तिचा विश्वास बसावा तरी कसा ? ती प्रातिकामीला म्हणूं लागलीः—

> **कथं त्वेवं वदसि प्रातिकामिन्को हि दीव्येद्भार्यया राजपुत्रः ।**
> **मूढो राजा द्यूतमदेन मत्तो ह्यभून्नान्यत्कैतवमस्य किंचित् ॥ ५**
>
> —महाभारत, सभापर्व अध्याय ६७

"हे प्रातिकामिन्, तूं हें काय बरळतो आहेस? कोणता राजपुत्र आपल्या बायकोला द्यूतांत पणाला लावील? राजा द्यूत-मदानें मत्त होऊन मूर्ख तर नाहीं बनला? किंवा त्याची सपशेल फसवणूक तर नाहींना झाली? हें असें होईलच कसें?" प्रातिकामीनें तिला सांगितलें कीं, युधिष्ठिरानें जेव्हां आपणांस पणाला लाविलें तेव्हां त्यांना कोणींही फसविलें नसून ते चांगले सावध होते व आपण काय करतों आहोंत हें त्यांना पूर्णपणें माहीत होतें. प्रथम त्यांनीं आपले बंधु पणाला लावले, नंतर त्यांनीं स्वतःला पणाला लावलें व तोही पण हरल्यानंतर त्यांनीं आपणांस पणाला लावलें." युधिष्ठिरानें स्वतःचें शरीर हरल्यावर नंतर आपणांस पणाला लाविलें यांतून कदाचित् अप्रतिष्ठेपासून सुटण्याचा मार्ग आपणांस सांपडण्याचा संभव आहे असें वाटून ती त्या सूताला म्हणाली, हे सूता, तूं सभेंत जाऊन त्या कपटी व जुगारी युधिष्ठिराला असें विचार कीं, तूं आधीं स्वतःला पणाला लावून हरलास व नंतर मला पणाला लाविलेंस कीं आधीं मला पणाला लावून हरून नंतर तूं परक्यांचा दास झालास? राजा याचें जें उत्तर देईल तें मला येऊन सांग. म्हणजे मी कसें वागावयाचें तें ठरवीन. राजाचीच तशी इच्छा असली तर मी या दुःखी स्थितींत तेथें येईनही.

**गच्छ त्वं कितवं गत्वा सभायां पृच्छ सूतज ।**
**किं तु पूर्वं पराजैषीरात्मानमथवा नु माम् ॥ ७**
**एतज्ज्ञात्वा समागच्छ ततो मां नय सूतज ।**
**ज्ञात्वा चिकीर्षितमहं राज्ञो यास्यामि दुःखिता ॥ ८**

—महाभारत, सभापर्व अध्याय ६७

तो सूत द्रौपदीच्या म्हणण्यानुसार राजसभेंत गेला व त्यानें युधिष्ठिरांना तिचा निरोप सांगितला. तें ऐकतांच युधिष्ठिर अगदीं अचेतन झाले व त्यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. दुर्योधनानें मात्र सूताला असें सांगितलें कीं, द्रौपदीनें येथेंच राजसभेंत येऊन हा प्रश्न युधिष्ठिराला विचारावा. येथें असलेले सर्व लोक या दोघांचा होणारा तो संवाद ऐकूं देत. तो बिचारा नोकर काय बोलणार? धन्याच्या आज्ञेनुरूप त्याला द्रौपदीकडे पुन्हां निरोप घेऊन जाणें

भागच होतें. तो अंतःकरणांतून अत्यंत दुःखी झाला पण विवश होऊन द्रौपदीकडे जाऊन त्यानें तिला असें सांगितलें कीं, हे राजकन्ये, हे सभ्य म्हणविणारे लोक तुला सभेंत बोलावीत आहेत. याचा अर्थ कौरवांचा विनाशकाळ जवळ आला आहे असाच आहे. जो कोणी क्षुद्रात्मा तुला राजसभेंत नेईल तो ऐश्वर्यापासून भ्रष्ट झाल्याशिवाय राहणार नाहीं. द्रौपदीनें त्याला इतकेंच उत्तर दिलें कीं :—

**एवं नूनं व्यदधात्संविधाता स्पर्शावुभौ स्पृशतो वृद्धबालौ ।**
**धर्मं त्वेकं परमं प्राह लोके स नः शमं धास्यति गोप्यमानः ॥ १५**
**सोयं धर्मो मात्यगात्कौरवान्वै सभ्यान्मत्वा पृच्छ धर्म्यं वचो मे ।**
**ते मां ब्रूयुर्निश्चितं तत्करिष्ये धर्मात्मानो नीतिमन्तो वरिष्ठाः ॥ १६**

——महाभारत, सभापर्व अध्याय ६७

"सर्व प्रकारच्या चराचर सृष्टीसाठीं परमेश्वरानेंच सुखें व दुखें लावून दिलेलीं आहेत. त्यामुळें आपल्या भाग्यानें मिळणाऱ्या सुखदुःखाचा फारसा विचार करण्याचें कारण नाहीं. सर्व जगांत धर्मच अत्यंत श्रेष्ठ आहे. आपण जर धर्मानुसार वागलों तर तो शेवटीं कल्याण केल्यावांचून राहात नाहीं. कौरवांच्या हातून धर्माचें उल्लंघन होऊं नये अशी माझी इच्छा आहे. म्हणून तूं सभासदांना जाऊन धर्मानुसार असलेलें माझें म्हणणें सांग. त्या सभेंतील धर्मात्मे, नीतिमान् व श्रेष्ठ असे लोक मला जसें वागावयास सांगत असतील तसें वागावयास मी सिद्ध आहें. तो बिचारा सूत पुनश्च सभेंत येऊन सभासदांना द्रौपदीचा प्रश्न विचारूं लागला. पण प्रश्न धर्माधर्माच्या सूक्ष्म विवेचनाच्या पलीकडे गेलेला असून दुर्योधनाचा द्रौपदीला सभेंत आणण्याचा दुराग्रह कधींही सुटावयाचा नाहीं असें पाहून उगाच आपला अपमान करून घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं अशा कल्पनेनें सभ्य खालीं माना घालून स्वस्थ बसले. दुर्योधनानें त्या सूताला असें सांगितलें कीं, तूं प्रत्यक्ष द्रौपदीकडे जाऊन तिलाच सभेंत सभ्यांना हा प्रश्न विचारावयासाठीं यावयास सांग. सूत त्याचा नोकर असला तरी द्रौपदीच्या क्रोधाला तो भीत होता. त्यामुळें तो पुनश्च मी द्रौपदीला काय सांगूं असें तो सभ्यांना विचारूं लागला. शेवटीं दुर्योधनानें रागानें आपली दृष्टि दुःशा-

सनाकडे वळविली व त्याला असें सांगितलें कीं, हा मूर्ख नोकर भीमाला भीत आहे. तूं स्वतःच जाऊन द्रौपदीला खेंचून आण. आपण काय वाटेल तें केलें तरी हे अवश शत्रु आपणांला काय करणार आहेत ? लाल नेत्र करून दुःशासन उठला व त्या महासतीला अप्रतिष्ठेनें सभेंत आणण्याचें, शौर्याला, कुळाला व माणुसकीला काळिमा फांसणारें तें कुकृत्य करण्यासाठीं अंतःपुराकडे निघाला. त्या करुण प्रसंगाचें चित्र चित्रित करीत असतां महाभारतकार म्हणतातः—

ततः समुत्थाय स राजपुत्रः श्रुत्वा भ्रातुः शासनं रक्तदृष्टिः ।
प्रविश्य तद्वेश्म महारथानामित्यब्रवीद् द्रौपदीं राजपुत्रीम् ।। २६
एह्येहि पाञ्चालि जितासि कृष्णे दुर्योधनं पश्य विमुक्तलज्जा ।
कुरून् भजस्वायतपत्रनेत्रे धर्मेण लब्धासि सभां परैहि ।। २७
ततः समुत्थाय सुदुर्मना सा विवर्णमामृज्य मुखं करेण ।
आर्ता प्रदुद्राव यतः स्त्रियस्ता वृद्धस्य राज्ञः कुरुपुङ्गवस्य ।। २८
ततो जवेनाभिससार रोषाद् दुःशासनस्तामभिगर्जमानः ।
दीर्घेषु नीलेष्वथ चोर्मिमत्सु जग्राह केशेषु नरेन्द्रपत्नीम् ।। २९
ये राजसूयावभृथे जलेन महाक्रतौ मन्त्रपूतेन सिक्ताः ।
ते पाण्डवानां परिभूय वीर्यं बलात्प्रसृष्टा धृतराष्ट्रजेन ।। ३०
स तां पराकृष्य सभासमीपमानीय कृष्णामतिदीर्घकेशीम् ।
दुःशासनो नाथवतीमनाथवच्चकर्ष वायुः कदलीमिवार्ताम् ।। ३१
सा कृष्यमाणा नमिताङ्गयष्टिः शनैरुवाचाथ रजस्वलाऽस्मि ।
एकं च वासो मम मन्दबुद्धे सभां नेतुं नार्हसि मामनार्य ।। ३२
ततोऽब्रवीत्तां प्रसभं निगृह्य केशेषु कृष्णेषु तदा स कृष्णाम् ।
कृष्णं च जिष्णुं च हरिं नरं च त्राणाय विक्रोशति याज्ञसेनी ।। ३३

दुःशासन उवाच ।

रजस्वला वा भव याज्ञसेनि एकाम्बरा वाप्यथवा विवस्त्रा ।
द्यूते जिता चासि कृतासि दासी दासीषु वासश्च यथोपजोषम् ।। ३४

वैशंपायन उवाच ।

प्रकीर्णकेशी पतितार्धवस्त्रा दुःशासनेन व्यवधूयमाना ।
ह्रीमत्यमर्षेण च दह्यमाना शनैरिदं वाक्यमुवाच कृष्णा ।। ३५

द्रौपद्युवाच ।

इमे सभायामुपनीतशास्त्राः क्रियावन्तः सर्व एवेन्द्रकल्पाः ।
गुरुस्थाना गुरवश्चैव सर्वे तेषामग्रे नोत्सहे स्थातुमेवम् ॥ ३६
नृशंसकर्मंस्त्वमनार्यवृत्त मा मा विवस्त्रां कुरु मा विकार्षीः ।
न मर्षयेयुस्तव राजपुत्राः सेन्द्रापि देवा यदि ते सहायाः ॥ ३७
धर्मे स्थितो धर्मसुतो महात्मा धर्मश्च सूक्ष्मो निपुणोपलभ्यः ।
वाचापि भर्तुः परमाणुमात्रमिच्छामि दोषं न गुणान्विसृज्य ॥ ३८
इदं त्वकार्यं कुरुवीरमध्ये रजस्वलां यत्परिकर्षसे माम् ।
न चापि कश्चित् कुरुतेऽत्र कुत्सां ध्रुवं तवेदं मतमभ्युपेतः ॥ ३९
धिगस्तु नष्टः खलु भारतानां धर्मस्तथा क्षत्रविदां च वृत्तम् ।
यत्र ह्यतीता कुरु धर्मवेलां प्रेक्षन्ति सर्वे कुरवः सभायाम् ॥ ४०
द्रोणस्य भीष्मस्य च नास्ति सत्त्वं क्षत्तुस्तथैवास्य महात्मनोऽपि ।
राज्ञस्तथा हीममधर्ममुग्रं न लक्षयन्ते कुरुवृद्धमुख्याः ॥ ४१

वैशंपायन उवाच ।

तथा ब्रुवन्ती करुणं सुमध्यमा भर्तॄन्कटाक्षैः कुपितानपश्यत् ।
सा पाण्डवान्कोपपरीतदेहान् संदीपयामास कटाक्षपातैः ॥ ४२
हृतेन राज्येन तथा धनेन रत्नैश्च मुख्यैर्न तथा बभूव ।
यथा त्रपाकोपसमीरितेन कृष्णाकटाक्षेण बभूव दुःखम् ॥ ४३
दुःशासनश्चापि समीक्ष्य कृष्णामवेक्षमाणां कृपणान्पतींस्तान् ।
आधूय वेगेन विसंज्ञकल्पामुवाच दासीति हसन्स शब्दम् ॥ ४४
तथा ब्रुवन्तीं करुणं रुदन्तीमवेक्षमाणां कृपणान्पतींस्तान् ।
दुःशासनः परुषाण्यप्रियाणि वाक्यान्युवाचामधुराणि चैव ॥ ५३
तां कृष्यमाणां च रजस्वलां च स्रस्तोत्तरीयामतदर्हमाणाम् ।
वृकोदरः प्रेक्ष्य युधिष्ठिरं च चकार कोपं परमार्तरूपः ॥ ५४

—महाभारत, सभापर्व अध्याय ६७

" अंतःपुरांत शिरून दुःशासन द्रौपदीला म्हणाला, 'हे कृष्णे, आम्ही धर्मानुसार जिंकलेली तूं आमची दासी आहेस. हे कमलनेत्रे, तूं यापुढें कौरवांची सेवा केली पाहिजेस. दासीला लाज कसली आली आहे? लाज सोडून तूं दुर्योधनाला पाहा. सभेंत चल." हृदयाला घरें पाडणारे त्याचे ते उद्‍गार ऐकतांच द्रौपदीचा चेहरा

पांढरा फटफटीत पडला. भग्नमनस्क स्थितींत आपल्या हातांनीं आपलें तोंड झांकून घेऊन व अत्यंत आर्त होऊन वृद्ध राजा धृतराष्ट्राच्या अंतःपुरांतील स्त्रिया जिकडे होत्या तिकडे ती धांवत जाऊं लागली. त्याबरोबर रागानें गर्जना करीत वेगानें दुःशासन तिच्या अंगावर धांवून गेला व त्यानें तिचे कुरळे, दीर्घ व काळेभोर केस धरून त्या सम्राज्ञीला खेंचलें. महान् राजसूय यज्ञांत मंत्रपूत अवभृथाच्या जलाचा ज्यांच्यावर अभिषेक झाला त्या द्रौपदीच्या भाग्यशाली केसांना पांडवांच्या पराक्रमाचा अनादर करून बलात्कारानें धृतराष्ट्रपुत्रानें स्पर्श केला. वाऱ्यानें ज्याप्रमाणें कदलीला ओढीत न्यावें त्याप्रमाणें श्रेष्ठ संरक्षण असलेल्या द्रौपदीला एकाद्या अनाथाप्रमाणें दुःशासन केस धरून फरफर ओढीत सभेंत नेऊं लागला. केसांना हिसके बसत असल्यामुळें किंचित वांकलेली द्रौपदी त्या अधमाला म्हणाली, हे मंदबुद्धीच्या दुष्टा, मी रजस्वला व एक वस्त्रा आहे. अशा स्थितींत तूं मला सभेंत नेऊं नकोस. याप्रमाणें वारंवार दुःशासनाला विनवीत व आपल्या संरक्षणासाठीं परमेश्वराचा धांवा करीत आक्रोश करणाऱ्या द्रौपदीच्या केसांना एक जोराचा हिसडा देऊन दुःशासनानें तिला सांगितलें कीं, तूं रजस्वला असलीस, एकवस्त्रा असलीस किंवा संपूर्णपणें विवस्त्र असलीस तरी त्याची यत्किंचितही चिंता बाळगण्याचें मला कांहीं कारण नाहीं. आम्ही द्यूतांत जिंकलेली तूं आमची दासी आहेस व दासीला वस्त्र असावें कीं नसावें हें ठरविण्याचा अधिकार सर्वस्वीं तिच्या धन्यांचा आहे. त्या ओढाताणींत द्रौपदीचे केस मोकळे सुटले होते. तिचा पदर खांद्यावरून घसरून खालीं पडला होता. लज्जा व क्रोध यांनीं तिचें अंतःकरण पूर्णपणें दग्ध झालें होतें. व तरीही दुःशासन तिच्या शरीराला हिसडे देत होता. विलाप करीत द्रौपदी त्याला म्हणाली, या तुमच्या सभेंत शास्त्रांचें अध्ययन केलेले, इंद्राप्रमाणें प्रभावशाली असे क्रियावान् लोक बसले आहेत. अशा मान्य लोकांसमोर या स्थितींत मला नेणें योग्य आहे काय? नृशंस कर्मांत निर्ढावलेल्या चारित्र्यभ्रष्ट अधमा, तूं मला याप्रमाणें ओढूं नकोस. माझें वस्त्र अस्ताव्यस्त झालें आहे. तूं इतका घोर अपराध केलास

कीं आतां तूं वांचूं शकणार नाहींस. इंद्रासहित सर्व देव जरी तुझ्या साहाय्यार्थ आले तरीही तुझें संरक्षण होऊं शकणार नाहीं. युधिष्ठिर धर्मबंधनानें बांधलेले आहेत. धर्म अत्यंत सूक्ष्म असून त्याचें रहस्य विचक्षणांनाही कळत नाहीं. या स्थितींत देखील माझ्या पतींचे गुण सोडून त्यांच्या परमाणूएवढया सूक्ष्म दोषांचेंही आविष्करण करण्याची माझी इच्छा नाहीं. सर्व कौरववीर पहात असतां माझ्यासारख्या रजस्वलेला तूं भरसभेंत ओढतोस हें केवढें मोठें दुष्कृत्य आहे. पण तरीही तुझी येथें कोणी निर्भर्त्सना करीत नाहीं! या सर्वांची बुद्धि तुझ्यासारखीच भ्रष्ट झालेली आहे काय? भरतकुलांतील या सर्व लोकांना धिक्कार असो. यांचा धर्म गेला. यांचें क्षत्रियत्वही पार संपलें. सर्व कौरव उघडया डोळयांनीं ज्या अर्थी ही धर्माची अमर्यादा पाहात आहेत, त्याअर्थी भीष्म, द्रोण, विदुर, राजा धृतराष्ट्र व इतर सर्व कुरुवृद्ध यांचें पुण्य व सामर्थ्य संपुष्टांतच आलें आहे असें म्हटलें पाहिजे."

याप्रमाणें करुण विलाप करीत सभेंत येऊन तिनें पांडवांच्याकडे क्रोध व लज्जा, तिरस्कार व घृणा यांनीं भरलेला एक कटाक्ष टाकला. द्रौपदीच्या त्या कटाक्षांत कोणतें ब्रह्मांड सांठविलेलें नव्हतें? राज्य गेल्यामुळें व सर्वस्व गेल्यामुळें पांडवांना जितकें दुःख झालें नाहीं तितकें लज्जा व क्रोध यांनीं मिश्रित अशा द्रौपदीच्या कटाक्षानें त्यांना दुःख झालें. त्यांच्या हृदयाचें पाणी पाणी होऊन गेलें. त्याही स्थितींत दुःशासनानें द्रौपदीला इतक्या जोराचा हिसडा दिला कीं ती मूर्च्छित होण्याच्या बेतांत आली. पण तिची ती अवस्था पाहून तो मूर्ख दुरात्मा दांत काढून हांसत दासी म्हणून तिला संबोधूं लागला. कर्णादि सर्व दुष्ट त्या मूर्खाचें अभिनंदन करूं लागले. इतर कोणीच कांहीं बोलेनात. ती भीष्मांना मी दासी आहे काय म्हणून विचारूं लागली. त्यांनीं उत्तराच्यासंबंधीं आपलें असामर्थ्य प्रकट केलें व युधिष्ठिराकडे बोट दाखविलें. शेवटीं अब्रूसाठीं द्रौपदी करुण आक्रंदन करूं लागली. दुःशासन तिला कठोरांतील कठोर वाक्यें ऐकवूं लागला. रजस्वला स्थितींत ओढली जाणारी व वस्त्र अस्ताव्यस्त झालेली द्रौपदी पाहून भीम संतापला. पण त्याचा कांहीं एक उपयोग नव्हता.

एकटा विकर्ण मात्र द्रौपदी दासी नाहीं असें स्पष्टपणें म्हणाला. पण कर्णानें त्यालाच धमकाविलें. व त्या तेजस्विनी सम्राज्ञीला भरसभेंत नग्न करण्याची त्यानें आज्ञा दिली. महाभारतकार म्हणतातः–

ततो दुःशासनो राजन्द्रौपद्या वसनं बलात्।
सभामध्ये समाक्षिप्य व्यपाक्रष्टुं प्रचक्रमे ।। ४०

वैशंपायन उवाच।

आकृष्यमाने वसने द्रौपद्या चिन्तितो हरिः।
गोविन्द द्वारकावासिन्कृष्ण गोपीजनप्रिय ।। ४१
कौरवैः परिभूतां मां किं न जानासि केशव।
हे नाथ हे रमानाथ व्रजनाथार्तिनाशन।
कौरवार्णवमग्नां मामुद्धरस्व जनार्दन ।। ४२
कृष्ण कृष्ण महायोगिन्विश्वात्मन्विश्वभावन।
प्रपन्नां पाहि गोविन्द कुरुमध्येवसीदतीम् ।। ४३
इत्यनुस्मृत्य कृष्णं सा हरिं त्रिभुवनेश्वरम्।
प्रारुदद् दुःखिता राजन्मुखमाच्छाद्य भामिनी ।। ४४
याज्ञसेन्या वचः श्रुत्वा कृष्णो गह्वरितोऽभवत्।
त्यक्त्वा शय्यासनं पद्भ्यां कृपालुः कृपयाभ्यगात् ।। ४५
कृष्णं च विष्णुं च हरिं नरं च त्राणाय विक्रोशति याज्ञसेनी।
ततस्तु धर्मोन्तरितो महात्मा समावृणोद्वै विविधैः सुवस्त्रैः ।। ४६
आकृष्यमाणे वसने द्रौपद्यास्तु विशांपते।
तद्रूपमपरं वस्त्रं प्रादुरासीदनेकशः ।। ४७
नानारागविरागाणि वसनान्यथ वै प्रभो।
प्रादुर्भवन्ति शतशो धर्मस्य परिपालनात् ।। ४८
ततो हलहलाशब्दस्तत्रासीद् घोरदर्शनः।
तदद्भुततमं लोको वीक्ष्य सर्वे महीभृतः।
शशंसुर्द्रौपदीं तत्र कुत्सन्तो धृतराष्ट्रजम् ।। ४९

—महाभारत, सभापर्व अध्याय ६८

नंतर दुःशासनानें बलात्कारानें द्रौपदीचें वस्त्र भर सभेंत ओढावयास प्रारंभ केला. मृत्यूहूनही भयंकर अशा या विटंबनेपासून कुणीही

आपलें संरक्षण करणें शक्य नाहीं असें पाहून, द्रौपदीनें भगवान् श्रीकृष्णांच्या नांवानें आर्त हांक मारली. ती म्हणाली हे द्वारकावासी, गोपीजनप्रिया श्रीकृष्णा, कौरवांनीं माझी चालविलेली विटंबना तुझ्या ध्यानांत आली नाहीं काय? हे महायोगिन् विश्वभावना, मी तुला सर्वस्वीं शरण आहें. तूं माझें संरक्षण कर. त्रिभुवनेश्वर श्रीकृष्णाला याप्रमाणें हांक मारून दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून घेऊन द्रौपदी रडूं लागली. त्याबरोबर भगवान् श्रीकृष्ण दुःखानें विव्हळ होऊन आपलें शय्यासन सोडून त्या ठिकाणीं आले. ती परमेश्वराला स्वतःच्या रक्षणार्थ हांक मारीत असतां तिच्या पातिव्रत्यधर्मानेंच अनेक वस्त्रांनीं तिला झांकून तिचें संरक्षण केलें. एक वस्त्र ओढलें जातांच अनेक वस्त्रें निघूं लागलीं. नंतर अनर्थसूचक असा भयंकर शब्द ऐकूं येऊं लागला. तो प्रकार पहातांच अनेक लोक द्रौपदीची प्रशंसा करून धृतराष्ट्रपुत्रांची निंदा करूं लागले. याप्रमाणें धर्मानें वस्त्रहरणाच्या आपत्तींतून तिला वांचविलें. तरी तिचे कष्ट संपले नाहींत. ती रडत असतां दुःशासन कर्णाच्या आज्ञेवरून वारंवार तिला ओढूं लागला. त्याबरोबर विलाप करीत ती म्हणाली:

स्वयंवरे यास्मि नृपैर्दृष्टा रङ्गे समागते ।
न दृष्टपूर्वा चान्यत्र साहमद्य सभां गता ॥ ४
यां न वायुर्न चादित्यो दृष्टवन्तौ पुरा गृहे ।
साहमद्य सभामध्ये दृश्यामि जनसंसदि ॥ ५
यां न मृष्यन्ति वातेन स्पृश्यमानां गृहे पुरा ।
स्पृश्यमानां सहन्तेऽद्य पाण्डवास्तां दुरात्मना ॥ ६
मृष्यन्ति कुरवश्चेमे मन्ये कालस्य पर्ययम् ।
स्नुषां दुहितरं चैव क्लिश्यमानामनर्हतीम् ॥ ७
किं न्वतः कृपणं भूयो यदहं स्त्री सती शुभा ।
सभामध्यं विगाहेऽद्य क्व नु धर्मो महीक्षिताम् ॥ ८
धर्म्यां स्त्रियं सभां पूर्वं न नयन्तीति नः श्रुतम् ।
स नष्टः कौरवो येषु पूर्वो धर्मः सनातनः ॥ ९
कथं हि भार्या पाण्डूनां पार्षतस्य स्वसा सती ।
वासुदेवस्य च सखी पार्थिवानां सभामियाम् ॥ १०

तामिमां धर्मराजस्य भार्यां सदृशवर्णजाम् ।
ब्रूत दासीमदासीं वा तत्करिष्यामि कौरवः ॥ ११
अयं मां सुदृढं क्षुद्रः कौरवाणां यशोहरः ।
क्लिश्नाति नाहं तत्सोढुं चिरं शक्ष्यामि कौरवाः ॥ १२
जितां वाप्यजितां वापि मन्यध्वं मां यथा नृपाः ।
तथा प्रयुक्तमिच्छामि तत्करिष्यामि कौरवाः ॥ १३

—महाभारत, सभापर्व अध्याय ६९

"काय दुर्दैव आहे ! केवळ स्वयंवरांतच मी सभेंत आलें होतें पुन्हां कधीं सभेंत आलें नाहीं. त्या मला आज या स्थितींत सभेंत येण्याचा प्रसंग आला! वायु व सूर्यही जिला कधीं पाहूं शकले नाहींत त्या माझ्यासारख्या राजस्त्रीला सर्व सभासद उघडया डोळयांनीं पहात आहेत. वाऱ्यानेंही मला स्पर्श केला तर परक्रमी पांडवांना तो सहन होत नसे. आज हा अधम मला वारंवार स्पर्श करीत असूनही पांडव तो सहन करीत आहेत! कौरव कुळांतील हे वृद्ध लोक मुलीसारख्या असलेल्या आपल्या सुनेला अशा प्रकारचे दिलेले कष्ट सहन करीत आहेत याचा अर्थ काळच फिरला आहे ! याच्यापेक्षां दुसरी कोणची शोचनीय गोष्ट असेल काय ? माझ्यासारख्या पतिव्रता स्त्रीला सभेमध्यें अशाच स्थितींत उभें राहणें भाग पडावें ! आज राजधर्म कोठें गेला ? स्त्रीला पूर्वीं अशा अवस्थेंत कधींही सभेंत नेत नसत. ही धर्मपरंपरा कौरव कुळांतून पूर्णपणें नष्ट झाली. पांडवांसारख्यांची भार्या, धृष्टद्युम्नासारख्या वीराची बहीण, व भगवान् श्रीकृष्णांची सखी, अशा रीतीनें सभेंत यावी काय ? हे कौरवश्रेष्ठांनो, धर्मराज युधिष्ठिराची ही पत्नी खरेंच दासी आहे असें तुम्हांला वाटतें काय ? कौरवांच्या यशाला मशाल लावणारा हा नराधम मला जे तीव्र क्लेश देत आहे ते आतां मी सहन करूं शकणार नाहीं. तुम्ही निर्णय द्याल तसें मी वागेन. सांगा, मी खरेंच दासी आहे काय? "

पण ती आर्त विलाप करीत असतां कोणीही सभ्य तिला उत्तर देईना. कर्णानें हलकटपणानें तिला भोगदासी ठरवून पांडवांचा परित्याग करून कौरवांपैकीं कोणाचाही स्वीकार करावयास उघडपणें

सांगितलें. व दुर्योधनानें तर निर्लज्जपणें आपली डावी मांडीही तिला दाखविली. द्रौपदीची कोणती विटंबना व्हावयाची शिल्लक राहिली होती? युधिष्ठिराच्या धर्मकार्पण्यानें स्त्रीजीवनांतील सर्वस्व घालवून बसण्याचा दुःखद प्रसंग तिच्यावर येऊन कोसळला. शेवटीं गांधारीनें तिची सुटका केली. तिच्या सामर्थ्यानें परत मिळालेलें स्वातंत्र्य युधिष्ठिरानें पुनः द्यूतांत गमाविल्यानें पतीबरोबर ती महासाध्वी अरण्यांत जावयास निघाली असतां त्या हलकट दुःशासनानें तिला पुढीलप्रमाणें दारुण शब्द ऐकविले :—

**महाप्राज्ञः सौमकिर्यज्ञसेनः कन्यां पाञ्चालीं पाण्डवेभ्यः प्रदाय ।**
**अकर्षीद्वै सुकृतं नेह किञ्चित् क्लीबाः पार्थाः पतयो याज्ञसेन्याः ॥ १०**
**सूक्ष्मप्रावारानजिनोत्तरीयान् दृष्ट्वारण्ये निर्धनानप्रतिष्ठान् ।**
**कां त्वं प्रीतिं लप्स्यसे याज्ञसेनि पतिं वृणीष्वेह यमन्यमिच्छसि ॥ ११**
**एते हि सर्वे कुरवः समेताः क्षान्ता दान्ताः सुद्रविणोपपन्नाः ।**
**एषां वृणीष्वेकतमं पतित्वे न त्वां नयेत्कालविपर्ययोयम् ॥ १२**

—महाभारत, सभापर्व अध्याय ७७

" अत्यंत बुद्धिमान् द्रुपदानें आपली कन्या द्रौपदी पांडवांना देऊन कांहीं एक भलें केलें नाहीं. कारण द्रौपदीचे पति पांडव हे षंढ आहेत. वल्कलें धारण करून व अजिनें अंगावर घेऊन स्वतःचें राज्य गमावून वनांत जाणाऱ्या निर्धन पांडवांच्या मागोमाग जाऊन द्रौपदी, तुला काय मिळणार आहे ? यांना सोडून जो कोणी दुसरा पति तुला बरा वाटेल त्याला तूं स्वीकार. येथें जमलेले सर्व कौरव धनकनकसंपन्न व अत्यंत प्रेमळ आहेत. त्यापैकीं कोणालाही तूं पति म्हणून पत्कर. आपलें तारुण्य व्यर्थ कां घालवितेस? हे शब्द ऐकून द्रौपदीच्या हृदयाला कोणत्या वेदना व्हावयाच्या उरल्या असतील! महाभारतकार म्हणतातः—

**तथेत्युक्त्वा तु सा देवी स्रवन्नेत्रजलाविला ।**
**शोणिताक्तैकवसना मुक्तकेशी विनिर्ययौ ॥ ९**

—महाभारत, सभापर्व अध्याय ७९

" डोळयांतून अश्रुधारा गाळीत रजस्वला स्थितींत शोणितानें भरलेलें तेंच वस्त्र नेसून मुक्तकेशा अवस्थेंत द्रौपदी अरण्यांत गेली."

अरण्यांत तरी द्रौपदीला सन्मानानें काळ घालवितां आला काय ? कौरवांनीं केलेली विटंबना पांडवांनीं सहन केल्यापासून सर्वच दुष्टांना जणू कीं काय द्रौपदीची विटंबना करणें ही अगदीं सहज गोष्ट वाटत होती. ती आश्रमांत एकटी आहे असें पाहून धृतराष्ट्राचा जांवई सिंधुराज जयद्रथ यानें तिला पळवून नेण्याचा प्रयत्न केला. पांडवांनीं रणांत त्याला गांठून भीमसेनानें त्यास ठार मारण्याचा उपक्रम चालविला तो युधिष्ठिराच्या दयाबुद्धीनें पुन्हां त्या आक्रमकाला जीवदानच दिलें ! अज्ञातवासांत तर तिच्यावर याहीपेक्षां दुःखाचा प्रसंग आलेला आहे. एकवार सम्राज्ञी असतां राजा विराटाच्या राणीची दासी होण्याचा प्रसंग तिच्यावर आला. विराटाचा सेनापति कीचक तेथें सैरंध्रीच्या मागें लागला. द्रौपदीनें त्याला पुष्कळ सांगून पहाण्याचा प्रयत्न केला पण कोणत्या बलवंतांना दुर्बलांच्या तोंडीं असलेलीं नीतितत्त्वें पटलीं आहेत ? द्रौपदीनें राणी सुदेष्णेकडून संरक्षण मिळविण्याचा प्रयत्न केला. पण उन्मत्त कीचकानें सुदेष्णेलाच आपल्या कारस्थानांत ओढून सैरंध्रीला कोणत्या तरी निमित्तानें स्वतःकडे पाठवून देण्यास आज्ञेच्या स्वरूपाची विनंती केली. कीचक हा अत्यंत बलवान् असून त्याच्या भरंवशावरच विराटाच्या राज्याचें अस्तित्व अवलंबून असल्यामुळें सुदेष्णेला त्याचें म्हणणें अमान्य करणें केवळ अशक्य होतें. शेवटीं स्वतःसाठीं मद्य आणण्याच्या निमित्तानें सुदेष्णेनें द्रौपदीला कीचकाच्या महालांत जावयास सांगितलें. द्रौपदीनें तिला असें सांगितलें कीं, कीचक अत्यंत निर्लज्ज असून तो माझ्या अब्रूच्या मागें लागलेला आहे याची आपणांस पूर्णपणें कल्पना आहे. अशा स्थितींत आपण मला त्याच्याकडे जावयास सांगावें हें मोठें आश्चर्य आहे. मी आपल्याकडे राहण्यापूर्वींच कोणाचीही भलतीच सेवा मी कधींही करणार नाहीं असें मी आपणांस सांगितलें होतें व आपणही तें मान्य केलें होतें. अशा स्थितींत हें भलतेंच काम आपण मला काय म्हणून सांगतां? कीचक कामांध असून मूर्ख आहे. मला पाहिल्याबरोबर तो माझा अपमान करील. आपल्याकडे पुष्कळ दासी आहेत, कोणालाही आपण पाठवूं शकतां. पण मी तुला पाठविलें असल्यामुळें कीचक तुझ्या

वाटेस जाणार नाहीं असें तोंड भरून आश्वासन देऊन सुदेष्णेनें तिच्या हातीं मद्याचा सुवर्णचषक दिला व तिला जावयास भाग पाडलें. आपल्यावर आलेल्या या दुःखद प्रसंगाबद्दल स्वतःच्याच दैवालाच दोष देत द्रौपदी कीचकाच्या महालांत गेली. तिस पहातांच कामांध कीचकानें तिचें स्वागत करून व आपल्या ऐश्वर्याचें तिच्याजवळ वर्णन करून तिला वश करण्याचा प्रयत्न चालविला. द्रौपदीनें त्याला सांगितलें कीं, राणीनें मद्य आणण्यासाठीं मला तुझ्याकडे पाठविलें आहे. मला फक्त मद्य दे, मी जातें. 'मद्य न्यावयास इतर पुष्कळ दासी आहेत' असें सांगून द्रौपदीला तो तेथेंच बलात्कारानें ओढावयास लागला असतां त्याला ढकलून देऊन ती आश्रयार्थ राजसभेकडे आली: सभेंत कंकवेषानें राजे युधिष्ठिर आहेत, तेव्हां तेथें आपल्या संरक्षणाची व्यवस्था होईल अशी तिची कल्पना होती. एका क्षुद्र दासीनें आपल्याला झिडकारलेलें पाहून कीचकानें तिचा पाठलाग करावयास सुरुवात केली. त्या महासाध्वीची दुःशासनानें केलेली विटंबना जणूं कीं काय अपुरीच होती, अशा कल्पनेनें त्याहूनही दारुण अप्रतिष्ठेचें ताट दैवानें तिच्यापुढें वाढून ठेवलें. कीचकानें तिच्या मागोमाग धांवत जाऊन भर सभेंत राजा विराटासमक्ष तिचे केस धरून तिला ओढलें व खालीं पाडून लाथ मारली. त्या सभेंत बल्लववेषानें भीमसेनही उपस्थित होता. लाल नेत्र करून कीचकाचा वध करावा म्हणून तो समोरच्या झाडाकडे पाहूं लागला व आपण कदाचित ओळखले जाऊं या भयानें युधिष्ठिर आपल्या पायाचा आंगठा त्याच्या आंगठ्यावर दाबून त्याला सावध करीत म्हणाले "हे बल्लवा, त्या वृक्षाकडे काय पाहतोस? स्वयंपाकासाठीं तुला लांकडे हवीं असतील तर रानांतले वृक्ष तोड. राजसभेंतील वृक्ष या कार्यासाठीं नसतात." द्रौपदीच्या कानावर हीं अक्षरें पडतांच तिच्या सहनशीलतेची तार तुटली. लाल नेत्र करून क्रोधकटाक्षानें आपल्या पतींचें अंतःकरण जाळीत ती म्हणाली :

**येषां वैरी न स्वपिति षष्ठेऽपि विषये वसन् ।**
**तेषां मां भगिनीं भार्यां सूतपुत्रः पदाऽवधीत् ॥ २२**

ते दद्युर्न च याचेयुर्ब्रह्मण्याः सत्यवादिनः ।
तेषां मां मानिनीं भार्यां सूतपुत्रः पदाऽवधीत् ।। २३
येषां दुन्दुभिनिर्घोषो ज्याघोषः श्रूयतेऽनिशम् ।
तेषां मां मानिनीं भार्यां सूतपुत्रः पदाऽवधीत् ।। २४
ये च तेजस्विनो दान्ता बलवन्तोऽतिमानिनः ।
तेषां मां मानिनीं भार्यां सूतपुत्रः पदाऽवधीत् ।। २५
सर्वलोकमिमं हन्युर्धर्मपाशसितास्तु ये ।
तेषां मां मानिनीं भार्यां सूतपुत्रः पदाऽवधीत् ।। २६
शरणं ये प्रपन्नानां भवन्ति शरणार्थिनाम् ।
चरन्ति लोके प्रच्छन्नाः क्व नु तेऽद्य महारथाः ।। २७
कथं ते सूतपुत्रेण वध्यमानां प्रियां सतीम् ।
मर्षयन्ति यथा क्लीबा बलवन्तोऽमितौजसः ।। २८
क्व नु तेषाममर्षश्च वीर्यं तेजश्च वर्तते ।
न परीप्सन्ति ये भार्यां वध्यमानां दुरात्मना ।। २९
मयात्र शक्यं किं कर्तुं विराटे धर्मदूषके ।
यः पश्यन्मां मर्षयति वध्यमानामनागसम् ।। ३०
न राजा राजवत्किञ्चित् समाचरति कीचके ।
दस्यूनामिव धर्मस्ते न हि संसदि शोभते ।। ३१
नाहमेतेन युक्तं वै हन्तुं मत्स्य तवान्तिके ।
सभासदोऽत्र पश्यन्तु कीचकस्य व्यतिक्रमम् ।। ३२
कीचको न च धर्मज्ञो न च मत्स्यः कथंचन ।
सभासदोऽप्यधर्मज्ञा य एनं पर्युपासते ।। ३३

—महाभारत, विराटपर्व अध्याय १६

" ज्यांचा वैरी जगांत कुठेंही स्वस्थपणें झोप घेऊं शकत नाहीं, ज्या सत्यवादी ब्रह्मण्य वीरांनीं आजवर फक्त दान दिलें, मागितलें मात्र नाहीं, ज्यांच्या दुंदुभीचा निर्घोष व धनुष्याचा टणत्कार अखंड चालू असतो,' जे तेजस्वी, उदार, अत्यंत बलवान् व अत्यंत मानी आहेत व शरण आलेल्या लोकांना जे सदैव आश्रय देतात, त्यांच्या या मानिनी भार्येला अधम सूतपुत्रानें आज लाथ मारली आहे. आपल्या प्रिय व पतिव्रता पत्नीचा एका सूतपुत्रानें केलेला हा अपमान

ते बलवान् व तेजस्वी लोक षंढाप्रमाणें कसा सहन करतात? त्यांचा क्रोध, वीर्य व तेज आज कोठें गेलें? दुरात्म्यांकडून त्यांच्या पत्नीचा होत असलेला हा अपमान ते कसे सहन करीत आहेत? एका स्त्रीचा अपमान सहन करणारा विराटासारखा धर्मदूषक राजा सिंहासनावर असतां मला काय करतां येणें शक्य आहे? हा राजा लुटारूप्रमाणें आहे. राजानें जसें वागावयास हवें तसें हा कीचकाशीं वागूं शकत नाहीं. हा राजा म्हणून या सभेंत मुळींच शोभत नाहीं. मत्स्यराज पहात असतांना व हे सारे सभासद जिवंत असतांना माझा असा अपमान व्हावा याचा अर्थच असा आहे कीं, कीचक तर अधार्मिक आहेच; पण राजा विराट व त्याची सेवा करणारे हे सारे सभासदही अत्यंत अधार्मिक आहेत. तिचा तो विलाप ऐकून युधिष्ठिर तिला म्हणाले : हे सैरंध्री, तूं येथें न थांबतांच सुदेष्णेच्या महालांत जा, पतीचें अनुवर्तन करणाऱ्या वीरपत्नी नेहमींच असे क्लेश भोगतात, पण शेवटीं पतिलोक मिळवितात. तुझ्या पतींना क्रोध व्यक्त करावयास हा काळ योग्य नाहीं असें वाटत असलें पाहिजे. म्हणूनच सूर्यासारखे तेजस्वी गंधर्व या वेळीं धांवून येत नाहींत. तुला काळ वेळ कांहीं समजत नाहीं. उगाच येथें आक्रंदन करून राजसभेंत द्यूत खेळण्यांत निमग्न असलेल्या आम्हांला तूं व्यर्थ विघ्न करीत आहेस. योग्य काळीं गंधर्व तुझें प्रिय करतील व तुझ्या अपमानाचें उत्तर देतील." पण द्रौपदीच्या सहनशीलतेची तार या वेळीं पूर्णपणें तुटली होती. संतापानें नेत्र लाल करून ती मानिनी स्त्री इतकेंच म्हणाली कीं :—

**अतीव तेषां घृणिनामर्थेऽहं धर्मचारिणी ।**
**तस्य तस्यैव ते वध्या येषां ज्येष्ठोऽक्षिदेविता ।। ४५**

—महाभारत, विराटपर्व अध्याय १६

"दुर्दैवानें मी ज्यांची पत्नी झालें ते भलतेच दयाशील आहेत. ज्यांच्यांतील ज्येष्ठ सदैव द्यूतांत रममाण होतो त्यांनीं जगांत अपमान व विटंबना यावांचून दुसरें काय पदरांत पाडून घेणें शक्य आहे?" त्या दिवशीं द्रौपदीच्या सहनशीलतेचे बंध पूर्णपणें तुटले

होते. दिवसभर ती तळमळत होती. अज्ञातवासाचा काळ संपेपर्यंत आपली अब्रू सुरक्षित राहील असा विश्वास तिला वाटत नव्हता. स्वतःला लाथ मारणारा कीचक क्षणमात्रही जिवंत राहूं नये अशी तिची इच्छा होती. कोण हें आपलें काम करील याचा विचार करीत असतां भीमसेनाच्या सामर्थ्यसंपन्न मूर्तीवांचून दुसरें कोणीही आपलें काम करील असें तिला वाटेना. रात्रींच्या वेळीं ती भीमसेनाच्या भेटीस्तव महानसांत गेली. भीमाला हांक मारीत असतां तिचा संताप इतका अनावर झाला होता कीं, आयुष्यांत कधींही नाहीं असे शब्द तिनें भीमाला ऐकविले. ती म्हणाली :—

**उत्तिष्ठोत्तिष्ठ किं शेषे भीमसेन यथा मृतः ।**
**नामृतस्य हि पापीयान् भार्यामालभ्य जीवति ।। १५**

—महाभारत, विराटपर्व अध्याय १७

" हे भीमसेना, एखाद्या मृताप्रमाणें तुम्ही स्वस्थ कसे झोपलांत! उठा. मनुष्य मेल्यावांचून दुरात्मे लोक त्याच्या बायकोची अप्रतिष्ठा करून कधीं जिवंत राहूं शकत नाहींत." भीमसेनानें उठून तिचें सांत्वन केलें व तिच्या शोकाचें कारण विचारलें. त्या दिवशीं तिच्या अंतःकरणांतील सर्व शोक खळाळून बाहेर पडलेला आहे. विराटपर्वांतील हें प्रकरण वाचतांच कारुण्यमूर्ति याज्ञसेनीचें यथार्थ दर्शन झाल्यावांचून रहात नाहीं.

## कारुण्यमूर्ति

ती भीमसेनाला म्हणाली :—

**अशोच्यत्वं कुतस्तस्या यस्या भर्ता युधिष्ठिरः ।**
**जानन् सर्वाणि दुःखानि किं मां त्वं परिपृच्छसि ।। १**
**यन्मां दासीप्रवादेन प्रातिकामी तदानयत् ।**
**सभापरिषदो मध्ये तन्मां दहति भारत ।। २**
**पार्थिवस्य सुता नाम का नु जीवति मादृशी ।**
**अनुभूयेदृशं दुःखमन्यत्र द्रौपदीं प्रभो ।। ३**
**वनवासगतायाश्च सैन्धवेन दुरात्मना ।**
**परामर्शो द्वितीयो वै सोढुमुत्सहते तु का ।। ४**

मत्सराज्ञः समक्षं तु तस्य धूर्तस्य पश्यतः ।
कीचकेन परामृष्टा का नु जीवति मादृशी ॥ ५
एवं बहुविधैः क्लेशैः क्लिश्यमानां च भारत ।
न मां जानासि कौन्तेय किं फलं जीवितेन मे ॥ ६
योऽयं राज्ञो विराटस्य कीचको नाम भारत ।
सेनानीः पुरुषव्याघ्र श्यालः परमदुर्मतिः ॥ ७
स मां सैरन्ध्रिवेषेण वसन्तीं राजवेश्मनि ।
नित्यमेवाह दुष्टात्मा भार्या मम भवेति वै ॥ ८
तेनापमन्त्रमाणाया वधार्हेण सपत्नहन् ।
कालेनेव फलं पक्वं हृदयं मे विदीर्यते ॥ ९
भ्रातरं च विगर्हस्व ज्येष्ठं दुर्द्यूतदेविनम् ।
यस्याऽस्मि कर्मणा प्राप्ता दुःखमेतदनन्तकम् ॥ १०
को हि राज्यं परित्यज्य सर्वस्वं चात्मना सह ।
प्रव्रज्यायैव दीव्येत विना दुर्द्यूतदेविनम् ॥ ११
यदि निष्कसहस्रेण यच्चान्यत्सारवद्धनम् ।
सायंप्रातरदेविष्यदपि संवत्सरान् बहून् ॥ १२
रुक्मं हिरण्यं वासांसि यानं युग्ममजाविकम् ।
अश्वाश्वतरसंघांश्च न जातु क्षयमावहेत् ॥ १३
सोऽयं द्यूतप्रवादेन श्रियः प्रत्यवरोपितः ।
तूष्णीमास्ते यथा मूढः स्वानि कर्माणि चिन्तयन् ॥ १४
दशनागसहस्राणि हयानां हेममालिनाम् ।
यं यान्तमनुयान्तीह सोऽयं द्यूतेन जीवति ॥ १५
रथाः शतसहस्राणि नृपाणाममितौजसाम् ।
उपासन्त महाराजमिन्द्रप्रस्थे युधिष्ठिरम् ॥ १६
शतं दासीसहस्राणां यस्य नित्यं महानसे ।
पात्रीहस्तं दिवारात्रमतिथीन् भोजयत्युत ॥ १७
एष निष्कसहस्राणि प्रदाय ददतां वरः ।
द्यूतजेन ह्यनर्थेन महता समुपाश्रितः ॥ १८
एनं हि स्वरसम्पन्ना बहवः सूतमागधाः ॥
सायं प्रातरुपातिष्ठन् सुमृष्टमणिकुण्डलाः ॥ १९
सहस्रमृषयो यस्य नित्यमासन् सभासदः ।
तपः श्रुतोपसम्पन्नाः सर्वकामैरुपस्थिताः ॥ २०

अष्टाशीतिसहस्राणि स्नातका गृहमेधिनः ।
त्रिंशद्दासीक एकैको यान् बिभर्ति युधिष्ठिरः ॥ २१
अप्रतिग्राहिणां चैव यतीनामूर्ध्वरेतसाम् ।
दश चापि सहस्राणि सोऽयमास्ते नरेश्वरः ॥ २२
आनृशंस्यमनुक्रोशं संविभागस्तथैव च ।
यस्मिन्नेतानि सर्वाणि सोऽयमास्ते नरेश्वरः ॥ २३
अन्धान्वृद्धांस्तथाऽनाथान् बालान् राष्ट्रेषु दुर्गतान् ।
बिभर्ति विविधान् राजा धृतिमान् सत्यविक्रमः ॥
संविभागमना नित्यमानृशंस्याद्युधिष्ठिरः ॥ २४
स एष निरयं प्राप्तो मत्सस्य परिचारकः ।
सभायां देविता राज्ञः कङ्को ब्रूते युधिष्ठिरः ॥ २५
इन्द्रप्रस्थे निवसतः समये यस्य पार्थिवाः ।
आसन् बलिभृतः सर्वे सोऽद्यान्यैर्भूतिमिच्छति ॥ २६
पार्थिवाः पृथिवीपाला यस्यासन् वशवर्तिनः ।
स वशे विवशो राजा परेषामद्य वर्तते ॥ २७
प्रताप्य पृथिवीं सर्वां रश्मिमानिव तेजसा ।
सोऽयं राज्ञो विराटस्य सभास्तारो युधिष्ठिरः ॥ २८
यमुपासन्त राजानः सभायामृषिभिः सह ।
तमुपासीनमद्यान्यं पश्य पाण्डव पाण्डवम् ॥ २९
सदस्यं समुपासीनं परस्य प्रियवादिनम् ।
दृष्ट्वा युधिष्ठिरं कोपो वर्धते मामसंशयम् ॥ ३०
अतदर्हं महाप्राज्ञं जीवितार्थेऽभिसंस्थितम् ।
दृष्ट्वा कस्य न दुःखं स्याद् धर्मात्मानं युधिष्ठिरम् ॥ ३१
उपास्ते स्म सभायां यं कृत्स्ना वीर वसुन्धरा ।
तमुपासीनमप्यन्यं पश्य भारत भारतम् ॥ ३२
एवं बहुविधैर्दुःखैः पीड्यमानामनाथवत् ।
शोकसागरमध्यस्थां किं मां भीम न पश्यसि ॥ ३३

—महाभारत, विराटपर्व अध्याय १८

इदं तु ते महद्दुःखं यत्प्रवक्ष्यामि भारत ।
न मेऽभ्यसूया कर्तव्या दुःखादेतद् ब्रवीम्यहम् ॥ १
सूदकर्मणि हीने त्वमसमे भरतर्षभ ।
ब्रुवन् बल्लवजातीयः कस्य शोकं न वर्धयेः ॥ २

सूपकारं विराटस्य बल्लवं त्वां विदुर्जनाः ॥
प्रेष्यत्वं समनुप्राप्तं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३
यदा महानसे सिद्धे विराटमुपतिष्ठसि।
ब्रुवाणो बल्लवः सूदस्तदा सीदति मे मनः ॥ ४
यदा प्रहृष्टः सम्राट् त्वां संयोधयति कुञ्जरैः।
हसन्त्यन्तःपुरे नार्यो मम तूद्विजते मनः ॥ ५
शार्दूलैर्महिषैः सिंहैरागारे योध्यसे यदा।
कैकेय्याः प्रेक्षमाणायास्तदा मे कश्मलं भवेत् ॥ ६
तत उत्थाय कैकेयी सर्वास्ताः प्रत्यभाषत।
प्रेष्याः समुत्थिताश्चापि कैकेयीं ताः स्त्रियोऽब्रुवन् ॥ ७
प्रेक्ष्य मामनवद्याङ्गीं कश्मलोपहतामिव।
स्नेहात्संवासजाद् धर्मात्सूदमेषा शुचिस्मिता ॥ ८
योध्यमानं महावीर्यमियं समनुशोचति।
कल्याणरूपा सैरन्ध्री बल्लवश्चापि सुन्दरः ॥ ९
स्त्रीणां चित्तं च दुर्ज्ञेयं युक्तरूपौ च मे मतौ।
सैरन्ध्री प्रियसंवासान्नित्यं करुणवादिनी ॥ १०
अस्मिन् राजकुले चेमौ तुल्यकालनिवासिनौ।
इति ब्रुवाणा वाक्यानि सा मां नित्यमतर्जयत् ॥ ११
क्रुध्यन्तीं मां च संप्रेक्ष्य समशङ्कन्त मां त्वयि।
तस्यां तथा ब्रुवत्यां तु दुःखं मां महदाविशत् ॥ १२
त्वय्येवं निरयं प्राप्ते भीमे भीमपराक्रमे।
शोके यौधिष्ठिरे मग्ना नाहं जीवितुमुत्सहे ॥ १३
यः सदेवान् मनुष्यांश्च सर्वांश्चैकरथोऽजयत्।
सोऽयं राज्ञो विराटस्य कन्यानां नर्तको युवा ॥ १४
योऽतर्पयदमेयात्मा खाण्डवे जातवेदसम्।
सोन्तःपुरगतः पार्थ कूपेऽग्निरिव संवृतः ॥ १५
यस्माद् भयममित्राणां सदैव पुरुषर्षभात्।
स लोकपरिभूतेन वेषेणास्ते धनञ्जयः ॥ १६
यस्य ज्याक्षेपकठिनौ बाहू परिघसन्निभौ।
स शङ्खपरिपूर्णाभ्यां शोचन्नास्ते धनञ्जयः ॥ १७
यस्य ज्यातलनिर्घोषात्समकम्पन्त शत्रवः।
स्त्रियो गीतस्वनं तस्य मुदिताः पर्युपासते ॥ १८

किरीटं सूर्यसङ्काशं यस्य मूर्धन्यशोभत ।
वेणी विकृतकेशान्तः सोऽयमद्य धनञ्जयः ॥ १९
तं वेणीकृतकेशान्तं भीमधन्वानमर्जुनम् ।
कन्यापरिवृतं दृष्ट्वा भीम सीदति मे मनः ॥ २०
यस्मिन्नस्त्राणि दिव्यानि समस्तानि महात्मनि ।
आधारः सर्वविद्यानां स धारयति कुण्डले ॥ २१
स्प्रष्टुं राजसहस्राणि तेजसाऽप्रतिमानि वै ।
समरे नाभ्यवर्तन्त वेलामिव महार्णवः ॥ २२
सोऽयं राज्ञो विराटस्य कन्यानां नर्तको युवा ।
आस्ते वेशप्रतिच्छन्नः कन्यानां परिचारकः ॥ २३
यस्य स्म रथघोषेण समकम्पन्त मेदिनी ।
स पर्वतवना भीम सहस्थावरजङ्गमा ॥ २४
यस्मिन् जाते महाभागे कुन्त्याः शोको व्यनश्यत ।
स शोचयति मामद्य भीमसेन तवानुजः ॥ २५
भूषितं तमलङ्कारैः कुण्डलैः परिहाटकैः ।
कम्बुपाणिनमायान्तं दृष्ट्वा सीदति मे मनः ॥ २६
यस्य नास्ति समो वीर्ये कश्चिदुर्व्यां धनुर्धरः ।
सोऽद्य कन्यापरिवृतो गायन्नास्ते धनञ्जयः ॥ २७
धर्मे शौर्ये च सत्ये च जीवलोकस्य संमतम् ।
स्त्रीवेषविकृतं पार्थं दृष्ट्वा सीदति मे मनः ॥२८
यदा ह्येनं परिवृतं कन्याभिर्देवरूपिणम् ।
प्रभिन्नमिव मातङ्गं परिकीर्णं करेणुभिः ॥ २९
मत्स्यमर्थपतिं पार्थं विराटं समुपस्थितम् ।
पश्यामि तुर्यमध्यस्थं दिशो नश्यन्ति मे तदा ॥ ३०
नूनमार्या न जानाति कृच्छ्रं प्राप्तं धनञ्जयम् ।
अजातशत्रुं कौरव्यं मग्नं दुर्द्यूतदेविनम् ॥ ३१
तथा दृष्ट्वा यवीयांसं सहदेवं गवां पतिम् ।
गोषु गोवेषमायान्तं पाण्डुभूताऽस्मि भारत ॥ ३२
सहदेवस्य वृत्तानि चिन्तयन्ती पुनः पुनः ।
न निद्रामभिगच्छामि भीमसेन कुतो रतिम् ॥ ३३
न विन्दामि महाबाहो सहदेवस्य दुष्कृतम् ।
यस्मिन्नेवंविधं दुःखं प्राप्नुयात् सत्यविक्रमः ॥ ३४

ब्रूयामि भरतश्रेष्ठ दृष्ट्वा ते भ्रातरं प्रियम् ।
गोषु गोवृषसंकाशं मत्स्येनाभिनिवेशितम् ।। ३५
संरब्धं रक्तनेपथ्यं गोपालानां पुरोगमम् ।
विराटमभिनन्दन्तमथ मे भवति ज्वरः ।। ३६
सहदेवं हि मे वीरं नित्यमार्या प्रशंसति ।
महाभिजनसम्पन्नः शीलवान् वृत्तवानिति ।। ३७
ह्रीनिषेवो मधुरवाक् धार्मिकश्च प्रियश्च मे ।
स तेऽरण्येषु वोढव्यो याज्ञसेनि क्षपास्वपि ।। ३८
सुकुमारश्च शूरश्च राजानं चाप्यनुव्रतः ।
ज्येष्ठापचायिनं वीरं स्वयं पाञ्चालि भोजयेः ।। ३९
इत्युवाच हि मां कुन्ती रुदती पुत्रगृद्धिनी ।
प्रव्रजन्तं महारण्यं तं परिष्वज्य तिष्ठति ।। ४०
तं दृष्ट्वा व्यापृतं गोषु वत्सचर्मक्षपाशयम् ।
सहदेवं युधां श्रेष्ठं किं नु जीवामि पाण्डव ।। ४१
यस्त्रिभिर्नित्यसम्पन्नो रूपणास्त्रेण मेधया ।
सोऽश्वबन्धो विराटस्य पश्य कालस्य पर्ययम् ।। ४२
अभ्यकीर्यन्त वृन्दानि दामग्रंथिमुदीक्ष्य तम् ।
विनयन्तं जवेनाश्वान् महाराजस्य पश्यतः ।। ४३
अपश्यमेनं श्रीमन्तं मत्स्यं भ्राजिष्णुमुत्तमम् ।
विराटमुपतिष्ठन्तं दर्शयन्तं च वाजिनः ।। ४४
किं नु मां मन्यसे पार्थ सुखिनीति परंतप ।
एवं दुःखशताविष्टा युधिष्ठिरनिमित्ततः ।। ४५
अतः प्रतिविशिष्टानि दुःखान्यनानि भारत ।
वर्तन्ते मयि कौन्तेय वक्ष्यामि शृणु तान्यापि ।। ४६
युष्मासु ध्रियमाणेषु दुःखानि विविधान्युत ।
शोषयन्ति शरीरं मे किं नु दुःखमतःपरम् ।। ४७

—महाभारत, विराटपर्व अध्याय १९

अहं सैरन्ध्रिवेषेण चरन्ती राजवेश्मनि ।
शौचदाऽस्मि सुदेष्णाया अक्षधूर्तस्य कारणात् ।। १
विक्रियां पश्य मे तीव्रां राजपुत्र्याः परंतप ।
आत्मकालमुदीक्षन्ती सर्वं दुःखं किलान्तवत् ।। २
अनित्या किल मर्त्यानामर्थसिद्धिर्जयाजयौ ।
इति कृत्वा प्रतीक्षामि भर्तॄणामुदयं पुनः ।। ३

चक्रवत्परिवर्तन्ते ह्यर्थाश्च व्यसनानि च ।
इति कृत्वा प्रतीक्षामि भर्तॄणामुदयं पुनः ।। ४
य एव हेतुर्भवति पुरुषस्य जयावहः ।
पराजये च हेतुश्च स इति प्रतिपालये ।।
किं मां न प्रतिजानीषे भीमसेन मृतामिव ।। ५
दत्वा याचन्ति पुरुषा हत्वा वध्यन्ति चापरे ।
पातयित्वा च पात्यन्ते परैरिति च मे श्रुतम् ।। ६
न दैवस्यातिभारोस्ति न चैवास्यातिवर्तनम् ।
इति चाप्यागमं भूयो दैवस्य प्रतिपालये ।। ७
स्थितं पूर्वं जलं यत्र पुनस्तत्रैव गच्छति ।
इति पर्यायमिच्छन्ती प्रतीक्षे उदयं पुनः ।। ८
दैवेन किल यस्यार्थः सुनीतोऽपि विपद्यते ।
दैवस्य चागमे यत्नस्तेन कार्यो विजानता ।। ९
यत्तु मे वचनस्यास्य कथितस्य प्रयोजनम् ।
पृच्छ मां दुःखितां तत्त्वं पृष्टा चात्र ब्रवीमि ते ।। १०
महिषी पाण्डुपुत्राणां दुहिता द्रुपदस्य च ।
इमामवस्थां संप्राप्ता मदन्या का जिजीविषेत् ।। ११
कुरून् परिभवेत् सर्वान् पाञ्चालानपि भारत ।
पाण्डवेयांश्च संप्राप्तो मम क्लेशो ह्यरिंदम ।। १२
भ्रातृभिः श्वशुरैः पुत्रैः बहुभिः परिवारिता ।
एवं समुदिता नारी का त्वन्या दुःखिता भवेत् ।। १३
नूनं हि बालया धातुर्मया वै विप्रियं कृतम् ।
यस्य प्रसादाद् दुर्नीतं प्राप्तास्मि भरतर्षभ ।। १४
वर्णावकाशमपि मे पश्य पाण्डव यादृशम् ।
तादृशो मे न तत्रासीत् दुःखे परमके तदा ।। १५
त्वमेव भीम जानीषे यन्मे पार्थ सुखं पुरा ।
साऽहं दासीत्वमापन्ना न शान्तिमवशा लभे ।। १६
नादैविकमहं मन्ये यत्र पार्थो धनञ्जयः ।
भीमधन्वा महाबाहुरास्ते छन्न इवानलः ।। १७
अशक्या वेदितुं पार्थ प्राणिनां वै गतिर्नरैः ।
विनिपातमिमं मन्ये युष्माकं ह्यविचिन्तितम् ।। १८
यस्या मम मुखप्रेक्षा यूयमिन्द्रसमाः सदा ।
सा प्रेक्षे मुखमन्यासामवराणां वरा सती ।। १९

पश्य पाण्डव मेऽवस्थां यथा नार्हामि वै तथा।
युष्मासु ध्रियमाणेषु पश्य कालस्य पर्ययम् ।। २०
यस्य सागरपर्यन्ता पृथिवी वशवर्तिनी।
आसीत्साऽद्य सुदेष्णाया भीताऽहं वशवर्तिनी ।। २१
यस्याः पुरःसरा आसन् पृष्ठतश्चानुगामिनः।
साहमद्य सुदेष्णायाः पुरःपश्चाच्च गामिनी ।। २२
इदं तु दुःखं कौन्तेय ममासह्यं निबोध तत्।
या न जातु स्वयं पिंष गात्रोद्वर्तनमात्मनः।
अन्यत्र कुन्त्या भद्रं ते सा पिनष्म्यद्य चन्दनम् ।। २३
पश्य कौन्तेय पाणी मे नैवाभूतां हि यौ पुरा।
इत्यस्य दर्शयामास किणवन्तौ करावुभौ ।। २४
बिभेमि कुन्त्या या नाहं युष्माकं वा कदाचन।
साऽद्याग्रतो विराटस्य भीता तिष्ठामि किङ्करी ।। २५
किं नु वक्ष्यति सम्राण्मां वर्णकः सुकृतो न वा।
नान्यपिष्टं हि मत्स्यस्य चन्दनं किल रोचते ।। २६

वैशंपायन उवाच।

सा कीर्तयन्ती दुःखानि भीमसेनस्य भामिनी।
रुरोद शनकैः कृष्णा भीमसेनमुदीक्षती ।। २७
सा बाष्पकलया वाचा निःश्वसन्ती पुनः पुनः।
हृदयं भीमसेनस्य घट्टयन्तीदमब्रवीत् ।। २८
नाल्पं कृतं मया भीम देवानां किल्बिषं पुरा।
अभाग्या यत्र जीवामि कर्तव्ये सति पाण्डव ।। २९
ततस्तस्याः करौ सूक्ष्मौ किणबद्धौ वृकोदरः।
मुखमानीय वै पत्न्या रुरोद परवीरहा ।। ३०
तौ गृहीत्वा च कौन्तेयो बाष्पमुत्सृज्य वीर्यवान्।
ततः परमदुःखार्त इदं वचनमब्रवीत् ।। ३१

—महाभारत, विराटपर्व अध्याय २०

" तुम्ही सर्व कांहीं गोष्टी जाणत असून मी दुःख कां करतें असें मला विचारतां हें मोठें आश्चर्य आहे. मी हंसावें असें पांडवांनीं माझ्यासाठीं काय केलें आहे? जिला युधिष्ठिर पति म्हणून मिळाला त्या दुर्दैवी स्त्रीच्या भाग्यांत 'रडण्यावांचून दुसरें काय असूं शकेल? प्रातिकामी सूत सर्व सभेमध्यें 'दासी' म्हणून मला म्हणाला. ती

गोष्ट अजूनही माझें हृदय जाळीत आहे. इतकें भयानक दुःख भोगून माझ्यासारखी कोणती राजकन्या जिवंत राहणें शक्य आहे? एक द्रौपदीच अशी दुर्दैवी स्त्री आहे कीं, जिच्यावर इतकें भयानक दुःखाचे प्रसंग ओढवून देखील ती जिवंत आहे. दुःखाचा एक प्रसंग माझ्यावर आला आहे काय? मी वनांत होते तर दुरात्म्या सैंधव जयद्रथानें माझ्यावर बलात्कार करण्याचा प्रसंग आणला. तो तुमचा धूर्त ज्येष्ठ बंधु युधिष्ठिर पहात असतां विराटाच्या समक्ष कीचकानें माझा अपमान केला. या स्थितींत माझ्याशिवाय दुसरें कोण जिवंत राहील? एकाहून एक भयानक दुःखें मी भोगीत असतां माझ्या पतींना त्याची जाणीवही नाहीं! मग मी जिवंत राहण्याचा उपयोग तरी काय? विराट् राजाचा सेनापति असलेला त्याचा दुर्बुद्धि शालक कीचक मी या सैरंध्री वेषांत येथें रहात असतां रोज मला स्वतःची भार्या हो म्हणून म्हणतो. तो सर्वस्वीं वध्य आहे. शत्रूला ठार मारण्याइतके तुम्ही पराक्रमी आहांत. तरीही मला हे शब्द रोज ऐकावे लागतात. माझें हृदय कां विदीर्ण होऊं नये. ज्याच्या कर्मानें हे अनंत व अपार दुःख भोगण्याचा प्रसंग माझ्यावर आलेला आहे त्या आपल्या द्यूतासक्त ज्येष्ठ भावाला माझ्या दुःखाचें कारण विचारा व त्याची निर्भर्त्सना करा. त्याच्यासारख्या अट्टल जुगाऱ्यावांचून दुसरें कोण स्वतःसुद्धां राज्य गमावून व्यर्थ वनवासाचें जीवन पत्करील? रोज सकाळ संध्याकाळ वर्षानुवर्षें तो संपत्ति लावून द्यूत खेळत बसला असता तरीदेखील संपूं नये इतकी संपत्ति आपल्याजवळ होती. तो हा सर्वस्व द्यूतांत गमावून बसला व तरीही आपल्याच कर्मांत चूर राहून स्वस्थ बसलेला आहे याला काय म्हणावें? गळ्यांत सुवर्णाच्या माळा घातलेले दहा हजार हत्ती व घोडे ज्याच्या पाठोपाठ चालावे, लक्षावधि रथ सज्ज करून त्यावर अधिरूढ झालेल्या शेंकडो राजांनीं इंद्रप्रस्थांत ज्या सम्राटाची सेवा करावी, हातांत भरलेलीं अन्नाचीं ताटें घेऊन सहस्रावधि अतिथींना ज्याच्या पाकशाळेंत दिवस व रात्र भोजन घालीत, स्वरसंपन्न व कानांत रत्नांचीं कुंडलें घातलेले स्तुति पाठक सकाळीं व संध्याकाळीं ज्याची उपासना करीत, तप व विद्या

यांनीं संपन्न असलेले सहस्रावधि ऋषि, ज्याचे सभासद होऊन सर्व इच्छा परिपूर्ण झाल्यामुळें नेहमीं तृप्त राहत, ऐशी हजार स्नातक व सहस्रावधि यति ज्याच्या आश्रयानें राहात, दया, औदार्य व न्यायसिद्ध वर्तन हा ज्याचा स्वभाव होता, जो धैर्यशाली व सत्य पराक्रमी अंध, वृद्ध, अनाथ, बाल, व संकटांत सांपडलेले लोक यांचें सदैव संरक्षण करी, तो सम्राट युधिष्ठिर मत्स्यराज्याचा परिचारक बनून द्यूतावर उपजीविका करीत त्याच्या सभेंतील श्रेष्ठ द्यूतकार म्हणून कंक या नांवानें या दुर्गतीच्या नरकांत पिचत पडला आहे. मोठमोठे राजे इंद्रप्रस्थांत नजराणे समर्पण करून ज्याच्याकडून संरक्षण अपेक्षीत तो दुसऱ्याकडून उपजीवन मागतो आहे ! पृथ्वीवरील सर्व राजे ज्याच्या स्वाधीन असावे तो विवश स्थितींत दुसऱ्याच्या स्वाधीन झालेला आहे ! सूर्याच्या किरणज्वालांप्रमाणें ज्याचा प्रभाव जगावर पसरला होता, तो विराटाचा सभास्तार बनला आहे ! विराटाला बरें वाटेल तसें तो बोलतो व वागतो. युधिष्ठिरांना पाहून माझा संताप व शोक अनावर होतो. धर्मात्मा युधिष्ठिराला जीवनासाठीं ही लाचारी पत्करावी लागावी काय ? स्पष्ट बोलतें याबद्दल क्षमा करा. रागावूं नका. हृदयाला पीळ पडतो म्हणूनच मी हें बोलतें. स्वयंपाक्याच्या हीन कामांत तुमच्यासारख्या महाप्रतापी पुरुषाला गढलेले पाहून कोणाला दुःख होणार नाहीं ? राजा विराटाचा स्वयंपाकी म्हणून लोक तुम्हांला ओळखतात यापेक्षां अधिक दुःखाचें मला कांहीं असूं शकेल का ? स्वतःला बल्लव म्हणून स्वयंपाक सिद्ध करून तुम्ही राजा विराटासमोर उभे होतां तेव्हां माझें अंतःकरण करपून जातें. तुम्ही बलवान् आहांत म्हणून आनंदानें राजा मदोन्मत्त हत्तीशीं जेव्हां आपणांस झुंज घ्यावयास लावतो तेव्हां अंतःपुरांतील स्त्रिया हंसतात पण मला अत्यंत दुःख होतें. तें पुरें पडत नाहीं म्हणूनच कीं काय माजलेले रेडे, वाघ व सिंह यांच्याशीं राणीसमोर जेव्हां तुमची झुंज लावण्यांत येते, तेव्हां शोकानें मला मूर्च्छा येते. तेव्हां राणी व तिच्या दासी आपणांस काय म्हणतात माहीत आहे? त्या म्हणतात, सहवासानें या सैरंध्रीचें या स्वयंपाक्यावर काय प्रेम बसलें आहे

पहा. सैरंध्री सुंदर आहे व बल्लवही सुंदर आहे. जोडा चांगला दिसतो. स्त्रियांचें चित्त ओळखावयास कठिण असतें. दोघेही बरोबरच येथें रहावयास आले. तेव्हां काय आहे कुणास ठाऊक? हें ऐकतांच मी संतापतें. तों त्या मला अधिकच चिडवितात. ज्या स्थितींत पत्नीला आपल्या पतीला आपला पति म्हणतां येत नाहीं ती ही स्थिति नरकापेक्षांही अधिक भीषण नाहीं काय? तुमच्यासारखा भीमपराक्रमी पुरुष युधिष्ठिरामुळेंच या दुर्गतीच्या नरकांत पिचत पडला आहेना ? हें सर्व दुःख पहात असतां मला क्षणभरही जिवंत रहाण्याची इच्छा होत नाहीं. ज्यानें एका रथानें देव व मनुष्यांना जिंकलें, तो पराक्रमी पार्थ विराटाच्या कन्यांना नृत्य शिकविणारा नर्तक बनला आहे, ज्यानें खांडव वन समर्पून अग्नीला प्रसन्न केलें तो खड्डयांत अग्नि पडावा त्याप्रमाणें अंतःपुरांत पडला आहे. जो शत्रूंना सदैव थरकांपवीत असे तो षंढ म्हणून ओळखला जातो. धनुष्याच्या दोरीचे घट्टे ज्याच्या हाताला शोभवीत, त्यानें हातांत शंखाच्या बांगडया भरल्या आहेत! ज्याच्या धनुष्याच्या टणत्कारानें शत्रू थरकांपत तो गाण्यानें स्त्रियांना रिझवीत आहे! सूर्याप्रमाणें तेजस्वी किरीट ज्याच्या मस्तकावर शोभत असे त्यानें पाठीवर वेणी सोडली आहे. भयंकर धनुष्य हातांत धारण करणारा अर्जुन वेणी घालून मुलींच्या घोळक्यांत उभा असलेला पाहिला कीं माझें अंतःकरण विदीर्ण होऊन जातें. सर्व दिव्यास्त्रें व विद्या यांचा जो आधार, समरांत ज्याच्या तेजाला राजे स्पर्शही करूं शकत नसत, ज्याच्या रथघोषानें पृथ्वी थरकांपावी, जो जन्मल्याबरोबर आर्या कुंतीचा सर्व शोक गेला, ज्याच्यासारखा पराक्रमी धनुर्धर जगांत कोणी नाहीं, त्या अर्जुनाला षंढाप्रमाणें स्त्रियांचे दागदागिने अंगावर घालून मुलींच्या घोळक्यांत वाद्यें वाजत असतां, विराटासमोर उपस्थित झालेले पाहून माझ्या डोळयापुढें अंधेरी येते. युधिष्ठिराच्या द्यूतप्रियतेमुळें पराक्रमी पार्थाची काय अवस्था झाली आहे याची आर्या कुंतीला कल्पनाही नसेल! व गोपरूपानें सहदेवाला येतांना पाहिलें कीं मी पांढरी फटक पडते. मला झोप मुळींच येत नाहीं. मग आनंद कुठला?

सहदेवानें असें काय पाप केलें कीं त्याला हें दुःख भोगावें लागावें! कुंतीनें त्याचा संभाळ मला करावयास सांगितला. त्याची ही काय दशा झाली आहे? सौंदर्यसंपन्न व अस्त्र आणि बुद्धि यांनीं युक्त नकुल विराटाचे घोडे संभाळीत आहेत. हातांत अश्वबंधनें घेऊन तो विराटाची सेवा करतो. युधिष्ठिरामुळें हें पहाण्याचा प्रसंग माझ्यावर आलेला आहे. तुमची ही दुर्गति महातांना माझी काय अवस्था होत असेल! युधिष्ठिराच्या द्यूताच्या कैफानें मला अंतः-पुरांत सैरंध्रीच्या वेषानें विराटाची सेवा करावयास लाविलें आहे. लाभ, जय व पराजय हे अनित्य असतात. संकटें व लाभ पुन्हां पुन्हां येतात व जातात. या तत्त्वज्ञानाकडे लक्ष देऊन व एकदां एका ठिकाणीं असलेलें पाणी पुन्हां तेथें येईल अशा कल्पनेनें पुन्हां तुमचा उदय होईल असा विश्वास बाळगून मी माझें दुःख सहन करीत आहें. द्रुपदाची कन्या व पांडवांची राणी होण्याचें भाग्य जिला लाभलें ती मी या अवस्थेंत कशी जिवंत राहूं? मला असे क्लेश भोगावे लागावेत यांत पांचाल व पांडव, इतकेंच नव्हे तर साऱ्या कौरव कुळाचाच पराभव आहे. समर्थ भ्राते, श्वशुर व पुत्र असतां इतकें दुःख भोगणारी दुसरी कोणी स्त्री असेल काय? मी लहानपणींच परमेश्वराचा घोर अपराध केला असला पाहिजे. त्याशिवाय मला इतकें घोर दुःख कां भोगावें लागावें? आपण माझा वर्ण पाहिलात काय? पूर्वीं तो कधीं असा होता का? दुःखानें पहा माझी काय अवस्था करून टाकली आहे! पूर्वीं मी कोणतें ऐश्वर्य भोगलें हें आपणांस माहीत आहे. त्या मला दासी व्हावें लागल्यावर शांति कशी लाभावी? इंद्रासारखे पराक्रमी तुम्ही माझ्या प्रसन्नतेसाठीं पूर्वीं माझ्याकडे पहात होता. ती मी श्रेष्ठ स्त्री असतांना माझ्या-पेक्षां हीन लोकांकडे आज मला त्यांची कृपा व्हावी म्हणून पहावें लागतें. या समुद्रवलयांकित पृथ्वीची मी एकवार सम्राज्ञी होते. आज मी सुदेष्णेच्या अधीन होऊन मी तिला भितें. पूर्वीं माझ्या पाठीमागें दासी धांवत. आज मी सुदेष्णेच्या पाठीमागें 'दासी' म्हणून धांवते. हे कौन्तेया, स्वतःसाठीं मी कधीं पूर्वीं देखील चंदन उगाळलें नाहीं. केवळ आर्या कुंतीसाठींच मी चंदन उगाळलें.

त्या मला सुदेष्णेसारख्या क्षुद्र स्त्रीसाठीं चंदन उगाळावें लागतें. माझ्या हाताला पडलेले हे घट्टे पाहिलेत काय ? पूर्वीं कधीं माझ्या हाताला असे घट्टे पडल्याचें पाहिलें होतें काय ? असें म्हणून द्रौपदीनें आपले तळहात भीमाला दाखविले. ती म्हणाली पूर्वीं मी तुम्हांला व कुंतीलाही भिण्याचा कधीं प्रसंग आला नाहीं, त्या मला दासी म्हणून राजा विराटाला भ्यावें लागतें. माझें चंदन सम्राटाला आवडेल काय म्हणून मी भिते. या विराटाला म्हणे माझ्याच हातचें चंदन आवडतें. असें म्हणून भीमसेनाच्या हृदयावर आपली मान टेकून द्रौपदी रडूं लागली. निश्वास टाकीत ती म्हणाली, मी परमेश्वराचा मोठाच अपराध केला आहे, ज्या स्थितींत मी मरावें त्या स्थितींत मी जगतें हें केवढें दुर्दैव ! भीमानें तिचे ते दोन्ही हात आपल्या तोंडाजवळ नेले व त्यांच्यावरील घट्टे पाहून तो रडूं लागला. तिचें दुःख पाहून भीमासारख्या पुरुषाच्या नेत्रांतूनही अश्रुधारा वाहूं लागल्या. युधिष्ठिराच्या धर्मकार्पण्यामुळें केवढ्या मोठ्या जीवनाचें हें भीषण बलिदान घडविलें आहे !

## अग्नीची तेजस्वी ज्वाला

द्रौपदीच्या उत्पत्ति कथेंत यज्ञाग्नीच्या वेदींतून ती उत्पन्न झाल्याचें वर्णन आपण मागें पाहिलेंच आहे. अग्नीच्या ज्वालेप्रमाणेंच ती अत्यंत प्रखर आहे. ती खरी तेजस्विनी व मानधन क्षत्राणी आहे. तिच्या वर दिलेल्या विलापावरून युधिष्ठिरांच्या धर्मकार्पण्यामुळेंच इतक्या भयानक आपत्ति ओढवल्याची तिला खात्री पटली आहे व म्हणूनच प्रसंगीं ती कठोर शब्द बोलते. ती इतकी मानधन आहे कीं दुसऱ्याचें कृपादान स्वीकारणें तिला पूर्णपणें असंमत आहे. गांधारीच्या मध्यस्थीनें तिची सुटका झाल्यावर राजा धृतराष्ट्र तिला वर माग म्हणून म्हणूं लागला. त्यावेळीं तिनें त्याला असें सांगितलें कीं:—

**ददासि चेद्वरं मह्यं वृणोमि भरतर्षभ ।**
**सर्वधर्मानुगः श्रीमानदासोस्तु युधिष्ठिरः ॥ २८**
**मनस्विनमजानन्तो मैवं ब्रूयुः कुमारकाः ।**
**एष वै दासपुत्रो हि प्रतिविन्ध्यं ममात्मजम् ॥ २९**

**राजपुत्रः पुरा भूत्वा यथा नान्यः पुमान्क्वचित् ।**
**राजभिर्लालितस्यास्य न युक्ता दासपुत्रता ।। ३०**

**—महाभारत, सभापर्व अध्याय ७२**

"आपल्याला मला वर द्यावयाचाच असेल तर युधिष्ठिर स्वतंत्र व्हावेत व ते दास असूं नयेत येवढाच वर मला द्या. माझा मुलगा जो प्रतिविंध्य त्याला लोकांनीं दासपुत्र म्हणूं नये अशी माझी इच्छा आहे. राजपुत्र म्हणून मोठमोठ्या राजांनीं सम्राट युधिष्ठिराच्या या पुत्राचें एकवार कोडकौतुक केलें असतां त्याला दासपुत्र असें विशेषण कोणी लावावयाला नको." धृतराष्ट्र तिला दुसरा वर माग म्हणूं लागला तेव्हां तिनें शस्त्रास्त्रांसहित भीमसेन, अर्जुन, नकुल व सहदेव यांचें स्वातंत्र्य मागितलें. धृतराष्ट्र तिला तिसरा वर माग म्हणाला : तेव्हां ती म्हणाली:—

**लोभो धर्मस्य नाशाय भगवन्नाहमुत्सहे ।**
**अनर्हा वरमादातुं तृतीयं राजसत्तम ।। ३४**
**एकमाहुर्वैश्यवरं द्वौ तु क्षत्रस्त्रियो वरौ ।**
**त्रयस्तु राज्ञो राजेन्द्र ब्राह्मणस्य शतं वराः ।। ३५**
**पापीयांस इमे भूत्वा संतीर्णाः पतयो मम ।**
**वेत्स्यन्ति चैव भद्राणि राजन्पुण्येन कर्मणा ।। ३६**

**—महाभारत, सभापर्व अध्याय ७१**

"लोभ धर्माचा नाश करतो. मला तिसरा वर नको. वैश्याला एक, क्षत्रिय स्त्रीला दोन, राजाला तीन व ब्राह्मणाला अनेक वर मागण्याचाचा अधिकार आहे. दुर्गतींतून माझे पति पार होऊन स्वतंत्र झाले म्हणजे स्वतःच्या भरंवशावर ते आपलें गेलेलें वैभव परत मिळवितील."

वनवासांत असतां द्रौपदीनें युधिष्ठिरांना वारंवार क्षत्रियांच्या कर्तव्याचा उपदेश केलेला आहे. क्षत्रियधर्माचें तिला सम्यक् ज्ञान असून आपल्या क्षमाशील पतींचें तेज वाढविण्याचें तिचें कर्तव्य तिनें योग्य रीतीनें पार पाडलें. अपमान सहन करणारी युधिष्ठिराची थंड प्रवृत्ति त्या मानिनीला कधींच आवडली नाहीं. ती युधिष्ठिरांना वनांत म्हणतेः—

नूनं च तव वै नास्ति मन्युर्भरतसत्तम ।
यत्ते भ्रातॄंश्च मां चैव दृष्ट्वा न व्यथते मनः ।। ३६
न निर्मन्युः क्षत्रियोस्ति लोके निर्वचनं स्मृतम् ।
तदद्य त्वयि पश्यामि क्षत्रिये विपरीतवत् ।। ३७
यो न दर्शयते तेजः क्षत्रियः काल आगते ।
सर्वभूतानि तं पार्थ सदा परिभवन्त्युत ।। ३८
तत्त्वया न क्षमा कार्या शत्रून्प्रति कथंचन ।
तेजसैव हि ते शक्या निहन्तुं नात्र संशयः ।।३९

—महाभारत, वनपर्व अध्याय २७

" तुम्हाला राग म्हणजे काय तो माहीतच नाहीं असें दिसतें. एरवीं आपल्या बंधूंची व माझी दुर्गति पाहून तुम्ही असे स्वस्थ राहिला नसतां. क्रोध नसलेला क्षत्रिय जगांत असूंच शकत नाहीं. क्षत्रिय कुलांत जन्म घेऊनही विपरीत आचरण करणारे आपणच फक्त मला दिसतां. योग्य वेळीं जो क्षत्रिय आपलें तेज प्रकट करीत नाहीं, त्याला सर्व प्राणिमात्राकडून नेहमींच अपमान सहन करावा लागतो. तेजानेंच ज्यांना मारणें शक्य आहे त्याला क्षमा करूं नये. युधिष्ठिर तिला क्षमेचें महत्त्व समजावून देऊं लागले त्या-वेळीं ती त्यांना इतकेंच म्हणाली कीं:—

नमो धात्रे विधात्रे च यौ मोहं चक्रतुस्तव ।
पितृपैतामहे वृत्ते वोढव्ये तेऽन्यथा मतिः ।। १
नेह धर्मानृशंसाभ्यां न क्षान्त्या नार्जवेन च ।
पुरुषः श्रियमाप्नोति न घृणित्वेन कर्हिचित् ।। ३

—महाभारत, वनपर्व अध्याय ३०

" त्या परमेश्वराला माझा साष्टांग नमस्कार असो कीं ज्यानें तुमची बुध्दीच भ्रांत करून टाकली. पितृपितामहांच्या परंपरेनें चालत आलेलें कर्तव्य पार पाडण्याऐवजीं भलत्याच गोष्टीकडे तुमचें मन धांव घेतें. नुसते दया, क्षमा, शांति, आर्जव व कारुण्य एवढ्याच धर्मांचा आश्रय करून आजपर्यंत कोणीही वैभवशाली झालेले मीं कधीं पाहिलें नाहीं." पराक्रमाच्या बाबतींत आपल्या पतींना या मानिनी स्त्रीनें नेहमींच प्रोत्साहित केलेलें आहे. अर्जुन ज्या वेळीं अस्त्रप्राप्तीसाठीं तपश्चर्या करावयास जाऊं लागला तेव्हां द्रौपदी त्याला म्हणाली:

यत्ते कुन्ती महाबाहो जातस्यैच्छद्धनञ्जय ।। २४
तत्तेऽस्तु सर्वं कौन्तेय यथा च स्वयमिच्छसि ।। २५

—महाभारत, वनपर्व अध्याय ३७

"हे धनंजया, आपल्या जन्माच्या वेळीं कुंतीनें ज्या इच्छा केल्या होत्या त्या सर्व परिपूर्ण करण्याची जबाबदारी आपणांवर आहे. कीचकाकडून अपमानित होण्याचा प्रसंग येतांच भीमाचें अंतःकरण प्रदीप्त करून तिनें पुढील शब्दांनीं त्याला वाट न पहातां तात्काळ कीचकाचा वध करावयास प्रवृत्त केलें आहे. ती म्हणाली:—

**दर्शने दर्शने हन्याद्यदि जह्यां च जीवितम् ।**
**तद्धर्मे यतमानानां महान्धर्मो नशिष्यति ।। ३९**
**जयद्रथं तथैव त्वमजैषीर्भ्रातृभिः सह ।**
**जहीममपि पापिष्ठं योऽयं मामवमन्यते ।। ४५**
**कीचको राजवाल्लभ्याच्छोककृन्मम भारत ।**
**तमेवं कामसंमत्तं भिन्धि कुम्भमिवाश्मनि ।। ४६**
**यो निमित्तमनर्थानां बहूनां मम भारत ।**
**तं चेज्जीवन्तमादित्यः प्रातरभ्युदयिष्यति ।। ४७**
**विषमालोड्य पास्यामि मा कीचकवशं गमम् ।**
**श्रेयो हि मरणं मह्यं भीमसेन तवाग्रतः ।। ४८**

—महाभारत, विराटपर्व अध्याय २१

"जर आपण आतां अज्ञातवास संपण्याची वाट पहात बसाल तर आपली ही पत्नी कांहीं जिवंत राहणार नाहीं. पूर्वीं जयद्रथाला आपण जिंकलें. आतां माझा घोर अपराध करणाऱ्या या अधम कीचकाला ठार मारा. राजाला प्रिय असल्यामुळें कामांध कीचक मला दुःख देण्याचें साहस करीत आहे. दगडावर आपटून घडा फोडावा त्याप्रमाणें आपण कीचकाला ठार मारा. माझ्या अनंत दुःखांचें कारण असणारा कीचक जर उद्यां प्रातःकाळीं सूर्योदय झाल्यावर जिवंत असलेला मी पाहीन तर मी विष पिऊन प्राणत्याग केल्यावांचून राहणार नाहीं. आपला देह कीचकाच्या स्वाधीन करण्याऐवजीं तुमच्यासमोर प्राणत्याग करणें मला अधिक श्रेयस्कर वाटतें." तिच्या या निर्वाणीच्या शब्दांमुळेंच भीम कीचकाला तात्काळ ठार मारावयास

सिद्ध झाला. द्रौपदीनें भीमाच्या आज्ञेनुसार कीचकाला फसवून नर्तनागारांत आणलें व पुनश्च भीमाला असें सांगितलें कीं:—

**अश्रुदुःखाभिभूताया मम मार्जस्व भारत।**
**आत्मनश्चैव भद्रं ते कुरु मानं कुलस्य च।। २९**

—महाभारत, विराटपर्व अध्याय २२

"आपण माझ्या अश्रूंचें परिमार्जन करा व स्वतःच्या कुळाचा मान संरक्षिला जाईल असेंच महनीय कृत्य करा." भीमानें भीषणपणें कीचकाला ठार मारल्यावर त्याचें प्रेत द्रौपदीनें स्वतः पाहिलें तेव्हांच तिचें समाधान झालें. भीम कीचकाला ठार मारीत असतां द्रौपदी तेथें जवळच उपस्थित होती. महाभारतकार म्हणतात :—

**तं संमथितसर्वाङ्गं मांसपिण्डोपमं कृतम्।**
**कृष्णाया दर्शयामास भीमसेनो महाबलः।। ८३**
**उवाच च महातेजा द्रौपदीं योषितां वराम्।**
**पश्यैनमेहि पाञ्चालि कामुकोऽयं यथा कृतः।। ८४**
**एवमुक्त्वा महाराज भीमो भीमपराक्रमः।**
**पादेन पीडयामास तस्य कायं दुरात्मनः।। ८५**
**ततोऽग्निं तत्र प्रज्वाल्य दर्शयित्वा तु कीचकम्।**
**पाञ्चालीं स तदा वीर इदं वचनमब्रवीत्।। ८६**
**प्रार्थयन्ति सुकेशान्ते ये त्वां शीलगुणान्विताम्।**
**एवं ते भीरु वध्यन्ते कीचकः शोभते यथा।। ८७**
**तत्कृत्वा दुष्करं कर्म कृष्णायाः प्रियमुत्तमम्।**
**तथा स कीचकं हत्वा गत्वा रोषस्य वै शमम्।। ८८**
**आमन्त्र्य द्रौपदीं कृष्णां क्षिप्रमायान्महानसम्।**
**कीचकं घातयित्वा तु द्रौपदी योषितां वरा।।**
**प्रहृष्टा गतसंतापा सभापालानुवाच ह।। ८९**
**कीचकोऽयं हतः शेते गन्धर्वैः पतिभिर्मम।**
**परस्त्रीकामसंमत्तस्तत्रागच्छत पश्यत।। ९०**

—महाभारत, विराटपर्व अध्याय २२

" संपूर्ण शरीर विमथन करून टाकलेला व मांसाचा लोळागोळा केलेला तो कीचक भीमसेनानें द्रौपदीला दाखविला. तो म्हणाला हे पांचाली, मी या कामुकाची कशी अवस्था करून टाकली आहे हें

स्वतः प्रत्यक्ष पहा. असें म्हणून भीमानें लाथेनेंच तो कीचकाच्या देहाचा मांसगोल द्रौपदीला दाखविला. तेथें अग्नि प्रज्वलित करून व त्याच्या प्रकाशांत कीचकाचें तें प्रेत द्रौपदीला दाखवून भीम म्हणाला : तुझ्यासारख्या साध्वी स्त्रीची जे विटंबना करावयास प्रवृत्त होतात त्यांना असाच भयानक मृत्यु येत असतो. भीम हें दुष्कर कर्म करून व द्रौपदीचें प्रिय करून तिचा निरोप घेऊन पाकशाळेंत निघून गेला. कीचकाच्या मृत्यूनें द्रौपदीचा सर्व शोक जाऊन तिला अत्यंत आनंद झाला व नृत्यशाळेच्या रक्षकांना बोलावन तिनें सांगितलें कीं, परस्त्रीच्या अभिलाषेनें कामोन्मत्त झालेला कीचक माझ्या गंधर्व पतींनीं ठार मारला आहे. या व त्याला पहा.

पुढें अश्वत्थाम्यानें तिचे पुत्र मारल्यावर भीमसेनाला तिनें त्याचा प्रतिकार करण्यासाठीं अशीच घोर उत्तेजना दिली आहे. ती भीमाला म्हणाली :—

भीमसेनमथागत्य परमं वाक्यमब्रवीत् ।
त्रातुमर्हसि मां भीम क्षत्रधर्ममनुस्मरन् ।। २२
जहि तं पापकर्माणं शंबरं मघवानिव ।
न हि ते विक्रमे तुल्यः पुमानस्तीह कश्चन ।। २३
श्रुतं तत्सर्वलोकेषु परमव्यसने यथा ।
द्वीपोऽभूस्त्वं हि पार्थानां नगरे वारणावते ।। २४
हिडिम्बदर्शने चैव तथा त्वमभवो गतिः ।
तथा विराटनगरे कीचकेन भृशार्दिताम् ।। २५

—महाभारत, सौप्तिकपर्व अध्याय ११

"क्षत्रियोचित कर्म करणें हें आपलें कर्तव्य आहे. शंबराला इंद्रानें ठार मारलें तसें आपण पापी अश्वत्थाम्याला ठार मारा. तुमच्यासारखा पराक्रमी पुरुष दुसरा कोणीही नाहीं. पार्थांना वारणावतांतून तुम्हीच वांचविलें. हिडिंबासुरापासून सर्वांचें रक्षण तुम्हींच केलें. विराटनगरींत कीचकानें केलेल्या माझ्या अपमानाचा सूड तुम्हीच घेतला.' अशा स्थितींत या दुःखापासून माझें रक्षण तुमच्याशिवाय कोण करणार ?

## महामानिनी

स्वाभिमानी द्रौपदीचा हा ज्वलंत आविष्कार महाभारतांत ठिकठिकाणीं दृष्टीस पडतो. ती तेजस्विनी स्त्री कौरवांनीं केलेले तिचे अपमान कधींही विसरली नाहीं. ज्या वेळीं तिचे पति कुल-क्षयाच्या भीतीनें स्वतःचे अधिकार सोडून व अपमान विसरून केवळ पांच गांवांवर कौरवांशीं संधि करावयास प्रवृत्त झाले व भगवान् श्रीकृष्ण संधीसाठीं शिष्टाई करावयास जाण्याचा प्रसंग उद्भवला त्या वेळीं कुलस्त्रीच्या अब्रूची आपल्या पतींना यत्किंचित्ही पर्वा नाहीं असें पाहून तिचें अंतःकरण खवळून उठलें. तिनें आपल्या तेजस्वी वाक्यांनीं भगवान् श्रीकृष्णासारख्या स्थितप्रज्ञ पूर्णावतारालाही क्रोध आणला. महाभारतकारांनीं या प्रसंगाचें अतिशय उत्कृष्ट वर्णन केलेलें आहे. तें येथें उद्धृत करून आपण या मानिनी स्त्रीचें वर्णन पूर्ण करूं. महाभारतकार म्हणतात :—

राज्ञस्तु तद्वचं श्रुत्वा धर्मार्थसहितं हितम् ।
कृष्णा दाशार्हमासीनमब्रवोच्छोककर्शिता ॥ १
सुता द्रुपदराजस्य स्वसितायतमूर्धजा ।
संपूज्य सहदेवं च सात्यकिं च महारथम् ॥ २
भीमसेनं च संशान्तं दृष्ट्वा परमदुर्मनाः ।
अश्रुपूर्णेक्षणा वाक्यमुवाचेदं मनस्विनी ॥ ३
विदितं ते महाबाहो धर्मज्ञ मधुसूदन ।
यथा निकृतिमास्थाय भ्रंशिताः पाण्डवाः सुखात् ॥ ४
धृतराष्ट्रस्य पुत्रेण सामात्येन जनार्दन ।
यथा च सञ्जयो राज्ञा मन्त्रं रहसि श्रावितः ॥ ५
युधिष्ठिरस्य दाशार्ह तच्चापि विदितं तव ।
यथोक्तः सञ्जयश्चैव तच्च सर्वं श्रुतं त्वया ॥ ६
पञ्च नस्तात दीयन्तां ग्रामा इति महाद्युते ।
अविस्थलं वृकस्थलं माकन्दीं वारणावतम् ॥ ७
अवसानं महाबाहो कञ्चिदेकं च पञ्चमम् ।
इति दुर्योधनो वाच्यः सुहृदाश्चास्य केशव ॥ ८
न चापि ह्यकरोद्वाक्यं श्रुत्वा कृष्ण सुयोधनः ।
युधिष्ठिरस्य दाशार्ह श्रीमतः सन्धिमिच्छतः ॥ ९
अप्रदानेन राज्यस्य यदि कृष्ण सुयोधनः ।
सन्धिमिच्छेन्न कर्तव्यं तत्र गत्वा कथञ्चन ॥ १०

शक्ष्यन्ति हि महाबाहो पाण्डवाः सृञ्जयैः सह ।
धार्तराष्ट्रबलं घोरं क्रुद्धं प्रतिसमासितुम् ॥ ११
न हि साम्ना न दानेन शक्योऽर्थस्तेषु कश्चन ।
तस्मात्तेषु न कर्तव्या कृपा ते मधुसूदन ॥ १२
साम्ना दानेन वा कृष्ण ये न शाम्यन्ति शत्रवः ।
योक्तव्यस्तेषु दण्डः स्याज्जीवितं परिरक्षता ॥ १३
तस्मात्तेषु महादण्डः क्षेप्तव्यः क्षिप्रमच्युत ।
त्वया चैव महाबाहो पाण्डवैः सह सृञ्जयैः ॥ १४
एतत्समर्थं पार्थानां तव चैव यशस्करम् ।
क्रियमाणं भवेत् कृष्ण क्षत्रस्य च सुखावहम् ॥ १५
क्षत्रियेण हि हन्तव्यः क्षत्रियो लोभमास्थितः ।
अक्षत्रियो वा दाशार्ह स्वधर्ममनुतिष्ठता ॥ १६
अन्यत्र ब्राह्मणात्तात सर्वपापेष्ववस्थितात् ।
गुरुर्हि सर्ववर्णानां ब्राह्मणः प्रसृताग्रभुक् ॥ १७
यथाऽवध्ये वध्यमाने भवेद् दोषो जनार्दन ।
स वध्यस्यावधे दृष्ट इति धर्मविदो विदुः ॥ १८
यथा त्वां न स्पृशेदेष दोषः कृष्ण तथा कुरु ।
पाण्डवैः सह दाशार्हैः सृञ्जयैश्च ससैनिकैः ॥ १९
पुनरुक्तं च वक्ष्यामि विश्रम्भेण जनार्दन ।
का तु सीमन्तिनी मादृक् पृथिव्यामस्ति केशव ॥ २०
सुता द्रुपदराजस्य वेदिमध्यात्समुत्थिता ।
धृष्टद्युम्नस्य भगिनी तव कृष्ण प्रिया सखी ॥ २१
आजमीढकुलं प्राप्ता स्नुषा पाण्डोर्महात्मनः ।
महिषी पाण्डुपुत्राणां पञ्चेन्द्रसमवर्चसाम् ॥ २२
सुता मे पञ्चभिर्वीरैः पञ्च जाता महारथाः ।
अभिमन्युर्यथा कृष्ण तथा ते तव धर्मतः ॥ २३
साऽहं केशग्रहं प्राप्ता परिक्लिष्टा सभां गता ।
पश्यतां पाण्डुपुत्राणां त्वयि जीवति केशव ॥ २४
जीवत्सु पाण्डुपुत्रेषु पञ्चालेष्वथ वृष्णिषु ।
दासीभूताऽस्मि पापानां सभामध्ये व्यवस्थिता ॥ २५
निरमर्षेष्वचेष्टेषु प्रेक्ष्यमाणेषु पाण्डुषु ।
पाहि मामिति गोविन्द मनसा चिन्तितोऽसि मे ॥ २६
यत्र मां भगवन्राजा श्वशुरो वाक्यमब्रवीत् ।
वरं वृणीष्व पाञ्चालि वरार्हाऽसि मता मम ॥ २७

अदासाः पाण्डवाः सन्तु सरथाः सायुधा इति ।
मयोक्ते यत्र निर्मुक्ता वनवासाय केशव ।। २८
एवंविधानां दुःखानामभिज्ञोऽसि जनार्दन ।
त्रायस्व पुण्डरीकाक्ष सभर्तृज्ञातिबान्धवान् ।। २९
नन्वहं कृष्ण भीष्मस्य धृतराष्ट्रस्य चोभयोः ।
स्नुषा भवामि धर्मेण साऽहं दासीकृता बलात् ।। ३०
धिक् पार्थस्य धनुष्मत्तां भीमसेनस्य धिग्बलम् ।
यत्र दुर्योधनः कृष्ण मुहूर्तमपि जीवति ।। ३१
यदि तेऽहमनुग्राह्या यदि तेऽस्ति कृपा मयि ।
धार्तराष्ट्रेषु वै कोपः सर्वः कृष्ण विधीयताम् ।। ३२
वैशंपायन उवाच ।
इत्युक्त्वा मृदुसंहारं वृजिनाग्रं सुदर्शनम् ।
सुनीलमसितापाङ्गी सर्वगन्धाधिवासितम् ।। ३३
सर्वलक्षणसम्पन्नं महाभुजगवर्चसम् ।
केशपक्षं वरारोहा गृह्य वामेन पाणिना ।। ३४
पद्माक्षी पुण्डरीकाक्षमुपेत्य गजगामिनी ।
अश्रुपूर्णेक्षणा कृष्णा कृष्णं वचनमब्रवीत् ।। ३५
अयं ते पुण्डरीकाक्ष दुःशासनकरोद्धृतः ।
स्मर्तव्यः सर्वकार्येषु परेषां सन्धिमिच्छता ।। ३६
यदि भीमार्जुनौ कृष्ण कृपणौ सन्धिकामुकौ ।
पिता मे योत्स्यते वृद्धः सह पुत्रैर्महारथैः ।। ३७
पञ्च चैव महावीर्याः पुत्रा मे मधुसूदन ।
अभिमन्युं पुरस्कृत्य योत्स्यन्ते कुरुभिः सह ।। ३८
दुःशासनभुजं श्यामं संछिन्नं पांसुगुण्ठितम् ।
यद्यहं तु न पश्यामि का शान्तिर्हृदयस्य मे ।। ३९
त्रयोदश हि वर्षाणि प्रतीक्षन्त्या गतानि मे ।
विधाय हृदये मन्युं प्रदीप्तमिव पावकम् ।। ४०
विदीर्यते मे हृदयं भीमवाक्शल्यपीडितम् ।
योऽयमद्य महाबाहुर्धर्ममेवानुपश्यति ।। ४१
इत्युक्त्वा बाष्परुद्धेन कण्ठेनायतलोचना ।
रुरोद कृष्णा सोत्कम्पं सस्वरं बाष्पगद्गदम् ।। ४२
स्तनौ पीनायतश्रोणी सहितावभिवर्षती ।
द्रवीभूतमिवात्युष्णं मुञ्चती वारि नेत्रजम् ।। ४३
तामुवाच महाबाहुः केशवः परिसान्त्वयन् ।
अचिराद्रक्ष्यसे कृष्णे रुदतीर्भरतस्त्रियः ।। ४४

एवं ता भीरु रोत्स्यन्ति निहतज्ञातिबान्धवाः ।
हतमित्रा हृतबला येषां क्रुद्धाऽसि भामिनी ।। ४५
अहं च तत्करिष्यामि भीमार्जुनयमैः सह ।
युधिष्ठिरनियोगेन दैवाच्च विधिनिर्मितात् ।। ४६
धार्तराष्ट्राः कालपक्वा न चेच्छृण्वन्ति मे वचः ।
शेष्यन्ते निहताः भूमौ श्वसृगालादनीकृताः ।। ४७
चलेद्धि हिमवान् शैलो मेदिनी शतधा फलेत् ।
द्यौः पतेच्च सनक्षत्रा न मे मोघं वचो भवेत् ।। ४८
सत्यं ते प्रतिजानामि कृष्णे बाष्पो निगृह्यताम् ।
हतामित्रान् श्रिया युक्तानचिराद् द्रक्ष्यसे पतीन् ।। ४९

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ८२

" सर्व लोकांचें बोलणें ऐकून व युधिष्ठिरांचेंही बोलणें ऐकून शोककर्शित द्रौपदी श्रीकृष्णाशीं बोलूं लागली. सहदेव व सात्यकीचें तिनें अभिनंदन केलें. भीमाचा शांतपणा पाहून ती अत्यंत खिन्न झाली. अश्रुपूर्ण नयनांनीं श्रीकृष्णाकडे पाहून ती म्हणाली : हे महाबाहो धर्मज्ञा, मधुसूदना, दुष्टांनीं कपटानें पांडवांना सुखापासून कसें भ्रष्ट केलें हें तुला माहीतच आहे. आपल्या अमात्यासहित धृतराष्ट्रपुत्रानें युधिष्ठिरासाठीं कोणता निरोप संजयाबरोबर पाठविला याचीही तुला कल्पना आहे. अविस्थळ, वृकस्थळ, माकंदी, वारणावत, व आणखी एक अशीं पांच गांवें मागून तेवढ्यावर युधिष्ठिर संधि करावयास तयार झाले, पण दुर्योधन तें ऐकावयास सिद्ध झाला नाहीं. राज्य दिल्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही कारणास्तव तूं तेथें जाऊन संधि करूं नये. सृंजयासहित पांडव दुर्योधनाच्या भयंकर सैन्याशीं धडक द्यावयास पूर्णपणें समर्थ आहेत. त्यांच्यासारख्या दुष्टांजवळून साम व दाम यांनीं कार्य होण्याची आशाच नको. त्यांच्यावर मुळींच दया दाखवूं नये असें माझें मत आहे. ज्याला स्वतःचें संरक्षण करावयाचें आहे त्यानें साम व दाम यांनीं जे शत्रू वळत नाहींत त्यांच्यावर दंडाचाच प्रयोग केला पाहिजे. आणि कौरवांसारख्या दुष्टांना तर तूं पांडव व सृंजय यांनीं मिळून अत्यंत घोर दंड दिला पाहिजे. हेंच पांडवांच्या सामर्थ्याला योग्य, क्षत्रियोचित व तुझी कीर्ति वाढविणारें ठरणार

आहे. आपल्या धर्माचें प्रतिपालन करणाऱ्या जातिवंत क्षत्रियानें लोभाविष्ट झालेल्या क्षत्रियाला अथवा अक्षत्रियाला अवश्य ठार मारावें. अवध्याचा वध करण्यांत जसा दोष आहे तसाच वध्याचा वध न करण्यांतही दोष आहे. हा दोष तुला लागणार नाहीं असें वर्तन तूं स्वतः कर व आपल्या अनुचरांनाही तसेंच करावयास भाग पाड. श्रीकृष्णा मी तुला असें विचारतें कीं, माझ्यासारखी स्त्री पृथ्वीवर दुसरी असेल काय? साक्षात् यज्ञवेदीपासून माझा जन्म झाला. राजा द्रुपदाची मी कन्या, धृष्टद्युम्नासारख्या वीराची भगिनी व तुझी प्रियसखी या आजमीढ कुळांत राजा पांडूची सून म्हणून व महेंद्राप्रमाणें प्रभावशाली अशा पांडवांची महाराणी म्हणून आलें. पांच वीर पुत्रांची मी माता आहें. जसा अभिमन्यु तुझा भाचा तसेंच तेही तुझे भाचे आहेत. पण श्रीकृष्णा, पांडव उघडया डोळयांनीं पहात असतां व तूं जिवंत असतां मला केस धरून सभेंत फरफटत ओढण्यांत आलें आहे. पंचाल, यादव व पांडव जिवंत असतां पाप्यांनीं मला सभेंत ओढलें व दासी म्हणून म्हटलें. माझ्या रक्षणाचा भार धर्मानेंच घेतलेले हे लोक त्याही स्थितींत शांतच बसले होते. तूं माझें रक्षण कर म्हणून मी तुला अंतःकरणांतून हांक मारली. राजा धृतराष्ट्रानें मला वर माग म्हणून म्हटलें. मी फक्त सशस्त्र पांडवांचें स्वातंत्र्य मागून यांना मोकळें केलें. पण कर्मानें यांनीं पुन्हां वनवास पत्करला. हे पुंडरीकाक्षा, माझ्या सर्व दुःखांची तुला जाणीव आहे. तूंच यांतून आमचें रक्षण केलें पाहिजेस. भीष्म व धृतराष्ट्रांची मी धर्मानें सून असतां बलात्कारानें मला दासी करण्यांत आलें. मला दासी करणारा दुर्योधन एक मुहूर्तमात्र जर जिवंत राहूं शकतो तर पांडवांच्या बलाचा उपयोग काय? भीमाच्या सामर्थ्याला व अर्जुनाच्या धनुर्धारीपणाला धिक्कार असो. जर तुझी माझ्यावर कृपा असेल व माझ्यावर अनुग्रह करावा असें तुला वाटत असेल तर शक्य असेल तितका तीव्र संताप कौरवांवर काढ." याप्रमाणें बोलून त्या महामानिनीनें आपले मृदु, दर्शनीय, सुगंधी, नीलवर्णाचे, व सर्पाकृति असे केंस डाव्या हातांत घेऊन व डोळयांत अश्रु आणून श्रीकृष्णांच्या डोळयासमोर धरले. ती पुनश्च म्हणाली,

हे पुंडरीकाक्षा, कौरवांच्याशीं संधि करण्याची ज्यावेळीं तुला इच्छा होईल त्या वेळीं त्या दृष्टीनें कोणतेंही कार्य करीत असतां दुःशासनानें ओढलेला हा माझा केशपाश तुझ्या स्मरणांत असूं दे. हे भीमार्जुन दीन होऊन संधीसाठीं उत्सुक झाले असतील तर माझा वृद्ध पिता द्रुपद आपल्या महारथ पुत्रांसहित आपल्या कन्येसाठीं अधमांचें निर्दालन करील. पतींना आपल्या पत्नीच्या अब्रूची चाड नसली तरी आपल्या मातेची अब्रू माझ्या पुत्रांना रक्षणीय खास वाटेल. माझे पांच पुत्र अभिमन्यूला पुढें करून कौरवांशीं युद्ध करतील. दुःशासनाचा माझ्या केंसांना स्पर्श करणारा तो हात रणांत तुटून रक्ताच्या थारोळ्यांत धुळींत लोळत पडलेला मी जोंवर पहात नाहीं तोंवर माझ्या हृदयाला कुठून शांति मिळणार ? तेरा वर्षें प्रज्वलित अग्नीप्रमाणें माझा संताप मी हृदयाशीं बाळगला आहे. आज भीमाच्या या शांतपणाच्या बोलण्यानें माझें अंतःकरण विदीर्ण झालें. भीमाच्याही तोंडून शांतिपाठच ऐकावे काय ? याप्रमाणें बोलून द्रौपदी रडूं लागली. तिच्या नेत्रांतून वाहणारा अश्रूपात पाहून तिचें सांत्वन करीत भगवान् श्रीकृष्ण तिला म्हणाले कीं, " साऱ्या कौरव स्त्रिया अशाच रडत असलेल्या पहाण्याचें भाग्य तुला लौकरच लाभेल. ज्यांच्यावर तूं रागावलीस त्या सर्व लोकांचा वध करून त्यांच्या अनाथ स्त्रिया अशाच रडत असलेल्या मी तुला दाखवीन. कालानें जीवित संपवीत आणलेले धृतराष्ट्रपुत्र जर माझें ऐकणार नाहींत तर कोल्हे कुत्रे व गिधाडें यांचें भक्ष्य होऊन ते रणांत नाश पावतील. हे कृष्णे, हिमाचल आपली जागा सोडील, पृथ्वीचे तुकडे उडतील, नक्षत्रांसहित द्युलोक खालीं पडेल, पण माझें वचन मिथ्या होणार नाहीं. अश्रु आंवर. शत्रूंचा विनाश होऊन आपले पति वैभवास चढलेले तूं लवकरच पहाशील."

द्रौपदीच्या वाग्बाणांनीं व अश्रूंनीं श्रीकृष्णाची ही भविष्यवाणी खरी करून दाखविली आहे. तेजस्विनी द्रौपदीचें महाभारतांतील हें व्यक्तिचित्र महाभारताच्या प्रत्येक वाचकाच्या अंतःकरणावर परिणाम घडवून आणल्याविना राहणार नाहीं.

---

# २४. भीम–ज्वलंत प्रतिशोध

महाभारतांतील रौद्ररस ज्याच्या अतिमानुष पराक्रमानेंच मुख्यतः फुललेला आहे, ज्याच्या प्रचंड सामर्थ्याचे महाभारतांतील आविष्कार आजही अन्याय व आक्रमण यांचा प्रतिशोध घ्यावयास उठलेल्या वीरबाहूंना स्फुरण द्यावयास व कातर हृदयांना कंपित करावयास पूर्णपणें समर्थ आहेत, किंबहुना ज्वलंत प्रतिशोधच ज्याच्या रूपानें आविष्कार पावलेला आहे तो द्वितीय पांडव भीमसेन महाभारताच्या प्रत्येक वाचकाच्या अंतःकरणावर विलक्षण परिणाम घडवून आणल्याविना राहात नाहीं. भीमसेन हे राजर्षि धर्मराज युधिष्ठिरांचें अतिप्रचंड सामर्थ्य होय. युधिष्ठिरांचें भीमावर सर्वांत अधिक प्रेम होतें. वनपर्वांतील यक्षप्रश्नप्रकरणांत यक्षानें नकुलाचें जीवदान मागणाऱ्या युधिष्ठिरांना असें म्हटलें आहे कीं:—

**तथैनं मनुजाः प्राहुर्भीमसेनं प्रियं तव ॥ २६**

—महाभारत, वनपर्व अध्याय ३१३

लोक असें म्हणतात कीं, 'भीमसेन तुझा प्रिय आहे.' महाप्रस्थानिकपर्वांत युधिष्ठिरांमागोमाग सारे बंधु व द्रौपदी जात असतां ते जेव्हां एकामागून एक गळून पडूं लागले तेव्हां भीम स्वतः जमिनीवर कोसळल्यानंतर याच गोष्टीचा अनुवाद करीत आहे. तो युधिष्ठिरांना म्हणतो :—

**भो भो राजन्नवेक्षस्व पतितोऽहं प्रियस्तव ॥ २४**

—महाभारत, महाप्रस्थानिकपर्व अध्याय २

"हे राजन्, माझ्याकडे पहा. तुझा प्रिय मी देखील गळून पडलों आहे." भीमानें द्रौपदी व इतर सर्व बंधु यांच्या पडण्याचें व मरणाचें वर्णन करीत असतां 'प्रिय' हें विशेषण मुळींच वापरलेलें नाहीं हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. भीम अवखळ असला तरी त्याच्या पराक्रमामुळेंच आपलें नानाविध संकटांतून संरक्षण झालें असून आपल्याला त्याच्या पराक्रमानेंच चांगले दिवस यावयाचे

---

व्याख्यान २४ वें, दि. २१ एप्रिल १९५१

आहेत अशी युधिष्ठिरांची त्याच्यासंबंधींची भावना महाभारतांत अनेक ठिकाणीं व्यक्त झालेली आहे. कुंतीनें बकासुराला ठार मारण्यासाठीं भीमाला पाठवावयाचें ठरविल्यावर तिला त्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत असतां युधिष्ठिर म्हणतात :—

**यस्य बाहू समाश्रित्य सुखं सर्वं शयामहे ।**
**राज्यं चापहृतं क्षुद्रैराजिहीर्षामहे पुनः ।। ७**
**यस्य दुर्योधनो वीर्यं चिन्तयन्नमितौजसः ।**
**न शेते रजनीः सर्वाः दुःखाच्छकुनिना सह ।। ८**
**यस्य वीरस्य वीर्येण मुक्ता जतुगृहाद्वयम् ।**
**अन्येभ्यश्चैव पापेभ्यो निहतश्च पुरोचनः ।। ९**
**यस्य वीर्यं समाश्रित्य वसुपूर्णां वसुन्धराम् ।**
**इमां मन्यामहे प्राप्तां निहत्य धृतराष्ट्रजान् ।। १०**

——महाभारत, आदिपर्व अध्याय १६२

"ज्याच्या बाहूंच्या आश्रयावर आपण सुखानें निद्रा घेतो व क्षुद्रांनीं अपहरण केलेलें आपलें राज्य परत मिळविण्याची आशा बाळगतों, ज्या अतितेजस्वी पुरुषाच्या पराक्रमाच्या चिंतेनें शकुनी-सहित दुर्योधन दुःखानें रात्री जागून काढतो, ज्या वीराच्या प्रभा-वानें आपण लाक्षागृहांतून सुटलों, पुरोचन ठार झाला व अनेक पापी लोकांच्या आक्रमणांपासून आपलें संरक्षण झालें, ज्याच्या वीर्याच्या भरंवशावर ही धनधान्यसंपन्न पृथ्वी धृतराष्ट्रपुत्रांना ठार मारून आपण आपल्या अधीन करून घेऊं असें समजतों."

## भीमाचें स्वरूप व शिक्षण

पुष्ट व दीर्घ बाहू असलेला, भरदार खांदे असून तापलेल्या सुवर्णाप्रमाणें गौरवर्णाचा व मदोन्मत्त गजेन्द्राप्रमाणें चालणारा असें महाभारतांत भीमाच्या स्वरूपाचें वर्णन आढळतें. आश्रम-वासिक पर्वांत म्हटलें आहे :——

**अयं पुनर्मत्तगजेन्द्रगामी प्रतप्तचामीकरशुद्धगौरः ।**
**पृथ्वायतांसः पृथुदीर्घबाहुर्वृकोदरः पश्यत पश्यतेमम् ।। ६**

—महाभारत, आश्रमवासिक पर्व अध्याय २५

प्रत्यक्ष महाभारतांतील भीमसेनाच्या या स्वरूपवर्णनावरून त्याच्या स्थूल स्वरूपासंबंधीं रूढ असलेले पुष्कळसे अपसमज दूर झाल्याविना रहाणार नाहींत. भीमाचें शरीर अत्यंत बांधेसूद असून तें कसलेलें व पिळदार होतें. त्याचा वर्ण गौर असून त्याचें गोरे-पण पिवळट वर्णाचें होतें. पांडवामध्यें नकुल हा नाजुक सौंद-र्याचा आदर्श असला तर भीमाचें सौंदर्य मर्दानी होतें. पेशव्यांच्या परंपरेंत पहिले बाजीराव व विश्वासराव यांच्या सौदर्यांत जी भिन्नता तीच भीमसेन व नकुल यांच्यांत होती असें म्हणतां येईल. भीमाचें स्वरूप व वैशिष्टच यांसंबंधीचें अधिक वर्णन उद्योगपर्वांत संजयाशीं राजा धृतराष्ट्रानें केलेल्या भाषणांत आलें आहे. तें असें:—

**अनर्महासी सोन्मादः तिर्यक्प्रेक्षी महास्वनः ॥ ५**
**महावेगो महोत्साहो महाबाहुर्महाबलः ॥ ६**
**बह्वाशी विप्रतीपश्च बाल्येऽपि रभसः सदा ॥ १०**
**अस्त्रे द्रोणार्जुनसमं वायुवेगसमं जवे ।**
**महेश्वरसमं क्रोधे को हन्याद् भीममाहवे ॥ १४**
**निष्ठुरो रोषणोऽत्यर्थं भज्येतापि न संनमेत् ।**
**तिर्यक्प्रेक्षी संहतभ्रूः कथं शाम्येद् वृकोदरः ॥ १८**
**शूरस्तथाऽप्रतिबलो गौरस्ताल इवोन्नतः ।**
**प्रमाणतो भीमसेनः प्रादेशेनाधिकोऽर्जुनात् ॥ १९**
**जवेन वाजिनोऽत्येति बलेनात्येति कुञ्जरान् ।**
**अव्यक्तजल्पी मध्वक्षो मध्यमः पाण्डवो बली ॥ २०**
**गदां भ्रामयतस्तस्य भिन्दतो हस्तिमस्तकान् ।**
**सृक्किणी लेलिहानस्य बाष्पमुत्सृजतो मुहुः ॥ २९**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ५१

"थट्टेंत देखील न हंसणारा, देहभान विसरणारा, नेहमीं वक्र दृष्टीनें पाहणारा, ज्याचा आवाज मोठा आहे, वेग प्रचंड आहे, उत्साह अतिरिक्त आहे असा विशाल व आजानुबाहू असलेला, अत्यंत बलवान्, अतिरिक्त खादाड, नेहमीं आमच्याविरुद्ध असलेला लहानपणीं देखील जो सदैव अत्यंत साहसी असे, अस्त्रविद्येंत द्रोण-अर्जुनाप्रमाणें प्रभावी, वेगांत वायूप्रमाणें, ज्याचा क्रोध महेश्वरा-

सारखा प्रलयंकर आहे अशा भीमाला युद्धांत कोण मारूं शकेल ? तो अत्यंत निष्ठुर व अतिशय रागीट असून मोडला जाईल पण कधींहि वांकणार नाहीं. भिवया आकुंचित करून नेहमीं वांकड्या दृष्टीनें पाहण्याची संवय असलेला भीम शांत होणें कसें शक्य आहे ? तो अत्यंत शूर असून त्याच्या योग्यतेचा बलवान दुसरा कोणीही नाहीं. तो गौरवर्णाचा असून तालवृक्षाप्रमाणें उंच आहे. अर्जुनापेक्षां भीमसेन शरीरानें अधिक धष्टपुष्ट असून शारीरिक बळाच्या दृष्टीनेंही तो त्याच्यापेक्षां अधिक श्रेष्ठ आहे. चपल अश्वाहून त्याचा वेग अधिक आहे. गजेन्द्रापेक्षां तो अधिक बलवान आहे. अत्यंत बलवान असलेल्या या द्वितीय पांडव भीमसेनाचे डोळे नेहमींच दारूनें धुंद झाल्याप्रमाणें आरक्त असून तो बोलत असतां त्याचा वर्णोच्चार नेहमीं अस्पष्ट व तोंडांतल्या तोंडांत असतो. रणांगणामध्यें गदा फिरवीत हत्तींचीं गंडस्थलें फोडीत असतां आपले ओठ चाटीत मधून मधून तो डोळ्यांतून क्रोधातिरेकानें अश्रू गाळीत असतो." भीमसेनाचें सामर्थ्य जसें प्रचंड तदनुरूप त्याचा आहारही चांगलाच दांडगा होता याचे महाभारतांत उल्लेख आढळतात. धृतराष्ट्र त्याचा जन्मजात शत्रु असल्यामुळें तो त्याला 'खादाड' म्हणतो असें नसून सामर्थ्यानुरूप त्याचा आहार प्रचंड असल्याचे स्वतंत्र उल्लेखही अनेक आहेत. महाप्रस्थानिक पर्वांत युधिष्ठिरानें भीमाला त्याच्या पतनाचीं कारणें सांगताना

**अतिभुक्तं च भवता प्राणेन च विकत्थसे ।। २५**

—महाभारत, महाप्रस्थानिकपर्व अ. २

"तूं अतिशय खात असून सदैव आपल्या बळाचीच अतिशय घमेंड मारीत होतास" असें म्हटलें आहे. एकचक्रा नगरींत पांडव रहात असतां तेथें ते ब्राह्मणरूपानें भिक्षा मागून आपलें उपजीवन चालवीत असत. भिक्षा आणल्यावर तिचें जें वांटप होई त्याचें महाभारतांत असें वर्णन आहे कीं,

**अर्धं ते भुञ्जते वीराः सह मात्रा परंतपाः ।**
**अर्धं सर्वस्य भैक्षस्य भीमो भुङ्क्ते महाबलः ।। ६**

—महाभारत, आदिपर्व अ. १५७

"आणलेल्या भिक्षेपैकीं अर्धी भिक्षा कुंतीसहित चार बंधु भक्षण करीत; व भिक्षेचा अर्धा भाग महाबल भीमसेन एकटा फस्त करीत असे." बकासुरासाठीं सिद्ध केलेलें गाडाभर अन्न, तो वरून मारीत असतांही त्याच्याकडे लक्ष देखील न देतां भीमानें खाऊन टाकल्याची गोष्ट तर प्रसिद्धच आहे. असो. इतर सर्व कौरव कुलांतील राजपुत्रां-प्रमाणेंच भीमसेनही शस्त्रास्त्रविद्येंत आचार्य द्रोणांचाच शिष्य होता. भीमसेन हा केवळ गदायुद्धांत प्रवीण होता ही रूढ समजूत बरोबर नाहीं. महाभारतानुसार खड्गयुद्ध, गदायुद्ध व रथांतून करावयाचें धनुष्यबाणांचें युद्ध या तिन्ही युद्धांच्या कलेंत भीमसेन निष्णात होता. त्याचप्रमाणें मल्लयुद्धांतही तो केवढा निष्णात होता हें जरासंधा-सारख्या वीराला त्यानें मल्लयुद्धांतच ठार मारलें यावरून स्पष्ट होतें. जीमूतासारख्या प्रथितयश व अजिक्य पत्रें मिळविणाऱ्या मल्लाला व कीचकासारख्या विख्यात बलवंतालाही भीमानें मल्ल-युद्धांतच ठार मारलें आहे. गदायुद्ध हें भीमाचें अतिशय आवडीचें युद्ध असून गदा या आयुधावर त्याचें विलक्षण प्रेम असे इतकेंच. त्याच्या भयानक गदेचें महाभारतांत अनेक ठिकाणीं वर्णन येतें. भीमानें आचार्य द्रोणांजवळ गदेचा अभ्यास केल्यानंतर, लाक्षागृह प्रकरणापूर्वीं युधिष्ठिरांच्या अल्पकालीन यौवराज्याच्या काळांत तत्कालीन गदायुद्धवेत्त्यांचे सर्व श्रेष्ठ आचार्य यादवेंद्र बलराम (भगवान् श्रीकृष्णांचे ज्येष्ठ बंधु) यांच्याजवळ त्यानें गदायुद्धाचें स्वतंत्र शिक्षण घेऊन त्यांत प्रावीण्य संपादन केलें. महाभारतकार म्हणतात:—

**असियुद्धे गदायुद्धे रथयुद्धे च पाण्डवः ।**
**संकर्षणादशिक्षद् वै शश्वच्छिक्षां वृकोदरः ।। ४**
**समाप्तशिक्षो भीमस्तु द्युमत्सेनसमो बले ।**
**पराक्रमेण सम्पन्नो भ्रातॄणामचरद्वशे ।। ५**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १३९

" खड्गयुद्ध, गदायुद्ध व रथांतून करावयाचें धनुर्बाणांचें युद्ध यांमध्यें भीम निष्णात असून त्यानें संकर्षणाकडे ( बलराम ) जाऊन गदायुद्धाचें स्वतंत्रपणें शिक्षण घेतलें. शस्त्रास्त्रविद्येचें शिक्षण झाल्या-

वर भीमसेन द्युमत्सेनाप्रमाणें बलवान् म्हणून प्रसिद्धीस आला व तो पराक्रमसंपन्न पुरुष आपल्या बंधूंच्या अधीन राहूं लागला."

## प्रचंड सामर्थ्य

महाभारतांतील भीमसेन हे श्रीमद्रामायणांतील हनुमंताप्रमाणेंच अतिप्रचंड सामर्थ्याचें दुसरें नांव आहे. हनुमंताप्रमाणेंच बलाची व वेगाची अधिष्ठात्री देवता जी वायु तिचा तो पुत्र आहे. त्याची जन्मकथा व जन्मतःच त्याच्या ठिकाणीं असलेलें अद्भुत सामर्थ्य यांचें वर्णन महाभारतांत पुढीलप्रमाणें आहेः—

प्राहुः क्षत्रं बलज्येष्ठं बलज्येष्ठं सुतं वृणु ।
ततस्तथोक्ता भर्ता तु वायुमेवाजुहाव सा ।। ११
ततस्तामागतो वायुर्मृगारूढो महाबलः ।
किं ते कुन्ति ददाम्यद्य ब्रूहि यत्ते हृदि स्थितम् ।। १२
सा सलज्जा विहस्याह पुत्रं देहि सुरोत्तम ।
बलवन्तं महाकायं सर्वदर्पप्रभञ्जनम् ।। १३
तस्याज्जज्ञे महाबाहुर्भीमो भीमपराक्रमः ।
तमप्यतिबलं जातं वागुवाचाशरीरिणी ।। १४
सर्वेषां बलिनां श्रेष्ठो जातोऽयमिति भारत ।
इदमत्यद्भुतं चासीज्जातमात्रे वृकोदरे ।। १५
यदङ्कात्पतितो मातुः शिलां गात्रैर्व्यचूर्णयत् ।
कुन्ती व्याघ्रभयोद्विग्ना सहसोत्पतिता किल ।। १६
नान्वबुध्यत संसुप्तमुत्सङ्गे स्वे वृकोदरम् ।
ततः स वज्रसंघातः कुमारो न्यपतद् गिरौ ।। १७
पतता तेन शतधा शिला गात्रैर्विचूर्णिता ।
तां शिलां चूर्णितां दृष्ट्वा पाण्डुर्विस्मयमागतः ।। १८

महाभारत, आदिपर्व अध्याय १२३

"युधिष्ठिराच्या जन्मानंतर पाण्डु कुन्तीला म्हणाला कीं, क्षत्रियांत बळालाच खरें प्राधान्य आहे. म्हणून बळानें सर्वश्रेष्ठ असलेला मुलगा तूं देवाला माग. आपल्या पतीचें हें भाषण ऐकून कुन्तीनें वायुदेवतेचेंच आवाहन केलें. तिच्या मंत्रसामर्थ्यानें मृगावर आरूढ होऊन महाबलशाली वायु तेथें आले व कुंतीला म्हणाले कीं, हे कुन्ती, तुझ्या हृदयांत काय आहे तें मला सांग. मी तुझी इच्छा पूर्ण

करीन. त्याबरोबर सलज्ज मन्द स्मित करून कुंती त्यांनाः म्हणाली कीं हे देवश्रेष्ठा, मला बलवान्, धिप्पाड शरीराचा व सर्वांच्या बळाचा गर्व पार भंगून टाकणारा असा पुत्र द्या. वायूपासून अतिबल व भीमपराक्रमी भीमसेन झाला. तो जन्मतःच आकाशवाणी झाली व तिनें कुंतीला असें सांगितलें कीं तुझा हा पुत्र सर्व बलवन्तांत श्रेष्ठ आहे. त्याच्या बळाचा प्रत्यय कुंतीला मोठ्या अद्भुत रीतीनें आला. एकदां कुंती भीमाला मांडीवर घेऊन बसली असतां तेथें एक वाघ आला. त्याला पहातांच भयकंपित होऊन भीम आपल्या मांडीवर झोपला आहे ही गोष्ट विसरून कुंती एकदम उठून उभी राहिली. त्याबरोबर जणूं कांहीं वज्राचाच बनविलेला तो सुदृढ कुमार कुंतीच्या मांडीवरून एका मोठ्या शिलेवर पडला. वाघाचें भय नाहींसें झाल्यावर दगडावर पडलेल्या त्या कुमाराला कांहीं लागलें असेल अशा कल्पनेनें कुंतीनें व पांडूनें त्या शिलाखंडाकडे पाहिलें तो त्यांना काय आढळून आलें? शिलाखंडामुळें भीमाला कांहींच इजा न होतां उलट भीमाच्या शरीराच्या आघातानें ती शिलाच चूर्ण झाली होती! तें पाहून राजा पांडूला आश्चर्य वाटलें.

अंगच्या अपार शरीरसामर्थ्याच्या भरंवशावर लहानपणीं आपल्याबरोबर खेळावयास असणाऱ्या सर्व कौरव राजकुमारांची तो चांगलीच खोडकी जिरवीत असे. धांवण्याची स्पर्धा, लक्ष्याभिहरण स्पर्धेनें खाणें, व एकमेकांच्या अंगावर धूळ उडविणें, इत्यादि बालक्रीडांत शंभरही धृतराष्ट्रपुत्रांची भीम चांगलीच जिरवीत असे. एकशेंएक धृतराष्ट्र पुत्रांचें नियमन करणें हा भीमाच्या हातचा खेळ होता. अत्यंत दुष्ट अंतःकरणाच्या दुर्योधनाला भीमाचा काटा काढावा असें वाटून त्यानें भीमाच्या अन्नांत एकदां कालकूट नांवाचें अतिशय भयंकर असें विष मिसळून तें अन्न त्याला खावयास दिलें. पण त्याच्या अद्भुत व अपार सामर्थ्यानें त्यानें तें विष पार पचवून टाकलें. त्याच्या विलक्षण सामर्थ्याचें वर्णन करतांना महाभारतकार म्हणतातः—

**ततो दुर्योधनः पापस्तद्भक्ष्ये कालकूटकम् ।**
**विषं प्रक्षेपयामास भीमसेनजिघांसया ॥ ४५**

स्वयमुत्थाय चैवाथ हृदयेन क्षुरोपमः ।
स वाचा मृतकल्पश्च भर्तृवच्च सुहृद्यथा ।। ४६
स्वयं प्रक्षिपते भक्ष्यं बहु भीमस्य पापकृत् ।
प्रतीक्षितं स्म भीमेन तं वै दोषमजानता ।। ४७
शीतं वातं समासाद्य श्रान्तो मदविमोहितः ।
विषेण च परीताङ्गो निश्चेष्टः पाण्डुनन्दनः ।। ५३
ततो बद्ध्वा लतापाशैर्भीमं दुर्योधनः स्वयम् ।
मृतकल्पं तदा वीरं स्थलाज्जलमपातयत् ।। ५४
स निःसंज्ञो जलस्यान्तमथ वै पाण्डवोऽविशत् ।
आक्रामन्नागभवने तदा नागकुमारकान् ।। ५५
ततः समेत्य बहुभिस्तदा नागैर्महाविषैः ।
अदश्यत भृशं भीमो महादंष्ट्रैर्विषोल्बणैः ।। ५६
ततोऽस्य दश्यमानस्य तद्विषं कालकूटकम् ।
हतं सर्वविषेणैव स्थावरं जंगमेन तु ।। ५७
दंष्ट्राश्च दंष्ट्रिणां तेषां मर्मस्वपि निपातिताः ।
त्वचं नैवास्य बिभिदुः सारत्वात्पृथुवक्षसः ।। ५८
ततः प्रबुद्धः कौन्तेयः सर्वं संछिद्य बन्धनम् ।
पोथयामास तान्सर्वान् केचिद् भीताः प्रदुद्रुवः ।। ५९

—महाभारत, आदिपर्व अ. १२८

"नंतर दुष्ट दुर्योधनानें भीमसेनाला ठार मारण्याच्या इच्छेनें त्याच्या अन्नांत कालकूट विष मिसळविलें. वरून दिसायला तो अमृतमय वाणीचा सुहृद् अथवा बंधु भासत असला तरी त्याचें अंतःकरण वस्तऱ्याच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण व मारक होतें. आग्रह करकरून त्यानें भीमाला तें विषमय अन्न खाऊं घातलें व भीमानेंही अजाणपणें तें खाल्लें. त्यानंतर बराच वेळ जलक्रीडा केल्यावर थकून भीम विश्रांतिमंदिरांत बसला असतां थंड वारा त्याच्या अंगाला लागू लागला. अतिरिक्त श्रमानें थकलेला, मदानें मोहित, विष साऱ्या अंगांत भिनलेला असा भीम थंड वारा अंगाला लागतांच पूर्णपणें असावध व निश्चेष्ट झाला. तो मूर्च्छित होऊन एकाद्या मेलेल्या माणसाप्रमाणें पडलेला पाहून दुर्योधनानें लतापाशांनीं

त्याला बांधलें व नदींत फेकून दिलें. निःसंज्ञ स्थितींत खोल पाण्यांत जात जात तो नाग लोकाकडे येऊं लागला. त्याला पाहतांच मोठमोठ्या दाढा असलेल्या भयंकर विषारी नागांनीं त्याला भयानक दंश करावयास प्रारंभ केला. त्याबरोबर विषावर विषाचाच उतारा मिळून नागांच्या विषानें भीमाच्या अंगांत भिनलेलें विष संपूर्णपणें नष्ट करून टाकलें. नागांनीं भीमाच्या मर्मामर्मावर आपल्या दातांनीं दंश केला. पण त्याची कातडी देखील इतकी चिवट होती कीं, ती त्यांना आपल्या सामर्थ्यशील दांतांनीं किंचिन्मात्रही तोडतां आली नाहीं. कांहीं वेळानें भीम सावध झाला. त्यानें लतापाशांचीं बंधनें तोडून टाकलीं व त्या नागांना आपल्या हातांनीं असें रगडून टाकलें कीं, त्यांतील कित्येक ठार झाले व उरलेले भयभीत होऊन पळून गेले.''

## लाक्षागृहांतून वांचविलें

भीमाचें असेंच अद्‌भुत सामर्थ्य लाक्षागृहांतून पाण्डवांना वांचवितांना प्रकट झालें आहे. त्यानेंच लाक्षागृहाला स्वतः आग लावून त्यांत पुरोचनाला फेकून दिलें. नंतर पाण्डव भुयारांतून बाहेर जात असतां तिथें नसणारी हवा, एक प्रकारचें भय व गोंधळ, आणि डोळ्यावर आलेली निद्रेची झांपड यामुळें सर्वांचा जीव घाबरा झाला. भीमानेंच त्या वेळीं सर्वांना अंगावर घेऊन वेगानें त्यांना भुयाराच्या पार करून दिलें. महाभारतकार म्हणतात :—

**भीमसेनस्तु राजेन्द्र भीमवेगपराक्रमः ।**
**जगाम भ्रातॄनादाय सर्वान्मातरमेव च ।। २०**
**स्कन्धमारोप्य जननीं यमावङ्केन वीर्यवान् ।**
**पार्थौ गृहीत्वा पाणिभ्यां भ्रातरौ सुमहाबलः ।। २१**
**उरसा पादपान्भञ्जन् महीं पद्भ्यां विदारयन् ।**
**स जगामाशु तेजस्वी वातरंहा वृकोदरः ।। २२**

—महाभारत, आदिपर्व अ. १४८

''हे राजेन्द्रा, भयंकर वेग व पराक्रम असलेल्या भीमसेनानें आईला व बन्धूंना घेऊन प्रयाण केलें. त्यानें आपल्या खांद्यावर

कुन्तीला घेतलें. नकुलसहदेवांना कमरेवर घेऊन व युधिष्ठिर आणि अर्जुन ह्यांना हातावर घेऊन तो भुयाराच्या बाहेर आला व वेगानें मार्ग आक्रमण करूं लागला. त्याचें जमिनीवर वेगानें पडणारें पाऊल जणूं कांहीं पृथ्वी विदीर्ण करीत होतें. मार्गातील वृक्षांना छातीचीच धडक देऊन तो भुईसपाट करीत होता. ह्याप्रमाणें तेजस्वी भीमसेन वाऱ्याप्रमाणें वेग धारण करून वनांतून जाऊं लागला." भीमाच्या ह्या वेळच्या गतीचें महाभारतांत अत्यंत काव्यमय वर्णन केलें असून कितीही श्रम केले तरी न थकण्याच्या त्याच्या सामर्थ्याचेंही सुंदर वर्णन केलें आहे. महाभारतकार म्हणतात :—

तेन विक्रममाणेन ऊरुवेगसमीरितम् ।
वनं सवृक्षविटपं व्याघूर्णितमिवाभवत् ।। १
जङ्घावातो ववौ चास्य शुचिशुक्रागमे यथा ।
आवर्जितलतावृक्षं मार्गं चक्रे महाबलः ।। २
समृद्गन्पुष्पितांश्चैव फलितांश्च वनस्पतीन् ।
अवरुज्य ययौ गुल्मान् पथस्तस्य समीपजान् ।। ३
स रोषित इव क्रुद्धो वने भञ्जन्महाद्रुमान् ।
त्रिःप्रस्रुतमदः शुष्मी षष्टिवर्षी मतङ्गराट् ।। ४
गच्छतस्तस्य वेगेन तार्क्ष्यमारुतरंहसः ।
भीमस्य पाण्डुपुत्राणां मूर्च्छेव समजायत ।। ५
ते श्रमेण च कौरव्यास्तृष्णया च प्रपीडिताः ।
नाशक्नुवंस्तदा गन्तुं निद्रया च प्रवृद्धया ।। ११
न्यविशन्त हि ते सर्वे निरास्वादे महावने ।
ततस्तृषा परिक्लान्ता कुन्ती पुत्रानथाब्रवीत् ।। १२
माता सती पाण्डवानां पञ्चानां मध्यत. स्थिता ।
तृष्णया हि परीतास्मि पुत्रान्भृशमथाब्रवीत् ।। १३
तच्छ्रुत्वा भीमसेनस्य मातृस्नेहात्प्रजल्पितम् ।
कारुण्येन मनस्तप्तं गमनायोपचक्रमे ।। १४
ततो भीमो वनं घोरं प्रविश्य विजनं महत् ।
न्यग्रोधं विपुलच्छायं रमणीयं ददर्श ह ।। १५
तत्र निक्षिप्य तान् सर्वानुवाच भरतर्षभः ।
पानीयं मृगयामीह विश्रमध्वमिति प्रभो ।। १६

एते रुवन्ति मधुरं सारसा जलचारिणः ।
ध्रुवमत्र जलस्थानं महच्चेति मतिर्मम ।। १७
अनुज्ञातः स गच्छेति भ्रात्रा ज्येष्ठेन भारत ।
जगाम तत्र यत्र स्म सारसा चलचारिणः ।। १८
स तत्र पीत्वा पानीयं स्नात्वा च भरतर्षभ ।
तेषामर्थे च जग्राह भ्रातॄणां भ्रातृवत्सलः ।। १९
उत्तरीयेण पानीयमानयामास भारत ।
गव्यूतिमात्रादागत्य त्वरितो मातरं प्रति ।।
शोकदुःखपरीतात्मा निशश्वासोरगो यथा ।। २०

—महाभारत, आदिपर्व अध्याय १५१

"पराक्रमी भीमसेन वेगानें जात असतां त्याच्या मांड्यांच्या विलक्षण वेगामुळें वृक्षांनीं भरलेलें संपूर्ण वन मथित झालें. ज्येष्ठ व आषाढामध्यें वाहणाऱ्या सोसाट्याच्या वाऱ्यानें ज्याप्रमाणें वृक्ष व लता उन्मळून पडून भुईसपाट होतात, तीच वनाची अवस्था भीमसेनाच्या चरणवेगानें उत्पन्न झालेल्या वाऱ्यानें साऱ्या वनाची त्या वेळीं करून टाकली. फुलाफळांनीं बहरलेल्या लता व झाडें आपल्या पायांनीं रगडीत व लतांचीं जाळीं तुडवीत तो जात होता. पूर्ण तारुण्यांत आलेला गंडस्थलांतून मदस्राव होत असलेला, व लोकांनीं चिडविल्यामुळें क्रुद्ध झालेला गजराज ज्याप्रमाणें मार्गांतील वृक्षांना तुडवीत जातो, त्याचप्रमाणें भीमसेन जात होता. गरुड व वायु यांच्याप्रमाणें वेग असलेल्या भीमाच्या त्या चालण्यानें त्याच्या शरीरावर असलेल्या त्याच्या बंधूंना मूर्च्छा येऊं लागली. शरीराला बसणाऱ्या हिसक्यामुळें पाण्डव थकून गेले. तहान लागून पुढें जाण्याची शक्ति त्यांच्यांत उरली नाहीं. डोळ्यावर झोपही खूपच आली. अशा स्थितींत कुंती तहानेनें व्याकूळ होऊन आपल्या पुत्रांना असें म्हणूं लागली कीं, पांच पुत्रांची आई असलेल्या मला कुणीं पाणी देऊं शकणार नाहीं काय ? तिचें तें करुणाजनक भाषण ऐकून भीमानें एका विशाल वटवृक्षाच्या छायेखालीं त्या सर्वांना विश्रांति घ्यावयास सांगितलें व इतके अपार परिश्रम करूनही मुळींच न थकलेला तो पाण्याच्या शोधार्थ निघाला. सरोवराजवळ येऊन त्यानें पोटभर जल प्राशन केलें व स्नान करून आपल्या बंधूंच्यासाठीं व आईसाठीं

पाणी न्यावयाचा तो विचार करूं लागला. पाणी न्यावयास भांडें कुठचें असणार ? शेवटीं आपल्या अंगावरील जाड उत्तरीय वस्त्रच त्यानें भिजविलें. पाण्डव जेथें पडले होते त्या ठिकाणाहून हें सरोवर दोन कोस लांब होतें. हें थबथबतें जाड वस्त्र तेवढ्या अंतरावरून त्वरित गतीनें घेऊन तो आपल्या आईजवळ आला. शोक व दु:खानें त्याचें अंत:करण भरून गेलें होतें व एकाद्या भयानक सर्पाप्रमाणें तो श्वास टाकीत होता." जवळ येतांच माता व बंधु यांना थकल्यामुळें झोप लागली असल्याचें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें. त्यांची निद्रा भंग पावूं नये म्हणून तो जवळच्याच एका शिलाखंडावर स्वस्थपणें बसला. ज्या अरण्यांत पांडव होते तें एका हिडिम्ब नांवाच्या मनुष्य-भक्षक, क्रूर व बलवान् राक्षसाचें अरण्य होतें. त्याला मनुष्याचा वास येतांच कोण माणसें आपल्या अरण्यांत आलीं आहेत तें पाहण्यासाठीं त्यानें आपल्या बहीण हिडिम्बेला पाठविलें. मनुष्यरक्ताची व मांसाची चिरेप्सित मेजवानी आपल्याला मिळेल या कल्पनेनें तो हर्षभरित झाला होता. माणसें दृष्टीस पडतांच त्यांना आपण कसें खाऊं व त्यांचें रक्त कसें पिऊं याचें तो आपल्या बहिणीला वर्णन ऐकवूं लागला. त्याच्याच शीलाची त्याची ती बहीण आपल्या बंधूच्या आज्ञेनुसार जी निघाली ती पांडव होते तेथें येतांच भीमसेनाचें सौंदर्य व सुदृढ शरीर पाहून त्याच्यावर लुब्ध झाली. कामविकार काय करणार नाहीं ? त्या भक्षक आपत्तीचें संरक्षक देवतेंत रूपांतर होऊन ती भीमसेनाला आगामी संकटाची सूचना देऊन स्वत:बरोबर येण्याची अभ्यर्थना करूं लागली. पण त्यानें आपल्या बंधूंना व मातेला सोडून येण्याचें नाकारलें. त्याबरोबर त्यांना जागृत करून बरोबर घेऊन चलावें असें हिडिम्बेनें सुचविलें. पण आत्मप्रत्ययपूर्ण व निर्भय भीमानें सुखानें झोपलेल्या कुंतीला व पांडवांना उठविण्याचें साफ नाकारलें. तो त्या राक्षसीलाच उलटा धीर देऊन असें म्हणूं लागला कीं:—

**माभैस्त्वं पृथुसुश्रोणि नैव कश्चिन्मयि स्थिते ।**
**अहमेनं हनिष्यामि प्रेक्षन्त्यास्ते सुमध्यमे ।। ७**

**नायं प्रतिबलो भीरु राक्षसापसदो मम ।**
**सोढुं युधि परिस्पन्दमथवा सर्वराक्षसाः ।। ८**
**पश्य बाहू सुवृत्तौ मे हस्तिहस्तनिभाविमौ ।**
**ऊरू परिघसंकाशौ संहतं चाप्युरो महत् ।। ९**
**विक्रमं मे यथेन्द्रस्य साऽद्य द्रक्ष्यसि शोभने ।**
**मावमंस्थाः पृथुश्रोणि मत्वा मामिह मानुषम् ।। १०**

--महाभारत, आदिपर्व अध्याय १५३

"हे सुन्दरी, तूं मुळींच भिऊं नकोस. माझ्यासमोर तुझा भाऊ कःपदार्थ आहे. तुझ्या दृष्टीसमोर मी त्याला पाहतां पाहतां ठार मारीन. तो राक्षसाधम माझा प्रतिपक्षी होण्याच्या देखील योग्यतेचा नाहीं. तोच काय, कोणताही राक्षस माझ्यासमोर क्षणमात्रही टिकावयाचा नाहीं. माझे हे हत्तीच्या सोंडेप्रमाणें पुष्ट असलेले बाहू पाहा. परिघाप्रमाणें असलेले माझे हे ऊरू व माझी भरदार छाती पहा. मला सामान्य मनुष्य समजून तूं माझ्या सामर्थ्याची कल्पना करूं नकोस. महेन्द्राप्रमाणें माझा पराक्रम आहे." याप्रमाणें त्या दोघांचा संवाद चालू असतां अजून आपली बहीण कां येत नाहीं म्हणून विचारांत पडलेला हिंडिब तेथें आला. आपली बहीण आपलें भक्ष्य असलेल्या मनुष्यावर लुब्ध झालेली पाहून त्याला अतोनात संताप चढला व प्रथम तो तिच्याच अंगावर धांवून जाऊं लागला. भीमानें त्याला आपल्या अंगावर घेतलें तेव्हां त्या नर-राक्षसांचें भीषण द्वंद्वयुद्ध झालें. थोडयाच वेळांत भीमसेनानें आपली माता व बंधु यांच्या समक्ष त्याला जमिनीवर रगडून यज्ञीय पशूला बुकलून ठार मारावें त्याप्रमाणें त्याला ठार मारलें. भीमसेनाच्या या भीम पराक्रमापासूनच कुंती व युधिष्ठिर यांना त्याच्या अचाट सामर्थ्याची खरी ओळख पटलेली आहे. पुढें अनुरक्त हिंडिबेचा त्यानें कुंती व युधिष्ठिर यांच्या अनुज्ञेनें स्वीकार केला. पुढें भगवान् श्रीकृष्णांच्या एका महान् योजनेंतील महत्त्वाचा कीलक ठरलेला घटोत्कच हा भीमसेनाला हिंडिबेपासून झालेला पुत्र होय. यानंतर एकचक्रा नगरींतील पांडवांच्या निवासांत कुंतीच्या आज्ञेवरून बकासुराचा वध करून भीमसेनानें तें सर्व वन व त्याच्या

आसमंतांतील प्रदेश नरमांसभक्षकांपासून सदाचा मुक्त केला मर्यादापुरुषोत्तम भगवान् श्रीरामचंद्रांनीं आपल्या दंडकारण्यांतील निवासांत नरमांसभक्षकांच्या आक्रमणाच्या भयापासून प्रदेश निर्भय करण्याचें जें महनीय कार्य केलें तेंच कार्य महापराक्रमी भीमसेनानें आपल्या या अल्पकालीन विजनवासांत पार पाडलें आहे. हिडिंब, बक व किर्मीर या सामर्थ्यशाली राक्षसांचा वध करणें हें भीमसेनाच्या अति मानवी सामर्थ्याचें द्योतक आहे. या महान् राक्षसी शक्तींशीं धडक देऊन त्यानें त्यांना नष्ट केल्यापासून त्याच्या सुहृदांचा व भगवान् श्रीकृष्णांचाही त्याच्या सामर्थ्याविषयींचा आत्मप्रत्यय इतका वाढलेला आहे कीं जरासंधाला ठार मारण्याच्या धर्मसंस्थापनेच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाच्या असलेल्या कार्यांत त्यांनीं भीमाच्या सामर्थ्याचेंच अमोघ साधन वापरलेलें आहे. मगध सम्राट जरासंध ही एक अति प्रचंड शक्ति असून अनियंत्रित व निरंकुश सत्तेचा उपभोग घेऊं इच्छिणारे तत्कालीन सारें धर्मद्रोही भारतीय राजमंडळ त्याच्या नेतृत्वाखालीं संघटित झालें आहे. या संघटनेचें व तिचा नेता जो जरासंध याचें सामर्थ्य इतकें प्रभावशाली होतें कीं अठरा वेळ त्या सामर्थ्याशीं धडक देऊनही उघडचा मैदानांत भगवान् श्रीकृष्णांना तें नष्ट करतां आलें नाहीं. इतकेंच नव्हे तर स्वतःच्या राज्यांतील नागर जीवनाला या आक्रमणकारी सामर्थ्याची सतत बाधा होऊन तें उत्सन्न होऊं नये म्हणून मथुरेच्या परिसराचा परित्याग करून द्वारकेच्या समुद्रवलयांकित दुर्गांत येऊन राहणें त्यांना भाग पडलें. हा संघटित भारतीय राजसंघ फोडण्याचें भगवान् श्रीकृष्णांनीं अनेक प्रयत्न केले. पण ते सारे व्यर्थ ठरले. त्यांच्याशीं विवाहबंधनाच्या मधुर व नाजुक नात्यानें संबद्ध झालेले लोक देखील युद्धाचा प्रसंग उद्भवतांच जरासंधाच्या नेतृत्वाखालीं त्याच्यावरच उठावयास सिद्ध होत. शेवटीं हा राजसंघ फोडावयाचा एकच मार्ग त्यांना दिसून आला व तो म्हणजे मगध सम्राटालाच ठार मारणें हा होय. एकदां सम्राट जरासंध मेला कीं या राजसंघांतील प्राण निघून जाऊन तो असंघटित व तेजोहीन होईल अशी त्यांची निश्चिति होती व पुढें तसेंच झालेंही. पण सम्राट् जरासंधाला

मारणार कोण ? त्याच्यावर ससैन्य आक्रमण करून त्याला सरळ मारतां येणें किती अशक्य आहे याचा प्रत्यय स्वत: श्रीकृष्णांना अठरा वेळ आलेला असल्यामुळें त्याच्या वधासाठीं उघडया रणाची रीत सोडून दुसऱ्याच मार्गाचा अवलंब करणें भाग होतें. जेथें सरळ नीतीनें महनीय कार्याचा विनाश होतो तेथें कूट नीतीचें अवलंबन हेंच आवश्यक ठरतें. तत्कालीन क्षत्रियांच्यामध्यें द्वंद्वयुद्धाचा एक नियम प्रचलित होता. त्याचें वैशिष्टच असें असे कीं जे दोन गृहस्थ एकमेकांस आव्हान देऊन द्वंद्वयुद्धासाठीं प्रवृत्त होतील त्यांच्या त्या युद्धांत तिसऱ्या कुणीही काय वाटेल तो परिणाम झाला तरी भाग घ्यावयाचा नसे. जरासंधाला जर द्वंद्वयुद्धांत एकटयाला गांठून आव्हान देतां आलें तर त्याला साह्यहीन अवस्थेंत ठार मारतां येईल असें त्यांच्या मनानें घेतलें. द्वंद्वयुद्धांत जरासंधाला एकटया भीमावांचून दुसरा कोणीही ठार मारूं शकणार नाहीं अशी त्यांची खात्री होती. ते युधिष्ठिराला म्हणतात :--

**मयि नीतिर्बलं भीमे रक्षिता चावयोर्जयः ।**
**मागधं साधयिष्याम इष्टिं त्रय इवाग्नयः ।। ३**
**त्रिभिरासादितोऽस्माभिर्विजने स नराधिपः ।**
**न संदेहो यथा युद्धमेकेनाप्युपयास्यति ।। ४**
**अवमानाच्च लोभाच्च बाहुवीर्याच्च दर्पितः ।**
**भीमसेनेन युद्धाय ध्रुवमप्युपयास्यति ।। ५**
**अलं तस्य महाबाहुर्भीमसेनो महाबलः ।**
**लोकस्य समुदीर्णस्य निधनायान्तको यथा ।। ६**

--महाभारत, सभापर्व अध्याय २०

"माझ्या ठिकाणीं नीति, भीमाच्या ठिकाणीं बल, व अर्जुन आम्हां तिघांचाही संरक्षणकर्ता अशा व्यवस्थेनें आम्ही जाऊं व जरासंधाला ठार मारूं. तीन अग्नींनीं ज्याप्रमाणें इष्टि साधली जाते त्याप्रमाणेंच आम्ही तिघे मिळून संकल्पित कार्यभाग साधूं. आम्ही तिघांनीं एकांतांत त्याला गांठल्यावर तो द्वंद्वयुद्धासाठीं सिद्ध होईल यांत मला संशय नाहीं. द्वंद्वयुद्ध नाकारण्यांत त्याला अपमान वाटेल. नवा विजय संपादन करण्याचा लोभ त्याला मुळींच सोड-

वणार नाहीं व स्वतःच्या बाहुवीर्याचा विलक्षण गर्व असल्यामुळें आपला पराजय होण्याची शक्यता देखील त्याला वाटणार नाहीं. उफाळलेल्या लोकांना अंतक ज्याप्रमाणें ठार मारतो त्याप्रमाणें भीम मात्र जरासंधाला ठार मारील यांत मला संशय नाहीं."

भगवान् श्रीकृष्णांच्या इच्छेनुरूप भीमसेन व अर्जुन त्यांच्याबरोबर मगधांच्या राजधानींत गेले. तेथें त्यांनीं राजा जरासंधाची एकांतांत गांठ घेऊन त्यास द्वंद्वयुद्धार्थ आव्हान केलें. श्रीकृष्णांच्या कल्पनेनुरूप जरासंधानें हें आव्हान स्वीकारलें व अहोरात्र चौदा दिवस भीमानें त्याच्याशीं मल्लयुद्ध करून त्याला ठार मारलें. भक्तिमार्गीय भागवतकारांनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं, या युद्धांत भीमसेन थकल्यामुळें त्यानें भगवान् श्रीकृष्णांना शरण जाऊन जरासंधाला मारण्याची युक्ति विचारली व जें कार्य बलानें पार पाडण्यासारखें नव्हतें तें त्यानें युक्तीनें पार पाडलें. पण महाभारतांत याला कुठेंही आधार नाहीं. सामर्थ्यशाली भीमसेनानें आपल्या स्वतःच्या विशिष्ट युद्धपद्धतीनें व महान् सामर्थ्यानेंच त्याला ठार मारलें आहे. महाभारतकार म्हणतात :–

**यत्ते दैवं परं सत्त्वं यच्च ते मातरिश्वनः ।**
**बलं भीम जरासंधे दर्शयाशु तदद्य वै ।। ४**
**एवमुक्तस्तदा भीमो जरासंधमरिंदमः ।**
**उत्क्षिप्य भ्रामयामास बलवन्तं महाबलः ।। ५**
**भ्रामयित्वा शतगुणं जानुभ्यां भरतर्षभ ।**
**बभञ्ज पृष्ठं संक्षिप्य निष्पिष्य विननाद च ।। ६**
**करे गृहीत्वा चरणं द्वेधा चक्रे महाबलः ।। ७**
**तस्य निष्पिष्यमाणस्य पाण्डवस्य च गर्जतः ।**
**अभवत्तुमुलो नादः सर्वप्राणिभयंकरः ।। ८**
**वित्रेसुर्मागधाः सर्वे स्त्रीणां गर्भाश्च सुस्रुवुः ।**
**भीमसेनस्य नादेन जरासंधस्य चैव ह ।। ९**

––महाभारत, सभापर्व अध्याय २४

भगवान् श्रीकृष्ण भीमसेनाला म्हणाले कीं, "तुझ्या ठिकाणीं जें श्रेष्ठ दैवी सामर्थ्य आहे व वायूपासून जें अपार बल तुला प्राप्त

झालें आहे त्याचा या जरासंधावर उपयोग कर. हें ऐकतांच महाबलवान् भीमसेनानें बलवान् जरासंधाला मांड्या धरून एकदम वर उचललें व शंभर वेळां गरगरां फिरवून जमिनीवर आपटलें. त्याच्या पाठीचा कणा त्यानें रगडून मोडून टाकला, जोरानें गर्जना केली व नंतर त्यानें आपल्या हातानें त्याचा पाय मोडून त्याला मधून फाडलें व त्याचे दोन तुकडे केले. रगडला जाणारा जरासंध मरणकाळच्या किंकाळ्यांनीं किंचाळत होता तर विजयोन्मादी भीमसेन जोरजोरानें गर्जना करीत होता. त्या दोघांचा तो संमिश्र नाद आसमंतांतील सर्व प्राण्यांना अत्यंत भयंकर वाटत होता. भीम व जरासंध यांच्या त्या गर्जनांनीं मगधांतील सर्व लोक त्रासून गेले व स्त्रियांचे गर्भपात झाले. भीमसेनाच्या जरासंधवधाच्या ह्या अपूर्व पराक्रमानें भारतांतील सर्व राजमंडळ थरकांपून उठलें व राजा युधिष्ठिराचा राजसूय यज्ञ शक्य कोटींत आला. केवळ भीमसेनाच्या ह्या महान् पराक्रमामुळें त्याच्या कीर्तीनें दिक्कोन गर्जून उठले व त्याच्याशीं जन्मभर वैर करणाऱ्या व त्याच्या विनाशाची चिंता वाहणाऱ्या धृतराष्ट्रप्रमुख कौरवांना त्याचा व त्यामुळें पांडवांच्या सत्तेचा विलक्षण धाक बसला. जरासंधाचा अंतक भीमसेन कोणालाही जिंकतां येणें केवळ अशक्य आहे अशी धृतराष्ट्राची सदाची समजूत होती. किंबहुना भीमसेनाचा धाक धृतराष्ट्राच्या अंतःकरणांत इतका विलक्षण बसला होता कीं, पांडव अज्ञातवासांतून प्रकट झाल्याचें कळतांच जरासंधाच्या मरणकाळच्या किंकाळ्या व रक्ताच्या थारोळ्यांत पडलेले त्याच्या देहाचे दोन तुकडे त्याच्या अंतश्चक्षूंसमोर सारखे नाचूं लागून त्याला झोप घेणें अशक्य होऊन बसलें. तो संजयाला म्हणतोः—

**सर्व एते महोत्साहा य त्वया परिकीर्तिताः ।**
**एकतस्त्वेव ते सर्वे समेता भीम एकतः ॥ १**
**भीमसेनाद्धि मे भूयो भयं संजायते महत् ।**
**क्रुद्धादमर्षणात्तात व्याघ्रादिव महारुरोः ॥ २**
**जागर्मि रात्रयः सर्वा दीर्घमुष्णं च निःश्वसन् ।**
**भीतो वृकोदरात्तात सिंहात् पशुरिवापरः ॥ ३**

न हि तस्य महाबाहोः शक्रप्रतिमतेजसः ।
सैन्येऽस्मिन् प्रतिपश्यामि य एनं विषहेद्युधि ॥ ४
अमर्षणश्च कौन्तेयो दृढवैरश्च पाण्डवः ।
अनर्महासी सोन्मादस्तिर्यक्प्रेक्षी महास्वनः ॥ ५
महावेगो महोत्साहो महाबाहुर्महाबलः ।
मन्दानां मम पुत्राणां युद्धेनान्तं करिष्यति ॥ ६
उरुग्राहगृहीतानां गदां बिभ्रद्वृकोदरः ।
कुरूणामृषभो युद्धे दण्डपाणिरिवान्तकः ॥ ७
अष्टास्रिमायसीं घोरां गदां कांचनभूषणाम् ।
मनसाऽहं प्रपश्यामि ब्रह्मदण्डमिवोद्यतम् ॥ ८
यथा मृगाणां यूथेषु सिंहो जातबलश्चरेत् ।
मामकेषु तथा भीमो बलेषु विचरिष्यति ॥ ९
सर्वेषां मम पुत्राणां स एकः क्रूरविक्रमः ।
बह्वाशी विप्रतीपश्च बाल्येऽपि रभसः सदा ॥ १०
उद्वेपते मे हृदयं ये मे दुर्योधनादयः ।
बाल्येऽपि तेन युध्यन्तो वारणेनेव मर्दिताः ॥ ११
तस्य वीर्येण संक्लिष्टा नित्यमेव सुता मम ।
स एव हेतुर्भेदस्य भीमो भीमपराक्रमः ॥ १२
ग्रसमानमनीकानि नरवारणवाजिनाम् ।
पश्यामीवाग्रतो भीमं क्रोधमूर्छितमाहवे ॥ १३
अस्त्रे द्रोणार्जुनसमं वायुवेगसमं जवे ।
महेश्वरसमं क्रोधे को हन्याद् भीममाहवे ॥ १४
संजयाचक्ष्व मे शूरं भीमसेनममर्षणम् ।
अतिलाभं तु मन्येऽहं यत्तेन रिपुघातिना ॥ १५
तदैव न हताः सर्वे पुत्रा मम मनस्विना ।
येन भीमबला यक्षा राक्षसाश्च पुरा हताः ॥ १६
कथं तस्य रणे वेगं मानुषः प्रसहिष्यति ।
न स जातु वशे तस्थौ मम बाल्येऽपि संजय ॥ १७
किं पुनर्मम दुष्पुत्रैः क्लिष्टः सम्प्रति पाण्डवः ।
निष्ठुरो रोषणोऽत्यर्थं भज्येतापि न संनमेत् ।
तिर्यक्प्रेक्षी संहतभ्रूः कथं शाम्येद् वृकोदरः ॥ १८
शूरस्तथाऽप्रतिबलो गौरस्ताल इवोन्नतः ।
प्रमाणतो भीमसेनः प्रादेशेनाधिकोऽर्जुनात् ॥ १९

जवेन वाजिनोऽत्येति बलेनात्येति कुंजरान् ।
अव्यक्तजल्पी मध्वक्षो मध्यमः पाण्डवो बली ।। २०
इति बाल्ये श्रुतः पूर्वं मया व्यासमुखात्पुरा ।
रूपतो वीर्यतश्चैव याथातथ्येन पाण्डवः ।। २१
आयसेन स दण्डेन रथान्नागान्नरान् हयान् ।
हनिष्यति रणे क्रुद्धो रौद्रः क्रूरपराक्रमः ।। २२
अमर्षी नित्यसंरब्धो भीमः प्रहरतां वरः ।
मया तात प्रतीपानि कुर्वन् पूर्वं विमानितः ।। २३
निष्कर्णामायसीं स्थूलां सुपार्श्वां काञ्चनीं गदाम् ।
शतघ्नीं शतनिर्ह्रादां कथं शक्ष्यन्ति मे सुताः ।। २४
अपारमप्लवागाधं समुद्रं शरवेधनम् ।
भीमसेनमयं दुर्गं तात मन्दास्तितीर्षवः ।। २५
क्रोशतो मे न शृण्वन्ति बालाः पण्डितमानिनः ।
विषमं न हि मन्यन्ते प्रपातं मधुदर्शिनः ।। २६
संयुगं ये गमिष्यन्ति नररूपेण मृत्युना ।
नियतं चोदिता धात्रा सिंहेनेव महामृगाः ।। २७
शैक्यां तात चतुष्किष्कुं षडस्त्रिममितौजसम् ।
प्रहितां दुःखसंस्पर्शां कथं शक्ष्यन्ति मे सुताः ।। २८
गदां भ्रामयतस्तस्य भिन्दतो हस्तिमस्तकान् ।
सृक्किणी लेलिहानस्य बाष्पमुत्सृजतो मुहुः ।। २९
उद्दिश्य नागान् पततः कुर्वतो भैरवान् रवान् ।
प्रतीपं पततो मत्तान् कुंजरान् प्रतिगर्जतः ।। ३०
विगाह्य रथमार्गेषु वरानुद्दिश्य निघ्नतः ।
अग्नेः प्रज्वलितस्येव अपि मुच्येत मे प्रजा ।। ३१
वीथीं कुर्वन् महाबाहुर्द्रावयन् मम वाहिनीम् ।
नृत्यन्निव गदापाणिर्युगान्तं दर्शयिष्यति ।। ३२
प्रभिन्न इव मातङ्गः प्रभंजन् पुष्पितान् द्रुमान् ।
प्रवेक्ष्यति रणे सेनां पुत्राणां मे वृकोदरः ।। ३३
कुर्वन्रथान्विपुरुषान्विसारथिहयध्वजान् ।
आरुजन् पुरुषव्याघ्रो रथिनः सादिनस्तथा ।। ३४
गङ्गावेग इवानूपांस्तीरजान् विविधान् द्रुमान् ।
प्रभङ्क्ष्यति रणे सेनां पुत्राणां मम संजय ।। ३५

दिशो नूनं गमिष्यन्ति भीमसेनभयार्दिताः ।
मम पुत्राश्च भृत्याश्च राजानश्चैव संजय ।। ३६
येन राजा महावीर्यः प्रविश्यान्तःपुरं पुरा ।
वासुदेवसहायेन जरासन्धो निपातितः ।। ३७
कृत्स्नेयं पृथिवी देवी जरासन्धेन धीमता ।
मागधेन्द्रेण बलिना वशे कृत्वा प्रतापिता ।। ३८
भीष्मप्रतापात् कुरवो नयेनान्धकवृष्णयः ।
यत्र तस्य वशे जग्मुः केवलं दैवमेव तत् ।। ३९
स गत्वा पाण्डुपुत्रेण तरसा बाहुशालिना ।
अनायुधेन वीरेण निहतः किं ततोऽधिकम् ।। ४०
दीर्घकालसमासक्तं विषमाशीविषो यथा ।
स मोक्ष्यति रणे तेजः पुत्रेषु मम संजय ।। ४१
महेन्द्र इव वज्रेण दानवान् देवसत्तमः ।
भीमसेनो गदापाणिः सूदयिष्यति मे सुतान् ।। ४२
अविषह्यमनावार्यं तीव्रवेगपराक्रमम् ।
पश्यामीवातिताम्राक्षमापतन्तं वृकोदरम् ।। ४३
अगदस्याप्यधनुषो विरथस्य विवर्मणः ।
बाहुभ्यां युध्यमानस्य कस्तिष्ठेदग्रतः पुमान् ।। ४४
भीष्मो द्रोणश्च विप्रोऽयं कृपः शारद्वतस्तथा ।
जानन्त्येते यथैवाहं वीर्यज्ञस्तस्य धीमतः ।। ४५

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ५१

"तूं सांगितलेले हे सर्व वीर एका बाजूला व एकटा भीम एका बाजूला अशी स्थिति आहे. सहनशीलता मुळींच अंगीं नसलेल्या व अत्यंत क्रुद्ध झालेल्या भीमसेनाचें मला मोठें भय वाटतें. एकाद्या मोठ्या हरिणाला वाघाचें वाटावें तसेंच मला भीमसेनाचें भय वाटतें. सिंहाला पाहून पशु भितात तसा मी भीमाला भितों. त्याच्या भयानें दीर्घ व उष्ण निःश्वास सोडून सारी रात्र मी जागून काढतों. इंद्राप्रमाणें अत्यंत तेजस्वी असलेल्या महाबाहु भीमसेनाला समरांगणांत सहन करूं शकेल असा सैन्यांत मला कुणीही दिसत नाहीं. त्याच्यांत सहन-शीलता मुळींच नसून मूळचाच तो अत्यंत रागीट आहे. आमच्याशीं त्याचें दृढस्वरूपाचें वैर आहे. थट्टेंत देखील न हंसणारा, उन्मादी,

वाकडचा दृष्टीनें पाहणारा, आवाज मोठा असलेला, वेगवान्, अतिरिक्त उत्साही, आजानुबाहु व महाबलवान् भीमसेन, माझ्या मूर्ख पुत्रांना युद्धांत ठार मारल्यावांचून राहणार नाहीं. गदा हातांत घेऊन दण्डपाणि अन्तकाप्रमाणें दिसणारा भीमसेन मोठमोठ्या पराक्रमी लोकांचा अन्त करील. आपली सोन्याचें काम केलेली पोलादी घोर गदा ब्रह्मदण्डाप्रमाणें उगारलेला भीम माझ्या डोळ्यासमोर दिसतो. ज्याप्रमाणें बलिष्ठ सिंह हरिणांच्या कळपांत संचार करतो, त्याप्रमाणें माझ्या सैन्यांत भीम संचार करील. तो खादाड, लहानपणापासूनच माझ्या पोरांशीं वाकडें असलेला, क्रूर व पराक्रमी भीमसेन एकटाच माझ्या सर्व पुत्रांचा अन्त करील. लहानपणींच एकाद्या मस्त हत्तीप्रमाणें त्यानें रणांत माझ्या पुत्रांचें मर्दन केलें आहे. त्यामुळें माझ्या दुर्योधनादिक पुत्रांची काय गति होईल याची कल्पना करतांच माझें अंतःकरण थरकांपतें. भीमपराक्रमी भीमसेन हाच साऱ्या भांडणाचा मूळ हेतु आहे. क्रोधानें उन्मत्त होऊन सैन्यांतील पदाति, घोडेस्वार व हत्तींचें सैन्य मर्दन करीत असलेला भीम जणू कीं कांहीं माझ्या डोळ्यासमोर उभा असलेला मला दिसतो. अस्त्रविद्येंत द्रोणार्जुनांप्रमाणें असलेला, वायूप्रमाणें वेगवान् व महेश्वराप्रमाणें ज्याचा क्रोध भयानक आहे अशा भीमाला युद्धांत कोण मारूं शकेल? संजया, रागीट भीमसेन काय म्हणाला तें मला सांग. माझ्या मुलांनीं अपराध केला तेव्हांच मनस्वी भीमसेनानें त्यांना ठार मारलें नाहीं हें मी माझें भाग्य समजतों. भीमपराक्रमी यक्ष व राक्षस ज्यानें ठार मारून टाकले, त्याचें रणांतील आक्रमण मनुष्य कसें सहन करूं शकेल? लहानपणीं देखील माझें नियंत्रण त्यानें कधींही जुमानलें नाहीं. मग माझ्या दुष्ट पुत्रांनीं इतके दिवस त्याचा अतोनात छळ केल्यावर तो कधीं ऐकेल काय? तो अत्यंत निष्ठुर, अतिशय रागीट, मोडेल पण वाकणार नाहीं अशा स्वभावाचा व भिवया आकुंचित करून नेहमीं वाकडें पाहणारा भीमसेन शांत राहणें कसें शक्य आहे? तो अत्यंत शूर असून त्याला प्रतियोद्धा कुणी नाहीं. गौर वर्णाचा, तालवृक्षाप्रमाणें उंच, अर्जुनापेक्षां अधिक धिप्पाड व बलवान् असणारा भीमसेन आरक्त नेत्रांचा असून त्याचे

शब्दोच्चार अस्पष्ट असतात, असें त्याच्या रूपाचें व पराक्रमाचें वर्णन त्याच्या लहानपणींच व्यासांच्या तोंडून मीं ऐकलें आहे. भयंकर पराक्रम करणारा व क्रूर स्वभावाचा भीम रणांत क्रोधानें पोलादी कांब हातांत घेऊन चतुरंग सैन्याचा नाश करील. आधींच तो रागीट, एकदम क्षुब्ध होणारा असा असून मीं त्याचा अपमान करून त्याचें पुष्कळच वाईट केलें आहे. मला अप्रिय वाटणाऱ्या गोष्टी तो करी म्हणून मीं त्याचा अवमान केला. आतां तो आपली सरळ, सोनेरी काम केलेली, वज्राप्रमाणें भयंकर व एकाच घावांत शंभर शंभर वीरांना जागच्या जागीं लोळविणारी गदा हातांत घेऊन माझ्या मुलांवर जेव्हां भयंकर आघात करील तेव्हां माझीं मुलें तो आघात कसा सहन करूं शकतील. अपार, नाव नसलेला, अगाध व बाणांनीं भरलेला असा भीमसेनरूपी दुर्गम सागर तरून जाण्याची इच्छा करणारीं माझीं मुलें मूर्खच म्हटलीं पाहिजेत. स्वतःला पंडित समजणारीं माझीं मुलें मी त्यांच्या कानींकपाळीं ओरडत असतांना देखील ऐकत नाहींत. मृत्यु ओढवलेल्या लोकांना समोरचा खड्डा दिसत नाहीं. जे कोणी भीमाशीं प्रसंग आहे याची कल्पना असूनही रणांत जातील ते मृगांना सिंहाच्या जबडयांत ढकलावें त्याप्रमाणें परमेश्वरानेंच मनुष्यरूपी मृत्यूच्या जबडयांत ढकलले आहेत असें म्हटलें पाहिजे. ओठ चाटीत, डोळयांतून क्रोधानें अश्रू येत असलेल्या स्थितींत गदा फिरवीत हत्तींची गंडस्थळें फोडणाऱ्या, हत्तींचे चीत्कार ऐकून प्रचंड गर्जना करणाऱ्या, प्रज्वलित अग्नीप्रमाणें सैन्यांतून फिरत प्रमुख योद्धयांना ठार मारीत जाणाऱ्या भीमाच्या तावडींतून माझीं मुलें सुटूं शकतील काय ? गदा हातीं घेऊन भीषण ताण्डव करीत माझ्या सैन्याला विदारण करून रस्ता काढणारा भीमसेन युगांताचेंच स्मरण करून देईल. मदोन्मत्त हत्ती फुलांनीं बहरलेलीं झाडें ज्याप्रमाणें तुडवून काढतो त्याचप्रमाणें भीमसेन आमच्या सैन्याची अवस्था करून टाकील. आमच्या चतुरंग सैन्याचा पूर्ण विध्वंस करून, गंगाप्रवाह तीरावरील विविध वृक्षांची जी अवस्था करतो तीच भीम आमच्या सैन्याची अवस्था करील. भीमाच्या भयानें माझे पुत्र, सेवक व युद्धासाठीं आलेले सर्व राजे दशदिशांना

पळून जातील असें मला वाटतें. ज्यानें पूर्वी भगवान् श्रीकृष्णांच्या साहाय्यानें अंतःपुरांत प्रवेश करून महापराक्रमी राजा जरासंधाला ठार मारलें तो हा भीम होय. बुद्धिमान मगधसम्राट जरासंधानें ही संपूर्ण पृथ्वी जिंकून पीडित केली होती. राजनीतिज्ञतेमुळें यादव व भीष्मांच्या प्रतापामुळें कौरव त्याच्या स्वाधीन न होतां आपलें स्वातंत्र्य टिकून राहिलें हें केवळ दैवच होय. त्या महापराक्रमी जरासंधाला ज्यानें आयुधाला स्पर्शही न करतां केवळ बाहुबळानें ठार मारलें त्या पांडुपुत्र भीमाच्या योग्यतेचें काय वर्णन करावें ? पुष्कळ दिवस सांठविलेलें विष संधि सांपडतांच सर्प ज्याप्रमाणें सोडतो त्याचप्रमाणें आपला इतके दिवस आवरलेला क्रोध भीम आतां माझ्या पुत्रांवर टाकील. ज्याप्रमाणें महेंद्र दानवांना वज्रानें ठार मारतो त्याचप्रमाणें गदापाणि भीमसेन माझ्या पुत्रांना ठार मारील. भीमाचे ते भयानक आरक्त नेत्र माझ्या मनःचक्षूसमोर सदैव आहेत. गदा हातांत नसतां, धनुष्यही नसतां, विरथ व कवचाचे तुकडे उडालेल्या स्थितींत केवळ बाहूंनीं युद्ध करणाऱ्याही भीमसेनाच्या समोर उभे राहण्याची कुणाची छाती आहे ! भीष्म, द्रोण, कृपाचार्य व मी या चौघांनाही भीमाच्या पराक्रमाची पूर्णपणें कल्पना आहे." महापराक्रमी जरासंधाच्या वधानंतर धर्मराजांच्या राजसूय यज्ञासाठीं केलेल्या दिग्विजयांत भीमानें शिशुपालासारख्या दैवी सामर्थ्यसंपन्न व्यक्तीच्या अंतःकरणाचाही थरकांप उडविलेला असून कर्णासारख्या महाधनुर्धराचाही पराजय केलेला आहे. भीमाचे हे अतिमानवी पराक्रम ध्यानांत घेतले तर त्यानें कीचक, दुःशासनादि घुंगरट्यांना ठार मारलें या गोष्टीचा स्वतंत्रपणें उल्लेख देखील करण्याचें कारण उरत नाहीं.

## युयुत्सु प्रवृत्ति व दांडगा आत्मप्रत्यय

भीमाच्या प्रचंड सामर्थ्याला अनुरूप अशीच त्याची ययुत्सु प्रवृत्ति असन स्वतःच्या सामर्थ्याविषयींचा त्याचा आत्मप्रत्यय विलक्षण आहे. धर्मनिष्ठ महापराक्रमी पुरुषानें, पराक्रमानें मिळणारें सर्व वैभव मिळविलेंच पाहिजे व धर्माच्या विरुद्ध नसणारे सर्व उपभोग घेतलेच

पाहिजेत असें त्याचें मत असून अकारण त्याग व अकर्मण्यता यांचा त्याला अत्यंत तिटकारा वाटतो. क्षात्रधर्माचा त्याला अत्यंत अभिमान असून क्षत्रिय धर्मानुसार पराक्रम करून साऱ्या जगाचें अधिराज्य मिळवावें असें त्याला वाटतें. राजसूय यज्ञाच्या वाटाघाटीच्या वेळीं जरासंधाचा पराक्रम व त्याचें अजिक्यपण याचें भगवान् श्रीकृष्णांनीं वर्णन करतांच युधिष्ठिर राजसूय यज्ञाची कल्पनाच सोडून देऊन स्वस्थ बसावयाच्या गोष्टी बोलू लागले. त्या वेळीं भीम युधिष्ठिरांना म्हणतो :—

**अनारम्भपरो राजा वल्मीक इव सीदति ।**
**दुर्बलश्चानुपायेन बलिनं योऽधितिष्ठति ॥ ११**
**अतन्द्रितश्च प्रायेण दुर्बलो बलिनं रिपुम् ।**
**जयेत्सम्यक्प्रयोगेण नीत्यार्थानात्मनो हितान् ॥ १२**
**कृष्णे नयो मयि बलं जयः पार्थे धनञ्जये ।**
**मागधं साधयिष्याम इष्टिं त्रय इवाग्नयः ॥१३**

—महाभारत, सभापर्व अध्याय १५

कमालीचा अकर्मण्य अथवा स्वतः दुर्बल असून युक्तीचा अवलंब न करतां बलवंताशीं धडक देणारा राजा वारुळाप्रमाणें नष्ट होतो. अत्यंत दक्ष राहून, नीतीच्या कुशल प्रयोगानें लाभ आपल्या पदरांत पाडून घेऊं इच्छिणारा राजा दुर्बल असला तरी योग्य युक्तीच्या अवलंबनानें बलिष्ठ शत्रूला देखील बहुधा जिंकतो. श्रीकृष्णाच्या ठिकाणीं परिपूर्ण नीति असून माझ्या ठिकाणीं बल व धनंजयाच्या ठिकाणीं विजय आहे. आम्ही तिघे मिळून जरासंधाचें काम पुरें करूं. तीन अग्नि ज्याप्रमाणें इष्टि साधतात तसेच आम्ही तिघे हें कार्य निश्चितपणें साधूं." साऱ्या राजसत्ता ज्याच्या पायाशीं विनम्र झाल्या होत्या, भगवान् श्रीकृष्ण देखील ज्याच्या भयानें राजधानी सोडून द्वारकेंत गेले होते व ज्याच्या प्रतापाचें वर्णन करीत असतां स्वतः भगवंतांनीं देखील ज्याचें अजिक्यपण मान्य केलें होतें त्या जरासंधाचें वर्णन ऐकतांच कोणीही अनुकूल बोलावयाच्या आंतच भीमानें काढलेले हे समयस्फूर्त उद्गार आहेत हें

ध्यानांत घेतलें म्हणजे त्याचें महत्त्व अधिकच स्पष्ट होतें. भीमाचा रणोत्साह असा अपूर्व आहे कीं, त्याला जर कोणी साहाय्य देऊं केलें तर तें घेण्यांत एक प्रकारचा कमीपणा वाटून तो तें नाकारतो. हिडिंब व किर्मीर या राक्षसांच्या वधाच्या वेळीं अर्जुनानें त्याला साहृय देऊं केलें असतां भीमानें तें नाकारलें. कर्णपर्वांत तर भीमसेनाच्या अंगावरील घाव व त्याला झालेले श्रम पाहून अर्जुन युद्धाचा भार स्वतःवर सोपवून त्याला युधिष्ठिरांच्या समाचाराला जाण्यासाठीं विनवीत असतां भीमानें त्याला दिलेलें उत्तर पाहण्यासारखें आहे. भीम त्याला म्हणाला :—

त्वमेव जानीहि महानुभाव राज्ञः प्रवृत्तिं भरतर्षभस्य ।
अहं हि यद्यर्जुन याम्यमित्रा वदन्ति मां भीत इति प्रवीराः ॥ ८
ततोऽब्रवीदर्जुनो भीमसेनं संशप्तकाः प्रत्यनीकस्थिता मे ।
एतानहत्वाऽद्य मया न शक्यमितोपयातुं रिपुसंघगोष्ठात् ॥ ९
अथाब्रवीदर्जुनं भीमसेनः स्ववीर्यमासाद्य कुरुप्रवीर ।
संशप्तकान् प्रतियोत्स्यामि संख्ये सर्वानहं याहि धनञ्जय त्वम् ॥१०

—महाभारत, कर्णपर्व अध्याय ६५

"हे महानुभावा! भरतश्रेष्ठ राजा युधिष्ठिर कोठें आहे हें पहावयास तूंच जा. जर मी येथून कोणत्याही निमित्तानें रण सोडून गेलों तर हे सारे शत्रू मला 'भ्याला' असें म्हणतील." त्यावर अर्जुनानें भीमाला असें सांगितलें कीं, "संशप्तक माझ्याविरुद्ध रणांत ठाण मांडून उभे आहेत. त्यांना ठार मारल्यावांचून शत्रुसैन्यांतून जाणें मला शक्य नाहीं." त्यावर आपल्या पराक्रमाच्या आत्मप्रत्ययानें भीमसेन अर्जुनाला म्हणाला कीं, या समोरच्या शत्रूंबरोबरच तुझ्या त्या संशप्तकांचाही मीच समाचार घेतों. किंबहुना साऱ्याच शत्रूंचा भार मी माझ्याकडे घेतों. तूं निश्चिंत मनानें युधिष्ठिरांच्या समाचारार्थ जा."

ज्याला जगांत जगावयाचें आहे त्यानें आपल्या हक्कांचें संरक्षण करण्यासाठीं सदैव जागरूक राहिलें पाहिजे व जगावयाचें तर आपल्या पराक्रमानें सन्मानाचें स्थान मिळवूनच जगलें पाहिजे अशी भीमाची विचारसरणी आहे. अपकारी लोकांनीं आपल्या उदात्तते-

पासून स्वतःचा लाभ करून घेऊन आपणांस बावळट समजून दुःख भोगावयास लावावें याची त्याला अत्यंत चीड आहे व जशास तसें या न्यायानेंच व्यवहारी जगांत वागलें पाहिजे असें त्याचें रोख ठोक तत्त्वज्ञान आहे. भीमाची सर्व विचारप्रणालि, युधिष्ठिरांना उत्तर म्हणून वनपर्वांत त्यानें केलेल्या भाषणांत स्पष्ट झाली आहे. युधिष्ठिर आपला सत्यपरिपालनाचा व धर्मसंरक्षणाचा ध्येयवाद सांगून द्रौपदीला गप्प बसविण्याचा प्रयत्न करीत असतां भीम म्हणतो :—

राज्यस्य पदवीं धर्म्यां व्रज सत्पुरुषोचिताम् ।
धर्मार्थकामहीनानां किं नो वस्तुं तपोवने ।। २
नैव धर्मेण तद्राज्यं नार्जवेन न चौजसा ।
अक्षकूटमधिष्ठाय हृतं दुर्योधनेन वै ।। ३
गोमायुनेव सिंहानां दुर्बलेन बलीयसाम् ।
आमिषं विघसाशेन तद्वद्राज्यं हि नो हृतम् ।। ४
धर्मलेशप्रतिच्छन्नः प्रभवं धर्मकामयोः ।
अर्थमुत्सृज्य किं राजन् दुःखेषु परितप्यसे ।। ५
भवतोऽनवधानेन राज्यं नः पश्यतां हृतम् ।
अहार्यमपि शक्रेण गुप्तं गाण्डीवधन्वना ।। ६
कुणीनामिव बिल्वानि पंगूनामिव धेनवः ।
हृतमैश्वर्यमस्माकं जीवतां भवतः कृते ।। ७
भवतः प्रियमित्येवं महद् व्यसनमीदृशम् ।
धर्मकामे प्रतीतस्य प्रतिपन्नाः स्म भारत ।। ८
कर्षयामः स्वमित्राणि नन्दयामश्च शात्रवान् ।
आत्मानं भवतां शास्त्रैर्नियम्य भरतर्षभ ।। ९
यद्वयं न तदैवैतान्धार्तराष्ट्रान्निहन्महि ।
भवतः शास्त्रमादाय तन्नस्तपति दुष्कृतम् ।। १०
भवान् धर्मो धर्म इति सततं व्रतकर्शितः ।
कच्चिद्राजन्न निर्वेदादापन्नः क्लीबजीविकाम् ।। १३
अस्मानमी धार्तराष्ट्राः क्षममाणानलं सतः ।
अशक्तानिव मन्यन्ते तत् दुःखं नाहवे वधः ।। १६
तत्र चेत् युध्यमानानामजिह्ममनिवर्तिनाम् ।
सर्वशो हि वधः श्रेयान् प्रेत्य लोकान् लभेमहि । १७

अथवा वयमेवैतान् निहत्य भरतर्षभ ।
आददीमहि गां सर्वां तथापि श्रेय एव नः ।। १८
आत्मार्थं युध्यमानानां विदिते कृत्यलक्षणे ।
अन्यैरपि हृते राज्ये प्रशंसैव न गर्हणा ।। २०
कर्षणार्थो हि यो धर्मो मित्राणामात्मनस्तथा ।
व्यसनं नाम तद्राजन् न धर्मः स कुधर्म तत् ।। २१
सर्वथा धर्मनित्यं तु पुरुषं धर्मदुर्बलम् ।
त्यजतस्तात धर्मार्थौ प्रेतं दुःखसुखे यथा ।। २२
यस्य धर्मो हि धर्मार्थं क्लेशभाङ्‌न स पण्डितः ।
न स धर्मस्य वेदार्थं सूर्यस्यान्धः प्रभामिव ।। २३
अतिवेलं हि योऽर्थार्थी नेतरावनुतिष्ठति ।
स वध्यः सर्वभूतानां ब्रह्महेव जुगुप्सितः ।। २५
सततं यश्च कामार्थी नेतरावनुतिष्ठति ।
मित्राणि तस्य नश्यन्ति धर्मार्थाभ्यां च हीयते ।। २६
तस्माद्धर्मार्थयोर्नित्यं न प्रमाद्यन्ति पण्डिताः ।
प्रकृतिः सा हि कामस्य पावकस्यारणिर्यथा ।। २८
सर्वथा धर्ममूलोऽर्थो धर्मश्चार्थपरिग्रहः ।
इतरेतरयोर्नीतौ विद्धि मेघोदधी यथा ।। २९
दानं यज्ञाः सतां पूजा वेदधारणमार्जवम् ।
एष धर्मः परो राजन् बलवान् प्रेत्य चेह च ।। ४६
एष नार्थविहीनेन शक्यो राजन् निषेवितुम् ।
अखिलाः पुरुषव्याघ्र गुणाः स्युर्यद्यपीतरे ।। ४७
धर्ममूलं जगद्राजन् नान्यत् धर्माद् विशिष्यते ।
धर्मश्चार्थेन महता शक्यो राजन् निषेवितुम् ।। ४८
न चार्थो भैक्ष्यचर्येण नापि क्लैब्येन कर्हिचित् ।
वेत्तुं शक्यः सदा राजन् केवलं धर्मबुद्धिना ।। ४९
प्रतिषिद्धा हि ते याञ्चा यया सिध्यति वै द्विजः ।
तेजसैवार्थलिप्सायां यतस्व पुरुषर्षभ ।। ५०
भैक्ष्यचर्या न विहिता न च विट्शूद्रजीविका ।
क्षत्रियस्य विशेषेण धर्मस्तु बलमौरसम् ।। ५१
स्वधर्मं प्रतिपद्यस्व जहि शत्रून् समागतान् ।
धार्तराष्ट्रवनं पार्थ मया पार्थेन नाशय ।। ५२

प्रजापालनसंभूतं फलं तव न गर्हितम् ।
एष ते विहितो राजन् धात्रा धर्मः सनातनः ॥ ५५
तस्मादपचितः पार्थ लोके हास्यं गमिष्यसि ।
स्वधर्माद्धि मनुष्याणां चलनं न प्रशस्यते ॥ ५६
न हि केवलधर्मात्मा पृथिवीं जातु कश्चन ।
पार्थिवो व्यजयद्राजन्न भूतिं न पुनः श्रियम् ॥ ५८
जिह्वां दत्वा बहूनां हि क्षुद्राणां लुब्धचेतसाम् ।
निकृत्या लभते राज्यमाहारमिव शल्यकः ॥ ५९
भ्रातरः पूर्वजाताश्च सुसमृद्धाश्च सर्वशः ।
निकृत्या निर्जिता देवैरसुराः पार्थिवर्षभ ॥ ६०
एवं बलवतः सर्वमिति बुध्वा महीपते ।
जहि शत्रून्महाबाहो परां निकृतिमास्थितः ॥ ६१
न ह्यर्जुनसमः कश्चित् युधि योधो धनुर्धरः ।
भविता वा पुमान्कश्चिन्मत्समो वा गदाधरः ॥ ६२
सर्वथा संहतैरेव दुर्बलैर्बलवानपि ।
अमित्रः शक्यते हन्तुं मधुहा भ्रमरैरिव ॥ ७०
यथा राजन्प्रजाः सर्वाः सूर्यः पाति गभस्तिभिः ।
अत्ति चैव तथैव त्वं सदृशः सवितुर्भव ॥ ७१
एतच्चापि तपो राजन् पुराणमिति नः श्रुतम् ।
विधिना पालनं भूमेर्यत्कृतं नः पितामहैः ॥ ७२
न तथा तपसा राजँल्लोकान्प्राप्नोति क्षत्रियः ।
यथा सृष्टेन युद्धेन विजयेनेतरेण वा ॥ ७३
अपेयात्किल भा सूर्याल्लक्ष्मीश्चन्द्रमसस्तथा ।
इति लोको व्यवसितो दृष्ट्वेमां भवतो व्यथाम् ॥ ७४
भवतश्च प्रशंसाभिर्निन्दाभिरितरस्य च ।
कथा युक्ताः परिषदः पृथग्राजन्समागताः ॥ ७५
इदमभ्यधिकं राजन् ब्राह्मणाः कुरवश्च ते ।
समेताः कथयन्तीह मुदिताः सत्यसंधताम् ॥ ७६
यन्न मोहान्न कार्पण्यात् न लोभान्न भयादपि ।
अनृतं किंचिदुक्तं ते न कामान्नार्थकारणात् ॥ ७७
यदेनः कुरुते किंचिद्राजा भूमिमवाप्नुवन् ।
सर्वं तन्नुदते पश्चाद्यज्ञैर्विपुलदक्षिणैः ॥ ७८

ब्राह्मणेभ्यो ददन्ग्रामान्गाश्च राजन्सहस्रशः ।
मुच्यते सर्वपापेभ्यस्तमोभ्य इव चंद्रमाः ॥ ७९
पौरजानपदाः सर्वे प्रायशः कुरुनन्दन ।
सवृद्धबालसहिताः शंसन्ति त्वां युधिष्ठिर ॥ ८०
श्वदृतौ क्षीरमासक्तं ब्रह्म वा वृषले यथा ।
सत्यं स्तेने बलं नार्यां राज्यं दुर्योधने तथा ॥ ८१
इति लोके निर्वचनं पुरश्चरति भारत ।
अपि चैताः स्त्रियो बालाः स्वाध्यायमधिकुर्वते ॥ ८२
इमामवस्थां च गते सहास्माभिररिंदम ।
हन्त नष्टाः स्म सर्वे वै भवतोपद्रवे सति । ८३
स भवान्रथमास्थाय सर्वोपकरणान्वितम् ।
त्वरमाणोभिनिर्यातु विप्रेभ्योऽर्थविभावकः ॥ ८४
वाचयित्वा द्विजश्रेष्ठानद्यैव गजसाह्वयम् ।
अस्त्रविद्भिः परिवृतो भ्रातृभिर्दृढधन्विभिः ॥ ८५
आशीविषसमैर्वीरैर्मरुद्भिरिव वृत्रहा ।
अमित्रांस्तेजसा मृद्गन्नसुरानिव वृत्रहा ॥
श्रियमादत्स्व कौन्तेय धार्तराष्ट्रान्महाबल ॥ ८६
न हि गाण्डीवमुक्तानां शराणां गार्ध्रवाससाम् ।
स्पर्शमाशीविषाभानां मर्त्यः कश्चन संसहेत् ॥ ८७
न स वीरो न मातंगो न च सोऽश्वोस्ति भारत ।
यः सहेत गदावेगं मम क्रुद्धस्य संयुगे ॥ ८८
सृंजयैः सह कैकेयैर्वृष्णीनां वृषभेण च ।
कथंस्विद्युधि कोन्तेय न राज्यं प्राप्नुयामहे ॥ ८९
—महाभारत, वनपर्व अध्याय ३३

अस्माभिरुषिताः सम्यग्वने मासास्त्रयोदश ।
परिमाणेन तान्पश्य तावतः परिवत्सरान् ॥ ३२
अस्ति मासः प्रतिनिधिर्यथा प्राहुर्मनीषिणः ।
पूतिकानिव सोमस्य तथेदं क्रियतामिति ॥ ३३
अथवाऽनडुहे राजन्साधवे साधुवाहिने ।
सौहित्यदानादेतस्मादेनसः प्रतिमुच्यते ॥ ३४
तस्माच्छत्रुवधे राजन् क्रियतां निश्चयस्त्वया ।
क्षत्रियस्य हि सर्वस्य नान्यो धर्मोऽस्ति संयुगात् ॥ ३५
—महाभारत, वनपर्व अध्याय ३५

"सत्पुरुषांना उचित असलेलें व धर्माला अनुसरून असलेलें राजसिंहासन स्वाधीन करून घेण्याची खटपट करा. धर्म, काम व अर्थ यांपासून वंचित झालेल्या अवस्थेंत आपण तपोवनांत राहण्यांत काय लाभ आहे? आपलें राज्य कांहीं दुर्योधनानें धर्मानें, सज्जनपणानें अथवा पराक्रमानें जिंकलेलें नाहीं. तें त्यानें कपटद्यूतानें जिंकलें आहे. कोल्हयानें सिंहाचा भाग घ्यावा अथवा कुत्र्यानें मांस पळवावें त्याप्रमाणें आम्हां बलवंतांचें राज्य त्या दुर्बलानें हरण केलें आहे. धर्माच्या लहान अंशाच्या नांवाखालीं धर्म व काम ज्याच्यापासून उत्पन्न होतात तो अर्थ सोडून देऊन व्यर्थ दुःखांत कां होरपळतां? गाण्डीवधारी अर्जुनानें संरक्षिलेलें आपलें राज्य इन्द्रालादेखील हरण करणें अशक्य होतें. केवळ तुमच्या अनवधानानें पाहतां पाहतां आमच्या डोळ्यांदेखत तें गेलें आहे. हात लुळे असलेल्या माणसाजवळून बिल्वफळें न्यावीं अथवा पङ्गू माणसाच्या गायी पळवाव्या त्याप्रमाणें केवळ तुमच्यामुळें आम्ही जिवंत असतां आमचें राज्य गेलें. धर्म साधण्याच्या इच्छेनें तुम्ही हें मोठें संकट स्वतःवर ओढवून घेतलें व केवळ तुम्हांला बरें वाटावें म्हणून आम्ही विपत्ति सहन करीत आहोंत. आम्ही आमच्या मित्रांना दुःख देऊन शत्रूंना मात्र आनंदित करीत आहोंत. कारण तुमच्या शास्त्रनियमांनीं आम्हीच स्वतःला बांधून घेतलें आहे. त्याच वेळीं आम्ही धृतराष्ट्रपुत्रांना जें ठार मारलें नाहीं त्याचें कारण केवळ तुमचे शास्त्रनियम होत. पण असें करण्यांत आम्ही मोठें दुष्कृत्य केलें आहे व त्याचाच परिणाम म्हणून हें दुःख आम्ही भोगीत आहोंत. आपण धर्म धर्म म्हणून भलत्याच कल्पनांनीं स्वतःला त्रास करून घेत निराश मनानें, एखाद्या षंढाप्रमाणें तर वागत नाहीं ना? आपण धृतराष्ट्रपुत्रांना क्षमा करावी म्हणून सहनशीलता दाखवितों. पण त्यामुळें ते मात्र आपल्याला अशक्त समजतात. ही गोष्ट जितकी दुःखाची आहे तितकें युद्धांत ठार होणें देखील दुःखाचें नाहीं. निष्कपट रीतीनें रणाला पाठ न दाखवितां आपल्या हक्कासाठीं लढत असतां मृत्यु आला तर स्वर्ग मिळेल व आम्हींच आमच्या शत्रूंना ठार मारलें तर साऱ्या पृथ्वीचें राज्य उपभोगूं. यांत उभयपक्षीं कल्याणच आहे. स्वतःच्या हक्कासाठीं

आवश्यक कर्तव्य म्हणून लढत असतां शत्रूनें आपणांस जिंकून आपलें राज्य घेतलें तरीदेखील ती निंदास्पद गोष्ट नसून भूषणास्पदच आहे. जो धर्म आपण व आपले मित्र यांना केवळ कष्टच देत असतो तो धर्म नसून कुधर्म होय. नेहमीं धर्म धर्म करून एक प्रकारचें धर्म-दुर्बलत्व आलेल्या माणसाला, प्रेताला ज्याप्रमाणें सुखदुःखें सोडून जातात त्याचप्रमाणें धर्म व अर्थ सोडून जात असतात. प्रयोजनाकडे न पाहतां जो केवळ धर्म धर्म करीत बसतो तो शाहणा नसून केवळ क्लेशभागी होतो. अंधाला ज्याप्रमाणें सूर्याचा प्रकाश कळत नाहीं त्याचप्रमाणें त्याला धर्माचें रहस्य कळत नाहीं. तसेंच जो धर्म व व काम सोडून स्वार्थीपणानें केवळ अर्थ अर्थ करीत बसतो तो ब्रह्म-हत्येसारखें घाणेरडें पाप करणारा असून सर्व प्राणिमात्रांना वध्य आहे. जो धर्म व अर्थ सोडून कामाच्याच पाठीमागें लागतो त्याचे धर्म व अर्थ तर नाश पावतातच, पण मित्रही त्याला सोडून जातात. दान, यज्ञ, संतांची पूजा, वेदधारण व आर्जव हेंच धर्माचें स्वरूप असून हा श्रेष्ठ धर्म इहपरलोकीं कल्याणकारक आहे. पण हे पुरुषव्याघ्रा, इतर सर्व सद्‌गुण अंगांत असूनही ज्याच्याजवळ संपत्ति नाहीं त्याला ह्या धर्माचें अनुष्ठान कधींही करतां येणें शक्य नाहीं. जगताचें धर्म हेंच मूळ असून त्यांपेक्षां दुसरें कांहींही श्रेष्ठ नाहीं. 'पण पुष्कळ संपत्तीवांचून धर्माचें अनुष्ठानच अशक्य आहे. पण हे राजा, केवळ धर्मबुद्धि ठेवून भिक्षा मागण्यानें वा षंढासारखें वाग-ल्यानें अर्थप्राप्ति कधींही होणार नाहीं. जिच्यापासून केवळ ब्राह्मणां-च्याच इच्छा सफळ होतात ती भिक्षा मागण्याची वृत्ति धर्मानेंच तुला बंद केली आहे. पराक्रमानें संपत्ति मिळविणें हा एकच मार्ग तुझ्यासाठीं मोकळा आहे. ब्राह्मणाप्रमाणें भिक्षा मागणें अथवा वैश्य-शूद्राप्रमाणें जीवन जगणें क्षत्रियाला धर्मानें सांगितलेलें नाहीं. बाहु-बळाच्या भरंवशावर स्वतःचें उपजीवन चालविणें हेंच क्षत्रियाला विहित आहे. स्वधर्माप्रमाणें वाग, आक्रमण करणाऱ्या आपल्या शत्रूंना ठार मार व मी व अर्जुन ह्यांच्या साहचानें धृतराष्ट्रपुत्रांचें हें वन नष्ट करून टाक. प्रजापालनानें मिळणारें पुण्यफळ हा तुझा वर्णधर्म होय. तुला ह्या मार्गाला निन्दास्पद म्हणतां येणार नाहीं.

परमेश्वरानेंच तुझ्यासाठीं हा शाश्वत धर्म सांगितलेला आहे. स्वधर्मापासून चळणें मुळींच प्रशंसनीय नाहीं. तूं आपल्या धर्मापासून चळलास कीं लोक तुझा उपहासच करतील. केवळ धर्म धर्म करीत बसणाऱ्या कोणत्याही राजाला आजपर्यंत पृथ्वी, कल्याण व संपत्ति यांची प्राप्ति झालेली नाहीं. व्याध ज्याप्रमाणें आपला आहार मिळवितो त्याचप्रमाणें लोभी व क्षुद्र लोकांना लोभ दाखवून वंचनेनेंच कुणालाही राज्य मिळत असतें. स्वतःपेक्षां ज्येष्ठ असलेल्या व सर्व दृष्टींनीं समृद्ध असलेल्या आपल्या बन्धूंना देवांनीं देखील वंचनेनेंच जिंकिलें व राज्य मिळविलें आहे. सामर्थ्यसंपन्न लोक असेंच करीत असतात हें ओळखून भेदनीतीच्या उपायानें तूं आपल्या शत्रूंना ठार मार. अर्जुनासारखा धनुर्धर कुणीही नाहीं व जगांत माझ्यासारखा गदाधरही कुणी नाहीं. मानसिक बळाच्या भरंवशावर युद्धासारखीं मोठीं कामें पार पडत असतात. नुसत्या सैन्यबळानें व उत्साहानें कांहीं होत नाहीं. अत्यंत संघटित होऊन केवळ संघटनेच्या भरंवशावर दुर्बल लोक देखील बलवान् शत्रूला ठार मारूं शकत असतात. दुर्बल मधमाशा देखील मध चोरणाऱ्याचा विनाश करीत नाहींत काय? सूर्य ज्याप्रमाणें आपल्या किरणांनीं जलशोषण करतो व पुन्हां वर्षाव करून लोकांचें रक्षण करतो, त्याप्रमाणें तूं आज पराक्रम कर व प्रजांचें परिपालन करून त्यांना आनंद दे. आपल्या पूर्वजांनीं केलें त्याप्रमाणें विधिपूर्वक भूमीचें परिपालन करणें ही एक सनातन तपश्चर्याच आहे. ज्याप्रमाणें युद्ध, विजय व पालन या धर्ममार्गानें क्षत्रियाला सद्गति मिळते त्याप्रमाणें त्याला तपश्चर्येनें सद्गति मिळूं शकत नाहीं. तुझी ही व्यथा पाहून लोकांना, प्रभा सूर्याला व ज्योत्स्ना चंद्राला सोडून गेल्यासारखें दुःख होतें. तूं अत्यंत लोकप्रिय आहेस. प्रजा तुझ्यावर प्रसन्न आहे. प्रत्येक ठिकाणीं लोक जमून तुझी स्तुति व तुझ्या शत्रूंची निन्दा करीत असतात. सारे ब्राह्मण व कुरुकुलांतील लोक तुझ्या सत्यसंधतेची प्रशंसा करीत असतात. मोह, कार्पण्य, लोभ, भय, काम व संपत्तीची अभिलाषा यांपैकीं कोणत्याही कारणास्तव तूं कधीं खोटें बोलूं शकला नाहींस असें लोकांचें मत आहे. राज्य मिळवितांना राजाला जें कांहीं पाप

लागतें तें विपुल दक्षिणा देऊन यज्ञ केल्यानें व विद्वान् ब्राह्मणांना खूप गोधन व सहस्रावधि अग्रहार दिल्यानें पार नाहींसें होतें. चंद्र अंधाराला नाहींसें करतो त्याचप्रमाणें या कृत्यांनीं मिळणारी कीर्ति सर्व दोषांना नाहींसें करतें, सारे पौरजानपद व वृद्धबालप्रजाजन आपणच राजा व्हावें अशी इच्छा करतात. कुत्र्याला खीर, चांडालाला वेद, चोराला सत्य व स्त्रीला बल असावें तसेंच दुर्योधनासारख्या अधमाला राज्य असणें सर्वथा अयोग्य आहे असें स्त्रिया व मुलांसुद्धां सर्व प्रजाजन म्हणत असतात. प्रजांनीं तुझ्या बाबतींत इतकी अपार निष्ठा दाखविली असतां तूं जर नुसताच बसून राहशील तर सर्वांचाच अकारण सर्वनाश होईल. म्हणून आपला रथ सज्ज करून व ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करवून आजच हस्तिनापुरावर चढाई कर. आम्हां दृढधनुर्धारी, अस्त्रज्ञ व सर्पाप्रमाणें भयंकर अशा बंधूंनीं परिवेष्टित अशा स्थितींत तूं मरुद्गणांनीं परिवेष्टित अशा महेंद्राप्रमाणें शोभशील. महेंद्रानें असुरांना ठार मारावें त्याप्रमाणें आपल्या पराक्रमानें शत्रूंना ठार मारून धृतराष्ट्रपुत्रांपासून तूं आपलें राज्य हिसकावून घे. गांडीव धनुष्यापासून सुटलेले व सर्पाप्रमाणें भयंकर असलेले अर्जुनाचे गार्धपत्र नांवाचे बाण सहन करूं शकेल असा कुणीही मनुष्य पृथ्वीवर नाहीं. त्याचप्रमाणें युद्धांत क्रुद्ध झालेल्या माझा गदावेग सहन करूं शकणारा वीर पुरुष, हत्ती किंवा अश्व अजून जन्मालाच यावयाचा आहे. सृंजय, कैकेय व भगवान् श्रीकृष्ण यांच्यासहित युद्ध करीत असतां आपल्याला राज्य मिळणार नाहीं असें तुला वाटतें काय? आपण अरण्यांत तेरा महिने घालविले आहेत. पूतिका ज्याप्रमाणें सोमाच्या प्रतिनिधि असतात, त्याचप्रमाणें महिने हे वर्षाचे प्रतिनिधि होऊं शकतात असें विद्वानांचें मत आहे. तेव्हां पूर्ण झालेले तेरा महिने म्हणजे तेरा वर्षेंच होत असें समजून वचनमुक्त व्हावयास हरकत नाहीं. तरीही तुला पाप वाटलेंच तर धर्मशास्त्रानुसार चांगल्या बैलाला भरपूर चारा घालून तुला पापापासून मुक्त होतां येईल. म्हणून हे राजा, शत्रुवधाचा तूं निश्चय कर. क्षत्रियाचा युद्धावांचून दुसरा कोणताही धर्म नाहीं."

असें हें भीमाचें माणसासारखें तत्त्वज्ञान आहे. श्रीकृष्णाच्या "शठं प्रति शाठ्यं" या तत्त्वाचें यथावत् आचरण करण्याचा त्याचा आत्मप्रत्ययही अत्यंत विलोभनीय आहे. महान् साहस व मोडलों तरी नमणार नाहीं ही वीरवृत्ति भीमसेनाच्या नसांनसांतून खेळते.

## मोडेन पण नमणार नाहीं

राजा धृतराष्ट्रानें भीमसेनाचें जें वर्णन केलें आहे त्यांत त्याच्या मोडेन पण वाकणार नाहीं, या प्रवृत्तीचा स्पष्ट उल्लेख आहेच. भीमाच्या या प्रवृत्तीचीं अनेक उदाहरणें महाभारतांत आहेत. द्रोण-पर्वांत या प्रवृत्तीचें मोठें विलक्षण उदाहरण आलें आहे. आचार्य द्रोणांचा धृष्टद्युम्नानें वध केल्यानंतर त्या भयानक वधाची वार्ता कळतांच द्रोणपुत्र अश्वत्थामा अतिशय संतापला व त्यानें पांडव सैन्याच्या विनाशासाठीं नारायणास्त्राचा प्रयोग केला. नारायणास्त्र हें असें विलक्षण अस्त्र होतें कीं त्याचा विघात दुसऱ्या कोणत्याही अस्त्रानें होण्यासारखा नव्हता. वाहन सोडून शस्त्र खालीं ठेवून व हात जोडून उभें राहाणें हा एकच तें अस्त्र शांत करण्याचा मार्ग होता. भगवान् श्रीकृष्णांनीं पांडव सैन्याला तशी आज्ञा केली व स्वतःचीं शस्त्रें खालीं ठेवून अर्जुनासहित ते स्वतः रथाखालीं उतरून उभे राहिले. त्यांच्या आज्ञेनुसार सर्वांनीं शस्त्रें खालीं ठेवलीं. पण भीमसेनाला तो साराच प्रकार अत्यंत अपमानास्पद वाटला. ज्याचा विघात होऊं शकत नाहीं असें अस्त्र जगांत असूं शकतें यावर त्याचा मुळींच विश्वास नव्हता व शत्रूचें अस्त्र केवढेंही भयानक असलें तरी त्याच्यासमोर हात जोडून उभें राहणें हें त्याला मरणाहूनही अति दुःखदायक वाटलें. श्रीकृष्ण मोठे देव असले तरी ते सांगतील त्या मानभंगाच्या गोष्टी मान्य करावयास त्याचें मन मुळींच तयार होईना. अर्जुनासारखा आपला भाऊ व इतरही सारे लोक वेड्यासारखे आपलीं शस्त्रें खालीं ठेवून द्रोणपुत्र अश्वत्थाम्या-सारख्या शत्रूसमोर नम्रपणें उभे राहिले आहेत हें पाहतांच त्याचा संताप अनावर झाला. श्रीकृष्णांचा अनादर करून तो सर्व सैन्या-समोर येऊन उभा राहिला व मोठ्यानें गर्जना करून म्हणूं लागलाः–

न कथंचन शस्त्राणि मोक्तव्यानीह केनचित् ।
अहमावारयिष्यामि द्रोणपुत्रास्त्रमाशुगैः ।। ४५
गदयाऽप्यनया गुर्व्या हेमविग्रहया रणे ।
कालवत् प्रहरिष्यामि द्रौणेरस्त्रं विशातयन् ।। ४६
न हि मे विक्रमे तुल्यः कश्चिदस्ति पुमानिह ।
यथेव सवितुस्तुल्यं ज्योतिरन्यन्न विद्यते ।। ४७
पश्यतेमौ हि मे बाहू नागराजकरोपमौ ।
समर्थौ पर्वतस्यापि शैशिरस्य निपातने ।। ४८
नागायुतसमप्राणो ह्यहमेको नरेष्विह ।
शक्रो यथाऽप्रतिद्वन्द्वो दिवि देवेषु विश्रुतः ।। ४९
अद्य पश्यत मे वीर्यं बाह्वोः पीनांसयोर्युधि ।
ज्वलमानस्य दीप्तस्य द्रौणेरस्त्रस्य वारणे ।। ५०
यदि नारायणास्त्रस्य प्रतियोद्धा न विद्यते ।
अद्यैतत्प्रतियोत्स्यामि पश्यत्सु कुरुपाण्डुषु ।। ५१
अर्जुनार्जुन बीभत्सो न न्यस्यं गाण्डिवस्त्वया ।
शशाङ्कस्येव ते पङ्को नैर्मल्यं पातयिष्यति ।। ५२

—महाभारत द्रोणपर्व अध्याय १९९

"कुणीही आपलीं शस्त्रें टाकण्याचें कारण नाहीं. मीं माझ्या बाणांनीं द्रोणपुत्राच्या अस्त्राचें निवारण करतों. अथवा माझ्या या सोन्याचें काम केलेल्या भयानक गदेनें कालाप्रमाणें प्रहार करून त्याचें अस्त्राचें सामर्थ्य संपवितों. ज्याप्रमाणें सूर्याच्या तोडीचें तेज नाहीं त्याचप्रमाणें माझ्या तोडीचा कुणीही पराक्रमी पुरुष नाहीं. माझे हे हत्तीच्या सोंडेप्रमाणें पुष्ट बाहू पहा. ते पर्वत उचलून फेकावयास सुद्धां समर्थ आहेत. सर्व माणसांत माझ्याच अंगीं दहा सहस्र हत्तींचें बळ आहे. महेन्द्राला ज्याप्रमाणें प्रतियोद्धा नाहीं त्याचप्रमाणें मलाही प्रतियोद्धा नाहीं. माझ्या ह्या पुष्ट बाहूंचें बळ पहा. मी द्रौणीच्या या प्रज्वलित अस्त्राचें निवारण करीन. नारायणास्त्राला प्रतियोद्धा नाहीं असें म्हणतात. साऱ्या कौरवपाण्डवांसमक्ष मीं त्याचा प्रतियोद्धा होतों. अर्जुना, अर्जुना हे बीभत्सो, जरा थांब. तूं आपलें गाण्डीव धनुष्य मुळींच टाकूं नकोस. चंद्रावर कलंक यावा त्याप्रमाणें तुझ्या धवल यशावर निष्कारण कलंक येईल." हें ऐकतांच अर्जुनानें

भीमसेनाला समजाविण्याचा प्रयत्न केला. पण त्यांचें मुळींच न ऐकतां संतापानें तो अश्वत्थाम्याच्या अंगावर धांवून गेला. अश्वत्थाम्याला तें हवेंच होतें. त्या अस्त्रानें अभिमंत्रित असे एकाहून एक तीक्ष्ण बाण त्यानें भीमाच्या अंगावर टाकावयास प्रारंभ केला. त्याबरोबर तें अस्त्र अधिकच प्रज्वलित झालें. व भीम जों जों आक्रमण करूं लागला तों तों अधिक प्रदीप्त होऊन अस्त्राच्या तेजानें भीमाला वेढून टाकलें. तो भयंकर प्रकार पाहतांच सारी पाण्डवपक्षीय मंडळी थरकांपून उठली. अर्जुनानें भीमाचें त्या अग्नीपासून संरक्षण व्हावें म्हणून त्याच्या शरीराभोवतीं वारुणास्त्राचा परकोट उभारण्याचा प्रयत्न केला. पण त्या अस्त्रदेवतेसमोर अर्जुन अगदीं क्षुद्र ठरत होता. त्याच्या वारुणास्त्राचा कांहींही उपयोग झाला नाहीं. शेवटीं श्रीकृष्ण व अर्जुन भीमाला वांचविण्यासाठीं त्या भयानक अग्नींतून वाट काढीत त्याच्याजवळ गेले. व तो ऐकेचना म्हणून जबरदस्तीनें त्याचे हात धरून त्याला रथाखालीं ओढूं लागले. महाभारतांत ह्या साऱ्या प्रकाराचें मोठें हास्यकारक वर्णन आहे. तें पुढीलप्रमाणें—

ततश्चकृषतुर्भीमं सर्वशस्त्रायुधानि च ।
नारायणास्त्रशान्त्यर्थं नरनारायणौ बलात् ।। १३
आकृष्यमाणः कौन्तेयो नदत्येव महारवम् ।
वर्धते चैव तद्घोरं द्रौणेरस्त्रं सुदुर्जयम् ।। १४
तमब्रवीत् वासुदेवः किमिदं पाण्डुनन्दन ।
वार्यमाणोऽपि कौन्तेय यद्युद्धान्न निवर्तसे ।। १५
यदि युद्धेन जेयाः स्युरिमे कौरवनन्दनाः ।
वयमप्यत्र युध्येम तथा चेमे नरर्षभाः ।। १६
रथेभ्यस्त्ववतीर्णाः स्म सर्व एव हि तावकाः ।
तस्मात्त्वमपि कौन्तेय रथात्तूर्णमपाक्रम ।। १७
एवमुक्त्वा तु तं कृष्णो रथाद् भूमिमवर्तयत् ।
निःश्वसन्तं यथा नागं क्रोधसंरक्तलोचनम् ।। १८
यदाऽपकृष्टः स रथान्न्यासितश्चायुधं भुवि ।
ततो नारायणास्त्रं तत्प्रशान्तं शत्रुतापनम् ।। १९

—महाभारत द्रोणपर्व अध्याय २००

"नंतर नारायणास्त्राच्या शान्तीसाठीं श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांनीं भीमाच्या हातांतून बळानें सारीं शस्त्रें काढून घेतलीं व त्याला ओढून बळानें रथाखालीं उतरविलें. भीम त्यांच्या हातांतून सुटण्याची धडपड करूं लागला. पण त्याला कांहीं सुटतां येईना. शेवटीं आपण मुळींच नमलों नाहीं हें दाखविण्यासाठीं तो जोरजोरानें गर्जना करूं लागला. तों त्याच्या त्या गर्जनेनें अश्वत्थाम्याचें तें घोर अस्त्र अधिकाधिक प्रज्वलित व दाहक होऊं लागलें. शेवटीं भगवान् श्रीकृष्ण त्याला म्हणाले, "भीमा हा काय पोरकटपणा आहे ? आम्ही वारंवार तुझें निवारण करीत असतां तूं युद्धापासून निवृत्त होत नाहींस याचा अर्थ काय ? जर युद्धानें विजय संपादन करतां आला असता तर आम्ही अथवा बाकीचे सर्व लोक लढल्यावांचून राहिलों असतों काय ? सर्व लोक रथांतून खालीं उतरून उभे राहिले आहेत. तुलाहि तसेंच उभें राहिलें पाहिजे." असें म्हणून श्रीकृष्णांनीं त्याला बळानें रथाखालीं उतरविलें. नाइलाज म्हणूनच तो उतरला खरा; पण सर्वस्वी इच्छेविरुद्ध वागावें लागल्यामुळें त्याचे डोळे रागानें अत्यंत आरक्त झाले होते व सर्पाप्रमाणें तो फूत्कार टाकीत होता. भीम रथाखालीं उतरतांच व त्यानें शस्त्रन्यास करतांच तें अस्त्र आपोआप शान्त झालें.

मानीपणा व ताठपणा यांचा भीमसेन हा मूर्तिमंत आविष्कार आहे. ज्यांच्यासमोर नम्र व्हावयास पाहिजे तेही शत्रु म्हणून समोर उभे राहिल्यावर तो त्यांच्यासमोर कधींहि नमला नाहीं. जयद्रथवधाच्या दिवशीं आचार्य द्रोणांच्या शकटव्यूहाचा भेद करावयास अर्जुन ज्या वेळीं गेला त्या वेळीं व्यूहद्वाराजवळच उभ्या असलेल्या आचार्य द्रोणांना गुरु म्हणून वन्दन करून व प्रदक्षिणा करून त्यांचा आशीर्वाद घेऊनच त्यानें व्यूहामध्यें प्रवेश केला असें वर्णन आहे. अर्जुन जाऊन पुष्कळ वेळ झाला तरी त्याची कांहींच वार्ता कळली नाहीं म्हणून युधिष्ठिरानें चिंतामग्न होऊन भीमसेनाला त्याच्या शोधार्थ पाठविलें. ज्याप्रमाणें अर्जुन आपणांस वन्दन करून गेला त्याचप्रमाणें भीमसेनही आपणांस वन्दन करील असें आचार्यांना वाटलें. पण तसें चिन्ह कांहींच दिसेना. शेवटीं स्वतः होऊनच आचार्य

द्रोणांनीं भीमसेनाला तसें सुचविलें. पण त्याचा काय परिणाम झाला असेल ? महाभारतकार म्हणतात :—

स मन्यमानस्त्वाचार्यो ममायं फाल्गुनो यथा ।
भीमः करिष्यते पूजामित्युवाच वृकोदरम् ।। ४४
भीमसेन न ते शक्या प्रवेष्टुमरिवाहिनी ।
मामनिर्जित्य समरे शत्रुमद्य महाबल ।। ४५
यदि ते सोऽनुजः कृष्णः प्रविष्टोऽनुमते मम ।
अनीकं न तु शक्यं मे प्रवेष्टुमिह वै त्वया ।। ४६
अथ भीमस्तु तच्छ्रुत्वा गुरोर्वाक्यमपेतभीः ।
क्रुद्धः प्रोवाच वै द्रोणं रक्तताम्रेक्षणस्त्वरन् ।। ४७
तवार्जुनो नानुमते ब्रह्मबन्धो रणाजिरम् ।
प्रविष्टः स हि दुर्धर्षः शक्रस्यापि विशेद् बलम् ।। ४८
तेन वै परमां पूजां कुर्वता मानितो ह्यसि ।
नार्जुनोऽहं घृणी द्रोण भीमसेनोऽस्मि ते रिपुः ।। ४९
पिता नस्त्वं गुरुर्बन्धुस्तथा पुत्रास्तु ते वयम् ।
इति मन्यामहे सर्वे भवन्तं प्रणताः स्थिताः ।। ५०
अद्य तद्विपरीतं ते वदतोऽस्मासु दृश्यते ।
यदि त्वं शत्रुमात्मानं मन्यसे तत्तथास्त्विह ।। ५१
एष ते सदृशं शत्रोः कर्म भीमः करोम्यहं ।
अथोद्भ्राम्य गदां भीमः कालदंडमिवान्तकः ।। ५२
द्रोणाय व्यसृजद्राजन् स रथादवपुप्लुवे ।
साश्वसूतध्वजं यानं द्रोणस्यापोथयत्तदा ।। ५३

—महाभारत द्रोणपर्व अध्याय १२७

स वध्यमानः समरे रथं द्रोणस्य मारिष ।
ईषायां पाणिना गृह्य प्रचिक्षेप महाबलः ।। १८
द्रोणस्तु सत्वरो राजन् क्षिप्तो भीमेन संयुगे ।
रथमन्यं समारुह्य व्यूहद्वारं ययौ पुनः ।। १९
तमायान्तं तथा दृष्ट्वा भग्नोत्साहं गुरुं तदा ।
गत्वा वेगात् पुनर्भीमो धुरं गृह्य रथस्य तु ।। २०
तमप्यतिरथं भीमश्चिक्षेप भृशरोषितः ।
एवमष्टौ रथाः क्षिप्त्वा भीमसेनेन लीलया ।। २१

**व्यदृश्यत निमेषेण पुनः स्वरथमास्थितः ।**
**दृश्यते तावकैर्योधैर्विस्मयोत्फुल्ललोचनैः ।। २२**
**तस्मिन् क्षणे तस्य यन्ता तूर्णमश्वानचोदयत् ।**
**भीमसेनस्य कौरव्यस्तदद्भुतमिवाभवत् ।। २३**
**ततः स्वरथमास्थाय भीमसेनो महाबलः ।**
**अभ्यद्रवत वेगेन तव पुत्रस्य वाहिनीम् ।। २४**

——महाभारत द्रोणपर्व अध्याय १२८

"अर्जुनानें ज्याप्रमाणें आपला सन्मान केला त्याचप्रमाणें भीमही आपला सन्मान करील असें वाटून आचार्य द्रोण भीमाला म्हणाले कीं, हे महाबला, मला जिकल्यावांचून तुला सैन्यांत प्रवेश करतां येणार नाहीं. तुझा विख्यात धाकटा बंधु अर्जुन माझी अनुमति घेऊनच सैन्यांत शिरला. तुला देखील तसेंच करतां येईल," हें ऐकतांच निर्भय भीमसेन क्रोधानें आपले नेत्र अधिकच आरक्त करून त्यांना म्हणाला, 'हे ब्राह्मणाधमा, तुझ्या अनुमतीनें अर्जुन तुझ्याच सैन्यांत शिरला ही शुद्ध थाप आहे. दुर्धर्ष अर्जुन इंद्राच्या देखील सैन्यांत शिरूं शकेल. मग तुझी कथाच काय ? गुरु म्हणून तुझा त्यानें सन्मान केला येवढेंच. पण मी अर्जुनाप्रमाणें दयाळू नाहीं. मी तुझा शत्रु भीम आहें. वास्तविक तूं आमचा गुरु असल्यामुळें आम्ही तुलाच पिता व सुहृद समजून व स्वतःला तुझे पुत्र समजून तुझ्यासमोर नेहमींच नम्र रहात होतों; पण तूं आपल्या पदवीला न शोभणारें वर्तन चालविलें आहेस. तूं जर स्वतःला आमचा शत्रु समजतोस तर तुझी इच्छा पूर्ण होवो." मी भीम तुझ्या शत्रू-प्रमाणेंच भयंकर कर्म करून दाखवितों. असें म्हणून अन्तकानें कालदण्ड फेकावा त्याप्रमाणें भीमानें आपली गदा फिरवून द्रोणांच्या अंगावर भिरकावली. ती येतांना पहातांच स्वतःला वांचविण्यासाठीं द्रोणांनीं रथाखालीं उडी घेतली व भीमाच्या त्या गदेनें अश्व, सूत व ध्वज यांसहित द्रोणांच्या रथाचें चूर्ण केलें. दुसरा रथ सज्ज करून व्यूहद्वारावर द्रोण येऊं लागले तों भीमासेनानें त्याही रथाची धुरा धरून तो फेकून दिला. तिसरा रथ सज्ज करून द्रोण आले तों भीमानें त्याही रथाची धुरा धरून तो उंच उचलून फेकून दिला.

सारे लोक आश्चर्यचकित होऊन पहात असतां याप्रमाणें एकंदर आठ वेळां द्रोणांचा रथ फेकून देऊन भीमानें त्यांचा उत्साह नष्ट केला. तेवढ्यांत अंतर साधून सारथ्यानें भीमाचा रथ त्याच्याजवळ आणला व त्यावर आरूढ होऊन द्रोण पुन्हां आपल्या जागीं येण्याच्या आंत भीम शकटव्यूहाचें अंतर तोडून बरेंच दूर आंत निघूनही गेला."

## भयंकर क्रोध व प्रतिशोध यांची मूर्ति

विलक्षण साहस व अपार सामर्थ्य अंगांत असल्यामुळें व क्रोध हा स्थायीभाव असल्यामुळें ज्यांनीं ज्यांनीं भीमाला डिवचण्याचा प्रयत्न केला व त्याचा अपराध केला त्या त्या प्रत्येकाचा सूड घेण्याचा प्रसंग आल्यावर ज्याचें नुसतें स्मरण झाल्यावरही कातरांचें अंतःकरण कंपित होऊन जाईल अशा प्रकारानें त्यानें त्यांचा प्रतिशोध घेतला आहे. हिडिंब, बकासुर, जरासंध यांना ठार मारतांना व जयद्रथाची फटफजिती करतांना या विशिष्ट प्रकाराचें त्याचें स्वरूप स्पष्ट झालें आहे. पण अज्ञातवासांतील कीचकवधाच्या प्रकरणांत तें ज्या विदारक रीतीनें स्पष्ट झालें तितक्या विदारक रीतीनें केवळ दुःशासनाच्या वधाचें अपवादात्मक प्रकरण सोडून दुसरीकडे कुठेंही प्रकट झालें नाहीं. अल्प अपराध केल्यावर देखील तो सहन न व्हावा ही ज्याची मूलभूत प्रवृत्ति व जरासंधासारख्यालाही फाडून खाण्यासारखें ज्याचें अपार सामर्थ्य त्याच्या अंतःकरणाच्या लाक्षागृहाला कीचकानें अपमानाची जणूं मशालच लावली होती. त्या उन्मत्त सूतपुत्रानें भीमाचा सर्वश्रेष्ठ मानबिंदु असलेल्या द्रौपदीवर आपली पापदृष्टि रोखली, इतकेंच नव्हे तर भीमसेन पहात असतां त्याच्यासमोर कीचकानें द्रौपदीचे केस धरून तिच्या कमरेंत लाथ हाणली. तें दृश्य पहातांच भीमाच्या अंतरंगाचा केवढा तिळपापड उडाला असेल! महाभारतकार वर्णन करतात :—

**तस्य भीमो वधं प्रेप्सुः कीचकस्य दुरात्मनः ।**
**दंतैर्दन्तांस्तदा रोषान्निष्पिपेष महामनाः ॥ १४**
**धूमच्छाया ह्यभजतां नेत्रे चोच्छ्रितपक्ष्मणी ।**
**सस्वेदा भ्रुकुटी चोग्रा ललाटे समवर्तत ॥ १५**

हस्तेन ममृदे चैव ललाटं परवीरहा ।
भूयश्च त्वरितः क्रुद्धः सहसोत्थातुमैच्छत ।। १६

—महाभारत, विराटपर्व अध्याय १६

"त्या दुरात्म्या कीचकाचा तत्काल वध करावा अशी इच्छा भीमाच्या अंतःकरणांत चमकली. रागानें देहभान विसरून त्यानें दांत एकमेकांवर कडकडा घासले. त्याचे नेत्र कलुषित झालेले दिसले. कपाळाला घाम येऊन त्याच्या भ्रुकुटी उग्र दिसूं लागल्या. आपला तळहात त्यानें कपाळावरून जोरानें घासला व त्याचा क्रोध वाढून कीचकाला ठार मारण्यासाठीं तो एकदम जागेवरून उठूं लागला. पण युधिष्ठिरानें त्याला आवरलें. ज्याचें नेतृत्व त्यानें मान्य केलें होतें, त्याच व्यक्तीनें त्याला आवरून त्याचा क्रोध मुळींच प्रकट होऊं दिला नाहीं. प्रस्फोट होऊं इच्छिणारा त्याच्या क्रोधाचा ज्वालामुखी याप्रमाणें त्या वेळीं थांबला तरी द्रौपदीनें रात्रीं महानसांत त्याची गांठ घेऊन त्याचा प्रस्फोट घडवून आणला. अपमानित अवस्थेंत भीमावांचून दुसरें कोणीही आपलें प्रिय करूं शकणार नाहीं अशी तिची खात्री होती. महाभारतकार म्हणतातः—

किं करोमि क्व गच्छामि कथं कार्यं भवेन्मम ।
इत्येवं चिन्तयित्वा सा भीमं वै मनसाऽगमत् ।। ४
नान्यः कर्ता ऋते भीमान्ममाद्य मनसः प्रियम् ।
तत उत्थाय रात्रौ सा विहाय शयनं स्वकम् ।। ५
प्राद्रवन्नाथमिच्छन्ती कृष्णा नाथवती सती ।
भवनं भीमसेनस्य क्षिप्रमायतलोचना ।। ६

—महाभारत, विराटपर्व अध्याय १७

"मी कुठें जाऊं ? काय करूं ? माझ्या अब्रूच्या संरक्षणासाठीं या दुष्टाला ताबडतोब ठार मारूं शकेल असा कोण आहे, याचा विचार करीत असतां तिच्या अंतःकरणाच्या फलकावर भीमाचीच रौद्र मूर्ति उभी राहिली. तशीच मध्यरात्रीं आपल्या शयनावरून उठून भीमसेनाच्या भवनाकडे द्रौपदी गेली. त्या वेळीं भीमसेन स्वस्थ झोपला होता. त्याच्या अंतःकरणाला लागेल असें बोलून द्रौपदीनें भीमसेनाला जागृत केलें. तिला त्या स्थितींत पाहातांच

भीमानें तिला म्हटलें कीं, द्रौपदी, तुझ्या सर्व विपत्तींत मीं तुझें संरक्षण केलें आहे. मीच तुझा खरा विश्वासपात्र आहें याची मला पूर्ण कल्पना आहे. तुला काय हवें तें सांग. तूं इतकी दुःखी कां ? द्रौपदीनें स्वतःचें हृदय मोकळें करून भीमाला आपल्या दुःखाचीं जीं कारणें सांगितलीं त्याचें विस्तृत वर्णन मी माझ्या द्रौपदीवरील व्याख्यानांत केलेंच आहे. द्रौपदीनें आपलें हृदय मोकळें करून त्याच्या छातीवर आपलें डोकें टेकलें. आपले घट्टे पडलेले हात त्याला दाखविले. ते तिचे दोन्ही हात आपल्या तोंडाजवळ नेऊन तो प्रचंड सामर्थ्यशाली भीमसेन एकाद्या दुर्बलाप्रमाणें रडूं लागला. बराच वेळ अश्रुपात करून तो तिला म्हणाला :—

धिगस्तु मे बाहुबलं गाण्डीवं फाल्गुनस्य च ।
यत्ते रक्तौ पुरा भूत्वा पाणी कृतकिणाविमौ ।। १
सभायां तु विराटस्य करोमि कदनं महत् ।
तत्र मे कारणं भाति कौन्तेयो यत् प्रतीक्षते ।। २
अथवा कीचकस्याहं पोथयामि पदा शिरः ।
ऐश्वर्यमदमत्तस्य क्रीडन्निव महाद्विपः ।। ३
अपश्यं त्वां यदा कृष्णे कीचकेन पदा हताम् ।
तदैवाहं चिकीर्षामि मत्स्यानां कदनं महत् ।। ४
तत्र मां धर्मराजस्तु कटाक्षेण न्यवारयत् ।
तदहं तस्य विज्ञाय स्थित एवास्मि भामिनि ।। ५
यच्च राष्ट्रात् प्रच्यवनं कुरूणामवधश्च यः ।
सुयोधनस्य कर्णस्य शकुनेः सौबलस्य च ।। ६
दुःशासनस्य पापस्य यन्मया नाहृतं शिरः ।
तन्मे दहति गात्राणि हृदि शल्यमिवार्पितम् ।। ७
मा धर्मं जहि सुश्रोणि क्रोधं जहि महामते ।
इदं तु समुपालम्भं त्वत्तो राजा युधिष्ठिरः ।
श्रृणुयाद्वाऽपि कल्याणि कृत्स्नं जह्यात् स जीवितम् ।। ८
धनंजयो वा सुश्रोणि यमौ वा तनुमध्यमे ।
लोकान्तरगतेष्वेषु नाहं शक्ष्यामि जीवितुम् ।। ९

—महाभारत, विराटपर्व अध्याय २१

"माझ्या बाहुबलाला व अर्जुनाच्या गाण्डीव धनुष्याला धिक्कार असो. तुझे आरक्त हात लोकांच्या घरीं कामें करीत असतां घट्टे पडून व्यथित होतात तर मग आमच्या पराक्रमांत अर्थ तरी काय आहे? विराटाच्या सभेंत आज मी मोठा भयंकर संहार केला असता पण केवळ युधिष्ठिरांनींच तो प्रकार होऊं दिला नाहीं. एकाद्या महान् गजराजाप्रमाणें, ऐश्वर्यमदानें उन्मत्त झालेल्या कीचकाचें मस्तक मीं माझ्या पायानें रगडून व तुडवून काढलें असतें. ज्या वेळीं कीचकानें तुला लाथ मारली त्या वेळीं मत्स्यांचें कंदन करण्याची कल्पना माझ्या मनांत चमकली. पण तेथें धर्मराजानें कटाक्षानें माझें निवारण केलें. त्यांची तशी इच्छा नाहीं हें पाहून मी स्वस्थ बसलों. ही एकच गोष्ट काय पण राज्यापासून भ्रष्ट होणें, कौरवांना ठार न मारणें, दुःशासन, शकुनि, कर्ण व दुर्योधन यांचीं मस्तकें न तोडणें या सर्व गोष्टींनीं माझ्या अंगाचा भडका उडालेला असून एकाद्या शल्याप्रमाणें या सर्व गोष्टी माझ्या हृदयांत टोचतात. पण काय करूं, युधिष्ठिराची तशी इच्छा नाहीं. तूं क्रोधाच्या भरांत आपल्या पतींची निंदा करण्याचा अधर्म करूं नकोस. क्रोध आवर. तूं आतां युधिष्ठिरांविषयीं जें बोललीस तें जर तूं त्यांच्यासमोर बोललीस तर युधिष्ठिर जिवंत रहाणार नाहींत. अर्जुन व नकुलसहदेवही जिवंत रहाणार नाहींत व द्रौपदी, माझ्या बंधूंवांचून मलाही जिवंत रहाणें अशक्य आहे. आतां कांहीं फार दिवस उरलेले नाहींत."

**मा दीर्घं क्षम कालं त्वं मासमर्धं च संमितम् ।**
**पूर्णे त्रयोदशे वर्षे राज्ञां राज्ञी भविष्यसि । १७**

—महाभारत, विराटपर्व अध्याय २१

दीर्घकालपर्यंत तुला हें सारें सहन करण्याचें यापुढें मुळींच कारण उरलेलें नाहीं. हा अत्यंत थोडया अवधीचा प्रश्न आहे. केवळ पंधरा दिवस तूं थांब. आजपासून पंधराव्या दिवशीं आपलीं तेरा वर्षें पूर्ण होतांच तूं साम्राज्ञी होशील. पण द्रौपदी इतका वेळ थांबणें केवळ अशक्य होतें. तिनें त्याला स्पष्ट सांगितलें कीं माझ्या अब्रूचा प्रश्न पंधरा दिवसापर्यंत थांबणार नसून पुढच्या क्षणावर

येऊन ठेपला आहे. अब्रू गेलेल्या स्थितींत मी एक क्षणभरही जिवंत रहाणार नाहीं. मग खुशाल पंधरा दिवसपर्यंत तुम्ही थांबा व राज्य करीत बसा. कीचकानें उद्यांचा सूर्य पाहूं नये अशी माझी इच्छा आहे. त्याच्या अधीन होणें किंवा विष प्राशन करून मरून जाणें यांवाचून दुसरा कोणताच मार्ग माझ्यासमोर दिसत नाहीं, असें म्हणून भीमाच्या छातीवर मस्तक टेकवून ती आक्रंदन करूं लागली. महाभारतकार म्हणतात :—

**इत्युक्त्वा प्रारुदत् कृष्णा भीमस्योरः समाश्रिता ।**
**भीमश्च तां परिष्वज्य महत्सान्त्वं प्रयुज्य च ।। ४९**
**आश्वासयित्वा बहुशो भृशमार्तां सुमध्यमाम् ।**
**हेतुतत्त्वार्थसंयुक्तैर्वचोभिर्द्रुपदात्मजाम् ।। ५०**
**प्रमृज्य वदनं तस्याः पाणिनाश्रुसमाकुलम् ।**
**कीचकं मनसाऽगच्छत् सृक्किणी परिसंलिहन् ।।**
**उवाच चैनां दुःखार्तां भीमः क्रोधसमन्वितः ।। ५१**

—महाभारत, विराटपर्व अध्याय २१

भीम उवाच ।

**तथा भद्रे करिष्यामि यथा त्वं भीरु भाषसे ।**
**अद्य तं सूदयिष्यामि कीचकं सहबान्धवम् ।। १**
**अस्याः प्रदोषे शर्वर्याः कुरुष्वानेन सङ्गतम् ।**
**दुःखं शोकं च निर्धूय याज्ञसेनि शुचिस्मिते ।। २**
**यैषा नर्तनशालेह मत्स्यराजेन कारिता ।**
**दिवाऽत्र कन्या नृत्यन्ति रात्रौ यान्ति यथागृहम् ।। ३**
**तत्रास्ति शयनं दिव्यं दृढाङ्गं सुप्रतिष्ठितम् ।**
**तत्रास्य दर्शयिष्यामि पूर्वप्रेतान् पितामहान् ।। ४**
**यथा च त्वां न पश्येयुः कुर्वाणां तेन संविदम् ।**
**कुर्यास्तथा त्वं कल्याणि यथा सन्निहितो भवेत् ।। ५**

—महाभारत, विराटपर्व अध्याय २२

याप्रमाणें बोलून द्रौपदी भीमसेनाच्या छातीवर डोकें ठेवून अश्रुपात करूं लागली असतां भीमानें तिला कुरवाळून तिचें सांत्वन केलें. नाना प्रकारें बोलून त्यानें तिचें समाधान करण्याचा प्रयत्न केला. आपल्या हातानें तिचे अश्रू पुसून कीचकाचा विचार मनांत

आणून अत्यंत संतापलेल्या भीमानें आपले ओठ चाटले व तो द्रौपदीला म्हणाला, "हे कल्याणि, मी त्या दुरात्म्या कीचकाला त्याच्या बांधवांसहित ठार मारतों. पण तूं एक युक्ति कर. दुःख व शोक गिळून टाकून आज सकाळींच कीचकाची तूं गांठ घे. व राजा विराटाच्या नृत्यशाळेंत तो येईल असा त्याच्याशीं संकेत कर. या मत्स्य राजाच्या नृत्यशाळेंत दिवसा मुली नृत्य शिकतात व त्या रात्रीं आपापल्या घरीं जातात. त्या ठिकाणीं एक मोठा दिव्य, दृढ व व्यवस्थित रीतीनें ठेवलेला असा मंचक आहे. त्या मंचकावरच मी कीचकाला त्याचे सारे पितामह दाखवितो. तूं गुप्तपणें त्याच्याशीं संकेत कर व त्याला नर्तनागारांत आणून सोड. पुढचें मी पाहीन." द्रौपदीनें त्याच्या इच्छेनुरूप कीचकाशीं संकेत केला. ठरलेल्या संकेताप्रमाणें कीचक नर्तनागारांत आला. भीम त्याच्या आधींच नर्तनागारांत येऊन बसला होता. तो आटोक्यांत येतांच भीमानें त्याचे केश धरून ओढले. साऱ्या रात्रभर त्या दोघांचें युद्ध झालें व शेवटीं भीमानें त्याला ठार मारलें. प्रतिशोधाच्या आगीनें संतप्त झालेल्या भीमसेनानें ज्या पद्धतीनें कीचकाला ठार मारलें तिचें वर्णन करीत असतां महाभारतकार म्हणतात :—

क्रोधाविष्टो विनिःश्वस्य पुनश्चैनं वृकोदरः ।
जग्राह जयतां श्रेष्ठः केशेष्वेव तदा भृशम् ।। ७२
गृहीत्वा कीचकं भीमो विरराज महाबलः ।
शार्दूलः पिशिताकाङ्क्षी गृहीत्वेव महामृगम् ।। ७३
तत एनं परिश्रान्तमुपलभ्य वृकोदरः ।
योक्त्रयामास बाहुभ्यां पशुं रशनया यथा ।। ७४
नदन्तं च महानादं भिन्नभेरीसमस्वनम् ।
भ्रामयामास सुचिरं विस्फुरन्तमचेतसम् । ७५
प्रगृह्य तरसा दोर्भ्यां कण्ठं तस्य वृकोदरः ।
अपीडयत कृष्णायास्तदा कोपोपशान्तये ।। ७६
अथ तं भग्नसर्वाङ्गं व्याविद्धनयनाम्बरम् ।
आक्रम्य च कटीदेशे जानुना कीचकाधमम् ।। ७७
अपीडयत बाहुभ्यां पशुमारममारयत् ।
तं विषीदन्तमाज्ञाय कीचकं पाण्डुनन्दनः ।।
भूतले भ्रामयामास वाक्यं चेदमुवाच ह ।। ७८

अद्याहमनृणो भूत्वा भ्रातुर्भार्यापहारिणम् ।
शान्तिं लब्धोऽस्मि परमां हत्वा सैरन्ध्रिकण्टकम् ॥ ७९
इत्येवमुक्त्वा पुरुषप्रवीरस्तं कीचकं क्रोधसरागनेत्रः ।
आस्रस्तवस्त्राभरणं स्फुरन्तमुद्भ्रान्तनेत्रं व्यसुमुत्ससर्ज ॥ ८०
निष्पिष्य पाणिना पाणिं संदष्टौष्ठपुटं बली ।
समाक्रम्य च संक्रुद्धो बलेन बलिनां वरः ॥ ८१
तस्य पादौ च पाणी च शिरो ग्रीवां च सर्वशः ।
काये प्रवेशयामास पशोरिव पिनाकधृक् ॥ ८२
तं संमथितसर्वाङ्गं मांसपिण्डोपमं कृतम् ।
कृष्णाया दर्शयामास भीमसेनो महाबलः ॥ ८३
उवाच च महातेजा द्रौपदीं योषितां वराम् ।
पश्यैनमेहि पाञ्चालि कामुकोऽयं यथा कृतः ॥ ८४
एवमुक्त्वा महाराज भीमो भीमपराक्रमः ।
पादेन पीडयामास तस्य कायं दुरात्मनः ॥ ८५
ततोऽग्निं तत्र प्रज्वाल्य दर्शयित्वा तु कीचकम् ।
पाञ्चालीं स तदा वीर इदं वचनमब्रवीत् ॥ ८६
प्रार्थयन्ति सुकेशान्ते ये त्वां शीलगुणान्विताम् ।
एवं ते भीरु वध्यन्ते कीचकः शोभते यथा ॥ ८७
तत्कृत्वा दुष्करं कर्म कृष्णायाः प्रियमुत्तमम् ।
तथा स कीचकं हत्वा गत्वा रोषस्य वै शमम् ॥ ८८
आमन्त्र्य द्रौपदीं कृष्णां क्षिप्रमायान्महानसम् ।

—महाभारत, विराटपर्व अध्याय २२

" क्रोधाविष्ट झालेल्या भीमसेनानें सुस्कारा सोडून पुनश्च त्याचे केस धरले. रक्त पिऊं इच्छिणारा वाघ ज्याप्रमाणें दिसतो तसाच भीम त्या वेळीं दिसूं लागला. कीचक थकला असें पाहून पशूला दोरीनें बांधतात त्याप्रमाणें भीमानें त्याला आपल्या भुजबंधनानें जखडून टाकलें. फुटलेल्या भेरीप्रमाणें अंतकाळचा घोर नाद करीत असलेल्या कीचकाला भीमानें इतक्या फेऱ्या दिल्या कीं तो अगदीं अचेतन होऊन गेला. केवळ श्वासावरूनच तो ओळखतां येत होता. नंतर त्याचें अंग सर्व ठिकाणीं सांधे खिळखिळे करून मोडून टाकल्यावर व डोळे उघडून मृत्यूची वाट पाहात तारवट-लेल्या डोळ्यांनीं तो आकाशाकडे पाहात असलेल्या स्थितींत त्याच्या

कमरेला मांडीचा विळखा घालून व दोन्ही हातांनीं त्याचा गळा दाबून पशूप्रमाणें बुकलून त्याला भीमानें ठार मारलें. नंतर त्याला त्यानें जमिनीवर फरफरां ओढलें व तो तोंडानें म्हणूं लागला कीं, आमच्या कुलस्त्रीची विटंबना करणाऱ्या या चांडाळाला ठार मारून मी आज कर्तव्यपूर्तीचें समाधान भोगीत आहें. याप्रमाणें बोलून त्यानें त्या कीचकाच्या प्रेताकडे पाहिलें. अस्ताव्यस्त स्थितींत वस्त्र व आभरणें इतस्ततः विखुरलीं असतांना, डोळे तारवटलेल्या स्थितींत त्याचें प्रेत पडलेलें पाहूनही भीमाचें समाधान होईना. क्रोधानें त्यानें पुनश्च आपले दांतओठ चावले व रागानें कीचकाच्या त्या प्रेतावर आक्रमण करून त्यानें त्याचा तो मृतदेह यथेच्छ तुडवून काढला व नंतर त्याचे हातपाय, मस्तक, मान इत्यादि सर्व अवयव त्याच्या देहांत घुसवून त्यानें त्याच्या शरीराचा एक मोठा मांसाचा गोळाच बनविला. लाथेच्या ठोकरीनें तो गोळा द्रौपदीच्या समोर करीत भीम म्हणाला : हे पांचाली, पहा या कामुकाची मी काय अवस्था केली आहे. तेथें अग्नि पेटवून तो मांसपिंड भीमानें तिला दाखविला. पुनश्च तो तिला म्हणाला : हे पांचाली, तुझ्यासारख्या शीलचारित्र्यसंपन्न साध्वीला जे लोक शीलभ्रष्ट करण्याचा प्रयत्न करतात त्यांचा वध अशा भयंकर प्रकारानें होत असतो. याप्रमाणें द्रौपदीचें काम केल्यावर त्याला खरें समाधान लाभलें. द्रौपदीचा निरोप घेऊन तो परत महानसांत आला. थोडया वेळानंतर कीच-काच्या वधाचा आश्चर्यकारक प्रकार ऐकून त्याचे सारे बांधव तिथें जमले व बलवान् अनुकीचकांनीं बळानें राजा विराटाची अनुमति घेऊन सैरंध्रीला कीचकाच्या प्रेताबरोबर जिवंत जाळून टाकण्या-साठीं म्हणून तिला तिरडीवर बांधलें. ती बिचारी शोकानें विलाप करूं लागली. तिच्या आक्रंदनाचा शब्द कानांत येतांच सारा भया-नक प्रकार भीमसेनाच्या ध्यानांत आला व बसल्या जागेवरूनच तिला संरक्षणाचें आश्वासन देत भीमसेन वेगळयाच मार्गानें स्मशानाकडे चालला. महाभारतकार म्हणतात :—

**इत्युक्त्वा स महाबाहु विजजृम्भे जिघांसया ।**
**ततः स व्यायतं कृत्वा वेषं विपरिवर्त्य च । १७**

अद्वारेणाभ्यवस्कन्द्य निर्जगाम बहिस्तदा ।
स भीमसेनः प्राकारादारुह्य तरसा द्रुमम् ॥ १८
श्मशानाभिमुखः प्रायाद्यत्र ते कीचका गताः ।
स लङ्घयित्वा प्राकारं निःसृत्य च पुरोत्तमात् ॥
जवेन पतितो भीमः सूतानामग्रतस्तदा ॥ १९
चितासमीपे गत्वा स तत्रापश्यद् वनस्पतिम् ।
तालमात्रं महास्कन्धं मूर्धशुष्कं विशाम्पते ॥ २०
तं नागवदुपक्रम्य बाहुभ्यां परिरभ्य च ।
स्कन्धमारोपयामास दशव्यामं परन्तपः ॥ २१
स तं वृक्षं दशव्यामं सस्कन्धविटपं बली ।
प्रगृह्याभ्यद्रवत्सूतान्दण्डपाणिरिवान्तकः ॥ २२
ऊरुवेगेन तस्याथ न्यग्रोधाश्वत्थकिंशुकाः ।
भूमौ निपतिता वृक्षाः सङ्घशस्तत्र शेरते ॥ २३
तं सिंहमिव सङ्क्रुद्धं दृष्ट्वा गन्धर्वमागतम् ।
वित्रेसुः सर्वशः सूता विषादभयकम्पिताः ॥ २४
गन्धर्वो बलवानेति क्रुद्ध उद्यम्य पादपम् ।
सैरन्ध्री मुच्यतां शीघ्रं यतो नो भयमागतम् ॥ २५
ते तु दृष्ट्वा तदाऽऽविद्धं भीमसेनेन पादपम् ।
विमुच्य द्रौपदीं तत्र प्राद्रवन्नगरं प्रति ॥ २६
द्रवतस्तांस्तु संप्रेक्ष्य स वज्री दानवानिव ।
शतं पंचाधिकं भीमः प्राहिणोद्यमसादनम् ॥ २७
वृक्षेणैतेन राजेन्द्र प्रभञ्जनसुतो बली ।
तत आश्वासयत्कृष्णां स विमुच्य विशांपते ॥ २८
उवाच च महाबाहुः पाञ्चालीं तत्र द्रौपदीम् ।
अश्रुपूर्णमुखीं दीनां दुर्धर्षः स वृकोदरः ॥ २९
एवं ते भीरु वध्यन्ते ये त्वां क्लिशन्त्यनागसम् ।
प्रैहि त्वं नगरं कृष्णे न भयं विद्यते तव ॥ ३०
अन्येनाहं गमिष्यामि विराटस्य महानसम् ॥ ३१

—महाभारत, विराटपर्व अध्याय २३

अथ मुक्ता भयात्कृष्णा सूतपुत्रान्निरस्य च ।
मोक्षिता भीमसेनेन जगाम नगरं प्रति ॥ ११

त्रासितेव मृगी बाला शार्दूलेन मनस्विनी ।
गात्राणि वाससी चैव प्रक्षाल्य सलिलेन सा ।। १२
तां दृष्ट्वा पुरुषा राजन् प्राद्रवन्तो दिशो दश ।
गन्धर्वाणां भयत्रस्ताः केचिद् दृष्ट्वा न्यमीलयन् ।। १३
ततो महानसद्वारि भीमसेनमवस्थितम् ।
ददर्श राजन् पाञ्चाली यथा मत्तं महाद्विपम् ।। १४
तं विस्मयन्ती शनकैः संज्ञाभिरिदमब्रवीत् ।।
गन्धर्वराजाय नमो येनास्मि परिमोचिता ।। १५

—महाभारत, विराटपर्व अध्याय २४

" याप्रमाणें बोलून भीमानें अनुकीचकांना मारण्याच्या इच्छेनें एक मोठी जांभई दिली, व नंतर आपला वेष बदलून दुसऱ्याच एका मार्गानें प्राकाराचें उल्लंघन करून तो स्मशानांत आला. चितेच्या जवळ जाऊन त्यानें एक मोठा वृक्ष उपटला. व तो आपल्या खांद्यावर घेऊन दण्डपाणि अन्तकाप्रमाणें सूतपुत्रांच्या अंगावर धांवून गेला. त्याच्या धांवण्याच्या वेगानेंच कित्येक वृक्ष उन्मळून पडले. क्रुद्ध झालेल्या सिंहाप्रमाणें गन्धर्व अंगावर येत असल्याचें पाहून विषादानें सारे अनुकीचक भयकंपित झाले. व बलवान् गन्धर्व झाड घेऊन मारावयास येतो आहे, तरी सैरन्ध्रीला सोडा व पळा असा एकच आरडाओरडा करीत ते द्रौपदीला सोडून नगराकडे पळूं लागले. पण आतां भीमसेन त्यांना सोडणार होता काय ? महेन्द्रानें वज्रानें दानवांचा नाश करावा त्याप्रमाणें भीमसेनानें त्या वृक्षानें १०५ अनुकीचकांना ठार मारून टाकलें. नंतर अश्रुनयना द्रौपदीला आश्वासन देत भीमसेन तिला म्हणाला, " तुझ्यासारख्या निरपराध व्यक्तीला जे लोक त्रास देतात त्यांना अशाच प्रकारें मृत्यु येत असतो. तूं नगरांत जा. आतां तुला कसलेंही भय उरलेलें नाहीं. मी दुसऱ्या वाटेनें महानसांत जातों. याप्रमाणें संकटांतून सुटल्यावर पाण्यानें शरीर व वस्त्रें स्वच्छ करून द्रौपदी विराटनगरीकडे येऊं लागली. तिला येतांना पाहतांच आपण हिच्याकडे नुसतें पाहिलें तरी रागावलेले गन्धर्व आपल्याला ठार मारून टाकतील या भयानें लोक दशदिशांना पळूं लागले व ज्यांना पळणें शक्य नव्हतें त्यांनीं डोळे मिटून घेतले.

येतांना द्रौपदीनें मत्त गजेन्द्राप्रमाणें महानसाच्या दाराशींच उभ्या असलेल्या भीमाला पाहिलें व त्याला ती ओळख देत म्हणाली कीं "ज्यानें या संकटापासून माझें संरक्षण केलें त्या गन्धर्वराजाला माझा नमस्कार असो." महापराक्रमी भीमसेनाच्या युद्धाची ही अमानुष पद्धति व प्रतिशोधाची ही विलक्षण तऱ्हा त्या काळीं इतकी प्रसिद्ध होती कीं तिच्यावरून तो सहज ओळखला जाई. त्यामुळेंच दक्षिणगोग्रहणाच्या युद्धांत राजा त्रिगर्तानें राजा विराटाला पकडून नेलें असतां त्याला सोडविण्यासाठीं भीम ज्या वेळीं रणांत उडी घेऊं लागला व आपल्या पद्धतीप्रमाणें एक महान् वृक्ष उपटून सैन्याला ठार मारण्याचा विचार करूं लागला त्यावेळीं युधिष्ठिरानें त्याला पुढीलप्रमाणें इषारा दिला आहे :—

> **मा भीम साहसं कार्षीस्तिष्ठत्वेष वनस्पतिः ।**
> **मा त्वं वृक्षेण कर्माणि कुर्वाणमतिमानुषम् ।। १८**
> **जनाः समवबुध्येरन् भीमोऽयमिति भारत ।**
> **अन्यदेवायुधं किञ्चित् प्रतिपद्यस्व मानुषम् ।। १९**
> **चापं वा यदि वा शक्तिं निस्त्रिंशं वा परश्वधम् ।**
> **यदेव मानुषं भीम भवेदन्यैरलक्षितम् ।। २०**
> **तदेवायुधमादाय मोक्षयाशु महीपतिम् ।**
> **यमौ च चक्ररक्षौ ते भवितारौ महाबलौ ।। २१**
>
> —महाभारत, विराटपर्व अध्याय ३३

हे भीमा, हा वृक्ष जागच्या जागींच राहूं दे. व्यर्थ साहस करूं नकोस. तूं जर वृक्ष हातांत घेऊन अमानुष कर्म करूं लागशील तर लोक हा भीम आहे हें ओळखल्यावांचून राहणार नाहींत. सामान्य माणसें ज्याप्रमाणें आयुध हातांत घेऊन युद्ध करतात त्याप्रमाणें रथांत बसून व धनुष्य, शक्ति, खड्ग इत्यादि मनुष्यासारखींच आयुधें हातांत घेऊन राजा विराटाची लवकर सुटका कर. नकुल व सहदेव तुझे चक्ररक्षक होतील."

## कौरव व भीमसेन

जाणून बुजून नग्न खड्गाखालीं जो आपलें मस्तक देईल त्याचें तें मस्तक चिरलें गेलें असतां खड्गाला दूषण देण्यांत काय अर्थ

आहे ? त्याचप्रमाणें भीमसेनासारख्या प्रचंड सामर्थ्याच्या, अनिवार क्रोधाच्या, व प्रतिशोधाच्या आगीनें नेहमींच प्रदीप्त असणाऱ्या व्यक्तीचा भयानक छळवाद केल्यावर त्याचे स्वाभाविक परिणाम भोगण्याची पाळी आल्यावर मग त्याला दूषण देण्यांत काय अर्थ आहे ? राजा धृतराष्ट्रानें कुलभेदाची जबाबदारी भीमावर ढकलली आहे हें आपण संजयाशीं त्यानें केलेल्या भाषणांत पाहिलेंच आहे. परंतु एखाद्या पाताळयंत्री पुरुषाला शोभण्यासारखेच ते उद्गार आहेत. केवळ लहानपणीं मुलांच्या स्वाभाविक खेळण्यांत भीमानें धृतराष्ट्रपुत्रांचा पराभव केला असतां त्यामुळें चिडून त्याला विषप्रयोग करण्यापर्यंत ज्या नीचांची मजल गेली त्यांच्याविषयीं भीमाच्या अंतःकरणांत काय म्हणून द्वेष संचरूं नये ? भीमाच्या सामर्थ्यामुळेंच पाण्डव अजिंक्य आहेत या समजुतीनें पहिल्यापासून भीमावरच धृतराष्ट्रासहित सर्व कौरवांनीं प्राणघेऊ भीषण आघात केलेले आहेत. लहानपणीं वैराची कल्पना देखील नसतांना त्यांनीं त्याच्यावर विषप्रयोग करून व मूर्च्छित स्थितींत त्याला लतापाशांनीं बांधून नदीच्या पाण्यांत फेकून दिलें. लाक्षागृहांत त्याला जिवंत जाळून टाकण्याचा प्रयत्न केला. स्वतःची माता कुंती व ज्येष्ठ बंधु युधिष्ठिर यांच्याविषयीं भीमाला आत्यंतिक प्रेम असे. त्यांच्या दुर्गतीला लाक्षागृहानंतर पारावार उरला नाहीं हें पाहून मूळचाच क्रोधी भीमसेन कौरवांचा कठोर विद्वेषी बनला असल्यास त्यांत नवल काय आहे ? आपल्यासारखा सामर्थ्यसंपन्न पुत्र असतांना एके काळीं जगताची साम्राज्ञी म्हणून जी नांदली त्या आपल्या मातेला पाणी प्यावयास फुटकें भांडेंही असूं नये व जाड कापड भिजवून तिला त्याचें पाणी पाजण्याचा आपल्यावर प्रसंग यावा याचें त्याच्या मानी अंतःकरणाला काय वाटलें असेल! केवळ राज्यलोभासाठीं मनुष्य इतका नीच होऊं शकतो याची त्याच्या सरळ स्वभावाला कल्पनाही शिवली नव्हती. ज्या दिवशीं त्यानें कुन्तीला वृक्षाखालीं अनाथासारखें झोपतांना पाहिलें त्याच दिवशीं त्याच्या अन्तःकरणांत कौरवांच्या विषयींचा भयानक विद्वेष बद्धमूल झाला. महाभारतकार म्हणतातः—

स सुप्तां मातरं दृष्ट्वा भ्रातृंश्च वसुधातले ।
भृशं शोकपरीतात्मा विललाप वृकोदरः ।। २१
अतः कष्टतरं किं नु द्रष्टव्यं हि भविष्यति ।
यत्पश्यामि महीसुप्तान्भ्रातृनद्य सुमंदभाक् ।। २२
शयनेषु परार्ध्येषु ये पुरा वारणावते ।
नाधिजग्मुस्तदा निद्रां तेऽद्य सुप्ता महीतले ।। २३
स्वसारं वसुदेवस्य शत्रुसंघावमर्दिनः ।
कुन्तिराजसुतां कुंतीं सर्वलक्षणपूजिताम् ।। २४
स्नुषां विचित्रवीर्यस्य भार्यां पाण्डोर्महात्मनः ।
तथैव चास्मज्जननीं पुण्डरीकोदरप्रभाम् ।। २५
सुकुमारतरामेनां महार्हशयनोचिताम् ।
शयानां पश्यताऽद्येह पृथिव्यामतथोचिताम् ।। २६
धर्मादिन्द्राच्च वाताच्च सुषुवे या सुतानिमान् ।
सेयं भूमौ परिश्रान्ता शेते प्रासादशायिनी ।। २७
किं नु दुःखतरं शक्यं मया द्रष्टुमतःपरम् ।
योऽहमद्य नरव्याघ्रान्सुप्तान्पश्यामि भूतले ।। २८
त्रिषु लोकेषु यो राज्यं धर्मनित्योऽर्हते नृपः ।
सोऽयं भूमौ परिश्रान्तः शेते प्राकृतवत्कथम् ।। २९
अयं नीलाम्बुदश्यामो नरेष्वप्रतिमोऽर्जुनः ।
शेते प्राकृतवद्भूमौ ततो दुःखतरं नु किम् ।। ३०
अश्विनाविव देवानां याविमौ रूपसंपदा ।।
तौ प्राकृतवदद्येमौ प्रसुप्तौ धरणीतले ।। ३१
ज्ञातयो यस्य नैव स्युर्विषमाः कुलपांसनाः ।
स जीवेत सुखं लोके ग्रामद्रुम इवैकजः ।। ३२
एको वृक्षो हि यो ग्रामे भवेत्पर्णफलान्वितः ।
चैत्यो भवति निर्ज्ञातिरर्चनीयः सुपूजितः ।। ३३
येषां च बहवः शूरा ज्ञातयो धर्ममाश्रिताः ।
ते जीवन्ति सुखं लोके भवन्ति च निरामयाः ।। ३४
बलवन्तः समृद्धार्था मित्रबान्धवनन्दनाः ।।
जीवन्त्यन्योन्यमाश्रित्य द्रुमाः काननजा इव ।। ३५
वयं तु धृतराष्ट्रेण सपुत्रेण दुरात्मना ।
विवासिता न दग्धाश्च कथंचिद्दैवसंश्रयात् ।। ३६

**तस्मान्मुक्ता वयं दाहादिमं वृक्षमुपाश्रिताः ।**
**कां दिशं प्रतिपत्स्यामः प्राप्ताः क्लेशमनुत्तमम् ॥ ३७**
**सकामो भव दुर्बुद्धे धार्तराष्ट्राल्पदर्शन ।**
**नूनं देवाः प्रसन्नास्ते नानुज्ञां मे युधिष्ठिरः ॥ ३८**
**प्रयच्छति वधे तुभ्यं तेन जीवसि दुर्मते ।**
**नन्वद्य ससुतामात्यं सकर्णानुजसौबलम् ॥ ३९**
**गत्वा क्रोधसमाविष्टः प्रेषयिष्ये यमक्षयम् ।**
**किं नु शक्यं मया कर्तुं यत्ते न क्रुध्यते नृपः ॥ ४०**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १५१

"आपली निजलेली आई व भाऊ पाहून अत्यंत शोकविव्हल झालेला भीम विलाप करूं लागला. तो म्हणाला, "आज जें मीं माझ्या डोळ्यांनीं पाहतों आहें त्याच्यापेक्षां अधिक शोककारक असें दुसरें कांहीं असूं शकेल काय? माझ्या अत्यंत दुर्भाग्यानें या माझ्या बन्धूंना मीं जमिनीवर झोंपलेले पाहात आहें. जे पूर्वी वारणावतांत उत्कृष्ट शय्येवर देखील झोप येत नाहीं म्हणून म्हणत ते आज जमिनीवर झोपले आहेत. तशीच ही आमची माता अत्यंत सुकुमार असून व अत्यंत श्रेष्ठ शय्येवर झोपण्याची तिची पात्रता असूनही ती जमिनीवर झोपलेली मी पहात आहे. ही शत्रुसंघाचें मर्दन करणाऱ्या वसुदेवाची बहीण, कुन्तीराजाची कन्या, सर्व श्रेष्ठ लक्षणांनीं युक्त, महाराज विचित्रवीर्याची सून, महाभाग पाण्डुराजाची भार्या, व आमच्यासारख्यांची माता असतांना तिनें अशा स्थितींत शयन करावें काय? धर्म, महेन्द्र, वायु यांच्यापासून जिला पुत्रलाभ झाला तिनें श्रान्त अवस्थेंत जमिनीवर आपलें अंग टाकावें काय? या माझ्या नरव्याघ्र बन्धूंना मीं जमिनीवर झोपलेले पाहणें याहून अधिक दुःखकारक काय असूं शकेल? जो धर्मनित्य राजा, त्रैलोक्याचें अधिराज्य करण्याच्या योग्यतेचा आहे तो आज परिश्रान्त स्थितींत एकाद्या सामान्य माणसाप्रमाणें जमिनीवर झोपला आहे, हा निळ्या मेघाप्रमाणें श्यामवर्णाचा व लोकांमध्यें अप्रतिम असणारा अर्जुन एकाद्या प्राकृताप्रमाणें जमिनीवर झोपला आहे; याहून अधिक दुःखदायक काय असूं शकेल? देवांमध्यें अश्विनीकुमार ज्याप्रमाणें सर्वांत

अधिक सुन्दर आहेत त्याप्रमाणेंच मनुष्यांत जे आपल्या रूपसंपत्तीनें सर्वश्रेष्ठ आहेत ते हे नुकुल सहदेव बिचारे कसे झोपले आहेत? ज्याला कुलाधम व दुरात्मे नि भेदबुद्धीचे नातलग मुळींच नसतील तो एकटचा ग्रामवृक्षाप्रमाणें सुखानें आपलें जीवन जगूं शकेल. गांवांत फुलें व पानें यांनीं लदबदलेला व ज्याला कोणींच दुसरे आपल्या जातीचे समान वृक्ष भाग्यांत वांटेकरी व्हावयास नाहींत असा एकच वृक्ष असला तर लोक त्याच्यावर पार बांधतात, त्याला पूजनीय समजतात व त्याची पूजा करतात; तशीच एकटचा मानवाची अवस्था आहे. तसेंच ज्याला धार्मिक व शूर जातभाई असतात ते सर्व लोक विपत्ति नसलेल्या अवस्थेंत सुखाचें जीवन जगूं शकतात. असे लोक बलवान्, सर्व इच्छा पूर्ण झालेले आपले मित्र व बान्धव यांना आनन्द देणारे असे होऊन अरण्यांतील वृक्षांप्रमाणें एकमेकांच्या आश्रयावर जिवंत राहतात. पण आमची ही काय अवस्था झाली आहे! दुरात्म्या धृतराष्ट्रानें आपल्या पुत्रांसहित कारस्थान करून आम्हांला राजधानींतून हाकलून देऊन दग्ध करण्याचा प्रयत्न केला. आम्ही हांकलले गेलों. दग्ध झालों नाहीं हें केवळ आमचें दैव! कसेतरी अग्नीपासून वांचून आम्हीं या वृक्षाच्या तळवटीं आलों आहों. आतां आम्ही कोठें जावें? केवढचा क्लेशांत आम्ही सांपडलों आहोंत! हे क्षुद्रा दुर्बुद्धे दुर्योधना, तुझ्यावर देव खरोखरीच प्रसन्न आहेत म्हणूनच तुझा वध करावयास मला युधिष्ठिर अनुज्ञा देत नाहींत. त्यामुळेंच तूं जिवंत आहेस. वास्तविक पुत्र व अमात्यासहित व कर्ण नि शकुनिसहित या सर्व दुष्टांना ठार मारण्याची माझी इच्छा आहे. पण आमच्या राजाला राग येत नाहीं त्याला मी काय करूं.''

भीमाच्या अन्तःकरणांत धृतराष्ट्रासहित सर्व कौरवांविषयीं विद्वेष बद्धमूल व्हावयास कौरवच याप्रमाणें कारणीभूत झाले. युधिष्ठिराची ही महत्ता आहे कीं इतक्या भयानक अपराधानंतर देखील त्याच्या अन्तःकरणांत कौरवांविषयीं विद्वेष उत्पन्न झाला नाहीं. तो झाला असता तर त्यालाही दोष देतां आला नसता. राज्यलोभासाठीं विष देण्यासारखीं व आश्रयार्थ आलेल्या एका अनाथ विधवेला तिच्या पांच पुत्रांसहित जिवंत जाळून टाकण्यासारखीं पंचमहा-

पातकासारखीं पातकें करावयास जे प्रवृत्त होतात ते धर्मशास्त्राप्रमाणेंच वध्य आहेत. मग भीमानें त्यांच्या बाबतींत तोच निर्णय घेतला असला तर त्याला दोषी कसें ठरवितां येईल? कौरवांचे अपराध एवढ्यावरच थांबले असते तरीही गोष्ट वेगळी होती; पण तसें मुळींच झालें नाहीं. राज्य तोडून दिल्यावर तें पाण्डवांनीं स्वतःच्या भरंवशावर वाढविलें तरी कौरवांनीं त्यांचा विद्वेष करून द्यूताच्या वाममार्गानें तें घशांत घातलें. कदाचित् भीम याही गोष्टीनें संतापला नसता. पण शूरांचा सर्वश्रेष्ठ मानबिंदु म्हणजे त्याची कुलस्त्री आहे. हें माहीत असतांना देखील युधिष्ठिरानें द्रौपदीला पणाला लावलें व तिचे केस धरून फरफटत दुःशासन तिला नागवी करण्याचा प्रयत्न करूं लागला. भीमाची काय अवस्था झाली असेल? एवढ्यासाठींच तुमचें भुजबल आहे काय, व नग्न केल्या जात असलेल्या बायकोचें ज्याला संरक्षण करतां येत नाहीं त्यानेंच बकासुर व हिडिंब यांना मारलें असेल काय असें विचारणारा आपला कटाक्ष जेव्हां भीमावर द्रौपदीनें टाकला तेव्हां त्याच्या हृदयाचें पाणी झालें. युधिष्ठिराच्या नियंत्रणामुळें त्याला कांहीं करतां येईना. शेवटीं तो युधिष्ठिरावरच संतापला व एकदम सभेंत उठून उभा राहून म्हणाला :—

भवन्ति गेहे बन्धक्यः कितवानां युधिष्ठिर ।
न ताभिरुत दीव्यन्ति दया चैवास्ति तास्वपि ॥ १
काश्यो यद्धनमाहार्षीद् द्रव्यं यच्चान्यदुत्तमम् ।
तथान्ये पृथिवीपाला यानि रत्नान्युपाहरन् ॥ २
वाहनानि धनं चैव कवचान्यायुधानि च ।
राज्यमात्मा वयं चैव कैतवेन हृतं परैः ॥ ३
न च मे तत्र कोपो भूत्सर्वस्येशो हि नो भवान् ।
इमं त्वतिक्रमं मन्ये द्रौपदी यत्र पण्यते ॥ ४
एषा ह्यनर्हती बाला पाण्डवान्प्राप्य कौरवैः ।
त्वत्कृते क्लिश्यते क्षुद्रैर्नृशंसैरकृतात्मभिः ॥ ५
अस्याः कृते मन्युरयं त्वयि राजन्निपात्यते ।
बाहू ते संप्रधक्ष्यामि सहदेवाग्निमानय ॥ ६

—महाभारत, सभापर्व अध्याय ६८

" हे युधिष्ठिरा, प्रत्येक द्यूतकाराच्या घरीं दासी असतात. पण कोणी त्या दासींना देखील द्यूतांत कधीं पणाला लावीत नाहींत. त्यांच्यावर देखील दया केली जाते. पण तूं प्रत्यक्ष आपल्या कुलस्त्रीची ही काय अवस्था करून टाकलीस ? राजसूय यज्ञांत मोठमोठ्या राजांनीं तुला समर्पण केलेले नजराणे व सर्व संपत्ति, इतकेंच नव्हे तर राज्य आणि स्वतःचा देह तूं द्यूतांत पणाला लावलास व या नीचांनीं कपटानें तें सर्व जिंकून घेतलें. त्याचेंही मला तितकें दुःख झालें नाहीं. त्यामुळें मी रागावलों नाहीं. कारण कीं आम्हां सर्वांचा तूंच धनी आहेस. पण द्रौपदीसारख्या धर्मपत्नीला तूं पणाला लावलेंस यांत मात्र तूं स्वतःच्या अधिकाराचें अतिक्रमण केलें आहेस. आमच्याशीं या निर्दोष स्त्रीचा संबंध आला हाच काय तो तिचा अपराध आहे. क्षुद्र, नृशंस व मन ताब्यांत नसलेल्या नराधमांकडून केवळ तुझ्यामुळेंच तिची ही असहनीय विटंबना चालली आहे. त्यांच्यापेक्षांही राग धरावयाचा तो तुझाच धरला पाहिजे. ज्या हातांनीं द्रौपदीची विटंबना होईल असें कुकृत्य तूं केलेंस ते तुझे हातच मी जाळून टाकतों. जा. सहदेवा, ऊठ व अग्नि आण. मी ह्या युधिष्ठिराचे हात जाळून टाकतों." शेवटीं अर्जुन मध्यें पडला व युधिष्ठिराचे हात वांचले. पण एवढ्यावरही हें प्रकरण मिटलें नाहीं. शेवटीं दुःशासनानें द्रौपदीला नग्न करावयास्तव तिच्या वस्त्राला हात घालून नागराजाच्या शेपटीवर पाय द्यावा त्याप्रमाणें भीमाला डिवचलें. तो तेथें प्रतिकार तर करूं शकत नव्हता, पण तो चालू प्रकार पाहतांच क्रोधानें ओठ थरथरत व हातावर हात चोळीत तो उभा राहिला व मानवेतिहासांत जिच्या रौद्रतेला उपमा नाहीं अशी भीषण प्रतिज्ञा त्यानें केली. तो म्हणाला:—

**इदं मे वाक्यमादध्वं क्षत्रिया लोकवासिनः ।**
**नोक्तपूर्वं नरैरन्यैर्न चान्यो यद्वदिष्यति ।। ५१**
**यद्येतदेवमुक्त्वाहं न कुर्यां पृथिवीश्वराः ।**
**पितामहानां पूर्वेषां नाहं गतिमवाप्नुयाम् ।। ५२**

अस्य पापस्य दुर्बद्धेर्भारतापसदस्य च ।
न पिबेयं बलाद्वक्षो भित्त्वा चेद्रुधिरं युधि ।। ५३
—महाभारत, सभापर्व अध्याय ६८

" हे जगांतील क्षत्रियांनो, मीं जें बोलत आहे तें नीट कान उघडे ठेवून ऐका. आजपर्यंत असें कोणीही बोलला नाहीं व पुढेंही असें कोणी बोलूं शकणार नाहीं. मी आतां जी प्रतिज्ञा करणार आहें ती जर मी पार पाडली नाहीं तर माझ्या पूर्वजांची पुण्यगति मला प्राप्त होणार नाहीं. या भरतकुलकलंक दुर्बुद्धीचें वक्षःस्थल फोडून मी जर त्याचें उष्ण रक्त प्राशन करणार नाहीं तर मला नरक प्राप्त होईल." भीमसेन ही भयंकर प्रतिज्ञा करीत असतां धृतराष्ट्र, गांधारी, कुरुकुलांतील इतर सर्व सभ्य ती ऐकत होते. कोणीही त्याचें सांत्वन केलें नाहीं कीं निवारण केलें नाहीं. उलट त्याचा संताप अनावर होण्यासाठीं दुःशासन पुन्हां पुन्हां द्रौपदीच्या केसांना हिसके देत व तिला फरफरां ओढत तिची अधिकाधिक अप्रतिष्ठा करूं लागला. वृद्धांच्या घातक मौनाची व मदांध तरुण सत्ताधिपांच्या अधमपणाची नि पोरकटपणाचीही मर्यादा सुटली. गांधारीनें वा धृतराष्ट्रानें त्याच वेळीं दुःशासनाचें निवारण करावयास हवें होतें. तें त्यांनीं न केल्यावर त्याच्या परिणामांबद्दल त्यांना भीमाला काडीइतकाही दोष द्यावयाचा अधिकार उरत नाहीं. पुन्हां झालेल्या अनुद्यूतानंतर पांडव वनांत जाऊं लागले असतां दुर्योधन न शोभेशा पोरकटपणानें भीमाच्या चालण्याची नक्कल करून त्याला वेडावूं लागला, दुर्योधनाचें पाहून दुःशासन त्याला वारंवार 'षंढ' व 'बैल' म्हणूं लागला व धृतराष्ट्र तें सारें ऐकून मानसिक समाधान अनुभवूं लागला. या सर्वच प्रकारांमुळें संतापलेला भीम म्हणाला :—

अहं दुर्योधनं हन्ता कर्णं हन्ता धनंजयः ।
शकुनिं चाक्षकितवं सहदेवो हनिष्यति ।। २६
इदं च भूयो वक्ष्यामि सभामध्ये बृहद्वचः ।
सत्यं देवाः करिष्यन्ति यन्नो युद्धं भविष्यति ।। २७
सुयोधनमिमं पापं हन्तास्मि गदया युधि ।
शिरः पादेन चास्याहमधिष्ठास्यामि भूतले ।। २८

वाक्यशूरस्य चैवास्य परुषस्य दुरात्मनः ।
दुःशासनस्य रुधिरं पातास्मि मृगराडिव ॥ २९
—महाभारत, सभापर्व अध्याय ७७

" मी दुर्योधनाला ठार मारीन. कर्णाला अर्जुन ठार मारील व या कपटद्यूत खेळणाऱ्या शकुनीला सहदेव ठार मारील. पुनश्च या सभेमध्यें मी माझ्या घोर प्रतिज्ञेचा उच्चार करतों. जर आमचें युद्ध झालें तर देव माझी वाणी सत्य केल्याविना राहणार नाहींत. या पापी दुर्योधनाला मी गदेनें ठार मारीन व त्याचें मस्तक मी पायानें तुडवीन. तसेंच या केवळ वाक्शूर, कठोर व दुरात्म्या दुःशासनाचें मी एकाद्या सिंहाप्रमाणें रक्त प्राशन करीन." भीमानें जेव्हां हीं वाक्यें उच्चारलीं तेव्हां त्याचा खरा भयंकरपणा कुरुकुलवृद्धांच्या ध्यानांत आला नाहीं. पण ज्या वेळीं तीं खरीं झालीं त्या वेळीं मात्र त्यांची छाती फाटल्यावांचून राहिली नाहीं. कुलस्त्रीचा अपमान होऊनही पांडव तो सहन करीत होते म्हणूनच दुःशासन भीमाला षंढ म्हणत होता ना? मग तो षंढपणाचा आळ नष्ट करण्याचा, त्याचा भयंकर सूड घेण्यावांचून दुसरा कोणता मार्ग भीमासाठीं मोकळा होता? केवळ युधिष्ठिराच्या नियंत्रणामुळेंच तेरा वर्षेपर्यंत भीमसेनानें हा क्रोध मनांत वागविला. त्यामुळें त्याची अवस्था कशी वेड्यासारखी होऊन गेली होती याचें वर्णन करतांना स्वतः श्रीकृष्णच म्हणतात :

नच स्वपिषि जागर्षि न्युब्जः शेषे परंतप ।
घोरामशान्तां रुषतीं सदा वाचं प्रभाषसे ॥ ५
निःश्वसन्नग्निवर्त्तेन संतप्तः स्वेन मन्युना ।
अप्रशान्तमना भीम सधूम इव पावकः ॥ ६
एकान्ते निःश्वसन् शेषे भारार्त इव दुर्बलः ।
अपि त्वां केचिदुन्मत्तं मन्यन्ते तद्विदो जनाः ॥ ७
आरुज्य वृक्षान् निर्मूलान् गजः परिरुजन्निव ।
निघ्नन् पद्भिः क्षितिं भीम निष्टनन् परिधावसि ॥ ८
नास्मिन् जने न रमसे रहः क्षिपसि पाण्डव ।
नान्यं निशि दिवा चापि कदाचिदभिनन्दसि ॥ ९
अकस्मात् स्मयमानश्च रहस्यास्से रुदन्निव ।
जान्वोर्मूर्धानमाधाय चिरमास्से प्रमीलितः ॥ १०

**भृकुटिं च पुनः कुर्वन्नोष्ठौ च विदशन्निव ।**
**अभीक्ष्णं दृश्यसे भीम सर्वं तन्मन्युकारितम् ।। ११**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ७५

"हे भीमा! तूं झोंप घेत नाहींस. सदा जागाच असतोस. झोंपलास तरी नुसता पालथा पडून राहतोस. नेहमीं घोर, अशांतिकारक व अत्यंत रागाची अशीच वाणी तूं उच्चारीत असतोस. अग्नि स्वतःच्याच ठिकाणीं स्वतःच्याच तापानें जळत राहावा त्याप्रमाणें तूंही स्वतःच्याच रागानें आपल्याच ठिकाणीं जळफळत असतोस. अशांत मनानें तूं सारखे निःश्वास सोडतांना धुरकटलेल्या अग्नीप्रमाणें दिसतोस. मंडळींत न मिसळतां एकाद्या भारार्त दुर्बलाप्रमाणें तूं एकांतांत सुस्कारे टाकीत बसतोस. लोक तुला उन्मत्त समजतात. रस्त्यानें जात असतां उन्मत्त हत्ती जसा साऱ्या झाडांना मुळापासून उखडून तुडवीत जातो त्याप्रमाणें पायानें जमिनीवर जणूं आघात करीत तूं जातोस. लोकांत कधींही न मिसळतां एकांतांतच राहाणें तुला आवडतें. रात्रीं व दिवसा तुला कुणीही भेटलें तरी तें तुला आवडत नाहीं. एकदमच तूं हसतोस व एकांतात तूं रडत बसतोस किंवा गुडघ्यांत डोकें घालून डोळे मिटून किती तरी वेळ तूं राहातोस. भिवया पुनःपुन्हां वांकड्या करीत सारखे दांतओठ तूं चावीत असतोस." याप्रमाणें भयानक स्वरूपाचा संताप भीमसेनानें तेरा वर्षें सतत आपल्या हृदयांत वागविला. त्याला वेड लागण्याचीच पाळी आली होती असें म्हटलें पाहिजे. अज्ञातवास संपतांच आपला सारा संताप केव्हां तरी काढण्याची संधि आली असेंच त्याला त्या वेळीं वाटलें. अशा स्थितींत संधीच्या वाटाघाटी सुरू झाल्या व श्रीकृष्ण स्वतः संधीसाठीं जाणार हें ऐकतांच तो अत्यंत विषण्ण झाला. राक्षसांपेक्षांही अधिक भीषण कर्म करणारे लोक संधीसाठीं कसे काय योग्य आहेत हें त्याला कळेना. श्रीकृष्ण ज्या वेळीं संधीवर त्याचें मत विचारूं लागले त्या वेळीं तो त्यांना उपरोधानें असें म्हणाला कीं,

**अप्ययं नः कुरूणां स्याद्युगान्ते कालसम्भृतः ।**
**दुर्योधनः कुलाङ्गारो जघन्यः पापपूरुषः ।। १८**

**तस्मान्मृदु शनैर्ब्रूया धर्मार्थसहितं हितम् ।**
**कामानुबद्धं बहुलं नोग्रमुग्रपराक्रम ।। १९**
**अपि दुर्योधनं कृष्ण सर्वे वयमधश्चराः ।**
**नीचैर्भूत्वाऽनुयास्यामो मा स्म नो भरताऽनशन् ।। २०**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ७४

"मला असें वाटतें कीं हा दुर्योधन म्हणजे युगान्तकाळीं काल-पुरुषानें भारलेला एक कुलांगार अति नीच असा पापपुरुष आहे. पण तूं त्याच्याशीं मृदु बोल. धर्म व अर्थानें युक्त, हितकारक, आपल्या इच्छा परिपूर्ण करणारे उग्र असें कांहींही बोलूं नकोस. कारण कीं आपल्या भरतकुळांतील लोक वांचले पाहिजेत ना! हे कृष्णा, सारें कुळ वांचण्यासाठीं हवें तर दुर्योधनाला सिंहासनावर बसवून आम्ही खालीं उभे राहून त्याची सेवा करूं." श्रीकृष्णांनीं त्याच्या तोंडून हें अभूतपूर्व भाषण ऐकतांच त्याचा क्रोध चेतविण्यासाठीं 'तूं भ्यालास काय' असें विचारलें. त्याबरोबर चिडून तो इतकेंच म्हणाला कीं,

**विगाढे युधि सम्बाधे वेत्स्यसे मां जनार्दन ।**
**परुषैराक्षिपसि किं व्रणं पूतिमिवोन्नयन् ।। १४**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ७६

"हे जनार्दना, भयानक महायुद्ध सुरू झाल्यावर मी भ्यालों कीं काय हें तुला आपोआप कळेल. उगाच माझ्या अंतःकरणाच्या जखमा कशाला उकरतोस?"

शेवटीं भीषण महायुद्ध झालें व इतक्या दिवसाच्या भीमाच्या इच्छा संपूर्ण करण्याची सुवर्णसंधि त्याला मिळाली. एकाहून एक भयंकर पंचमहापातकांच्या राशी उभारणाऱ्या सर्व नराधमांना धर्मशास्त्रानुसार त्यानें कठोरांतले कठोर दंड दिले. राजसभेंत कुल-स्त्रीचे केश धरून ओढणाऱ्या व भीमाला षंढ म्हणणाऱ्या दुःशासन-दुर्योधनादिकांना त्याची प्रतिज्ञा ऐकतांना तुच्छ वाटली. पण ती खरी होतांना मात्र त्यांना स्वतःचेंच षंढत्व पूर्णपणें पटून त्यांच्या अंगावर शहारे उत्पन्न झाले. तेंच काय? पण भीमाच्या प्रति-शोधाच्या रोमांचकारी कथा ऐकणाऱ्या लोकांना आज पांच हजार

वर्षानंतर देखील हृदय थरारल्याचा अनुभव आल्याविना राहाणार नाहीं. दुःशासनाला भीमसेन उग्र दंड देत असतां कौरवपक्षीयच काय पण पाण्डवपक्षीय मंडळी सुद्धां थरारल्यावांचून राहिलीं नाहींत. महारथि कर्ण व दुर्योधन पहात असतां त्यानें तो उग्र दंड दिला आहे.

## रोमांचकारी प्रतिशोध

महाभारतकार दुःशासनाच्या वधाचें वर्णन करतांना म्हणतातः—

तं पातयित्वाऽथ वृकोदरोऽथ जगर्ज हर्षेण विनादयन् दिशः ।
नादेन तेनाऽखिलपार्श्ववर्तिनो मूर्च्छाकुलाः पतितास्त्वाजमीढ ।। १२
भीमोऽपि वेगादवतीर्य यानाद् दुःशासनं वेगवानभ्यधावत् ।
ततः स्मृत्वा भीमसेनस्तरस्वी सापत्नकं यत्प्रयुक्तं सुतैस्ते ।। १३
तस्मिन्सुघोरे तुमुले वर्तमाने प्रधानभूयिष्ठतरैः समन्तात् ।
दुःशासनं तत्र समीक्ष्य राजन्भीमो महाबाहुरचिन्त्यकर्मा ।। १४
स्मृत्वाथ केशग्रहणं च देव्या वस्त्रापहारं च रजस्वलायाः ।
अनागसो भर्तृपराङमुखाया दुःखानि दत्तान्यपि विप्रचिन्त्य ।। १५
जज्वाल क्रोधादथ भीमसेन आज्यप्रसिक्तो हि यथा हुताशः ।
तत्राह कर्णं च सुयोधनं च कृपं द्रौणिं कृतवर्माणमेव ।। १६
निहन्मि दुःशासनमद्य पापं संरक्ष्यतामद्य समस्तयोधाः ।
इत्येवमुक्त्वा सहसाऽभ्यधावन्निहन्तुकामोऽतिबलस्तरस्वी ।। १७
तथा तु विक्रम्य रणे वृकोदरो महागजं केसरिको यथैव ।
निगृह्य दुःशासनमेकवीरः सुयोधनस्याधिरथेः समक्षम् ।। १८
रथादवप्लुत्य गतः स भूमौ यत्नेन तस्मिन्प्रणिधाय चक्षुः ।
असिं समुद्यम्य सितं सुधारं कण्ठे पदाऽऽक्रम्य च वेपमानम् ।। १९
उवाच तद्गौरिति यद् ब्रुवाणो हृष्टो वदेः कर्णसुयोधनाभ्याम् ।
ये राजसूयावभृथे पवित्रा जाताः कचा याज्ञसेन्या दुरात्मन् ।। २०
ते पाणिना कतरेणावकृष्टास्तद् ब्रूहि त्वां पृच्छति भीमसेनः ।
श्रुत्वा तु तद् भीमवचः सुघोरं दुःशासनो भीमसेनं निरीक्ष्य ।। २१
जज्वाल भीमं स तदा स्मयेन संशृण्वतां कौरवसोमकानाम् ।
उक्तस्तदाऽऽजौ स तथा सरोषं जगाद भीमं परिवर्तनेत्रः ।। २२
अयं करिकराकारः पीनस्तनविमर्दनः ।
गोसहस्रप्रदाता च क्षत्रियान्तकरः करः ।। २३

अनेन याज्ञसेन्या मे भीम केशा विकर्षिताः ।
पश्यतां कुरुमुख्यानां युष्माकं च सभासदाम् ॥ २४
एवं त्वसौ राजसुतं निशम्य ब्रुवन्तमाजौ विनिपीड्य वक्षः ।
भीमो बलात्तं प्रतिगृह्य दोर्भ्यामुच्चैर्ननादाथ समस्तयोधान् ॥ २५
उवाच यस्यास्ति बलं स रक्षत्वसौ भवेदद्य निरस्तबाहुः ।
दुःशासनं जीवितं प्रोत्सृजन्तमाक्षिप्य योधांस्तरसा महाबलः ॥ २६
एवं क्रुद्धो भीमसेनः करेण उत्पाटयामास भुजं महात्मा ।
दुःशासनं तेन स वीरमध्ये जघान वज्राशनिसन्निभेन ॥ २७
उत्कृत्य वक्षः पतितस्य भूमावथापिबच्छोणितमस्य कोष्णम् ।
ततो निपात्यास्य शिरोपकृत्य तेनासिना तव पुत्रस्य राजन् ॥ २८
सत्यां चिकीर्षुर्मतिमान् प्रतिज्ञां भीमोऽपिबच्छोणितमस्य कोष्णम् ।
आस्वाद्य चास्वाद्य च वीक्षमाणः क्रुद्धो हि चैनं निजगाद वाक्यम् ॥२९
"स्तन्यस्य मातुर्मधुसर्पिषोर्वा माध्वीकपानस्य च सत्कृतस्य ।
दिव्यस्य वा तोयरसस्य पानात्पयोदधिभ्यां मथिताच्च मुख्यात् ॥ ३०
अन्यानि पानानि च यानि लोके सुधामृतस्वादुरसानि तेभ्यः ।
सर्वेभ्य एवाभ्यधिको रसोऽयं ममाद्य चास्याहितलोहितस्य" ॥ ३१
अथाह भीमः पुनरुग्रकर्मा दुःशासनं क्रोधपरीतचेताः ।
गतासुमालोक्य विहस्य सुस्वरं किं वा कुर्यां मृत्युना रक्षितोऽसि ॥ ३२
एवं ब्रुवाणं पुनराद्रवन्तमास्वाद्यमानं तमतिप्रहृष्टम् ।
ये भीमसेनं ददृशुस्तदानीं भयेन तेऽपि व्यथिता निपेतुः ॥ ३३
ये चापि नासन् व्यथिता मनुष्यास्तेषां करेभ्यः पतितं हि शस्त्रम् ।
भयाच्च संचुक्रुशुरस्वरैस्ते निमीलिताक्षा ददृशुः समन्ततः ॥ ३४
तं तत्र भीमं ददृशुः समन्ताद्दौःशासनं तद्रुधिरं पिबन्तम् ।
सर्वेऽपलायन्त भयाभिपन्ना न वै मनुष्योऽयमिति ब्रुवाणाः ॥ ३५
तस्मिन्कृते भीमसेनेन रूपे दृष्ट्वा जनाः शोणितं पीयमानम् ।
संप्राद्रवंश्चित्रसेनेन सार्धं भीमं रक्षो भाषमाणा भयार्ताः ॥ ३६
भीमोऽपि हत्वा तत्रैव दुःशासनममर्षणम् ।
पूरयित्वाञ्जलिं भूयो रुधिरस्योग्रनिःस्वनः ॥ ४१
शृण्वतां लोकवीराणां इदं वचनमब्रवीत् ।
एष ते रुधिरं कण्ठात् पिबामि पुरुषाधम ॥ ४२
ब्रूहीदानीं तु संहृष्टः पुनर् गौरिति गौरिति ।
ये तदाऽस्मान् प्रनृत्यन्ति पुनर् गौरिति गौरिति ॥ ४३

तान्वयं प्रतिनृत्यामः पुनर्गौरिति गौरिति ।
प्रमाणकोटयां शयनं कालकूटस्य भोजनम् ।। ४४
दंशनं चाहिभिः कृष्णैर्दाहं च जतुवेश्मनि ।
द्यूतेन राज्यहरणमरण्ये वसतिश्च या ।। ४५
द्रौपद्याः केशपक्षस्य ग्रहणं च सुदारुणम् ।
इष्वस्त्राणि च संग्रामेष्वसुखानि च वेश्मनि ।। ४६
विराटभवने यश्च क्लेशोऽस्माकं पृथग्विधः ।
शकुनेर्धार्तराष्ट्रस्य राधेयस्य च मन्त्रिते ।। ४७
अनुभूतानि दुःखानि तेषां हेतुस्त्वमेव हि ।
दुःखान्येतानि जानीमो न सुखानि कदाचन ।। ४८
धृतराष्ट्रस्य दौरात्म्यात्सपुत्रस्य सदा वयम् ।
इत्युक्त्वा वचनं राजञ्जयं प्राप्य वृकोदरः ।।
पुनराह महाराज स्मयंस्तौ केशवार्जुनौ ।। ४९
असृग्दिग्धो विस्रवल्लोहितास्यः क्रुद्धोत्यर्थं भीमसेनस्तरस्वी ।
दुःशासने यद्रणे संश्रुतं मे तद्वै सत्यं कृतमद्येह वीरौ ।। ५०

—महाभारत, कर्णपर्व अध्याय ८३

"नंतर त्याला खालीं पाडून व नीच आपल्या तावडींत आला या कल्पनेनें भीमानें हर्षानें गर्जना करून दशदिशा दणाणून सोडल्या. त्याच्या त्या नादानें सभोवारचे सर्व लोक मूर्च्छित होऊन जमिनीवर पडले. नंतर कौरवांनीं आजवर केलेले सर्व अपकार मनांत आणून भीमसेन आपल्या वाहनावरून खालीं उतरला व सूड घेण्यासाठीं म्हणून वेगानें दुःशासनाच्या अंगावर चालून गेला. दुःशासनाला पाहतांच देवी द्रौपदीच्या रजस्वला स्थितींतील वस्त्रापहरणाची, तिच्या केशग्रहणाची व पति अगतिक अवस्थेंत आहेत हें पाहून त्या निरागस महासाध्वीला दिलेल्या भयानक क्लेशांची स्मृतिचित्रें भीमाच्या डोळ्यासमोर तरळूं लागलीं व हविर्भाग दिलेला अग्नि ज्याप्रमाणें भडकून उठतो त्याचप्रमाणें क्रोधानें भीमसेनही अत्यंत संतप्त झाला. त्यानें कर्ण, दुर्योधन, कृपाचार्य, कृतवर्मा, अश्वत्थामा यांना हांका मारून असें सांगितलें कीं हे सर्व योद्धयांनो, मी या मूर्तिमंत पाप असलेल्या दुःशासनाला तुम्हां सर्वांसमक्ष ठार करणार आहें. ज्याचें सामर्थ्य असेल त्यानें याचें संरक्षण करावें. असें

बोलून अत्यंत बलवान् भीमसेनानें सिंहानें मोठ्या हत्तीला पकडावें त्याप्रमाणें दुर्योधन व कर्णासमक्ष दुःशासनाला घेरलें. त्याच्या डोळ्यांत इतका क्रोध चढला होता कीं त्याला खालीं पाडून भीमानें त्याच्या गळ्यावर आपला पाय दिला व तो वेदनेनें किंचाळत असतांनाच त्यानें आपलें खड्ग निष्कोषित करून हातांत घेतलें. त्यानें त्याला जोरानें विचारलें, तूं आम्हांला कर्ण व दुर्योधना-समक्ष बैल असें म्हणत होतास नाहीं काय ? बोल, राजसूय यज्ञाच्या अवभृथस्नानानें जे पवित्र झाले ते देवी याज्ञसेनीचे केश तूं कोणच्या हातानें धरून ओढलेस ? हे दुरात्म्या, तुला भीमसेन विचारीत आहे बोल. भीमाचें हें वाक्य ऐकतांच त्या स्थितींतही दुःशासनाचा अभिमान जागृत होऊन ज्या हातानें त्यानें द्रौपदीच्या केसांना स्पर्श केला होता तो भीमाच्या डोळ्यासमोर उभारीत तो म्हणाला, पहा हा तो हात आहे. हत्तीच्या सोंडेप्रमाणें पुष्ट, शृंगारांत पीनस्तनांचें विमर्दन करणारा, सहस्रावधि गोप्रदानें करणारा व क्षत्रियांचा अन्त करणारा हा हात आहे. हे भीमा, कौरव कुळांतील प्रमुख लोक पहात असतां, सारे सभासद उपस्थित असतां तुमच्या डोळ्यांसमोर याच हातानें मी याज्ञसेनीचे केस ओढले. त्याची ती मरणकाळची धिटाई पाहून भीमानें त्याच्या छातीला पीडा देत आपल्या दोन्ही हातांनीं त्याला बळानें गच्च आवळून पुन्हां जोरानें गर्जना केली व सर्व योद्धयांना असें सांगितलें कीं मी याचा हा हात उपटतो. ज्याच्यांत सामर्थ्य असेल त्यानें याचें रक्षण करावें. याप्रमाणें बोलून भीमसेनानें दुःशासनाचा हात उपटून काढला व सर्व लोकांसमक्ष त्यानेंच त्यास ठार मारलें. नंतर हातांतील खड्गानें त्याचें मस्तक तोडून व हृदय विदारण करून भीमसेन त्यांतून निघ-णारें उष्ण रक्त आपली प्रतिज्ञा खरी करण्यासाठीं पिऊं लागला. पुनःपुन्हां आस्वाद घेऊन तें रक्त प्राशन करीत असतां तो म्हणाला, मातेचें स्तन्य, जगांतील सर्व मधुर रस, उत्कृष्ट मदिरा इतकेंच नव्हे तर समुद्रमंथनांतून निघालेलें अमृत, यापेक्षांही या रक्ताची गोडी अधिक श्रेष्ठ आहे ह्यांत शंका नाहीं. त्या रक्तप्राशनानेंही उग्रकर्म्या भीमसेनाचा राग शांत झाला नाहीं. त्याच्या मृत देहाकडे पाहून तो

म्हणाला, काय करावें ? आतां मला तुझें कांहींच करतां येणें शक्य नाहीं. मृत्यूनें तुझें संरक्षण केलें आहे. पुनःपुन्हां रक्त पिणाऱ्या व अत्यंत हर्षित झालेल्या भीमसेनाला त्या भयानक स्थितींत पाहतांच कित्येक लोक व्यथित होऊन मूर्च्छित होऊन खालीं पडले. कित्येकांच्या हातांतलीं शस्त्रें भयानें गळून पडलीं. कांहीं आर्त निनाद करूं लागले. कांहींनीं आपले डोळे गच्च मिटून घेतले व हा मनुष्य नाहीं असें म्हणत कित्येक पळून गेले. पळतांना देखील ते थरकांपत होते. पुन्हां भीमानें दुःशासनाच्या रक्तानें आपली अंजलि भरून घेऊन सर्व वीरांसमक्ष म्हटलें हे पुरुषाधमा, नीट पहा. आज मी तुझा कण्ठनाल चिरून त्यांतील उष्ण रक्त प्राशन करीत आहें. पुन्हां आम्हांला गाय म्हण. त्या वेळीं तुम्ही आम्हांला गाय म्हणून नाचत होतात, आज आम्ही तुम्हांला गाय म्हणून नाचत आहोंत. विषप्राशन करवून नदींत फेकून देणें, सर्पदंश करविणें, लाक्षागृहांत जाळून टाकण्याचा प्रयत्न करणें, कपटद्यूतानें राज्य हरण करणें, अकारण वनवासाचें दुःख देणें, सर्वांत भयंकर असें द्रौपदीच्या केशपाशाचें कर्षण, सदोदित छळ करीत राहाणें, ह्या सर्वांचें हें फळ आहे. विराट राजाचे येथें आम्ही जे अपार क्लेश भोगले व शकुनि, दुर्योधन आणि कर्ण यांनीं कारस्थानें करून आम्हांला जो त्रास दिला त्याचें हें फळ आहे. आमच्या अनेकविध दुःखांचें तूंच कारण आहेस. दुरात्म्या धृतराष्ट्रानें आम्हांला जन्मभर क्लेश दिले. आपल्या पुत्रांसहित त्यानें आम्हांला छळलें. थोडेंदेखील सुख त्यानें आम्हांला लाभूं दिलें नाहीं त्याचें हें दारुण फळ आहे. याप्रमाणें बोलून रक्तानें न्हालेला भीमसेन श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांच्या जवळ आला व मी केलेली प्रतिज्ञा पूर्णपणें खरी केली असें त्यानें त्यांना सांगितलें."

ज्याप्रमाणें भीमसेनानें दुःशासनाचें रक्त प्राशन करून आपली प्रतिज्ञा पूर्ण केली त्याचप्रमाणें गदायुद्धांत दुर्योधनाच्या मांड्या मोडून त्याला खालीं पाडल्यावर लाथेनें त्याचें मस्तक तुडवून आपली दुसरीही प्रतिज्ञा त्यानें पूर्ण केली. महाभारतकार म्हणतात :—

**ततो दुर्योधनं हत्वा भीमसेनः प्रतापवान् ।**
**पातितं कौरवेन्द्रं तमुपगम्येदमब्रवीत् ।। ३**

गौर्गौरिति पुरा मन्द द्रौपदीमेकवासम् ।
यत्सभायां हसन्नस्मांस्तदा वदसि दुर्मते ।। ४
तस्यावहासस्य फलमद्य त्वं समवाप्नुहि ।
एवमुक्त्वा स वामेन पदा मौलिमुपास्पृशत् ।। ५
शिरश्च राजसिंहस्य पादेन समलोडयत् ।
तथैव क्रोधसंरक्तो भीमः परबलार्दनः ।। ६
पुनरेवाब्रवीद्वाक्यं यत्तच्छृणु नराधिप ।
येऽस्मान्पुरोपनृत्यन्त मूढा गौरिति गौरिति ।। ७
तान्वयं प्रतिनृत्यामः पुनर् गौरिति गौरिति ।
नास्माकं निकृतिर्वह्निर्नाक्षद्यूतं न वञ्चना ।। ८
स्वबाहुबलमाश्रित्य प्रबाधामो वयं रिपून् ।।
सोऽवाप्य वैरस्य परस्य पारं वृकोदरः प्राह शनैः प्रहस्य ।
युधिष्ठिरः केशवसृञ्जयांश्च धनंजयं माद्रवतीसुतौ च ।। ९
रजस्वलां द्रौपदीमानयन्ये येचाप्यकुर्वन्त सदस्यवस्त्राम् ।
तान्पश्यध्वं पाण्डवैर्धार्तराष्ट्रान् रणे हतांस्तपसा याज्ञसेन्याः ।। १०
ये नः पुरा षण्ढतिलानवोचन् क्रूरा राज्ञो धृतराष्ट्रस्य पुत्राः ।
ते नो हताः सगणाः सानुबन्धाः कामं स्वर्गं नरकं वा पतामः ।।११
पुनश्च राज्ञः पतितस्य भूमौ स तां गदां स्कन्धगतां प्रगृह्य ।
वामेन पादेन शिरः प्रमृद्य दुर्योधनं नैकृतिकं न्यवोचत् ।। १२

—महाभारत, शल्यपर्व अध्याय ५९

“नंतर दुर्योधनाला खालीं पाडून प्रतापशाली भीमसेन त्याच्या जवळ येऊन म्हणाला, आम्हांला हंसत एकवस्त्रा द्रौपदीला गाय असें म्हणून पूर्वीं तूं जो तिचा उपहास केलास त्याचें फळ हे दुर्मते, तूं आतां भोग, असें म्हणून त्यानें आपल्या डाव्या पायानें राजा दुर्योधनाच्या मस्तकावर लाथ मारली. पुन्हां क्रोधानें डोळे आरक्त करून तो म्हणाला, पूर्वीं शत्रु आम्हांला गाय म्हणून नाचत होते. आज आम्ही त्यांना गाय म्हणून नाचत आहोंत. आम्ही कांहीं यांच्याप्रमाणें अग्नि व द्यूताचें कपट करून व वंचना करून आमच्या शत्रूंना पीडा देत नाहीं. स्वतःच्या बाहुबलाच्या भरंवशावर आम्ही आमच्या शत्रूंना पीडा देतों. नंतर वैराच्या पार जाऊन हंसत हंसत भीमसेन युधिष्ठिर श्रीकृष्ण इत्यादिकांच्या जवळ आला व त्यांना म्हणाला, “रजस्वला द्रौपदीला ज्यांनीं सभेंत आणलें व तिला नग्न

करण्याचा जे प्रयत्न करीत होते त्या धृतराष्ट्रपुत्रांना द्रौपदीच्या तपानें पांडवांनीं ठार मारलें. जे राजा धृतराष्ट्राचे पुत्र आमच्याशीं क्रूरपणानें वागून आम्हांला षंढ म्हणत होते ते आज सपुत्रपौत्रबांधव आम्ही ठार मारले आहेत. मग या कृत्यानें आम्हांला स्वर्ग मिळो वा नरक मिळो." याप्रमाणें बोलून पुनश्च हातांत गदा घेऊन तो दुर्योधनाजवळ आला व त्यानें त्याच्या मस्तकावर डाव्या पायानें पुनश्च लत्ताप्रहार केला. सारे धृतराष्ट्रपुत्र भीमसेनानें ठार मारून टाकले. पण या बाबतींत त्याला दोष देतां येणार नाहीं. कारण त्यांनीं त्याचे तसेच भयानक अपराध केले होते. मेल्यानंतरही कौरवांना भीमानें क्षमा केली नाहीं. घोर अपराध झाल्यावर जगांतल्या महापुरुषांनीं तो अपराध करणाऱ्यांचा असाच भयंकर प्रतिशोध घेतलेला आहे. वंचनेनें पित्याला मारल्यावर साऱ्या सत्ताधीशांचीं खांडोळीं उडविणाऱ्या वीरश्रेष्ठ भार्गवरामांना आर्यसंस्कृतीनें भगवंताचा अवतार मानलें आहे. वंचना करून शहाजी राजांना पकडून देणाऱ्या घोरपड्यांचा एका रात्रीं निर्वंश करून टाकणाऱ्या छत्रपति शिवरायांना भारतीय संस्कृतीनें अवतारी पुरुषच मानलें आहे. मग भीमाला तरी याविषयीं दोष कसा देतां येणार? नुसते एका वंशांत जन्मल्यानें कुणी कुणाचे बंधु होत नसतात. जे समान जीवनविषयक दृष्टिकोनाचे ते आपले व जे त्या जीवनदृष्टीला नष्ट करावयास उद्युक्त होतील ते परके हाच या बाबतींतील खरा दृष्टिकोन आहे. कौरवांनीं आर्यसंस्कृतीच्या जीवनमूल्यांनाच धक्का लावण्याचा प्रयत्न केला. त्याचें फळ भीमानें त्यांना भोगावयास लावलें.

भीमाला यासंबंधीं कधींही पश्चात्ताप वाटला नाहीं. पश्चात्ताप वाटण्यासारखें त्यांत कांहींही नव्हतेंच. गांधारीनें ज्या वेळीं त्याला तूं दुःशासनाचें रक्त कां प्यालास असें विचारलें त्या वेळीं मी दुःशासनाचें रक्त प्यालों नसून प्रतिज्ञा खरी करण्यासाठीं केवळ आपले ओठ रक्तांत भिजविले असें तिला सांगून भीम म्हणाला कीं :—

**न मामर्हसि गान्धारि दोषेण परिशंकितुम् ।**
**अनिगृह्य पुरा पुत्रानस्मास्वनपकारिषु ।**
**अधुना किं नु दोषेण परिशंकितुमर्हसि ॥ २०**

—महाभारत, स्त्रीपर्व अध्याय १५

" हे गांधारी, तूं मला दोष देऊं नकोस. पूर्वीं तूं व तुझे पुत्र आमच्यावर अपकार करीत असतां तूं त्यांना आवरलें नाहींस. त्याचा परिणाम भोगण्याची पाळी आल्यावर आतां दोष देण्यांत काय अर्थ आहे? धृतराष्ट्रानें केलेले अपकार भीमाच्या अंतःकरणांतून कधींही गेले नाहींत. त्यानें नेहमीं आपल्या बाहूंना थोपटून धृतराष्ट्राला ऐकूं जाईल अशा बेतानें त्याच्या पुत्राच्या वधाची त्याला आठवण करून द्यावी. त्यानें भीष्मद्रोणांना देखील कधीं क्षमा केली नाहीं. जे धर्माचे संरक्षक तेच कुलस्त्रियांच्या अब्रूवर निखारे ठेवणाऱ्या नीच नराधमांच्या पक्षाकडून आपलें सामर्थ्य खर्चीं घालीत आहेत हें पाहून त्याचा संताप अनावर होई. युद्धामध्यें द्रोणाचार्यांना तोंडावर तो असें म्हणाला कीं :—

**श्वपाकवन्म्लेच्छगणान् हत्वाचान्यान्पृथग्विधान् ।**
**अज्ञानान्मूढवद् ब्रह्मन्पुत्रदारधनेप्सया ।। ३९**
**एकस्यार्थे बहून् हत्वा पुत्रस्याधर्मविद्यया ।**
**स्वकर्मस्थान्विकर्मस्थो न व्यपत्रपसे कथम् ।। ४०**

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय १९२

" हे ब्राह्मणा, पुत्र, दारा व धन यांच्या इच्छेनें, अज्ञानानें एकाद्या चांडाळाप्रमाणें तूं किती लोकांना ठार मारलें आहेस? स्वतः कर्मभ्रष्ट होऊन अधर्मानें, आपल्या धर्माप्रमाणें वागणाऱ्या लोकांची अशी कत्तल करतांना तुला लाज वाटली नाहीं काय?" आश्रमवासिक पर्वांत मुलांच्या श्राद्धासाठीं राजा धृतराष्ट्र धन मागत असतां व युधिष्ठिर व अर्जुन यांनीं तें देऊं केलें असतां भीम त्यांना म्हणतो :—

**कष्टात्कष्टतरं यान्तु सर्वे दुर्योधनादयः ।। १९**
**यैरियं पृथिवी कृत्स्ना घातिता कुलपांसनैः ।**
**कुतस्त्वमसि विस्मृत्य वैरं द्वादशवार्षिकम् ।। २०**
**अज्ञातवासं गहनं द्रौपदीशोकवर्धनम् ।**
**क्व तदा धृतराष्ट्रस्य स्नेहोऽस्मद्गोचरो गतः ।। २१**
**कृष्णाजिनोपसंवीतो हृताभरणभूषणः ।**
**सार्धं पाञ्चालपुत्र्या त्वं राजानमुपजग्मिवान् ।। २२**
**क्व तदा द्रोणभीष्मौ तौ सोमदत्तोऽपि वाऽभवत् ।**
**यत्र त्रयोदश समा वने वन्येन जीवथ ।। २३**

न तदा त्वां पिता ज्येष्ठः पितृत्वेनाभिवीक्षते ।
किं ते तद्विस्मृतं पार्थ यदेष कुलपांसनः ॥ २४
दुर्बुद्धिर्विदुरं प्राह द्यूते किं जितमित्युत । २५

—महाभारत, आश्रमवासिकपर्व अध्याय ११

"त्या दुर्योधनादिकांना सगळ्यांत वाईटांतली वाईट दुर्गति मिळो. कारण त्याच कुलंगारांनीं या सर्व पृथ्वीचा नाश केलेला आहे. बारा वर्षे चाललेलें आपलें अखंड वैर, अज्ञातवासांतील कष्ट व द्रौपदीला झालेलें दुःख तूं इतक्यांत विसरलास काय? त्या वेळीं या धृतराष्ट्राचें आमच्यावरील प्रेम कोठें गेलें होतें? हरिणाजिन पांघरून सर्व अलंकार काढून घेतलेल्या अवस्थेंत द्रौपदीसहित तूं या धृतराष्ट्राकडे गेला होतास तेव्हां त्याला आपल्याविषयीं कांहीं दया वाटली काय? ते पितामह भीष्म व द्रोणाचार्य व तो सोमदत्त आपण ज्या वेळीं तेरा वर्षे वनवास केला त्या वेळीं कोठें गेले होते? हा आपला ज्येष्ठ पिता त्यावेळीं पित्याप्रमाणें वागूं इच्छीत नव्हता. पार्था, हा कुलांगार व दुर्बुद्धि धृतराष्ट्र द्यूतांत काय जिंकलें म्हणून विदुराला कौतुकानें विचारीत होता हें तूं विसरलास काय?"

महाभारतांतील भीमसेनाचीं हीं वैशिष्टयें व त्यांचें हें स्वरूप आहे. त्याला एकच नियंत्रण आहे व तें म्हणजे युधिष्ठिर. भीमसेनानें युधिष्ठिराचे आपल्यावरील अधिकार अमान्य केल्यास मी त्याला कौरवांच्या दास्यांतून मुक्त करावयास सिद्ध आहे असें दुर्योधनानें म्हटलें असतां द्यूतप्रसंगीं भीमानें असें उत्तर दिलें कीं :—

यद्येष गुरुरस्माकं धर्मराजो महामनाः ।
नः प्रभुः स्यात्कुलस्यास्य न वयं मर्षयेमहि ॥ १२
ईशो नः पुण्यतपसां प्राणानामपि चेश्वरः ।
मन्यते जितमात्मानं यद्येष विजिता वयम् ॥ १३

—महाभारत, सभापर्व अध्याय ७०

"जर हा महानुभाव धर्मराज आमचा गुरु व आमच्या कुलाचा प्रभु नसता तर आम्ही चालू प्रकार कधींही सहन केले नसते. हा आमच्या पुण्याचा, तपाचा, इतकेंच काय पण प्राणांचाही ईश्वर आहे. हा जर स्वतःला जित समजतो तर आम्हीही जित आहों-तच." भीमानें आपलें म्हणणें अक्षरशः खरें केलें आहे. सभापर्व

व विराटपर्वांतील अत्यंत आणीबाणीच्या प्रसंगींही युधिष्ठिरांच्या आज्ञा व संकेत त्याला पटत नसतां देखील त्यानें निमूटपणें पाळले आहेत. तेरा वर्षें त्यानें युधिष्ठिरासाठींच अपार दुःख सहन केलें. युधिष्ठिरानेंही भीमाच्या क्रोधाला योग्य प्रसंगीं सांडवाट मिळूं दिली आहे. मेलेल्या दुर्योधनाला भीमसेनानें लाथ मारली असतां तूं हा अधर्म कसा सहन केलास असें ज्या वेळीं श्रीकृष्ण युधिष्ठिरांना विचारूं लागले त्या वेळीं त्यांना उत्तर देतांना युधिष्ठिर म्हणतातः–

**न ममैतत्प्रियं कृष्ण यद्राजानं वृकोदरः ।**
**पदा मूर्ध्न्यस्पृशत्क्रोधान्न च हृष्ये कुलक्षये ॥ ३५**
**निकृत्या निकृता नित्यं धृतराष्ट्रसुतैर्वयम् ।**
**बहूनि परुषाण्युक्त्वा वनं प्रस्थापिताः स्म ह ॥ ३६**
**भीमसेनस्य तद्दुःखमतीव हृदि वर्तते ।**
**इति सञ्चिन्त्य वार्ष्णेय मयैतत्समुपेक्षितम् ॥ ३७**
**तस्माद्धत्वाऽकृतप्रज्ञं लुब्धं कामवशानुगम् ।**
**लभतां पाण्डवः कामं धर्मेऽधर्मे च वा कृते ॥ ३८**

—महाभारत, शल्यपर्व अध्याय ६०

"हे श्रीकृष्णा, भीमानें ह्या राजाच्या मस्तकाला पायानें स्पर्श केला याविषयीं अथवा एवढा मोठा कुलक्षय झाला म्हणून मला मुळींच आनंद होत नाहीं. पण अत्यंत कपटानें व अतिशय कठोर बोलून या धृतराष्ट्रपुत्रांनीं आम्हांला वनांत घालविलें याचें भीमाच्या हृदयांत अतिशय दुःख आहे. त्यामुळें या लोभी, मूर्ख व वाटेल तसें वागणाऱ्या दुर्योधनाच्या बाबतींत भीम धर्मानें वागतो कीं अधर्मानें याचा विचार न करतां मी त्याला त्याच्या मनाप्रमाणें वागूं दिलें." अनुचरानें ज्याप्रमाणें नेत्याच्या नियंत्रणांत राहणें अवश्य त्याचप्रमाणें नेत्यानेंही योग्य परिस्थितींत अनुचराच्या प्रवृत्तीला सांडवाट मिळवून देणें अवश्यच आहे. असो. नृशंस धाकांत राहून धर्म व नीति यांची प्रतिष्ठापना विषम परिस्थितींत व्हावयाची असली तर नियंत्रित भीम समाजांत अवश्य हवेत.

---

# २५. नरोत्तम पार्थ

पांडव हे पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांच्या धर्मसंस्थापनेच्या महत्कार्याचें साधनयंत्र होते असें विधान मीं अनेकवार केलें आहे. त्यांतल्या त्यांत जर अधिक कांटेकोर रीतीनें बोलावयाचें झालें तर तृतीय पांडव अर्जुन हेंच तें साधनयंत्र होय असें म्हणतां येईल. महाभारत अथवा जयनामक इतिहास हा नर–नारायण विजयाचाच इतिहास होय हें आपण मागें पाहिलेंच आहे. यांतील सर्वश्रेष्ठ जो नारायण तो केवळ प्रेरक व सहायक असून विजय वस्तुतः नरानेंच मिळविला आहे. नर हा सर्वश्रेष्ठ पुरुष होय. नर व नारायण हे दोघेही जगत्कल्याणार्थ तपश्चर्या करीत असून ते परमेश्वराचे साक्षात् अवतार होत असें आपल्या पुराणवाङ्मयांतून नेहमीं वर्णन येतें. यांतील नर हा महान् योद्धा असून त्यानें असुरश्रेष्ठ प्रल्हादाचा पराभव केल्याचें वर्णन प्रसिद्ध आहे. अर्जुन हा या नराचा अवतार असून श्रीकृष्ण म्हणजे नारायण होय. अर्जुनाला नराचा अवतार म्हणण्यांत त्याचें सर्वश्रेष्ठत्व महाभारतकारांनीं वर्णन केलें आहे. अर्जुनाचें महाभारतकारांना विलक्षण महत्त्व वाटतें. तोही आपल्या इतर बंधूंप्रमाणें देवसंभव असून देवराज महेंद्राचा तो पुत्र होय. महेंद्र ज्याप्रमाणें सर्व देवांत श्रेष्ठ, त्याचप्रमाणें अर्जुन हा सर्व मानवांत श्रेष्ठ असें महाभारतकारांना ध्वनित करावयाचें आहे. महाभारतांतील सर्वश्रेष्ठ प्रकरण जें श्रीमद्भगवद्गीता तें अर्जुनाच्या निमित्तानें निर्माण झालें आहे. अर्जुनाच्या पराक्रमाचें महाभारतांत मोठें अद्भुत वर्णन आहे. यश, कीर्ति व प्रताप यांचा अर्जुन म्हणजे ओतीव पुतळा असून पांडवांचें सर्व वैभव व माहात्म्य त्याच्या व्यक्तिमत्त्वांत समाविष्ट झालेलें आहे. महाभारतांतील वनपर्वांत अर्जुनाचें वर्णन करीत असतां महर्षि म्हणतात :—

**यस्तु देवमनुष्येषु प्रख्यातः सहजैर्गुणैः ।**
**श्रिया रूपेण शीलेन व्रतेन च दमेन च ।**
**प्रख्यातो बलवीर्येण संमतः प्रतिभानवान् ॥ ७**

---

व्याख्यान २५ वें, दि. २२ एप्रिल १९५१

वर्चस्वी तेजसा युक्तः क्षमावान्वीतमत्सरः ।
साङ्गोपनिषदान्वेदान् चतुराख्यानपञ्चमान् ॥ ८
योधीते गुरुशुश्रूषां मेधां चाष्टगुणाश्रयाम् ।
ब्रह्मचर्येण दाक्ष्येण प्रसवैर्वयसापि च ॥ ९
एको वै रक्षिता चैव त्रिदिवं मघवानिव ।
अकत्थनो मानयिता स्थूललक्ष्यः प्रियंवदः ॥ १०
सुहृदश्चान्नपानेन विविधेनाभिवर्षति ।
सत्यवाक्पूजितो वक्ता रूपवाननहंकृतः ॥ ११
भक्तानुकम्पी कान्तश्च प्रियश्च स्थिरसंगरः ।
प्रार्थनीयैर्गुणगणैर्महेन्द्रवरुणोपमः ॥ १२

—महाभारत, वनपर्व अध्याय ४५

"जो देव व मनुष्य यांच्यामध्यें आपल्या स्वाभाविक गुणांनीं अतिशय प्रसिद्ध आहे; अभिजात शोभा, शील, रूप, व्रत, दम, बल, वीर्य, प्रतिभा इत्यादिकांनीं युक्त असणारा, ज्याच्या शरीरावरच विद्या, ऐश्वर्य यांचें तेज झळकतें; अतिशय शूर, क्षमाशील, अंतःकरणाला मत्सराचा स्पर्शही नसलेला, सांगवेद व उपनिषदें, इतिहास व पुराणवाङ्मय यांचें गुरूजवळ अध्ययन करून ज्यानें ज्ञान प्राप्त करून घेतलें आहे असा, गुरूची शुश्रूषा करणारा, बुद्धिमत्तेचे सर्व गुण असलेला, ब्रह्मचर्य, सदा सावधपणा, तत्परता, वय, इतर अनेक सद्‌गुणांचें आश्रयस्थान असणारा, महेन्द्र ज्याप्रमाणें स्वर्गाचें संरक्षण करतो त्याप्रमाणें सर्वांचें संरक्षण करूं शकणारा, आपल्याविषयीं व आपल्या श्रेष्ठतेविषयीं स्वतः कधींच कांहीं न म्हणणारा, मान्य लोकांचा सदा सन्मान करणारा, मोठ्या व लोककल्याणकारक अशाच ध्येयावर सदैव दृष्टि ठेवणारा, अत्यंत गोड बोलणारा, आपल्या सुहृदांवर अन्नपानादि विविध भोगांचा सदैव वर्षाव करणारा, सत्यवक्ता, सर्व लोकांना मान्य होईल असें वक्तृत्व अंगीं असणारा, लावण्यसंपन्न, मुळींच अहंकार नसलेला, आपल्या आश्रयानें राहणाऱ्या व आपल्यावर प्रेम करणाऱ्या लोकांविषयीं अपार दया बाळगणारा, आपल्या सद्‌गुणांनीं तळपणारा, सर्वांना प्रिय वाटणारा,

संग्रामांत नेहमीं स्थिर राहणारा, लोकांनीं ज्याची अभिलाषा करावी अशा अनंत गुणगणांनीं महेंद्र व वरुणांप्रमाणें असणारा" असें अर्जुनाचें महाभारतांत वर्णन आहे.

महाभारतांतील वर्णनाप्रमाणें इतर सर्व पांडव गौरवर्णाचे पण अर्जुन मात्र श्यामवर्णाचा होता. भगवान् श्रीकृष्ण, द्रौपदी व अर्जुन या महाभारतांतील तीनही श्रेष्ठ व्यक्ति श्यामवर्णाच्याच होत्या. अर्जुनाच्या स्वरूपाचें वर्णन करतांना महाभारतकार म्हणतात :—

**यस्त्वेव पार्श्वेऽस्य महाधनुष्मान् श्यामो युवा वारणयूथपोपमः ।**
**सिंहोन्नतांसो गजराजगामी पद्मायताक्षोऽर्जुन एषः वीरः ॥ १५**

—महाभारत, विराटपर्व अध्याय ७१

"या भीमसेनाच्या पाठीमागें हा जो मोठें धनुष्य घेऊन उभा असलेला श्यामवर्णाचा पुरुष आहे यालाच अर्जुन असें म्हणतात. हा हत्तीच्या छाव्याप्रमाणें दिसत असून याची गतीही गजेन्द्राप्रमाणेंच आहे. सिंहाप्रमाणें याचे स्कंध उन्नत असून कमलाप्रमाणें याचे नेत्र विस्तीर्ण आहेत." हाच श्लोक आश्रमवासिक पर्वांत अर्जुनाच्या स्वरूपाचें वर्णन करीत असतां आला आहे. अर्जुनाच्या शरीराच्या ठेवणीसंबंधींचें आणखी एक विशेष वर्णन महाभारतांत आलेलें आहे, तसें इतर कोणाच्याही बाबतींत आलेलें नाहीं. त्यावरून असें दिसतें कीं, अर्जुनाच्या पोटऱ्या अधिक मांसल व पुष्ट होत्या. महाभारताच्या आश्वमेधिक पर्वाच्या ८७ व्या अध्यायांत युधिष्ठिरांनीं श्रीकृष्णांना असें विचारलें आहे कीं, अर्जुनाचें शरीर सर्व लक्षणांनीं युक्त असतांना त्याला वारंवार प्रवास कां करावा लागतो व दुःख कां करावें लागतें ? त्यावर उत्तर देत असतांना श्रीकृष्णांनीं युधिष्ठिराला असें सांगितलें कीं,

**न ह्यस्य नृपते किञ्चित्संश्लिष्टमुपलक्षये ।**
**ऋते पुरुषसिंहस्य पिण्डकेऽस्याधिके यतः ॥ ८**
**स ताभ्यां पुरुषव्याघ्रो नित्यमध्वसु वर्तते ।**
**न चान्यदनुपश्यामि येनासौ दुःखभाजनम् ॥ ९**

—महाभारत, आश्वमेधिकपर्व अध्याय ८७

"हे राजन्, पोटऱ्या सर्वसामान्य मनुष्याहून अधिक मांसल व परिपुष्ट असणें याविना अर्जुनाच्या शरीरावर दुसरें कोणतेंही दुर्लक्षण नाहीं. त्यामुळें अर्जुनाला नेहमीं प्रवास करावा लागतो. याविना त्याच्या सतत दुःखीपणाचें दुसरें कांहीं कारण मला तरी दिसत नाहीं." भगवान् श्रीकृष्णांनीं हीं वाक्यें उच्चारतांच द्रौपदीनें किंचित् असूयेनें व वाकड्या नजरेनें श्रीकृष्णाकडे पाहिलें व त्यावरून तिचें पार्थावरील प्रेम ध्यानांत येऊन श्रीकृष्णांना मोठी गंमत वाटली असें महाभारतांत वर्णन आहे.

**कृष्णा तु द्रौपदी कृष्णं तिर्यक् सासूयमैक्षत ।**
**प्रतिजग्राह तस्यास्तं प्रणयं चापि केशिहा ॥ ११**

—महाभारत, आश्वमेधिकपर्व अध्याय ८७

## आदर्श विद्यार्थी

अर्जुन हा अत्यंत बुद्धिमान्, दक्ष व विनयसंपन्न असा आदर्श विद्यार्थी असून त्याच्या सद्गुणांनीं त्यानें आचार्य द्रोणांचें इतकें उत्कट प्रेम संपादिलें होतें कीं स्वतःच्या मुलापेक्षांही आचार्यांना अर्जुन अधिक आवडूं लागला होता. अस्त्रविद्येवर त्याचें अधिक प्रेम होतें. त्यामुळें अस्त्रप्रयोग, चपलता कलात्मकता या तिन्ही दृष्टींनीं सर्व शिष्यांच्यापेक्षां लवकरच अर्जुन त्यांच्या विद्यालयांत सर्वश्रेष्ठ ठरला. ज्याला शिकवावें असा हाच एकमात्र आदर्श विद्यार्थी आहे अशी त्याच्याविषयीं द्रोणांची भावना असे. अर्जुनानें अनेक प्रसंगीं आपली विद्याभ्यसनाची आस्था द्रोणांच्या ध्यानांत आणून दिली होती. आचार्य द्रोणांनीं आपल्या मुलाला खास अस्त्रें शिकवावीं अशा मनोवृत्तीनें सर्व विद्यार्थ्यांना पाणी आणण्याचें काम दिलें. सर्व विद्यार्थ्यांना पाणी आणावयास त्यांनीं कमंडलू दिले व आपल्या मुलाला मात्र मोठ्या तोंडाचा कुंभ दिला. कुंभ लवकर भरे व कमंडलू भरावयास उशीर लागत असे. त्यामुळें अश्वत्थामा लवकर घरीं येई व बाकीच्या विद्यार्थ्यांना यावयास वेळ लागे. तेवढ्या अवकाशांत द्रोण आपल्या पुत्राला विद्येचें विशेष रहस्य सांगून मोकळे होत. बुद्धिमान् अर्जुनाच्या ही गोष्ट तत्काळ

लक्षांत आली व वारुणास्त्रानें आपला कमंडलू भरून तो अश्वत्थाम्याच्या बरोबरच आश्रमांत राहूं लागला. त्यामुळें आचार्यांचा कांहींच उपाय न चालून त्यांना अर्जुनालाही विद्येचीं सर्व रहस्यें सांगणें क्रमप्राप्त झालें. अस्त्रविद्या व सतत अभ्यास यामुळें अर्जुन द्रोणांना अत्यंत प्रिय झाला व सतत गुरूच्या सेवेंत निरत राहिल्यामुळें त्यानें तें प्रेम सदाचें टिकवूनही धरलें. एके दिवशीं द्रोणाचार्यांनीं त्याला विशेष स्वरूपाचा अभ्यास करण्यासाठीं सूचना द्यावयासाठीं व त्याच्या बुद्धिमत्तेचीही परीक्षा पहावयासाठीं म्हणून आचाऱ्याला असें सांगितलें कीं, रात्रीं अंधारांत दिवा नसतांना अर्जुनाला अन्न वाढूं नये; व त्यानें कां वाढीत नाहीं असें विचारतांच त्याला असें सांगावें कीं अंधारांत तुला घांस बरोबर तोंडांत घेतां येणार नाहीं म्हणून मी तुला अन्न वाढीत नाहीं. जर त्यानें त्यावर असें उत्तर दिलें कीं नित्याच्या सरावामुळें माझा घांस तोंडांतच जाईल, तर त्याला असें उत्तर द्यावें कीं, लक्ष्यवेधाचा असाच सराव केल्यास, अंधारांत लक्ष्य समोर दिसत नसतांही लक्ष्यवेध सहज करतां येईल. तुला हें कोणी सांगितलें असें त्यानें विचारल्यास माझें नांव मात्र सांगूं नकोस. पण अर्जुनाच्या बाबतींत आचार्यांना इतकी वाट देखील पहावी लागली नाहीं. त्यांच्या सूचनेप्रमाणें आचाऱ्यानें अर्जुनाला कांहीं सांगण्याआधींच एके दिवशीं तो जेवावयाला बसला असतां वाऱ्यानें दिवा विजला. तरीही त्या अंधारांत घास बरोबर आपल्या तोंडांतच जात आहे असें पाहून अर्जुनाच्याच मनांत असा विचार आला कीं, संवयीनें अन्नाचा घांस दिसत नसतां देखील बरोबर आपण तोंडांत घालूं शकतों तर आपणांस लक्ष्यवेधच करतां येणार नाहीं काय? रात्रींच्या अंधारांत त्यानें धनुर्बाणांचा लक्ष्यवेधाचा अभ्यास केला. त्याच्या धनुष्याचा टंकार रात्रीच्या गहन अंधकारांत द्रोणांनीं ऐकला मात्र; लगेच उठून त्यांनीं अभ्यास करीत असलेला अर्जुन पाहिला. आचार्यांचें वत्सल हृदय भरून आलें व त्यांनीं अर्जुनाला आलिंगन देऊन असें सांगितलें कीं:—

**प्रयतिष्ये तथा कर्तुं यथा नान्यो धनुर्धरः।**
**त्वत्समो भविता लोके सत्यमेतद् ब्रवीमि ते॥ २७**

—महाभारत, **आदिपर्व** अध्याय १३२

"हे पार्थ मी सत्यप्रतिज्ञा करतों कीं, या जगांत तुझ्यासारखा दुसरा कोणीही धनुर्धर होणार नाहीं. असें करण्यासाठीं मी आवश्यक ते सर्व प्रयत्न करीन. त्याप्रमाणें आचार्यांनीं अकार्य करावयास देखील मागें पुढें पाहिलें नाहीं. एकलव्य नांवाच्या त्यांच्या एका एकनिष्ठ शिष्याचा अंगठा देखील आचार्यांनीं तो अर्जुनापेक्षां हस्तलाघवांत अधिक श्रेष्ठ ठरूं नये या एकाच कारणास्तव गुरूदक्षिणेच्या मिषानें कापून टाकावयास लावला होता. प्रथम भेटींतच अर्जुनानें आचार्यांचें आपल्या पाणीदारपणानें चित्त हरण करून घेतलें होतें. द्रुपदानें द्रोणाचार्यांचा जो अपमान केला, तो शल्याप्रमाणें सदैव त्यांच्या हृदयांत टोचत असे. व या अपमानाचें प्रायश्चित्त म्हणून आपल्या शिष्याकडून त्याचा पराभव करून त्याला शरण आणावें अशी त्यांची मनीषा होती. भीष्मांनीं कौरवांच्या राजदरबारीं त्यांना आश्रय दिल्यावर व शिष्य म्हणून धृतराष्ट्राचे शंभर पुत्र व पंडूचे पांच पुत्र त्यांच्या स्वाधीन केल्यावर द्रोणाचार्यांनीं त्या सर्वांना एकांतांत बोलाविलें व त्यांना असा प्रश्न विचारला कीं:—

**कार्यं मे कांक्षितं किञ्चिद् हृदि संपरिवर्तते ।**
**कृतास्त्रैस्तत्प्रदेयं मे तदेतद्वदतानघाः ॥ ६**

——महाभारत, आदिपर्व अध्याय १३२

मीं तुम्हांला विद्यादान करणार आहें. पण तें माझें विद्यादान हेतुपूर्वक आहे. तुम्हांला मी पूर्णपणें कृतास्त्र केल्यानंतर स्वतःच्या सामर्थ्यानें तुम्ही आपल्या गुरूच्या अंतःकरणांतील इच्छा पूर्ण कराल काय ? महाभारतकार म्हणतातः—

**तच्छ्रुत्वा कौरवेयास्ते तूष्णीमासन् विशांपते ।**
**अर्जुनस्तु ततः सर्वं प्रतिजज्ञे परंतप ॥ ७**
**ततोऽर्जुनं तदा मूर्ध्नि समाघ्राय पुनः पुनः ।**
**प्रीतिपूर्वं परिष्वज्य प्ररुरोद मुदा तदा ॥ ८**

महाभारत, आदिपर्व अध्याय १३२

द्रोणाचार्यांचें हें भाषण ऐकतांच ते सर्व कौरव राजपुत्र अगदीं गप्प बसले. कोणीही त्यांच्या प्रश्नाला कांहींच उत्तर देईना. अर्जुनानें मात्र सर्वांसमक्ष आचार्यांची सर्व इच्छा परिपूर्ण करण्याची

प्रतिज्ञा केली. त्याबरोबर अर्जुनाला आचार्यांनीं आपल्याजवळ ओढून घट्ट मिठी मारली व त्याच्या मस्तकाचें वारंवार अवघ्राण करून हर्षातिरेकानें ते जोरजोरानें रुदन करूं लागले. अर्जुनाची आचार्यांनीं पुनः पुनः परीक्षा घ्यावी व त्या प्रत्येक परीक्षेंत अर्जुनानें आचार्यांना त्यांच्या कल्पनेपेक्षांही अधिक संतोष देऊन त्यांचें प्रेम संपादन करावें. ज्याच्या प्राप्तीसाठीं महारथी कर्ण जन्मभर तळमळत असे व गुरूचा शाप ग्रहण करूनही जें अस्त्र संपादन करावयाचा त्यानें प्रयत्न केला, तें ब्रह्मशिरस नांवाचें सर्वश्रेष्ठ अस्त्र अर्जुनानें केवळ आपल्या कौशल्यानें गुरुकृपा संपादन करून सहज रीत्या मिळविलें होतें. त्याच्या लक्ष्यवेधित्वाचें व महास्त्रसंपादनाचें महाभारतांत पुढीलप्रमाणें मनोरम वर्णन आहे.

तांस्तु सर्वान् समानीय सर्वविद्यास्त्रशिक्षितान् ।
द्रोणः प्रहरणज्ञाने जिज्ञासुः पुरुषर्षभः ।। ६७
कृत्रिमं भासमारोप्य वृक्षाग्रे शिल्पिभिः कृतम् ।
अविज्ञातं कुमाराणां लक्ष्यभूतमुपादिशत् ।। ६८

द्रोण उवाच

शीघ्रं भवन्तः सर्वेऽपि धनूंष्यादाय सर्वशः ।
भासमेतं समुद्दिश्य तिष्ठध्वं संधितेषवः ।। ६९
मद्वाक्यसमकालं तु शिरोऽस्य विनिपात्यताम् ।
एकैकशो नियोक्ष्यामि तथा कुरुत पुत्रकाः ।। ७०

वैशंपायन उवाच

ततो युधिष्ठिरं पूर्वमुवाचाङ्गिरसां वरः ।
संधत्स्व बाणं दुर्धर्ष मद्वाक्यान्ते विमुञ्च तम् ।। ७१
ततो युधिष्ठिरः पूर्वं धनुर्गृह्य परंतपः ।
तस्थौ भासं समुद्दिश्य गुरुवाक्यप्रचोदितः ।। ७२
ततो विततधन्वानं द्रोणस्तं कुरुनन्दनम् ।
स मुहूर्तादुवाचेदं वचनं भरतर्षभ ।। ७३
पश्यैनं तं द्रुमाग्रस्थं भासं नरवरात्मज ।
पश्यामीत्येवमाचार्यं प्रत्युवाच युधिष्ठिरः ।। ७४
स मुहूर्तादिव पुनर्द्रोणस्तं प्रत्यभाषत ।

द्रोण उवाच

अथ वृक्षमिमं मां वा भ्रातॄन्वापि प्रपश्यसि ॥ ७५
तमुवाच स कौन्तेयः पश्याम्येनं वनस्पतिम् ।
भवन्तं च तथा भ्रातॄन् भासं चेति पुनः पुनः ॥ ७६
तमुवाचापसर्पेति द्रोणोऽप्रीतमना इव ।
नैतच्छक्यं त्वया वेद्धुं लक्ष्यमित्येव कुत्सयन् ॥ ७७
ततो दुर्योधनादींस्तान् धार्तराष्ट्रान् महायशाः ।
तेनैव क्रमयोगेन जिज्ञासुः पर्यपृच्छत ॥ ७८
अन्यांश्च शिष्यान् भीमादीन् राज्ञश्चैवान्यदेशजान् ।
तथा च सर्वे तत्सर्वं पश्याम इति कुत्सिताः ॥ ७९
—महाभारत, आदिपर्व अध्याय १३२

वैशंपायन उवाच

ततो धनञ्जयं द्रोणः स्मयमानोऽभ्यभाषत ।
त्वयेदानीं प्रहर्तव्यमेतल्लक्ष्यं विलोक्यताम् ॥ १
मद्वाक्यसमकालं ते मोक्तव्योऽत्र भवेच्छरः ।
वितत्य कार्मुकं पुत्र तिष्ठ तावन्मुहूर्तकम् ॥ २
एवमुक्तः सव्यसाची मण्डलीकृतकार्मुकः ।
तस्थौ भासं समुद्दिश्य गुरुवाक्यप्रचोदितः ॥ ३
मुहूर्तादिव तं द्रोणस्तथैव समभाषत ।
पश्यस्येनं स्थितं भासं द्रुमं मामपि चार्जुन ॥ ४
पश्याम्येकं भासमिति द्रोणं पार्थोऽभ्यभाषत ।
न तु वृक्षं भवन्तं वा पश्यामीति च भारत ॥ ५
ततः प्रीतमनाः द्रोणो मुहूर्तादिव तं पुनः ।
प्रत्यभाषत दुर्धर्षः पाण्डवानां महारथम् ॥ ६
भासं पश्यसि यद्येनं तथा ब्रूहि पुनर्वचः ।
शिरः पश्यामि भासस्य न गात्रमिति सोऽब्रवीत् ॥ ७
अर्जुनेनैवमुक्तस्तु द्रोणो हृष्टतनूरुहः ।
मुञ्चस्वेत्यब्रवीत्पार्थं स मुमोचाविचारयन् ॥ ८
ततस्तस्य नगस्थस्य क्षुरेण निशितेन च ।
शिर उत्कृत्य तरसा पातयामास पाण्डवः ॥ ९
तस्मिन्कर्मणि संसिद्धे पर्यष्वजत पाण्डवम् ।
मेने च द्रुपदं सङ्ख्ये सानुबन्धं पराजितम् ॥ १०

कस्यचित्त्वथ कालस्य स शिष्योऽङ्गिरसां वरः ।
जगाम गङ्गामभितो मज्जितुं भरतर्षभ ॥ ११
अवगाढमथो द्रोणं सलिले सलिलेचरः ।
ग्राहो जग्राह बलवाञ्जङ्घान्ते कालचोदितः ॥ १२
स समर्थोऽपि मोक्षाय शिष्यान् सर्वानचोदयत् ।
ग्राहं हत्वा तु मोक्षध्वं मामिति त्वरयन्निव ॥ १३
तद्वाक्यसमकालं तु बीभत्सुर्निशितैः शरैः ।
अवार्यैः पञ्चभिर्ग्राहं मग्नमम्भस्यताडयत् ॥ १४
इतरे त्वथ संमूढास्तत्र तत्र प्रपेदिरे ।
तं तु दृष्ट्वा क्रियोपेतं द्रोणोऽमन्यत पाण्डवम् ॥ १५
विशिष्टं सर्वशिष्येभ्यः प्रीतिमांश्चाभवत्तदा ।
स पार्थबाणैर्बहुधा खण्डशः परिकल्पितः ॥ १६
ग्राहः पञ्चत्वमापेदे जङ्घां त्यक्त्वा महात्मनः ।
अथाब्रवीन्महात्मानं भारद्वाजो महारथम् ॥ १७
गृहाणेदं महाबाहो विशिष्टमतिदुर्धरम् ।
अस्त्रं ब्रह्मशिरो नाम सप्रयोगनिवर्तनम् ॥ १८
न च ते मानुषेष्वेतत्प्रयोक्तव्यं कथंचन ।
जगद्विनिर्दहेदेतत्कल्पतेजसि पातितम् ॥ १९
असामान्यमिदं तात लोकेष्वस्त्रं निगद्यते ।
तद् धारयेथाः प्रयतः शृणु चेदं वचो मम ॥ २०
बाधेतामानुषः शत्रुर्यदि त्वां वीर कश्चन ।
तद्वधाय प्रयुञ्जीथास्तदस्त्रमिदमाहवे ॥ २१
तथेति संप्रतिश्रुत्य बीभत्सुः स कृताञ्जलिः ।
जग्राह परमास्त्रं तदाह चैनं पुनर्गुरुः ।
भविता त्वत्समो नान्यः पुमाँल्लोके धनुर्धरः ॥ २२
—महाभारत, आदिपर्व अध्याय १३३

"आपले सर्व विद्यार्थी अस्त्रविद्येंत प्रवीण झाले आहेत व नाना प्रकारची शस्त्रविद्या त्यांनीं हस्तगत केली आहे असें पाहून लक्ष्य-वेधासाठीं अत्यंत आवश्यक अशी चित्ताची एकाग्रता त्यांच्या ठिकाणीं किती बाणली आहे याची परीक्षा घ्यावयाचें द्रोणाचार्यांनीं ठरविलें. त्यांनीं कारागिराकडून एक कृत्रिम भास तयार करून त्याला एका वृक्षाच्या अग्रावर ठेवून दिलें. तो कृत्रिम आहे याची

आपल्या शिष्यांना मुळींच कल्पना न देतां त्यांनीं त्याचाच लक्ष्यवेध करावयास सांगितलें. ते म्हणाले, तुम्ही सर्वजण आपआपलीं धनुष्यें सज्ज करून व त्यावर बाण लावून अगदीं सिद्ध असा. या भासाचें मस्तक तुम्हांला तोडावयाचें आहे. माझी आज्ञा होतांच याचें मस्तक तुम्ही तोडून खालीं पाडलें पाहिजे. तुमच्यापैकीं एकेकाला मी हें काम करावयास सांगणार आहें. याप्रमाणें बोलून त्यांनीं सर्वांत वडील म्हणून युधिष्ठिराला बोलाविलें व त्याला असें सांगितलें कीं, तुझ्या धनुष्यावर बाण लाव. लक्ष्य नीट पहा व मी आज्ञा देतांच बाण सोड. युधिष्ठिर द्रोणांच्या आज्ञेप्रमाणें सज्ज राहिले. एक मुहूर्तभर थांबून पुन्हां द्रोणाचार्यांनीं युधिष्ठिराला सांगितलें कीं, 'हे राजपुत्रा वृक्षाच्या अग्रावरील या भासाकडे नीट लक्षपूर्वक पहा. त्याबरोबर युधिष्ठिरांनीं त्यांना प्रत्युत्तर दिलें कीं, 'मी या भासाकडे पहातच आहे.' आचार्य पुनश्च एक मुहूर्त थांबले. पुनश्च त्यांनीं युधिष्ठिराला विचारलें, 'कायरे ! तूं या भासाकडे पहात असतां तुला हा वृक्ष, मी व तुझे बंधु दिसतात काय ? 'होय, मला सर्व कांहीं दिसतें' असें युधिष्ठिरांनीं उत्तर दिलें. तें ऐकतांच आचार्य किंचित् विमनस्क झाले. पुन्हां पुन्हां त्यांनीं त्याच्या तोंडून तेंच उत्तर ऐकून असंतुष्ट चित्तानें आचार्य त्याला म्हणाले, 'चल हो बाजूला ! लक्ष्यवेध करणें हें तुझें काम नव्हे. त्यांनीं युधिष्ठिराची निर्भर्त्सना केली. क्रमाक्रमानें उर्वरित पांडव, दुर्योधनादि कौरव व इतर देशोदेशीचे राजपुत्र या सर्वांचीच आचार्यांनीं परीक्षा घेतली व सर्वच या विषयांत युधिष्ठिराचे निष्ठावंत अनुयायी असलेले पाहून त्यांनीं त्या सर्वांनाच बाजूला करून त्यांची निर्भर्त्सना केली. आशेनें त्यांनीं अर्जुनास बोलावलें व त्याला असें सांगितलें कीं, वत्सा, तुला या लक्ष्यावर आतां प्रहार करावयाचा आहे. लक्ष्य नीट पाहून घे. माझें आज्ञार्थक वाक्य संपतें न संपतें तोंच तुला बाण सोडावा लागेल. धनुष्य सज्ज करून व तें आकृष्ट करून लक्ष्यावर दृष्टि स्थिर करीत एक मुहूर्तमात्र थांब. गरूच्या आज्ञेनुरूप अर्जुनानें धनुष्य सज्ज करून व त्यावर बाण योजून त्याचें आकर्षण केलें व लक्ष्यावर आपली दृष्टि स्थिर करून तो उभा राहिला. बरोबर एका मुहूर्तानें

आचार्यांनीं अर्जुनाला विचारलें कीं 'तुला भास, झाड आणि मी हें सर्वच दिसतें काय?' त्यावर अर्जुनानें त्यांना सांगितलें, 'आचार्य! मला आपण, वृक्ष अथवा इतर कोणीही दिसत नाहीं. मला फक्त भास दिसतो' त्याबरोबर द्रोणांना अतिशय आनंद झाला व ते पांडवांच्यामध्यें महारथ असलेल्या त्या अर्जुनाला पुन्हां मुहूर्तानंतर म्हणाले कीं, 'वत्सा आतांही तुला भासच दिसतो काय?' एकाग्र-चित्त पार्थानें सांगितलें 'मला फक्त भासाचें मस्तक दिसतें. बाकी कोणताही अवयव दिसत नाहीं.' त्याचें उत्तर ऐकतांच द्रोणांच्या अंगावर हर्षानें रोमांच उभे राहिले व ते अर्जुनाला एकदम म्हणाले 'सोड बाण' त्याबरोबर अर्जुनानें आपल्या तीक्ष्ण बाणानें त्या भासाचें मस्तक तोडून खालीं पाडलें. त्याचें तें कृत्य पहातांच द्रोणांनीं त्याला प्रेमानें घट्ट मिठी मारली. द्रुपदाचा त्याच्या सैन्या-सहित पराभव झालाच असें आचार्यांना वाटलें. एकदां शिष्यासहित द्रोणाचार्य गंगेवर स्नान करण्यासाठीं गेले असतां एका बलवान् मगरानें त्यांचा पाय पकडला. स्वतः आपली सुटका करून घ्यावयास ते पूर्णपणें समर्थ असतांही आपल्या शिष्यांची परीक्षा पहावी म्हणून त्यांनीं आपल्या शिष्यांना सांगितलें कीं, या मगराला ठार मारून मला सोडवा. पण मगरानें आचार्यांना धरलेलें पाहून ते शिष्य इतके थिजून गेले कीं, कांहींएक न सुचून ते वेड्यासारखे पहातच राहिले. अर्जुनानें मात्र तीक्ष्ण बाण काढून त्या मगराचे तुकडे उडवून दिले. आपल्या सर्व शिष्यांत कसल्याही प्रसंगीं मुळींच न डगमगतां आपलें चित्त स्थिर ठेवून अवश्य तें कार्य पार पाडण्याचें सामर्थ्य केवळ अर्जुनाच्याच ठिकाणीं आहे अशी त्यांची खात्री पटली. अत्यंत प्रसन्न होऊन आचार्य अर्जुनाला म्हणाले, 'हे महाबाहो, मी तुला अति दुर्धर व आपल्या वैशिष्टयानें सर्व अस्त्रांतून तळपणारें असें ब्रह्मशिर नांवाचें अस्त्र प्रयोग व उपसंहार यांसहित देतों. मात्र याचा प्रयोग तूं मनुष्यावर कधींही करूं नकोस. अल्पतेजावर जर याचा प्रयोग केला तर तें सर्व जगाचें भस्म करून टाकतें. हें अत्यंत असामान्य असें अस्त्र आहे. तूं त्याचें धारण कर व माझी एक सूचना ऐक. जर एकादा अमानुष शत्रु तुला बाधा उत्पन्न करील तर

त्याच्या वधासाठींच केवळ तूं या अस्त्राचा प्रयोग कर. अर्जुनानें हात जोडून गुरूजवळून त्या अस्त्राचा स्वीकार केला. पुनश्च गुरूनें त्याला सांगितलें कीं, हे पार्थ, जगांत तुझ्यासारखा धनुर्धर दुसरा कोणीही होणार नाहीं."

## पार्थाची अलौकिक गुरुभक्ति

आचार्य द्रोणांनीं अर्जुनाला, त्याच्यावर पुत्रापेक्षांही अधिक प्रेम करून जें विद्यादान केलें होतें, त्याविषयींच्या कृतज्ञतेनें अर्जुनाचें अंतःकरण नेहमीं भारलेलें असे. ते काय गुरुदक्षिणा मागणार आहेत याचा विचारदेखील न करतां मागतील तें द्यावयाचें असें अर्जुनानें निश्चित केलेंच होतें, त्याप्रमाणें त्यानें राजा द्रुपदाचा पराभव करून आचार्य द्रोणांची अपेक्षित गुरुदक्षिणा त्यांना समर्पण केली. ही गुरुदक्षिणा देत असतांना सुद्धां त्यानें एका दगडानें दोन पक्षी मारले. नुकतेंच कर्णाचें साहाय्य मिळाल्यामुळें स्वतःच्या पक्षाच्या सबलतेविषयीं भलत्याच विपरीत कल्पना झालेला दुर्योधन व कर्ण या दोघांच्याही डोळ्यावरील भ्रामक कल्पनेचें पटल त्यानें दूर सारलें आणि आचार्यांनाही संतुष्ट केलें. 'ज्या वेळीं द्रोणांच्या आज्ञेवरून कर्णासहित कौरव व पांडव राजकुमार द्रुपदाच्या राजनगरीवर चालून गेले त्या वेळीं घडलेल्या वृत्तासंबंधीं महाभारतकार म्हणतातः—

**पूर्वमेव तु संमन्त्र्य पार्थो द्रोणमथाऽब्रवीत् ।**
**दर्पोद्रेकात्कुमाराणामाचार्यं द्विजसत्तमम् ॥ १२**
**एषां पराक्रमस्यान्ते वयं कुर्याम साहसम् ।**
**एतैरशक्यः पाञ्चालो ग्रहीतुं रणमूर्धनि ॥ १३**
**एवमुक्त्वा तु कौन्तेयो भ्रातृभिः सहितोऽनघः ।**
**अर्धक्रोशे तु नगरादतिष्ठद् बहिरेव सः ॥ १४**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १३८

"आधींच विचारविनिमय करून व आपले सारे विरोधी कुमार स्वतःच्या पराक्रमाच्या कल्पनेनें दर्पांध झाले आहेत असें पाहून अर्जुनानें द्रोणाचार्यांना असें म्हटलें कीं, 'रणांगणांत द्रुपदाला पकडणें या सर्वांना अत्यंत अशक्य आहे. यांनीं एकदां पराक्रम गाजविल्यानंतर अंतीं आम्हांला जें साहस करावयाचें आहे तें आम्ही

करूं' असें म्हणून अर्जुन आपल्या बंधूंसहित द्रुपदाच्या नगराबाहेर अर्ध्या कोसावरच थांबला. कर्णासहित चालून गेलेल्या सर्व कौरवांना द्रुपदानें, त्याच्या सैन्यानें व प्रजाजनांनींही चांगलेंच झोडपून काढून पळवून लावलें. त्यांचा आर्त निनाद ऐकून नंतरच अर्जुन संग्रामांत शिरला व त्यानें द्रुपदाला पकडून आणून आचार्यांच्या पायावर लोटलें. आचार्यांचें अपार प्रेम असलेला सर्व सद्गुण-संपन्न पार्थ व आचार्य यांनाच नियतीनें एकमेकांविरुद्ध पुढें हत्यार उपसावयास लावून जें भयानक दृश्य जगताच्या रंगपटावर उभें केलें त्यांत तिचें सामर्थ्यंच दिसून येतें. दुर्दैवानें आचार्यांनीं हस्तिनापुरच्या गादीचें स्वतःवरील स्वामित्व मान्य केलें. राज्याची फाळणी होतांच पांडवांच्या शत्रुपक्षाचे आश्रित म्हणून त्यांना रहावें लागलें. अर्जुनाविरुद्ध शस्त्र उपसण्याची कल्पनाही त्यांना अत्यंत दुःखद वाटे. सभापर्वांत दुर्योधन पांडवांपासून आपण आमचें संरक्षण करा म्हणून ज्या वेळीं विनवूं लागला, त्या वेळीं आचार्य त्याला म्हणतात :-

**रथातिरथसङ्ख्यायां योऽग्रणीरर्जुनो युवा ॥ ४६**
**सृष्टप्राणो भृशतरं तेन चेत्संगमो मम ।**
**किमन्यद् दुःखमधिकं परमं भुवि कौरवाः ॥ ४७**

—महाभारत, सभापर्व अध्याय ८०

"रथ व अतिरथ यांच्या गणनेंत जो सर्वश्रेष्ठ आहे त्या तरुण अर्जुनाशीं, तो आपलें सर्व सामर्थ्य खर्च करून युद्ध करीत असतां मला प्रतिपक्षी म्हणून त्याच्याशीं गांठ घ्यावी लागणें यासारखें अधिक दुःखदायक असें मला जगांत दुसरें काय आहे?" आचार्यांची अर्जुनाविषयींची ही भावना वारंवार व्यक्त झालेली आहे. ज्या ज्या वेळीं प्रसंग पडेल त्या प्रत्येक वेळीं आचार्य द्रोणच नव्हे तर कृपाचार्य व अश्वत्थामा यांनीं देखील अर्जुनाविषयींचा आपला विलक्षण अभिमान प्रकट केलेला आहे. अर्जुनाचें देखील आपल्या गुरूवर असेंच विलक्षण प्रेम होतें. त्यांच्याशीं लढण्याची कल्पना त्याच्या अंगावर शहारे उत्पन्न करते. द्रोण हे अर्जुनाचे प्रतिपक्षी म्हणून युद्धांत उभे असतां व अर्जुनाचे नियंत्रक भगवान् श्रीकृष्ण त्याला

द्रोणांना मारणें हें तुझें कर्तव्य आहे, असें वारंवार सांगत असतां देखील द्रोणांचा वध करणें अर्जुनाच्या दृष्टीनें अत्यंत अशक्य कोटींतील आहे. ज्या वेळीं द्रोणांनीं कौरवांचें सेनापतित्व स्वीकारून युधिष्ठिरांना पकडून देण्याची प्रतिज्ञा केली त्या वेळीं अर्जुनाला युधिष्ठिरांनीं ती प्रतिज्ञा सांगून स्वतःच्या संरक्षणाची व्यवस्था करावयास सांगितलें असतां अर्जुन युधिष्ठिरांना उत्तर देतांना म्हणतोः—

**यथा मे न वधः कार्य आचार्यस्य कदाचन ।। ७**
**तथा तव परित्यागो न मे राजंश्चिकीर्षतः ।**
**अप्येवं पाण्डव प्राणानुत्सृजेयमहं युधि ।। ८**
**प्रतीपो नाहमाचार्ये भवेयं वै कथञ्चन ।**
**त्वां निग्राहमाहवे राज्यं धार्तराष्ट्रोऽयमिच्छति ।। ९**
**न स तं जीवलोकेऽस्मिन् कामं प्राप्येत्कथंचन ।**
**प्रपतेत् द्यौः सनक्षत्रा पृथिवी शकलीभवेत् ।। १०**

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय १३

" हे राजन्, ज्याप्रमाणें मला आचार्यांचा वध मुळींच करावयाचा नाहीं, त्याचप्रमाणें आपला परित्यागही करावयाचा नाहीं. द्रोणांनीं कितीही पराक्रम जरी केला तरीही त्यांना मी आपल्याला पकडूं देणार नाहीं हें जसें खरें आहे त्याचप्रमाणें प्राणत्यागाची जरी वेळ आली तरीही मीं आचार्यांशीं कृतघ्न होणें अत्यंत अशक्य आहे. तुम्हांला बंधनांत टाकून दुर्योधन राज्य मिळवूं इच्छीत आहे. पण द्यूलोक नक्षत्रासहित खालीं पडेल, कदाचित् पृथ्वीचे तुकडे पडतील पण तुम्हांला धरण्याची कोणाचीही इच्छा या जगतांत पूर्ण होणें सर्वस्वीं अशक्य आहे." अर्जुनानें आपल्या गुरूशीं नमन केल्यावांचून व त्यांचा आशीर्वाद घेतल्यावांचून कधींही युद्ध केलेलें नाहीं. त्याचें खड्ग नेहमीं न्यायार्थ उचललेलें असून गुरूचेंच खड्ग अन्यायी असल्यामुळें युद्धांत त्याच्या जयाची इच्छा करण्यावांचून गुरूलाही दुसरें कांहीं करतां येणें शक्य झालें नाहीं.

भारतांतील महायुद्धांत भाग घेणारे सर्व क्षत्रिय द्रोणाचार्यांचे शिष्य असल्यामुळें आचार्यांचा वध करूं नये व आपण जिवंत

असतांना आचार्यांचा वध होऊं नये अशी अर्जुनाची पहिल्यापासून उत्कट इच्छा होती. आचार्यांना न मारतां केवळ धरून आणावें म्हणजे प्रतिपक्ष्याला त्यांच्या सामर्थ्याचा उपयोग करतां येणार नाहीं असें अर्जुन म्हणत असे. शेवटीं द्रोणाचार्य 'अश्वत्थामा मारला गेला' या कल्पनेनें ज्या वेळीं न्यस्तशस्त्र होऊन व समाधि साधून स्वस्थ बसले तेव्हां हातांत खड्ग घेऊन त्यांचा शिरच्छेद करण्याच्या इच्छेनें धृष्टद्युम्न त्यांच्या अंगावर धांवून गेला असतां अर्जुनानें आपल्या रथावरून त्याला ओरडून सांगितलें कीं,

**उक्तवांश्च महाबाहुः कुन्तीपुत्रो धनञ्जयः ।। ६५**
**जीवन्तमानयाचार्यं मा वधीर्द्रुपदात्मज ।**
**न हन्तव्यो न हन्तव्य इति ते सैनिकाश्च ह ।। ६६**

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय १९२

"हे द्रुपदात्मजा! आचार्यांना जिवंत अवस्थेंत आण. त्यांना ठार मारूं नकोस." अंतःकरणांत अपार गुरुप्रेम उचंबळून येऊन अर्जुन "मारूं नकोस, मारूं नकोस" म्हणून ओरडूं लागला. पण पंचाल राजपुत्रानें कार्याकार्याचा यत्किंचित्‌ही विवेक न करतां समाधि-मग्न द्रोणाचार्यांचें मस्तक आपल्या खड्गाच्या फटकाऱ्यानें तोडून तें कौरवसैन्याच्या समोर भिरकावून दिलें. आपण समर्थ शिष्य पहात असतां द्रोणाचार्यांच्या जवळूनच शस्त्रास्त्रविद्येचें शिक्षण घेतलेल्या त्यांच्या एका शिष्यानें इतक्या क्रूरपणें त्यांचा वध केला या जाणिवेनें अर्जुनाचें अंतःकरण करपून गेलें. आपण गुरुवधाला पर्यायानें कारण आहोंत असें वाटून तो अत्यंत शोकमग्न झाला व द्रोणवधानंतर क्रुद्ध झालेल्या अश्वत्थाम्यानें नारायणास्त्राचा प्रयोग केल्यानंतर त्याच्या प्रभावानें पांडवांच्या सैन्याचा नाश होऊं लागलेला पाहून युधिष्ठिरानें जेव्हां अर्जुनाला द्रोणवधानें घाबरलेल्या कुरुसैन्याला कोण नेता मिळाला म्हणून विचारलें तेव्हां त्याला उत्तर देतांना अर्जुनाचा हा सर्व शोक खळाळून बाहेर पडला. तो म्हणाला:—

**उद्यम्यात्मानमुग्राय कर्मणे वीर्यमास्थिताः ।। २६**
**धमन्ति कौरवाः शङ्खान्यस्य वीर्यं समाश्रिताः ।**
**यत्र ते संशयो राजन् न्यस्तशस्त्रे गुरौ हते ।। २७**

धार्तराष्ट्रानवस्थाप्य क एष नदतीति हि ।
ह्रीमन्तं तं महाबाहुं मत्तद्विरदगामिनम् ॥ २८
वाघ्रास्यमुग्रकर्माणं कुरूणामभयंकरम् ।
यस्मिञ्जाते ददौ द्रोणो गवां दशशतं धनम् ॥ २९
ब्राह्मणेभ्यो महार्हेभ्यः सोऽश्वत्थामैष गर्जति ।
जातमात्रेण वीरेण येनोच्चैःश्रवसा यथा ॥ ३०
ह्रेषता कम्पिता भूमिर्लोकाश्च सकलास्त्रयः ।
तच्छ्रुत्वान्तर्हितं भूतं नाम तस्याकरोत्तदा ॥ ३१
अश्वत्थामेति सोऽद्यैष शूरो नदति पाण्डव ।
यो ह्यनाथ इवाक्रम्य पार्षतेन हतस्तथा ॥ ३२
कर्मणा सुनृशंसेन तस्य नाथो व्यवस्थितः ।
गुरुं मे यत्र पाञ्चाल्यः केशपक्षे परामृशत् ॥ ३३
तन्न जातु क्षमेद् द्रौणिर्जानन् पौरुषमात्मनः ।
उपचीर्णो गुरुर्मिथ्या भवता राज्यकारणात् ॥ ३४
धर्मज्ञेन सता नाम सोऽधर्मः सुमहान् कृतः ।
चिरं स्थास्यति चाकीर्तिस्त्रैलोक्ये सचराचरे ॥ ३५
रामे वालिवधाद् यद्वदेवं द्रोणे निपातिते ।
सर्वधर्मोपपन्नोऽयं स मे शिष्यश्च पाण्डवः ॥ ३६
नायं वदति मिथ्येति प्रत्ययं कृतवांस्त्वयि ।
स सत्यकञ्चुकं नाम प्रविष्टेन ततोऽनृतम् ॥ ३७
आचार्य उक्तो भवता हतः कुञ्जर इत्युत ।
ततः शस्त्रं समुत्सृज्य निर्ममो गतचेतनः ॥ ३८
आसीत्सुविह्वलो राजन् यथा दृष्टस्त्वया विभुः ।
स तु शोकसमाविष्टो विमुखः पुत्रवत्सलः ॥ ३९
शाश्वतं धर्ममुत्सृज्य गुरुः शस्त्रेण घातितः ।
न्यस्तशस्त्रमधर्मेण घातयित्वा गुरुं भवान् ॥ ४०
रक्षत्विदानीं सामात्यो यदि शक्तोऽसि पार्षतम् ।
ग्रस्तमाचार्यपुत्रेण क्रुद्धेन हतबन्धुना ॥ ४१
सर्वे वयं परित्रातुं न शक्ष्यामोऽद्य पार्षतम् ।
सौहार्दं सर्वभूतेषु यः करोत्यतिमानुषः ॥ ४२
सोऽद्य केशग्रहं श्रुत्वा पितुर्धक्ष्यति नो रणे ।
विक्रोशमाने हि मयि भृशमाचार्यगृद्धिनि ॥ ४३

अपाकीर्य स्वयं धर्मं शिष्येण निहतो गुरुः ।
यदा गतं वयो भूयः शिष्टमल्पतरं च नः ।। ४४
तस्येदानीं विकारोऽयमधर्मोऽयं कृतो महान् ।
पितेव नित्यं सौहार्दात्पितेव हि च धर्मतः ।। ४५
सोल्पकालस्य राज्यस्य कारणाद् घातितो गुरुः ।
धृतराष्ट्रेण भीष्माय द्रोणाय च विशाम्पते ।।
विसृष्टा पृथिवी सर्वा सह पुत्रैश्च तत्परैः ।। ४६
संप्राप्य तादृशीं वृत्तिं सत्कृतः सततं परैः ।
अवृणीत सदा पुत्रान् मामेवाभ्यधिकं गुरुः ।। ४७
अवेक्षमाणस्त्वां मां च न्यस्तास्त्रश्चाहवे हतः ।
न त्वेनं युध्यमानं वै हन्यादपि शतक्रतुः ।। ४८
तस्याचार्यस्य वृद्धस्य द्रोहो नित्योपकारिणः ।
कृतो ह्यनार्यैरस्माभिः राज्यार्थे लुब्धबुद्धिभिः ।। ४९
अहो बत महत्पापं कृतं कर्म सुदारुणम् ।
यद्राज्यसुखलोभेन द्रोणोऽयं साधु घातितः ।। ५०
पुत्रान् भ्रातॄन् पितॄन् दाराञ्जीवितं चैव वासविः ।
त्यजेत्सर्वं मम प्रेम्णा जानात्येवं हि मे गुरुः ।। ५१
स मया राज्यकामेन हन्यमानो ह्युपेक्षितः ।
तस्मादर्वाक्शिरा राजन् प्राप्तोऽस्मि नरकं प्रभो ।। ५२
ब्राह्मणं वृद्धमाचार्यं न्यस्तशस्त्रं महामुनिम् ।
घातयित्वाद्य राज्यार्थे मृतं श्रेयो न जीवितम् ।। ५३

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय १९६

" ज्याच्या पराक्रमाच्या भरंवशावर आतांच्या विकल स्थितींतहि उग्रकर्मासाठीं स्वतःचें अंतःकरण सिद्ध करून पराक्रमाच्या स्फूर्तीनें कौरव शंख फुंकीत आहेत, न्यस्तशस्त्र स्थितींत आचार्यांचा वध केल्यानंतर घाबरलेल्या कौरवांना स्थिर करून जो हा सिंहनाद करीत आहे त्या महाबाहू, मत्त गजेंद्राप्रमाणें गति असलेल्या, जबडा वासलेल्या वाघाप्रमाणें भयंकर, उग्रकर्में करणाऱ्या व कौरवांना अभयप्रदान करणाऱ्या रणपण्डिताला तुम्ही ओळखलें नाहीं काय? ज्याच्या जन्माबरोबर आचार्य द्रोणांनीं ब्राह्मणांना एक सहस्र गाईंचें प्रदान केलें तो हा अश्वत्थामा गर्जना करीत आहे.

ज्यानें जन्मतांच उच्चैःश्रव्याप्रमाणें गर्जना केल्यामुळें आकाशवाणीनें ज्याचें नांवच अश्वत्थामा असें ठेविलें तो हा शूर अश्वत्थामा गर्जना करीत आहे. ज्याला अनाथाप्रमाणें आक्रमण करून धृष्टद्युम्नांकडून तुम्ही ठार मारविलें त्याचा हा नाथ सज्ज होऊन तुमच्यावर चालून आला आहे. अत्यंत क्रूरतापूर्वक तुम्ही माझ्या गुरूला ठार मारलें. तुम्ही नृशंसपणानें जें अकार्य केलें त्याचें फळ देण्यासाठीं अश्वत्थामा गर्जना करीत आहे. या पंचाल राजपुत्रानें माझ्या गुरूला केस धरून ओढलें. स्वतःच्या पौरुषाची पूर्णपणें कल्पना असलेला द्रोणपुत्र ही गोष्ट कधींही सहन करणार नाहीं. आपण राज्यासाठीं प्रत्यक्ष स्वतःच्या गुरूशीं खोटेपणाचें वर्तन करून त्यांना फसविलें आहे. धर्मज्ञ असूनही लोभासाठीं आपण भयानक स्वरूपाचा अधर्म केला आहे. वालीच्या वधामुळें रामाची अपकीर्ति जशी त्रैलोक्यांत चिरकाल स्थिर राहिली त्याचप्रमाणें द्रोणाचार्यांना मारून आपणही सदाच्या अपकीर्तीचे धनी होऊन राहिलां आहांत. हा पांडव सर्व प्रकारें धार्मिक असून शिवाय माझा शिष्यही आहे, हा कधींही खोटें बोलणार नाहीं अशा विश्वासानें आचार्यांनीं तुम्हांला विचारलें. पण तुम्ही सत्याचें नुसतें पांघरूण घेऊन खोटयाचा आश्रय केलात. मारलांत तुम्ही हत्ती व सांगितलें मात्र आचार्यांना अश्वत्थामा मेला म्हणून! प्रत्यक्ष गुरूशीं तुम्हीं खोटें बोलला. गुरूच्या अंतःकरणाला तुम्ही केवढें दुःख दिलें हें तुम्ही स्वतः अनुभविलेंच आहे. तुमच्या साक्षीवर विश्वास ठेवून महानुभाव आचार्य शस्त्र खालीं ठेवून अत्यंत विव्हल स्थितींत निर्मम व गतचेतन झाले. शोकानें व्याकूळ झालेले आचार्य, पुत्रावर त्यांचें अतिशय प्रेम असल्यामुळें रणविन्मुख झाले. हातीं हत्यार असतांना आचार्यांवर एकाचीही चढाई करण्याची शक्ति नव्हती. मग मात्र तुमचें शौर्य जागृत झालें! शाश्वत धर्माचा परित्याग करून शस्त्रानें तुम्ही गुरूचाच घात केलात. न्यस्तशस्त्र गुरूचा अधर्मानें घात करणारे तुम्ही आतां क्रुद्ध झालेल्या आचार्यपुत्रानें ग्रासलेल्या गुरुघातक धृष्टद्युम्नाचें आपल्या अमात्यासहित स्वतःच्या सामर्थ्याच्या भरंवशावर खुशाल संरक्षण करावें. या गुरु-

घातकाचें संरक्षण करण्याची आमची शक्ति नाहीं. जो सर्व लोकांच्यावर अंगीं अतिमानवी शक्ति असतांना देखील प्रेम करीत असे, तो आज आपल्या पित्याच्या केशग्रहणाची वार्ता ऐकून रणांत आपल्यास जाळून टाकील. काय आश्चर्य आहे ! आचार्याविषयीं कृतज्ञता बाळगून त्यांना मारूं नका म्हणून मी जोरजोरानें ओरडत असतां धर्म बाजूला ढकलून शिष्यानें प्रत्यक्ष गुरूचीच हत्या केली आहे ! आपलें बहुतेक वय गेल्यावर व अतिशय थोडें आयुष्य उरल्यावर आपली बुद्धि चळली व आपण महान् अधर्म केलांत. सौहार्द व धर्म या दोन्ही दृष्टींनीं जो आपला पिता होता त्याला अस्थिर व चंचल राज्याच्या लोभासाठीं ठार मारून आपण जगाच्या दृष्टीनें गुरुघातक ठरलों. धृतराष्ट्रानें भीष्म व द्रोण यांच्या पायावर सर्व पृथ्वी समर्पण करून आपलीं मुलें त्यांच्या स्वाधीन केलीं. तींही तत्परतेनें त्यांची सेवा करीत. असें सन्मानाचें ऐश्वर्य व सतत सत्कार मिळत असतांही त्यांच्यापेक्षां तर काय, पण स्वतःच्या पुत्रापेक्षांही आचार्यांनीं माझ्यावरच अधिक प्रेम केलें. पण मी त्यांना त्याचें काय फळ दिलें ? शस्त्र खालीं ठेवल्यानंतर माझ्याकडे व आपणांकडे आचार्य पहात होते. पण आपण त्यांना न वांचवितां त्यांचा वध होऊं दिला. हे महाराज ! आपल्यामागें नव्हे, आपल्यासमोर, आपल्या संमतीनें हा वध झाला आहे. हातांत शस्त्र धरून आचार्य युद्ध करीत असतां त्यांना मारण्याचें सामर्थ्य देवेन्द्रांत तरी होतें काय ? त्या आपल्या वृद्ध, नेहमीं आपल्यावर उपकार करणाऱ्या अशा गुरूचा राज्यलोभानें बुद्धि भ्रष्ट झालेल्या आम्ही अनार्यांनीं द्रोह केला आहे. केवढें भयानक पाप आम्ही केलें ! केवढें दारुण कर्म आमच्या हातून घडलें आहे ! ! राज्यासाठीं गुरूचा वध करणाऱ्या आमची धन्यच म्हटली पाहिजे! हा अर्जुन माझ्यावरील प्रेमानें आपले पुत्र, बंधु, पूर्वज, स्त्रिया इतकेंच काय पण जीवित देखील टाकील अशी आचार्यांना माझ्याविषयीं खात्री वाटत होती. पण राज्यलोभानें मी प्रत्यक्ष त्या गुरूचा वध होत असतांना देखील त्या गोष्टीची उपेक्षा केली. हे महाराज ! खालीं मस्तक लोंबत असलेल्या स्थितींत मी निश्चित नरकांत जाणार आहें. अप्रत्यक्ष रीतीनें द्रोणांच्या वधाला

कारणीभूत होऊन कोणतें पाप करावयाचें मी शिल्लक ठेवलें आहे! ब्राह्मण, वृद्ध, आचार्य, न्यस्तशस्त्र व महामुनि अशांना राज्यासाठीं ठार मारून निलाजरें जीवन जगण्यापेक्षां मृत्यु अनंतपटीनीं श्रेष्ठ आहे."

## अर्जुनाचें शील

गुरुवत्सल पार्थ महान् शीलधन होता. शीलासाठीं त्यानें कठोरांतला कठोर शापदेखील सहन केला, पण आपलें चारित्र्य भ्रष्ट होऊं दिलें नाहीं. पराक्रमांत त्याच्याशीं स्पर्धा करूं इच्छिणारे कर्णासारखे लोक त्याच्या पराक्रमासमोर तर हीनतेज होतेच, पण त्याच्या देदीप्यमान अशा चारित्र्यासमोर ते अधिकच हीन भासतात. वैयक्तिक सूड म्हणून कुलस्त्रीची विटंबना करावयास प्रवृत्त होणाऱ्या लोकांची अर्जुनाशीं तुलना तरी करतां येईल काय? अर्जुनाच्या शीलसंपन्नतेची कसोटी पहाणारे दोन प्रसंग महाभारतांत वर्णन केले आहेत. एक प्रसंग वनपर्वांत असून दुसरा विराटपर्वांत आहे. ज्येष्ठ बंधूंच्या आज्ञेवरून अर्जुनानें भगवान् महादेवांना प्रसन्न करून घेऊन पाशुपतास्त्र संपादन केल्यानंतर इतर देवतांच्या जवळून त्या त्या दिव्य अस्त्रांचें ज्ञान मिळविण्याच्या इच्छेनें आपला पिता जो महेन्द्र त्याच्याबरोबर अर्जुन कांहीं वर्षें देवलोकांत राहिला. महेन्द्राच्या आज्ञेवरून सर्व देवांनीं अर्जुनाचें मोठें स्वागत केलें व त्यांच्याजवळून प्रयोग नि उपसंहारासहित अर्जुनानें महास्त्रें संपादन केलीं. नंतर चित्रसेन गंधर्वाजवळ त्यानें नृत्य व गायन शिकावें अशी इंद्रानें इच्छा प्रदर्शित केली. महास्त्रें संपादन केल्यानंतर शक्य तितक्या लवकर आपल्या बंधूंच्याकडे जावें असें अर्जुनाला वाटत होतें. वारंवार होणाऱ्या बंधूंच्या आठवणीनें स्वर्गसुखांत त्याला काडीचीही गोडी वाटेना. पण इंद्राची आज्ञा त्याला डावलतां येणें शक्य झालें नाहीं. शेवटीं तो नृत्यगायन शिकला. अर्जुनाचें औदासीन्य इंद्राच्या लक्षांत आलें. पण त्याचें कारण कांहीं त्याच्या ध्यानांत आलें नाहीं. कदाचित् त्याच्या सुखोपभोगांत कांहीं न्यून असेल अशा कल्पनेनें महेन्द्र त्याच्याकडे अधिक लक्ष देऊं लागला.

एके दिवशीं स्वर्गीय नृत्यपीठावर उर्वशीचें नृत्य चालू असतां अर्जुनाचें लक्ष तिच्यावर खिळून राहिल्याचा इंद्राला भास झाला व त्याला अर्जुनाच्या औदासीन्याचें हेंच कारण असावें असें वाटून त्यानें चित्रसेन गंधर्वाला बोलावून उर्वशीला अर्जुनाकडे पाठवावयास सांगितलें. उर्वशीला ज्या वेळीं चित्रसेनानें महेन्द्राची आज्ञा कळविली, त्या वेळीं तिला अत्यंत आनंद झाला. कारण अर्जुनाची अभिलाषा तिच्या अंतःकरणांत यापूर्वींच उत्पन्न झाली होती. रात्रींच्या चंद्रप्रकाशांत स्नान केल्यामुळें अधिकच सुंदर दिसणारी व स्वर्गीय सौंदर्याचा अत्यंत श्रेष्ठ आविष्कार असलेली सर्वाभरणभूषित उर्वशी अर्जुनाच्या महालांत आली. उर्वशीच्या सौंदर्याचें काय वर्णन करावें ! नारायणाच्या ऊरूपासून जन्म पावलेली ती सौंदर्यदेवता जगत्स्रष्टयाच्या सौंदर्यनिर्मितीच्या सामर्थ्याचें महान् प्रतीकच होती. नारायणाला तपोभ्रष्ट करण्यासाठीं आलेल्या स्वर्गीय अप्सरांचा सौंदर्यमद जिरविण्यासाठींच नारायणांनीं जिला उत्पन्न केलें, स्वर्गाचें सदाचें आभूषण म्हणूनच नारायणांनीं जिला प्रसाद म्हणून महेन्द्राच्या स्वाधीन केलें, जिच्या पृथ्वीवरील अल्पकालीन वास्तव्यांतच तिच्या विरहामुळें महेन्द्राला स्वर्गातील सौंदर्य स्मशानाप्रमाणें वाटूं लागलें, राजा पुरूरवा जिच्यापायीं राज्यत्याग करून अरण्यांत भटकत फिरला, त्या लावण्याच्या अलौकिक सम्राज्ञीचें लावण्यवैभव काय वर्णावें ? ती अर्जुनाच्या दाराशीं येतांच सेवकांनीं अर्जुनाला ती आल्याची वर्दी दिली. मध्यरात्रींच्या चंद्रप्रकाशांत उर्वशी आपणाकडे आल्याचें पहातांच अर्जुन चांगलाच गोंधळला. ती सौंदर्यदेवता आपणाकडे कशाला आली असावी हें त्याला कळेना. महाभारतकार या सर्व प्रकाराचें वर्णन करतांना म्हणतात :—

**उपातिष्ठत तद्वेश्म निर्मलं सुमनोहरम् ।**
**स शङ्कितमना राजन् प्रत्युद्गच्छत तां निशि ।। १८**
**दृष्ट्वैव चोर्वशीं पार्थो लज्जासंवृतलोचनः ।**
**तदाभिवादनं कृत्वा गुरुपूजां प्रयुक्तवान् ।। १९**

अर्जुन उवाच ।

अभिवादये त्वां शिरसा प्रवराप्सरसां वरे ।
किमाज्ञापयसे देवि प्रेष्यस्तेहमुपस्थितः ॥ २०
फाल्गुनस्य वचः श्रुत्वा गतसंज्ञा तदोर्वशी ।
गन्धर्ववचनं सर्वं श्रावयामास तं तदा ॥ २१

उर्वश्युवाच ।

यथा मे चित्रसेनेन कथितं मनुजोत्तम ।
तत्तेऽहं संप्रवक्ष्यामि यथा चाहमिहागता ॥ २२
उपस्थाने महेन्द्रस्य वर्तमाने मनोरमे ।
तवागमनतो वृत्ते स्वर्गस्य परमोत्सवे ॥ २३
रुद्राणां चैव सान्निध्यमादित्यानां च सर्वशः ।
समागमेऽश्विनोश्चैव वसूनां च नरोत्तम ॥ २४
महर्षीणां च संघेषु राजर्षिप्रवरेषु च ।
सिद्धाचरणयक्षेषु महोरगगणेषु च ॥ २५
उपविष्टेषु सर्वेषु स्थानमानप्रभावतः ।
ऋद्ध्या प्रज्वलमानेषु अग्निसोमार्कवर्ष्मसु ॥ २६
वीणासु वाद्यमानासु गन्धर्वैः शक्रनन्दन ।
दिव्ये मनोरमे गेये प्रवृत्ते पृथुलोचन ॥ २७
सर्वाप्सरःसु मुख्यासु प्रनृत्तासु कुरूद्वह ।
त्वं किलानिमिषः पार्थ मामेकां तत्र दृष्टवान् ॥ २८
तत्र चावभृथे तस्मिन्नुपस्थाने दिवौकसाम् ।
तव पित्राभ्यनुज्ञाता गताः स्वं स्वं गृहं सुराः ॥ २९
तथैवाप्सरसः सर्वा विशिष्टाः स्वगृहं गताः ।
अपि चान्याश्च शत्रुघ्न तव पित्रा विसर्जिताः ॥ ३०
ततः शक्रेण संदिष्टश्चित्रसेनो ममान्तिकम् ।
प्राप्तः कमलपत्राक्ष स च मामब्रवीदथ ॥ ३१
त्वत्कृतेऽहं सुरेशेन प्रेषितो वरवर्णिनि ।
प्रियं कुरु महेन्द्रस्य मम चैवात्मनश्च ह ॥ ३२
शक्रतुल्यं रणे शूरं सदौदार्यगुणान्वितम् ।
पार्थं प्रार्थय सुश्रोणि त्वमित्येवं तदाब्रवीत् ॥ ३३
ततोऽहं समनुज्ञाता तेन पित्रा च तेऽनघ ।
तवान्तिकमनुप्राप्ता शुश्रूषितुमरिंदम ॥ ३४
त्वद्गुणाकृष्टचित्ताहमनङ्गवशमागता ।
चिराभिलषितो वीर ममाप्येष मनोरथः ॥ ३५

वैशंपायन उवाच ।

तां तथा ब्रुवतीं श्रुत्वा भृशं लज्जावृतोऽर्जुनः ।
उवाच कर्णौ हस्ताभ्यां पिधाय त्रिदशालये ॥ ३६
दुःश्रुतं मेस्तु सुभगे यन्मां वदसि भाविनि ।
गुरुदारैः समाना मे निश्चयेन वरानने ॥ ३७
यथा कुन्ती महाभागा यथेन्द्राणी शची मम ।
तथा त्वमपि कल्याणी नात्र कार्या विचारणा ॥ ३८
यच्चेक्षितासि विस्पष्टं विशेषेण मया शुभे ।
तच्च कारणपूर्वं हि शृणु सत्यं शुचिस्मिते ॥ ३९
इयं पौरववंशस्य जननी मुदितेति ह ।
त्वामहं दृष्टवांस्तत्र विज्ञायोत्फुल्ललोचनः ॥ ४०
न मामर्हसि कल्याणि अन्यथा ध्यातुमप्सरः ।
गुरोर्गुरुतरा मे त्वं मम त्वं वंशवर्धिनी ॥ ४१

उर्वश्युवाच ।

अनावृताश्च सर्वाः स्म देवराजाभिनन्दन ।
गुरुस्थाने न मां वीर नियोक्तुं त्वमिहार्हसि ॥ ४२
पुरोर्वंशे हि मे पुत्रा नप्तारो वा त्विहागताः ।
तपसा रमयन्त्यस्मान्न च तेषां व्यतिक्रमः ॥ ४३
तत्प्रसीद न मामार्तां विसर्जयितुमर्हसि ।
हृच्छयेन च संतप्तां भक्तां च भज मानद ॥ ४४

अर्जुन उवाच ।

शृणु सत्यं वरारोहे यत्त्वां वक्ष्याम्यनिन्दिते ।
शृण्वन्तु मे दिशश्चैव विदिशश्च सदेवताः ॥ ४५
यथा कुन्ती च माद्री च शची चैव ममानघे ।
तथा च वंशजननी त्वं हि मेद्य गरीयसी ॥ ४६
गच्छ मूर्ध्ना प्रपन्नोऽस्मि पादौ ते वरवर्णिनि ।
त्वं हि मे मातृवत् पूज्या रक्ष्योऽहं पुत्रवत्त्वया ॥ ४७

वैशंपायन उवाच ।

एवमुक्ता तु पार्थेन उर्वशी क्रोधमूर्च्छिता ।
वेपन्ती भ्रुकुटीवक्रा शशापाथ धनञ्जयम् ॥ ४८

उर्वश्युवाच ।

तव पित्राभ्यनुज्ञातां स्वयं च गृहमागताम् ।
यस्मान्मां नाभिनन्देथाः कामबाणवशं गताम् ।। ४९
तस्मात्त्वं नर्तनः पार्थ स्त्रीमध्ये मानवर्जितः ।
अपुमानिति विख्यातः षण्ढवद् विचरिष्यसि ।। ५०
एवं दत्वार्जुने शापं स्फुरदोष्ठी श्वसन्त्यथ ।
पुनः प्रत्यागता क्षिप्रमुर्वशी गृहमात्मनः ।। ५१

—महाभारत, वनपर्व अ. ४६

"उर्वशी आपल्या मंदिरांत आल्याचें ऐकतांच अर्जुनाच्या अंतःकरणांत शंका उत्पन्न झाली. त्यानें ताबडतोब तिची भेट घेतली. उर्वशीला पहातांच लज्जेनें व संकोचानें पार्थानें आपले नेत्र खालीं वळविले. त्यानें तिला अभिवादन केलें व गुरूची करावी तशी तिची पूजा करून पार्थ तिला म्हणाला, 'हे सर्वश्रेष्ठ अप्सरे! मी तुला साष्टांग नमस्कार करतों. हे देवि! तुझी काय आज्ञा आहे? मी आज्ञांकित सेवक म्हणून तुझ्यासमोर उभा आहे. काय आज्ञा आहे ती मला सांग.' पार्थाच्या तोंडून हें वाक्य ऐकतांच उर्वशी थिजूनच गेली. तिला कांहीं सुचेचना. चित्रसेनानें तिला जी कल्पना दिली होती, त्यावरून या गोष्टीची अर्जुनाकडून तिनें कधीं अपेक्षाच केली नव्हती. शेवटीं रसभंग होऊन चित्रसेनानें सांगितलेलें ती अर्जुनाला सांगू लागली. ती म्हणाली, 'हे नरश्रेष्ठा! चित्रसेनाच्या सांगण्यावरून मी येथें आलें आहें. त्यानें जें मला सांगितलें तें मी तुला सांगतें. तुझ्या येण्याबद्दल महेन्द्राच्या देवसभेंत मोठा उत्सव चालू असतां त्या ठिकाणीं एकादश रुद्र, द्वादश आदित्य, अष्ट वसु, अश्विनीकुमार, महर्षि, श्रेष्ठ राजर्षि यांचे संघ, सिद्ध, चारण, गंधर्व, यक्ष यांचे संघ, आपआपल्या स्थानावर उपस्थित असतां व सूर्य, चंद्र आणि अग्नि आपल्या संपूर्ण वैभवानें तळपत असतां नृत्य व गायन सुरू होतें. गंधर्व वीणा वाजवीत होते. दिव्य गायन चालू होतें व मुख्य मुख्य अप्सरा नृत्य करीत होत्या. अशा वेळीं तुझी दृष्टि पापणीदेखील न हालवितां एकसारखी माझ्यावरच खिळून राहिली होती. सभेचें काम संपून सर्व लोक आपापल्या स्थानीं निघून गेल्यानंतर महेन्द्रानें

चित्रसेन गंधर्वाकडून मला कांहीं आज्ञा कळविली. चित्रसेनानें मला असें सांगितलें कीं, महेन्द्रानेंच मला तुझ्याकडे पाठविलें असून तूं त्याचें, माझें व स्वतःचेंही प्रिय कर. हे सुन्दरी, सर्व श्रेष्ठ गुणांनीं सदैव युक्त असणाऱ्या व रणांत महेन्द्राप्रमाणें शूर असलेल्या पार्थाची प्रार्थना करून त्याला आनंद दे. मी तुझ्या पित्याच्या व चित्रसेनाच्या आज्ञेप्रमाणें तुझी सेवा करावयास्तव येथें आलें आहे. पण केवळ त्यांची आज्ञा म्हणूनच मी येथें आलें असें मात्र नाहीं. तुझ्या गुणांनीं चित्त आकृष्ट होऊन मी मदनाच्या स्वाधीन झालें. फार दिवसांपासून तुझ्या प्राप्तीचा मनोरथ मी माझ्या अंतःकरणांत बाळगला होता. तो पूर्ण होण्याचा शुभक्षण आज उगवला आहे. तिचें तें भाषण ऐकतांच लाजेनें व संकोचानें अर्जुन अगदीं थिजून गेला. दोन्ही हातांनीं आपले कान झाकून घेत तो म्हणाला, 'हे देवि, तुझीं वाक्यें ऐकत असतां माझ्या कानांना अतिशय दुःख होत आहे. तूं माझ्या गुरुपत्नीप्रमाणें आहेस, याचा तूं यत्किंचित् तरी विचार केला आहेस काय ? माझी माता महाभागा कुंती अथवा माझी येथील माता महेन्द्रपत्नी शची यांच्याप्रमाणेंच मी तुलाही माझी तिसरी माताच समजतों. वेगळा विचारच तुझ्याविषयीं माझ्या मनांत येत नाहीं. मी तुझ्याकडे अनिमिष नेत्रांनीं पाहिल्याचा अकारण अपसमज पसरला आहे. सत्य तेंच मी तुला सांगतों. तुला पहातांच आमचे पूर्वज सम्राट पुरूरवा यांची ही पत्नी व आमच्या पौरव वंशाला जन्म देणारी ही आमची आदिमाता म्हणून आनंदानें माझे डोळे विस्फारले गेले; व मातेच्या स्वरूपावर बालकाचे डोळे खिळून रहावे त्याप्रमाणें ते खिळून राहिले. माझ्या मनांत दुसरा कोणता विचार आला असेल अशी तूं कल्पना देखील करूं नकोस. आमचा वंश वाढविणारी तूं मला मान्य असणाऱ्या सर्व व्यक्तींच्या पेक्षांही श्रेष्ठ आहेस. हें ऐकतांच उर्वशी त्याला म्हणाली, 'अर्जुना ! उगाच मला आपल्या गुरुस्थानीं तूं बसवूं नकोस. तूं देवराज इंद्राचा पाहुणा आहेस व अप्सरा ह्या पाहुण्यांच्या उपभोग्य असतात. त्या नेहमीं अनावृत असतात. तुमच्या मानवी सृष्टींतील नातीं येथें स्वर्गांत आणण्याचें कारण नाहीं. पुरूच्या वंशांत उत्पन्न झालेले.

त्याचे पुत्र व नातू इत्यादि जे जे लोक तपाचरण करून स्वर्गांत आले त्या सर्वांनीं आम्हांला रमविलें आहे. आमचा उपभोग घेतला आहे. त्यांत त्यांना कसलेंही पाप लागलेलें नाहीं; मी आर्त आहे, मदनबाणानें संतप्त व घायाळ झालेली आहे, व तुझ्यावर मी अत्यंत अनुरक्त आहे. तरी माझ्यावर प्रसन्न हो. माझा त्याग करणें तुला शोभणार नाहीं. माझी इच्छा पूर्ण कर. त्याबरोबर अर्जुन म्हणाला, हे वरारोहे! मी तुला पुनश्च सांगतों तें नीट ऐक. हे दिशा व विदिशांच्या अभिमानी देवतांनो! मी जें बोलत आहे तें नीट ऐका. ज्याप्रमाणें कुंती, माद्री व शची या माझ्या माता मला वंद्य आहेत, त्याचप्रमाणें आमच्या वंशाची जननी असलेली उर्वशी ही माता म्हणून मला वंद्य आहे. हे माते, मी तुझ्या पायावर आपलें मस्तक ठेवतों. मी तुला शरण आहे. तूं मला मातेप्रमाणें पूज्य आहेस. पुत्राप्रमाणेंच तूं माझें रक्षण केलें पाहिजे. पार्थानें याप्रमाणें मनोभंग करतांच उर्वशी क्रोधानें भान विसरली. तिला अतीव दुःख झालें व भृकुटि वक्र करून तिनें अर्जुनाला शाप दिला. ती म्हणाली, तुझ्या पित्यानें अनुज्ञा दिलेल्या, मदनाच्या आधीन झालेल्या, व स्वतः होऊन तुझ्या घरीं चालत आलेल्या मला तूं झिडकारून टाकतोस त्या अर्थीं हे पार्था, तूं यापुढें षंढ होऊन मानवर्जित अवस्थेंत एक नर्तक म्हणून स्त्रियांच्यामध्यें राहशील! हा शाप देऊनही उर्वशीचा राग गेला नाहीं. ती उसासे टाकीत होती व तिचे ओठ थरथरां कांपत होते. खिन्न मनानें ती आपल्या घरीं परत गेली." हा शाप ऐकतांच अर्जुनानें ताबडतोब गंधर्व चित्रसेनाची भेट घेतली व त्याला सर्व वृत्त सांगून आपल्यावरील संकटाची कल्पना दिली. चित्रसेनानें ती गोष्ट महेन्द्राच्या कानावर घातली. भाग्यशाली व्यक्तीवर आलेलीं संकटें हीं अखेरीस त्या व्यक्तीचें कल्याणच करीत असतात. महेन्द्रानें अर्जुनाला एकांतांत बोलावून आपल्या सामर्थ्यानें उर्वशीचा तो शाप केवळ एक वर्षाचा करून हा शाप पुढें अज्ञातवासांत तुमच्या उपयोगीच पडेल असें सांगितलें. पुढें बृहन्नला वेषानें अर्जुनाला या शापाचा उपयोग करून घेतां आला. महाभारतकारांनीं अर्जुनाच्या या देदीप्यमान चारित्र्यानें प्रभावित

होऊन त्याच्या जीवनांतील या महनीय प्रसंगाचें महत्त्व असें सांगितलें आहे कीं:–

इदं यः शृणुयाद् वृत्तं नित्यं पाण्डुसुतस्य वै ।
न तस्य कामः कामेषु पापकेषु प्रवर्तते ॥ ६२

—महाभारत, वनपर्व अध्याय ४६

"जो कोणी अर्जुनाच्या जीवनांतील हा प्रसंग वारंवार ऐकेल, त्याला पापकर्म करण्याबद्दल कधीं इच्छाच होणार नाहीं." अर्जुनाच्या आयुष्यांतील त्याचें चारित्र्य कसाला लागण्याचा दुसरा प्रसंग अज्ञातवासानंतर राजा विराटाच्या राजनगरींत आलेला आहे. पांडव अज्ञातवासांत एक वर्ष सेवक म्हणून आपल्या घरीं राहिले, या गोष्टीचा विराटाला इतका संकोच वाटत होता कीं, कांहींही करून त्यांचा व आपला विशेष संबंध जुळवावा असें त्याच्या मनानें घेतलें. त्यानें युधिष्ठिराला विनविलें कीं, मी अर्जुनाला माझी कन्या उत्तरा देतों. पत्नी म्हणून त्यानें तिचा स्वीकार करावा अशी माझी इच्छा आहे. युधिष्ठिरांनीं अर्जुनाकडे पाहिलें, त्याबरोबर अर्जुनानें विराटाला असें सांगितलें कीं,

प्रतिगृह्णाम्यहं राजन् स्नुषां दुहितरं तव ।
युक्तश्चावां हि सम्बन्धो मत्स्यभारतयोरपि ॥ ३६

—महाभारत, विराटपर्व अध्याय ७१

"हे राजन्, मत्स्य आणि भारत या दोन राजवंशांचा एकमेकांशीं नात्याचा संबंध यावा असें मलाही वाटतें म्हणून मी तुझ्या कन्येचा सून म्हणून स्वीकार करतों." अर्जुनाचें हें उत्तर ऐकतांच विराटाला मोठें आश्चर्य वाटून तो म्हणाला: "मी तुला माझी कन्या पत्नी म्हणून द्यावयास सिद्ध असतां सून म्हणून तिचा स्वीकार करावयाचें कारण काय?" त्यावर अर्जुनानें जें उत्तर दिलें तें शिक्षणक्षेत्रांतील व्यक्तींनीं आजही आपल्या अंतःकरणाच्या फलकावर कोरून ठेवण्यासारखें आहे. अर्जुन म्हणाला:–

अन्तःपुरेऽहमुषितः सदा पश्यन् सुतां तव ।
रहस्यं च प्रकाशं च विश्वस्तां पितृवन्मयि ॥ २
प्रियो बहुतमश्चासं नर्तको गीतकोविदः ।
आचार्यवच्च मां नित्यं मन्यते दुहिता तव ॥ ३

वयस्थया तया राजन् सह संवत्सरोषितः ।
अतिशङ्का भवेत् स्थाने तव लोकस्य वा विभो ॥ ४
तस्मान्निमंत्रयेऽयं ते दुहितां मनुजाधिप ।
शुद्धो जितेन्द्रियो दान्तस्तस्याः शुद्धिः कृता मया ॥ ५
स्नुषायां दुहितुर्वापि पुत्रे चात्मनि वा पुनः ।
अत्र शङ्कां न पश्यामि तेन शुद्धिर्भविष्यति ॥ ६
अभिशापादहं भीतो मिथ्यावादात्परंतप ।
स्नुषार्थमुत्तरां राजन् प्रतिगृह्णामि ते सुताम् ॥ ७
स्वस्रीयो वासुदेवस्य साक्षाद् देवशिशुर्यथा ।
दयितश्चक्रहस्तस्य सर्वास्त्रेषु च कोविदः ॥ ८
अभिमन्युर्महाबाहुः पुत्रो मम विशाम्पते ।
जामाता तव युक्तो वै भर्ता च दुहितुस्तव ॥ ९

—महाभारत, विराटपर्व अध्याय ७२

"हे राजा, मी तुझ्या मुलीबरोबर अंतःपुरांत राहिलों. सतत मी तिला पहात आलों. एकांतांत व लोकांतांत तिचे माझे संबंध आले. पित्यावर ठेवावा असा तिनें माझ्यावर विश्वास ठेवला. कुशल नर्तक व निष्णात गायक म्हणून मी तिला अत्यंत मान्य व प्रिय होतों. गुरूच्या नात्यानें तुझी कन्या मला पहात आली. वयांत आलेल्या तुझ्या मुलीबरोबर मी संपूर्ण एक वर्ष घालविल्यानंतर व आतां मी षंढ नसून अर्जुन आहे ही गोष्ट कळल्यावर तुझ्या व लोकांच्याही अंतःकरणांत एकादी भलतीच शंका उत्पन्न होणें अत्यंत स्वाभाविक आहे. मी शुद्ध, जितेंद्रिय व इंद्रियें स्वाधीन असलेला असा असून तुझ्या कन्येचें पावित्र्य माझ्या सहवासांत पूर्णपणें संभाळलें गेलें हें स्पष्ट होणें आवश्यक आहे. सून व कन्या सारख्याच असतात. मी त्यांच्यांत फरक करीत नाहीं. त्याचप्रमाणें माझ्या मुलानें तुझ्या कन्येचा स्वीकार केला, तर ती भरताच्या कुळांत येणारच आहे. कारण, माझ्यांत व पुत्रांत कांहींच फरक नाहीं. मी सून म्हणून तुझ्या कन्येचा स्वीकार केला, तर कसल्याही मिथ्यावादाला जागाच राहणार नाहीं. मी खोटे अपसमज व अभिशाप यांना अत्यंत भितों.

सून म्हणून तुझ्या कन्येचा मी स्वीकार करीत आहें. माझा मुलगा म्हणजे तूं सामान्य समजूं नकोस. एकाद्या देवपुत्राप्रमाणें तो सुंदर असून साक्षात् श्रीकृष्णाचा तो भाचा आहे. श्रीकृष्णाचें त्याच्यावर अत्यंत प्रेम असून सर्व प्रकारच्या अस्त्रविद्येंत तो अत्यंत निष्णात आहे. माझा आजानुबाहु पुत्र अभिमन्यु तुझ्या कन्येचा पति व तुझा जामाता व्हावयास सर्वस्वीं योग्य आहे.'' अर्जुनाचें शील व चारित्र्य असें विलोभनीय होतें. त्याची शालीनताही त्याच्या शीलाइतकीच विलोभनीय होती. खांडववनांत श्रीकृष्णांच्या हातून अर्जुनानें मयासुराला जीवदान देवविल्यानंतर आपल्याला जीवदान देणाऱ्या व्यक्तीचें कांहीं तरी प्रिय करावें म्हणून महान् शिल्पकार असलेला मयासुर त्याला कांहींतरी मागून घे म्हणून विनवूं लागला. अर्जुनानें त्याला काय उत्तर दिलें असेल? अर्जुन त्याला म्हणाला :—

**कृतमेव त्वया सर्वं स्वस्ति गच्छ महासुर ।**
**प्रीतिमान् भव मे नित्यं प्रीतिमन्तो वयं च ते ।। ४**

—महाभारत, सभापर्व अध्याय १

" हे महासुरा, आमच्या कृत्यांची जाणीव ठेवून तूं आम्हांला कृतज्ञतेनें विचारावयास आलास यांत मला सर्व कांहीं मिळालें आहे. असेंच आमच्यावर प्रेम कर. आम्हींही तुझ्यावर प्रेम करीत राहूं. यापेक्षां आम्हांला तुझ्याकडून कोणत्याही गोष्टीची अपेक्षा नाहीं. आनंदानें तूं आपल्या निवासस्थानीं जा.'' अर्जुनाला आपल्या महत्तेची जाणीव नसल्यामुळें तो असें बोलत असेल असें मयासुराला वाटलें व त्यानें अर्जुनाला असें सांगितलें कीं, 'आपलें बोलणें आपल्याला शोभत असलें तरी आपल्यावरील माझ्या प्रेमाचें प्रत्यक्ष प्रतीक म्हणून कांहीं करावें अशी माझी इच्छा आहे. विश्वकर्मा जसा देवांचा, तसाच मी दानवांचा उत्कृष्ट शिल्पकार आहे.' पण असें त्यानें म्हटल्यावरही आपण त्याच्याजवळ कांहीं मागावें असें अर्जुनाला वाटेना. त्याच्या अभिजाततेला उपकाराचा मोबदला घेण्याची प्रवृत्ति अतिशय हीन वाटली. शेवटीं त्यानें मयासुराला असें सांगितलें कीं, माझ्याऐवजीं तूं श्रीकृष्णांची इच्छा पूर्ण कर म्हणजे मला त्यांत सर्व कांहीं मिळालें.

## अर्जुनाची मानवता

अर्जुनाच्या अनेक विलोभनीय गुणांप्रमाणेंच त्याच्या ठिकाणीं असलेली मानवताही अत्यंत विलक्षण आहे. संग्रामांत मर्यादातीत पराक्रम प्रकट करणारा व निश्चित विजय संपादन करणारा हा महान् योद्धा अपराधाचा दंड जसा देऊं शकत असे, त्याचप्रमाणें विसरावयाचें त्या वेळीं सर्व अपराध विसरूंही शकत असे. सर्व कौरवांना ठार मारल्यानंतर म्हाताऱ्या व अंध धृतराष्ट्रानें पूर्वी आपले कितीही अपराध केले असले तरी कुळांतील सर्वांत वडील मनुष्य म्हणून अगतिक अवस्थेंत तो आपल्या आश्रयाला आल्यावर त्याच्याशीं आपलें वैर चालवीत बसावें असें भीमाप्रमाणें अर्जुनाला कधींही वाटलें नाहीं. श्राद्धासाठीं धृतराष्ट्र पांडवांना धन मागूं लागला असतां भीमाप्रमाणें त्याला त्या भावनानिष्ठ परिस्थितींत मागचीं पापें काढून दुरुत्तरें करीत बसणें त्याला मुळींच योग्य वाटलें नाहीं. दुरुत्तरें करणाऱ्या भीमालाच समजावीत असतां उलट तो म्हणतो :—

> किरीटी किञ्चिदानम्य तमुवाच नरर्षभम् ।
> भीम राजा पिता वृद्धो वनवासाय दीक्षितः ।। ९
> दातुमिच्छति सर्वेषां सुहृदामौर्ध्वदेहिकम् ।
> भवता निर्जितं वित्तं दातुमिच्छति कौरवः ।। १०
> भीष्मादीनां महाबाहो तदनुज्ञातुमर्हसि ।
> दिष्टया त्वद्य महाबाहो धृतराष्ट्रः प्रयाचते ।। ११
> याचितो यः पुराऽस्माभिः पश्य कालस्य पर्ययम् ।
> योऽसौ पृथिव्याः कृत्स्नाया भर्ता भूत्वा नराधिपः ।। १२
> परैर्विनिहतामात्यो वनं गन्तुमभीप्सति ।
> मा तेऽन्यत् पुरुषव्याघ्र दानाद् भवतु दर्शनम् ।। १३
> अयशस्यमतोऽन्यत् स्यादधर्मश्च महाभुज ।
> राजानमुपशिक्षस्व ज्येष्ठं भ्रातरमीश्वरम् ।। १४
> अर्हस्त्वमपि दातुं वै नादातुं भरतर्षभ ।
> एवं ब्रुवाणं बीभत्सुं धर्मराजोऽप्यपूजयत् ।। १५

—महाभारत, आश्रमवासिक पर्व अध्याय ११

"हे भीमसेना, आपला वृद्ध पिता राजा धृतराष्ट्र वनवासी होण्यासाठीं बद्धपरिकर झाला असून तत्पूर्वी आपल्या सर्व सुहृदांचें और्ध्वदेहिक करण्याची त्याची इच्छा आहे. भीष्मादिकांच्या नांवानें, तुम्ही जिंकलेलें धन तो दान करूं इच्छितो. पूर्वी आपण ज्याच्याजवळ याचना करीत होतों तो धृतराष्ट्र आज भाग्याच्या प्रभावानें आपल्याजवळ याचना करीत आहे. एकदां एकछत्री साम्राज्याचा अधिपति असलेल्या व्यक्तीवर आमच्याजवळ याचना करण्याची पाळी यावी हा काळाचा केवढा महिमा आहे! त्याचे सारे अमात्य व सहायक आपण ठार मारलेले आहेत. वनांत जाण्याचीच इच्छा आतां त्याला उरलेली आहे. अशा स्थितींत त्याला द्रव्यसाहाय्य देणें, यावांचून दुसऱ्या कोणत्याही इच्छेचा उदयच तुमच्या अंतःकरणांत होऊं नये अशी माझी इच्छा आहे. या वेळीं यावांचून दुसरा कोणताहि विचार मनांत आणणें म्हणजे आपण फार मोठ्या अधर्माचे व अपकीर्तीचे धनी होण्यासारखें आहे. आपले ज्येष्ठ बंधु व राजे युधिष्ठिर यांचीही तशीच इच्छा आहे. आपण त्यांच्याच इच्छेनुसार वागावें असें मला वाटतें. यावेळीं उसनें फेडण्याच्या कल्पनेपेक्षां उदार अंतःकरणानें देणें हेंच आपल्याला योग्य आहे. अर्जुन याप्रमाणें बोलल्यावर युधिष्ठिरांनीं देखील त्याचें अभिनंदन केलें." पण क्रोधी भीमसेनावर त्याचा कांहींएक परिणाम न होऊन त्यानें अर्जुनाला जें कठोर उत्तर दिलें तें मी भीमसेनाच्या व्यक्तिचित्रांत उल्लेखिलेंच आहे. अर्जुनाच्या अभिजात सुसंस्कृततेला भीमाचा हा कठोरपणा मुळींच आवडला नाहीं. या कटु क्रौर्याबद्दल भीमाला चांगलें सणसणीत उत्तर ऐकवावें, असा विचार त्याच्या मनांत चमकून गेला पण कांहींही झालें तरी भीम त्याचा वडील बंधु होता व वडील म्हणून ज्याप्रमाणें धृतराष्ट्राचे अपराध पोटांत घालून त्याच्याशीं माणसासारखें वागणें त्याला आवश्यक वाटत होतें, त्याचप्रमाणें ज्येष्ठ बंधु म्हणून भीमसेनाला दुरुत्तरें एकविणें अथवा त्याचा अवमान करणें हेंही त्याच्या अभिजाततेला मुळींच पटणारें नव्हतें. त्यानें भीमाला इतकेंच म्हटलें कीं,

**भीमो ज्येष्ठो गुरुर्मे त्वं नातोऽन्यद् वक्तुमुत्सहे।**
**धृतराष्ट्रस्तु राजर्षिः सर्वथा मानमर्हति ।। १**
**न स्मरन्त्यपराद्धानि स्मरन्ति सुकृतान्यपि ।**
**असंभिन्नार्यमर्यादः साधवः पुरुषोत्तमाः ।। २**

——महाभारत, आश्रमवासिक पर्व अध्याय १२

"हे भीमसेना, तुम्ही माझे ज्येष्ठ बंधु असून मला सर्वस्वीं मान्य आहांत. त्यामुळेंच तुमच्या या बोलण्यावर मी कांहीं बोलूं इच्छीत नाहीं. पण काय वाटेल तें झालें तरी राजा धृतराष्ट्राला आपण सर्वस्वीं मान दिलाच पाहिजे असें मला वाटतें. जगांतील श्रेष्ठ व सज्जन पुरुष व आर्यांच्या मर्यादा न सोडणारे लोक दुसऱ्यांचे नुसते अपकारच वारंवार उगाळीत बसत नसून त्यांच्या सुकृतांचें व इतर संबंधांचेंही स्मरण ठेवीत असतात." शेवटीं तर अर्जुनानें भीमसेनाच्या कटुभाषणाबद्दल विदुराच्या तोंडीं राजा धृतराष्ट्राची क्षमाही मागितली.

## दीर्घदर्शिता व अभिजात शालीनता

अर्जुनाची दीर्घदर्शिता अनेक प्रसंगीं व्यक्त झालेली आहे. महायुद्धासाठीं साहाय्य मागावयास्तव भगवान् श्रीकृष्णांच्याकडे अर्जुन ज्या वेळीं गेला त्या वेळीं नियतीनें त्याच्यासमोर एक मोठा विलक्षण स्वरूपाचा पेंच उत्पन्न केला होता. त्याला असें आढळून आलें कीं, राजा दुर्योधनही युद्धाचेंच साहाय्य मागावयास्तव श्रीकृष्णांच्याचकडे आलेला असून तो आपल्या आधीं आलेला आहे. तत्कालीन क्षत्रियांत रूढ असलेल्या नियमांनुसार ज्याचें साहाय्यार्थ आधीं बोलावणें येईल त्याच्याकडे जाणें हें कर्तव्य मानलें जात असे. दुर्योधन आधीं आलेला असल्यामुळें पुढें काय होईल याची अर्जुनाला चिंता वाटणें स्वाभाविकच होतें. भगवान् श्रीकृष्णांनीं त्याचा तो पेंच सोडविला. त्यांनीं दुर्योधनाला असें सांगितलें कीं, तूं जरी माझ्याकडे प्रथम आलेला असलास तरी अर्जुनाला मीं प्रथम पाहिलें आहे. त्यामुळें तुम्हां दोघांचाही माझ्यावर सारखाच हक्क लागू झाला आहे. त्यांतल्या त्यांत अर्जुन तुझ्यापेक्षां लहान असल्यामुळें

त्याच्या मागणीकडे प्रथम लक्ष देणें धर्मशास्त्रानुसारच आवश्यक आहे. या संग्रामाच्या बाबतींत मी असा निर्णय घेतला आहे कीं, एका बाजूला मी स्वतः जाईन व दुसऱ्या बाजूला माझ्यासारखेच पराक्रमी असे नारायण नांवाचे दहा सहस्र योद्धे गोप देईन. हें गोप-सैन्य प्रत्यक्ष लढावयास उपयोगी पडेल. मी मात्र मुळींच युद्ध करणार नाहीं. एका बाजूला न्यस्तशस्त्र मी व दुसऱ्या बाजूला दहा सहस्र योद्धयांचें खडें सैन्य यांपैकीं तुम्हांला काय हवें आहे तें तुम्ही ठरवावें. प्रथम मी अर्जुनालाच असें विचारतों कीं, त्याला काय हवें आहे तें त्यानें सांगावें. महाभारतकार म्हणतात :—

> एवमुक्तस्तु कृष्णेन कुन्तीपुत्रो धनञ्जयः ।
> अयुध्यमानं सङ्ग्रामे वरयामास केशवम् ।। २१
>
> —महाभारत, उद्योगपर्व अध्याय ७

"याप्रमाणें भगवान् श्रीकृष्णांनीं सांगतांच कुंतीपुत्र धनंजयानें युद्ध न करणाऱ्या श्रीकृष्णालाच आपल्या बाजूला येण्याची विनंती केली." दुर्योधनाला आपला मोठा भार उतरल्यासारखें वाटलें व निरुपयोगी श्रीकृष्ण टाकून उपयुक्त सैन्य वांट्याला येण्यांत आपल्या दैवानें अर्जुनावर मातच केली असें त्याला वाटलें. येथें दोघांच्या मनोरचनेंत अत्यंत मोठा फरक होता. दुर्योधन दुसऱ्यांच्या भरवंशावर पांडवांशीं युद्ध करूं इच्छीत होता. पण दिव्यास्त्रवेत्त्या अर्जुनाला शत्रूंना मारण्यासाठीं दुसऱ्यांच्या साहाय्याची आवश्यकता मुळींच वाटत नव्हती. दुर्योधन गेल्यावर भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाला असा प्रश्न केला कीं "चांगले लढणारें पराक्रमी सैन्य सोडून देऊन मुळींच न लढणाऱ्या मला पत्करून तूं काय मिळविलेंस? त्यावर उत्तर देतांना अर्जुन म्हणतो :—

> भवान् समर्थस्तान् सर्वान् निहन्तुं नात्र संशयः ।
> निहन्तुमहमप्येकः समर्थः पुरुषर्षभ ।। ३५
> भवांस्तु कीर्तिमान् लोके तद् यशस्त्वां गमिष्यति ।
> यशसां चाहमप्यर्थी तस्मादसि मया वृतः ।। ३६
> सारथ्यं तु त्वया कार्यमिति मे मानसं सदा ।
> चिररात्रेप्सितं कामं तद् भवान् कर्तुमर्हसि ।। ३७
>
> —महाभारत, उद्योगपर्व अध्याय ७

"आपण जर युद्ध केलें तर त्या सर्वांना ठार मारावयास पूर्णपणें समर्थ आहांत यांत संशयच नाहीं. पण हे पुरुषश्रेष्ठा! मी देखील त्या सर्वांना ठार मारावयास पूर्णपणें समर्थ आहे. पण कीर्ति ज्याचें नित्य अनुगमन करते असे आपण असल्यामुळें आपण जेथें जाल तेथें यशाची प्राप्ति झाल्याविना कधींच राहणार नाहीं. मला यशाचीच इच्छा आहे, म्हणून न्यस्तशस्त्र स्थितींतही मी आपणांसच वरिलें. आपण माझें सारथ्य करावें ही माझी फार दिवसांची इच्छा आहे ती मात्र आपण या वेळीं पूर्ण करावी." त्यावर भगवान् श्रीकृष्णांनीं त्याचें अभिनंदन करून त्याला असें म्हटलें कीं, 'माझ्याशीं स्पर्धा करण्याचा तुझा नेहमीं बाणा आहे ही फारच चांगली गोष्ट आहे. मी सारथ्य करावें अशी जर तुझी इच्छाच आहे तर मी तें अवश्य करीन." श्रीकृष्ण युद्ध करीत नाहीं म्हणाले तरी त्यांच्या व्यक्ति-मत्त्वाच्या प्रभावानें शत्रुपक्षांतील अतिश्रेष्ठ धनुर्धरांचाही धीर खचून जाऊन त्यांचा आत्मप्रत्यय नष्ट होईल याची अर्जुनाला पूर्ण-पणें कल्पना होती. बाहुबल, पराक्रम व अस्त्रविद्या यांच्या विषयांत अर्जुनाला स्वतःसंबंधींच इतका विलक्षण आत्मविश्वास होता कीं त्याला सैन्याच्या साह्याचें कांहींच महत्त्व वाटत नव्हतें. पण श्रीकृष्णांचें विभूतिमत्त्व व त्यामुळें होणारे लाभ मात्र फारच मह-त्त्वाचे होते. त्यांचें मार्गदर्शन, त्यांची दिव्य प्रतिभा व त्यांचें परमे-श्वरी सामर्थ्य या सर्वांचा न्यस्तशस्त्र स्थितींत त्याला अधिक लाभ मिळण्यासारखा होता. म्हणून दूरदर्शितेनेंच त्यानें श्रीकृष्णांना हातचें जाऊं दिलें नाहीं. ज्यासाठीं तो श्रीकृष्णांना सोडावयास सिद्ध नव्हता ते सर्व लाभ त्याला किती मोठ्या प्रमाणांत मिळाले हें भारतीय युद्धांतील अनेक घटनांनीं व विशेषतः अंतिम निर्णयानें सिद्धच केलें आहे. श्रीकृष्ण नसते तर कपटपटु धृतराष्ट्राच्या उद्योग-पर्वांतील कारस्थानांना पाण्डव बळी पडल्याविना राहते ना! श्रीकृष्ण नसते तर कौरवांच्या धुरंधर सेनानींचा आत्मप्रत्यय नष्ट करून त्यांच्या विशाल सैन्याच्या सेनानींची फळी कोणीही फोडूं शकलें नसतें. श्रीकृष्ण नसते. तर भीष्म, भगदत्त व अश्वत्थामा

यांच्या दिव्यास्त्रसमूहांत अर्जुन दग्ध झाल्याविना राहिला नसता. सर्वांत श्रेष्ठ गोष्ट म्हणजे कृष्णाच्या अभावीं अर्जुनाला रणांगणावर वारंवार उत्पन्न होणाऱ्या व्यामोहापासून कोण वांचवूं शकलें असतें ? अपूर्व दूरदर्शितेनेंच श्रीकृष्णांसारख्या पुरुषोत्तमाला अर्जुनानें सदाचें अंकित करून घेतलें. विराटपर्वांतील उत्तर गोग्रहणाच्या प्रकरणांतही अशीच दीर्घदर्शिता त्यानें प्रकट केली आहे. वनवासापूर्वींचा पार्थ व वनवासानंतरचा पार्थ यांच्यांत सामर्थ्याच्या दृष्टीनें अतिशय फरक पडलेला होता. वनवासापूर्वींच्या पार्थाचें निवारण करण्याचें सामर्थ्य भीष्मद्रोणादिकांत होतें. आपल्या सभेंतील वर्तनाचें स्पष्टीकरण करतांना व कौरवांचें अजिक्यत्व वर्णन करतांना युधिष्ठिरांनीं भीमाजवळ केलेला या गोष्टीचा उल्लेख आपण युधिष्ठिराच्या व्यक्तिचित्रणांत पाहिलेला आहे. त्या जाणिवेनेंच व्यासांच्या संकेतानुसार अर्जुनाला देवतांजवळून अस्त्रप्राप्ति करून घेण्यासाठी तपश्चर्येला पाठविण्यांत आलें होतें. वनवासानंतरचा पार्थ मात्र भीष्मद्रोणांनाही अजिक्य वाटत होता. हें आपलें वाढलेलें प्रचंड सामर्थ्य सर्व शत्रूंच्या समोर एकदम प्रकट करावयाची संधि उत्तर गोग्रहणाचीच होती. आपल्या सामर्थ्याच्या दीप्तीनें शत्रूंचे डोळे दिपवून भरंवशाच्या वीरांसंबंधींचाही त्यांचा विश्वास भंगून टाकावा म्हणूनच अर्जुनानें प्रकट होण्याची ही संधि साधली व सूर्य ज्याप्रमाणें आपल्या किरणजालांनीं अंधकाराचा नायनाट करीतच प्रकट होतो त्याप्रमाणें अर्जुनही आपल्या महास्त्रजालांनीं शत्रुसंघ नष्ट करीतच प्रकट झाला. त्याच्या त्या पराक्रमाची पकड कौरवांच्या पराक्रमी सेनापतींच्या व योद्ध्यांच्याही मनावर केवढी विलक्षण बसली होती याची साक्ष उद्योगपर्वांत ठिकठिकाणीं मिळते. अशीच दीर्घदर्शिता अर्जुनानें धर्मराजाच्या अश्वमेध यज्ञाच्या वेळींही प्रकट केलेली आहे. यज्ञीय अश्वाच्या संरक्षणाच्या मिषानें सर्व पृथ्वीचा दिग्विजय केल्यानंतर अर्जुन ज्या वेळीं राजधानीकडे परत यावयास निघाला त्या वेळीं त्यानें युधिष्ठिरांना आपला म्हणून जो निरोप पाठविला आहे तो या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचा आहे. तो म्हणतो :—

**आगमिष्यन्ति राजानः सर्वे वै कौरवर्षभ ।**
**प्राप्तानां महतां पूजा कार्या ह्येतत्क्षमं हि नः ।। १५**
**इत्येतद्वचनाद्राजा विज्ञाप्यो मम मानद ।**
**यथा चात्ययिकं न स्याद्यदर्घाहरणेऽभवत् ।। १६**
**कर्तुमर्हति तद्राजा भवांश्चाप्यनुमन्यताम् ।**
**राजद्वेषान्न नश्येयुरिमा राजन् पुनः प्रजाः ।। १७**

—महाभारत, आश्वमेधिकपर्व अध्याय ८६

" आपल्या यज्ञासाठीं अनेक मोठमोठे राजे येतील त्या सर्वांचा सन्मान करणें हें आपलें कर्तव्य आहे. मान्यांचा सन्मान हा केलाच पाहिजे. पण हे श्रीकृष्णा, राजसूय यज्ञांत अग्रपूजेच्या वेळीं जो प्रकार घडला त्याची मात्र अश्वमेधांत पुनरावृत्ति होऊं नये अशी माझी इच्छा आहे. महाराज युधिष्ठिरांनीं तर ही काळजी घ्यावीच पण आपणही त्याला अनुमोदन द्यावें अशी माझी विनंति आहे. राजे लोकांच्या आपआपसांतील वैमनस्यानें व द्वेषानें प्रजांचा पुन्हां विनाश होऊं नये अशी माझी इच्छा आहे." हा निरोप त्यानें भगवान् श्रीकृष्णांबरोबरच युधिष्ठिरांना पाठविलेला आहे. भगवान् श्रीकृष्णांना हा निरोप देऊन युधिष्ठिराकडे पाठविण्यांत अर्जुनानें केवढें मोठें धोरण पार पाडलें आहे. राजसूयांतील शिशुपाल-वधाचा भीषण प्रसंग केवळ श्रीकृष्णांच्या अग्रपूजेमुळेंच उद्भवला. त्यामुळें त्यांच्याचकडून युधिष्ठिरांना हा निरोप पोहोंचला म्हणजे ज्याची अग्रपूजा व्हावयाची ती व्यक्ति व जिनें अग्रपूजा करावयाची ती व्यक्ति या दोघांनाही अर्जुनाचा आशय त्यामुळें आपोआपच कळला. भारतीय युद्धांत क्षत्रियांचा केवढाही संहार झाला असला तरी शूरांचें उष्ण रक्त कांहीं त्यामुळें भारतवर्षांतून अजिबात लुप्त झालेलें नव्हतें. अशा स्थितींत नुकताच त्या उष्ण रक्ताचा अश्व-संरक्षणाच्या मिषानें प्रत्यक्ष अनुभव आलेल्या पार्थानें स्वाभाविकच पुढील संहार टाळण्याची ही खटपट केली. त्यांत त्यानें जगाचे आशीर्वाद घेतले, युधिष्ठिरांचें अंतःकरण पुन्हां न दुखविण्याची व्यवस्था केली व भगवान् श्रीकृष्णांच्या पट्टशिष्याला अवश्य तो धोरणीपणा राखून त्यानें त्यांच्याही हृदयाला संतोष दिला. सभा-

पर्वामध्यें असाच धोरणीपणा त्यानें व्यक्त केला आहे. अत्यंत विपरीत प्रसंगींही मनावर त्याचा किती विलक्षण ताबा राहूं शके याचें सभापर्व हें एक निदर्शनच होय. दुःशासन द्रौपदीला केस धरून हिसडे देत असतां संतापलेला भीमसेन युधिष्ठिराचेच हात जाळून टाकावयास ज्या वेळीं प्रवृत्त झाला त्या वेळीं अर्जुनाला आभाळ फाटल्यासारखें वाटलें. काय वाटेल तें झालें तरी पांडवांच्या अभेद्य एकीचा भंग होऊं नये अशी त्याची धारणा होती व त्यामुळें केवढ्याही भयानक महाप्रसंगांत आपलें मन स्थिर ठेवून युधिष्ठिराचें नेतृत्व न झुगारून देणेंच योग्य होय असें त्यानें ठरविलें. त्यानें भीमसेनाला असें सांगितलें कीं :—

> **न पुरा भीमसेन त्वमीदृशीर्वदिता गिरः ।**
> **परैस्ते नाशितं नूनं नृशंसैर्धर्मगौरवम् ॥ ७**
> **न सकामाः परे कार्या धर्ममेवाचरोत्तमम् ।**
> **भ्रातरं धार्मिकं ज्येष्ठं कोऽतिवर्तितुमर्हति ॥ ८**
>
> **—महाभारत, सभापर्व अध्याय ६८**

"हे भीमसेना, यापूर्वी तूं अशी वाणी केव्हांही उच्चारली नाहींस. नृशंस दुष्टांनीं तुला तुझा तोल सोडावयास लावून धर्माविषयींचा तुझा अंतःकरणांतील आदरभाव तर नष्ट केला नाहीं ना ! काय वाटेल तें झालें तरी धर्मानुसार वागणें हेंच तुझें कर्तव्य आहे. परकीयांना आपल्यांत भेद उत्पन्न होणें हितावह वाटतें. त्यांची ती इच्छा आपण कधींही पूर्ण होऊं न दिली पाहिजे."

## अभिजात शालीनता

अर्जुनाच्या या दीर्घदर्शित्वाप्रमाणेंच अभिजात शालीनता व विनयनम्रता हे त्याचे अतिशय महत्त्वाचे असे विशेष होते. त्याच्याशीं नेहमीं स्पर्धा करणारा कर्ण जितका आत्मश्लाघी इतकाच अर्जुन स्वतःविषयीं अतिशय थोडें बोलणारा होता. आत्मस्तुति व परनिन्दा या गोष्टी त्याला विषतुल्य वाटत असून असे प्रसंग आल्यास त्याला मरणप्राय दुःख होत असे. अर्जुनाच्या जीवनांत असे प्रसंग कधीं उद्‌भवल्यास त्याची कशी विलक्षण अवस्था होत असे याचें महाभारतांत एक उदाहरण आलें आहे. ज्या वेळीं कर्णानें युधिष्ठिराचा पराभव करून त्याचें सारें शरीर आपल्या बाणांनीं तासून

काढलें व ते आपल्या शिबिरांत विश्रांति घ्यावयास जेव्हां परतले त्या वेळीं त्यांचें दर्शन घ्यावयास म्हणून श्रीकृष्ण व अर्जुन त्यांच्या शिबिरांत आले. त्यांना पहातांच युधिष्ठिराची अशी समजूत झाली कीं कर्णाला मारूनच अर्जुन आपल्याकडे आला आहे. म्हणून त्यानें त्याबद्दल अर्जुनाचें अभिनंदन चालविलें. अर्जुनानें त्यांना असें सांगितलें कीं, मी अजून कर्णाला मारलें नसून आतां जाऊन मारणार आहें. हें ऐकतांच युधिष्ठिराच्या हर्षाची जागा तीव्र क्रोधानें घेतली व त्यांनीं अर्जुनाला गाण्डीव धनुष्य दुसऱ्या कुणाला तरी देऊन टाकावयास सांगितलें. अर्जुनाची अशी प्रतिज्ञा होती कीं, जो कोणी गाण्डीव दुसऱ्या कुणाला द्यावयास सांगेल त्याला ताबडतोब ठार करावयाचें. युधिष्ठिराच्या तोंडून हें वाक्य ऐकतांच आपल्या प्रतिज्ञेच्या रक्षणार्थ अर्जुनानें आपलें खड्ग उपसलें. तें पाहातांच भगवान् श्रीकृष्णांनीं त्याची समजूत घालून प्रत्यक्ष शब्दशः आपली प्रतिज्ञा पार न पाडतां ती पर्यायानें पार पाडावी असें सुचविलें. गुरूचा वध प्रत्यक्ष न करतां त्याची निन्दा करणें हाच त्याचा वध होय असें धर्मशास्त्र असल्यामुळें या पर्यायाचा आश्रय कर असें श्रीकृष्ण त्याला म्हणाले. अर्जुनाला युधिष्ठिरांची निन्दा करणें अत्यंत जड गेलें. कसेंबसें त्यानें आपलें कर्तव्य पार पाडलें व त्या गोष्टीची त्याला इतकी लाज वाटली कीं महाभारतकार म्हणतातः

> **एता वाचः परुषाः सव्यसाची स्थिरप्रज्ञः श्रावयित्वा तु रूक्षाः ।**
> **बभूवासौ विमना धर्मभीरुः कृत्वा प्राज्ञः पातकं किञ्चिदेवम् ॥ २२**
> **तदानुतेपे सुरराजपुत्रो विनिःश्वसंश्चासिमथोद्बबर्ह ।**
> **तमाह कृष्णः किमिदं पुनर्भवान् विकोशमाकाशनिभं करोत्यसिम् ॥२३**
> —महाभारत, कर्णपर्व अध्याय ७०

"याप्रमाणें युधिष्ठिरांना अत्यंत कठोर व रुक्ष अशीं वाक्यें ऐकविल्यानंतर धर्मभीरु अर्जुन अत्यंत विमनस्क झाला. कांहींतरी भयंकर पातक केलें असें त्याला वाटूं लागलें. युधिष्ठिराची निंदा करून जगांत तोंड दाखविण्यापेक्षां मृत्यु बरा असें त्याला वाटून त्यानें आपलें खड्ग उपसलें व तो जोरजोरानें निःश्वास टाकूं लागला. त्याबरोबर भगवान् श्रीकृष्ण त्याला पुनश्च म्हणाले, 'अर्जुना, हें रे

काय ! पुन्हां तूं आपलें खड्ग कशासाठीं नग्न केलेंस ?' त्याबरोबर अर्जुनानें त्यांना असें सांगितलें कीं,

> अहं हनिष्ये स्वशरीरमेव प्रसह्य येनाहितमाचरं वै ।
> निशम्य तत् पार्थवचोऽब्रवीदिदं धनञ्जयं धर्मभृतां वरिष्ठः ।। २५
>
> —महाभारत, कर्णपर्व अ. ७०

"ज्या या माझ्या शरीरानें ही गुरुनिंदेसारखी अत्यंत लाजिरवाणी गोष्ट केली तें शरीर जिवंत ठेवण्याची माझी इच्छा नाहीं." अर्जुनाचें हें विलक्षण वाक्य ऐकून भगवंतांनीं त्याला पुन्हां असा पर्याय सुचविला कीं, ज्याप्रमाणें गुरूची निंदा करणें हा त्याचा वध होय, त्याचप्रमाणें स्वतःची स्तुति करणें हा आपला वध होय असें शास्त्र असल्यामुळें पर्यायानें युधिष्ठिरांची निंदा करून जसा तूं त्यांचा वध केलास त्याचप्रमाणें स्वतःची स्तुति करून तूं आपलाही वध करून टाक म्हणजे तूं दोषापासून मुक्त होशील." अर्जुनाला स्वतःची स्तुति करतांना मरणप्राय दुःख झालें. शेवटीं आपली स्तुति करीत असतां तो इतका शोकाकुल झाला व लाजला कीं, मध्येंच थांबून त्यानें युधिष्ठिरांचे पाय धरले व त्यांची क्षमा मागितली.

## विलोभनीय आत्माभिमान

अर्जुन हा अत्यंत विनयसंपन्न असल्यामुळें आपली महात्मता तो जरी कधींही प्रकट करीत नसला तरी देखील त्याच्या आत्माभिमानाला जर कुणी डिवचण्याचा प्रयत्न केला तर तो उफाळून उठल्याखेरीज राहात नसे. याचें अतिशय महत्त्वाचें उदाहरण महाभारताच्या उद्योगपर्वांत आलें आहे. कौरवांशीं युद्ध करावयाचें निश्चित ठरल्यानंतर व त्यांच्याकडे ११ अक्षौहिणी सैन्य एकत्रित झाल्याचें कळल्यावर पांडवांना सेनेची व साहाय्याची अत्यंत गरज वाटूं लागणें स्वाभाविकच होतें. अशा स्थितींत जितके सहायक येतील तितक्यांचा संग्रह करणें व कोणालाही न दुखवितां सर्वांना संभाळून घेणें हेंच धोरण फलदायी ठरणारें होतें. अशा स्थितींत पांडवांच्याकडे भगवान् श्रीकृष्णांचा पराक्रमी शालक व भोज-

कटाचा राजा रुक्मी आपलें एक अक्षौहिणी सैन्य घेऊन आला. युधिष्ठिरानें त्याचें मोठें स्वागत केलें. तो महा गर्विष्ठ होता. पांडवांनीं केलेल्या स्वागताचा स्वीकार करून सर्व योद्धे व श्रीकृष्ण आणि युधिष्ठिर यांच्या समक्ष तो अर्जुनाला असें म्हणाला कीं :-

**सहायोऽस्मि स्थितो युद्धे यदि भीतोऽसि पाण्डव ।**
**करिष्यामि रणे साह्यमसह्यं तव शत्रुभिः ॥ २१**
**न हि मे विक्रमे तुल्यः पुमानस्तीह कश्चन ।**
**हनिष्यामि रणे भागं यन्मे दास्यसि पाण्डव ॥ २२**
**अपि द्रोणकृपौ वीरौ भीष्मकर्णावथो पुनः ।**
**अथवा सर्व एवैते तिष्ठन्तु वसुधाधिपाः ॥ २३**
**निहत्य समरे शत्रूंस्तव दास्यामि मेदिनीम् । २४**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १५८

" हे पांडवा, तूं जर भ्याला असशील तर युद्धांत मी तुझें साहाय्य करावयास सिद्ध आहें. भिण्याचें कांहीं कारण नाहीं. तुझ्या शत्रूंना असह्य वाटेल असें साहाय्य मी तुला करीन. येथें माझ्या तोडीचा कोणीही वीर नाहीं. कुरु सैन्याच्या ज्या भागावर तूं मला जावयास सांगशील त्या संपूर्ण विभागाचा मी विध्वंस करीन. द्रोणाचार्य, कृपाचार्य, भीष्म अथवा कर्ण या विख्यात योद्ध्यांपैकीं तूं म्हणशील त्यांचा वध करून मी तुझें कार्य पूर्ण करीन किंवा असें करावयास काय अडचण आहे? तुझ्या साहाय्यार्थ येथें जमलेल्या सर्व राजांना येथें स्वस्थ आपापल्या जागीं विश्रांति घ्यावयास सांग. मी एकटाच तुझ्या सर्व शत्रूंचा निःपात करून पृथ्वीचें राज्य तुला मिळवून देतों." त्याचें हें बोलणें ऐकतांच महापराक्रमी पार्थानें त्याचा अनुनय केला असेल काय? महाभारतकार म्हणातात :—

**शृण्वतां पार्थिवेन्द्राणामन्येषां चैव सर्वशः ।**
**वासुदेवमभिप्रेक्ष्य धर्मराजं च पाण्डवम् ॥ २५**
**उवाच धीमान् कौन्तेयः प्रहस्य सखिपूर्वकम् ।**
**कौरवाणां कुले जातः पाण्डोः पुत्रो विशेषतः ॥ २६**
**द्रोणं व्यपदिशन् शिष्यो वासुदेवसहायवान् ।**
**भीतोऽस्मीति कथं ब्रूयां दधानो गाण्डिवं धनुः ॥ २७**

युध्यमानस्य मे वीर गन्धर्वैः सुमहाबलैः ।
सहायो घोषयात्रायां कस्तदासीत् सखा मम ।। २८
तथा प्रतिभये तस्मिन् देवदानवसंकुले ।
खाण्डवे युध्यमानस्य कः सहायस्तदाऽभवत् ।। २९
निवातकवचैर्युद्धे कालकेयैश्च दानवैः ।
तत्र मे युध्यमानस्य कः सहायस्तदाऽभवत् ।। ३०
तथा विराटनगरे कुरुभिः सह सङ्गरे ।
युध्यतो बहुभिस्तत्र कः सहायोऽभवन्मम ।। ३१
उपजीव्य रणे रुद्रं शक्रं वैश्रवणं यमम् ।
वरुणं पावकं चैव कृपं द्रोणं च माधवम् ।। ३२
धारयन् गाण्डिवं दिव्यं धनुस्तेजोमयं दृढम् ।
अक्षय्यशरसंयुक्तो दिव्यास्त्रपरिबृंहितः ।। ३३
कथमस्मद्विधो ब्रूयाद् भीतोऽस्मीति यशोहरम् ।
वचनं नरशार्दूल वज्रायुधमपि स्वयम् ।। ३४
नास्मि भीतो महाबाहो सहायार्थश्च नास्ति मे ।
यथाकामं यथायोगं गच्छ वाऽन्यत्र तिष्ठ वा ।। ३५

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १५८

"सर्व लोकांसमक्ष रुक्मीचें हें गर्वोद्धत भाषण ऐकून अर्जुनानें एकवार युधिष्ठिर व श्रीकृष्ण यांच्याकडे पाहिलें व किंचित् हंसून मित्रभावानेंच पण स्पष्ट शब्दांत पार्थ रुक्मीला म्हणाला कीं, 'हे राजा, तूं भलतीच गोष्ट आपल्या तोंडानें उच्चारलीस. कौरवांच्या विख्यात कुळांत उत्पन्न झालेला, पिता म्हणून राजा पांडूचें नांव सांगणारा, आचार्य द्रोणांसारख्या व्यक्तीचा शिष्य म्हणविणारा, ज्याला श्रीकृष्णासारखा सहायक आहे असा व गांडीवासारखें धनुष्य हातांत धारण करणारा माझ्यासारखा पुरुष, भ्यालों असें कधींतरी म्हणेल काय ? मला साहाय्याची काय आवश्यकता आहे ? घोषयात्रेंत अत्यंत बलवान् अशा गंधर्वांशीं मी युद्ध करीत असतां कोणत्या माझ्या मित्रानें मला साहाय्य केलें ? खांडवांत अत्यंत भयानक अशा देवदानवांशीं मी युद्ध करीत असतां कोणी मला साहाय्य केलें ? निवातकवच व कालकेय या भयानक दानवांशीं मी युद्ध करीत असतां कोण माझा सहायक होता ? नुकताच विराट नगरींत उत्तर गोग्रहण प्रसंगीं मी एकट्यानें सर्व कौरवांशीं

ज्या वेळीं भयानक संग्राम केला त्या वेळीं माझा सहायक कोठें कोण होता ? भगवान् महारुद्र, इंद्र, कुबेर, यमधर्म, वरुण, अग्नि, कृपाचार्य, द्रोणाचार्य व भगवान् श्रीकृष्ण यांचा मी शिष्य आहे. माझ्या हातीं दैवी तेजानें युक्त असलेलें दृढ गांडीव धनुष्य असून माझ्याजवळ अक्षय्य भाते आहेत. अनंत दिव्य अस्त्रें माझ्याजवळ आहेत. वज्र हातांत घेऊन साक्षात् देवेंद्र जरी आमच्यासमोर येऊन उभा राहिला व भ्यालों असें यशाचें अपहरण करणारें वाक्य उच्चारावयास सांगूं लागला, तरी आम्ही असें भलतेंच कसें बोलूं? मी मुळींच भ्यालों नाहीं व मला साहाय्याची कांहीं एक आवश्यकता नाहीं. तुझ्या इच्छेप्रमाणें तुला वाटलें तर रहा नाहींतर खुशाल जा." अर्जुनाच्या या उत्तरानंतर रागावून रुक्मी निघून गेला. अर्जुनानें त्याची यत्किंचित्‌ही गय केली नाहीं. अथवा अनुनय करण्याच्या भरीस तो पडला नाहीं. भय हा विषय नरोत्तम पार्थाच्या कक्षेबाहेर होता. स्वतःच्या पौरुषाचा विश्वास त्याला इतका विलक्षण आहे कीं, त्याच्या भरंवशावर कसल्याही प्रसंगीं भीतीचा लवलेश देखील पार्थाच्या अंतःकरणाला शिवूं शकत नाहीं. लाक्षागृह दाहानंतर पांडव वनांतून भटकत असतां बकासुर वधाच्या प्रसंगानंतर ज्या वेळीं ते द्रुपदनगराकडे जाऊं लागले त्यावेळीं रस्त्यांत अंगारपर्ण नांवाच्या गंधर्वाशीं त्यांची गांठ पडली. पांडव सर्वस्वी साहाय्यहीन होते, तर मानवी शक्तीपेक्षां अधिक शक्तिसंपन्न असलेला गंधर्व आपल्या बळाच्या गर्वांत होता. त्यानें पांडवांना अडविल्यानंतर व भलत्या वेळीं गंगेवर येण्याचा तुम्हांला अधिकार नाहीं म्हणून तो त्यांना दरडावूं लागल्यानंतर अर्जुनानें त्याला जें उत्तर दिलें, तें त्याच्या या निर्भयतेचेंच द्योतक आहे. अर्जुन म्हणतो :—

समुद्रे हिमवत्पार्श्वे नद्यामस्यां च दुर्मते ।
रात्रावहनि सन्ध्यायां कस्य गुप्तः परिग्रहः ।। १६
भुक्तो वाप्यथवाऽभुक्तो रात्रावहनि खेचर ।
न कालनियमो ह्यस्ति गङ्गां प्राप्य सरिद्वराम् ।। १७
वयं च शक्तिसम्पन्ना अकाले त्वामधृष्णुम ।
अशक्ता हि रणे क्रूर युष्मानर्चन्ति मानवाः ।। १८

—महाभारत, आदिपर्व अध्याय १७०

" हे दुर्बुद्धे, समुद्र, हिमाचलाचा पार्श्वभाग व या गंगानदीचें तीर येथें दिवसरात्र व संध्याकाळ यांचा कांहीं एक नियम नसतो. दिवस आहे कीं रात्र आहे, कोणी भुक्त स्थितींत आहे कीं अभुक्त स्थितींत आहे हे नियम गंगेला लागू नाहींत, आणि सगळ्यांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, अशक्तासाठीं हे सारे नियम असतात. आम्ही शक्तिसंपन्न आहोंत व तूं ज्याला अकाल समजतोस त्याच वेळीं आम्ही तुझें धर्षण करीत आहोंत. हे क्रूरा, जे लोक अशक्त असतात ते तुमची पूजा करीत बसतात." अर्जुनानें ज्या वेळीं हें उत्तर दिलें, त्या क्षणापर्यंत केवळ मानवी योद्धयांचाच त्याला परिचय होता. अतिमानवी शक्तींशीं त्याचा कांहींही संबंध आलेला नव्हता, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्या वेळीं त्याच्याजवळची अस्त्रविद्या ही पुढें जशी दैवी व अलौलिक झाली तशीही नव्हती. आचार्य द्रोणाजवळ तो जें काय शिकला, तेवढेंच काय तें त्याच्याजवळ होतें. अशा स्थितींत गंधर्वासारख्या अतिमानवी शक्तीशीं पडलेल्या पहिल्याच प्रसंगांत हृदयाचा स्वाभाविक आविष्कार म्हणून त्यानें काढलेले हे उद्गार त्याचा दुर्दान्त आत्मप्रत्ययच व्यक्त करतात. त्याचें हें उत्तर ऐकतांच अंगारपर्णानें क्रुद्ध होऊन एकाहून एक तीक्ष्ण बाणांनीं त्याच्यावर प्रहार करावयास प्रारंभ केला. प्रतिकारासाठीं धनुर्धर पार्थाजवळ साधें धनुष्य देखील नव्हतें. त्या वेळीं तो गाण्डीवधारी तर नव्हताच. कारण गांडीव धनुष्य त्याला खांडववनदाह प्रकरणानंतर पुढें अग्नीच्या प्रसादानें मिळालें आहे. त्या वेळीं त्याच्या हातांत होतें फक्त कोलताड. पण युद्धकुशल पार्थानें आपल्या हातांतील केवळ कोलताडानेंच गंधर्वाचे सर्व बाण हाणून पाडले. स्वतःच्या अस्त्रांच्या ज्ञानाचा त्याला इतका विलक्षण प्रत्यय होता कीं हंसत हंसत तो गंधर्वाला म्हणाला :—

**बिभीषिका वै गन्धर्व नास्त्रज्ञेषु प्रयुज्यते ।**
**अस्त्रज्ञेषु प्रयुक्तेयं फेनवत् प्रविलीयते ।। २७**
**मानुषानतिगन्धर्वान् सर्वान् गन्धर्व लक्षये ।**
**तस्मादस्त्रेण दिव्येन योत्स्येऽहं न तु मायया ।। २८**

**पुरास्त्रमिदमाग्नेयं प्रादात्किल बृहस्पतिः ।**
**भरद्वाजाय गन्धर्व गुरुर्मान्यः शतक्रतोः ॥ २९**
**भरद्वाजादग्निवेश्य अग्निवेशाद् गुरुर्मम ।**
**साध्विदं मह्यमददद् द्रोणो ब्राह्मणसत्तमः ॥ ३०**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १७०.

"हे गंधर्वा, 'अस्त्रज्ञांना कोणी छलकपटानें भय दाखवूं शकत नसतात. अस्त्रज्ञावर जर कोणी भीतीच्या हुलकावण्यांचा प्रयत्न केला तर त्या हुलकावण्या थोड्याच वेळांत फेसाप्रमाणें जागच्या जागीं जिरून जात असतात. मी माझ्या दिव्य अस्त्राच्या भरंवशावर मनुष्य, गंधर्व व त्याच्याहीपेक्षां अधिक अतिमानवी सामर्थ्याशीं गांठ घेऊं शकेन. तुझ्यासारखा मी कपटानें युद्ध करणार नसून केवळ दिव्य अस्त्रानेंच लढणार आहें. ज्या आग्नेय अस्त्राचा मी आतां तुझ्यावर प्रयोग करणार आहें, तें महेन्द्राचा गुरू जो बृहस्पति त्यानें पूर्वीं भरद्वाजाला दिलें. त्यानें तें अग्निवेश्याला दिलें. त्यानें तें द्रोणाचार्यांना दिलें व ब्राह्मणश्रेष्ठ द्रोणाचार्यांपासून तें अस्त्र माझ्याकडे आलें आहे." असें बोलून अर्जुनानें अग्न्यस्त्राचा प्रयोग करून गंधर्वाची पूर्णपणें खोडकी जिरवली. अर्जुनाच्या निर्भय वृत्तीनें व शुद्ध क्षात्रधर्मानुसार त्याच्या ठिकाणीं असलेल्या अलौकिक धर्मानेंच त्यानें दिव्य सामर्थ्य मिळवलेलें होतें. सामान्य गंधर्वाचा त्याच्यासमोर पाडच काय? पण धनुर्वेदाची देवता असलेल्या भगवान् महादेवांनाही त्यानें या आपल्या अलौकिक धैर्यानेंच प्रसन्न करून घेतलें. आपल्या ज्येष्ठ बंधूच्या आज्ञेवरून, वनवासांत असतां अर्जुनानें अस्त्रप्राप्तीसाठीं हिमाचलावर भगवान् महादेवांना प्रसन्न करून घेण्याच्या इच्छेनें मोठी तपश्चर्या केली असें महाभारतांत वर्णन आहे. या तपश्चर्येच्या सामर्थ्यानें प्रभावित झालेल्या महर्षींनीं भगवान् शंकरांना अर्जुनाला वरदान देऊन कृतार्थ करावें अशी प्रार्थना केली. अर्जुन कशासाठीं ही तपश्चर्या करीत आहे याची ऋषींना कल्पना नसली तरी श्रीशंकरांना ती होतीच. एकादी भोग्य वस्तू अथवा वैभव मागण्यासाठीं अर्जुनानें ही तपस्या केली असती तर त्याची इच्छा देवाधिदेवांनीं तत्काळ

पूर्ण केली असती. पण त्याला पाहिजे होतें पाशुपतास्त्र. येवढें महान् अस्त्र धारण करण्यासारखें अलौकिक धैर्य अर्जुनाच्या ठिकाणीं आहे कीं नाहीं याची पूर्णपणें परीक्षा घेतल्यावांचून अस्त्र अर्जुनाला द्यावें असें भगवंतांना वाटेना. नुसत्या तपश्चर्येनें या धैर्याची परीक्षा होणारी नव्हती. शेवटीं आपण स्वतःच परीक्षा घ्यावी असें ठरवून महादेवांनीं किराताचा वेष घेतला. व जेथें पार्थ तपश्चर्या करीत होता तेथें ते येऊन पोहोंचले. ते आले त्याच वेळीं मूक नांवाचा एक दानव वराहवेषानें अर्जुनाच्या अंगावर चालून येत होता. त्याला येतांना पाहतांच अर्जुनानें त्याला ठार मारण्यासाठीं आपलें धनुष्य सज्ज करून त्यावर बाण लाविला. त्याच्या धैर्याची परीक्षा पहावयास हीच उत्कृष्ट संधि आहे हें पाहून भगवान् महादेवांनीं अर्जुनाला दरडावीत म्हटलें, "थांब थांब. ही माझी शिकार आहे. तुला ती मारण्याचा अधिकार नाहीं." पण अर्जुनानें त्यांना सामान्य किरात समजून दुर्लक्ष केलें व वराहाच्या रोखानें आपला बाण सोडला. किरातरूपी शंकरांनींही त्याचवेळीं त्या वराहावर बाणवृष्टि केली व दोघांच्याही बाणप्रहारांनीं त्या वराहाचे केव्हांच तुकडे उडाले. वराहाला ठार केल्यावर अर्जुन त्या किराताकडे वळला. अनेक स्त्रियांनीं परिवेष्टित अशा त्या एका सामान्य किरातानें आपल्यासारख्या श्रेष्ठ क्षत्रियाला दरडावून 'थांब' म्हणावें, इतकेंच नव्हें तर आपल्या शिकारीवर आघात करून उपमर्द करावा ही गोष्ट अर्जुनाला अत्यंत अपमानास्पद वाटली व त्याच्या अपकृत्याचें फळ त्याला भोगावयास लावावें या इच्छेनें अर्जुन त्याला म्हणाला, "या अत्यंत घोर अरण्यांत अनेक स्त्रियांना बरोबर घेऊन निर्भयचित्तानें फिरणारा तूं कोण आहेस रे ? माझ्या या वराहावर प्रहार करण्याचें तुला काय कारण ? मनाच्या लहरीनुसार वागण्याचें प्रायश्चित्त मी आतां तुला देणार आहें. माझा उपमर्द करून तूं स्वतःचा मृत्यूच ओढवून घेतलेला आहेस. दुसऱ्याच्या सावजावर स्वतः आघात करणें हा मृगयाधर्म नाहीं. तूं जें धर्माचें उल्लंघन केलेंस त्याचें फळ म्हणून तुला मी ठार करणार आहें. त्याच्या त्या धमकावणीला यत्किंचित्ही भीक न घालतां किरात

त्याला विचारूं लागला, " आम्ही नेहमींच अरण्यांत रहात असल्या-मुळें तू जो मला अरण्यांत राहण्याविषयीं प्रश्न केलास तो अगदींच निरर्थक आहे. पण तूं मात्र अरण्यांतील दिसत नाहींस. तुझ्या-सारख्या सुकुमार व सुखोपभोगांना सर्वस्वी उचित अशा व्यक्तीनें अशा घोर अरण्यांत राहणें मात्र आश्चर्यकारक आहे." स्वतःला सुकुमार हें लाविलेलें विशेषण अर्जुनाला निश्चितच आवडलें नाहीं. तो चिडून त्याला धाक दाखविण्यासाठीं म्हणाला, "अग्नीसारखे तेजस्वी बाण व गांडीवासारखे धनुष्य यांच्या आश्रयानें या घोर अरण्यांत मी एकाद्या अग्नीप्रमाणें तळपत रहात आहें. तूं ज्याला वराह समज-तोस तो वराह नसून एक घोर राक्षस या रूपानें मला मारण्यासाठीं आला होता. मी त्याला ठार मारलें." किरात पार्थाला म्हणूं लागला, " काय थापा मारतोस रे ! तुझ्या आधीं या वराहाला माझे बाण लागले आहेत. माझ्याच बाणांनीं याचे प्राण हरण करून याला भूमीवर सदाचें लोळविलें. वस्तुतः ही माझी शिकार व माझ्याच प्रहारानें ती मारली गेली आहे. जी चूक तूं स्वतः केलीस तिच्या-बद्दल लाज वाटण्याऐवजीं आपल्या सामर्थ्याच्या अहंकारानें स्वतःची चूक तूं दुसऱ्यावर लादूं पहात आहेस. पण तुझा भलताच अन्यायी मूर्खपणा मी चालू देईन असें तुला वाटतें काय ? माझ्या दृष्टीसमोर तूं अधिक वेळ जिवंत राहूं शकणार नाहींस. हे मूर्खा ! तूं फार दर्पांध आहेस. माझ्या वज्रासारख्या समर्थ बाणांचा मी तुझ्यावर प्रहार करणार आहें; स्थिर रहा. नुसता बडबड काय करतोस ? प्रत्यक्ष बाणप्रहार कर व तुझें जें काय सामर्थ्य असेल तें दाखव." किरा-ताच्या या उत्तरानें अर्जुनाचा स्वाभिमान चांगलाच दुखावला व त्याच्या जीविताचा अंत करण्याच्या इच्छेनें भयंकर बाणांचा त्यानें त्याच्यावर वर्षाव करावयास प्रारंभ केला. हिमाचलाच्या पायथ्याशीं त्रिपुरांतक महादेव व खांडव वनदाह प्रसंगांत देव दानवांनाही धूळ चारणारा पार्थ या दोघांचें भयंकर युद्ध सुरू झालें. या युद्धाचें व त्यांत प्रकट झालेल्या पार्थाच्या अलौकिक धैर्याचें वर्णन करतांना महाभारतकार म्हणतात :—

तस्य तद्वचनं श्रुत्वा किरातस्यार्जुनस्तदा।
रोषमाहारयामास ताडयामास चेषुभिः ।। ३२
ततो हृष्टेन मनसा प्रतिजग्राह सायकान्।
भूयो भूय इति प्राह मन्दमन्देत्युवाच ह ।। ३३
प्रहरस्व शरानेतान्नाराचान्मर्मभेदिनः।
इत्युक्तो बाणवर्षं स मुमोच सहसार्जुनः ।। ३४
ततस्तौ तत्र संरब्धौ राजमानौ मुहुर्मुहुः।
शरैराशीविषाकारैस्ततक्षाते परस्परम् ।। ३५
ततोऽर्जुनः शरवर्षं किराते समवासृजत्।
तत्प्रसन्नेन मनसा प्रतिजग्राह शंकरः ।। ३६
मुहुर्तं शरवर्षं तत् प्रतिगृह्य पिनाकधृक्।
अक्षतेन शरीरेण तस्थौ गिरिरिवाचलः ।। ३७
स दृष्ट्वा बाणवर्षं तु मोघीभूतं धनंञ्जयः।
परमं विस्मयं चक्रे साधु साध्विति चाब्रवीत् ।। ३८
* अहोऽयं सुकुमाराङ्गो हिमवच्छिखराश्रयः।
गाण्डीवमुक्तान्नाराचान् प्रतिगृह्णात्यविव्हलः ।। ३९
कोऽयं देवो भवेत्साक्षाद् रुद्रो यक्षः सुरोऽसुरः। *
विद्यते हि गिरिश्रेष्ठे त्रिदशानां समागमः ।। ४०
न हि मद्बाणजालानामुत्सृष्टानां सहस्रशः।
शक्तोऽन्यः सहितुं वेगमृते देवं पिनाकिनम् ।। ४१
देवो वा यदि वा यक्षो रुद्रादन्यो व्यवस्थितः।
अहमेनं शरैस्तीक्ष्णैर्नयामि यमसादनम् ।। ४२
ततो हृष्टमना जिष्णुर्नाराचान् मर्मभेदिनः।
व्यसृजच्छतधा राजन् मयूखानिव भास्करः ।। ४३
तान् प्रसन्नेन मनसा भगवाँल्लोकभावनः।
शूलपाणिः प्रत्यगृह्णाच्छिलावर्षमिवाचलः ।। ४४
क्षणेन क्षीणबाणोथ संवृत्तः फाल्गुनस्तदा।
भीश्चैनमाविशत्तीव्रा तं दृष्ट्वा शरसंक्षयम् ।। ४५
चिन्तयामास जिष्णुस्तु भगवन्तं हुताशनम्।
पुरस्तादक्षयौ दत्तौ तूणौ येनास्य खाण्डवे ।। ४६
किं नु मोक्ष्यामि धनुषा यन्मे बाणाः क्षयं गताः।
अयं च पुरुषः कोऽपि बाणान् ग्रसति सर्वशः ।। ४७

हत्वा चैनं धनुष्कोटया शूलाग्रेणेव कुञ्जरम् ।
नयामि दण्डधारस्य यमस्य सदनं प्रति ।। ४८
प्रगृह्याथ धनुष्कोटया ज्यापाशेनावकृष्य च ।
मुष्टिभिश्चापि हतवान् वज्रकल्पैर्महाद्युतिः ।। ४९
संप्रयुद्धो धनुष्कोटया कौन्तेयः परवीरहा ।
तदप्यस्य धनुर्दिव्यं जग्राह गिरिगोचरः ।। ५०
ततोऽर्जुनो ग्रस्तधनुः खड्गपाणिरतिष्ठत ।
युद्धस्यान्तमभीप्सन् वै वेगेनाभिजगाम तम् ।। ५१
तस्य मूर्ध्नि शितं खड्गमसक्तं पर्वतेष्वपि ।
मुमोच भुजवीर्येण विक्रम्य कुरुनन्दनः ।। ५२
तस्य मूर्धानमासाद्य पफालासिवरो हि सः ।
ततो वृक्षैः शिलाभिश्च योधयामास फाल्गुनः ।। ५३
तदा वृक्षान् महाकायः प्रत्यगृह्णादथो शिलाः ।
किरातरूपी भगवाँस्ततः पार्थो महाबलः ।। ५४
मुष्टिभिर्वज्रसंकाशैः धूममुत्पादयन् मुखे ।
प्रजहार दुराधर्षे किरातसमरूपिणि ।। ५५
ततः शक्राशनिसमैर्मुष्टिभिर्भृशदारुणैः ।
किरातरूपी भगवानर्दयामास फाल्गुनम् ।। ५६
ततश्चटचटाशब्दः सुघोरः समपद्यत ।
पाण्डवस्य च मुष्टीनां किरातस्य च युध्यतः ।। ५७
सुमुहूर्तं तु तद्युद्धमभवल्लोमहर्षणम् ।
भुजप्रहारसंयुक्तं वृत्रवासवयोरिव ।। ५८
जघानाथ ततो जिष्णुः किरातमुरसा बली ।
पाण्डवं च विचेष्टन्तं किरातोप्यहनद् बली ।। ५९
तयोर्भुजविनिष्पेषात् संघर्षेणोरसोस्तथा ।
समजायत गात्रेषु पावकोऽङ्गारधूमवान् ।। ६०

—महाभारत, वनपर्व अध्याय ३९

"किराताचें तें बोलणें ऐकून अर्जुनाला अतिशय राग आला व त्यानें त्याच्यावर बाणप्रहार करावयास प्रारंभ केला. किरातानें सारे प्रहार शांतपणें स्वीकारले ; इतकेंच नव्हे तर 'आणखी, आणखी' म्हणून तो त्याला हेटाळणीनें चिडवूं लागला. जों जों अर्जुन किरातावर बाणप्रहार करी तों तों त्यानें म्हणावें, "अरे

मूर्खा, हे मर्मभेदक बाण आणखी टाक, तेवढयानें काय झालें!" चिडून अर्जुनानें बाणांची अधिक वृष्टि करावयास प्रारंभ केला. किरातानेंही आपले कांहीं बाण अर्जुनाच्या अंगावर टाकले. दोघांचेही सर्पाकृति बाण एकमेकांचें अंग तासून काढण्यासाठींच जणूं स्पर्धा करीत होते. अर्जुनानें जों जों बाणवृष्टि केली तों तों भगवान् शंकरांनीं प्रसन्न चित्तानें तिचा स्वीकार केला. मुहूर्तभर एकसारखी अर्जुनाची बाणवृष्टि चालू होती. पण एकाद्या पर्वताप्रमाणें भगवान् शंकर स्थिर उभे होते. त्यांच्या शरीरावर ओरखडा देखील उठला नाहीं. आपला सारा बाणवर्षाव व्यर्थ गेला असें पाहून अर्जुनाला मोठें आश्चर्य वाटलें व त्यानें 'साधु साधु' असें म्हणून किराताची प्रशंसा केली. तो मनाशीं म्हणूं लागला कीं, हा हिमाचलाच्या शिखराचा आश्रय करून राहिलेला अत्यंत सुकुमार शरीराचा किरात मुळींच विव्हल न होतां गांडीव धनुष्यापासून सुटलेल्या बाणांचा आघात सहन करीत आहे हें केवढें आश्चर्य आहे? हा कोण असेल बरें? हा मनुष्य असणें तर शक्य नाहीं. हा कुणी तरी देवच असला पाहिजे. साक्षात् भगवान् शंकर तर या रूपानें येथें आले नसतील ना! किंवा यक्ष, देव अथवा दानव यांपैकीं तर हा कुणी नसेल ना! हिमालयावर वारंवार देवांच्या गांठी पडतात असें म्हणतात. एरव्हीं माझ्या सहस्रशः बाणांचा वेग सहन करावयाचें सामर्थ्य पिनाक धनुष्य हातांत धारण करणाऱ्या भगवान् शंकरांवांचून दुसऱ्या कुणांतही नाहीं. केवळ भगवान् महादेव सोडून हा दुसरा कुणीही देव किंवा यक्ष असला तरी मी माझ्या तीक्ष्ण बाणांनीं त्याला यमलोकीं नेल्यावांचून रहाणार नाहीं असें म्हणून अर्जुनानें सूर्यानें किरणजाल टाकावें त्याप्रमाणें मर्मभेदी बाणांची एकसारखी वृष्टि चालविली. ज्याप्रमाणें पर्वत गारांचा वर्षाव सहन करतो त्याप्रमाणें भगवान् शंकरांनीं आनंदानें ती सारी वृष्टि सहन केली. ती बाणवृष्टि चालू असतां आपले बाण कधीं संपणें शक्य आहे अशी शंका देखील अर्जुनाच्या मनांत आली नाहीं. कारण त्याचे भाते अक्षय्य होते व अग्नीनें ते त्याला दिलेले होते. पण कधीं नाहीं तें आश्चर्य त्या वेळीं घडून आलें. आपले बाण संपत

आल्याचें अर्जुनाच्या दृष्टोत्पत्तीस आलें. ती अपूर्व गोष्ट पहातांच त्याला आश्चर्य वाटलें व त्याच्या अन्तःकरणांत भय उत्पन्न झालें. तो मनांत म्हणूं लागला कीं खाण्डव वनाच्या दाहानें संतुष्ट होऊन अग्नीनें मला हे भाते ज्या वेळीं दिले त्या वेळीं त्यांतील बाण कधींही संपणार नाहींत असें त्यानें मला अभिवचन दिलें होतें. देवाचें हें वरदान खोटें व्हावें हें मोठें आश्चर्य आहे. बाणच जर संपले तर गाण्डीव धनुष्य केवढेंही दिव्य असलें तरी त्याचा उपयोग काय? मी आतां ह्या धनुष्यांतून सोडूं काय? हा किरात मात्र अतिशयच आश्चर्यकारक आहे. हा सारखे माझे बाणच गिळंकृत करीत आहे. पण या चिंतामग्न स्थितींतही युद्धांत माघार घेण्याचा विचार देखील अर्जुनाच्या मनांत आला नाहीं. तो म्हणूं लागला, बाण संपले तरी हरकत नाहीं. मी माझ्या धनुष्याच्या कोटीनेंच त्याच्यावर प्रहार करीन. शूलाच्या प्रहारानें हत्तीला ठार मारावें त्याप्रमाणें धनुष्यप्रहारानें मीं ह्याला ठार मारल्याखेरीज रहाणार नाहीं. लगेच अर्जुनानें किरातावर धनुष्य मारून प्रत्यंचेनें त्याला ओढलें व वज्रासारख्या तीक्ष्ण मुष्टिप्रहारांनीं तो त्याला मारूं लागला. हंसत हंसत भगवान् शंकरांनीं त्याचें तें दिव्य धनुष्यही गुप्त करून टाकलें. गाण्डीवासारखें धनुष्य व अक्षय्य भात्यांतील बाणांसारखे बाण नाहींसे झाल्यावर अर्जुनाऐवजीं कर्ण असता तर त्यानें पलायनाचा मार्ग निश्चित अवलंबिला असता. पण अर्जुनाच्या मनांतही तो विचार आला नाहीं. आतां त्याच्याजवळ एकच हत्यार उरलें होतें, व तें म्हणजे खड्ग. त्यानें आपलें खड्ग उपसलें व युद्धाचा अंत करून टाकावा म्हणून वेगानें तो किराताच्या अंगावर धांवून गेला. तें तीक्ष्ण खड्ग बाहूंतील सर्व बळ खर्च करून त्यानें किराताच्या मस्तकावर मारलें. त्याचा परिणाम काय झाला? किराताच्या मस्तकाचे तुकडे पडले काय? छे, छे, उलट अर्जुनाच्या खड्गाचे मात्र तुकडे उडाले. तरीही माघार घेण्याची कल्पना देखील क्षात्रधर्माच्या त्यां मूर्त आविष्काराच्या अंतःकरणाला शिवली नाहीं. त्यानें दिसतील ते वृक्ष व शिलाखंड उचलून त्यांनींच किरातावर

प्रहार करावयास प्रारंभ केला. पण किरातरूपी भगवंतांनीं बाणांप्रमाणें त्याही सर्वांचा ग्रास करून टाकला. शेवटीं अर्जुनानें किराताशीं अंगावर रोमांच उत्पन्न करणारें भीषण मुष्टियुद्ध आरंभिलें. भगवंतांनींही त्याच्यावर मुष्टींचे उलट आघात करावयास सुरुवात केली. दोघांच्याही मष्टींचा मोठमोठा शब्द होऊं लागला. एकमेकांच्या आघातांनीं व त्यांच्या भुजांच्या आणि मांड्यांच्या मल्लयुद्धांतील परस्परघर्षणानें ठिणग्या बाहेर पडूं लागल्या." इतकें भीषण महायुद्ध करून शेवटपर्यंत मागें न हटण्याचें व्रत चालविणारा पार्थ भगवान् शंकरांना आपल्या महास्त्रासाठीं योग्य शिष्य वाटला असल्यास नवल नाहीं. शेवटीं सायंपूजेच्या वेळीं पार्थिवाला वाहिलेलें पूजासाहित्य किराताच्या मस्तकीं पाहून अर्जुनाला भगवंतांची ओळख पटली व त्यानें शंकरांना साष्टांग नमस्कार घातला. श्रीशंकर त्याच्यावर इतके प्रसन्न झाले कीं त्यांनीं त्याच्या धैर्याची मुक्तकंठानें प्रशंसा चालविली, इतकेंच नव्हे तर स्वतःशींही त्याची तुलना करावयास मागेंपुढें पाहिलें नाहीं. भगवान् म्हणाले:—

**भो भो फाल्गुन तुष्टोऽस्मि कर्मणाऽप्रतिमेन ते ।**
**शौर्येणानेन धृत्या च क्षत्रियो नास्ति ते समः ।। ६८**
**समं तेजश्च वीर्यं च ममाद्य तव चानघ ।**
**प्रीतस्तेऽहं महाबाहो पश्य मां भरतर्षभ ।। ६९**

—महाभारत, वनपर्व अध्याय ३९

" हे अर्जुना, तुझ्या ह्या अप्रतिम कर्मानें, शौर्यानें व धैर्यानें मी अत्यंत प्रसन्न झालों आहें. तुझ्यासारखा कुणीही क्षत्रिय नाहीं. तुझें तेज, वीर्य व पराक्रम माझ्यासारखाच आहे. हे महाबाहो मी तुझ्यावर अत्यंत प्रसन्न आहें. तूं मला पहा." अर्जुनानें भगवान् शंकराचें मोठें स्तवन केलें. भगवंतांनीं त्याला गाढ आलिंगन देऊन त्याची भुक्त केलेलीं सर्व शस्त्रास्त्रें त्याला परत दिलीं व वर मागावयास सांगितलें. अर्जुनानें त्यांचें पाशुपतास्त्र त्यांना मागितलें. भगवान् शंकर त्याला म्हणाले :—

**ददामि तेऽस्त्रं दयितमहं पाशुपतं विभो ।**
**समर्थो धारणे मोक्षे संहारे चासि पाण्डव ।। १५**

**नैतद्वेद महेन्द्रोऽपि न यमो न च यक्षराट् ।**
**वरुणोप्यथवा वायुः कुतो वेत्स्यन्ति मानवाः ।। १६**
**न त्वेतत्सहसा पार्थ मोक्तव्यं पुरुषे क्वचित् ।**
**जगद्विनाशयेत्सर्वमल्पतेजसि पातितम् ।। १७**
**अवध्यो नाम नास्त्यत्र त्रैलोक्ये सचराचरे ।**
**मनसा चक्षुषा वाचा धनुषा च निपातयेत् ।। १८**

—महाभारत, वनपर्व अध्याय ४०

" हे पार्था, मी तुला माझें अत्यंत प्रिय असें जें पाशुपतास्त्र तें देतों. तें अस्त्र धारण करावयास, तें सोडावयास व त्याचा उपसंहार करावयास तूं सर्वस्वीं योग्य आहेस. महेन्द्र, यमधर्म, कुबेर, वरुण अथवा वायु या देवतांनाही हें अस्त्र माहीत नाहीं. मग मानवांची कथाच काय ? पण पार्था, या अस्त्राच्या बाबतींत मी तुला एक महत्त्वाची चेतावणी देतों. ती ही कीं वाटेल त्या माणसावर या अस्त्राचा विचार न करतां तूं प्रयोग करूं नकोस. अल्पसामर्थ्याच्या व्यक्तीवर या अस्त्राचा प्रहार केला तर तें संपूर्ण जगाचा विनाश केल्याशिवाय रहाणार नाहीं. या अस्त्राला या सर्व त्रैलोक्यांत अवध्य अशी कोणतीही शक्ति नाहीं. याचा प्रयोग केवळ धनुष्य-बाणांनींच होतो असेंही नाहीं. नुसत्या मानसिक संकल्पानें, डोळ्यांनीं, वाणीनें व धनुष्यबाणांनींही या अस्त्राचा प्रयोग करून शत्रूला मारतां येतें." भगवान् शंकरांनीं नंतर गुरु म्हणून अर्जुनाला अस्त्रोपदेश केला. अर्जुनाचें केवढें हें अलौकिक भाग्य आहे कीं भगवान् शंकरांसारखा त्रैलोक्याचा स्वामी गुरू म्हणून त्याला लाभला. केवळ आत्मविश्वास व धैर्य यांच्या भरंवशावर त्यानें हें अलौकिक सामर्थ्य मिळविलें. इतका हा त्याचा गुण देदीप्यमान होता. मोठमोठ्या संकटांच्या प्रसंगींही न डगमगणारा आत्मविश्वास ही अर्जुनाची नैसर्गिक देणगी होती. उत्तरगोग्रहणाच्या वेळीं उत्तर ज्या वेळीं अर्जुनाला असें म्हणूं लागला कीं,

**एकस्त्वं पाण्डवश्रेष्ठ बहूनेतान् महारथान् ।।**
**कथं जेष्यसि सङ्ग्रामे सर्वशस्त्रास्त्रपारगान् ।। ३३**
**असहायोऽसि कौन्तेय ससहायाश्च कौरवाः ।**
**अत एव महाबाहो भीतस्तिष्ठामि तेऽग्रतः ।। ३४**

—महाभारत, विराटपर्व अध्याय ४५

"हे पांडवश्रेष्ठा, तूं एकटा आहेस व हे अनेक महारथी येथें जमले आहेत. तूं एकटा या शस्त्रास्त्रपारंगत अशा सर्व महारथ्यांना कसा जिंकू शकशील ? तुला कोणाचेंही साहाय्य नाहीं व कौरव तर अत्यंत मोठ्या सैन्यानिशीं येथें आले आहेत. म्हणून मला अत्यंत भीति वाटते." त्याबरोबर हसून अर्जुनानें त्याचें आश्वासन केलें व रुक्मीला जें उत्तर दिलें होतें तेंच त्यालाही देऊन त्यानें त्याचें भय संपूर्णपणें नष्ट करून टाकलें. त्याच्या धैर्याची व विलक्षण आत्मप्रत्ययाची महाभारताच्या द्रोणपर्वांत एक प्रकारें कसोटीच लागण्याचा प्रसंग वर्णिलेला आहे. अभिमन्यूच्या वधानंतर शोकसंतप्त झालेल्या अर्जुनानें त्याचा वध झाला कसा म्हणून व मुलगा मरत असतां तुम्ही भीरूप्रमाणें रणांगणाच्या बाहेर कां राहिलांत म्हणून ज्या वेळीं आपल्या बंधूंची निर्भर्त्सना चालविली, त्या वेळीं युधिष्ठिरांनीं त्याला असें सांगितलें कीं, आम्ही सर्व अभिमन्यूनें केलेल्या चक्रव्यूहाच्या प्रवेश मार्गांतून आंत जात असतां भगवान् महादेवाच्या वरदानानें प्रबल झालेल्या सिंधुराज जयद्रथानें आम्हांला अडविलें व त्यामुळें अभिमन्यूला साहाय्य करणें आम्हांला शक्य झालें नाहीं. हें ऐकतांच जयद्रथ हाच आपल्या पुत्राच्या वधाचें कारण होय असें अर्जुनाच्या मनानें घेतलें व पुत्राचा सूड घेण्यासाठीं त्याला ठार करावें अशी प्रबळ इच्छा त्याच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली. क्रोध व शोक या संमिश्र भावनांनीं तळहातावर तळहात घाशीत जोरजोरानें निःश्वास टाकीत व डोळ्यांतून अश्रूधारा वाहवीत त्यानें अशी प्रतिज्ञा केली कीं,

**सत्यं वः प्रतिजानामि श्वोऽस्मि हन्ता जयद्रथम् ।**
**न चेद् वधभयाद्भीतो धार्तराष्ट्रान् प्रहास्यति ॥ २०**
**न चास्मान् शरणं गच्छेत् कृष्णं वा पुरुषोत्तमम् ।**
**भवन्तं वा महाराज श्वोऽस्मि हन्ता जयद्रथम् ॥ २१**
**धार्तराष्ट्रप्रियकरं मयि विस्मृतसौहृदम् ।**
**पापं बालवधे हेतुं श्वोऽस्मि हन्ता जयद्रथम् ॥ २२**
**रक्षमाणाश्च तं सङ्ख्ये ये मां योत्स्यन्ति केचन ।**
**अपि द्रोणकृपौ राजन् छादयिष्यामि ताञ्छरैः ॥ २३**

यद्येतदेवं सङ्ग्रामे न कुर्यां पुरुषर्षभाः ।
मा स्म पुण्यकृतां लोकान् प्राप्नुयां शूरसंमतान् ।। २४
ये लोका मातृहन्तॄणां ये चापि पितृघातिनाम् ।
गुरुदारगतानां ये पिशुनानां च ये सदा ।। २५
साधूनसूयतां ये च ये चापि परिवादिनाम् ।
ये च निक्षेपहर्तॄणां ये च विश्वासघातिनाम् ।। २६
धर्मादपेता ये चान्ये मया नात्रानुकीर्तिताः ।
ये चानुकीर्तितास्तेषां गतिं क्षिप्रमवाप्नुयाम् ।। ४५
यदि व्युष्टामिमां रात्रिं श्वो न हन्यां जयद्रथम् ।
इमां चाप्यपरां भूयः प्रतिज्ञां मे निबोधत ।। ४६
यद्यस्मिन्नहते पापे सूर्योऽस्तमुपयास्यति ।
इहैव संप्रवेष्टाऽहं ज्वलितं जातवेदसम् ।। ४७
असुरसुरमनुष्याः पक्षिणो वोरगा वा
पितृरजनिचरा वा ब्रह्मदेवर्षयो वा ।
चरमचरमपीदं यत्परं चापि तस्मात्
तदपि मम रिपुं तं रक्षितुं नैव शक्ताः ।। ४८
यदि विशति रसातलं तदग्र्यं वियदपि देवपुरं दितेः पुरं वा ।
तदपि शरशतैरहं प्रभातेभृशमभिमन्युरिपोः शिरोऽभिहर्ता ।। ४९
एवमुक्त्वा विचिक्षेप गाण्डीवं सव्यदक्षिणम् ।
तस्य शब्दमतिक्रम्य धनुःशब्दोऽस्पृशद् दिवम् ।। ५०

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय ७३

"मी आपणांसमोर अशी प्रतिज्ञा करतों कीं, उद्यां मी जयद्रथाला ठार मारीन. जर जयद्रथ भिऊन दुर्योधनाचा पक्ष सोडून पळून न गेला; जर तो आम्हांला, महाराज युधिष्ठिरांना अथवा पुरुषोत्तम श्रीकृष्णाला शरण न आला, तर मी उद्यां खात्रीनें त्याला ठार मारीन. आमचें सारें सौहार्द विसरून दुर्योधनाचें प्रिय करण्यासाठीं त्या पाप्यानें बालवध घडविला आहे. मी त्याला निश्चित ठार करीन. जे कोणी त्याचें संरक्षण करण्यासाठीं माझ्याशीं युद्ध करावयास प्रवृत्त होतील, ते प्रत्यक्ष माझे गुरु द्रोण व कृप जरी असले तरीही मी त्यांना माझ्यां बाणजालांनीं झाकून टाकीन. हे पुरुषर्षभांनो, उद्यांच्या संग्रामांत मी हें कृत्य जर न केलें तर शूर व

पुण्यवान् लोकांची गति मला कधींही प्राप्त होणार नाहीं. उलट मातृघातकी, पितृघातकी, गुरुपत्नीच्या इभ्रतीवर डोळा ठेवणारे, पिशुन, सज्जनांचा मत्सर करणारे, निंदक, दुसऱ्याची ठेव दडपून टाकणारे व विश्वासघातकी अशा लोकांची गति मला प्राप्त होईल. मी ज्यांचा उच्चार केला नाहीं अशाही पापी लोकांची गति भ्रष्टप्रतिज्ञ होणाऱ्या मला निश्चित प्राप्त होईल. आणखी दुसरी प्रतिज्ञा मी करतों. उद्यां सूर्यास्तापर्यंत या पाप्याचा जर मी वध केला नाहीं, तर तुम्हा सगळ्यांसमक्ष मी अग्नींत प्रवेश करून स्वतःला दग्ध करून घेईन. दैत्य, देव, मनुष्य, पक्षी, सर्प, पितृदेवता, राक्षस, ब्रह्मर्षि, देवर्षि, अथवा चराचरांत कोणतीही अशी शक्ति नाहीं कीं, जी माझ्या शत्रूचें संरक्षण करूं शकेल. तो जगांत कोठेंही गुप्त राहिला तरी मी रसातलापासून स्वर्गापर्यंत सर्व चराचराचा माझ्या बाणांनीं वेध करून त्याचा शिरच्छेद करीन, असें म्हणून त्यानें गांडीव धनुष्याचा टणत्कार केला." तो ऐकतांच भगवान् श्रीकृष्ण त्या वेळीं त्याला कांहीं बोलले नाहींत, पण त्यानंतर रात्रीं अर्जुनाची गांठ घेऊन त्यांनीं त्याला म्हटलें कीं :-

भ्रातृणां मतमज्ञाय त्वया वाचा प्रतिश्रुतम् ।
सैन्धवं चास्मि हन्तेति तत्साहसमिदं कृतम् ।। २
असंमन्त्र्य मया सार्धमतिभारोऽयमुद्यतः ।
कथं तु सर्वलोकस्य नावहास्या भवेमहि ।। ३
धार्तराष्ट्रस्य शिबिरे मया प्रणिहिताश्चराः ।
त इमे शीघ्रमागम्य प्रवृत्तिं वेदयन्ति नः ।। ४
स राज्ञा स्वयमाचार्यो भृशमभ्यर्थितोऽर्जुन ।
संविधानं च विहितं रथाश्च किल सज्जिताः ।। २५
कर्णो भूरिश्रवा द्रौणिर्वृषसेनश्च दुर्जयः ।
कृपश्च मद्रराजश्च षडेतेऽस्य पुरोगमाः ।। २६
शकटः पद्मकश्चार्धो व्यूहो द्रोणेन निर्मितः ।
पद्मकर्णिकमध्यस्थः सूची पार्श्वे जयद्रथः ।। २७
स्थास्यते रक्षितो वीरैः सिन्धुराट् स सुदुर्मदः ।
धनुष्यस्त्रे च वीर्ये च प्राणे चैव तथौरसे ।। २८

अविषह्यतमा ह्येते निश्चिताः पार्थ षड्रथाः ।
एतानजित्वा षड्रथान्नैव प्राप्यो जयद्रथः ।। २९
तेषामेकैकशो वीर्यं षण्णां त्वमनुचिन्तय ।
सहिता हि नरव्याघ्र न शक्या जेतुमञ्जसा ।। ३०
भूयस्तु मंत्रयिष्यामि नीतिमात्महिताय वै ।
मन्त्रज्ञैः सचिवैः सार्धं सुहृद्भिः कार्यसिद्धये ।। ३१

—महारभात, द्रोणपर्व अध्याय ७५

"हे अर्जुना, आपल्या बंधूंचें मत मुळींच न घेतां जयद्रथाच्या वधाची तूं जी ही प्रतिज्ञा केली आहेस ती करण्यांत तूं फार मोठें साहस केलें आहेस. माझ्याशीं कांहींएक विचारविनिमय न करतां केवढा मोठा भार तूं अकारण उचललास! जर प्रतिज्ञा खोटी ठरली तर आपण सर्व लोकांत हास्यास्पद ठरल्याखेरीज राहाणार नाहीं. आपण हास्यास्पद कसे ठरणार नाहीं हाच विचार माझ्या मनांत एकसारखा घोळत आहे. दुर्योधनाच्या शिबिरांत मी ठेविलेल्या माझ्या हेरांनीं मला आतांच येऊन असें सांगितलें कीं, तुझी प्रतिज्ञा आपल्या सेनेंतील गर्जनांनीं कौरवांच्या शिबिरांत कळली असून ती ऐकून घाबरलेल्या जयद्रथानें व त्याच्यासहित दुर्योधनानेंही द्रोणाचार्यांची प्रार्थना केली व द्रोणांनींही संरक्षणाचें त्यांना आश्वासन दिलें. द्रोणाचार्यांनीं त्याच्या संरक्षणासाठीं योजना केली असून सिद्धता केली आहे. शकट व पद्म यांचे मिश्र व्यूह त्यांनीं निर्माण केले असून पद्मव्यूहाच्या कर्णिकेच्या मध्यभागीं राजा जयद्रथ राहावयाचा आहे. कर्ण, भूरिश्रवा, अश्वत्थामा, वृषसेन व कृपाचार्य हे सहा महारथी त्याच्या संरक्षणासाठीं फळी उभारून् उभे राहणार आहेत. हे सहाही महारथी धनुष्य, अस्त्र, पराक्रम, शारीरिक बल इत्यादि सर्व बाबतींत अत्यंत श्रेष्ठ असून त्यांचा पराक्रम सहन करावयास अत्यंत कठिण आहे. या सहा महारथ्यांना जिकल्यावांचून जयद्रथापर्यंत जाऊन पोहोंचतां येणें अशक्य आहे. यांपैकीं एकेकालाही सहज जिंकून बाजूला करणें कठीण असतां या सहा जणांची शक्ति एकवटल्यावर त्यांना जिंकणें किती कठिण आहे हें सांगावयासच नको. या सर्व गोष्टींचा तूं कांहीं विचार केला आहेस

काय? धैर्य देण्याऐवजीं भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाशीं हें बोलावयास प्रारंभ करतांच शोकमग्न मनःस्थितींत त्याचा उत्साह वास्तविक खचून जावयास पाहिजे. पण त्याऐवजीं श्रीकृष्णांना उत्तर देतांना अर्जुन म्हणतो :–

षड्रथान् धार्तराष्ट्रस्य मन्यसे यान् बलाधिकान् ।
तेषां वाय ममार्धेन न तुल्यमिति मे मतिः ॥ १
अस्त्रमस्त्रेण सर्वेषामेतेषां मधुसूदन ।
मया द्रक्ष्यसि निर्भिन्नं जयद्रथवधैषिणा ॥ २
द्रोणस्य मिषतश्चाहं सगणस्य विलप्यतः ।
मूर्धानं सिन्धुराजस्य पातयिष्यामि भूतले ॥ ३
यदि साध्याश्च रुद्राश्च वसवश्च सहाश्विनः ।
मरुतश्च सहेन्द्रेण विश्वेदेवाः सहेश्वराः ॥ ४
पितरः सह गन्धर्वाः सुपर्णाः सागरादयः ।
द्यौर्वियत् पृथिवी चेयं दिशश्च स दिगीश्वराः ॥ ५
ग्रामारण्यानि भूतानि स्थावराणि चराणि च ।
त्रातारः सिन्धुराजस्य भवन्ति मधुसूदन ॥ ६
तथापि बाणैर्निहतं श्वो द्रष्टाऽसि रणे मया ।
सत्येन च शपे कृष्ण तथैवायुधमालभे ॥ ७
यस्य गोप्ता महेष्वासस्तस्य पापस्य दुर्मतेः ।
तमेव प्रथमं द्रोणमभियास्यामि केशव ॥ ८
तस्मिन् द्यूतमिदं बद्धं मन्यते स सुयोधनः ।
तस्मात् तस्यैव सेनाग्रं भित्वा यास्यामि सैन्धवम् ॥ ९
द्रष्टाऽसि श्वो महेष्वासान् नाराचैस्तिग्मतेजितैः ।
शृङ्गाणीव गिरेर्वज्रैः दार्यमाणान् मया युधि ॥ १०
नरनागाश्वदेहेभ्यो विस्रविष्यति शोणितम् ।
पतद्भ्यः पतितेभ्यश्च विभिन्नेभ्यः शितैः शरैः ॥ ११
गाण्डीवप्रेषिता बाणा मनोऽनिलसमा जवे ।
नृनागाश्वान् विदेहासून् कर्तारश्च सहस्रशः ॥ १२
यमात् कुबेराद् वरुणादिन्द्राद् रुद्राच्च यन्मया ।
उपात्तमस्त्रं घोरं तद् द्रष्टारोऽत्र नरा युधि ॥ १३
ब्रह्मेणास्त्रेण चास्त्राणि हन्यमानानि संयुगे ।
मया द्रष्टासि सर्वेषां सैन्धवस्याभिरक्षिणाम् ॥ १४

शरवेगसमुत्कृत्तै राज्ञां केशव मूर्धभिः ।
आस्तीर्यमाणां पृथिवीं द्रष्टाऽसि श्वो मया युधि ॥ १५
क्रव्यादांस्तर्पयिष्यामि द्रावयिष्यामि शात्रवान् ।
सुहृदो नन्दयिष्यामि प्रमथिष्यामि सैन्धवम् ॥ १६
बह्वागस्कृत्कुसंबन्धी पापदेशसमुद्भवः ।
मया सैन्धवको राजा हतस्वान् शोचयिष्यति ॥ १७
सर्वक्षीरान्नभोक्तारं पापाचारं रणाजिरे ।
मया सराजकं बाणैर्भिन्नं द्रक्ष्यसि सैन्धवम् ॥ १८
तथा प्रभाते कर्ताऽस्मि यथा कृष्ण सुयोधनः ।
नान्यं धनुर्धरं लोके मंस्यते मत्समं युधि ॥ १९
गाण्डीवं च धनुर्दिव्यं योद्धा चाहं नरर्षभ ।
त्वं च यन्ता हृषीकेश किं नु स्यादजितं मया ॥ २०
तव प्रसादाद् भगवन् किं नावाप्तं रणे मम ।
अविषह्यं हृषीकेश किं जानन्मां विगर्हसे ॥ २१
यथा लक्ष्म स्थिरं चन्द्रे समुद्रे च यथा जलम् ।
एवमेतां प्रतिज्ञां मे सत्यां विद्धि जनार्दन ॥ २२
मावमंस्था ममास्त्राणि मावमंस्था धनुर्दृढम् ।
मावमंस्था बलं बाह्वोर्मावमंस्था धनञ्जयम् ॥ २३
तथाभियामि सङ्ग्रामं न जीयेयं जयामि च ।
तेन सत्येन सङ्ग्रामे हतं विद्धि जयद्रथम् ॥ २४

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय ७६

" हे श्रीकृष्णा, दुर्योधनाच्या ज्या सहा महारथ्यांना तूं बलवान् समजतोस, त्यांची माझ्या अर्ध्या बळाइतकी देखील योग्यता नाहीं. जयद्रथाच्या वधाची इच्छा करणाऱ्या माझ्याकडून त्या सर्वांच्या अस्त्रांचें अस्त्रप्रयोगानेंच निखंदन केलेलें तूं पहाशील. द्रोणाचार्य पहात असतां व गणांसहित विलाप करीत असतां जयद्रथाचें मस्तक तोडून मी निश्चित जमिनीवर पाडीन. साध्य, रुद्र,, वसू, अश्विनी-कुमार, मरुद्गणांसहित इंद्र, महेश्वरांसहित विश्वेदेव इत्यादि जगतां-तील यच्चयावत् शक्ति जयद्रथाचें रक्षण करावयास पुढें आल्या तरी देखील माझ्या बाणांनीं मी जयद्रथाला ठार केल्याचें तूं पहाशील. मी शपथपूर्वक प्रतिज्ञा करतों. आम्हां क्षत्रियांचें दैवत जें

आयुध त्याला स्पर्श करून मी पुन्हां प्रतिज्ञा करतों कीं, मी उद्यां जयद्रथाला निश्चित ठार मारीन. महान् धनुष्य हातांत घेऊन द्रोण त्याचें संरक्षण करणार आहेत ना ? उद्यां प्रथम मी द्रोणांचीच गांठ घेईन. दुर्योधनानें या युद्धाची भिस्त द्रोणाचार्यांच्यावर ठेवली आहे. म्हणून प्रथम त्यांच्या सैन्याचेंच विदारण करून मी जयद्रथावर चालून जाईन. उद्यां वज्रानें पर्वताचीं शिखरें तोडावीं त्या प्रमाणें मोठमोठ्या धनुर्धरांना मी आपल्या बाणांनीं तोडलेले तूं पहाशील. गांडीवापासून निघालेल्या व मन आणि वायूप्रमाणें वेगवान् असलेल्या माझ्या बाणांनीं उद्यां रणांगणावरून रक्ताचे पूर वाहविले जातील व प्रेतांचे खच पडतील. यम, कुबेर, वरुण, इंद्र व महारुद्र यांच्यापासून मी जीं घोर अस्त्रें मिळविलीं त्यांचा प्रभाव उद्यां लोकांना दिसेल. मी माझ्या ब्रह्मास्त्रानें जयद्रथाचें रक्षण करणाऱ्या लोकांचीं सर्व अस्त्रें नष्ट करीत असतां तूं पहाशील. माझ्या बाणांनीं तोडून जमिनीवर पाडलेलीं राजांचीं मस्तकें सारी पृथ्वी व्यापितील. उद्यां मी रक्त व मांसावर उपजीविका करणाऱ्या प्राण्यांना तृप्त करीन; शत्रूंना पळवून लावीन; सुहृदांना आनंद देईन; व सिंधु राजाचें प्रमथन करीन. उद्यां सकाळीं मी असें कर्म करीन, कीं ज्यामुळें दुर्योधनाला माझ्यासारखा दुसरा कोणीही धनुर्धर नाहीं असें निश्चित वाटेल. हे हृषीकेशा गाण्डीवासारखें दिव्य धनुष्य, माझ्यासारखा योद्धा, व तुझ्यासारखा सारथि असतां जगांत न जिंकलें जाण्यासारखें काय असूं शकेल ? हे भगवन्, तुझ्या प्रसादानें मला रणांत आजपर्यंत अलभ्य असें काय राहिलें आहे ? माझा पराक्रम माहीत असतां देखील जाणून बुजून तूं माझा उपहास कां करीत आहेस ? ज्याप्रमाणें चंद्रामध्यें शोभा व समुद्रामध्यें जल स्थिर आहे त्याचप्रमाणें माझी प्रतिज्ञाही स्थिर आहे, व ती सत्य होईल. माझ्या अस्त्रांचा, दृढ धनुष्याचा, बाहुबलाचा व व्यक्तिमत्त्वाचा तूं अवमान करूं नकोस. आजपर्यंत मी संग्रामांत कधींही जिंकला न जातां जर केवळ विजयच संपादन केला असेल तर त्या सत्यानें मी जयद्रथाला निश्चित ठार मारीन." केवढा हा विलक्षण आत्मप्रत्यय आहे ! या आत्मप्रत्ययाला साजेसाच अलौकिक

पराक्रम अर्जुनाच्या ठिकाणीं होता. त्याच्या पराक्रमाच्या घोषानें सारें महाभारत निनादित झालें आहे. अर्जुनाची विख्यात अशीं जीं दहा नांवें आहेत त्यांतलीं बहुतेक सर्व नांवें त्याच्या पराक्रमानें त्याला मिळालीं आहेत. अर्जुन, फाल्गुन, जिष्णु, किरीटी, श्वेतवाहन, बीभत्सु, विजय, कृष्ण, सव्यसाची, धनंजय हीं अर्जुनाचीं दहा नावें होत. ह्यांतलीं सात नांवें तरी केवळ पराक्रमानें अर्जुनाला मिळालीं आहेत. आपल्या ह्या विविध नांवांची उपपत्ति सांगत असतां विराट पर्वांत अर्जुन उत्तराला म्हणतो कीं: --

सर्वाञ्जनपदाञ्जित्वा वित्तमादाय केवलम् ।
मध्ये धनस्य तिष्ठामि तेनाहुर्मां धनंजयम् ॥ १३
अभिप्रयामि सङग्रामे यदहं युद्धदुर्मदान् ।
नाजित्वा विनिवर्तामि तेन मां विजयं विदुः ॥ १४
श्वेताः काञ्चनसन्नाहा रथे युज्यन्ति मे हयाः ।
सङग्रामे युध्यमानस्य तेनाहं श्वेतवाहनः ॥ १५
उत्तराभ्यां फल्गुनीभ्यां नक्षत्राभ्यामहं दिवा ।
जातो हिमवतः पृष्ठे तेन मां फाल्गुनं विदुः ॥ १६
पुरा शक्रेण मे दत्तं युध्यतो दानवर्षभैः ।
किरीटं मूर्ध्नि सूर्याभं तेनाहुर्मां किरीटिनम् ॥ १७
न कुर्यां कर्म बीभत्सं युध्यमानः कथञ्चन ।
तेन देवमनुष्येषु बीभत्सुरिति विश्रुतः ॥ १८
उभौ मे दक्षिणौ पाणी गाण्डीवस्य विकर्षणे ।
तेन देवमनुष्येषु सव्यसाचीति मां विदुः ॥ १९
पृथिव्यां चतुरन्तायां वर्णो मे दुर्लभः समः ।
करोमि कर्म शुक्लं च तस्मान्मामर्जुनं विदुः ॥ २०
अहं दुरापो दुर्धर्षो दमनः पाकशासनिः ।
तेन देवमनुष्येषु जिष्णुर्नामास्मि विश्रुतः ॥ २१
कृष्ण इत्येव दशमं नाम चक्रे पिता मम ।
कृष्णावदातस्य ततः प्रियत्वाद् बालकस्य वै ॥ २२

—महाभारत, विराटपर्व अध्याय ४४

"हे उत्तरा, सर्व जनपदांना जिंकून व त्यांच्या जवळून खंडणी म्हणून केवळ वित्त घेऊन मी धनौघाच्या मध्यभागीं उभा राहतों

म्हणून मला धनंजय म्हणतात. जर संग्रामांत युद्धदुर्मद लोकांवर मी चालून गेलों तर त्यांना जिंकल्यावांचून कधींही परत फिरत नाहीं म्हणून मला विजय असें म्हणतात. खोगिरांवर सोन्याचें काम केलेले असे पांढरे शुभ्र अश्व संग्रामांत युद्ध करीत असतां माझ्या रथाला जुंपलेले असतात म्हणून मला श्वेतवाहन म्हणतात. हिमाचलाच्या पायथ्याशीं दिवसां उत्तराफाल्गुनी नक्षत्रावर माझा जन्म झालेला असल्यामुळें फाल्गुन असें माझें नांव पडलें आहे. पूर्वी मोठमोठ्या दानवांशीं युद्ध करीत असतां इंद्रानें माझ्या मस्तकावर सूर्यासारखा तेजस्वी किरीट घातला म्हणून किरीटी असें माझें नांव पडलें आहे. युद्ध करीत असतां बीभत्स (घाणेरडें) कर्म मी कधींही करीत नाहीं. त्यामुळें मला सर्व लोक बीभत्सु असें म्हणतात. उजव्या व डाव्या हातांनीं मी गाण्डीव धनुष्याचें सारखेंच विकर्षण करीत असल्यामुळें मला सव्यसाची असें म्हणतात. माझ्या अंगकान्तीसारखी कान्ति अत्यंत दुर्लभ आहे व मी नेंहमीं विशुद्ध कर्मेंच करीत असतों म्हणून मला अर्जुन असें म्हणतात. मी दुराप, दुर्धर्ष व शत्रूंचें दमन करणारा आहे म्हणून मला जिष्णु असें म्हणतात. माझे वडील देवेन्द्र यांचें नांवही जिष्णु असल्यामुळें मला तेंच नांव वापरलें जातें. मी माझ्या वडिलांचा अत्यंत लाडका होतों त्यामुळें आकर्षण करणारा म्हणून व माझा वर्णही कृष्ण असल्यामुळें कृष्ण असें पित्यानेंच माझें नांव ठेवलें आहे."

अर्जुनाच्या पराक्रमासंबंधीं एक मोठी विलक्षण शंका अथवा विलक्षण स्वरूपाचा अपसमज सर्वत्र पसरलेला आढळतो. अर्जुन स्वतः विशेष पराक्रमी नसून केवळ भगवान् श्रीकृष्णांच्या साहाय्यामुळेंच तो यशस्वी ठरलेला आहे हा तो अपसमज होय. याच्या जोडीला दुसराही एक अपसमज आहे, व तो म्हणजे कर्ण अर्जुनापेक्षां अधिक पराक्रमी होता हा होय. महेन्द्रानें जर कर्णाचीं कवचकुंडलें हरण करण्याची वंचकता केली नसती व आयत्या वेळीं भूमींत त्याचें रथचक्र अडकलें असतां युद्धधर्म सोडून श्रीकृष्णांच्या सूचनेनूरूप अर्जुनानें त्याच्यावर भ्याडपणाचा प्रहार केला नसता, तर सरळ व शुद्ध द्वंद्वयुद्धांत झाला त्यापेक्षां उलटा परिणाम झाला

असता. कवच-कुंडलांच्या अपहरणानंतरही वंचनेनेंच अर्जुनाला त्यास मारावें लागलें ही घटना कर्णाच्या प्रभावाची व अर्जुनाच्या निष्प्रभतेचीच द्योतक आहे. तसेंच अर्जुनाचा प्रभाव भगवान् श्रीकृष्णांच्या साहाय्यावर अवलंबून आहे. भीष्म, कर्ण, भूरिश्रवा, भगदत्त इत्यादि मोठमोठ्या पराक्रमी व्यक्तींना अर्जुनानें जिंकिलें अथवा ठार मारलें तें श्रीकृष्णाच्याच प्रभावानें होय. हेंच वेगळ्या शब्दांत मांडावयाचें म्हणजे अर्जुन हा कर्णाप्रमाणें स्वायत्तसिद्धि नसून तो परायत्तसिद्धि आहे. श्रीकृष्ण अर्जुनांच्या जीवनांतून काढून टाका व मग पहा त्या जीवनांत काय उरतें तें. अर्जुनाला श्रीकृष्णांनीं मोठें करावयाचें ठरविलें म्हणून तो मोठा भासला. यापेक्षां त्याचें स्वतंत्र कर्तृत्व कांहीं नाहीं. हे दोन्ही अपसमजच असून महाभारत संहितेचें त्यांना पुढीलप्रमाणें उत्तर आहे :—

## अर्जुनानें केलेले कर्णाचे पराभव

वस्तुतः पहिल्या अपसमजाचें उत्तर याच व्याख्यानमालेंतील कर्णाच्या व्यक्तिचित्रणांत बरेंचसें आलें आहे. महाभारताच्या उपलब्ध संहितेकडे सूक्ष्मतेनें पाहिल्यास असें आढळून येतें कीं अर्जुनाबरोबर झालेल्या एकाही द्वंद्व वा संकुल युद्धांत कर्णानें अर्जुनाचा पराभव केलेला नसून उलट अर्जुनासमोर कर्णाला हार खाऊन प्रत्येक वेळीं पळून जावें लागलेलें आहे. इतकेंच नव्हे तर ज्या युद्धांत कर्णाचा पराभव होऊन त्याला त्याच्या सैन्यासहित व सहायकांसहित पळून जावें लागलें त्या प्रत्येक युद्धांत कोणाचेंही साहाय्य न घेतां एकट्या अर्जुनानें निर्विवादपणें विजय संपादन केला आहे. द्रोणाचार्यांच्या जवळून अस्त्रविद्या संपादन केल्यानंतर त्यांना द्यावयाची गुरुदक्षिणा म्हणून द्रुपदावर जेव्हां कुरु-पांडवांनीं स्वारी केली त्या वेळीं कुरुसैन्यांत कर्ण होता असा महाभारताच्या आदिपर्वांत उल्लेख आहे.

**दुर्योधनश्च कर्णश्च युयुत्सुश्च महाबलः ।**
**दुःशासनो विकर्णश्च जलसंधः सुलोचनः ।। ६**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १३८

हा कर्ण महारथी कर्ण नसून दुर्योधनाचा कर्ण नांवाचा बंधु असावा असें एकादा निरीक्षक म्हणण्याचा संभव आहे. कारण महा-

भारताच्या आदिपर्वांत (अ. ११७–३) दुर्योधनाच्या बंधूंच्या नांवांची जी यादी दिलेली आहे तिच्यांत कर्ण असें नांव आहे. पण द्रुपदावर हल्ला चढविणाऱ्या योद्ध्यांत ज्याचा उल्लेख येतो तो कर्ण दुर्योधनाचा बंधु नसून महारथी कर्णच असला पाहिजे असें महाभारतांतील (आदिपर्व अ. १३८–२१) या उल्लेखावरून वाटतें. कारण या श्लोकांत कर्णाच्या मागें 'महाबल' असें विशेषण आहे. दुर्योधनाचा बंधु जो कर्ण त्याचा उल्लेख महाभारतांत नांवांच्या यादीनंतर केवळ भीमानें ठार मारल्यावेळींच काय तो येतो व त्याला महाबल म्हणण्याचें कांहींच कारण नाहीं इतका तो अनुल्लेखनीय आहे. या युद्धांत पांडव बुद्ध्याच मागें राहिले हें मी सांगितलेंच आहे. द्रुपदानें कर्णासहित कौरवांचा खरपूस समाचार घेऊन त्यांना घाबरें केलें होतें. त्यानंतर पांडव युद्धांत पडले व अर्जुनानेंच द्रुपदाचा संपूर्णपणें पराजय करून त्याला बंदिस्त केलें.

**सबालवृद्धास्ते पौराः कौरवानभ्ययुस्तदा ।**
**श्रुत्वा सुतुमुलं युद्धं कौरवानेव भारत ।। २४**
**द्रवन्ति स्म नदन्ति स्म क्रोशन्तः पाण्डवान् प्रति ।**
**पाण्डवास्तु स्वनं श्रुत्वा आर्तानां लोमहर्षणम् ।। २५**
**तत उत्सृज्य तच्चापमाददानं शरावरम् ।**
**खड्गमुद्धृत्य कौन्तेयः सिंहनादमथाकरोत् ।। ५६**
**पाञ्चालस्य रथस्येषामाप्लुत्य सहसाऽपतत् ।**
**पाञ्चालरथमास्थाय अवित्रस्तो धनञ्जयः ।। ५७**
**विक्षोभ्याम्भोनिधिं पार्थस्तं नागमिव सोऽग्रहीत् ।**
**ततस्तु सर्वपञ्चाला विद्रवन्ति दिशो दश ।। ५८**

—महाभारत, आदिपर्व अध्याय १३८

याच तऱ्हेचा दुसरा प्रसंग घोषयात्रा प्रकरणांतील आहे. घोषयात्रेच्या प्रकरणांत वनवासी पांडवांना आपल्या ऐश्वर्याच्या प्रदर्शनानें लाजविण्यासाठीं कौरव गेले असतां त्यांच्याबरोबर कर्ण होता. मार्गांत चित्रसेन गंधर्व व कौरव यांचें भयंकर युद्ध जुंपलें असतां त्या युद्धांत कौरवांचा सेनापति कर्णच होता. पण त्याचा चित्रसेन गंधर्वानें पूर्णपणें पराजय करून त्याला पळ काढावयास लाविलें व दुर्योधनाला बंदी करून तो घेऊन गेला.

गन्धर्वैस्तु महाराज भग्ने कर्णे महारथे ।
सम्प्राद्रवच्चमूः सर्वा धार्तराष्ट्रस्य पश्यतः ।। १
तान् दृष्ट्वा द्रवतः सर्वान् धार्तराष्ट्रान् पराङ्मुखान् ।
दुर्योधनो महाराजो नासीत् तत्र पराङ्मुखः ।। २
तामापतन्तीं संप्रेक्ष्य गन्धर्वाणां महाचमूम् ।
महता शरवर्षेण सोऽभ्यवर्षदरिंदमः ।। ३
अचिन्त्य शरवर्षं तु गन्धर्वास्तस्य तं रथम् ।
दुर्योधनं जिघांसन्तः समन्तात् पर्यवारयन् ।। ४
युगमीषां वरूथं च तथैव ध्वजसारथी ।
अश्वांस्त्रिवेणुं तल्पं च तिलशो व्यधमच्छरैः ।। ५
दुर्योधनं चित्रसेनो विरथं पतितं भुवि ।
अभिद्रुत्य महाबाहुर्जीवग्राहमथाग्रहीत् ।। ६

—महाभारत, वनपर्व अध्याय २४२

शेवटीं अगतिक व लाजेनें तोंड काळें ठिक्कर पडलेले दुर्योधनाचे अमात्य युधिष्ठिराला शरण गेल्यानंतर त्याच्या आज्ञेनें अर्जुनानेंच गंधर्व चित्रसेनाचा सपशेल पराभव करून त्याला शरण आणलें व दुर्योधनाची सुटका करून त्याला त्या प्राणसंकटांतून वांचविलें.

स वध्यमानस्तैरस्त्रैरर्जुनेन महात्मना ।
ततोऽस्य दर्शयामास तदाऽऽत्मानं प्रियः सखा ।। २७
चित्रसेनस्तथोवाच सखायं युधि विद्धि माम् ।
चित्रसेनमथालक्ष्य सखायं युधि दुर्बलम् ।। २८
सञ्जहारास्त्रमथ तत् प्रसृष्टं पाण्डवर्षभः ।
दृष्ट्वा तु पाण्डवाः सर्वे संहृतास्त्रं धनञ्जयम् ।। २९

——महाभारत, वनपर्व अध्याय २४५

अर्जुन उवाच ।

उत्सृज्यतां चित्रसेन भ्राताऽस्माकं सुयोधनः ।
धर्मराजस्य संदेशान्मम चेदिच्छसि प्रियम् ।। ९

चित्रसेन उवाच ।

पापोऽयं नित्यसंतुष्टो न विमोक्षणमर्हति ।
प्रलब्धा धर्मराजस्य कृष्णायाश्च धनञ्जय ।। १०

नेदं चिकीर्षितं तस्य कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
जानाति धर्मराजो हि श्रुत्वा कुरु यथेच्छसि ।। ११

वैशंपायन उवाच ।

ते सर्व एव राजानमभिजग्मुर्युधिष्ठिरम् ।
अभिगम्य च तत् सर्वं शशंसुस्तस्य चेष्टितम् ।।१२
अजातशत्रुस्तच्छ्रुत्वा गन्धर्वस्य वचस्तदा ।
मोक्षयामास तान् सर्वान् गन्धर्वान् प्रशशंस च ।। १३

—महाभारत, वनपर्व अध्याय २४६

तेषां शराणां वेगेन शितानां तिग्मतेजसाम् ।
विमुह्यमानो राधेयो यत्नात्तमनुधावति ।। ११
ततोऽर्जुनस्य भुजयोर्वीर्यमप्रतिमं भुवि ।
ज्ञात्वा वैकर्तनः कर्णः संरब्धः समयोधयत् ।। १४
एवमुक्तस्तु राधेयो युद्धात् कर्णो न्यवर्तत ।। २२

——महाभारत, आदिपर्व अध्याय १९०

या उल्लेखिलेल्या दोन उदाहरणांपैकीं पहिल्या द्रुपदाच्या उदाहरणांतील कर्ण 'तुष्यतु दुर्जनः' या न्यायानें दुर्योधनाचा बंधु होता असें म्हटलें तरी घोषयात्रेंतील पळणारा कर्ण हा महारथी, राधेय, आधिरथ कर्णच होय याविषयीं कोणालाही संशय असूं शकत नाहीं. घोषयात्रेंतील वर्तनाचा कर्णाच्या साऱ्या चारित्र्यावर परिणाम झालेला असून विराट पर्वांतील उत्तरगोग्रहण प्रसंगीं कृपाचार्य व कर्णपर्वांत सारथ्य करीत असतां शल्य त्याचा पाणउतारा करीत असतां या प्रसंगाचें त्याला हेतुतः स्मरण देत आहेत.

ज्या ज्या वेळीं कर्ण व अर्जुन यांची द्वंद्व युद्धांत गांठ पडली त्या प्रत्येक वेळीं कर्णाचा पराभव होऊन तो पळून गेलेला आहे. कर्णानें अर्जुनाचा पराभव करून त्याला पळवून लावल्याचें साऱ्या महाभारतांत एकही उदाहरण नाहीं. कर्ण व अर्जुन यांची द्वंद्व युद्धांत पहिली गांठ द्रौपदी स्वयंवरानंतर झालेल्या भीषण युद्धांत पडली. या युद्धांत अर्जुनानें कर्णाचा पराभव करून त्याला पळ काढावयास लाविलें. कर्णानें या प्रसंगीं युद्धांतून निवृत्त होण्याचें कारण म्हणून जो युक्तिवाद केला तो किती फुसका होता याचें विवेचन कर्णाच्या

व्यक्तिचित्रणावरील भाषणांत मी केलेंच आहे. त्यामुळें येथें नुसता उल्लेख केला तरी पुरें होईल. दुसरा कर्णाची अगदीं फटफजिती करण्यासारखा पराजय अर्जुनानें उत्तर गोग्रहणांत केलेला आहे. व विशेषतः कर्णाच्या मर्यादातीत आत्मश्लाघेची पार्श्वभूमि त्याच्या त्या पराजयाला लाभलेली असल्यामुळें तर त्याचा पराजय अधिकच डोळयांत भरतो. या मोठ्या युद्धांत एकदां नव्हे तर तीनदां कर्णाचा पराजय होऊन त्याला पळावें लागलें. रणांगणांत कर्णाच्या पहिल्याच गांठीच्या वेळीं अर्जुनानें त्याच्यासमोर त्याच्या भावाला ठार मारून त्याला पराजित करून पळ काढावयास लाविलें. महाभारतकार म्हणतात :—

तथा सपत्नान् विकिरन् किरीटी चचार संख्येऽतिरथो रथेन ।
शोणाश्ववाहस्य हयान् निहत्य वैकर्तनभ्रातुरदीनसत्त्वः ।।
एकेन सङ्ग्रामजितः शरेण शिरो जहाराथ किरीटमाली ।। १८
तस्मिन् हते भ्रातरि सूतपुत्रो वैकर्तनो वीर्यमथाददानः ।
प्रगृह्य दन्ताविव नागराजो महर्षभं व्याघ्र इवाभ्यधावत् ।। १९
स पार्थमुक्तैरिषुभिः प्रणुन्नो गजो गजेनेव जितस्तरस्वी ।
विहाय सङ्ग्रामशिरः प्रयातो वैकर्तनः पाण्डवबाणतप्तः ।। ३६

—महाभारत, विराटपर्व अध्याय ५४

"नंतर अर्जुनानें कर्णाच्या भावाच्या रथाचे घोडे मारून एका बाणानें त्याचा शिरच्छेद केला. आपल्या भावाला ठार केलेलें पाहून दांत उगारून हत्ती धांवावा किंवा बैलांच्या अंगावर क्रुद्ध वाघानें झडप घालावी त्याप्रमाणें अर्जुनाच्या अंगावर कर्ण चालून आला. पण अर्जुनाच्या बाणप्रहारांनीं तो व्यथित व भग्न झाला. एका गजानें दुसऱ्या गजाला भग्न करावें तशीच अर्जुनानें कर्णाची अवस्था करून टाकिली व त्याच्या बाणांनीं तप्त होऊन संग्राम सोडून कर्ण पळून गेला." त्याच युद्धांत पुढें कृप व द्रोण यांचा अर्जुनानें पराभव केल्यानंतर कर्णानें पुनश्च त्याच्याशीं गांठ घेऊन द्वंद्वयुद्ध केलें. पण त्याचा परिणाम काय झाला? महाभारतकार म्हणतात :—

ततः पार्थो महाबाहुः कर्णस्य धनुरच्छिनत् ।
स शक्तिं प्राहिणोत्तस्मै तां पार्थो व्यधमच्छरैः ।। २२
ततोऽनुपेतुर्बहवो राधेयस्य पदानुगाः ।
तांश्च गाण्डीवनिर्मुक्तैः प्राहिणोद् यमसाधनम् ।। २३
ततोऽस्याश्वाञ्छरैस्तीक्ष्णैर्बीभत्सुर्भारसाधनैः ।
आकर्णमुक्तैरभ्यघ्नंस्ते हताः प्रापतन् भुवि ।। २४
अथापरेण बाणेन ज्वलितेन महौजसा ।
विव्याध कर्णं कौन्तेयस्तीक्ष्णेनोरसि वीर्यवान् ।। २५
तस्य भित्वा तनुत्राणं कायमभ्यगमच्छरः ।
ततः स तमसाऽविष्टो न स्म किञ्चित् प्रजज्ञिवान् ।। २६
स गाढवेदनो हित्वा रणं प्रायादुदङ्मुखः ।
ततोऽर्जुन उदक्रोशदुत्तरश्च महारथः ।। २७

—महाभारत, विराटपर्व अध्याय ६०

"नंतर महाबाहू पार्थानें कर्णाचें धनुष्य तोडून टाकलें. कर्णानें त्याच्यावर शक्ति नांवाचें आयुध टाकलें; पण पार्थानें आपल्या बाणांनीं त्याचे तुकडे उडविले. त्यानंतर कर्णाचे कित्येक अनुचर, त्याच्यावर तुटून पडले. पण पार्थानें आपल्या बाणाघातांनीं त्यांना यमनगरीचा मार्ग दाखविला. नंतर आकर्ण ओढलेल्या आपल्या तीक्ष्ण बाणांच्या प्रहारांनीं त्यानें कर्णाचे घोडे मारले. नंतर एका अत्यंत तेजस्वी तळपत्या बाणानें त्यानें कर्णाच्या वक्षःस्थळावर प्रहार केला. अर्जुनाचा तो बाण कर्णाचें कवच फोडून इतका खोलवर कर्णाच्या शरीरांत रुतून बसला कीं, डोळ्यासमोर अंधारी येऊन त्याची ज्ञानशक्ति बधिर होऊन गेली. गाढ वेदनेनें विव्हल होऊन व समरांगण सोडून देऊन उत्तरेकडे तोंड करून तो पळून गेला. त्याबरोबर अर्जुन व उत्तर मोठमोठ्यानें गर्जना करूं लागले." याच युद्धांतील अखेरच्या क्षणीं तर अर्जुनानें संमोहनास्त्रानें सारें कुरुसैन्य मोहित केलें. त्यांत कर्ण होताच. त्या अस्त्राच्या मोहांत सारें कुरुसैन्य सांपडलें असतां ज्यांचीं वस्त्रें अर्जुनाच्या आज्ञेनें उत्तरानें हिरावून घेतलीं त्यांतही कर्ण होताच. इतकेंच नव्हे तर महारथांच्या वस्त्रांचें वर्णन करीत असतां कर्णाचें जें वस्त्र हिरावून घ्यावयास अर्जुनानें उत्तराला आज्ञा केली, त्याचा रंग

पीत होता असें महाभारताच्या विराट पर्वांत वर्णन आहे. प्रत्यक्ष भारतीय युद्धांतही ज्या ज्या वेळीं कर्ण व अर्जुन यांची गांठ पडली त्या त्या प्रत्येक क्षणीं अर्जुन विजेताच ठरला आहे तर कर्ण पलायन-वीरच ठरला आहे. शेवटच्या संग्रामांत कर्णासमोर पार्थानें संरक्षिलेल्या भीमसेनानें दुःशासनाचा कंठ फोडून त्यांतील उष्ण रक्त प्राशन केलें, पण दुःखानें उसासे टाकण्यापलीकडे कर्ण त्या क्षणीं कांहीं एक करूं शकला नाहीं. इतकेंच नव्हे तर स्वतःच्या अनुपस्थितींत अभिमन्यूला मूर्च्छित अवस्थेंत अधर्मानें ठार केल्याची आठवण देऊन आव्हानपुरस्सर अर्जुनानें कर्णाचा मुलगा ठार मारला तरीही कर्ण त्याचें संरक्षण करूं शकला नाहीं. अशा स्थितींत अर्जुन व कर्ण यांची पराक्रमाच्या बाबतींत तुलना तरी कशी होणार? पराक्रमी अर्जुनानें कर्णाला शेवटीं वंचनेनें कां ठार मारलें एवढा एकच प्रश्न शेवटीं शिल्लक उरतो. त्याचें उत्तर इतकेंच आहे कीं अडचणींत सांपडलेल्या शत्रूच्या संकटांचा लाभ न उठविणारा मनुष्य शेवटीं राजनीतिशास्त्राच्याच दृष्टीनें मूर्ख ठरत असतो. अंतीं काळाचेंच बळ सर्वश्रेष्ठ असल्यामुळें लहान देखील अडचणींचा फायदा घ्यावा, व अत्यंत क्षुद्र शत्रूची देखील उपेक्षा करूं नये, असेंच राजनीतिशास्त्र सांगतें. मग त्यानें कर्णासारख्या नीतिभ्रष्ट शत्रूची तरी उपेक्षा कां करावी? त्यावरून एक दुसऱ्यापेक्षां अधिक पराक्रमी होता हें ठरत नाहीं. जन्मभर वंचकताच केलेल्या शत्रूंच्या बाबतींत नीतिशास्त्राचे नियम लागू पडत नाहींत. अशा शत्रूंशीं वंचना करणें अधर्म नसून कुशल नीतिज्ञतेचेंच तें द्योतक आहे. व्यक्तिगत सामर्थ्याचा निर्णय करण्याचा प्रश्नच त्यांतून उद्‌भवूं शकत नाहीं. एकट्या कर्णानें कोणताही दिव्य पराक्रम केल्याचें महाभारतांत वर्णन नाहीं. जरासंधाचा त्यानें एक वेळ पराभव केला यावांचून जगाला स्तिमित करणारा त्याचा दुसरा पराक्रम दाखवितां येणार नाहीं. अर्जुनाच्यासंबंधीं महाभारतांत अशा कितीतरी गोष्टी दाखवून देतां येण्यासारख्या आहेत. कर्णाच्या तोंडावरच कृपाचार्यांनीं कर्ण व अर्जुन यांची तुलना करतांना या गोष्टीवर उत्कृष्ट प्रकाश टाकलेला आहे. ते म्हणतात :—

परिचिन्त्य तु पार्थेन संनिपातो न नः क्षमः ।
एकः कुरूनभ्यगच्छदेकश्चाग्निमतर्पयत् ।। ५
एकश्च पञ्च वर्षाणि ब्रह्मचर्यमधारयत् ।
एकः सुभद्रामारोप्य द्वैरथे कृष्णमाह्वयत् ।। ६
एकः किरातरूपेण स्थितं रुद्रमयोधयत् ।
अस्मिन्नेव वने पार्थो हृतां कृष्णामवाजयत् ।। ७
एकश्च पञ्च वर्षाणि शक्रादस्त्राण्यशिक्षत ।
एकः सोऽयमरिं जित्वा कुरूणामकरोद् यशः ।। ८
एको गन्धर्वराजानं चित्रसेनमरिंदमः ।
विजिग्ये तरसा सङ्ख्ये सेनां प्राप्य सुदुर्जयाम् ।। ९
तथा निवातकवचाः कालखञ्जाश्च दानवाः ।
दैवतैरप्यवध्यास्ते एकेन युधि पातिताः ।। १०
एकेन हि त्वया कर्ण किं नामेह कृतं पुरा ।
एकैकेन यथा तेषां भूमिपाला वशे कृताः ।। ११

—महाभारत, विराटपर्व अध्याय ४९

"एकटचा अर्जुनानें कौरवांशीं गांठ घेतली. त्यानें एकटचानें खांडववनांत अग्नीचें संतर्पण केलें. त्यानें पांच वर्षें एकनिष्ठेनें उग्र ब्रह्मचर्य पालन केलें. एकटचानेंच सुभद्राहरण करून द्वंद्वयुद्धांत यदुपतीला आव्हान दिलें. किरातरूपी शंकराशीं त्यानें एकटचानें द्वंद्वयुद्ध केलें. एकटचानेंच जयद्रथाच्या तावडींतून याच वनांत द्रौपदीची सुटका केली. त्यानें एकटचानेंच महेंद्रासारख्याजवळून दिव्य अस्त्रें संपादन केलीं. एकटचानेंच राजसूयाच्या वेळीं शत्रूंना जिंकून कौरवांचें यश दिगंतांत पसरविलें. अजिक्य अशा ससैन्य चित्रसेन गंधर्वाला त्यानें एकटचानें जिंकलें. देवतांना देखील अवध्य असे कालखंज व निवातकवच नांवाचे दानव त्यानें एकटचानेंच ठार मारले. तूं एकटचानें कधीं काय केलें आहेस तें तर आम्हांला सांग. त्यांच्यापैकीं प्रत्येकजणानें एकेकटचानें जो पराक्रम केला आहे तो कांहीं तूं केलेला नाहींस."

कर्ण व अर्जुन यांच्या पराक्रमासंबंधीं अपसमज निर्माण होण्याचें केवळ एकच कारण आहे व तें म्हणजे आपली प्रतिष्ठा वाढविण्यासाठीं स्वतःचीच प्रशंसा करण्याची कर्णाला जशी खोड

आहे, तशी अर्जुनाला मुळींच नाहीं. या संवयीच्या कारणाची मीमांसा मी कर्णावरील माझ्या व्याख्यानांत केलेली आहे. भगवान् श्रीकृष्णांसारखे अलौकिक विभूतिमत्त्व मित्र म्हणून चिर-सहवासांत असल्यामुळें, युधिष्ठिरासारख्या अत्यंत चारित्र्यसंपन्न अशा ज्येष्ठ बंधूचा आदर्श सहवास नेहमीं लाभल्यामुळें व बाल्या-पासून श्रेष्ठ पुरुषांच्या सहवासाची नि अध्ययनाची सतत संधि लाभल्यामुळें अर्जुनाच्या ठिकाणीं स्वाभाविक नम्रता व अभिजातता उत्पन्न झालेली होती. अत्यंत विलक्षण स्वरूपाच्या प्रसंगीं देखील मर्यादातीत संयम राखून अर्जुन वागलेला आहे. क्रिया हेंच त्याचें बोलणें आहे. द्रौपदीच्या विटंबनेच्या प्रसंगीं सूडाच्या एकामागून एक प्रतिज्ञा करणाऱ्या भीमसेनाला इषारा म्हणून अर्जुन जें सूचक वाक्य बोलला त्यावरून त्याचा स्वभाव व्यक्त होतो. तो म्हणतो :—

**नैवं वाचा व्यवसितं भीम विज्ञायसे सताम् ।**
**इतश्चतुर्दशे वर्षे द्रष्टारो यद् भविष्यति ।। ३०**

—महाभारत, सभापर्व अध्याय ७७

"हे भीमसेना, मोठ्या लोकांना जें करावयाचें असतें तें त्यांच्या बोलण्यांतून कधीं व्यक्त होत नाहीं. आजपासून १४ व्या वर्षीं जें काय होईल तें आपण प्रत्यक्षच पाहूं." शेवटीं अगदींच असहनीय वाटलें तेव्हां त्या अंतःकरण खवळून टाकणाऱ्या परिस्थितींत एक-दांच काय तें अर्जुन बोललेला आहे. तो म्हणतो :—

**असूयितारं द्रष्टारं प्रवक्तारं विकत्थनम् ।**
**भीमसेन नियोगात्ते हन्ताहं कर्णमाहवे ।। ३२**
**अर्जुनः प्रतिजानीते भीमस्य प्रियकाम्यया ।**
**कर्णं कर्णानुगांश्चैव रणे हन्तास्मि पत्रिभिः ।। ३३**
**ये चान्ये प्रतियोत्स्यन्ति बुद्धिमोहेन मां नृपाः ।**
**तांश्च सर्वानहं बाणैर्नेतास्मि यमसादनम् ।। ३४**
**चलेद्धि हिमवान् स्थानान्निष्प्रभः स्याद् दिवाकरः ।**
**शैत्यं सोमात्प्रणश्येत मत्सत्यं विचलेद् यदि ।। ३५**
**न प्रदास्यति चेद् राज्यमितो वर्षे चतुर्दशे ।**
**दुर्योधनोऽभिसत्कृत्य सत्यमेतद्भविष्यति ।। ३६**

—महाभारत, सभापर्व अध्याय ७७

"नेहमीं आमची असूया करणारा, अत्यंत वाईट कृत्यासाठीं दुसऱ्यांना प्रेरणा देणारा, वाटेल तें बडबडणारा व आपली प्रौढी गाण्यांत सदैव निमग्न अशा या कर्णाला, हे भीमसेना, तुझ्या आज्ञेनें मी ठार मारीन. भीमाचें प्रिय व्हावें म्हणून कर्ण व त्याचे अनुचर यांना मी युद्धांत माझ्या बाणांनीं ठार मारीन, अशी मी अर्जुन प्रतिज्ञा करीत आहें. बुद्धीला मोह उत्पन्न झाल्यामुळें आणखी जे कोणी राजे माझ्याशीं युद्ध करावयास येतील त्या सर्वांना मी ठार मारीन. मी बोललेल्या या शब्दांत जर अंतर पडेल तर हिमाचल स्थानभ्रष्ट होईल, सूर्य निष्प्रभ होईल व शीतलता चंद्राला सोडून जाईल. आजपासून १४ व्या वर्षीं दुर्योधन सन्मानपूर्वक आमचें राज्य जर आम्हांला परत देणार नाहीं तर हें सत्य झाल्यावांचून राहणार नाहीं." अर्जुनानें ह्या भाषणांत कर्णाला जीं विशेषणें लावलेलीं आहेत तीं संपूर्णपणें खरीं आहेत हें मीं माझ्या कर्णावरील भाषणांत दाखवून दिलेंच आहे. अर्जुन हीं वाक्येंही बोलला तो एकदाच व तेंही आपण इतकें सगळें बोलत असतां अर्जुन मात्र कांहींही बोलत नाहीं, हें पाहून भीमसेन खट्टू होऊं नये म्हणूनच काय तें होय. भीमसेनाच्या खिन्न होण्याचा प्रश्न जर नसता तर हींही वाक्यें अर्जुन बोलला नसता. जें कांहीं करून दाखवावयाचें होतें तें त्यानें प्रत्यक्षच करून दाखविलें असतें. महाभारतांत अर्जुन व कर्ण या दोघांच्याचकडे पाहिलें तर आत्मप्रशंसेचें कर्णाला एक प्रकारचें वेड लागलेलें होतें असें दिसून येईल. प्रत्यक्ष पराक्रमापेक्षांही दुसऱ्यांना तिटकारा येईल इतकीं आत्मप्रौढीचीं भाषणें करणें हा कर्णाचा स्वभाव बनून गेला आहे. त्यामुळें उगाच त्याच्या संबंधांत एक विलक्षण भ्रम निर्माण होतो. अनेकवार तें त्याचें फजितखोर पलायन पाहूनही दुर्योधनासारखा राज्यशकट चालविणारा सम्राट् देखील त्याच्या प्रौढीच्या भाषणांनीं शेवटपर्यंत त्याच्यावर विश्वासून फसलेला आहे. अगदीं कवचकुंडलें असतांना देखील निर्विवादपणें अर्जुनानें कर्णाचा पराभव केल्यामुळें या प्रश्नाचें प्रयोजनच उरत नाहीं. नुसत्या पराक्रमांतच नव्हे तर अस्त्रज्ञतेंतही कर्णापेक्षां अर्जुन श्रेष्ठ होता. त्यानें त्या त्या देवतांना

प्रसन्न करून मिळविलेलीं महास्त्रें कौरवांपैकीं एक भीष्मांचा अपवाद सोडला तर दुसऱ्या कोणालाही येत नव्हतीं. कर्णाची विद्या शापित होती, तर अर्जुनाची विद्या गुरूच्या संतोषांतून निर्माण झाली होती. चित्रसेनाच्या दिव्यास्त्राशीं संबंध येतांच कर्णाचीं मानुष अस्त्रें त्याच्या उपयोगी पडूं शकलीं नाहींत व त्याचा पराभव झाला असें घोषयात्रा प्रकरणांत वर्णन आहे. अर्जुनासमोर कोणाच्याही दिव्यास्त्रांचा असा प्रभाव चालूं शकला नाहीं. कारण दिव्य व मानुष अशा दोन्ही अस्त्रांचें त्याचें ज्ञान केवळ अद्वितीय होतें. तात्पर्य, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे शत्रूंनीं ज्याची पाठ कधींच पाहिली नाहीं, त्या अर्जुनासारख्या लोकोत्तर व्यक्तीशीं प्राणभयानें प्रत्येक वेळीं पळून जाणाऱ्या कर्णाची तुलना कधींही होऊं शकत नाहीं. उपलब्ध महाभारतसंहितेनुसार याहून वेगळें तात्पर्य निघूं शकणार नाहीं.

## श्रीकृष्ण व अर्जुन

एका अपसमजाच्या बाबतींत असलेली वस्तुस्थिति आपण पाहिल्यावर दुसऱ्या अपसमजाकडे वळूं. श्रीकृष्ण सहायक होते म्हणूनच केवळ अर्जुनाचे पराक्रम गाजले हें खरें नसून पराक्रमाच्या बाबतींत पार्थ पूर्णपणें स्वायत्तसिद्धि, कर्तृत्ववान् व लोकोत्तर पुरुष होता. भगवान् श्रीकृष्णांच्या त्याच्यावरील अलौकिक प्रेमाच्या अनेक महत्त्वपूर्ण कारणांपैकीं हेंही एक कारण होतें हें लक्षांत ठेविलें पाहिजे. अर्जुन व श्रीकृष्ण यांची प्रथम भेट जी झाली व ते समवयस्क असल्यामुळें मित्रत्वाचे जे संबंध प्रस्थापित झाले ते द्रौपदीस्वयंवरांत अर्जुनानें मत्स्ययंत्राचा भेद केल्यानंतर झालेले आहेत. त्याच्यापूर्वी पांडवांचा व भगवान् श्रीकृष्णांचा कांहीं एक प्रत्यक्ष असा संबंध उत्पन्न झालेला नाहीं. फार तर एकमेकांना एकमेकांचें नांव माहीत असेल इतकेंच. त्या रात्रींच भगवान् श्रीकृष्णांनीं स्वतः हून पांडवांची भेट घेतली व त्यांच्याशीं आपले संबंध प्रस्थापित केले. समवयस्क असल्यामुळें अर्जुनाशीं त्यांचें मित्रत्व उत्पन्न झालें व त्याच्या अनेक विलोभनीय

सद्गुणांनीं तो श्रीकृष्णांचा बहिश्चर प्राण बनला. पण या घटनेच्या कितीतरी पूर्वीं अर्जुनानें स्वतंत्ररीत्या देदीप्यमान पराक्रम गाजविलेले आहेत. त्यांत श्रीकृष्णांचा काडीइतकाही संबंध नाहीं. गुरुदक्षिणा म्हणून द्रुपदाचा पराभव करून पंचाल देशाचा राजा व राज्य त्यानें स्वतःच्याच पराक्रमानें आचार्य द्रोणांच्या पायावर समर्पण केलें. श्रीकृष्णांचा संबंध येण्यापूर्वीं जें अत्यंत अल्पकालीन यौवराज्य युधिष्ठिरानें केलें त्या काळांत अर्जुनानें केलेल्या पराक्रमाचें वर्णन करीत असतां महाभारतकार म्हणतात :–

**न शशाक वशे कर्तुं यं पाण्डुरपि वीर्यवान् ।**
**सोऽर्जुनेन वशं नीतो राजासीद्यवनाधिपः । २१**
**अतीव बलसंपन्नः सदा मानी कुरून् प्रति ।**
**विपुलो नाम सौवीरः शस्तः पार्थेन धीमता ।। २२**
**भीमसेनसहायश्च रथानामयुतं च सः ।**
**अर्जुनः समरे प्राच्यान् सर्वानेकरथोऽजयत् ।। २४**
**तथैवैकरथो गत्वा दक्षिणामजयद् दिशम् ।।**
**धनौघं प्रापयामास कुरुराष्ट्रं धनञ्जयः ।। २५**

—महाभारत, आदिपर्व अ. १३९

"वीर्यवान् राजा पाण्डूही ज्याला जिंकून मांडलिक करूं शकला नाहीं, त्या यवनाधिपाला अर्जुनानें जिंकून स्वाधीन करून घेतलें. अत्यंत बलसंपन्न व कुरुराज्याशीं सदैव गर्वोद्धतपणें वागणाऱ्या विपुल नांवाच्या सौवीर देशाच्या राजाला अर्जुनानें युद्धांत ठार मारलें. भीमसेनाच्या साहाय्यानें पूर्वेच्या बाजूच्या दहा सहस्र योद्ध्यांवर त्यानें विजय संपादन केला. एकट्यानेंच दक्षिण दिशेचा विजय करून कुरुराष्ट्रांत त्यानें धनाचा ओघ आणला." लाक्षागृह प्रकरणानंतर द्रौपदीस्वयंवरापूर्वीं मार्गांत अंगारपर्ण नांवाच्या गंधर्वावर अर्जुनानें आपल्या अस्त्रप्रतापानें विजय संपादन केलेला आहे. श्रीकृष्णांशीं त्याचा संबंध येण्यापूर्वींचे त्याचे हे पराक्रम आहेत. स्वतःच्या पराक्रमानेंच त्यानें दैवी शक्तींना प्रसन्न करून घेतलें आहे. त्याच्या पराक्रमाविषयीं श्रीकृष्णांची असलेली खात्री सुभद्राहरणाच्या प्रसंगीं यादवांच्या राजसभेंत केलेल्या भाषणांत

त्यांनीं व्यक्त केलेली आहे. श्रीकृष्णांशीं संबंध आल्यावर दोघांनीं मिळून केलेला मोठा पराक्रम खाण्डववनप्रसंगींचा होय. चक्रपाणि श्रीकृष्ण व अग्नीच्या प्रसादानें मिळालेलें गाण्डीव धनुष्य धारण करणारा अर्जुन या दोघांनीं या युद्धांत दिव्य पराक्रम केला. पण दोघांनीं दोन दिशांनीं स्वतंत्रपणेंच पराक्रम केलेला आहे. तरी पण या युद्धांत भगवान् श्रीकृष्ण उपस्थित असल्यामुळें त्यांचें अर्जुनाला साह्य झालें असें म्हणतां येईल. पण त्यानंतर युधिष्ठिराच्या राजसूययज्ञाच्या वेळीं अर्जुनानें जो दिग्विजय केलेला आहे त्या वेळीं श्रीकृष्ण त्याच्याबरोबर नव्हते. संपूर्ण उत्तर दिशेचा अर्जुनानें स्वतःच्याच भरंवशावर विजय केलेला आहे. तत्कालीन राजांत सर्वश्रेष्ठ पराक्रमी असलेल्या भगदत्ताला त्यानें याच वेळीं जिंकलें. त्याच्या या विजयासंबंधीं लिहितांना महाभारतकार म्हणतात :–

**तत्र राजा महानासीद् भगदत्तो विशांपते।**
**तेनासीत् सुमहद् युद्धं पाण्डवस्य महात्मनः। ८**
**स किरातैश्च चीनैश्च वृतः प्राग्ज्योतिषोऽभवत्।**
**अन्यैश्च बहुभिर्योधैः सागरानूपवासिभिः ॥ ९**
**ततः स दिवसानष्टौ योधयित्वा धनञ्जयम्।**
**प्रहसन्नब्रवीद् राजा संग्रामविगतक्लमम् ॥ १०**
**उपपन्नं महाबाहो त्वयि कौरवनन्दन।**
**पाकशासनदायादे वीर्यमाहवशोभिनि ॥ ११**
**अहं सखा महेन्द्रस्य शक्रादनवरो रणे।**
**न शक्ष्यामि च ते तात स्थातुं प्रमुखतो युधि ॥ १२**
**त्वमीप्सितं पाण्डवेय ब्रूहि किं करवाणि ते।**
**यद् वक्ष्यसि महाबाहो तत्करिष्यामि पुत्रक ॥ १३**

—महाभारत, सभापर्व अ. २६

"त्या ठिकाणीं प्राग्ज्योतिष पुराचा राजा भगदत्त व अर्जुन यांचा मोठा संग्राम झाला. किरात, चीन देशांतील योद्धे व इतर अनेक वेगवेगळ्या जमातींचें सैन्य त्याच्या जवळ होतें. आठ दिवसांच्या घनघोर युद्धानंतर भगदत्त अर्जुनाला म्हणाला: 'हे कौरवनंदना, तुझ्यासारख्या व्यक्तीच्या अंगीं रणांगणाला अपूर्व शोभा आणणारें असें शौर्य असावें हें योग्यच आहे. महेन्द्राच्या पुत्राला शोभेल असाच

तुझा पराक्रम आहे. मी महेन्द्राचा मित्र असून त्याच्यासारखाच पराक्रमी आहे. पण तुझ्यासमोर युद्धांत उभें राहण्याचें सामर्थ्य माझ्यांत नाहीं. तूं माझ्या मुलासारखाच आहेस. तुझी इच्छा काय आहे तें सांग. तूं जें म्हणशील तें करावयास मी सिद्ध आहें."

श्रीकृष्ण सहायक नसतांना एकट्या अर्जुनाच्या पराक्रमाचें भगदत्तानें दिलेलें हें एकप्रकारचें प्रशस्तिपत्रकच नव्हे काय? वनवासांत कांहीं पांडवांच्या बरोबर श्रीकृष्ण नव्हते. हिमाचलावर तपस्या करीत असतां किरातरूपी शंकराशीं धैर्य न खचूं देतां युद्ध करून अर्जुनानें जें अपूर्व पौरुष प्रकट केलें, व भगवान् शंकरांजवळून पाशुपत नांवाचें दिव्य अस्त्र संपादन केलें, त्या वेळींही भगवान् श्रीकृष्ण त्याचे सहायक नव्हते. त्याच्या एकट्याच्याच पराक्रमाची ही स्वार्जित संपदा आहे. शंकरावर त्यानें हा जो अपूर्व विजय संपादन केला, त्यामुळें सर्व लोकपाल त्याच्यावर प्रसन्न झाले व त्यांनीं आपलीं महास्त्रें अर्जुनाला समर्पण केलीं. प्रत्यक्ष महेन्द्राच्या अर्ध्या आसनावर बसण्याचा मान केवळ आपल्या कर्तृत्वानें अर्जुनानें संपादन केलेला आहे. त्यानंतर महेन्द्राच्या आज्ञेवरून देवांनाही अजिंक्य असलेलें पौलोम व कालकेय, निवातकवचादि मोठमोठे दानवयोद्धे त्यानें जिंकले व ठार मारले, तेही स्वतःच्या अस्त्रज्ञानाच्या व पराक्रमाच्या भरंवशावरच होय. तेथेंही श्रीष्कृण त्याचे सहायक नव्हते. घोषयात्रेंत चित्रसेन गन्धर्वावर त्यानें जो विजय संपादन केला तोही श्रीकृष्णांच्या साहाय्यावांचून स्वतःच्या बाहुबलाच्या भरंवशावरच होय. आणि या सर्वांवर तळपणारा त्याचा तो विख्यात विजय व त्यांत निर्विवादपणें प्रकट झालेलें धनुर्धर पार्थाचें तळपतें तेज विस्मयानें कुणाचें नेत्र स्तिमित करणार नाहीं! तो त्याचा अपूर्व विजय उत्तरगोग्रहणांतील होय.

## उत्तरगोग्रहण

उत्तरगोग्रहणाच्या प्रकरणांत अर्जुनाला नुसतें श्रीकृष्णांचें साह्य नव्हतें, इतकेंच नव्हे तर ज्याचें साहाय्य होतें त्याचें तें उलटें उपद्रवकारक होतें. आपल्या सर्व महारथांसहित कौरवांनीं जेव्हां उत्तरेच्या

बाजूनें विराटनगरावर स्वारी केली त्या वेळीं त्यांचा प्रतिकार करावयास्तव विराटनगरांत कोणीही योद्धा शिल्लक नव्हता. दक्षिणेच्या बाजूनें एक दिवसच आधीं त्रिगर्त देशाचा राजा सुशर्मा यानें त्या राज्यावर स्वारी केलेली असल्यामुळें त्याच्याशीं करावयाच्या युद्धांत स्वतः राजा विराट, त्याचें सारें सैन्य व चारही पाण्डव गुंतलेले होते. नगरींत केवळ नुकताच तारुण्याच्या दारवंठ्यांत प्रवेश केलेला राजपुत्र उत्तर होता. कौरवांच्या हातून मार खाऊन पळत आलेल्या गोपानें या राजपुत्राला कौरवांच्या चढाईची वार्ता सांगितली. त्या वेळीं राजपुत्र अंतःपुरांत बसला होता. तो कांहीं तशाही वयांत भीषण पराक्रम करणारा अभिमन्यु नव्हता. अंतःपुरांतील स्त्रियांसमोर आपली बढाई मारण्याच्या हेतूनें व कांहींशा बालिशपणानें तो असें म्हणूं लागला कीं मीं आतांच गाईंना सोडविण्यासाठीं गेलों असतों. पण काय करावें ? मला कोणी सारथीच नाहीं. पूर्वीं मी केलेल्या घोर युद्धांत माझा सारथि मारला गेला. आज जर मला कुणी चांगला सारथि मिळेल तर मी कौरवांची चांगलीच खोडकी जिरविल्यावांचून राहाणार नाहीं. ज्याप्रमाणें वज्रधारी महेन्द्र दानवांना थरकांपवितो त्याप्रमाणें मी कौरवांना रणांगणांत कंपित करून माझ्या गाई परत आणीन. दुर्योधन, भीष्म, कर्ण, कृपाचार्य, अश्वत्थामा व द्रोण या सर्वांचाच उन्माद मी नष्ट करीन. माझा पराक्रम पाहतांच कौरवांना प्रत्यक्ष अर्जुनाशींच आपली गांठ पडली असें वाटल्याविना राहाणार नाहीं." वारंवार त्याच्या तोंडून ही वाक्यें बाहेर पडतांच अर्जुनाच्या मनांत प्रकट होण्याची ही चालून आलेली संधि साधावी असा विचार चमकून गेला. व द्रौपदीला बोलावून त्यानें असें सांगितलें कीं तूं सारथ्यासाठीं माझें नांव उत्तराला सुचव. त्याला असें सांग कीं बृहन्नला दिसायला जरी षंढ आहे तरीही तिच्या पाठीशीं कर्तृत्वाची मोठी परंपरा आहे. बृहन्नला अर्जुनाचें सारथ्य करीत होती. अर्जुनाच्या सहवासांत तिनें अनेक महायुद्धें पाहिलीं आहेत. आपली इच्छा असली तर ती आपलें सारथ्य करील. द्रौपदीनें तो निरोप उत्तराला कळविला व उत्तरेच्या मध्यस्थीनें बृहन्नलावेषधारी अर्जुन पुष्कळ दिखाऊ

आढेवेढे घेऊन सारथ्यास्तव सिद्ध झाला. उलटें कवच घालून त्यानें आपल्या षंढत्वाची बतावणीही योग्य प्रकारें केली. नंतर रथी उत्तराला घेऊन सारथी अर्जुन समरांगणावर जात असतां राजकन्या उत्तरा त्याला असें म्हणूं लागली कीं समरांगणावर विजय संपादन केल्यावर शत्रुपक्षाकडील महारथ्यांची सुंदरसुंदर वस्त्रें तुम्ही आमच्या खेळासाठीं आणा. तुझा भाऊ जर बोलल्याप्रमाणें युद्धांत विजय संपादन करील तर मी तूं म्हणतेस तशीं वस्त्रें अवश्य आणीन असें सूचक उत्तर तिला देऊन अर्जुनानें रणांगणाकडे आपला रथ चालविला. प्रत्यक्ष रणांगणावर रथ येऊन ठेपला मात्र. अंतःपुरांतील वाचिवीर उत्तराच्या अंगाला कांपरेंच भरलें. महाभारतांतील उत्तराचें हें प्रकरण हास्यरसाचें एक अपूर्व निदर्शन असून भारतचम्पूकार अनन्तभट्ट, कविवर्य मुक्तेश्वर, व महाराष्ट्र कविवर्य मोरोपंत यांच्या प्रतिभेला या प्रकरणांत विलक्षण फुलोरा आलेला आहे. मोरोपंतांचें आर्याभारत पुष्कळसें कण्ठस्थ करणाऱ्या लोकांना या प्रकरणांतील पंतांच्या आर्या घोळून घोळून म्हणतांना चर्वणेचा अलौकिक आनंद उपभोगावयास मिळतो. महाभारतांतही या प्रकरणाचें मोठें विलक्षण वर्णन आहे. महाभारतकार म्हणतात कीं:

तदनीकं महद् दृष्ट्वा गजाश्वरथसंकुलम् ।
कर्णदुर्योधनकृपैर्गुप्तं शान्तनवेन च ॥ ८
द्रोणेन च सपुत्रेण महेष्वासेन धीमता ।
हृष्टरोमा भयोद्विग्नः पार्थं वैराटिरब्रवीत् ॥ ९

उत्तर उवाच ।

नोत्सहे कुरुभिर्योद्धुं रोमहर्षं हि पश्य मे ।
बहुप्रवीरमत्युग्रं देवैरपि दुरासदम् ॥ १०
प्रतियोद्धुं न शक्ष्यामि कुरुसैन्यमनन्तकम् ।
नाशंसे भारतीं सेनां प्रवेष्टुं भीमकार्मुकाम् ॥ ११
रथनागाश्वकलिलां पत्तिध्वजसमाकुलाम् ।
दृष्ट्वैव हि परानाजौ मनः प्रव्यथतीव मे ॥ १२
यत्र द्रोणश्च भीष्मश्च कृपः कर्णो विविंशतिः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सोमदत्तश्च बाह्लिकः ॥ १३

**दुर्योधनस्तथा वीरो राजा च रथिनां वरः ।**
**द्युतिमन्तो महेष्वासाः सर्वयुद्धविशारदाः ।। १४**
**दृष्ट्वैव हि कुरूनेतान् व्यूढानीकान् प्रहारिणः ।**
**हृषितानि च रोमाणि कश्मलं चागतं मम ।। १५**

—महाभारत, विराटपर्व अध्याय ३८

" कौरवांचें तें कर्ण, दुर्योधन, कृपाचार्य, भीष्म, अश्वत्थामा, व द्रोणाचार्य यांनीं संरक्षिलेलें भयंकर चतुरंग सैन्य पहातांच उत्तर भयानें उद्विग्न झाला व त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. तो थरकांपत अर्जुनाला म्हणाला, बृहन्नले कौरवांशीं मी युद्ध करूं इच्छीत नाहीं. माझ्या अंगावरचे हे रोमांच पाहिलेस काय? ह्या कौरवांच्या सैन्यांत अत्यंत प्रबल योद्धे असून हें सैन्य देवांना देखील जिंकण्यास अत्यंत कठीण आहे. या अफाट कौरवांच्या सैन्याशीं युद्ध करण्याची माझी छाती नाहीं. युद्ध तर लांबच राहिलें, भयानक धनुष्य घेतलेल्या योद्धयांच्या या सेनेंत प्रवेश करण्यासही मी धजूं शकत नाहीं. भावी भयाच्या कल्पनेनें माझें मन थरकांपून उठलें आहे. द्रोण, भीष्म, कृप, कर्ण, विविंशति, अश्वत्थामा, विकर्ण, सोमदत्त, बाह्लीक, दुर्योधन,इत्यादि हे सारे योद्धे आपल्या पराक्रमानें आजवर जगांत तळपलेले असून हे युद्धविशारद मोठमोठीं धनुष्यें हातांत घेऊन उभे आहेत. त्यांना पहातांच माझ्या अंगावर रोमांच उभे राहून डोळ्यांसमोर अंधारी आली आहे. अशा स्थितींत मी त्यांच्याशीं काय लढणार?" तात्पर्य या युद्धांतील अर्जुनाचा सहायक भगवान् श्रीकृष्णांप्रमाणें संकटांतून त्याचें संरक्षण करणारा, व प्रसंगविशेषीं त्याचा मोह नष्ट करून त्याचा उत्साह वर्धन करणारा नसून उलट त्यालाच ज्याला वारंवार संभाळून घ्यावें लागलें अशा प्रकारचा एक भ्याड आहे. अर्जुनानें त्याचा विलाप ऐकून त्याला धीर देण्याचा प्रयत्न केला. पण तें काम चांगलेंच कठीण होतें.महाभारतकारांनीं त्याचें जें शब्दचित्र चित्रित केलें आहे, तें या दृष्टीनें पहाण्यासारखें आहे. भारतकार म्हणतातः—

बृहन्नलोवाच ।

**भयेन दीनरूपोऽसि द्विषतां हर्षवर्धनः ।**
**न च तावत्कृतं कर्म परैः किंचिद् रणाजिरे ।। १९**

स्वयमेव च मामात्थ वह मां कौरवान् प्रति ।
सोऽहं त्वां तत्र नेष्यामि यत्रैते बहुला ध्वजाः ॥ २०
मध्यमामिषगृध्राणां कुरूणामाततायिनाम् ।
नेष्यामि त्वां महाबाहो पृथिव्यामपि युध्यताम् ॥ २१
तथा स्त्रीषु प्रतिश्रुत्य पौरुषं पुरुषेषु च ।
कत्थमानोऽभिनिर्याय किमर्थं न युयुत्ससे ॥ २२
न चेद् विजित्य गास्तास्त्वं गृहान् वै प्रतियास्यसि ।
प्रहसिष्यन्ति वीरास्त्वां नरा नार्यश्च संगताः ॥ २३
अहमप्यत्र सैरन्ध्र्या ख्याता सारथ्यकर्मणि ।
न च शक्ष्याम्यनिर्जित्य गाः प्रयातुं पुरं प्रति ॥ २४
स्तोत्रेण चैव सैरंध्र्यास्तव वाक्येन तेन च ।
कथं न युध्येयमहं कुरून् सर्वान् स्थिरो भव ॥ २५

उत्तर उवाच ।

कामं हरन्तु मत्स्यानां भूयांस कुरवो धनम् ।
प्रहसन्तु च मां नार्यो नरा वाऽपि बृहन्नले ॥ २६
संग्रामे न च कार्यं मे गावो गच्छन्तु चापि मे ।
शून्यं मे नगरं चापि पितुश्चैव बिभेम्यहम् ॥ २७

वैशंपायन उवाच ।

इत्युक्त्वा प्राद्रवद् भीतो रथात् प्रस्कन्द्य कुण्डली ।
त्यक्त्वा मानं च दर्पं च विसृज्य सशरं धनुः ॥ २८

बृहन्नलोवाच ।

नैष शूरैः स्मृतो धर्मः क्षत्रियस्य पलायनम् ।
श्रेयस्तु मरणं युद्धे न भीतस्य पलायनम् ॥ २९

वैशंपायन उवाच ।

एवमुक्त्वा तु कौन्तेयः सोऽवप्लुत्य रथोत्तमात् ।
तमन्वधावत् धावन्तं राजपुत्रं धनञ्जयः ॥ ३०
दीर्घां वेणीं विधुन्वानः साधु रक्ते च वाससी ।
विधूय वेणीं धावन्तमजानन्तोऽर्जुनं तदा । ३१
सैनिकाः प्राहसन् केचित् तथा रूपमवेक्ष्य तम् ।
तं शीघ्रमभिधावन्तं संप्रेक्ष्य कुरवोऽब्रुवन् ॥ ३२
क एष वेषसंच्छन्नो भस्मन्येव हुताशनः ।
किञ्चिदस्य यथा पुंसः किञ्चिदस्य यथा स्त्रियः ॥ ३३

सारूप्यमर्जुनस्येव क्लीबरूपं बिभर्ति च ।
तदेवैतच्छिरोग्रीवं तौ बाहू परिघोपमौ ॥
तद्वदेवास्य विक्रान्तं नायमन्यो धनञ्जयात् ॥ ३४
अमरेष्विव देवन्द्रो मानुषेषु धनञ्जयः ।
एकः कोऽस्मानुपायायादन्यो लोके धनञ्जयात् ॥ ३५
एकः पुत्रो विराटस्य शून्ये संनिहितः पुरे ।
स एष किल निर्यातो बालभावान्न पौरुषात् ॥ ३६
सत्रेण नूनं छन्नं हि चरन्तं पार्थमर्जुनम् ।
उत्तरः सारथिं कृत्वा निर्यातो नगराद् बहिः ॥ ३७
स नो मन्यामहे दृष्ट्वा भीत एव पलायते ।
तन्नूनमेष धावन्तं जिघृक्षति धनञ्जयः ॥ ३८
इति स्म कुरवः सर्वे विमृशन्तः पृथक् पृथक् ।
न च व्यवसितुं किञ्चिदुत्तरं शक्नुवन्ति ते ॥ ३९
छन्नं तथा तं सत्रेण पाण्डवं प्रेक्ष्य भारत ।
उत्तरं तु प्रधावन्तमभिद्रुत्य धनञ्जयः ॥
गत्वा पदशतं तूर्णं केशपक्षे परामृशत् ॥ ४०
सोऽर्जुनेन परामृष्टः पर्यदेवयदार्तवत् ।
बहुलं कृपणं चैव विराटस्य सुतस्तदा ॥ ४१

उत्तर उवाच ।

शृणुयास्त्वं हि कल्याणि बृहन्नले सुमध्यमे ।
निवर्तय रथं क्षिप्रं जीवन् भद्राणि पश्यति ॥ ४२
शातकुम्भस्य शुद्धस्य शतं निष्कान् ददामि ते ।
मणीनष्टौ च वैडूर्यान् हेमबद्धान् महाप्रभान् ॥ ४३
हेमदण्डप्रतिच्छन्नं रथं युक्तं च सुव्रतैः ।
मत्तांश्च दशमातङ्गान् मुञ्च मां त्वं बृहन्नले ॥ ४४

वैशंपायन उवाच ।

एवमादीनि वाक्यानि विलपन्तमचेतसम् ।
प्रहस्य पुरुषव्याघ्रो रथस्यान्तिकमानयत् ॥ ४५
अथैनमब्रवीत्पार्थः भयार्तं नष्टचेतसम् ।
यदि नोत्सहसे योद्धुं शत्रुभिः शत्रुकर्षण ॥
एहि मे त्वं हयान् यच्छ युध्यमानस्य शत्रुभिः ॥ ४६
प्रयाह्येतद्रथानीकं मद्बाहुबलरक्षितः ॥
अप्रधृष्यतमं घोरं गुप्तं वीरैर्महारथैः ॥ ४७

मा भैस्त्वं राजपुत्राग्र्य क्षत्रियोऽसि परंतप ।
कथं पुरुषशार्दूल शत्रुमध्ये विषीदसि ।। ४८
अहं वै कुरुभिर्योत्स्ये विजेष्यामि च ते पशून् ।
प्रविश्यैतद्रथानीकमप्रधृष्यं दुरासदम् ।। ४९
यन्ता भव नरश्रेष्ठ योत्स्येऽहं कुरुभिः सह ।
एवं ब्रुवाणो बीभत्सुर्वैराटिमपराजितः ।
समाश्वास्य मुहुर्तं तमुत्तरं भरतर्षभ ।। ५०
तत एनं विचेष्टन्तमकामं भयपीडितम् ।
रथमारोपयामास पार्थः प्रहरतां वरः ।। ५१

—महाभारत, विराटपर्व अध्याय ३८

"अर्जुन म्हणाला: तूं भयानें अत्यंत दीन झाला आहेस. तुझा हा चेहरा पाहतांच शत्रूंचा हर्ष वाढणार आहे. अजून शत्रूंनीं कांहीं एक कर्म केलें नसतांना इतकें घाबरावयास काय झालें? तूं स्वतःच आग्रह करून मला कौरवसैन्यासमोर तुला घेऊन यावयास भाग पाडलें आहेस. आतां मी तुला या पद्धतीनें कधींही रणविन्मुख होऊं देणार नाहीं. जेथें हे अनंत ध्वज दिसत आहेत त्या ठिकाणीं मी तुला नेणार. गिधाडांचें भक्ष्य व्हावयासच केवळ योग्य अशा या आततायी कौरवांच्या मध्यभागीं मी तुला नेणार. अन्तःपुरांतील स्त्रिया व नोकरचाकर ह्यांच्या समोर तूं हवें तें बोललास, इतकेंच नव्हे, तर त्यांच्यासमोर युद्धासाठीं म्हणून तूं बाहेरही पडलास. मग आतांच युद्ध कां करीत नाहींत ? जर तूं गाई न जिंकतां व युद्ध न करतां घरीं परत गेलास तर हे सर्व वीर तर तुला हंसतीलच; पण नगरांतील सर्व पुरुष व स्त्रिया तुझा उपहास केल्यावांचून राहणार नाहींत. मी अत्यंत कुशल सारथि आहे, असें सैरंध्रीनें तुझ्याजवळ माझें वर्णन केलें आहे. गाई जिंकिल्यावांचून मला राजधानींत कधींही परत जातां येणार नाहीं. सैरंध्रीच्या स्तुतीनें व तुझ्या बोलण्यानें मला प्रेरणा मिळाली. स्थिर हो, कौरवांशीं युद्ध केल्या-वांचून आतां मला तरी दुसरी गति नाहीं." हें ऐकतांच आधींच घाबरलेला उत्तर म्हणाला: 'हे बृहन्नले मत्स्यांचें वाटेल तितकें धन कौरवांनीं खुशाल हरण करूं दे . नगरांतील स्त्रीपुरुषांनीं माझा

वाटेल तितका उपहास केला तरी चालेल. माझ्या गाई खुशाल जावोत. मला संग्रामाशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं. नगरांत कुणी नाहीं व मी एकटा इकडे निघून आलों म्हणूनच बाबा रागावतील.' नुसतें एवढें बोलूनच उत्तर राहिला नाहीं; तर भिऊन त्यानें रथावरून खालीं उडी मारली व स्वाभिमान, ताठा, धनुष्यबाण रथांतच टाकून देऊन तो नगराकडे पळूं लागला. बृहन्नला त्याला म्हणाली, 'शूर क्षत्रियांचा पळून जाणें हा धर्म नव्हे. युद्धांतून पळून जाण्यापेक्षां मरण पत्करणें बरें.' पण ऐकतो कोण? तो एकसारखा पळूंच लागला. अर्जुनानेंही रथांतून खालीं उडी मारली. त्याची लांबसडक वेणी धांवण्याच्या वेगानें पाठीवर इकडून तिकडे व तिकडून इकडे रुळत होती, व त्याचें लाल रंगाचें वस्त्र वाऱ्यानें उडत होतें. एवढ्या मोठ्या कुरुसैन्यासमोर एक छोटा राजपुत्र एका षंढाला सारथि करून आला, व तो भिऊन पळत असतां तो षंढ त्याला धरण्याचा प्रयत्न करीत आहे, हें पाहतांच सारें कौरवसैन्य हंसूं लागलें. पण कोणी म्हणूं लागले,' कां हो, भस्मांत ज्याप्रमाणें अग्नि झांकलेला असावा त्याप्रमाणें हा या क्लीब वेषांत असलेला कोणी महापुरुष तर नसेल? याचीं कांहीं वैशिष्टयें पुरुषासारखीं आहेत तर कांहीं स्त्रीसारखीं आहेत. दिसायला जरी हा क्लीब दिसत असला तरी एकंदर शरीरयष्टि व आकृति यांवरून अर्जुनासारखेंच याचें रूप दिसतें. ही मान, हें शिर, तें परिघाप्रमाणें पुष्ट असे आजानुबाहु हात, ती गति यावरून खात्रीनें हा अर्जुनच असला पाहिजे असें वाटतें. महेन्द्र ज्याप्रमाणें देवांत, त्याचप्रमाणें अर्जुन मनुष्यांत प्रसिद्ध आहे. त्याला कोण ओळखणार नाहीं? आणि आमच्यावर एकटें चालून येण्याची एका अर्जुनावांचून दुसऱ्या कुणाची छाती आहे? हा विराटाचा पुत्र एकटाच नगरांत होता असें दिसतें. आम्हांला पाहूनच तो पळून जात आहे त्याअर्थीं पौरुष अंगीं होतें म्हणून तो येथें आलेला नसून केवळ बालिशपणानेंच तो रणांगणांत आला असला पाहिजे. क्वचित् त्यालाही अर्जुनाची ओळख नसेल. पण अज्ञानानें गुप्त वेषानें राहणाऱ्या पार्थालाच सारथि करून हा नगरा-

बाहेर निघाला आहे. आम्हांला पाहून भीतीनें हा पळत असून बहुधा हा अर्जुनच त्याला पकडून आणण्यासाठीं धांवत असला पाहिजे." ह्याप्रमाणें अर्जुनाविषयीं शंका येऊन कौरव सैन्यांतील योद्धे एक-मेकांशीं बोलत होते. पण ह्या बाबतींत त्यांच्या बुद्धीचा निश्चय कांहीं होत नव्हता. इकडे पळणाऱ्या उत्तरामागोमाग जाऊन अर्जु-नानें शंभराव्या पावलावर त्याला पकडलें व त्याचे केस धरून त्याला जागच्या जागीं उभें केलें. अर्जुनानें पकडतांच अत्यंत दीन होऊन उत्तर रडूं लागला. विलाप करीत तो म्हणाला, "हे कल्याणि बृहन्नले! मला येवढी भीक दे. शक्य तितक्या लवकर आपला रथ राजधानीकडे वळव. फुकट मरण्यांत काय अर्थ आहे? मी तुला शुद्ध सोन्याचे शंभर निष्क देईन. सोन्याचें काम केलेलीं आठ अत्यंत तेजस्वी रत्नें देईन. सुवर्णदंडानें युक्त असा उत्कृष्ट रथ व गंडस्थळांतून मदधारा वहाणारे दहा गजराज मी तुला देईन; पण मला सोड." याप्रमाणें आर्त प्रलाप काढीत उत्तर एकसारखा विलाप करीत होता. युद्धाच्या नुसत्या कल्पनेनेंच त्याची सारी चेतना नष्ट झाली होती. तरीही अर्जुनानें एकवार जोरानें हंसून त्याला रथाजवळ आणलें. त्याचा थरकांप पाहून हंसत हंसत अर्जुन त्याला म्हणाला, "जर तुला शत्रूंशीं प्रत्यक्ष लढण्याचें धैर्य होत नसेल तर मी त्यांच्याशीं लढेन. तूं निदान माझें सारथ्य तर कर. लोकांनीं धर्षण करावयास अशक्य वाटणारें व मोठमोठ्या महा-रथ्यांनीं संरक्षिलेलें हें सैन्य तुला केवढेंही भयंकर वाटत असलें तरी माझ्या बाहूंनीं आतां तुला संरक्षण दिलेलें आहे. निःशंक मनानें तूं या सैन्यांत प्रवेश कर. हे राजपुत्रा! भिऊं नकोस, तूं क्षत्रिय आहेस. शत्रूच्यासमोर उभें राहून आपल्या दुर्बलतेचें असें प्रदर्शन करीत विषाद करणें तुला शोभतें काय? मी या कौरवांशीं युद्ध करून तुझें गोधन तुला परत मिळवून देतों. याप्रमाणें अर्जुनानें त्याला समजाविलें, पण तरीही तो भयानें थरथरां कांपत पळून जाण्याची धडपड करीतच होता. तथापि अर्जुनानें त्याला तसेंच रथावर बसविलें." पुढें अर्जुनानें त्याला शमी वृक्षावरचीं आपलीं शस्त्रास्त्रें काढावयास लावून जेव्हां आपली ओळख करून दिली व

त्यानेंही हा अर्जुनच आहे यासंबंधींची आपली पूर्ण खात्री करून घेतली तेव्हांच त्याचें कांपरें गेलें. तरीही पहिल्या दोन शंखनादांतच त्याची मूर्च्छित होण्याची वेळ आली होती असें महाभारतांत वर्णन आहे. तात्पर्य, अशा या अननुभवी व घाबरलेल्या सहायकाचा संभाळ करीत अर्जुनानें या रणक्षेत्रावर भीष्म, द्रोण, कृपाचार्य व कर्ण अशा महारथांचा द्वंद्व व संकुल अशा दोन्ही प्रकारच्या युद्धांत पराभव केला. इतकेंच नव्हे तर एकटे पितामह भीष्म सोडून इतरांचीं तर त्यानें वस्त्रेंही हिरावून घेऊन त्यांची पूर्णपणें फटफजिती केली. दातीं तृण धरून महारथ्यांना पळतां भुई थोडी झाली. मग सैनिकांची कथाच काय ? शेवटीं साऱ्या गुरुजनांना बाणांचें अभिवादन करून त्यानें त्या साऱ्यांसमक्ष सम्राट दुर्योधनाचा किरीट आपल्या बाणांनीं उडवून दिला व या साऱ्या सहायकांनाही तुझें संरक्षण करतां येणें केवळ अशक्य आहे असें सुचवीत नि आपल्या विजयाच्या दुंदुभिध्वनांनीं दशदिशा दणाणून सोडीत पार्थ परतला. अर्जुनाचा हा अपूर्व विजय श्रीकृष्णांच्या साहाय्यावांचून झालेला आहे. केवळ भारतीय युद्धांत भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाचें सारथ्य करावयास आले, व त्या १८ दिवसांच्या युद्धांतच काय तें त्यांचें प्रत्यक्ष साह्य अर्जुनाला मिळालेलें आहे. श्रीकृष्णांच्या परमेश्वरी विभूतिमत्त्वानें अनेक जिवावरच्या संकटांतून अर्जुनाचें संरक्षण केलें ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. भगदत्ताच्या मंत्रित अंकुशांपासून श्रीकृष्णांनींच अर्जुनाला वांचविलें. अश्वत्थाम्याच्या नारायणास्त्रापासून श्रीकृष्णांमुळेंच अर्जुन वांचला. तक्षकाच्या दंशापासून श्रीकृष्णांच्या कुशल सारथ्यकर्मामुळेंच अर्जुन वांचलेला आहे. याप्रमाणें कांहीं आणीबाणीच्या प्रसंगीं भगवंतांनीं त्याला वांचविलें व त्याचें संरक्षण केलें हें जरी खरें असलें तरी केवळ श्रीकृष्णांमुळें अर्जुनाला युद्ध चालवितां आलें व तो म्हणजे केवळ मातीचा पुतळा असून श्रीकृष्ण होते म्हणूनच तो पराक्रमी दिसला, हें मात्र साफ खोटें आहे. श्रीकृष्ण अर्जुनाहून सर्वच बाबतींत अनंतपटींनीं श्रेष्ठ होते ,यांत शंका नाहीं. आणि म्हणूनच तर ते नारायण आहेत. अर्जुनानें त्यांचें दास्य मान्य केलें तरी त्याला

त्यांनीं स्वतःचा सखा मानण्याइतके सद्गुण व पराक्रम त्याच्या ठिकाणीं निश्चित होते. पराक्रमाच्या बाबतींतही तो श्रीकृष्णांशीं स्पर्धा करून स्वतः तसें होण्याचा आटोकाट प्रयत्न करी. या गोष्टीची श्रीकृष्णांना जाणीव होती. अर्जुनानें जेव्हां त्यांना स्वतःचें सारथ्य करावयास सांगितलें तेव्हां त्यांनीं स्पष्ट शब्दांत असें म्हटलें आहे कीं,

**उपपन्नमिदं पार्थ यत्स्पर्धसि मया सह।**
**सारथ्यं ते करिष्यामि कामः सम्पद्यतां तव ॥ ३८**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ७

" हे पार्था, तूं माझ्याशीं स्पर्धा करतोस ही गोष्ट योग्यच आहे. तुझीच इच्छा सफळ होवो. मी तुझें सारथ्य करीन." पण मोठ्या व अनंत श्रेष्ठ गुणांनीं युक्त अशा व्यक्तीची स्पर्धा करून ते सद्गुण आपल्या अंगीं यावे म्हणून आटोकाट प्रयत्न करणें यांत दोषास्पद असें कांहींच नाहीं. या स्वरूपाच्या स्पर्धेला सात्त्विक स्पर्धा असें म्हणतात. तिनें थोर विभूतिमत्त्व क्रुद्ध होण्याऐवजीं प्रसन्नच होत असतें. कर्णानें अर्जुनाशीं स्पर्धा केली, पण तिचें स्वरूप शुद्ध तामसी होतें. या दोन स्पर्धांतच पहा केवढा फरक आहे! अर्जुना-इतकें स्वतःला मोठें होतां येत नाहीं म्हणून त्यानें मत्सरग्रस्त होऊन त्याच्या विनाशाचेच प्रयत्न केले, व त्यासाठीं सगळ्या प्रकारच्या हीन मार्गांचा अवलंब करून शेवटीं साऱ्या जगाचीच होळी पेटविली. पार्थानें श्रीकृष्णाशींच स्पर्धा केली पण त्यांच्या विभूतिमत्त्वाचा प्रभाव पहातांच " शाधि मां त्वां प्रपन्नम् " असें म्हणून शिष्य होऊन दासभावानें तो त्यांना शरण गेला, व त्यांची कृपा त्यानें संपादन केली. तात्पर्य, अर्जुन हा परायत्तसिद्धि नसून स्वायत्तसिद्धि होता; व त्याचा पराक्रम सर्वांनीं मान्य करण्याइतका सर्वश्रेष्ठ होता हें निर्विवाद आहे.

## अर्जुनाचा प्रभाव

अर्जुनाच्या प्रतापाचा प्रभाव तत्कालीन सर्व व्यक्तींवर पडलेला आढळून येतो. सत्यसंध लोकांत सर्वश्रेष्ठ असे भीष्म त्याच्यासंबंधीं उद्गार काढतांना म्हणतात :—

न तु पश्यामि योद्धारमात्मनः सदृशं भुवि ।
ऋते तस्मान्नरव्याघ्रात्कुन्तीपुत्राद् धनञ्जयात् ॥ १८
स हि वेद महाबुद्धिर्दिव्यान्यस्त्राण्यनेकशः ।
न तु मां विवृतो युद्धे जातु युध्येत पाण्डवः ॥ १९

—महाभारत उद्योगपर्व अध्याय १५६

"हे राजा दुर्योधना, सर्व जगांत एकटचा कुंतीपुत्र, नरव्याघ्र धनंजयावांचून माझ्यासारखा योद्धा मला दुसरा कुणीही आढळत नाहीं. तो अत्यंत बुद्धिमान असून अनेक दिव्य अस्त्रें त्याला माहीत आहेत. पण तो माझ्याशीं मन लावून युद्ध करील असें वाटत नाहीं." भीष्मांनीं हे उद्‌गार केव्हां काढले तेंही लक्षांत घेण्यासारखें आहे. ज्या वेळीं राजा दुर्योधनानें त्यांना सेनापतित्वाचा अभिषेक करून त्यांच्या सामर्थ्याचें महत्त्व वर्णन केलें त्या वेळीं भीष्मांनीं काढलेले हे सहजोद्‌गार आहेत. उभय पक्षांतील रथि व अतिरथि यांच्या संख्येचें वर्णन करीत असतां व राजा दुर्योधनाला प्रत्येक योध्याच्या पराक्रमाची कल्पना देत असतां भीष्म म्हणतात:—

ते स्मरन्तश्च संग्रामे चरिष्यन्ति च रुद्रवत् ।
लोहिताक्षो गुडाकेशो नारायणसहायवान् ॥ १६
उभयोः सेनयोर्वीरो रथो नास्तीति तादृशः ।
न हि देवेषु वा पूर्वं मनुष्येषूरगेषु च ॥ १७
राक्षसेष्वथ यक्षेषु नरेषु कुत एव तु ।
भूतोऽथवा भविष्यो वा रथः कश्चिन्मया श्रुतः ॥१८
समायुक्तो महाराज रथः पार्थस्य धीमतः ।
वासुदेवश्च संयंता योद्धा चैव धनञ्जयः ॥१९
गाण्डीवं च धनुर्दिव्यं ते चाश्वान् वातरंहसः ।
अभेद्यं कवचं दिव्यमक्षय्यौ च महेषुधी ॥ २०
अस्त्रग्रामश्च माहेन्द्रो रौद्रः कौबेर एव च ।
याम्यश्च वारुणश्चैव गदाश्चोग्रप्रदर्शनाः ॥ २१
वज्रादीनि च मुख्यानि नानाप्रहरणानि च ।
दानवानां सहस्राणि हिरण्यपुरवासिनाम् ॥ २२
हतान्येकरथेनाजौ कस्तस्य सदृशो रथः ।
एष हन्याद्धि संरंभी बलवान् सत्यविक्रमः ॥ २३
तव सेनां महाबाहुः स्वां चैव परिपालयन् ।
अहं चैनं प्रत्युदियामाचार्यो वा धनञ्जयम् ॥ २४

न तृतीयोऽस्ति राजेन्द्र सेनयोरुभयोरपि ।
य एनं शरवर्षाणि वर्षन्तमुदियात् रथी ॥ २५
जीमूत इव घर्मान्ते महावातसमीरितः ।
समायुक्तस्तु कौन्तेयो वासुदेवसहायवान् ॥
तरुणश्च कृती चैव जीर्णावावामुभावपि ॥ २६

—महाभारत उद्योगपर्व अध्याय १६९

" लाल नत्राचा व नारायणाचें साह्य असलेला अर्जुन इतका पराक्रमी आहे कीं तुझ्या व पांडवांच्या अशा दोन्ही सैन्यांत त्याच्या योग्यतेचा रथी दुसरा कुणीही नाहीं. किंबहुना अर्जुनाच्या पराक्रमाचें मी तुझ्याजवळ काय वर्णन करूं ? देव, मनुष्य, नाग, राक्षस, यक्ष, यांच्यामध्येंही आजवर असा कुणीही रथी ऐकला नाहीं. सर्व प्रकारच्या दिव्य सामर्थ्यानें युक्त असा रथ, भगवान् श्रीकृष्णांसारखा सारथि, धनंजयासारखा अप्रतिम योद्धा, गाण्डीवासारखें सामर्थ्यशील धनुष्य, ते वाऱ्याशीं स्पर्धा करणारे घोडे, तें दिव्य अभेद्य कवच व ज्यांच्यांतील बाण कधींही संपत नाहींत असे ते अक्षय्य भाते, महेश्वर, महेन्द्र, कुबेर, यम, वरुण या सर्वांचीं एकवटलेलीं दिव्य अस्त्रें, अत्यंत उग्र अशा गदा व नाना प्रकारचीं वज्रादिक आयुधें, या सर्व गोष्टींचा बोध एकटचा अर्जुन या शब्दानें होतो. हिरण्यपुरांत राहणारे सहस्रावधि दानव ज्या एकटचानें ठार मारले, त्याच्यासारखा रथी दुसरा कोण असूं शकेल ? हा बलवान्, सत्यपराक्रमी व खवळलेला पार्थ तुझी सेना ठार मारील व स्वतःच्या सैन्याचें संरक्षण करील. उन्हाळ्यानंतर प्रचंड झंझावातानें प्रेरिलेला मेघ ज्याप्रमाणें पावसाची वृष्टि करतो त्याप्रमाणें बाणांचा अविरत वर्षाव करणाऱ्या अर्जुनावर तुझ्या व पाण्डवांच्या अशा दोन्हीही सैन्यांत मी किंवा आचार्य द्रोण हे दोघे सोडून तिसरा कोणीही चालून जाऊं शकणार नाहीं. पण अर्जुन तरुण, कृतकर्मा, सर्व साधनांनीं युक्त व श्रीकृष्णांचें साहाय्य असलेला आहे, तर आम्हीं दोघेही आतां अत्यंत वृद्ध झालेलों आहोंत. अशा स्थितींत आमच्यापेक्षां निश्चितच तो श्रेष्ठ ठरणार. पितामह भीष्मांना जलप्रदान करून अर्जुनानें ज्या वेळीं त्यांना तृप्त केलें, त्या वेळीं भीष्मांनीं

त्याच्यासंबंधीं जे सहजोद्गार काढले आहेत ते त्याच्या श्रेष्ठतेचे निश्चित द्योतक ठरतात. ते म्हणतात :—

**कथितो नारदेनासि पूर्वर्षिरमितद्युते ।**
**वासुदेवसहायस्त्वं महत्कर्म करिष्यसि ।। ३१**
**यन्नोत्सहति देवेन्द्रः सह देवैरपि ध्रुवम् ।**
**विदुस्त्वां निधनं पार्थ सर्वक्षत्रस्य तद्विदः ।। ३२**
**धनुर्धराणामेकस्त्वं पृथिव्यां प्रवरो नृषु ।। ३३**
**मनुष्या जगति श्रेष्ठाः पक्षिणां पतगेश्वरः ।**
**सरितां सागरः श्रेष्ठो गौर्वरिष्ठा चतुष्पदाम् ।। ३४**
**आदित्यस्तेजसां श्रेष्ठो गिरीणां हिमवान् वरः ।**
**जातीनां ब्राह्मणः श्रेष्ठः श्रेष्ठस्त्वमसि धन्विनाम् ।। ३५**

—महाभारत भीष्मपर्व अध्याय १२१

"हे अर्जुना, तूं नर नांवाचा ऋषि आहेस असें नारदांनीं मला पूर्वींच सांगितलें आहे. भगवान् श्रीकृष्णांच्या साहाय्यानें तूं असें महत्कर्म करशील कीं जें देवेंद्रालाही करतां येणार नाहीं. तत्त्ववेत्ते लोक जगांतील सर्व क्षत्रियांचा अंत करण्यासाठींच तूं उत्पन्न झाला आहेस असें म्हणतात. सर्व जगांतील धनुर्धारी लोकांत तूं सर्वश्रेष्ठ आहेस. जगांतील प्राणिमात्रांत मनुष्य श्रेष्ठ, पक्ष्यांमध्यें गरुड श्रेष्ठ, जलसंचयांत समुद्र श्रेष्ठ, चतुष्पाद प्राण्यांत गाय श्रेष्ठ, तेजस्वी पदार्थांत सूर्य श्रेष्ठ, पर्वतांत हिमाचल श्रेष्ठ, जातींत ब्राह्मण श्रेष्ठ, त्याचप्रमाणें सर्व धनुर्धारी लोकांत तूं श्रेष्ठ आहेस." सत्यासाठीं आपलें सर्व जीवन समिधा म्हणून आपत्तीच्या अग्नींत जाळून टाकणारे महाभाग भीष्म, जे प्रत्यक्ष भार्गवरामासारख्या क्षत्रियांतकासमोरही नमले नाहींत ते मुक्तकंठानें अर्जुनाच्या गुणांचें हें वर्णन करीत आहेत. यावरून त्याचा त्यांच्या मनावर केवढा विलक्षण प्रभाव असला पाहिजे हें स्पष्टच होतें. आचार्य द्रोणांचें तर अर्जुन हा सर्वस्वच होता. त्याच्या धनुष्याच्या नुसत्या टंकारानें द्रोणांचें अंतःकरण विकसित होऊन उठत असे. विराटपर्वांत अर्जुनाच्या आगमनाबरोबर आचार्य द्रोणांनीं अपशकुनांचें वर्णन करून पराभवाचे दुर्योधनाला जे इशारे दिले आहेत ते या सर्व दृष्टींनीं त्यांच्या

मनावरील अर्जुनाचा प्रभाव व्यक्त करतात. अर्जुनाचे मित्र ज्याप्रमाणें त्याच्या विलक्षण प्रभावानें प्रभावित झाले आहेत त्याचप्रमाणें त्याचे शत्रूही त्याच्या सामर्थ्यानें प्रभावित झालेले दृष्टीस पडतात. अश्वत्थामा अर्जुनाचें वर्णन करीत असतां कर्णाला म्हणतो :

नैष देवान् न गन्धर्वान् न सुरान् न च राक्षसान् ।
भयादिह न युध्येत कुन्तीपुत्रो धनञ्जयः ।। १७
यं यमेषोऽतिसंक्रुद्धः संग्रामे निपतिष्यति ।
वृक्षं गरुत्मान् वेगेन विनिहत्य तमेष्यति ।। १८
त्वत्तो विशिष्टं वीर्येण धनुष्यमरराट्समम् ।
वासुदेवसमं युद्धे तं पार्थं को न पूजयेत् ।। १९
देवं देवेन युध्येत मानुषेण च मानुषम् ।
अस्त्रं ह्यस्त्रेण यो हन्यात् कोऽर्जुनेन समः पुमान् ।। २०
पुत्रादनन्तरं शिष्य इति धर्मविदो विदुः ।
एतेनापि निमित्तेन प्रियो द्रोणस्य पाण्डवः ।। २१
यथा त्वमकरोर्द्यूतमिन्द्रप्रस्थं यथाऽहरः ।
यथाऽऽनैषीः सभां कृष्णां तथा युध्यस्व पाण्डवम् ।। २२
अयं ते मातुलः प्राज्ञः क्षत्रधर्मस्य कोविदः ।
दुर्द्यूतदेवी गान्धारः शकुनिर्युध्यतामिह ।। २३
नाक्षान् क्षिपति गाण्डीवं न कृतं द्वापरं न च ।
ज्वलतो निशितान् बाणास्तांस्तान् क्षिपति गाण्डिवम् ।। २४
न हि गाण्डीवनिर्मुक्ता गार्ध्रपक्षाः सुतेजनाः ।
नान्तरेष्ववतिष्ठन्ते गिरीणामपि दारणाः ।। २५
अन्तकः पवनः मृत्युस्तथाग्निर्वडवामखः ।
कुर्युरेते क्वचिच्छेषं न तु क्रुद्धो धनञ्जयः ।। २६

—महाभारत, विराटपर्व अध्याय ५०

" देव, गंधर्व, असुर वा राक्षस यांपैकीं कुणाच्याही भयानें अर्जुन युद्धापासून निवृत्त होणें केवळ अशक्य आहे. ज्याच्या ज्याच्यावर युद्धांत हा तुटून पडेल त्याला हा, गरुड आपल्या पंखांच्या वेगानें झाडें मुळापासून उखडून टाकतो त्याप्रमाणें नष्ट केल्या-वांचून रहाणार नाहीं. महेंद्राप्रमाणें पराक्रमी अर्जुन पराक्रमानें तुझ्यापेक्षां निःसंशय श्रेष्ठ आहे. श्रीकृष्णांशींच ज्याची तुलना होऊं शकते, त्या अर्जुनाविषयीं आदरभाव कोण दाखविणार नाहीं ?

अर्जुन ज्याप्रमाणें अस्त्रांचा अस्त्रांनींच कुशलतेनें नाश करतो, तसें कौशल्य कुणाच्या अंगीं आहे? पुत्रानंतर शिष्यच असें शास्त्रें सांगतात. मग द्रोणांना हा सद्‌गुणसंपन्न शिष्य प्रिय असला तर त्यांत काय नवल आहे? तूं जसें द्यूत खेळलास, पांडवांच्या राजधानीचें हरण करण्यांत व द्रौपदीला सभेंत आणण्यांत जसा पुढाकार घेतलास तसाच आतां अर्जुनाशीं लढण्यांतही घे. हा तुझा महापंडित, क्षत्रधर्माचा दाता व कपटद्यूत खेळण्यांत प्रवीण असा शकुनि आतां पुढें येऊं दे. पण एक मात्र लक्षांत असूं दे. गाण्डीव धनुष्यांतून उलटसुलट पडणाऱ्या फाशांचें दान पडत नाहीं. त्यांतून तळपते व तीक्ष्ण बाण फक्त बाहेर पडतात. चांगले पाजळलेले गार्धपत्र नांवाचे गाण्डीव धनुष्यापासून सुटणारे बाण मध्यें मुळींच न थांबतां केवळ लक्ष्यवेध करतात. पर्वतांचेंही विदारण करण्याचें त्यांच्यांत सामर्थ्य आहे. अंतक, पवन, मृत्यु व वडवाग्नि हे देखील नाश करतांना कांहीं शिल्लक ठेवतील; पण अर्जुन कांहींही शिल्लक ठेवावयाचा नाहीं." अर्जुनाचें नांव ऐकतांच शत्रुसैन्याचा थरकांप होऊन त्याचा आत्मविश्वास प्रत्येक वेळीं नष्ट झालेला आहे. जीवनाच्या अंतापर्यंत त्याच्याशीं स्पर्धा करणारा व स्वतःचें श्रेष्ठत्व नि सामर्थ्य त्याच्यापेक्षां अधिक असल्याचें वारंवार उद्‌घोषून सांगणारा कर्ण देखील कृष्णशिष्टाईनंतर श्रीकृष्णाशीं झालेल्या महत्त्वपूर्ण संवादांत युद्धाचें भवितव्य सांगतांना असें म्हणतो कीं :—

**आध्वर्यवं च ते कृष्ण ऋतावस्मिन् भविष्यति ।**
**होता चैवात्र बीभुत्सुः सन्नद्धः स कपिध्वजः ॥ ३०**
**गाण्डीवं स्रुक् तथा चाज्यं वीर्यं पुंसां भविष्यति ।**
**ऐन्द्रं पाशुपतं ब्राह्मं स्थूणाकर्णं च माधव ।**
**मन्त्रास्तत्र भविष्यन्ति प्रयुक्ताः सव्यसाचिना ॥ ३१**

—महाभारत, उदघोगपर्व अध्याय १४१

**अहं चान्ये च राजानो यच्च तत्क्षत्रमण्डलम् ।**
**गाण्डीवाग्निं प्रवेक्ष्याम इति मे नास्ति संशयः ॥ ४५**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय १४३

"हे श्रीकृष्णा! या रणयज्ञाचा अध्वर्यु तूं आहेस. सिद्ध असलेला वानरध्वज अर्जुन हा या यज्ञांतील होता असून गाण्डीव

धनुष्य हीच स्त्रुक्, योद्धयांचा पराक्रम हेंच आज्य व अर्जुनानें प्रयोगिलेलीं ऐंद्र, पाशुपत, ब्राह्म व स्थूणाकर्ण हीं महास्त्रें हेच या रणयज्ञांतील मंत्र होत. मी, सर्व राजे, इतकेंच नव्हे तर युद्धांत भाग घेणारें समस्त क्षत्रियमंडल गाण्डीव धनुष्याच्या अग्नींत भस्मसात् होणार आहे यांत मला तिळमात्र शंका नाहीं." कर्णासारख्या आत्मकेन्द्रित व आत्मप्रौढीचें केवळ आगर असलेल्या व्यक्तीच्या तोंडून तिच्या प्रांजल मानसिक अवस्थेंत बाहेर पडलेले हे उद्गार त्याच्या शत्रूच्या मनावर देखील, त्याचा केवढा विलक्षण प्रभाव होता याचेंच द्योतक नाहींत काय ?

## त्याच्या कर्तृत्वाचा विश्वास

अर्जुनाच्या प्रभावाप्रमाणेंच त्याच्या कर्तृत्वाचा त्याच्या सर्व सुहृदांना विलक्षण विश्वास असल्याचें आढळून येतें. भीष्म, द्रोण, कृपाचार्य व कर्ण या धनुर्धरांशीं आपल्याला कसें युद्ध करतां येईल या चिंतेंत निमग्न असणाऱ्या युधिष्ठिरांना तिच्यांतून मार्ग काढतांना, भीमसेनावर त्यांचें अतोनात प्रेम असतांनाही केवळ अर्जुनावरच भरंवसा ठेवण्याची इच्छा झाली. महादेवादि सर्व देवांना प्रसन्न करून घेऊन अपार सामर्थ्य मिळवूं शकणारा, पांचही भावांत केवळ पार्थच आहे अशी त्यांची पूर्ण कल्पना होती. भगवान् श्रीकृष्णांची सुद्धां अर्जुनाविषयीं अशाच प्रकारची निश्चिति असल्याचें आढळून येतें. नवव्या दिवशींच्या रात्रीं पांडवांच्या युद्धसमितीची बैठक भरली असतां त्यांत भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनासंबंधीं पुढील उद्गार काढले आहेत :—

**अनुज्ञातं तु पार्थेन मया कार्यं न संशय ।**
**अथवा फाल्गुनस्यैष भारः परिमितो रणे ।। ३७**
**स हनिष्यति संग्रामे भीष्मं परपुरञ्जयम् ।**
**अशक्यमपि कुर्याद्धि रणे पार्थः समुद्यतः ।। ३८**
**त्रिदशान् वा समुद्युक्तान् सहितान् दैत्यदानवैः ।**
**निहन्यादर्जुनः संख्ये किमु भीष्मं नराधिप ।। ३९**

**—महाभारत, भीष्मपर्व अध्याय १०७**

" अर्जुन जर मला अनुज्ञा देईल तर मी कोणतेंही कार्य करावयास सिद्ध आहे. त्यानें अनुज्ञा द्यावी म्हणजे मी तुमच्या सेनापतित्वाचा स्वीकार करून आव्हानपुरःसर भीष्मांना ठार मारतों. पण खरें सांगावयाचें म्हणजे एकटा अर्जुनच ही गोष्ट करावयास पूर्णपणें समर्थ आहे. पार्थ भीष्मांना युद्धांत ठार मारूं शकेल. त्यानें जर मनांत आणलें तर अशक्य गोष्टी देखील तो रणांगणांत निश्चित करूं शकतो. दैत्य व दानवांचे संघ एकत्रित आले तरी देखील त्यांना ठार करण्याचें ज्याचें सामर्थ्य, त्याच्यासमोर भीष्मांची कथा काय ? उद्योगपर्वांत कर्णाशीं बोलतांनाही श्रीकृष्ण अगदीं असेंच सांगतात. ते म्हणतात :—

ध्रुवो जयः पाण्डवानामितीदं न संशयः कश्चन विद्यतेऽत्र ।<br>
जयध्वजो दृश्यते पाण्डवस्य समुच्छ्रितो वानरराज उग्रः ॥ ३<br>
यदा द्रक्ष्यसि संग्रामे श्वेताश्वं कृष्णसारथिम् ।<br>
ऐन्द्रमस्त्रं विकुर्वाणमुभे चाप्यग्निमारुते ॥ ६<br>
गाण्डीवस्य च निर्घोषं विस्फूर्जितमिवाशनेः ।<br>
न तदा भविता त्रेता न कृतं द्वापरं न च ॥ ७<br>
यदा द्रक्ष्यसि संग्रामे द्रोणं शान्तनवं कृपम् ।<br>
सुयोधनं च राजानं सैन्धवं च जयद्रथम् ॥ १२<br>
युद्धायापततस्तूर्णं वारितान् सव्यसाचिना ।<br>
न तदा भविता त्रेता न कृतं द्वापरं न च ॥ १३

—महाभारत, उदद्योगपर्व अध्याय १४२

" हे कर्णा, या युद्धांत पांडवांना जयश्री माळ घालणार ही गोष्ट निश्चित आहे. कारण अर्जुनाचा उग्र वानरध्वज जयाचीं चिन्हें सुचवीत आहे. मी सारथ्य करीत असतांना श्वेतवाहन पार्थ अग्न्यस्त्र, वाय्वस्त्र व ऐंद्र अस्त्रांचा प्रयोग करीत असतांना जेव्हां तूं पाहशील व अशनिपाताप्रमाणें भयानक असा गाण्डीव धनुष्याचा घोष तूं ऐकशील त्या वेळीं हें युद्ध आहे, द्यूत नव्हे अशी तुझी खात्री होईल. महायुद्धांत अर्जुन ज्या वेळीं भीष्म, द्रोण, कृपाचार्य, राजा जयद्रथ व दुर्योधन इत्यादि तुमच्याकडच्या सर्व राजांचें निवारण करील त्या वेळीं युद्ध व द्यूत यांत काय भिन्नता

असते याची तुला कल्पना आल्यावांचून राहणार नाहीं. दुर्योधनाच्या सभेंत त्याच्या तोंडावर बजावीत असतां श्रीकृष्ण म्हणतात :--

अयं भीष्मस्तथा द्रोणः कर्णश्चायं तथा कृपः ।
भूरिश्रवाः सौमदत्तिरश्वत्थामा जयद्रथः ।। ४९
अशक्ताः सर्व एवैते प्रतियोद्धुं धनञ्जयम् ।
अजेयो ह्यर्जुनः संख्ये सर्वैरपि सुरासुरैः ।।
मानुषैरपि गन्धर्वैर्मा युद्धे चेत आधिथाः ।। ५०
दृश्यतां वा पुमान् कश्चित् समग्रे पार्थिवे बले ।
योऽर्जुनं समरे प्राप्य स्वस्तिमानाव्रजेद् गृहान् ।। ५१
किं ते जनक्षयेणेह कृतेन भरतर्षभ ।
यस्मिञ्जिते जितं तस्यात् पुमानेकः सदृश्यताम् ।। ५२
यः सदेवान् सगन्धर्वान् सयक्षासुरपन्नगान् ।
अजयत् खाण्डवप्रस्थे कस्तं युध्येत मानवः ।। ५३
तथा विराटनगरे श्रूयते महदद्भुतम् ।
एकस्य च बहूनां च पर्याप्तं तन्निदर्शनम् ।। ५४
युद्धे येन महादेवः साक्षात् संतोषितः शिवः ।
तमजेयमनाधृष्यं विजेतुं जिष्णुमच्युतम् ।
आशंससीह समरे वीरमर्जुनमूर्जितम् ।। ५५
मद्द्वितीयं पुनः पार्थं कः प्रार्थयितुमर्हति ।
युद्धे प्रतीपमायान्तमपि साक्षात् पुरंदरः ।। ५६
बाहुभ्यामुद्वहेद् भूमिं दहेत् क्रुद्ध इमाः प्रजाः ।
पातयेत् त्रिदिवाद् देवान् योऽर्जुनं समरे जयेत् ।। ५७

--महाभारत, उद्योगपर्व अध्याय १२४

"हे भीष्म, द्रोण, हा कर्ण, कृपाचार्य, भूरिश्रवा, सौमदत्ति, अश्वत्थामा, जयद्रथ हे सर्व अर्जुनासमोर अत्यंत अशक्त आहेत. देव, दैत्य, मनुष्य, गंधर्व या सर्वांनाच अर्जुन युद्धांत अजिक्य आहे. मला या संपूर्ण राजांच्या सैन्यांत असा एक तरी योद्धा दाखवून द्या कीं जो समरांत अर्जुनाची गांठ घेऊन सुखानें पुन्हां आपल्या घरीं जाऊं शकेल. हे भरतर्षभा, व्यर्थ इतक्या मनुष्यांचा वध करून काय उपयोग ? एकट्या अर्जुनावर तुम्ही विजय मिळविला तरी सर्व पांडव सैन्यावर तुम्ही विजय मिळविल्यासारखें होईल. पण

असा एक तरी मनुष्य दाखवून द्या कीं जो अर्जुनाला जिंकूं शकेल. देव, गंधर्व, यक्ष, असुर, पन्नग या सर्वांना खांडवप्रस्थांत ज्यानें जिंकलें त्याच्याशीं कोणता मानव युद्ध करूं शकेल? नुकतेंच विराटनगरांत अर्जुनानें तुम्हांला जिंकून जें पळावयास लावलें त्यावरून तुम्ही व अर्जुन यांच्यांतील सामर्थ्याचें अंतर केवढें मोठें आहे हें स्पष्टच होत नाहीं काय? ज्यानें साक्षात् भगवान् महादेवांना संतुष्ट केलें त्या अजेय, अनाधृष्य व कधींही पराभव माहीत नसलेल्या अशा वीरश्रेष्ठ अर्जुनाशीं युद्धांत गांठ घेण्याची कल्पनाच किती मूर्खपणाची आहे? एकटया अर्जुनाशीं युद्ध करणें हें जर इतकें कठीण आहे तर आतां तर मी त्याचा साहायक आहे. आम्हां दोघांचें सामर्थ्य एकवटल्यावर त्या सामर्थ्याशीं कोण धडक घेऊं शकेल? देवेंद्राचें तरी असें सामर्थ्य आहे काय? हातानें पृथ्वी उचलण्याची इच्छा करणें, क्रुद्ध होऊन यच्चयावत् प्रजांना जाळून टाकणें व स्वर्गस्थ देवांना खालीं पाडणें आणि अर्जुनाला जिंकणें ह्या गोष्टी सारख्याच आहेत." पाशुपतास्त्र मिळविल्यानंतर अपार वाढलेल्या अर्जुनाच्या सामर्थ्याचें भगवान् श्रीकृष्णांनीं वर्णन केलें असलें तर तें ठीकच आहे. पण त्याच्या आधीं सुभद्राहरणाच्या वेळींच बलरामाच्या आधिपत्याखालीं संक्रुद्ध झालेलें सर्व यादव सैन्य अर्जुनावर चालून जाण्याच्या गोष्टी बोलत असतां श्रीकृष्ण त्याच्या सामर्थ्याचें वर्णन करतांना म्हणतातः—

**न च पश्यामि यः पार्थं विजयेत रणे बलात् ।**
**वर्जयित्वा विरूपाक्षं भगनेत्रहरं हरम् ।। ८**
**योद्धा पार्थश्च शीघ्रास्त्रः को नु तेन समो भवेत् ।**
**तमभिद्रुत्य सान्त्वेन परमेण धनञ्जयम् ।। १०**

—महाभारत, आदिपर्व अध्याय २२१

"आपल्या सामर्थ्याच्या भरंवशावर अर्जुनाला जिंकूं शकणारी व्यक्ति एकटया भगवान् महादेवांवांचून दुसरी कोणतीही मला दिसत नाहीं. पार्थ हा अत्यंत शीघ्रास्त्र असा योद्धा आहे. त्याच्यासारखा कोणीही येथें मला दिसत नाहीं. त्यामुळें युद्धाच्या गोष्टी करण्याऐवजीं सामोपचारानेंच त्याला वळविणें व समजावून परत

आणणें हा एकच प्राप्त परिस्थितींत मार्ग आहे. ज्याप्रमाणें सुहृदांना अर्जुनाच्या कर्तृत्वाविषयीं गाढ विश्वास असे त्याचप्रमाणें शत्रूनांही त्याच्या कर्तृत्वाचा विलक्षण स्वरूपाचा धाक असे. अभिमन्यूच्या वधानें संतप्त झालेल्या अर्जुनानें ज्या वेळीं जयद्रथाच्या वधाची प्रतिज्ञा केली त्यावेळीं ती नुसती वार्ता ऐकतांच आपलें आयुष्य संपल्याची जयद्रथाची खात्री होऊन गेली. महाभारतकार वर्णन करतात:——

श्रुत्वा तु तं महाशब्दं पाण्डूनां जयगृद्धिनाम् ।
चारैः प्रवेदिते तत्र समुत्थाय जयद्रथः ।। १
शोकसंमूढहृदयः दुःखेनाभिपरिप्लुतः ।
मज्जमान इवागाधे विपुले शोकसागरे ।। २
जगाम समितिं राज्ञां सैन्धवो विमृशन् बहु ।
स तेषां नरदेवानां सकाशे पर्यदेवयन् ।। ३
अभिमन्योः पितुर्भीतः सव्रीडो वाक्यमब्रवीत् ।
योऽसौ पाण्डोः किल क्षेत्रे जातः शक्रेण कामिना ।। ४
स निनीषति दुर्बुद्धिर्मां किलैकं यमक्षयम् ।
तत् स्वस्ति वोऽस्तु यास्यामि स्वगृहं जीवितेप्सया ।। ५
वधो नूनं प्रतिज्ञातो मम गाण्डीवधन्वना ।
तथा हि हृष्टाः क्रोशन्ति शोककाले स्म पाण्डवाः ।। १०
तत्र देवा न गन्धर्वा नासुरोरगराक्षसाः ।
उत्सहन्तेऽन्यथाकर्तुं कुत एव नराधिपाः ।।११
तस्मान्मामनुजानीत भद्रं वोऽस्तु नरर्षभाः ।
अदर्शनं गमिष्यामि न मां द्रक्ष्यन्ति पाण्डवाः ।। १२

——महाभारत, द्रोणपर्व अध्याय ७४

"पाण्डवांच्या सैन्यांतील जयघोषणा व आपल्या हेरांनीं सांगितलेल्या वार्ता ऐकून रात्रीं झोपलेला जयद्रथ आपल्या शय्येचा परित्याग करून उठला. अर्जुनानें आपल्या वधाची प्रतिज्ञा केली आहे हें नुसतें ऐकतांच त्याची जीवनाची सारी आशा संपून गेली होती. शोकानें त्याचें हृदय मूढ बनलें होतें. दुःखांत जणूं तो बुडाला होता. अगाध व विपुल शोकसागरांत तळापर्यंत बुडालेला जयद्रथ स्वतःच्या मनाशीं पुष्कळ विचार करूं लागला. पण त्याला स्वतःचा प्राण

वांचविण्याचा कोणताही मार्ग सांपडेना. शेवटीं विलाप करीत तो राजे लोकांच्या सभेंत गेला. आपल्या भयाचें प्रदर्शन करीत असतां त्याला विलक्षण लाज वाटत होती. पण मृत्यूचें भय लज्जेपेक्षां अधिक तीव्र असल्यामुळें ती गुंडाळून ठेवून तो म्हणाला: 'काम-लंपट इंद्रानें राजा पांडूच्या क्षेत्रांत ज्याला उत्पन्न केलें तो दुर्बुद्धि, अभिमन्यूच्या वधाचें कारण झालेल्या तुम्हां सर्वांना सोडून केवळ मला एकटयालाच ठार माणार आहे. मला माझें जीवित अत्यंत प्रिय आहे म्हणून तुमचा निरोप घ्यावयास मी येथें आलों आहें. तुम्हां सर्वांचें कल्याण असो ! जगण्याच्या इच्छेनें मीं आतां माझ्या घरीं जातों. युद्धाची इच्छा व सामर्थ्य माझ्यांत उरलेलें नाहीं. वास्तविक आज अभिमन्यूचा वध झालेला असल्यामुळें पाण्डवांनीं दुःखांत रहावयास पाहिजे; पण या वेळीं ते आनंदानें गर्जना करीत आहेत. याचा अर्थच असा आहे कीं, माझ्या वधाची अर्जुनानें निश्चित प्रतिज्ञा केली आहे. त्रैलोक्यांतील दैवी शक्ति देखील अर्जुनाची प्रतिज्ञा मिथ्या करूं शकत नाहींत. मग मानवांची कथाच काय? म्हणून तुम्ही सगळे मला निरोप द्या. मला पाण्डव पाहूं शकणार नाहींत अशा ठिकाणीं मीं जातों."

महारथ पार्थाचा, जन्मभर विद्वेष करणाऱ्या कर्णानें, त्याचें रथ-चक्र भूमीनें गिळलें असतां थोडा वेळ थांबण्यासाठीं अर्जुनाची प्रार्थना करतांना त्याचें जें वर्णन केलें आहे तें त्याची महात्मता स्पष्ट करावयास पुरेसें आहे. विख्यात, रणकर्मांत विशिष्ट, शूरतम, साधुवृत्त, युद्धधर्मांत अभिज्ञ, वेदांताच्या अवभृथानें स्नान केलेला, दिव्यास्त्रवेत्ता, रणांगणांत कार्तवीर्याप्रमाणें पराक्रम करणारा, हीं कर्णानें अर्जुनाला लावलेलीं विशेषणें त्याची महात्मताच व्यक्त करतात. कोणत्याही भावनेंत असो, पण मत्सरहीन अवस्थेंत गेल्या-वर तत्कालीन महापुरुषाच्या तोंडून स्वाभाविकपणें अर्जुनाविषयीं कोणते उद्‌गार बाहेर पडतात, याचेंही कर्णानें अर्जुनाला लावलेलीं विशेषणें म्हणजे पर्याप्त निदर्शनच होय.

अर्जुनाच्या महाभारतांतील पराक्रमाचे दिव्य व मानुष असे दोन भाग पडतात. खाण्डववनापासून महादेवांवरील विजय, स्वर्गांतील

वास्तव्यांत पोलोम, निवातकवच, कालकेय इत्यादि हिरण्यपुरवासी दैत्यांवर त्यानें संपादन केलेले विजय हे सारे त्याचे दिव्य पराक्रम असून उत्तरगोग्रहण, द्रौपदी स्वयंवरांतील युद्ध, उत्तर दिशा दिग्विजय, भारतीय युद्धांतील पराक्रम हे सारे त्याचे मानुष पराक्रम होत. त्याच्या दिव्य पराक्रमांत हिमाचलावर किरात वेषधारी भगवान् शंकरांशीं त्यानें केलेलें युद्ध सर्वश्रेष्ठ असलें तर त्याच्या मानुष पराक्रमांत अभिमन्यूच्या वधानंतर जयद्रथवधाच्या दिवशीं सर्व कुरुसैन्याशीं त्यानें केलेलें अत्यंत भीषण युद्ध सर्वश्रेष्ठ आहे. आधुनिक मनाला अर्जुनाचा स्वर्गवास, महादेवांशीं झालेलें त्याचें युद्ध, खाण्डववनदाह प्रकरण, इत्यादि दैवी गोष्टींवर विश्वास ठेवणें कठिण जातें. दैवी सृष्टि आहे किंवा नाहीं व तिच्याशीं मानवाला संबंध प्रस्थापित करतां येणें शक्य आहे किंवा नाहीं हे सारे प्रश्न स्वतंत्र आहेत. भारतीय वाङ्मयाची निर्मिति ह्या सर्व गोष्टींवरील श्रद्धेंतूनच झालेली आहे हें तें वाङ्मय वाचीत असतां ध्यानांत ठेवणें अवश्य आहे. महाभारतांतील सर्वच वीर पुरुषांच्या जीवनांत त्यांच्या पराक्रमाचे दैव व मानुष असे दोन भाग पडलेले आढळून येतील. त्यांचीं एकमेकांपासून फारकत करणें कठिण आहे, इतके ते एकजीव व एकरूप आहेत. पण पार्थाच्या महान् जीवनांतील दैवी भाग सोडून त्याच्या निव्वळ मानुष पराक्रमांकडे पाहिलें तरी तत्कालीन सर्व महापुरुषांत पराक्रम, प्रभाव व व्यक्तिमत्त्व या सर्व दृष्टींनीं एक भगवान् श्रीकृष्णांचा अपवाद सोडला तर तो सर्वश्रेष्ठ होता असें महाभारतकारांचें मत आहे हें स्पष्ट होतें व तेवढेंच मला येथें दिग्दर्शित करावयाचें आहे. अर्जुनानें महादेवांशीं युद्ध केलें असो अथवा नसो, तो स्वर्गांत राहिलेला असो अथवा नसो, त्यानें अमानुष शक्तींशीं संग्राम केलेला असो अथवा नसो, अस्त्रज्ञान, युद्धकौशल्य, सामर्थ्य, सद्गुण व पराक्रम या दृष्टींनीं तो सर्वश्रेष्ठ होता ही गोष्ट निर्विवाद सत्य आहे. त्याच्या मानुष पराक्रमांवरून देखील ही गोष्ट पूर्णपणें सिद्ध होते. दैवी पराक्रम हे या गोष्टीला फुलोरा आणतात इतकेंच. माझा दैवी गोष्टींवर विश्वास आहे; पण ज्यांचा नसेल व तो भाग प्रक्षिप्त म्हणून ज्यांना निकालांत

काढावयाचा असेल त्यांना देखील पार्थ हा नरोत्तम होता ही गोष्ट मान्य करणें भाग आहे, एवढेंच मला येथें दाखवून द्यावयाचें आहे.

## श्रीकृष्णांचें पार्थावरील अलौकिक प्रेम

द्रौपदी स्वयंवराच्या रात्रीं भगवान् श्रीकृष्णांनीं आपल्या धर्म-संस्थापनेच्या कार्यांतील महान् साधनयंत्र म्हणून पांडवांचा उपयोग होईल अशी निश्चिति वाटल्यावरून स्वतः होऊन त्यांची भेट घेतली व त्यांना आश्रय देऊन त्यांच्याशीं आपले संबंध प्रस्थापित केले याचा उल्लेख मागें केलेलाच आहे. कुंती ही त्यांची आत्या असल्या-मुळें पांडव हे त्यांचे आतेबंधु होते. पांडवांपैकीं युधिष्ठिर व भीम-सेन हे वयानें त्यांच्यापेक्षां वडील असल्यामुळें त्यांना मान्य होते, तर नकुल व सहदेव हे त्यांच्यापेक्षां धाकटे होते. अर्जुन वयानें त्यांच्या बरोबरीचा असल्यामुळें त्याच्याशीं त्यांनीं मित्रत्व केलें. भगवान् श्रीकृष्ण अर्जुनापेक्षां सर्वच बाबतींत श्रेष्ठ असल्यामुळें त्या युगपुरुषासमोर तो विनम्र झाला असला तर त्याच्या लोकोत्तर गुणांनीं श्रीकृष्णांचेंही त्याच्यावर अलौकिक प्रेम बसलें आहे. थोड्याच कालावधींत हें मित्रत्व सखिभावांत परिणत होऊन अर्जुन त्यांचा बहिश्चर प्राण झाला. कृष्णार्जुनांची प्रगाढ मैत्री हें महा-भारतकाळीं देखील उपमान होऊन राहिलें होतें. धर्माच्या बलि-वेदीवर स्वतःच्या पुत्राचें देखील बलिदान द्यावयास सिद्ध झालेले शोकमोहातीत पूर्णावतार भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाच्या व्यक्तिमत्त्वांत आपल्या अंतःकरणाच्या साऱ्या कोमल भावना गुंतवूं लागले हा केवढा अद्भुत चमत्कार आहे! व तो ज्याच्या विलोभनीय व्यक्ति-मत्त्वानें घडवून आणला त्याची महत्ता तरी केवढी असली पाहिजे! भीष्मांशीं युद्ध चालू असतां नवव्या दिवशींच्या रात्रीं पांडवांच्या शिबिरांत युद्धसमितीसमोर भाषण करीत असतां भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाविषयींच्या आपल्या सर्व भावना अत्यंत उत्कटतेनें व्यक्त केल्या आहेत. ते म्हणतात :—

तव भ्राता मम सखा सम्बन्धी शिष्य एव च ।
मांसान्युत्कृत्य दास्यामि फाल्गुनार्थे महीपते ॥ ३३
एष चापि नरव्याघ्रो मत्कृते जीवितं त्यजेत् ।
एष नः समयस्तात तारयेम परस्परम् ॥ ३४

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय १०७

" हे राजन् ! हा तुझा बंधु अर्जुन माझा सखा, संबंधी व शिष्य आहे. तुला अधिक काय सांगूं ? अर्जुनासाठीं मी माझ्या मांसाचे देखील लचके तोडून देईन. हा देखील माझ्यासाठीं आपलें जीवित देईल. एकमेकांचें संरक्षण करावयाचें हा आमचा संकेतच ठरलेला आहे." अश्वत्थामा ज्यावेळीं श्रीकृष्णांकडे सुदर्शनचक्राचें दान मागावयास आला त्यावेळीं त्याला उत्तर देतांनाही भगवंतांच्या तोंडून अर्जुनासंबंधींच्या त्यांच्या उत्कट भावनांचा असाच आविष्कार झालेला आहे. ते म्हणतात :—

यः सदैव मनुष्येषु प्रमाणं परमं गतः ।
गाण्डीवधन्वा श्वेताश्वः कपिप्रवरकेतनः ॥ २६
यः साक्षात् देवदेवेशं शितिकण्ठमुमापतिम् ।
द्वन्द्वयुद्धे पराजिष्णुस्तोषयामास शंकरम् ॥ २७
यस्मात् प्रियतरो नास्ति ममान्यः पुरुषो भुवि ।
नादेयं यस्य मे किञ्चिदपि दाराः सुतास्तथा ॥ २८
तेनापि सुहृदा ब्रह्मन् पार्थेनाक्लिष्टकर्मणा ।
नोक्तपूर्वमिदं वाक्यं यस्त्वं मामभिभाषसे ॥ २९

—महाभारत, सौप्तिकपर्व अध्याय १२

" जो नेहमींच मनुष्यांतील सर्वश्रेष्ठत्वाचें अंतिम मानचिन्ह म्हणन दाखवितां येण्यासारखा आहे, गांडीवधन्वा, श्वेताश्व, वानरध्वज म्हणून लोक ज्याला ओळखतात, देवदेवांचेही ईश्वर उमापति महादेवदेखील द्वंद्वयुद्धांत पराजित करण्याच्या हेतूनें धडक घेऊन ज्यानें संतुष्ट केले, ज्याच्यावांचून मला जगांत दुसरे कोणीही अधिक प्रिय नाहीं, स्त्रीपुत्रांसहित काय वाटेल तें जरी ज्यानें मागितलें तर मला न देण्यासारखें असूं शकत नाहीं त्या, माझ्या विशुद्धशील व परमसुहृद पार्थानें देखील मला जें कधीं मागितलें नाहीं तें तूं

माझ्याजवळ मागत आहेस ! भगवंतांचें हे अर्जुनाविषयींचे उद्गार त्यांच्या शोकमोहातीत अंतःकरणांत अर्जुनानें कोणतें स्थान मिळविलें होतें याची पूर्णपणें साक्ष देतात. अर्जुनाविषयीं त्यांच्या भावना किती कोमल होत्या, त्याच्या संकटप्रसंगीं त्यांना कशी तगमग लागून राही, ते स्वतः त्याची काळजी घेण्यासाठीं किती खपत व त्याचें संरक्षण करण्यासाठीं किती तत्परतेनें झटत याचें प्रत्यंतर जयद्रथवधाची अर्जुनानें ज्या रात्रीं प्रतिज्ञा केली त्या रात्रीच्या त्यांच्या हालचालींत पहावयास मिळते. अर्जुनानें शोकावेगांत ही भीषण प्रतिज्ञा केल्यानंतर एकांतांत त्याची भेट घेऊन श्रीकृष्णांनीं त्या प्रतिज्ञेच्या पूर्तीच्या आड येणाऱ्या सर्व संकटांची त्याला पूर्णपणें कल्पना दिली. व कुणाचाही विचार न करतां भलतेंच दुष्कर कर्म करावयाचा निश्चय करण्याबद्दल त्याला ठपका दिला. आत्मविश्वासानें अर्जुन त्यांना स्वतःच्या पराक्रमाचें वर्णन करून निश्चिंत रहावयास सांगू लागला. पण तेवढ्यानें त्यांचें समाधान झालें नाहीं. ते साऱ्या रात्रभर जागे होते. स्वतः पार्थाचें शिबिर तपासून त्यांनीं तेथें स्थंडिल करून पार्थाची पुष्पालंकृत शय्या सिद्ध केली. अर्जुनाच्या प्रतिज्ञेची वार्ता कौरवांच्या शिबिरांत पोहोचलेली असल्यामुळें त्याला रात्रीं एकाद्या संकटाला बळी पडावें लागूं नये म्हणून त्यांनीं आयुधें हातांत घेतलेल्या दक्ष रक्षक गणांचे पहारे अर्जुनाच्या शिबिराभोंवतीं बसविले. स्वतःच्या शिबिरांत आल्यावर श्रीकृष्णांनीं पुष्कळ वेळ विचार केला. एकट्या पार्थाच्यानें दुसऱ्या दिवशींच्या सूर्यास्तापर्यंत हें काम तडीस जाईल असें त्यांना वाटेना. शेवटीं आपला आवडता सारथी जो दारुक त्याला श्रीकृष्ण सांगू लागले.

स्मृत्वा प्रतिज्ञां पार्थस्य दारुकं प्रत्यभाषत ।
अर्जुनेन प्रतिज्ञातमार्तेन हतबन्धुना ॥ २१

जयद्रथं वधिष्यामि श्वोभूत इति दारुक ।
तत्तु दुर्योधनः श्रुत्वा मन्त्रिभिर्मन्त्रयिष्यति ॥ २२

यथा जयद्रथं पार्थो न हन्यादिति संयुगे ।
अक्षौहिण्यो हि ताः सर्वा रक्षिष्यन्ति जयद्रथम् ॥ २३

द्रोणश्च सहपुत्रेण सर्वास्त्रविधिपारगः ।
एको वीरः सहस्राक्षो दैत्यदानवदर्पहा ॥ २४
सोऽपि तं नोत्सहेताजौ हन्तुं द्रोणेन रक्षितम् ।
सोऽहं श्वस्तत् करिष्यामि यथा कुन्तीसुतोऽर्जुनः ॥ २५
अप्राप्तेऽस्तं दिनकरे हनिष्यति जयद्रथम् ।
न हि दारानमित्राणि ज्ञातयो न च बान्धवाः ॥ २६
कश्चिदन्यः प्रियतरः कुन्तीपुत्रान्ममार्जुनात् ।
अनर्जुनमिमं लोकं मुहूर्तमपि दारुक ॥ २७
उदीक्षितुं न शक्तोऽहं भविता न च तद्यथा ।
अहं विजित्य तान् सर्वान् सहसा सहयद्विपान् ॥ २८
अर्जुनार्थे हनिष्यामि सकर्णान् ससुयोधनान् ।
श्वो निरीक्षन्तु मे वीर्यं त्रयो लोका महाहवे ॥ २९
धनञ्जयार्थे समरे पराक्रान्तस्य दारुक ।
श्वो नरेन्द्रसहस्राणि राजपुत्रशतानि च ॥३०
साश्वद्विपरथान्याजौ विद्रविष्यामि दारुक ।
श्वस्तां चक्रप्रमथितां द्रक्ष्यसे नृपवाहिनीम् ॥ ३१
मया क्रुद्धेन समरे पाण्डवार्थे निपातिताम् ।
श्वः सदेवाः सगन्धर्वाः पिशाचोरगराक्षसाः ॥ ३२
ज्ञास्यन्ति लोकाः सर्वे मां सुहृदं सव्यसाचिनः ।
यस्तं द्वेष्टि स मां द्वेष्टि यस्तं चानु स मामनु ॥ ३३
इति संकल्प्यतां बुद्ध्या शरीरार्धं ममार्जुनः ।
यथा त्वं मे प्रभातायामस्यां निशि रथोत्तमम् ॥ ३४
कल्पयित्वा यथाशास्त्रमादाय व्रज संयतः ।
गदां कौमोदकीं दिव्यां शक्तिं चक्रं धनुः शरान् ॥ ३५
आरोप्य वै रथे सूत सर्वोपकरणानि च ।
स्थानं च कल्पयित्वाऽथ रथोपस्थे ध्वजस्य मे ॥ ३६
वैनतेयस्य वीरस्य समरे रथशोभिनः ।
छत्रं जाम्बूनदैर्जालैरर्कज्वलनसप्रभैः ॥ ३७
विश्वकर्मकृतैर्दिव्यैरश्वानपि विभूषितान् ।
बलाहकं मेघपुष्पं शैब्यं सुग्रीवमेव च ॥ ३८
युक्तान् वाजिवरान् यत्तः कवची तिष्ठ दारुक ।
पाञ्चजन्यस्य निर्घोषमार्षभेणैव पूरितम् ॥ ३९

श्रुत्वा च भैरवं नादमुपेयास्त्वं जवेन माम् ।
एकाह्नाऽहममर्षं च सर्वदुःखानि चैव ह ।। ४०
भ्रातुः पैतृष्वसेयस्य व्यपनेष्यामि दारुक ।
सर्वोपायैर्यतिष्यामि यथा बीभत्सुराहवे ।। ४१
पश्यतां धार्तराष्ट्राणां हनिष्यति जयद्रथम् ।
यस्य यस्य च बीभत्सुर्वधे यत्नं करिष्यति ।।
आशंसे सारथे तत्र भविताऽस्य ध्रुवो जयः । ४२

--महाभारत, द्रोणपर्व अध्याय ७९

" हे दारुका ! पुत्रवधानें आर्त झालेल्या पार्थानें उद्यां जयद्रथाच्या वधाची प्रतिज्ञा केलेली आहे. ही प्रतिज्ञा कळल्यावर आपल्या मंत्र्यासहित विचार करून अर्जुन उद्यां जयद्रथाला मारूं शकणार नाहीं अशी खटपट केल्याविना दुर्योधन कधींही राहणार नाहीं. दुर्योधनाचें तें विशाल सैन्य उद्यां जयद्रथाचें सर्व तऱ्हेनें रक्षण करील. अस्त्रविद्येंत अत्यंत पारंगत असलेले द्रोणाचार्य आपल्या पुत्रासहित जयद्रथाच्या रक्षणासाठीं प्राणपणानें झटतील. दैत्यदानवांचा मद हरण करणारा महेन्द्र देखील द्रोणाचार्यांनीं ज्याला संरक्षण दिलें आहे अशा व्यक्तीला मारूं शकणार नाहीं इतकें त्याचें सामर्थ्य प्रभावी आहे. तरी पण दारुका ! उद्यां सूर्य अस्ताला जाण्याच्या आंत कुंती-पुत्र अर्जुन जयद्रथाचा वध करूं शकेल असें सारें कांहीं मी केल्या-विना राहणार नाहीं. कारण तसें न झालें तर भ्रष्टप्रतिज्ञ अर्जुन अग्नींत प्रवेश केल्यावांचून राहणार नाहीं. माझ्या स्त्रिया, मित्र, ज्ञाति व बांधव या सर्वांत अर्जुनाइतकें प्रिय मला दुसरें कोणीच नाहीं. हे दारुका ! अर्जुन नष्ट झालेल्या स्थितींत हें जग एक मुहूर्तभरही पाहण्याची माझी इच्छा नाहीं व असें मी होऊं देणारही नाहीं. अर्जुनाऐवजीं उद्यां मीच युद्ध करून कौरवांच्या चतुरंग सैन्यावर विजय संपादन करून कर्ण व दुर्योधनासहित कुरुवीरांना ठार मारतों. त्रैलोक्यांतील सर्व लोकांनीं उद्यां एकदां माझा पराक्रम पहावाच. अर्जुनासाठीं उद्यां मी माझें युद्धकौशल्य व सामर्थ्य अवश्य प्रकट करीन. सहस्रावधि राजे व राजपुत्र यांचा मी उद्यां संहार करीन. क्रुद्ध होऊन अर्जुनासाठीं मीं माझ्या सुदर्शन चक्रानें विध्वस्त केलेलें

कुरुसैन्य उद्यां सारे लोक पहातील. उद्यां देव, गंधर्व, पिशाच, नाग, राक्षस, मनुष्यें अथवा ही सर्व चराचर सृष्टीच खरें सौहार्द कसे असतें व मी अर्जुनाचा खरा सुहृद् कसा आहे हें ओळखतील. दारुका, तुला खरें सांगू. जो अर्जुनाचा द्वेष करतो तो माझाच द्वेष करतो व जो पार्थावर प्रेम करतो तो माझ्यावर प्रेम करतो हें तूं निश्चित समज. अर्जुन म्हणजे माझें अर्धें शरीरच होय. आतां प्रभातसमय झालाच आहे. तूं माझा रथ सर्वप्रकारें सिद्ध करून दक्ष व सज्ज रहा. माझी कौमोदकी गदा, दिव्यशक्ति, चक्र, धनुर्बाण इत्यादि सर्व आयुधें व रणसाहित्य रथांत सिद्ध ठेव. माझा गरुडध्वज उभारून ठेव. माझें सूर्याप्रमाणें तेजस्वी रत्नांनीं युक्त असें सुवर्णाचें छत्र रथावर योजून शैब्य, सुग्रीव, मेघपुष्प व बलाहक हे चार अश्व रथाला जुंपून व कवच अंगांत घालून तूं अगदीं सज्ज रहा. पांचजन्याचा भैरवनाद मी केला कीं तीच खूण समजून तूं ताबडतोब रणांगणांत मी असेन तेथें ये. क्षणमात्रही वेळ न घालवितां त्यावेळीं तूं शक्य तितक्या वेगानें रथ हांक. तशी वेळच आली तर मी उद्यांच्या एकाच दिवसांत माझ्या या आतेभावाचीं सर्व दुःखें व क्रोध संपूर्णपणें नष्ट करीन. दारुका ! माझा अगदीं निश्चय ठरलेला आहे. उद्यां सारे धार्तराष्ट्र पहात असतां अर्जुन जयद्रथाचा वध करूं शकेल असें सारें कांहीं मी अवश्य करीन. फार काय ? ज्याच्या ज्याच्या वधासाठीं अर्जुन प्रयत्न करील त्या त्या गोष्टीसाठीं करावयाच्या प्रत्येक युद्धांत मी त्याच्या विजयाचीच अपेक्षा करतों. त्यासाठीं मी कांहींही करावयास सिद्ध आहें." श्रीकृष्णांचे हे उद्गार ऐकतांच दारुक सद्गदित झाला व म्हणाला कीं, 'हे पुरुषश्रेष्ठा, तूं स्वतः ज्याच्या सारथ्यासाठीं प्रवृत्त झालास त्याचा पराभव होणारच कसा ? त्याचा सर्वत्र विजयच होणार. आणि अर्जुनाच्या विजयासाठीं भगवान् श्रीकृष्णांनीं काय करावयाचें शिल्लक ठेवलें ? शोकानें उद्विग्न झालेल्या पार्थाच्या स्वप्नांत प्रवेश करून त्यांनीं भगवान् महादेवाचें त्याला दर्शन घडवून दिलें, व त्यांच्याकडून प्रत्यक्ष पाशुपत त्याला देवविलें, व या कृत्यानें त्याच्या अंतःकरणांत धैर्य उत्पन्न केलें. रणांगणांत पार्थाचें त्यांनीं अनेक प्रकारें साहाय्य केलेंच, पण निघतां-

नाही त्यांनीं त्याच्या मनांत अपूर्व उत्साह निर्माण केला. द्रोणांशीं करावयाच्या युद्धांत उगाच अर्जुनाचा वेळ गुंतून राहूं नये म्हणून श्रीकृष्णांना इतकी काळजी लागली कीं, त्यांनीं मध्यंतरींच अर्जुनाला सुचविलें, 'आपल्या कार्याच्या दृष्टीनें वेळ गमाविणें अनिष्ट असल्यामुळें आपण त्यांना सोडून निघून जाऊं.' द्रोणाचार्य आव्हान देत असतांही त्यांच्याकडे दुर्लक्ष करून त्यांनीं आपला रथ पुढें काढला' इतकेंच नव्हे तर शेवटीं सहस्रावधि सैनिक ठार मारून देखील जयद्रथ दिसत नाहीं असें पाहून स्वतःच्या सामर्थ्यानें अंधार उत्पन्न करून त्यांनीं अर्जुनाकडून जयद्रथाचा वध करविला. जयद्रथाला असें वरदान होतें कीं, त्याचें मस्तक जो कोणी जमिनीवर पाडी त्याच्या मस्तकाचे शतशः तुकडे होतील. श्रीकृष्णांनीं अर्जुनाला या गोष्टीची जाणीव देऊन त्याच्याकडून तें मस्तक नेमकें जयद्रथाच्या पित्याच्या मांडीवरच उतरविलें, व एका दगडानें दोन पक्षी मारून अर्जुनाचा प्राण वांचविला. एकाद्या धनलोभी वृद्धानें आपल्या धनकोषाला जपावें, त्याहूनही अधिक दक्षतेनें ते अर्जुनाला जपत. ल

कृष्णांसारख्या इतिहासाच्या ओघांत केवळ अद्वितीय असलेल्या पूर्णावतार युगपुरुषाचें अंतःकरण पार्थानें आपल्या गुणगणांनीं इतकें व्यापून टाकलें होतें; तरीही पण पार्थाला पूर्णपुरुष म्हणतां येणार नाहीं. तो नरोत्तम असला तरी श्रीरामचंद्रांप्रमाणें मर्यादापुरुषोत्तम कांहीं नव्हे. मानवी जीवन हें नेहमीं अपूर्ण असतें. तें कितीहि परिपूर्ण करण्याचा प्रयत्न केला तरी शेवटीं अपूर्णच कसें रहातें, याचें चित्रणच महर्षि व्यासांनीं पार्थाच्या रूपानें केलेलें आहे.

## नरोत्तम पार्थाची अपूर्णता

श्रीमद् भगवद्गीतेच्या उपदेशानंतर 'नष्टो मोहः' 'माझा मोह पूर्णपणें नष्ट झाला आहे' असें उद्घोषून सांगणाऱ्या अर्जुनासारख्या दृढ निश्चयी व्यक्तीलाही दुःखाच्या विलक्षण आघातांनीं मोह उत्पन्न होतो. इतकेंच नव्हे तर, त्या मोहांत त्याचा तोलही जातो असें दिसतें. अभिमन्यूच्या वधानें शोकाकुल झालेला पार्थ त्याच्या स्मृतींनीं जेव्हां विव्हल झाला, तेव्हां श्रीकृष्णांना त्याला आवरावें

लागलें. त्याचें त्या वेळचें स्वरूप इतकें विलक्षण होतें कीं, कोणी त्याच्याशीं बोलावयास देखील धजेना. महाभारतकार म्हणतातः—

तमन्तकमिव क्रुद्धं निःश्वसन्तं मुहुर्मुहुः ।
पुत्रशोकाभिसंतप्तमश्रुपूर्णमुखं तथा ।। ८५
न भाषितुं शक्नुवन्ति द्रष्टुं वा सुहृदोऽर्जुनम् ।
अन्यत्र वासुदेवाद्वा ज्येष्ठाद्वा पाण्डुनन्दनात् ।। ८६
सर्वास्ववस्थासु हितावर्जुनस्य मनोनुगौ ।
बहुमानात् प्रियत्वाच्च तावेनं वक्तुमर्हतः ।। ८७

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय ७२

"पुत्रशोकानें संतप्त होऊन नेत्रांतून वाहणारे सारे अश्रू तोंडभर झालेल्या व अंतकाप्रमाणें क्रुद्ध होऊन उसासे टाकणाऱ्या अर्जुनाशीं भाषण करणें तर दूरच राहिलें, पण त्याच्याकडे नुसतें पाहण्याची सुद्धां कोणाची छाती होईना. केवळ भगवान् श्रीकृष्ण व ज्येष्ठ पांडव युधिष्ठिर हे दोघेच काय ते त्याच्याशीं बोलूं शकत होते. त्यांच्याविषयीं अर्जुनाच्या मनांत अपार आदर असल्यामुळें व त्यांचेंही त्याच्यावर अलौकिक प्रेम असल्यामुळें ते त्याच्याशीं बोलूं शकत होते." या स्थितींत अर्जुनाच्या तोंडून त्याला मान्य असलेल्या भीमसेनादि सर्व योद्धयांविषयीं जे उद्‌गार बाहेर पडले, ते शोकानें त्याचा तोल गेल्याचेच निदर्शक आहेत. तो म्हणतोः—

कथं च वः कृतास्त्राणां सर्वेषां शस्त्रपाणिनाम् ।
सौभद्रो निधनं गच्छेद् वज्रिणापि समागतः ।। ७८
यद्येवमहमज्ञास्यमशक्तान् रक्षणे मम ।
पुत्रस्य पाण्डुपञ्चालान् मया गुप्तो भवेत् ततः ।। ७९
कथं च वो रथस्थानां शरवर्षाणि मुञ्चताम् ।
नीतोऽभिमन्युर्निधनं कदर्थीकृत्य वः परैः ।। ८०
अहो वः पौरुषं नास्ति न च वोऽस्ति पराक्रमः ।
यत्राभिमन्युः समरे पश्यतां वो निपातितः ।। ८१
आत्मानमेव गर्हेयं यदहं वै सुदुर्बलान् ।
युष्मानाज्ञाय निर्यातो भीरूनकृतनिश्चयान् ।। ८२
आहोस्विद् भूषणार्थाय वर्म शस्त्रायधानि वः ।
वाचस्तु वक्तुं संसत्सु मम पुत्रमरक्षताम् ।। ८३

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय ७२

" तुमच्यासारखे कृतास्त्र वीर हातांत शस्त्रें धारण करून उभे असतां प्रत्यक्ष देवेन्द्राशीं संग्रामाचा प्रसंग आला तरी माझ्या अभिमन्यूला मरण कसें यावें? तुम्ही सारे पांडुपांचाल इतके अशक्त आहांत, हें जर मला आधीं माहीत असतें तर मीच माझ्या पुत्राचें संरक्षण केलें असतें. आपआपल्या रथांत बसून तुम्ही बाणांचा वर्षाव करीत असतां तुम्हांला तुच्छ लेखून शत्रूंनीं अभिमन्यूला कसें मारलें? ज्या अर्थी तुमच्या डोळ्यासमोर अभिमन्यूला ठार मारण्यांत आलें त्या अर्थी तुमच्यांत पौरुषही नाहीं व पराक्रमही नाहीं हें अगदीं स्पष्ट झालें आहे. अथवा तुम्हांला तरी दोष देऊन काय उपयोग!" तुमच्यासारख्या अत्यंत दुर्बल, अस्थिर बुद्धीच्या व भ्याड लोकांच्या भरंवशावर युद्ध सोपवून मी निघून गेलों हा माझाच मूर्खपणा आहे. तुमचीं आयुधें व चिलखत केवळ भूषणासाठीं व गप्पा मारण्यासाठीं आहेत हें मला आधींच माहीत असतें तर किती बरें झालें असतें!" पार्थासारख्या अलौकिक व्यक्तीवर देखील शोकाचा इतका पगडा बसूं शकतो हीच मानवी जीवनांची खरी अपूर्णता होय. अर्जुनाच्या या अपूर्णतेचें सर्वांत मोठें निदर्शन महाभारताच्या आश्वमेधिक पर्वांत मिळतें. गीतेच्या शेवटीं 'तूं एकाग्रतेनें सारें ऐकलेंस काय?' असें वारंवार श्रीकृण विचारीत असतां 'हो' असें उत्तर देऊन मोह नष्ट झाल्याची कबुली देणारा पार्थ येथें स्वच्छ असें म्हणूं लागला कीं, आपण मला जें काय तत्त्वज्ञान रणांगणांत सांगितलें तें सारें मी पूर्णपणें विसरलों आहें. आतां चांगलीं शांतवेळ आहे तेव्हां आपण तें तत्त्वज्ञान मला पुन्हां सांगा. आपला उपदेश त्यानें किती लक्षपूर्वक ऐकला असेल याची श्रीकृष्णांना यावरून चांगलीच कल्पना आली व ते म्हणाले:—

अबुद्धया नाग्रहीर्यस्त्वं तन्मे सुमहदप्रियम्।
न च साऽद्य पुनर्भूयः स्मृतिर्मे संभविष्यति ॥ १०
नूनमश्रद्दधानोऽसि दुर्मेधा ह्यसि पाण्डव।
न च शक्यं पुनर्वक्तुमशेषेण धनञ्जय ॥ ११

'—महाभारत, आश्वमेधिकपर्व अध्याय १६

" हे अर्जुना, मुळींच लक्ष न दिल्यामुळें त्या उपदेशाचें तूं ग्रहण केलें नाहींस, हें ऐकून मला अत्यंत वाईट वाटलें. मलाही आतां मीं काय सांगितलें होतें त्याची आठवण नाहीं. तें सारें तत्त्वज्ञान तुला पुन्हां सांगतां येणें अशक्य आहे. हे पांडवा, तूं अत्यंत मंद बुद्धीचा व अश्रद्धावान आहेस यांत कांहीं शंका नाहीं. " याप्रमाणें त्याला दूषणें 'देत कां होईना पण मनांत त्याच्याविषयीं अपार कळकळ असल्यामुळें अनुगीता या नांवाखालीं भगवान् श्रीकृष्णांनीं त्याला पुनश्च तें तत्त्वज्ञान थोडक्यांत सांगितलें. पूर्णावताराच्या अंतः-करणांत अर्जुनाविषयींच येवढी अपार कळकळ कां उत्पन्न झाली असेल ? पण ती कां उत्पन्न होऊं नये ? चकोर दिसल्यावर चंद्र अमृतवर्षाव करणारच, पार्थानें आपली तशीच पात्रता सिद्ध केली होती. पार्थानें श्रीकृष्णांच्या म्हणण्यासाठीं काय करावयाचें शिल्लक ठेवलें होतें ? कर्तृत्वाची व आत्मप्रत्ययाची प्रचंड ऊर्मि असलेल्या अपार सामर्थ्यशाली अर्जुनानें भगवान् श्रीकृष्णांच्या महात्मतेची ओळख पटतांच त्यांच्या इच्छाशक्तींत आपलें जीवनसर्वस्व विरवून टाकून तो त्यांच्या कार्याचें एक साधनयंत्र बनून राहिला होता. श्रीरामायणांतील लक्ष्मणानंतर पार्थानेंच हें विलक्षण साहस करून दाखविलें. लक्ष्मणानंतर एकनिष्ठ शिष्य व अनुचर म्हणून पार्थाचेंच नांव घेतां येण्यासारखें आहे. या दृष्टीनें पार्थाच्या जीवनपटाचें विश्लेषण न केलें तर त्याचें वर्णन अपुरें राहील.

### पार्थाचें अपूर्व आत्मसमर्पण

आपलें संपूर्ण व्यक्तिमत्त्व श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या उपदेशानंतर अर्जुनानें भगवान् श्रीकृष्णांच्या इच्छाशक्तींत पूर्णपणें विरवून टाकलें. भगवद्‌गीतेच्या उपदेशापर्यंत अर्जुन श्रीकृष्णांशीं स्पर्धा करीत होता. त्याला श्रीकृष्ण हे महापुरुष वाटत होते पण ते सर्वसमर्थ भगवान् आहेत अशी कांहीं त्याची तोंवर श्रद्धा नव्हती. त्यामुळें भगवद्‌गीते-पूर्वींच्या व नंतरच्या अर्जुनाच्या श्रीकृष्णाशीं असलेल्या वागणुकींत विलक्षण फरक वाटतो. गीतोपदेशापूर्वीं श्रीकृष्ण हे अर्जुनाचे मित्र आहेत. पण गीतेंतील विश्वरूपदर्शनानंतर मात्र त्यांच्या पूर्णाव-तारत्वाची खात्री पटून अर्जुन त्यांना म्हणतो :-

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात् प्रणयेन वापि ।। ४१**
**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।**
**एकोऽथवाऽप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ।। ४२**

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय ३५

"हे भगवंता, मी तुला माझा सखा समजून आजवर एकेरी नांवानें हे कृष्णा, हे यादवा, हे सख्या असें जें प्रमादानें अथवा प्रेमानें म्हटलें तें केवळ तुझी महात्मता माहीत नसल्यामुळेंच होय. सहज थट्टा म्हणून विहार, शय्या, आसन, भोजन इ. प्रसंगीं एकांतांत अथवा लोकांतांत मी जो कांहीं तुझा अवमान केला असेल त्याबद्दल मला क्षमा कर." इतकेंच नव्हे तर अर्जुन पुढें म्हणतोः—

**पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।**
**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ।।४३**
**तस्मात् प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।**
**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ।। ४४**

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय ३५

'तूं चराचर विश्वाचा पिता असून तूंच सर्व विश्वाचा गुरु व सर्वांना पूज्य आहेस. या त्रैलोक्यांत तुझ्यासारखा अप्रतिम प्रभावशाली दुसरा कोणीही नाहीं. मग तुझ्याहून अधिक योग्यतेचा दुसरा कोण कसा असूं शकेल ? म्हणून हे स्तुत्य ईश्वरा ! मी तुला साष्टांग वंदन करतों. पित्यानें पुत्राचें, सख्यानें सख्याचे अथवा प्रियानें प्रियेचे अपराध पोटांत घालावे त्याचप्रमाणें माझे सर्व अपराध पोटांत घालून तूं मला क्षमा कर. बुद्धीला धर्माधर्माचा व्यामोह उत्पन्न झाल्यानंतर "शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्" मी तुझा शिष्य असून तुला शरण आलों आहे, असें म्हणून श्रीकृष्णांना गुरु म्हणून अर्जुन शरण गेला व थोड्याच वेळांत ते प्रत्यक्ष धर्माचेंही उपास्य दैवत असणारे भगवान् आहेत असा प्रत्यय येऊन तो त्यांना दासभावानें वंदन करूं लागला. शेवटीं तर भगवंतांनीं त्याला

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ।। ६५**

सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ।। ६६

— महाभारत, भीष्मपर्व अध्याय ४२

" आपलें मन तूं माझ्यांत समर्पण कर, माझा भक्त होऊन माझें भजन कर व मलाच वंदन कर. तूं मला प्रिय आहेस. मी तुला प्रतिज्ञेवर सांगतों कीं, तूं माझ्या स्वरूपांत विलीन होऊन जीवनाचें अंतिम प्राप्तव्य हस्तगत झाल्यानें कृतार्थ होशील यांत शंका नाहीं. अर्जुना ! शोक करूं नकोस. चिंतेचें तुला कारणच नाहीं. इतर सर्व मार्गांचा परित्याग करून तूं मला शरण ये. सर्व पापांपासून मी तुझी सुटका करीन " असें गंभीर आश्वासन दिलें. पूर्णावतार भगवंतांच्या विभूतिमत्त्वाची पूर्णपणें ओळख पटल्यामुळें धर्माधर्माचें सर्व दायित्व त्यांच्याचवर टाकून त्यांच्या या उपदेशानुसार अर्जुनानें स्वात्मसमर्पणयोगाच्या या मार्गाची पूर्णपणें कांस धरली. धर्माधर्म, कर्माकर्म, पापपुण्य, भावाभाव सारेंसारें कांहीं त्यानें श्रीकृष्णांच्या इच्छाशक्तींत विलीन करून टाकलें. अशा आत्मसमर्पणाच्या योगोपासनेंत त्याच्यासारख्या प्रचंड सामर्थ्याच्या व अपार कर्तृत्व-शक्तीच्या व्यक्तीला स्वतःच्या मनोवृत्तीशीं केवढा विलक्षण संग्राम करावा लागला असेल याची नुसती कल्पनाच केलेली बरी. त्या संग्रामांत लक्ष्मणाच्या खालोखाल अर्जुनच यशस्वी ठरला आहे. म्हणून स्वात्मसमर्पणयोगाच्या महान् उपासकांत लक्ष्मणाचा क्रमांक पहिला असला तर अर्जुनाचा दुसरा आहे. लक्ष्मणाला या योगो-पासनेच्या " हा अग्निप्रवेशुचि नित्य नवा । भ्रतारेवीण करावा । तो हा योगू । कां घोटे कढत विख । डोंगर गिळितां मुख । न फाटे काई ।।" अशा एकाहून एक कठिणतम परीक्षेंत कधींच अपयश आलें नाहीं. माझ्या श्री रामायणावरील व्याख्यानमालेंत मीं तें दाखवून दिलेंच आहे. अर्जुनाला मात्र कांहीं क्षणीं असें भासमान होण्यासारखे प्रसंग आले. पण नरोत्तम अर्जुन शेवटीं या कठिणतम योगोपासनेंत उत्तीर्ण झालाच. त्याला करावा लागलेला अंतःप्रवृत्तींचा संघर्ष अत्यंत विलक्षण स्वरूपाचा आहे. मनांतल्या अनेक पवित्र श्रद्धा व कोमल भावना यांच्याशींच तो संघर्ष आहे. त्याचीं कांहीं उदाहरणेंच मी येथें देतों :—

(१) श्रीमद्भगवद्गीतेच्या प्रारंभीं अर्जुनाच्या मनांत आपल्या बंधूंना, सुहृदांना व गुरुजनांना कसें मारावें असा विकल्प उत्पन्न होऊन तें अधर्माच्या, अनीतीच्या व मानवताविरोधाच्या कल्पनेनें व्याकुल होऊन गेलें होतें असें वर्णन आहे. तो श्रीकृष्णांना म्हणतो:

आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः सम्बन्धिनस्तथा ।। ३४
एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ।। ३५
तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान् स्वबान्धवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ।। ३७
यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ।। ३८
कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ।। ३९
अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद् राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ।। ४५

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय २५

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ।। ४
गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुञ्जीय भोगान् रुधिरप्रदिग्धान् ।। ५

—महाभारत, भीष्मपर्व अध्याय २६

"मातुल, श्वशुर, पौत्र, मेव्हणे व इतर संबंधी लोक यांना मारण्याची माझी इच्छा नाहीं. त्यांनीं मला मारलें तरी मी त्यांना मारणार नाहीं. आचार्य, वडीलधारे लोक, पितामह, पुत्र यांना कोण मारील ? सामान्य पृथ्वीची तर कथाच काय, पण त्रैलोक्याचें राज्य मिळत असलें तरी मी यांचा वध करणार नाहीं. धार्तराष्ट्रांना मारणें म्हणजे स्वजनांचाच वध करणें आहे. स्वजनांचा वध करून आम्ही तरी कसे सुखी होऊं ? लोभाविष्ट झाल्यामुळें कुलक्षयाचा दोष व मित्रद्रोहाचें पातक, काय असतें याची यांना जाणीव नसली तरी आम्हांला ती आहे. आम्ही यांच्यासारखें वागून कसें चालेल ?

हे पापाचरणास प्रवृत्त झाले म्हणून आम्हीही तसेंच करावें काय ? अहो आम्हीं हें केवढें मोठें पाप करावयास उद्युक्त झालों आहोंत ! राज्यसुखाच्या लोभानें आमच्या स्वजनांनाच आम्ही मारूं इच्छीत आहोंत! मी प्रतिकार करीत नसतांना व निःशस्त्र स्थितींत असतांना धृतराष्ट्रपुत्रांनीं मला ठार मारलें तरी तें मला अधिक कल्याण-कारक वाटेल. हे मधुसूदना, भीष्म व द्रोण या अत्यंत पूज्य अशा व्यक्तींना युद्धामध्यें मी बाणांनीं कसा मारूं ? या महानुभाव गुरूंना न मारतां व त्यांच्या रक्तानें बरबटलेले उपभोग भोगण्याची इच्छा न बाळगतां भिक्षा मागून पोट भरणें देखील अत्यंत श्रेयस्कर आहे." भगवान् श्रीकृष्णांनीं गीतातत्त्वज्ञानाच्या उपदेशानें त्याचा मोह नष्ट केला व तो युद्धासाठीं सज्ज झाला. पण तत्त्वज्ञान पटल्याची व स्वात्मसमर्पणाची द्यावी लागणारी परीक्षा आपल्या कल्पनेपेक्षांही अधिक कठोर असूं शकेल याची मात्र त्याला कल्पनाही नसेल! त्याला वाटलें असेल कीं भीष्मांना युद्धाच्या घनघोर धुम-श्चक्रींत त्यांचे प्रहार अंगावर झेलीत व रणमदाच्या धुंदींत उलट त्यांच्यावर प्रहार करीत मारावयाचें असेल. पण त्यापेक्षांही त्याला कठिण परीक्षा द्यावी लागली. शूर अर्जुनाला ज्यांत भ्याड ठरावें लागेल, प्रतिकाराची भूमिका घेतलेल्या अर्जुनाला ज्यांत निःशस्त्रावर आक्रमण केल्याचें व प्रतिकारशून्य व्यक्तीला ठार मारल्याचें पातक करावें लागेल अशी भूमिका त्याला पत्करावी लागली. शिखंडीला पुढें करून मला ठार मारावें, स्त्रीपूर्व शिखंडी-वर मी मुळींच प्रहार करणार नाहीं, या स्थितींतही केवळ अर्जुनच मला मारूं शकेल असें भीष्मांनीं सांगितलें. षंढाला पुढें करून आपल्या अत्यंत चारित्र्यसंपन्न पितामहाला त्याच्या वार्धक्याच्या अवस्थेंत या पद्धतीनें मारण्याचा आलेला प्रसंग पाहून अर्जुनाला केवढें दुःख झालें असेल! नवव्या दिवशींच्या रात्रीं भीष्मांच्या शिबिरांतून परत येतांना रस्त्यांत अर्जुन श्रीकृष्णांना म्हणाला :—

**यथोक्तवति गांगेये परलोकाय दीक्षिते ।**
**अर्जुनो दुःखसन्तप्तः सव्रीडमिदमब्रवीत् ॥ ९०**

**गुरुणा कुरुवृद्धेन कृतप्रज्ञेन धीमता ।**
**पितामहेन संग्रामे कथं योद्धाऽस्मि माधव ।। ९१**

——महाभारत, भीष्मपर्व अध्याय १०७

"याप्रमाणें परलोकासाठीं दीक्षाबद्ध होऊन भीष्म बोलल्यानंतर अत्यंत दुःखी झालेला अर्जुन मनांत लाजला व श्रीकृष्णांना म्हणाला : हे माधवा, गुरु, सर्व कौरवांत वृद्ध, कृतप्रज्ञ व अत्यंत बुद्धिमान अशा पितामहांशीं मी कसा संग्राम करूं? लहानपणीं माझ्या अंगावरील धुळीनें यांच्या मांडीवर लोळत असतां यांचें शरीर मीं अनेकवार मळवून टाकलें आहे. वास्तविक हे राजा पांडूला पित्यासारखे असतांना मी माझ्या लहानपणीं यांच्या अंकावर बसून त्यांना बाबा म्हणून हांक मारावी व त्यांनीं मला म्हणावें कीं छे, छे, मी तुझा तात नाहीं. तुझ्या बापाचा बाप आहे. आज त्यांनाच मी माझ्या हातांनीं ठार मारूं काय? माझें सैन्य खुशाल मारलें जावो. या युद्धांत माझा जय होवो किंवा वध होवो, पण मी या महानुभावाशीं मुळींच युद्ध करणार नाहीं. या बाबतींत आपलें काय मत आहे?" कसोटीच्या या पहिल्याच क्षणीं आपल्या शिष्याची अशी अवस्था झालेली पाहून श्रीकृष्णांना काय वाटलें असेल? त्यांनीं अर्जुनाला सांगितलें कीं 'पूर्वीं भीष्मांच्या वधाची प्रतिज्ञा करून तुझ्यासारख्या क्षत्रियाला त्या प्रतिज्ञेपासून भ्रष्ट कसें होतां येईल! तुला त्यांना ठार मारावेंच लागेल. भीष्म म्हणजे कृतान्ताचा संहारासाठीं वासलेला जबडाच होय. तुलाच तो फाडला पाहिजे.' स्वात्मसमर्पणाच्या भूमिकेवरून आपले सारे मनोविकार आवरून अखेरीस अर्जुनाला मनांत अपकृत्य वाटणारें देखील हें कृत्य करावेंच लागलें. कीर्तीच्या, धर्माच्या, व मानव्याच्या हृदयाशीं बाळगलेल्या सर्व कल्पनांविरुद्ध आपल्या नेत्याच्या इच्छेसाठीं केवढें विलक्षण द्वंद्व त्याला करावें लागलें असेल! पण त्यांत तो यशस्वी ठरला.

(२) अर्जुनाची दुसरी कसोटीची परीक्षा जयद्रथाच्या वधाच्या दिवशींच्या युद्धांत भगवंतांनीं घेतली. कर्माकर्म व धर्माधर्म या सर्वांचा भार स्वतःच्या मस्तकीं घेऊन 'तूं केवळ माझी

आज्ञा पाळ !' असें श्रीकृष्णांनीं त्याला सांगितलें होतें. व त्यानेंही होकार भरला होता. याचीच ही दुसरी कसोटी होय. धर्मशास्त्राचें ज्ञान नसलेला तो कोणी असता तर गोष्ट वेगळी होती. पण येथील आज्ञापरिपालनांत स्वतःच्याच मनाविरुद्ध त्याला संग्राम करावयाचा होता. द्रोणाचार्यांचा व्यूह भेदून अर्जुन सैन्यसागरांत प्रविष्ट झाल्यानंतर त्याचीच वार्ता जेव्हां ऐकूं येईना तेव्हां युधिष्ठिरांनीं सात्यकीला त्याचा शोध करून त्याचें कुशल आहे कीं नाहीं तें कळवावयास सांगितलें. सात्यकि द्रोणांच्या सैन्यांत प्रविष्ट झाल्यानंतर कौरवांकडील एक महान् योद्धा सौमदत्ति भूरिश्रवा हा सात्यकीवर चालून आला. आतांपर्यंत युद्ध करून सात्यकि अगदीं थकून गेला होता व भूरिश्रवा ताज्या दमाचा होता. त्यानें सात्यकीला केश धरून जमिनीवर आपटलें व खड्गानें त्याचें मस्तक तोडून टाकण्यासाठीं एका बाजूला त्याला फरफरां ओढत भूरिश्रव्यानें आपलें खड्ग उपसून तें वर उचललें. त्यांचा तो संग्राम पहात असतां भूरिश्रव्याच्या पराक्रमाबद्दल अर्जुन स्वतःच्या मनांत प्रशंसा करीत होता. सात्यकीसारख्या महापराक्रमी वीरावर भूरिश्रव्यानें केलेली ही मात पाहून त्याच्या शौर्यपूर्जक अंतःकरणाला अत्यंत आनंद झाला होता. पण सात्यकीसारखा खंदा वीर बळी पडणार असें पाहून श्रीकृष्णांनीं अर्जुनाला असें सांगितलें कीं, येथून आपल्या बाणानें भूरिश्रव्याचा हात तोडून टाक.' अर्जुनाला या द्वंद्वयुद्धांत पडून लक्ष नसलेल्या शत्रूचें असावध स्थितींत हनन करणें बरें वाटलें नाहीं. भूरिश्रव्याबद्दल त्याला एक प्रकारें कौतुकच वाटत होतें. पण श्रीकृष्णांची आज्ञा ऐकतांच मनांतल्या मनांत भूरिश्रव्याचीच प्रशंसा करीत पण त्यानें श्रीकृष्णांच्या आज्ञेनुरूप त्याचा हात तोडून त्याला मृत्युपंथास पाठविलें. महाभारतकार म्हणतातः

**तं तथा परिकृष्यन्तं दृष्ट्वा सात्वतमाहवे ।**
**वासुदेवस्ततो राजन् भूयोऽर्जुनमभाषत ।। ६३**
**पश्य वृष्ण्यन्धकव्याघ्रं सौमदत्तिवशं गतम् ।**
**तव शिष्यं महाबाहो धनुष्यनवरं त्वया ।। ६४**

एवमुक्तो महाबाहुर्वासुदेवेन पाण्डवः ।
मनसा पूजयामास भूरिश्रवसमाहवे ।। ६६
विकर्षन् सात्वतश्रेष्ठं क्रीडमान इवाहवे ।
संहर्षयति मां भूयः कुरूणां कीर्तिवर्धनः ।। ६७
प्रवरं वृष्णिवीराणां यन्न हन्याद्धि सात्यकिम् ।
महाद्विपमिवारण्ये मृगेन्द्र इव कर्षति ।। ६८
एवं तु मनसा राजन् पार्थः संपूज्य कौरवम् ।
वासुदेवं महाबाहुरर्जुनः प्रत्यभाषत ।। ६९
सैन्धवे सक्तदृष्टित्वान्नैनंपश्यामि माधवम् ।
एतत्त्वसुकरं कर्म यादवार्थे करोम्यहम् ।। ७०
इत्युक्त्वा वचनं कुर्वन् वासुदेवस्य पाण्डवः ।
ततः क्षुरप्रं निशितं गाण्डीवे समयोजयत् ।। ७१
पार्थबाहुविसृष्टः स महोल्केव नभश्च्युता ।
सखड्गं यज्ञशीलस्य साङ्गदं बाहुमच्छिनत् ।। ७२

—महाभारत द्रोणपर्व अध्याय १४२

"याप्रमाणें भूरिश्रवा सात्यकीला ओढीत असतां श्रीकृष्ण अर्जुनाला पुन्हां म्हणाले, 'पार्था, पहा, पहा, हा वृष्णि व अन्धकांतील व्याघ्र, तुझ्यासारखाच धनुर्धारी असलेला तुझा शिष्य सात्यकि भूरिश्रव्याच्या ताब्यांत गेला आहे. तुझ्याचसाठीं हा येथें आला. ह्याला सोडविण्यासाठीं आवश्यक तें तूं केलें पाहिजेस. याप्रमाणें भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाशीं बोलल्यावर मनांतल्या मनांत तो भूरिश्रव्याचीच प्रशंसा करूं लागला. तो म्हणूं लागला, 'या सात्वतश्रेष्ठ सात्यकीला याप्रमाणें ओढीत असतां कौरवांच्या कीर्तींत भर घालणारा हा भूरिश्रवा माझ्या हृदयाला अत्यंत आनंद देत आहे. गजेंद्रावर झडप घालून सिंहानें त्याला फरफरां ओढावें त्याप्रमाणें हा सात्यकीला ओढीत आहे. वृष्णिप्रवर सात्यकीला हा ठार मारणार नाहीं असें आतां केलेंच पाहिजे.' याप्रमाणें मनांत त्याची प्रशंसा करीत महाबाहु अर्जुन श्रीकृष्णांना म्हणाला, 'जयद्रथाकडे माझी दृष्टि खिळून राहिल्यामुळें सात्यकीकडे माझें लक्षच गेलें नाहीं. आपण म्हणतां तें कर्म अत्यंत दुष्कर आहे. पण मी तें करतों.' असें म्हणून त्यानें एक तीक्ष्ण बाण भूरिश्रव्याच्या हाताच्या रोखानें सोडला व त्याचा खड्ग धारण केलेला हात तोडून टाकला.

(३) कठिणतम परीक्षेंत स्वतःचें मन मारून आत्मसमर्पण केलेल्या अर्जुनाची द्रोणवधाच्या वेळीं पुन्हां श्रीकृष्णांनीं परीक्षा घेतली. पण या परीक्षेंत मात्र भावनेनें चित्त विचलित झालेल्या अर्जुनाला उत्तीर्ण होतां आलें नाहीं. द्रोणाचार्य घोर संग्राम करीत असतां त्यांच्यासमोर उभे राहण्याची कुणाचीही छाती नव्हती. त्यांच्यापुढें पराक्रम चालण्यासारखा नाहीं असें पाहून वेगळ्याच युक्तीनें त्यांना संपवावें असें श्रीकृष्णांच्या मनानें घेतलें. महाभारतकार म्हणतातः—

त्रस्तान् कुन्तीसुतान् दृष्ट्वा द्रोणसायकपीडितान् ।
मतिमाञ्छ्रेयसे युक्तः केशवोऽर्जुनमब्रवीत् ॥ ९
नैष युद्धे न संग्रामे जेतुं शक्यः कथञ्चन ।
सधनुर्धन्विनां श्रेष्ठो देवैरपि सवासवैः ॥ १०
न्यस्तशस्त्रस्तु संग्रामे शक्यो हन्तुं भवेन्नृभिः ।
आस्थीयतां जये योगो धर्ममुत्सृज्य पाण्डवाः ॥ ११
यथा न संयुगे सर्वान्न हन्याद् रुक्मवाहनः ।
अश्वत्थाम्नि हते नैष युद्धेदिति मतिर्मम ॥ १२
तं हतं संयुगे कश्चिदस्मै शंसतु मानवः ।
अन्ये त्वरोचयन् सर्वे कृच्छ्रेण तु युधिष्ठिरः ॥ १३

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय १९०

"द्रोणाचार्यांच्या बाणांनीं पीडलेले पाण्डव पाहून अंतिम विजयावर दृष्टि असलेले श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले, धनुष्य हातांत घेऊन द्रोण उभे असतां महेन्द्र सैन्यासह चालून आला तरी त्याला द्रोणांचा पराभव करतां येणें शक्य नाहीं. समरांगणांत शस्त्रत्याग केला तरच द्रोणांचा वध करतां येणें शक्य आहे असें माझें मत आहे. म्हणून धर्माऐवजीं जय प्रधान समजून अधार्मिक वाटणाऱ्या देखील युक्तींचा तुम्हीं अवलंब करावा असें मला वाटतें. जर आचार्यांची तुम्ही उपेक्षा केली तर हे रुक्मरथ द्रोण सर्वांनाच ठार मारतील. पण अश्वत्थामा जर मेला तर द्रोणाचार्य पुढें युद्ध न चालवितां शस्त्रसंन्यास करतील असें माझें मत आहे. म्हणून कोणी तरी त्यांच्याजवळ जाऊन अश्वत्थामा मेला असें त्यांना खोटेंच

सांगावें व त्यांनीं शस्त्रपरित्याग केल्यावर त्यांना मारावें. ही गोष्ट इतर सर्वांना रुचली. मोठ्या कष्टानें युधिष्ठिरही या गोष्टी तयार झाले. पण भगवान् श्रीकृष्णांच्या इच्छेसाठीं देखील आपल्या गुरूचा द्रोह करावयास अर्जुनाचें अन्तःकरण सिद्ध झालें नाहीं. त्यानें ती गोष्ट नाकारली इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष ती गोष्ट घडून आल्यावर शस्त्रन्यास करून समाधि अवस्थेंत गेलेल्या द्रोणाचार्यांचा वध करावयास्तव धृष्टद्युम्न नग्न खड्ग हातांत घेऊन त्यांच्या अंगावर चालून जाऊं लागला, त्यावेळीं महाभारतकार म्हणतातः—

**न हन्तव्यो न हन्तव्य इति ते सर्वतोऽब्रुवन् ।**
**तथैव चार्जुनो वाहादवरुह्यैनमाद्रवत् ।। ६४**
**उद्यम्य त्वरितो बाहुं ब्रुवाणश्च पुनः पुनः ।**
**जीवन्तमानयाचार्यं मा वधीरिति धर्मवित् ।। ६५**

—महाभारत, द्रोणपर्व अध्याय १९३

" आचार्यांना मारूं नकोस मारूं नकोस, असा एकच आरडा-ओरडा झाला व त्याला आवरण्यासाठीं अर्जुनानें स्वतःच्या रथावरून खालीं उडी घेतली. आपला एक हात उंच उभारून त्याच्या मागें धांवत अर्जुन जोरजोरानें ओरडूं लागला. मारूं नकोस ! गुरूचा वध करूं नकोस. आचार्यांना जिवंत पकडून आण." पण अर्जुन जवळ जाऊन पोंचण्याआधींच धृष्टद्युम्नानें द्रोणाचार्यांचा वध केला. हा एकच असा प्रसंग आहे कीं, जेथें भावनेनें अर्जुनावर विजय मिळविला आहे. ती भावना विलोभनीय आहे, श्रेष्ठ आहे. पण शेवटीं ती भावना आहे. केवढीही विलोभनीय असली तरी शेवटीं कठोर कर्मयोगासमोर तिची प्रतिष्ठा असूं शकत नाहीं. सीतेला वनांत नेऊन सोडण्याची आज्ञा प्रभु रामचंद्रानें केली त्यावेळीं लक्ष्मणाचेंही अन्तःकरण असेंच विचलित झालें होतें. पण त्याचें पारडें कर्तव्या-कडेच झुकलें. अर्जुनावर मात्र येथें भावनेनें विजय संपादन केला. त्यानंतर मात्र अर्जुन सांवरला व कर्णवधाच्या प्रसंगीं असाच प्रसंग उपस्थित झाला असतां त्यानें आपलें अंतःकरण विचलित होऊं दिलें नाहीं.

(४) युधिष्ठिरांच्या नेतृत्वामुळें धर्म हा साऱ्याच पाण्डवांचा जसा स्थायी भाव होऊन राहिला होता तसाच तो अर्जुनाचाही होता. विशुद्ध धर्मनिष्ठपणांत कसल्याही प्रकारचा पर्याय व तोही स्वार्था-साठीं सुचविलेला पर्याय स्वीकारण्याची त्याच्या अंतःकरणाची तयारी नसे. या गोष्टीचें प्रत्यंतर द्रौपदीस्वयंवरानंतर त्यानें केलेल्या तीर्थयात्राप्रकरणांत पहावयास सांपडतें. द्रौपदीस्वयंवरा-नंतर महर्षि नारदांच्या सांगण्यावरून पाण्डवांमध्यें आपापसांत असा संकेत ठरला होता कीं, द्रौपदी कोणाही एकाबरोबर असतां दुसऱ्यानें जर त्या अवस्थेंत त्या दोघांना पाहिलें तर पाहणाऱ्यानें बारा वर्षें तीर्थयात्रा करावी. दुर्दैवानें हा प्रसंग एकदां अर्जुनावरच आला. एके दिवशीं एका ब्राह्मणाच्या गाई चोरांनीं पळविल्या. त्याबरोबर आरडाओरडा करीत तो पाण्डवांच्या निवासस्थानीं आला. अर्जुनाला ती गोष्ट कळतांच चोरांचा प्रतिकार करण्याच्या निश्चयानें आयुधें घेण्यासाठीं म्हणून तो शस्त्रागारांत गेला. त्याचवेळीं त्या शस्त्रागारांतच युधिष्ठिर व द्रौपदी एकांतांत होते. अर्जुनाला मोठेंच धर्मसंकट ओढवल्यासारखें वाटलें. ब्राह्मणाचें साह्य न करावें तर कर्तव्यच्युतीचा दोष लागेल व साह्य करावें तर महर्षि नारदांसमक्ष ठरलेल्या कराराचा भंग होऊन आपल्याला तीर्थयात्रेसाठीं जावें लागेल अशा पेचांत तो सांपडला. थोडा वेळ विचार करून त्यानें असें ठरविलें कीं स्वतः कष्ट भोगले तरी हरकत नाहीं पण ब्राह्मणाचें गोधन त्याला परत मिळवून द्यावें. युधिष्ठिरांना विचारून त्यानें शस्त्रागारांत प्रवेश केला व आपलीं शस्त्रें घेऊन नि चोरांचा प्रतिकार करून ब्राह्मणाचें गोधन त्यानें त्याला परत मिळवून दिलें. तो परत आल्यावर सर्वांनींच त्याचें मोठें स्वागत केलें. पण नंतर अर्जुन निर्बंधाच्या भंगामुळें तीर्थ-यात्रेस जाण्यासाठीं युधिष्ठिरांची जेव्हां आज्ञा मागूं लागला, त्या वेळीं अर्जुनाच्या वियोगाच्या कल्पनेनें व्याकूळ होऊन बंधुवत्सल युधिष्ठिर त्याला न जाण्याचा आग्रह करूं लागले. त्यांनीं त्याला असें सांगितलें कीं, मला विचारूनच तूं आंत आला असल्यामुळें तुला कसल्याही प्रकारचा दोष लागूं शकत नाहीं. शिवाय वडील

माणसानें धाकट्याच्या विहरणाच्या वेळीं तेथें जाणें जसें दोषास्पद आहे तसेंच विशिष्ट कार्यानिमित्त वडिलांच्या आज्ञेनें धाकट्यांनीं तेथें अनुप्रवेश करणें दोषास्पद नाहीं. म्हणून तुझ्या हातून धर्म-लोपही घडलेला नाहीं व माझें धर्षणही झालें नाहीं. यावर अर्जुनानें जें त्यांना उत्तर दिले तें त्याच्या विशिष्ट मनोवृत्तीवर प्रकाश पाडूं शकतें. तो म्हणाला:–

**न व्याजेन चरेद् धर्ममिति मे भवतः श्रुतम् ।**
**न सत्याद्विचलिष्यामि सत्येनायुधमालभे ।। ३४**

––महाभारत, आदिपर्व अध्याय २१३

"हे महाराज, कपटानें धर्माचरण करूं नये असें मी आपल्या जवळून ऐकलें आहे.. सत्यापासून मी रेसभरही विचलित होणार नाहीं. मी आयुधाला स्पर्श करून हें आपणांस सांगतों." अर्जुनाच्या अशा प्रतिज्ञा होत्या कीं युद्ध सोडून इतर वेळीं जो कोणी युधि-ष्ठिरांच्या शरीराचें रक्त काढील अथवा त्यांना जखम करील त्याला मी तत्काळ ठार मारीन. तसेंच कोणी गाण्डीव धनुष्य दुसऱ्याला द्यावयास सांगेल तर त्यालाही मी ठार मारीन. कपटानें धर्माचरण करावयास मुळींच प्रवृत्त न होणारा पार्थ या प्रतिज्ञांच्या बाबतींत कसलाही पर्याय मान्य करणार नाहीं अशी खात्री असल्यामुळेंच विराटपर्वांत उत्तर व बृहन्नला यांच्या नगरप्रवेशाच्या वेळीं कंकानें केलेल्या बृहन्नलेच्या प्रशंसेनें रागावून विराट राजानें फेकून मारलेल्या फांशानें मस्तकाला जखम होऊन त्यांतून रक्त वाहूं लागलें असतां त्या स्थितींत केवळ उत्तरालाच प्रवेश करूं द्या, बृहन्नलेला प्रवेश करूं देऊं नका, असें युधिष्ठिरानें सुचविलें आहे. ते म्हणतात:–

**क्षत्तारं कुरुराजस्तु शनैः कर्णमुपाजपत् ।**
**उत्तरः प्रविशत्वेको न प्रवेश्या बृहन्नला ।। ५४**
**एतस्य हि महाबाहो व्रतमेतत् समाहितम् ।**
**यो ममाङ्गे व्रणं कुर्याच्छोणितं वाऽपि दर्शयेत् ।।**
**अन्यत्र संग्रामगतान्न स जीवेत् कथञ्चन ।। ५५**
**न मृष्याद्भृशसंक्रुद्धो मां दृष्ट्वा तु सशोणितम् ।**
**विराटमिह सामात्यं हन्यात् सबलवाहनम् ।। ५६**

–महाभारत, विराटपर्व अध्याय ६८

" उत्तराला आणावयास जाणाऱ्या दूताला कंकवेषांतील युधिष्ठिर म्हणाले: एकट्या उत्तरालाच प्रवेश करूं द्या. बृहन्नलेला आंत येऊं देऊं नका. त्याचें असें व्रत आहे कीं युद्ध सोडून इतर वेळीं जो कोणी माझ्या शरीराचें रक्त काढील अथवा मला जखम करील तो कोणत्याही कारणास्तव जिवंत राहूं शकणार नाहीं. माझें हें रक्त पाहिल्यावर अत्यंत संतापून तो राजा विराटाला अमात्य व सैन्यासहित ठार मारल्याविना रहाणार नाहीं." अशा सत्यप्रतिज्ञ व प्रतिज्ञेंत पर्याय न मानणाऱ्या अर्जुनाची भगवान् श्रीकृष्णांच्या इच्छाशक्तींत त्यानें स्वात्मसमर्पण केल्यावर काय अवस्था झाली तें पहा. कर्णपर्वांत संतापलेल्या युधिष्ठिरानें गाण्डीव धनुष्य दुसऱ्याला देऊन टाक असें म्हटल्यावर आपल्या हातांत खड्ग घेऊन स्वतःची प्रतिज्ञा खरी करण्यासाठीं अर्जुन युधिष्ठिराकडे धांव घेऊं लागला. त्याबरोबर श्रीकृष्णांनीं त्याचा हात धरून त्याला विचारलें येथें शिबिरांत हें खड्ग कशासाठीं ? त्यावर अर्जुन त्यांना म्हणाला :—

**अर्जुनः प्राह गोविन्दं क्रुद्धः सर्प इव श्वसन् ।**
**अन्यस्मै देहि गाण्डीवमिति मां योऽभिचोदयेत् ।। ९**
**भिन्द्यामहं तस्य शिर इत्युपांशु व्रतं मम ।**
**तदुक्तं मम चानेन राज्ञाऽमितपराक्रम ।। १०**
**समक्षं तव गोविन्द न तत्क्षन्तुमिहोत्सहे ।**
**तस्मादेनं वधिष्यामि राजानं धर्मभीरुकम् ।। ११**
**प्रतिज्ञां पालयिष्यामि हत्वैनं नरसत्तमम् ।**
**एतदर्थं मया खड्गो गृहीतो यदुनन्दन ।। १२**
**सोऽहं युधिष्ठिरं हत्वा सत्यस्यानृण्यतां गतः ।**
**विशोको विज्वरश्चापि भविष्यामि जनार्दन ।। १३**

—महाभारत, कर्णपर्व अध्याय ६९

" दुसऱ्याला गाण्डीव दे असें जो कोणी मला म्हणेल त्याचा शिरच्छेद करावयाचा अशी माझी प्रतिज्ञा आहे. या राजानें आपल्यासमोर तसें केलें असल्यामुळें मी या धर्मभीरु राजाचा वध करणार आहे. याला ठार मारून मी माझ्या प्रतिज्ञेचें संरक्षण करीन. सत्याचें यथावत् पालन केल्यानेंच मला खरी मनःशांति लाभेल." त्याबरोबर महाभारतकार म्हणतात:—

धिग् धिगित्येव गोविन्दः पार्थमुक्त्वाब्रवीत् पुनः ।। १५

कृष्ण उवाच ।

इदानीं पार्थ जानामि न वृद्धाः सेवितास्त्वया ।
काले न पुरुषव्याघ्र संरंभं यद् भवानगात् ।। १६
न हि धर्मविभागज्ञः कुर्यादेवं धनञ्जय ।
यथा त्वं पाण्डवाद्येह धर्मभीरुरपण्डितः ।। १७
अकार्याणां क्रियाणां च संयोगं यः करोति वै ।
कार्याणामक्रियाणां च स पार्थ पुरुषाधमः ।। १८
त्वया चैवं व्रतं पार्थ बालेनेव कृतं पुरा ।
तस्मादधर्मसंयुक्तं मौर्ख्यात् कर्म व्यवस्यसि ।। २७
त्वमित्यत्रभवन्तं हि ब्रूहि पार्थ युधिष्ठिरम् ।
त्वमित्युक्तो हि निहतो गुरुर्भवति भारत ।। ८३

——महाभारत, कर्णपर्व अध्याय ६९

"तुझा धिक्कार असो! असें अर्जुनाला म्हणून भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, हे पार्था, आज मला ही गोष्ट स्पष्टपणें कळली कीं परिणतप्रज्ञ लोकांचा तुला मुळींच सहवास घडलेला नाहीं. कारण महत्त्वाच्या प्रसंगीं तुझी बुद्धि पूर्णपणें गोंधळली. धर्माचें रहस्य जाणणारा मनुष्य तुझ्यासारखें कधींही वागणार नाहीं. तूं नुसताच धर्मभीरू नसून महामूर्ख आहेस. कार्याकार्याचा विवेक ज्याला नाहीं त्याला पुरुषाधम असें म्हणतात. एक तर तूं मूर्खपणानें ही प्रतिज्ञाच कशाला केलीस? व शिवाय या पद्धतीनें ती पाळण्यांत तर अधर्म व मूर्खपणा यांचा तूं कळसच करीत आहेस. गुरूंना कसें मारावें याची तरी तुला कल्पना आहे काय? ज्यांना 'तुम्ही' म्हणावयाचें त्यांना 'तूं' म्हणणें व ज्यांचा सन्मान करावयाचा त्यांची तोंडावर निर्भर्त्सना करणें हाच गुरूचा खरा वध होय. यांत प्रतिज्ञेचेंही पालन होईल व युधिष्ठिरांचेही प्राण वांचतील." अर्जुन यांवर श्रीकृष्णांना असें विचारूं शकत होता कीं, आचार्य द्रोणांच्या बाबतींत हाच न्याय लावावयास आपण सिद्ध कां झाला नाहीं? पण तसें विचारण्याची त्यांची हिम्मत झाली नाहीं. पुढें श्रीकृष्णांच्या म्हणण्यानुसार युधिष्ठिरांची निर्भर्त्सना करून पर्यानानेंच त्यानें

आपल्या प्रतिज्ञेचें पालन केलें. पुन्हा खड्ग उपसून तो उभा राहिला. भगवंतांनीं त्याला त्याचें कारण विचारलें. त्यावर तो म्हणाला, जो कोणी युधिष्ठिरांना ठार मारील त्याचा वध करावयाचा अशी माझी दुसरी प्रतिज्ञा आहे. पर्यायानें कां होईना पण मी युधिष्ठिरांचा वध केला आहे त्यामुळें स्वत:ला संपवून मी माझ्या प्रतिज्ञेचें पालन करतों. श्रीकृष्णांनीं त्याला मूर्खांत काढून असें सांगितलें कीं गुरुवध हें एक भयंकर पातक असेल तर आत्महत्या त्याहूनही अधिक भयानक पाप आहे. पर्यायानें ज्याप्रमाणें तूं आपल्या एका प्रतिज्ञेचें पालन केलेंस त्याचप्रमाणें दुसऱ्याही प्रतिज्ञेचें तुला पर्यायानें पालन करतां येईल. स्वत:ची स्तुति हा स्वत:चा वध आहे. तूं आतां आपल्या पराक्रमाचें स्वत:च्याच तोंडानें वर्णन कर म्हणजे तुझा वध झालाच. अर्जुनानें याही पर्यायाचा स्वीकार केला. केवढें विलक्षण आत्मसमर्पण हें ! तात्पर्य अंगीं प्रचंड सामर्थ्य, सर्व प्रकारची योग्यता, त्रैलोक्याचे दिक्कोन गर्जवून टाकणारी कीर्ति, देवेंद्राच्या आसनाला भिडणारी यशोपताका, प्रखर स्वाभिमान व कर्तृत्वाची प्रचंड उर्मि असतांना देखील मनोवृत्तीशीं अपूर्व द्वंद्व करून अर्जुनानें योग्य नेतृत्व मिळतांच त्याच्या इच्छाशक्तींत धर्माधर्म' कर्माकर्म, भावाभाव, सुकृतदुष्कृत इत्यादिकांसहित जे विलक्षण आत्मसमर्पण केलें त्यामुळें तर तो अधिकच श्रेष्ठ वाटतो. पाण्डव हे तर श्रीकृष्णांच्या धर्मसंस्थापनेच्या कार्याचें साधनयंत्र आहेतच; पण अर्जुन हा त्यांतील सर्वांत महत्त्वाचा भाग होय. नरनारायणांच्या जोडींतील नराचें स्वरूप हें असें आहे.

## नकुल व सहदेव

युधिष्ठिर, भीम व अर्जुन ह्या एकाहून एक श्रेष्ठ पुरुषांच्या दीप्तींत नकुल-सहदेवांचें तेज पार लोपून गेलें आहे. त्यांच्या अंगीं कर्तृत्व असलें तरी तें भीमार्जुनांइतकें देदीप्यमान नाहीं किंवा वेगळेपणानें उमटून दिसण्यासारखें स्वतंत्र असें कोणतेंही कार्य त्यांच्याकडून घडलेलें नाहीं. नाहीं म्हणावयास सहदेवानें युद्धांत शकुनीला मारलें आहे. पण शकुनि हा इतका क्षुद्र योद्धा आहे कीं त्याचें

तसें महत्त्व कांहीं नाहीं. नकुल हा सर्व पाण्डवांत अत्यंत सुन्दर होता. त्याच्यावर कुंतीचें अतोनात प्रेम असे. सौंदर्याचा त्याला अभिमानही असे. पाण्डव आपलें शेवटचें प्रस्थान करीत असतां नकुल ज्या वेळीं गळून पडला त्या वेळीं 'त्याच्या पतनाचें कारण काय?' म्हणून भीमसेनानें विचारलें असतां युधिष्ठिर म्हणतात :—

रूपेण मत्समो नास्ति कश्चिदित्यस्य दर्शनम् ।
अधिकश्चाहमेवैक इत्यस्य मनसि स्थितम् ।। १६

—महाभारत, महाप्रस्थानिक पर्व अध्याय २

"माझ्यासारखा रूपवान् कुणीही नाहीं असा याला मोठा गर्व असल्यामुळें याचें पतन झालें. सामान्यत: तो स्वभावाचा शांत आहे व आपले ज्येष्ठ बन्धु करतील तें विचारपूर्वकच करतील अशी त्याची भावना असल्यामुळें स्वत:च्या कुठल्याही मतांच्या बाबतींत तो आग्रही नाहीं. त्याची ही विशिष्ट मनोवृत्ति उद्योगपर्वांत श्रीकृष्णांना शिष्टाईसाठीं निरोप देत असतां त्यानें केलेल्या भाषणांत व्यक्त होते. तो श्रीकृष्णांना म्हणतो :-

सर्वमेतदतिक्रम्य श्रुत्वा परमतं भवान् ।
यत्प्राप्तकालं मन्येथास्तत्कुर्याः पुरुषोत्तम ।। ४
तस्मिंस्तस्मिन्निमित्ते हि मतं भवति केशव ।
प्राप्तकालं मनुष्येण क्षमं कार्यमरिन्दम ।। ५
अस्माकमपि वार्ष्णेय वने विचरतां तदा ।
न तथा प्रणयो राज्ये यथा सम्प्रति वर्तते ।। ८
इमान् हि पुरुषव्याघ्रानचिन्त्यबलपौरुषम् ।
आत्तशस्त्रान् रणे दृष्ट्वा न व्यथेदिह कः पुमान् ।। १०
स भवान् कुरुमध्ये तं सान्त्वपूर्वं भयोत्तरम् ।
ब्रूयाद्वाक्यं यथा मन्दो न व्यथेत सुयोधनः ।। ११

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ८०

"हे श्रीकृष्णा, सर्वांचेंच म्हणणें आपण ऐकलें आहे. आपल्याला स्वत:लाही स्वतंत्र मत आहे. जें आपणांस काळाच्या दृष्टीनें योग्य वाटेल तें करावें. त्या त्या प्रत्येक प्रसंगीं काळ व प्रकरण यांच्या अनुरोधानेंच मनुष्याचीं मतें बदलतात अथवा स्थिरही राहतात.

आतां आमचेंच पहा. नुकतेंच आम्हीं वनवासांत असतां राज्याविषयीं आम्हांला जितकी आस्था वाटत नव्हती तितकी ती आतां वाटूं लागली आहे. शस्त्रें हातांत घेऊन सिद्ध असलेल्या या अचिंत्य सामर्थ्यशाली पुरुषांना आमच्या बाजूनें रणांत उभे ठाकलेले पाहतांच कुणाच्या अन्तःकरणाचा थरकांप उडणार नाहीं! आपण कौरवांच्या सभेंत दुर्योधनाचें अन्तःकरण व्यथित होणार नाहीं अशाच पद्धतीनें आपल्या बोलण्याचा प्रारंभ करावा. त्यानें साम दुरावतो असें वाटलें तर मग खुशाल कठोर बोलावें." नकुल हा कोणत्याही प्रश्नाचा स्वतंत्रपणें विचार करणारा होता असें दिसतें तर सहदेव हा उतावळ्या स्वभावाचा असून आपल्याला कांहींतरी विशेष समजतें अशी त्याची भावना आहे. महाप्रस्थानिक पर्वांत त्याचे दोष सांगतांना युधिष्ठिर म्हणतात : "आपल्याइतका शहाणा दुसरा कुणीच नाहीं असें याला वाटत असल्यामुळें याचें पतन झालें आहे." सहदेव हा उतावळ्या स्वभावाचा असून त्याला पोंच नाहीं. सभापर्वांत श्रीकृष्णांच्या अग्रपूजेच्या वेळीं त्यानें केलेलें भाषण औद्धत्याचेंच निदर्शक आहे. पण त्याहीपेक्षां श्रीकृष्णांना शिष्टाईच्या वेळीं निरोप देतांना त्यानें जें भाषण केलें आहे तें त्याच्या उतावळेपणाचें पूर्ण निदर्शक आहे. तो म्हणतो :—

> यदेतत्कथितं राज्ञा धर्म एषः सनातनः ।
> यथा च युद्धमेव स्यात्तथा कार्यमरिन्दम ॥ १
> यदि प्रशममिच्छेयुः कुरवः पाण्डवैः सह ।
> तथापि युद्धं दाशार्ह योजयेथाः सहैव तैः ॥ २
> कथं नु दृष्ट्वा पाञ्चालीं तथा कृष्ण सभागताम् ।
> अवधेन प्रशाम्येत मम मन्युः सुयोधने ॥ ३
> यदि भीमार्जुनौ कृष्ण धर्मराजश्च धार्मिकः ।
> धर्ममुत्सृज्य तेनाहं योद्धुमिच्छामि संयुगे ॥ ४

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ८१

"युधिष्ठिरांनीं जें सांगितलें तें धर्मदृष्ट्या बरोबर आहे. पण आपण मात्र कौरवांच्या राजसभेंत जाऊन ज्यामुळें युद्धच निश्चित होईल असें करावें. कौरव पांडवांशीं संधि करूं इच्छितील तरीही

तो होऊं न देतां आपण युद्ध घडवून आणावें. द्रौपदीला सभेंत ज्यानें आणलें त्या दुर्योधनाचा वध झाल्यावांचून माझ्या मनाला शांति नाहीं. हे कृष्णा, जर भीमसेन, अर्जुन व धर्मराज हे धार्मिक असतील तर धर्म सोडून देखील युद्ध करण्याची माझी इच्छा आहे." खरोखरींच असें घडून आलें असतें तर कर्णादिकांसमोर बिचाऱ्या सहदेवाची काय स्थिति झाली असती ? भीष्मांनीं नकुल व सहदेव या दोघांचीही गणना रथ्यांमध्यें केलेली आहे. हव्या त्या प्रसंगीं आपल्या बंधूंशीं ते एकरूप होऊन गेल्यामुळें श्रीकृष्णांच्या कार्यांत त्यांचाही उपयोग झालेलाच आहे. सावत्रपणाचें नातेंही न उरूं देतां युधिष्ठिरांच्या जीवनप्रवाहांत एकरूप होऊन जाण्यांत त्यांची महात्मताच व्यक्त होते.

भगवान् श्रीकृष्णांच्या धर्मस्थापनेच्या कार्यांतील साधनयंत्राचें अथवा पाण्डवांचें स्वरूप हें असें आहे.

---

# २६. उपसंहार

माझ्या पहिल्या दोन व्याख्यानांत महाभारत हा सांस्कृतिक ज्ञानकोश होय असें मीं म्हटलें आहे. बहिरंग परीक्षण व अंतरंग परीक्षण असे ग्रंथपरीक्षणाचे दोन प्रकार आहेत. पैकी बहिरंग परीक्षणाचा व्याप मोठा असून प्रत्यक्ष जीवन उजळण्यासाठीं त्यांतून हातीं कांहींच लागत नाहीं. शिवाय बहिरंग परीक्षणाचे वाद कधींच संपण्यासारखे नसतात. महाराष्ट्रांतील व महाराष्ट्राबाहेरीलही विद्वान् मंडळींत महाभारताच्या बहिरंग परीक्षणाचे वाद आजही चालू आहेत. माझ्या कालाच्या मर्यादेंत कालनिर्णय, कर्त्याचा निर्णय, संस्करणें इत्यादि दृष्टींचा ऊहापोह करणें शक्य नव्हतें. म्हणून बहिरंग परीक्षणापेक्षां अधिक महत्त्वाच्या अशा अंतरंग परीक्षणाचीच मी कास धरली. मला ग्रंथांतील प्रतिपाद्याची ओळख करून द्यावयाची होती, व त्यांतील सौंदर्य, मांगल्य, व शुचिता यांच्या परिचयांत माझे व आपले असे दोघांचेही क्षण जावे असें वाटत होतें. म्हणून बहिरंग परीक्षणाच्या तुषाकंडनाऐवजीं अंतरंगाकडेच मी माझी दृष्टि वळविली.

महाभारताच्या अंतरंग परीक्षणाचे विविध प्रकार आहेत. अनेक दृष्टींनीं महाभारतीय विषयावर ग्रंथनिष्पत्ति होऊं शकते. मंत्रशास्त्र, तत्त्वज्ञान, काव्यविषयक दृष्टि, उपकथानकें, तत्कालीन युद्धशास्त्र, शस्त्रास्त्रांची अवस्था यांपैकीं प्रत्येक विषयावर एक मोठा ग्रंथ निर्माण होऊं शकतो. माझ्या कालमर्यादेंत कोणता तरी एक दृष्टिकोन पूर्णपणें मांडला जाणें अवश्य होतें. मी महाभारताकडे सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टिकोनांतून पाहिलें. महाभारताच्या संघर्षाची लोक जी उपपत्ति बसवितात व विशेषतः मानवी जीवन-मूल्यें उखडून टाकावयास प्रवृत्त झालेले कम्युनिस्ट त्याचें जें स्वरूप मांडतात तें सर्वथैव चुकीचें आहे. पण त्यासाठीं महाभारतांतील

---

व्याख्यान २६ वें दि. २३ एप्रिल १९५१

संघर्षाचें खरें स्वरूप काय आहे हें समजणें आवश्यक आहे. मी माझ्या व्याख्यानमालेंत महाभारतांतील संघर्षाचें तें स्वरूपच सविस्तर मांडून दाखविलें आहे. भारतवर्षाचा इतिहास कसा उलगडावा हें यांतून दिग्दर्शित झालें आहे.

माझें प्रतिपादन अपूर्ण राहिलें आहे याची मला पूर्ण जाणीव आहे. पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांना धर्मसंस्थापनेच्या कार्यास कां प्रवृत्त व्हावें लागलें व आपल्या या कार्यासाठीं त्यांनीं कोणतें साधन वापरलें एवढ्याच गोष्टींचें पंचवीस व्याख्यानांत मी दिग्दर्शन केलें आहे. श्रीकृष्णांनीं तें कार्य कसें पूर्णावस्थेस नेलें व त्यांनीं धर्माची प्रतिष्ठापना केली म्हणजे काय केलें याचें मीं या व्याख्यानांत प्रतिपादन केलेलें नाहीं. थोडक्यांत या उपसंहारांत मी त्याचा आढावा घेणार आहे. पण मीं पत्करलेलें दायित्व तेवढ्यानें संपणारें नाहीं याची मला पूर्णपणें जाणीव आहे. प्रस्तुत व्याख्यानमाला मध्येंच तुटल्यासारखी वाटूं नये म्हणून फक्त मी येथें संक्षिप्त समालोचन करणार आहें. एक प्रकारें पुढच्या व्याख्यानमालेची ही नांदीच होय असें म्हटलें तरी चालेल. माझा विषय पूर्ण करावयास "भगवान् श्रीकृष्ण" या एकाच विषयावर मला आणखी इतकींच व्याख्यानें द्यावीं लागतील. समीपवर्ती भविष्यकाळांत हें घडून आलें तर माझें प्रतिपादन पूर्ण होईल. अशी एक दुसरी व्याख्यानमाला "श्रीकृष्णचरित्रा"वर देऊन मीं माझें प्रतिपादन पूर्ण करीन, एवढेंच येथें आश्वासन देऊन मी आतांपर्यंत झालेल्या व पुढें होणाऱ्या विषयाचें थोडक्यांत समालोचन करणार आहें.

श्रीमन्महाभारत हा आर्यांच्या जीवनशास्त्रावरील महान् ग्रंथ असून त्यांत भारतीय जीवनाच्या परमोच्चतेचें, अधःपतनाचें व पुन्हां परिस्थितीवर मात करून घडून आलेल्या पुनरुत्थानाचें महर्षि व्यासांनीं आपल्या दिव्य प्रतिभेनें दर्शन घडविलेलें आहे. महाभारताचा इतिहास हा नरनारायणांच्या विजयाचा इतिहास असून त्यांतील अधिनायक भगवान् श्रीकृष्ण हे पूर्णावतार आहेत; धर्माची संस्थापना, अधर्माचें विध्वंसन व साधूंचें परित्राण असें या

पूर्णावताराच्या कार्याचें त्रिविध स्वरूप आहे.ज्या ज्या वेळीं अधर्माचें उत्थान व धर्माची ग्लानि होते त्या त्या वेळीं श्रीकृष्णांसारख्या ईश्वरी शक्तीचा या जगांत संभव होतो. महाभारतकाळीं असें धर्माचें अध:पतन झालें होतें. पण पतन कळावयास त्याचें शुद्ध स्वरूप समजणें अवश्य आहे. महर्षि व्यासांच्या सूक्ष्मदर्शी प्रतिभेचा खरा विशेष हा आहे कीं, त्यांनीं धर्म अथवा भारतीयांच्या व्यक्ति-व समष्टिविषयक विकसनाचें परिपूर्ण स्वरूप महाभारतांत दाखवून त्याचें अध:पतन कसें झालें होतें हेंही दिग्दर्शित केलें आहे. रामायणांत फक्त विकसनाचेंच तेवढें स्वरूप दाखविलें आहे. महाभारताच्या शांतिपर्वांतही तें पूर्णपणें दिग्दर्शित केलें आहे. भीष्मांच्या तोंडून आर्य समाजाच्या व्यक्तिविषयक व समाजविषयक विकसनाच्या अंतिमाचें महर्षींनीं केलेलें दिग्दर्शन मी आपणांसमोर इतके दिवस मांडलें आहे.

## राज्यसंस्था नियंत्रित पाहिजे

कोणत्याही समाजाच्या विकसनाला अथवा अध:पतनाला राज्यसंस्थाच उत्तरदायी असते असा महाभारताचा सिद्धांत आहे.

**कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम् ।**
**इति ते संशयो मा भूत् राजा कालस्य कारणम् ।। ७९**

—महाभारत, शांतिपर्व अ. ६९

असें महाभारताचें म्हणणें आहे. राज्यसंस्था ही मानवसमाजांतील सर्व संस्थांचा आधार असून सर्व आश्रमांत गृहस्थाश्रम जसा श्रेष्ठ तशीच राज्यसंस्था सर्व संस्थांत श्रेष्ठ होय.समाजाचें धारण, पोषण व विकसन तिच्यावरच अवलंबून असतें. भारतीयांची राज्यसंस्था स्वतंत्र नसून ती नियंत्रित आहे. महाभारतानें तिचीं चार नियंत्रणें सांगितलेलीं आहेत. त्यांपैकीं पहिलें महत्त्वाचें नियंत्रण पौरजानपदांचें होय. पौर व नागर यांच्या स्वतंत्र समिति अथवा प्रतिनिधिमंडळें असून त्यांच्या संमतीविना राजाला कांहींही करतां येत नसे. प्रधानमंत्री अथवा युवराजाची नियुक्ति देखील प्रजांच्या या प्रतिनिधिमंडळाच्या संमतीनेंच झाली पाहिजे, असा शांति-पर्वाच्या ‘ राजधर्म ’ प्रकरणांत कटाक्ष असून मंत्रिमंडळानें ठरविलेले

निर्णय अंतिम मान्यतेसाठीं पौरजानपदांकडे पाठविले जात. पौरजानपदांकडे पुढील अधिकार असत : (१) पौरजानपद राज्याला वारस सुचवूं शकत. (२) असलेला वारस ते नाकारूं शकत ; व त्याच्या जागीं दुसरा बसवूं शकत. (३) कर ठरलेले होते पण विशिष्ट आपत्तीच्या प्रसंगीं राजाला ते वाढवावयाचे असल्यास पौरजानपदांची संमति घेऊन अनुनयपूर्वकच ते वाढवितां येत. राज्ययंत्राचें दुसरें मोठें नियंत्रण तपस्वी ब्राह्मणांचें असे. तिसरें नियंत्रण मंत्रिसत्तेचें व चवथें सर्वश्रेष्ठ नियंत्रण राजांचाही राजा असलेल्या धर्माचें असे. कर्तव्यविन्मुख राजाला दंड करावा असें महाभारताचें मत आहे. अशा नियंत्रित अवस्थेंत असणारे राज्यतंत्र समाजाच्या केवळ धारण–विकसनासाठींच असल्यामुळें त्याचें स्वरूप जोंवर शुद्ध राहील तोंवरच समाज राहूं शकेल. राज्यसंस्थेचें हें स्वरूप कलंकित करणाऱ्या, स्वार्थी ठरलेल्या व केवळ स्वतःच्या लहरीनुसार राज्य करणाऱ्या सुलतानाला राज्यावर बसण्याचा अधिकार तर नाहींच, पण जिवंत राहण्याचा देखील अधिकार नाहीं असें महाभारतांत स्पष्ट म्हटलें आहे. अनुशासन पर्वाच्या ६१ व्या अध्यायांत धर्मद्रोह करणाऱ्या, पापी सचिवसत्ता असलेल्या अनीतिमान राजाला ठार मारावें असें सांगितलें असून पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें प्रजांनीं तें राजयंत्र मोडून टाकावें, अगदीं संघटितरीत्या मोडून टाकावें असा स्पष्ट निर्देश आहे.

> अरक्षितारं हर्तारं विलोप्तारमनायकम् ।
> तं वै राजकलिं हन्युः प्रजाः संनह्य निर्घृणम् ।। ३२
> अहं वो रक्षितेत्युक्त्वा यो न रक्षति भूमिपः ।
> स संहत्य निहन्तव्यः श्वेव सोन्माद आतुरः ।। ३३
>
> —महाभात, अनुशासनपर्व अध्याय ६१

सारांश भारतीयांचें राज्यच काय पण साम्राज्य देखील लोकांनीं निवडलेलें असे असें महाभारताच्या आदिपर्वांत म्हटलें आहे. महाभारतकालीं हें राज्यतंत्र पूर्णपणें अधःपतित झालें असून त्याचीं सर्व नियंत्रणें गळून पडून तें अनियंत्रित, अधार्मिक, अनीतिमान् व स्वार्थी झालें होतें.

## व्यक्तिचित्रांतून दिसणारें अधःपतन

या अधःपतनाचें चित्र महर्षि व्यासांनीं महाभारतांतील व्यक्ति-चित्रांच्या रूपानें चित्रित केलें आहे. सर्वांचें मूळ जी तपस्वी संस्था तिचें अधःपतन द्रोणांच्या रूपानें महाभारतांत दृष्टोत्पत्तीस येतें. वसिष्ठांची व परशुरामांची तेजस्विता लुप्त होऊन सतीच्या वस्त्र-हरणप्रसंगीं लाचारीनें मौन स्वीकारून ब्राह्मण्याला अधम राज्य-सत्तेच्या संरक्षणाची ढाल व्हावें लागलें; इतकेंच नव्हे तर झोपलेल्या लोकांची कत्तल करण्यांत ते पुरुषार्थ मानूं लागले. अर्थात त्यांची नियंत्रक शक्ति संपली. सम्राट् जरासंधाच्या रूपानें धर्माऐवजीं पाशवी सामर्थ्य हेंच साम्राज्याचें प्रेरक ठरलें असें दाखविलेलें असून धृतराष्ट्र व दुर्योधनाच्या रूपानें महर्षि व्यासांनीं राज्यसंस्था अधम-पणाच्या अंतिम टोकावर येऊन कुलस्त्रियांच्या अब्रूची देखील तिला कशी चाड राहिली नव्हती हें स्पष्ट केलें आहे. कर्ण, शकुनि व दुःशासन ह्यांच्या रूपानें अमात्यसंस्था कशी पापिष्ठ झाली होती हें महर्षींनीं दाखविलें असून महत्त्वाकांक्षी पुरुष आत्मकेंद्रित व अहंकारी बनला म्हणजे त्याच्या सद्‌गुणांची माती होऊन त्याचें पतन कसें होतें व तो मानवतेचा भयानक संहारक व राष्ट्राचा विध्वंसक कसा ठरतो हें महारथी कर्णाच्या रूपानें महर्षींनीं सुस्पष्ट दाखविलें आहे. राजर्षि भीष्मांच्या रूपानें भव्य जीवन देखील समष्टिनिष्ठे-ऐवजीं व्यक्तिगत ध्येयनिष्ठेनें व्यापलें असलें तर तें दुराचाऱ्यांचें शेवटीं संरक्षक बनून कसें निर्माल्यवत् होऊन जातें हें महर्षींनीं दाखविलें असून भीष्म, विदुर व गांधारी यांच्या रूपानें सचिवसंस्था कशी दुर्बल झाली होती हें महर्षींनीं स्पष्ट केलें आहे. आत्यंतिक धर्मश्रद्धेंतून धर्माच्या हेतूऐवजीं त्याच्या अंगावर अधिक जोर दिला तर कसें कार्पण्य उत्पन्न होतें, हें महर्षींनीं युधिष्ठिराच्या रूपानें दिग्दर्शित केलें असून अशा कार्पण्याच्या नियंत्रणामुळें प्रचंड सामर्थ्य व महनीय पौरुष, साधीं नीतिमूल्यें संरक्षण करावयाच्या बाबतींत देखील कसें दुर्बल होऊन जातें हें भीम व अर्जुनाच्या व्यक्ति-चित्रांच्या रूपानें महर्षींनीं दाखविलें आहे. सभापर्वांतील द्रौपदीच्या

वस्त्रहरणाचा प्रसंग हें याचें उत्कृष्ट निदर्शन होय. तेजस्विनी द्रौपदी व राजमाता कुंती ह्या धर्मकार्पण्याचेंच बलिदान म्हणतां येतील. तात्पर्य महाभारतकाळीं राज्यसंस्था भ्रष्ट, सचिवसंस्था पापी, धर्म दुर्बळ, व तेजस्वी नि तत्त्वज्ञानी पुरुष अकर्मण्य किंवा निरुपयोगी झाले होते.

बलवान् म्हणेल तो धर्म व सत्ताधारी म्हणेल ती नीति अशी परिस्थिति उत्पन्न होऊन धर्म व तत्त्वज्ञान यांनीं सामर्थ्याला नियंत्रित करण्याऐवजीं सामर्थ्यच त्यांना नियंत्रित करूं लागलें. अधर्माचें अभ्युत्थान तें हेंच होय. हें संकट बाह्य आक्रमणाचें नसून अभ्यंतर आक्रमणाचें होतें. बाह्य आक्रमण शस्त्रांनीं परतवितां येतें व त्यासाठीं मनाची सिद्धता होणें सुलभ आहे. अभ्यंतर आक्रमण स्वकीयांचें असतें. तें नष्ट करावयास सर्व मानवी कोमल भावनांवर विजय मिळवून अंतःकरण वज्राप्रमाणें कठिण व समष्टि-जीवनाच्या आत्यंतिक कल्याणाशीं पूर्णपणें एकरूप करावें लागतें. अपूर्ण मानवी जीवनाच्या मर्यादेंत ही गोष्ट बसूं शकत नसल्या-मुळें पूर्णावताराशिवाय हें कार्य कोण करूं शकणार?

## पूर्णावतार श्रीकृष्ण व त्यांचें कार्य

भगवान् श्रीकृष्ण सर्व प्रकारच्या मानवी अपूर्णतेच्या इतके वर आहेत कीं, पूर्णता व श्रीकृष्ण हे शब्द जणूं काय एकमेकांचे पर्याय-वाचक आहेत. श्रीमद्‌भगवद्‌गीतेंत सांगितलेल्या स्थितप्रज्ञाच्या महान् कर्मयोगाचें प्रात्यक्षिक म्हणजे गीतेच्या जनकाचा स्वतःचाच जीवनपट होय. आपल्या जीवनाचा हेतु सांगतांना भगवान् स्वतःच म्हणतातः—

धर्माच्या संरक्षणासाठीं व संस्थापनेसाठीं त्या त्या वेषांनीं व रूपांनीं मी त्रैलोक्यांत जेथें आवश्यक असेल तेथें जन्म घेऊन प्रत्येक युगायुगांत परिवर्तनाच्या क्षणीं धर्ममर्यादेची स्थापना करतों. प्राणिमात्रांच्या कल्याणावांचून माझ्या जन्माचा दुसरा हेतु नाहीं. जे धर्माचा लोप करणारे असतील ते मला वध्य आहेत. धर्माच्या स्थापनेसाठीं मी ही प्रतिज्ञा केली आहे. ज्ञान, सत्य, विकारावर

वजय मिळविणें, पावित्र्य, कर्तव्यनिष्ठा, अकार्याविषयीं घृणा, मनाचें वैभव, धैर्य व क्षमा ज्या ठिकाणीं नांदते तेथेंच मी रमतों. ही प्रतिज्ञा मानवी हृदयांतील स्वपरभावांना पूर्णपणें पराभूत करणारी आहे. भगनान् श्रीकृष्णांना अधर्माचें अभ्युत्थान करणाऱ्या स्वकीयांनाच कंठस्नान घालावें लागलें आहे. आर्यधर्माचें कार्पण्य नष्ट करून धर्मनिष्ठ व्यक्तींच्या अंतःकरणांत धर्माची तेजस्वी ज्योत पाजळण्यासाठीं त्यांनीं गीताधर्माचा उपदेश केला. गीतेचें तत्त्वज्ञान इतकें परिपूर्ण आहे कीं, कोणत्याही नव्या सामाजिक रचनेच्या पुरस्कर्त्याला त्याच्या आश्रयावांचून आपल्या विचारांची शास्त्रशुद्ध बैठक निर्माणच करतां येणार नाहीं. व्यक्तिगत व सामाजिक जीवनाचीं भारतीय मूल्यें व त्यांना असलेला अनुभवसिद्ध तत्त्वज्ञानाचा शाश्वत पाया गीताग्रंथानें दिग्दर्शित केला आहे. पण नुसतें तत्त्वज्ञान सांगून जगतांतल्या मदांध सत्ता वळत नसतात. धर्माची प्रतिष्ठापना मानवतेस स्थिर स्वरूपांत करावयाची असली तर प्रथम राज्यसंस्थेचें शुद्धीकरण अत्यंत आवश्यक ठरतें. भगवान् श्रीकृष्णांना राज्यसंस्थेच्या शुद्धीकरणासाठीं प्रथम स्वतःच्या घरापासूनच प्रारंभ करावा लागला. त्यांचा मामा कंस यानें परकीय मगधांच्या साम्राज्यसत्तेशीं संबंध जोडून यादवांचें गणराज्य पार भंगून टाकलें व पाशवी सामर्थ्यावर अधिष्ठित अशी आपली एकतंत्री सत्ता स्थापन केली. भगवान् श्रीकृष्णांनीं भरसभेंत त्याचा वध करून सत्तेचीं सूत्रें स्वतःच्या हातीं न घेतां त्या गणराज्याची पुनश्च प्रतिष्ठापना केली. प्रजा राजाचा वध करूं शकते व नेता सत्तासूत्रापासून अलिप्त राहूं शकतो ही गोष्ट तत्कालीन साम्राज्यसत्तांना व राज्यसत्तांना अभिनव होती. त्यामुळें जरासंधाच्या नेतृत्वाखालीं एकत्रित झालेल्या सर्व अनियंत्रित राज्यसंस्थांचे व राज्यसंघांचें श्रीकृष्णांशीं दारुण वैर उत्पन्न झालें. भगवान् श्रीकृष्णांनीं या बहुसंख्य नृशंसांचें आव्हान पत्करलें व आपद्धर्माच्या अवलंबावांचून शाश्वत धर्माचें संरक्षण अशक्य आहे हें ओळखून "शठे शाठ्यं समाचरेत्" व "निकृत्याभिचरन् वध्यः" या नीतीचा पुरस्कार करून या सत्तांचा अंत घडवून आणला.. जरासंध हें सर्व सत्तांचें केंद्र असल्या-

मुळें भीमाकरवीं त्यांनीं द्वंद्वयुद्धांत त्यास ठार करून राजांचा संघ फोडला. नंतर एकेका सत्तेला गांठून अवश्य होतें त्याला ठार मारलें व उरलेल्यांना स्वतःच उत्पन्न केलेल्या पांडवांच्या नव्या धर्म-साम्राज्याच्या पूर्ण नियंत्रणाखालीं आणलें. या नव्या धर्ममय राज्य-तंत्राच्या विरोधकांच्या अंतःकरणांत धाक उत्पन्न करण्यासाठीं चेदि-राज शिशिपालाचा त्यांनीं भरसभेंत वध केला. पांडव परिपूर्ण नाहींत हें त्यांना माहीत होतें. पण त्यांच्या संघटित नेतृत्वाची (Collective leadership) वस्तुस्थिति त्यांना मान्य झाली. पांड-वांचा नेता युधिष्ठिर धर्माचें नियंत्रण स्वभावतःच मानणारा असून भीमार्जुनांच्या प्रचंड शक्ति त्याच्या नेतृत्वाखालीं असल्यामुळें त्या उन्मादी व उन्मार्गगामी नव्हत्या. म्हणून श्रीकृष्णांनीं धर्मसंस्थापनेचें साधनयंत्र या नात्यानें पांडवांचा उपयोग करून घेतला. यादवांचें गणराज्य व पांडवांचें संघटित नेतृत्वही भगवान् श्रीकृष्णांच्या धर्म-संस्थापनेच्या कार्यांतील दोन अत्यंत महत्त्वाचीं साधनें होतीं. उत्तरायुष्यांत श्रीकृष्णांना असें आढळून आलें कीं, त्यांपैकीं यादवांची सत्ता अखंड मिळालेल्या विजयामुळें व आक्रमणाचें भय पूर्णपणें नष्ट झाल्यामुळें मदांध व अहंकारी झालेली असून आपलें नियंत्रण निघून गेल्यानंतर जरासंध व कौरव यांच्याचप्रमाणें ती सत्ताही शाश्वत धर्ममूल्यांची भक्षक बनल्यावांचून राहणार नाहीं. मर्यादा-पुरुषोत्तम रामचंद्र गेल्यावर वानरांच्या धर्मरक्षक सामर्थ्याचें धर्म-भक्षक आक्रमकांत रूपांतर झाल्याचें त्यांनीं स्वतःच अनुभविलें होतें. त्यांच्यासमोर मोठाच पेंच उत्पन्न झाला व तेथेंच त्यांचें देवत्व खरें पणाला लागलें; कारण येथें प्रश्न जरासंधदुर्योधनादि लांबच्या लोकांचा नसून प्रद्युम्न, सांब यांच्यासारख्या स्वतःच्या मुलांबाळां-चाच होता; पण भगवान् श्रीकृष्णांचें खड्ग व चक्र शाल्व–शिशु-पालांच्या बाबतींत जितकें प्रभावी ठरलें तितकेंच तें स्वतःच्या मुलांच्या बाबतींत देखील प्रभावी ठरल्यावांचून राहिलें नाहीं. धर्म-सत्तेचें अधिराज्य जे मानतील ते आपले व तद्विरुद्ध सारे उन्मार्ग-वर्ती, ते आपल्या शस्त्राचें लक्ष्य होत ही त्यांची धारणा स्वतःच्या मुलांबाळांच्या बाबतींत देखील तितकीच. उग्र राहिली. आपणच

उत्पन्न केलेली यादवसत्ता त्यांनीं नामशेष करून टाकली. श्रीकृष्णांच्या चरित्राची खरी भव्यता त्यांच्या या महनीय त्यागांत आहे. जगाच्या इतिहासांत असें महनीय विभूतिमत्त्व मागें कधीं झालें नाहीं व त्यानंतरही आजवर दृष्टोत्पत्तीस आलें नाहीं. महाभारताच्या व भगवान् श्रीकृष्णांच्या जीवनकार्याचा एकच महान् संदेश आहे व तो म्हणजे शाश्वत कल्याणमार्गाच्या पथिकाला अंतीं यश निश्चित ठेवलें आहे. व्यक्तित्व व अस्मिता पूर्णपणें मानवतेशीं एकरूप केल्यावांचून जगत्कल्याणाचा विचार कोणीही करूं शकत नाहीं व त्यावांचून उत्पन्न झालेल्या योजना व नियोजनें मानवतेच्या विध्वंसक ठरल्यावांचून राहणार नाहींत. आजही आपण हेंच अनुभवीत आहोंत. जग विनाशाच्या गर्तेकडे ओढलें जात आहे. जड भौतिक वाद व त्यांतून निर्माण झालेल्या समाजसत्तावादासारख्या व साम्यवादासारख्या अनेक योजना संहाराच्या भस्मासुरांत परिणत होत आहेत, याचें खरें कारण हेंच होय. पण भारतीय संस्कृतीच्या विकसनांत अस्मिता व तिचें क्षेत्र वाढविण्याचीं साधनें यांचा विचारही नाहीं. श्रीकृष्णांनीं गीतातत्त्वज्ञानाच्या रूपानें तो मार्ग दाखविला आहे. चैतन्यवादी विश्वात्मधारणेच्या भारतीय राष्ट्रानें जगाचें वैषम्य ओळखून समर्थ, संघटित व शत्रूच्या अंतःकरणांत धाक उत्पन्न होईल इतकें पराक्रमी झालें पाहिजे, हाच माझ्या मतें महाभारताचा सन्देश आहे.

## एक आक्षेप

श्रीकृष्णांच्या चरित्राचा व विशेषतः त्यांनीं घडवून आणलेल्या संहाराचा विचार करतांना नेहमींच एक आक्षेप घेतला जातो. तो असा कीं, महाभारतीय युद्धांत जो भयानक संहार घडून आला त्यामुळें कर्त्या पुरुषांची एक सबंध पिढीच्या पिढी कापली जाऊन राष्ट्राला दुबळेंपण आलें व अलेक्झांडर दि ग्रेटची स्वारी भारतवर्षावर झाली त्या वेळीं त्याला अडथळा करावयास कोणीच उरलें नाहीं. पण हें साफ खोटें आहे. श्रीकृष्णांचा काळ व अलेक्झांडरच्या स्वारीचा काळ यांतील कित्येक शतकांचें अंतर लक्षांत घेतलें तर

हा आक्षेप निर्मूल ठरतो. श्रीकृष्णांनीं धर्माचें जें पुनरुज्जीवन केलें त्याच्या परिणामाचें अलंकारिक वर्णन राजा परीक्षिताच्या कलिविजयाच्या व कलीला हद्दपार करण्याच्या कथेच्या रूपानें भागवत पुराणांत केलेलें आहे. राजा परीक्षितापासून तर नवनंदांपर्यंत भारतीय राजवंश जे अखंड चाललेले आढळून येतात ते काय सिद्ध करतात ? हेंच कीं, भारतीय राष्ट्रांतील राज्ययंत्रें या युद्धानें मोडलेलीं नव्हती. तीं मोडणार कशीं? कारण कीं त्यांच्या वारसांना पांडवांनीं मुळींच नष्ट केलेलें नसून त्यांनाच राज्यावर बसवून त्यांनीं श्रीरामचंद्रांच्या आदर्श राज्यपद्धतीचेंच श्रीकृष्णांच्या नेतृत्वाखालीं पुनरुज्जीवन केलें होतें. अलेक्झांडरच्या काळीं भारतीय राज्ययंत्र दुबळें झालें होतें ही कल्पनाही अत्यंत चुकीची आहे. जर भारतीय राज्ययंत्र अलेक्झांडरच्या काळीं खरोखरीच दुबळें झालें असतें तर अलेक्झांडरनें हिन्दुस्थान सोडून मायदेशीं प्रयाण केलें नसतें. त्याच्या प्रयाणाचें कारण त्याच्या सैनिकांनीं देश सोडून फार दिवस झाले असल्यामुळें स्वदेशी जाण्यासाठीं आग्रह धरला होता हें सांगण्यांत येतें. पण तें खरें नसून भारतीय गणराज्याच्या सैनिकांकडून या ग्रीक सैनिकांची दारुण ससेहोलपट चालली होती त्यामुळें त्यांचा धीर खचला होता हें आहे. डॉ. जयस्वाल यांनीं आपल्या 'हिंदु पॉलिटी' या ग्रंथांत या विषयावर अतिशय उत्कृष्ट प्रकाश टाकलेला आहे. स्वतः ग्रीक लेखकांनींच हल्लींच्या लाहोर नि अमृतसर यांच्या परिसरांत वस्ती करून राहिलेल्या कठगण संघासंबंधानें जें लिहिलेलें आहे तें हा गैरसमज नाहींसा करण्यास पुरेसें आहे. कठगणांतील लोक धैर्याबद्दल अत्यंत विख्यात असून ते युद्धकलेंत अत्यंत निष्णात आहेत असें त्यांनीं म्हटलें असून आंभी व पोरस या दोन राजांचा पराभव शिकंदरापूर्वीं त्यांनीं दोनदां तरी केलेला होता. भारतांत उल्लेखिलेल्या व्यूहरचनेची या लोकांना चांगलीच माहिती असून शिकंदराशीं त्यांनीं शकट व्यूहानें आपल्या सैन्याची रचना करून युद्ध केलें होतें. ग्रीक लोकांचा विजयाचा उन्माद या शकट व्यूहानें इतका जिरवला कीं शिकंदराच्या सैनिकांच्या अंतःकरणांत तेथूनच न्यूनगंड उत्पन्न झाला. या गणांतील

स्त्रिया पतिनिधनोत्तर सती जात असत, इतकेंच नव्हे तर त्यांच्या नैतिक कल्पना अत्यंत उच्च होत्या. त्यानंतर बिआस नदीच्या काठीं असलेल्या योधेयगणांच्या हातून शिकंदराच्या सैन्याला इतका मार खावा लागला कीं तेथूनच शिकंदराच्या माघारीला सुरुवात होऊन हिंदुस्थानच्या भानगडींत न पडतां त्यानें ग्रीसकडे प्रयाण केलें. डॉ. जयस्वाल लिहितात :–

When Alexander reached the Hyphasis or Beas, he heard that beyond that river, the country was " exceedingly fertile and the inhabitants were good agriculturists, brave in war and living under an excellent system of internal government; for the multitude was governed by the aristocracy, who exercised their athority with justice and moderation. (Arrian Bk. V 25). The description tallies with Kautilya's Varttasastropajivinah. They were prosperous by agriculture and kept themselves ready for war, fully depending on their own sword. It is unfortunate that the State has been left unnamed. Actual government vested in what the Greeks called an aristocracy. But their parliament consisted of five thousand representatives. The find-spot of yaudheya coins sugges s that this unnamed State on the Beas was probably of the Yaudheyas. Each member of parliament supplied one elephant to the State army. These Indians according to Arrian ( V. 25 ), had elephants in greater number and of superior size and courage. As Alexander himself put it, the Macedonians had been fighting only against small numbers, " *Now for the first time* " they had to face really large armies. And they refused to move an inch forward amongst the nations whose very name, according to Alexander, filled his soldiers with terror. There was this unnamed Republic which covered the land on the other side of the Beas. There was also the great army of the Nandas waiting to give reception to the Macedonian, but the immediate

cause of alarm was the prospect of meeting the Republic beyond the river. Alexander's army "now began to lose heart" and "they began to hold conferences" where people "positively asserted that they would follow no further." It was from the doors of the unnamed Republic that the campaign of Alexander assumed the form of retreat.

ज्या वेळीं अलेक्झांडर बिआस नदीच्या तीरावर आला त्यावेळीं त्याला असें कळलें कीं, त्या नदीच्या पलीकडे असलेला प्रदेश अत्यंत सुपीक असून तेथील लोक उत्तम शेतकरी, धैर्यशील योद्धे, व रणपंडित असून त्यांची अंतर्गत राज्यव्यवस्था अत्यंत उत्कृष्ट होती. तेथील राज्यतंत्र न्यायनिष्ठ व उत्कृष्ट होतें. या राज्यतंत्राचें नांव दुर्दैवानें ग्रीकानें दिलेलें नाहीं. पण तें गणराज्य असून त्यांच्या संसदेमध्यें पांच हजार लोकप्रतिनिधि नांदत असत. तेथें जीं नाणीं सांपडलीं आहेत, त्यावरून हें अनामिक राज्य यौधेय गणसंघाचें असलें पाहिजे. संसदेचा प्रत्येक सभासद राज्यतंत्राचे सैन्यांत एक हत्ती पुरवीत असे. अलेक्झांडरनें स्वतःच असें म्हटलें आहे कीं, आतां-पर्यंत ग्रीक सैन्याला अल्पसंख्य सैन्याशीं लढण्याची संवय होती. या यौधेय गणसंघाशीं त्याची रणांत जी गांठ पडली तीच पहिल्या प्रथम मोठ्या सैन्याशीं गांठ पडली. या यौधेयांचें सामर्थ्य इतकें प्रचंड होतें कीं त्यांचें नांव ऐकल्याबरोबर अलेक्झांडरचें जगज्जेतें सैन्य भीतीनें थरथरां कांपूं लागलें. त्यांनीं रेसभर देखील पुढें जाण्याचें नाकारलें. बिआसच्या दुसऱ्या तीरावर असेंच एक प्रबल गणराज्य होतें. व त्यानंतर मगधांच्या नंद साम्राज्याचा सैन्यसागर मॅसिडो-नियाच्या सैन्याचें स्वागत करण्याकरितां सिद्ध होताच. पण अलेक्झांडरच्या सैन्याच्या योद्ध्यांचा धीर सुटण्याचें खरें कारण हें गणराज्यच होय. ग्रीक सैन्याचें धैर्य पार खचलें. तें वारंवार आपल्या सभा बोलावूं लागले व अलेक्झांडरला साथ देण्याचें त्यांनीं साफ नाकारलें.; या अनामिक गणराज्याशीं गांठ पडल्यापासूनच जगज्जेत्या शिकंदराच्या पलायनशौर्याला प्रारंभ झालेला आहे. त्यानंतर क्षुद्रक गणसंघानें त्याचा चांगलाच पराभव केला. या

क्षुद्रक गणसंघाची एक लक्ष फौज होती. तिच्याशी गांठ पडतांच त्यांची काय अवस्था झाली ? याचें पुढील वर्णन पहा :—

" The Macedonians lost their heart at the prospect of meeting this army." "When the Macedonians found that they had still on hand a fresh war in which the most war-like nations in all India would be their antagonists. They were struck with an unexpected terror, and began again to upbraid the King in the language of sedition."

या सैन्याशीं गांठ पडतांच ग्रीकांचा धीर सुटला. ज्या वेळीं आधींच खच्ची झालेल्या त्यांना पुन्हां नवें युद्ध करावें लागणार असें दिसून आलें व हिंदुस्थानांतील प्रत्येक नव्या पदन्यासांत हाच भीषण प्रसंग येणार अशी त्यांची खात्री पटली तेव्हां त्यांच्या अंतःकरणांत कल्पनातीत भय उत्पन्न झालें व ते आपल्या नेत्याला दूषणें लावूं लागले. 'एकाकिभिः क्षुद्रकैर्जितम्' असें भगवान् पतंजलि आपल्या महाभाष्यांत या प्रसंगाचें वर्णन करतात. शेवटीं अलेक्झांडरनें त्यांच्याशीं तह केला. त्यासाठीं या गणराज्याकडून शंभर प्रतिनिधि आले होते. त्यांच्या स्वागतार्थ शंभर सुवर्ण सिंहासनें सिद्ध केलीं असून त्यांच्या भोंवतालीं हिरेमाणकें जोडलेले सोनेरी पडदे सोडले होते असें वर्णन आहे. महाभारतानंतर उत्पन्न झालेल्या दुबळेपणाचा हा पुरावा आहे काय ? उलट त्यानंतर लवकरच उत्पन्न झालेल्या भारतसम्राट् चंद्रगुप्तानें ग्रीक क्षत्रपाचा इतका खरपूस समाचार घेतला कीं, धनकोशाबरोबरच आपलें कन्यारत्नही त्या मदांध क्षत्रपाला मौर्य चंद्रगुप्ताच्या चरणांवर समर्पण करावें लागलें. हे पुरावे हिंदु राष्ट्राच्या दुर्बलतेचे खास नाहींत. श्रीकृष्णांनीं स्थापन केलेल्या धर्मचक्रांत तपस्विसत्तेचें वाढलेलें तेजही मौर्यांच्या काळापर्यंत तसेंच तळपत असलेलें दिसतें. तक्षशिलेच्या एका प्राध्यापकाला अलेक्झांडरनें भेटावयास येण्याविषयीं निरोप पाठविला पण त्यानें येण्याचें नाकारलें. त्यावर अलेक्झांडरकडून त्याला असा निरोप गेला कीं, देवपुत्र अलेक्झांडर तुला बोलवीत आहे. न आल्यास शिरच्छेद होईल. त्यावर त्यानें इतकेंच उत्तर दिलें कीं, "अलेक्झां-

डरइतका मीही देवपुत्र आहें व शिरच्छेदाचें उत्तर द्यावयास नंद राजांचें खड्ग सिद्ध आहे." सुवर्णाच्या राशींना तुच्छ समजणारे व लावण्याकडे पाठ फिरविणारे भस्मांकित विरागी पुरुष फक्त भारतवर्षांतच आढळल्याचें ग्रीक प्रवाशानें लिहून ठेवलें आहे. मगधांत राज्यक्रांति करून व मौर्य चंद्रगुप्तांचें साम्राज्य स्थिर करून शेवटीं हिमालयांत निघून जाणारा आर्य चाणक्य तर देदीप्यमान तपस्येचा मूर्त आदर्शच आहे. तात्पर्य श्रीकृष्णांनीं उत्पन्न केलेलीं जीवनमूल्यें व राष्ट्रीय सामर्थ्य त्यांच्यानंतर दोन हजार वर्षेंपर्यंत टिकून होतीं. कोणत्याही तत्त्वज्ञानाला इतकें स्थैर्य व वस्तुस्थितीला इतकें जीवन प्राप्त झाल्याचें उदाहरण जगाच्या इतिहासांत तरी दुसरें एकादें दाखवितां येईल काय ? शिवाय या संस्कृतीची पचनशक्ति इतकी जबर आहे कीं, येथें राहिलेले ग्रीक वैष्णव संप्रदायांत विलीन होऊन गेले. त्यांचे स्मृतिस्तंभ अजूनही भेलसासारख्या ठिकाणीं पहावयास सांपडतील. ग्रीक म्हणून त्यांचें नांव निशाण देखील भारतांत शिल्लक राहिलें नाहीं. मग राष्ट्रीय अधःपात कां झाला असेल ? श्रीकृष्णांचें तत्त्वज्ञान नि कार्य आपण विसरलों म्हणून असें माझें त्याला उत्तर आहे. हें तेजस्वी तत्त्वज्ञान मारण्याचा पद्धतशीर प्रयत्न गौतम बुद्धानें केला.

## अधःपाताला बुद्ध जबाबदार

आपल्या क्षणभंगुरवादाच्या व शून्यवादाच्या तत्त्वज्ञानानें गौतम बुद्धानें गीतोपदिष्ट वैदिक तत्त्वज्ञानावर आघात करून जीवनाचा नैराश्यवादी दृष्टिकोन भारतीय राष्ट्राला दिला. अलीकडे इतिहासांत कालखंड ही काय चीज असते याची कल्पना नसलेले कित्येक सर्वोदयवादी विद्वान् गीतेंत ब्रह्मनिर्वाण असा शब्द असल्यामुळें गीताकारांनीं वैदिक तत्त्वज्ञानांतील ब्रह्मवाद व बुद्धाचें निर्वाण यांचा समन्वय साधला असल्याचें प्रतिपादन करूं लागले आहेत ! बुद्धाचें पिशाच्च जागविण्याचा हा प्रयत्न वेडपट आहे. निर्वाण शून्यवादी असून ब्रह्म सत् आहे. शिवाय मागाहून कित्येक शतकांनीं जन्म पावलेल्या बुद्धाच्या तत्त्वज्ञानाचा गीताकारांना समन्वय घाला-

वयास लावणें कोणत्या शास्त्रबुद्धीचें लक्षण समजावयाचें? पण आंतल्या आवाजावर भिस्त ठेवणारे नेहमीं सुसंगत तर्कशास्त्राच्या बाहेरच असावयाचे ! असो. गौतम बुद्ध नुसतें हें तत्त्वज्ञान सांगून राहिला नाहीं. त्याच्या प्रसाराचा व गीतोपदिष्ट वैदिक धर्माच्या विध्वंसनाचा त्यानें पद्धतशीर प्रयत्न केला. बुद्ध स्वत: गणराज्यांत जन्म पावलेला असल्यामुळें व तो राहत असे त्या परिसराभोंवतीं सर्व गणराज्य असल्यामुळें व गणराज्यपद्धतींत तो चांगलाच रुळलेला असल्यामुळें गणराज्याच्या पद्धतीवर त्यानें आपले भिक्षु व बौद्ध संघ व धर्मसंघ स्थापन केले. जातककथांतून व बौद्धवाङमयांतून याला हवे तितके पुरावे मिळतात. वैदिक धर्मांत संसारांतून खऱ्या अर्थानें निवृत्त झालेल्यांनाच केवळ विशिष्ट ज्ञानमय जीवन व्यतीत करण्याची कामगिरी असलेल्या समाजरचनेंतील विशिष्ट वर्णालाच सांगितलेली 'संन्यास दीक्षा' त्यानें समाजांतील सर्व थरांना मोकळी ठेवून कर्मयोग्याचा क्षात्रधर्म व प्रवृत्तिमार्ग समाजांतून पद्धतशीरपणें ठार मारला. संघांत भिक्षु होऊन जे येत ते वैराग्यसंपन्न मुळींच नसत. भिक्षूंबरोबरच भिक्षुणीही संघांत भरती होऊन अनाचार वाढले. कांहीं थोडे ज्ञाननिष्ठ नैराश्यपूर्ण निर्वाणवादी बनले तर उरलेले बहुसंख्याक अज्ञ, आयते जगणारे, व्यक्तिसुखवादी व कमालीचे संकुचित मनोवृत्तीचे भोगवादी बनले. अहिंसा, सत्य इत्यादि अंगांवर विशेष जोर देऊन त्यानें साधनांचेंच स्तोम माजविलें खरें पण लोककल्याण व तत्त्वज्ञान यांचा या साधनमार्गाशीं कांहींच संबंध नव्हता. त्यानें ठिकठिकाणीं धर्मसंघ स्थापन करून गणराज्यांचीच पद्धत त्या संघांना लावून त्यांची एक भव्य संघटना निर्माण केली, व त्या संघटनेच्या द्वारें धर्मचक्राच्या मार्गानें एकसूत्री असे ब्रह्म व क्षत्र यांच्या विनाशाचें यंत्र उभारलें. काल्पनिक वैषम्याच्या परिभाषेनें खालच्या समाजांतील पुष्कळच अनुयायी त्यानें ओढले व तेथून या वैदिक तत्त्वज्ञानाचा अपकर्ष होऊन भारताच्या दुबळेपणाच्या व पारतंत्र्याच्या कालखंडास प्रारंभ झाला.श्रीशंकराचार्य, कुमारिलभट्ट यांच्यासारखे तत्त्वज्ञानी त्याचें खंडन करावयास पुढें सरसावले, पण बुद्धाच्या तत्त्वज्ञानाचा

भारतावरील परिणाम कधींही समूळ नष्ट झाला नाहीं. आजही नैराश्यवादी दृष्टिकोनाचा बुद्धमतसंप्रदाय राजकीय क्षेत्रापासून तर तत्त्वज्ञानापर्यंत सर्वत्र आपला प्रभाव गाजवीत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येईल. एका बाजूला गीतेनें वर्णन केलेल्या आसुरी संपत्तीचे प्रतिनिधि असलेले मार्क्सचे जडवादी सांप्रदायिक व दुसऱ्या बाजूला बुद्धाच्या दृष्टिकोनाचे सर्वोदयी समर्थक यांच्या तावडींत आजही हिंदुसमाजाची दामटी वळत आहे. बुद्धाच्या या सांप्रदायिकांनीं राष्ट्राला आत्मप्रत्ययापासून वंचित करून त्यांच्यांत कमालीचा दुबळेपणा आणला व दुराचाऱ्यांना संरक्षणाची ढाल मिळवून दिली असली तर मार्क्सच्या जड भौतिकवादी अनुयायांनीं प्रत्येक पतनाला शास्त्राचा आधार मिळवून देण्याची खटपट चालविली आहे! ब्रह्म चैतन्यवादी व कठोर कर्मयोगाची दीक्षा देणारे भगवान् श्रीकृष्णांचें तत्त्वज्ञान व तें आत्मसात् करून संघटित होणारा सामर्थ्यसंपन्न समाजपुरुष यावांचून या परिस्थितींतही राष्ट्रीय पुनरुत्थानाचा दुसरा मार्ग नाहीं. श्रीकृष्ण ज्यांचे मार्गदर्शक नि गीता ज्यांचा राष्ट्रीय तत्त्वज्ञानाचा महनीय ग्रंथ त्यांना मॉस्कोपासून अथवा शाक्यमुनीपासून तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें व जीवनाच्या दृष्टिकोनाच्या दृष्टीनें कांहींही उसनवारी करण्याचें कारण नाहीं. फक्त त्यांनीं दृष्टि साफ करून आपण व आपली परंपरा ओळखण्याची मात्र सिद्धता ठेविली पाहिजे.

## जडवादाचें पर्यवसान

मी इतके दिवस जी व्याख्यानमाला दिली तिच्यांतील माझा खरा हेतु भारतीय राष्ट्राच्या आत्म्याचें स्वरूपदर्शन करविण्याचा होता. भारतीय द्रष्टयांनीं समाजजीवनाच्या प्रगतीच्या व परागतीच्या अंतिमांचें दिग्दर्शन करीत असतां कृतयुगाच्या कल्पनेनें जसें प्रगतीचें तसें कलियुगाच्या कल्पनेनें परागतीचें अथवा अधःपतनाचें चित्रण केलें आहे. आजच्या मानव समाजाची अवस्था कोणत्या श्रेणींतील आहे असें जर मला विचारलें तर मी असें म्हणेन कीं, भारतीय समाजशास्त्रज्ञ ज्याला कलियुगाची अवस्था म्हणतात त्या तमोयुगांत आजचा मानव समाज नांदत असून आजचें भारत तर

त्यांत अग्रगण्य ठरलें आहे असें म्हणावें लागेल. भारतीय द्रष्ट्यांच्याच शब्दांत आजच्या अवस्थेचें वर्णन "चोरप्राया जनपदाः हीनसत्त्वमराजकम्" असें करतां येईल. उदात्त ध्येयघोषांच्या नांवाखालीं समर्थांचा नागडा स्वार्थ तिसऱ्या महायुद्धाची भीषण आपत्ति मानवतेवर आणूं पहात आहे. पहावें तेथें पशुत्वाच्या ताण्डवावांचून दुसरें कांहीं दृष्टीसच पडूं नये अशी वस्तुस्थिति उत्पन्न झालेली आहे. आजच्या जगानें जीवनाचा जडवादी दृष्टिकोन अंगिकारलेला आहे व जडवादी दृष्टिकोनाचें पर्यवसान वाढत्या पशुत्वावांचून दुसऱ्या कशांतच होऊं शकत नाहीं. जडवादी दृष्टिकोनांतून उत्पन्न झालेल्या लोकतंत्र सत्तांनीं अथवा खरें म्हटलें तर लोकतंत्राच्या नांवाखालीं मूठभर भांडवलवादी सत्ताधीपांनीं बहुसंख्य जनतेला पिळवणुकीनें जीवन अशक्य करून टाकलें म्हणून त्यांच्यावर कम्युनिझमचा तोडगा काढण्यांत आला. पण तो देखील पूर्णपणें जडवादीच असल्यामुळें त्याचेंही पर्यवसान जीवनांत पशुतेचें ताण्डव माजण्यांतच झालें. किंबहुना भांडवली सत्तेचें पशुत्व देखील या साम्यवादी व क्रांतिवादी पशुत्वाहून बरें; कारण त्यांत अकार्याचा मनाला थोडा संकोच वाटणें तरी शक्य कोटींतलें आहे. पण कम्युनिझमनें पशुत्व, अनीति, सांस्कृतिक अधःपतन व पाप यांना शास्त्राच्या पार्श्वभूमीचा पुरवठा करून या गोष्टींविषयींचा मनांतला संकोच देखील नष्ट करण्याची व्यवस्था केलेली आहे. विरोधविकासवादी तत्त्वज्ञानाचें थोतांड उभारून कम्युनिझमनें विरोधावांचून प्रगतीच अशक्य असा समाजजीवनांत सिद्धांत मांडून रक्तपात, अकारण भयानक स्वरूपाचा रक्तपात, संहार व प्रलय यांना इतिकर्तव्यतेचें स्वरूप दिलें. सृष्टीचें मूलतत्त्व गतिमान् असतां व त्यावरून समाजजीवन फक्त गतिमान् आहे येवढेंच सिद्ध होत असतां ते प्रगतिमान् असल्याचा अशास्त्रीय सिद्धांत पुढें करून खोटा आशावाद त्या संहाराची पार्श्वभूमि म्हणून निर्माण केला व अंतःकरणांतील पशुत्वावर कोणताही तोडगा न काढतां फक्त अराज्यवादाची गोंडस कल्पना पुढें मांडून इस्लामच्या स्वर्गकल्पनेचें अनुसरण केलें. स्वर्गाच्या आशेनें इस्लामच्या वधवादानें एकवार शतकानुशतकें पृथ्वीवर मानवी रक्ताचे

पाट वाहविले. आतां अराज्यवादाच्या खोट्या आशावादानें कम्युनिस्टांच्या वधवाद पुन: एकदां आग व रक्तपात यांचें भीषण थैमान् जगभर घालूं पहात आहे.

## महाभारताचा संदेश

कम्युनिस्टांचा नेता स्टालिन आतां वृद्ध झालेला आहे. लेनिनच्या मृत्यूनंतर त्याच्या अनुयायांचें जें झालें तेंच स्टालिनच्या मृत्यूनंतर त्याच्याही अनुयायांचें होईल. वेगवेगळे संप्रदाय आजच निघूं लागलेले पाहून आपल्या डोळ्यांदेखत स्वत:ची कल्पना जगावर लादण्याची स्टालिनला घाई झालेली असून त्यासाठीं तो तिसरें महायुद्ध जगावर लादूं पहात आहे, ही राजकीय विचारवंतांची कल्पना पुष्कळच अंशीं बरोबर आहे. तात्पर्य, एका जडवादी क्रियेची ही जड साम्यवादी प्रतिक्रिया तिच्याहून अधिक हिंस्त्र व भीषण आहे. जगांत मांगल्य नांदायला मनुष्य, पशुत्वावर विजय संपादन केलेला संयमशील मनुष्य उत्पन्न होण्याची आवश्यकता आहे. अंत:करणाच्या विकसनाचा मार्ग सांगणारें स्थितप्रज्ञदर्शन सांगणाऱ्या भगवद्गीतेच्या दृष्टिकोनावांचून असा मनुष्य निर्माण होणें दुरापास्त आहे. पण खास भगवद्गीतेच्या जन्मभूमीची काय अवस्था आहे? जडवादी राष्ट्रांत देखील जी नीतिमत्ता आढळेल तिचाही येथें पत्ता नाहीं! जगांत वाढीस लागलेलें पशुत्व हिंस्त्र असलें तरी तें निदान सामर्थ्यशील आहे. भारतांतील पशुत्व हिंसक तर आहेच; पण तें दुबळें, भित्रें व आत्मभक्षक आहे! शाश्वत जीवनमूल्यांच्या संरक्षणासाठीं प्रभास क्षेत्रांत आपल्या पुत्रांचेंही बलिदान घेणाऱ्या निर्मम पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांच्या जन्मभूमींत सत्तेचें आसन घट्ट पकडून ठेवण्यासाठीं, स्वत: संमत केलेल्या मूल्यांनाच मशाल लावण्याचा उपक्रम सुरू आहे! प्रजाजनांच्या इच्छाशक्तीसाठीं राणीचा व पुत्रांचा परित्याग करणाऱ्या श्रीरामचंद्रांच्या या भूमींत आपलें चारित्र्य लोकमताच्या चावडीवर जाऊं नये म्हणून विचार व्यक्त करण्याच्या स्वातंत्र्याच्या नरडीला नख लावण्याचे प्रयत्न चालू आहेत! ज्या भूमींत हातानें अजाणतां

अपहार केला म्हणून हात तोडून टाकणारे लिखित व त्या दुष्कृत्याची स्वत:ला जन्मभर आठवण राहावी म्हणून आपल्या अंगरख्याची बाही जन्मभर अर्धीच ठेवणारे तपस्वी दादोजी कोंडदेव उत्पन्न झाले, तेथें आज दानत व प्रामाणिकपणाच्या नांवानें सहारा वाळवंट निर्माण झालें असून दैनिक वृत्तपत्रांचीं पृष्ठें अपहरण, चोरी व हिंसा यांनीं रोज भरलेलीं आढळतात. हें तें रामांचें वा कृष्णांचें, ऋषींचें वा द्रष्टयांचें राष्ट्र आहे काय ? निश्चित नाहीं. मानवी जीवनांतील संपूर्ण पशुत्व नष्ट करून देवजीवन उत्पन्न करण्याचें कार्य इतिहासाच्या ओघांत ज्या राष्ट्रानें अनेकवार केलें व ज्याला तें इतिहाससिद्ध कर्तव्य या नात्यानें पुढेंही करावयाचें आहे तें भारतीय राष्ट्र हें निश्चितच नव्हे. मग तें राष्ट्र कोणतें? त्याचें स्वरूप काय? हें दिग्दर्शित करण्यासाठींच मी ही व्याख्यानमाला दिली. कर्तव्यासाठीं कर्तव्य, चारित्र्यासाठीं चारित्र्य व नीतिमत्तेसाठीं नीतिमत्तेचा अंगीकार करणारी निर्मम व विश्वात्म धारणेची मानवी सृष्टि हे भारतीय राष्ट्रजीवनाचें खरें स्वरूप आहे. असें राष्ट्रजीवन भारतांत निर्माण करून हें राष्ट्र अत्यंत सामर्थ्यसंपन्न केल्यावांचून मानवतेचे आजचे प्रश्न सुटावयाचे नाहींत. भारतांत हें राष्ट्रजीवन उत्पन्न करावयाचें असलें तर भारताच्या प्राचीन ऋषींनीं दिग्दर्शित केलेल्या दिव्य सांस्कृतिक मूल्यांवर आत्यंतिक निष्ठा असलेल्या, त्यांच्या संरक्षणाचा ज्वलंत दृढनिश्चय केलेल्या व त्यासाठीं अवश्य तें सर्व दिव्य करावयास सिद्ध असलेल्या लोकांनीं एकसंधपणानें कटिबद्ध झालें पाहिजे. रामायण-महाभारतांच्या आदर्शांतून आपल्या राष्ट्रजीवनाचें आत्मदर्शन घेऊन तें प्रत्यक्षांत आणण्यासाठीं आपण कटिबद्ध झालों तरच तें ऐकण्याचा खरा उपयोग आहे. मोहवश पार्थाला स्वत:च्या सिंहनादानें जागृत करून त्याच्यांतून महान् कर्मयोगी निर्माण करणारा भगवान् श्रीकृष्ण आपल्याही अंत:करणांत स्फूर्ति उत्पन्न करून चैतन्यानें रसरसलेलें कर्मयोगी हिंदुराष्ट्र निश्चित निर्माण करील असा माझा विश्वास आहे. मात्र त्यासाठीं आपण मार्क्सऐवजीं श्रीकृष्णांकडे आपली दृष्टि वळविली पाहिजे. पुनरुज्जीवनाची इच्छाच ज्या राष्ट्रांतून मरून जाते तें आपोआपच विनाशाची

पाऊलवाट चालूं लागतें. इतिहासाच्या आदर्शांतून आत्मदर्शन जें राष्ट्र घेत नाहीं त्याच्या अंतःकरणांत पुनरुज्जीवनाची इच्छाही निर्माण होत नाहीं. रामायण-महाभारताच्या दिव्य इतिहासांतून हें राष्ट्रीय आत्मदर्शन घडविण्यांत पुनरुज्जीवनाची उत्कट इच्छा या राष्ट्रांत उत्पन्न व्हावी येवढेंच माझें अभिलषित आहे.